श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । श्रीरुक्मिणीपांडुरंगाभ्यां नमः । जयजय भीमातीरविहा-
रा । भक्तवत्सला कृपासागरा । व्यापूनियां चराचरा । असरसी निराळा सर्वातीत ॥१॥ गणेश सरस्वती रूपक । तूं न-
टलासि अनेक । ह्मणऊनि शारदा विनायक । ग्रंथारंभीं नमिलीं म्यां ॥ २॥ नमूं सद्गुरु तुकाराम । जेणें निरसिला भ-
वभ्रम । आपुले नामीं देऊनि प्रेम । भवबंधन निरसिलें ॥ ३ ॥ आतां नमूं महाकवी । व्यास वाल्मीकिमुनि भार्गवी ।
शुक नारद उशनाकवी । जैमिनि आदि नमियेले ॥४॥ आतां नमूं संतसज्जन । जे हरीस आवडती जीवाहून । कलि-
युगीं अवतार धरून । जड मूढ अज्ञान तारिले ॥ ५ ॥ आरंभिला भक्तविजयग्रंथ । हा सिद्धी पाववा तुह्मी समस्त ।
जेविं दुर्बळागृहीं मांडितां कृत्य । साहित्य श्रीमंत करिताती ॥ ६ ॥ जेविं डोळस असतां कृपाघन । अंधासी हिंडवी
तीर्थाटन । तेविं तुह्मीं आपले कृपादानेंकरून । सरतीं वचनें करावीं ॥७॥ मंदमती मी अज्ञान । मीं नाहीं केलें काव्य-
पठन । नाहीं पाहिले ग्रंथ पुराण । गीर्वाण भाषा नेणें मी ॥८॥ परंतु येथें एक असे परी । जे भक्तचरित्रें आवडती हरी ।
ऐसें बोलिला त्रिपुरारी । भविष्योत्तरपुराणीं ॥९॥ ह्मणऊनी हिंसा चित्तीं । मज उपजली अतिप्रीती । चंचूनें टिटवी
अपांपती । कोरडा करीन ह्मणतसे ॥ १० ॥ ज्या हरीचे वर्णितां गुण । श्रुतीस पडलें अति मौन । शेषाच्या जिह्वा चि-
रिल्या जाण । केलें आंथरूण अंगाचें ॥ ११ ॥ ब्रह्मा इंद्र आणि हर । हे नेणती ज्याचा पार । तेथें मी काय पामर । गुण
वर्णूं तयाचे ॥ १२ ॥ बाळकें अघटित घेतां आळ । माता पुरवी तत्काळ । तैसा तो दीनदयाळ । आळ माझी पुरवील
कीं ॥ १३॥ बैसावें पित्याचे मांडीवरु । ऐसें इच्छितां बाळ धुरु । अढळपदीं निरंतरु । स्थापिला जैसा हरीनें ॥ १४ ॥
कीं दुग्ध मागतां वाटीभर । उपमन्यूसि दीधला क्षीरसागर । तैसाचि तो दीनदयाळ उदार । आळ माझी पुरवील कीं
॥ १५ ॥ कृतीं त्रेतीं द्वापारीं । जे भक्त अवतरले पृथ्वीवरी । तेचि कलियुगामाझारीं । प्रगट झाले तारक ॥१६॥ त्यांचीं
चरित्रें वर्णावयास । मज वाटला बहु उल्हास । आतां श्रोतेहो सावकाश । यावें अवधान मजलागीं ॥ १७॥ नेणें मी
कांहीं चातुर्य व्युत्पत्ती । नव्हें बहुश्रुत अध्यात्म ग्रंथीं । नेणें संस्कृत वाणी निश्चितीं । श्रीरुक्मिणीपति जाणतसे ॥१८॥
मागें संतवरदानीं । एकनाथ बोलिले रामायणीं । तैसीं माझीं प्रसाद बोलणीं । वरदवाणी नसे कीं ॥१९॥ नामदेव मु-
क्तेश्वरांनीं । भारतीं वर्णिला चक्रपाणी । तैसीं माझीं प्रसाद बोलणीं । वरदवाणी नसे कीं ॥ २० ॥ श्रीभागवतीं टीका
वामनी । हरिविजय केला श्रीधरांनीं । तैसीं माझीं बोलणीं । वरदवाणी नसे कीं ॥२१॥ बोधराज रामदासांनीं । गीतीं
आळविला कैवल्यदानी । तैसीं माझीं प्रसाद बोलणीं । वरदवाणी नसे कीं ॥२२॥ गणेशनाथ केशवस्वामी । साळया
रसाळ प्रसिद्ध जनीं । कबीर बोलिले हिंदुस्थानीं । देश भाषा आपुली ॥ २३ ॥ ऐसे संत प्रेमळ जनीं । ज्यांचे ग्रंथ ऐ-
कतां श्रवणीं । अज्ञानी होती अतिज्ञानी । नवल करणी अद्भुत ॥ २४ ॥ रेडियामुखें प्रतिष्टानीं । वेद बोलविले ज्ञाने-
श्वरांनीं । ऐसे संत दयाळ गुणी । ग्रंथारंभीं नमियेले ॥२५॥ जेविं गंगेंत मिळतां समरस जाण । वोहळासि आलें पवि-

त्रपण । कीं लोह परिसा लागतां जाण । तें होय भूषण श्रीमंतां ॥ २६॥ कीं राजपुत्राचे वर्णितां गुण । यथार्थ मानिती
प्रधानजन । तेविं भक्तचरित्रें वर्णितां जाण । संतसज्जन तुष्टती ॥२७॥ ना तरी पुराणप्रसिद्ध नसली सरिता । परी सिंधु-
मिळणीं पावे मान्यता । कीं कल्पतरूचे छायेसी बैसतां । दरिद्र आपदा न बाधी ॥२८॥ तेविं मी मतिमंद असतां जाण ।
निजभक्तांचे वर्णितां गुण । कृपा करील रुक्मिणीरमण । भक्तभूषण कृपाळू ॥२९॥ उपजलों जयाचे गोत्रीं जाण । तया
वसिष्ठासी साष्टांगनमन । तेणें आपुले कृपेंकरून । ग्रंथ सिद्धीसी पाववावा ॥३०॥ आतां नमूं मातापिता । ज्यांस स-
कळ तीर्थांहूनि वरिष्ठता । ज्यांचेनि नरदेह तत्त्वतां । लाधला अवचिता निजभाग्यें ॥ ३१ ॥ आमुचे कुळींचें दैवत ।
उभयपक्षीं रुक्मिणीकांत । तयांसि नमितां विबुध समस्त । तृप्त होती निर्धारें ॥३२॥ जैसें समुद्राचें करितां पूजन । स-
कळ सरितांचें संतुष्ट मन । कीं निशापतीचें घेतां दर्शन । सकळ उडुगणें दीसती ॥ ३३ ॥ कीं पृथ्वीप्रदक्षिणा करितां
त्वरित । सकळ क्षेत्रें आलीं त्यांत । नातरी दृष्टीं देखिल्या विनतासुत । पक्षी समस्त आराधिले ॥ ३४ ॥ तेविं उपासि-
तां पांडुरंगदेवत । सकळ सुरवर होती तृप्त । तो देवाधिदेव पंढरीनाथ । भार समस्त तयावरी ॥३५॥ तो बुद्धीचा दाता
चक्रपाणी । जैसी वदवील कवित्ववाणी । ती सादर होऊनि संतसज्जनीं । परिसा श्रवणीं निजप्रेमें ॥ ३६ ॥ ह्मणाल
निजबुद्धीनें त्वरित । आपुले मतीनें रचिला ग्रंथ । तरी तैसें नव्हे जी निश्चित । विकल्प चित्तीं न धरावा ॥ ३७॥ तरी
उत्तरदेशीं साचार । नाभाजी विरिंचि अवतार । तेणें संतचरित्र ग्रंथ थोर । ग्वाल्हेरीभाषेंत लिहिला असे ॥३८॥ आ-
णि खानदेशीं उद्धवचिद्धन । त्यांहीं भक्तचरित्रें वर्णिलीं जाण । दोहींचें संमत एक करून । भक्तविजय आरंभिला ३९
श्रीभीमातीरवासी रुक्मिणीरमण । तेणें दीधलें आश्वासन । ग्रंथ प्राकृत वदविला गहन । तो परिसा सज्जनहो प्रीतीनें
॥ ४० ॥ बाळक बोबडें बोले वचन । परी माता चोज करी ऐकोन । तैसें माझें आर्ष बोलणें पूर्ण । अंगीकाराल वाटतें
॥ ४१ ॥ कीं गंगेसी वोहळ मिळतां जाण । तिणें केला आपुले समान । तेविं तुह्मांसि सलगी करितां जाण । सरतीं व-
चनें होतील कीं ॥ ४२॥ कीं कस्तूरींत मृत्तिका गेली मिळोन । मोलास चढली तिजसमान । तैसेंच माझें प्राकृत भा-
षण । कराल मान्य वाटतसे ॥ ४३॥ नातरी पडतां किंचित जीवन । पय करी आपुल्यासमान । तेविं तुमच्या कृपेंक-
रून । सरतीं वचनें होतील ॥ ४४ ॥ तुह्मी संत ईश्वरमूर्ती । ऐसा निश्चय दृढ चित्तीं । ह्मणोनियां महीपती । नमन करी
सद्भावें ॥४५॥ आतां ऐका चित्त देऊन । श्रीकृष्ण अवतार संपतां जाण । कलियुगीं यज्ञादिदानधर्म । यांचा लोप जा-
हला ॥ ४६ ॥ विप्रीं सांडिला आचार । क्षत्रीं सांडिला विचार । चतुर्थाश्रम साचार । धरामर न करितील ॥४७॥ पुत्र
नायके पितृवचन । शिष्य न करिती गुरुसेवन । भ्रतार स्त्रियांचें वचन ऐकोन । श्वशुरगृहीं राहती ॥ ४८ ॥ कोणासि
नावडे तीर्थाटन । सद्भावें न करिती पुराणश्रवण । हरिकीर्तन टाकून जाण । भोरिप आवडीं पाहती ॥४९॥ शाळग्राम
टाकून धरामरीं । क्षुद्र दैवतें वसविती घरीं । तुळसी रुद्राक्ष टाकूनि दूरी । दरुषणें गळां घालिती ॥५०॥ धनाढ्यासी



नावडे दान । निरोगियासी नावडे तपाचरण । रायासी नावडती प्रजाजन । न्यायनीति राहिल्या ॥ ५१ ॥ कुलस्त्रिया
होती दासी । कन्या विकिती अश्विनी ऐसी । अविंध मारिती गायीसी । कलिराजा प्रकटतां ॥ ५२ ॥ असत्यभाषण
बहु बोलती । साधुजनांची निंदा करिती । खोटें तेंचि खरें दाविती । साक्ष देती सकळिक ॥५३॥ गायत्रीचा लोप झा-
ला । साबरीमंत्र प्रकटला । विश्वास देऊनि भाविकांला । घात करितील निर्दय ॥ ५४ ॥ पाषाण होऊन देव बैसले ।
तयांसी अविंध फोडिती बळें । तीर्थीं कर बैसविले । थोर पीडिलें कलीनें ॥ ५५ ॥ असत्याएवढें पाप नाहीं । सत्याए-
वढें सुकृत नाहीं । कलीनें सत्य लोपविलें अवघेंही । दोष झाले अपार ॥ ५६ ॥ राहूचा उदय होतां जाण । अंधारें कोंदे
जैसें गगन । कीं जवळ येतां मरण । देहीं रोग एकवटती ॥ ५७ ॥ जैसी रजनी प्रकटतां जाण । पिशाचें उठती मसणां-
तून । कीं पुरुष देखोनि प्राक्तनहीन । दुःखदैन्य येतसे तेथें ॥ ५८ ॥ कीं गुरु क्षोभतांचि जाण । त्यापुढें प्रकटे अज्ञान ।
कीं तारुण्यदशा येतांचि पूर्ण । देहीं अहंता विस्तारे ॥ ५९ ॥ नातरी कुटिल येतां सभेसी । निंदा प्रकटे आपैसी । कलि
उद्भवतां दुरितें तैसीं । प्रकट झालीं अपार ॥ ६० ॥ बदरिकाश्रमासी ऋषि गेले । इतर ब्राह्मणीं आचार सांडिले । ऐसें
होतांच एक वेळे । पृथ्वीकंप जाहला ॥ ६१ ॥ यावरी वैकुंठीं श्रीहरी । निजभक्तांशीं विचार करी । अद्भुत पाप मही-
वरी । मृत्युलोकीं जाहलें ॥६२॥ यज्ञ याग सर्व राहिले । ब्राह्मणीं सत्कर्म टाकिलें । अज्ञानजन बुडाले । दुःखार्णवा-
माझारीं ॥ ६३ ॥ ऐसियास काय विचार । ऐसें बोलतां क्षीराब्धिजावर । तंव अवघे भक्त जोडोनि कर । सन्मुख उभे
राहिले ॥ ६४ ॥ मग ह्मणती हृषीकेशी । कांहीं आज्ञा करावी आह्मांसी । तेव्हां क्षीरसागरविलासी । निजभक्तांसी
बोलत ॥ ६५॥ आह्मीं मागें अवतार धरूनी । दुष्ट दैत्य टाकिले मारूनी । निर्वैर केली सर्व धरणी । आतां बौद्ध हो-
ऊनि बैसलों ॥ ६६॥ यावरी तुह्मीं सकळिकीं । अवतार घेऊनि मृत्युलोकीं । माझीं स्थानें आहेत जितकीं । महाक्षेत्रें
पुरातनें ॥ ६७ ॥ पंढरीक्षेत्र दिंडीरवन । तेथें उद्धवें अवतार धरून । दक्षिणदेशींचे सर्व जन । माझे भक्तीसीं लावावे
॥६८॥ मथुरा गोकुळ वृंदावन ॥ तेथें अक्रूरें अवतार धरून । माझे भक्तीस अवघे जन । उपदेश करूनी लावावे ॥६९॥
दारुक भक्त पश्चिम दिशेस । अवतार धरूनि रामदास । माझे भजनीं सकळ देश । लाऊनि उद्धार करावा ॥७०॥ पूर्व
दिशेसी जगन्नाथ । व्यास अवतार धरून तेथ । माझीं चरित्रें आति अद्भुत । जनासी श्रवण करवावीं ॥ ७१ ॥ हस्त-
नापुर क्षेत्र जाण । तेथें वाल्मीकें अवतार धरून । माझे भजनीं सकळ जन । अति आदरें लावावे ॥ ७२॥ राम अव-
तार म्यां घेतला । तुह्मी वानर झालेति त्यावेळां । रावण मारून इंद्र सोडविला । सकळ देवांसहित ॥७३॥ तेचि कृष्णा-
वतारीं गोपाळ । कोणी यादव झाले प्रेमळ । कंसादिदैत्य निर्दाळूनि सकळ । गोब्राह्मण रक्षिले ॥ ७४ ॥ आतां बुद्धा-
वतार धरून । उगाच निवांत राहिलोंजाण । तुह्मावांचूनि माझें कीर्तन । जनासि श्रवण कोण करवी ॥७५॥ तुह्मांलागीं
मी झालों सगुण । येरवीं मज पुसते कोण । भक्तांवांचूनि मजकारण । कोणी जिवलग दिसेना ॥७६॥ ऐसें बोलतां

कमळावर । भक्त करिती जयजयकार । ह्मणती तूं दीनदयाळ ईश्वर । कळलें साचार आह्मांसी ॥ ७७ ॥ सूर्यापासाव
जैसे किरण । कीं मृत्तिकेपासाव सुवर्ण । तैसे आह्मी भक्तजन । तुझेनि पावन श्रीहरी ॥ ७८ ॥ कीं जीवनापासोनि वृक्ष
जाण । कीं आकाशीं असे तारागण । तैसे आह्मी भक्तजन । तुझेनि संपन्न श्रीहरी ॥७९॥ तंतूपासूनि पट जाण । कीं दी-
पापासूनि प्रभाघन । तैसे आह्मी भक्तजन । तुझेनि पावन श्रीहरी ॥ ८० ॥ जीवनापासोनि जळचरें जाण । कीं पुष्पां-
पासूनि मकरंद पूर्ण । तैसे आह्मी भक्तजन । तुझेनि थोर दिसतसों ॥ ८१ ॥ सुवर्णापासाव जैसें कंकण । आकाशापा-
साव निघे पवन । तैसे आह्मी भक्तजन । तुझेनि सगुण झालों कीं ॥८२॥ वोडंबरियाचीं बाहुलीं । नाचवित्याचेनि सू-
त्रें नाचलीं । तैसी लंका घेवविली । आह्माहातीं रघुवीरा ॥८३॥ पांवा ध्वनी मधुर बोलिला । परी वाजवित्याचेनि
वाजला । तैसाच कृष्णावतारीं करविला । आमचे हातें प्रताप ॥ ८४ ॥ तुझ्या इच्छेनें सकळिक । होती जाती ब्र-
ह्मादिक । अनंत ब्रह्मांडें देख । घडिसी मोडिसी स्वइच्छें ॥ ८५॥ आतां आह्मांसी ज्या रीतीं । आज्ञा करिशील श्री-
पती । तैसे जाऊनि सत्वरगती । जन भक्तीसी लावूं कीं ॥८६॥ ऐसें ऐकोनि कमळावर । उद्धवासि बोले प्रत्युत्तर ।
शिंपियाचे वंशीं अवतार । नामदेव तूं होईं ॥ ८७ ॥ पंढरीक्षेत्र भूमंडळीं । अवतार धरूनि तये स्थळीं । माझी अनं-
तनामावळी । जनासी श्रवण करवावी ॥ ८८ ॥ रामकृष्णादि अवतार घेऊनी । जीं चरित्रें दाविलीं तुह्मांलागुनी ।
तीं जनाचिये श्रवणीं । सर्व तुवां पाडावीं ॥ ८९ ॥ कलियुगामाजी एक । माझें नाम आहे तारक । ऐसें सांगे रमा-
नायक । उद्धवासी ते वेळीं ॥ ९० ॥ शुकासि सांगे हृषीकेशी । त्वां अवतरावें अविंधवंशीं । अयोनिसंभव जन्म तु-
जसी । निश्चयेंसी देईन ॥ ९१ ॥ निमित्तमात्र जाऊनि तेथ । होईं माझा कबीर भक्त । नाममहिमा अति अद्भुत । प्र-
कट त्वरित करावा ॥ ९२ ॥ मग वाल्मीकासि ह्मणे जगन्निवास । तूं ब्राह्मण होईं तुलसीदास । निजभक्तिप्रेमा अति
विशेष । दाखवीं जनांसी कलियुगीं ॥ ९३ ॥ शतकोटि रामायण । तूं भविष्य बोलिलासि पुरातन । तेंचि महिमा
प्राकृत करून । लावीं जन भक्तीसी ॥ ९४ ॥ दारुका तूं डाकुरासी । रामदास ब्राह्मण होईं त्वरेंसी । मी द्वारकेहून तु-
झे भक्तीसी । धांवून येईन सत्वर ॥ ९५ ॥ शंकरासि सांगे विश्वकर्ता । तुह्मीं व्हावें नरसीमेहता । जुनागढीं भक्तिमा-
र्गकथा । जनां समस्तां ऐकवीं ॥ ९६ ॥ तुह्मीं पुढें व्हावें सत्वरें । मीही मागून येतों त्वरें । ज्ञानेश्वररूपें निर्धारें । अर्थ
गीतेचा सांगेन ॥९७॥ ब्रह्मा होईल सोपान । सदाशिव निवृत्ति पूर्ण । आदिमाया मुक्ताईरूपें जाण । अवतरेल भू-
मंडळीं ॥ ९८ ॥ ऐसें बोलतां वनमाळी । जयजयकारें पिटिली टाळी । देवीं पुष्पवृष्टी केली । आनंदले निर्जर ॥ ९९ ॥
ह्मणती धन्य आजिचा दिन । आह्मांवरी तुष्टला जगज्जीवन । आतां मृत्युलोकीं अवतार घेऊन । उद्धार करूं
आपुला ॥ १०० ॥ वैकुंठ कैलासाहूनि अधिक । आह्मांस दिसतो मृत्युलोक । पापपुण्य तेथें पिक । यज्ञयागादिक
हवनें ॥ १ ॥ कर्मभूमीस सुकृत केलें । तें स्वर्गलोकीं सर्व वेंचलें । मागुती लोटून दीधलें । कर्मभूमीस पुढती पैं ॥ २ ॥



मृत्युलोकीं जोडती हरिचरण । मृत्युलोकीं जोडे वैकुंठभुवन । येथें जन्मतां हरिकीर्तन । श्रवणीं पडे सर्वांच्या ॥ ३ ॥
ह्मणउनि कर्मभूमीसी अवतार । अवघे घेऊं निर्जर । ऐसें बोलूनि सत्वर । सुरवर इंद्रभुवनीं गेले ॥ ४ ॥ आतां क-
रावया विश्वोद्धार । अवतार घेतील वैष्णववीर । त्यांचीं चरित्रें सविस्तर । ऐका सादर निजकर्णीं ॥ ५ ॥ नातरी ऐसें
ह्मणाल मनीं । या कथा नाहींत व्यासोक्तपुराणीं । हा विकल्प चित्तांत आणुनी । संशयवनीं पडाल ॥ ६ ॥ तरी भ-
विष्योत्तरपुराणांत । स्वयें बोलिला पराशरसुत । कीं कलियुगीं अवतार घेतील भक्त । नीचयोनींत स्वलीलें ॥ ७ ॥
अघटित चरित्रें दावूनि जनीं । स्वाधीन करितील चक्रपाणी । नाममहिमा प्रकट करूनी । सिद्धांतज्ञानीं निमग्न
॥ ८ ॥ ते हे निजभक्त वैष्णवजन । कोणता अवतार घेतील कोण । त्याचें सविस्तर झालें कथन । तें परिसा सज्जन
निजप्रीतीं ॥ ९ ॥ पुढिले अध्यायीं निरूपण । श्रीजयदेवचारित्र अतिपावन । महीपती ह्मणे अवधान । संतसज्जनीं
मज द्यावें ॥ ११० ॥ स्वस्तिश्री भक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । प्रथमाध्याय र-
साळ हा ॥ १११ ॥ ओंव्या १११ ॥ अध्याय १ ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु ॥

॥ श्री भक्तविजय अध्याय १ ला समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीगोपालकृष्णाय नमः । यावरी व्यासासी सांगे राजीवनयन । त्वां कथिलीं पुराणें संपूर्ण । त्यां-
च्या अर्थ न कळे गहन । अज्ञानजनां कलियुगीं ॥ १ ॥ तूं जयदेवरूपें अवतार । घेऊनि करीं जनांचा उद्धार । ऐसें ऐ-
कूनि नमस्कार । व्यासें घातला साष्टांग ॥२॥ जगन्नाथक्षेत्रासमीप जाण । तुंदुबिल्व ग्राम नामाभिधान । ब्राह्मणवं-
शीं अवतार पूर्ण । तेथें घेतला श्रीव्यासें ॥ ३ ॥ वर्णांमाजी उत्तमवर्ण । चारी वर्णांत मुख्य ब्राह्मण । तेथें पराशरनंदन ।
अवतरलासे निजलीलें ॥४ ॥ दिवसेंदिवस थोर झाला । मायबापें व्रतबंध केला । अभ्यास न करितां झाला । सर्वशा-
स्त्रीं निपुण पैं॥५॥ तारागणांत न लोपे चंद्र । कीं पक्षियामाजी जैसा खगेंद्र । कीं देवांमाजी इंद्र । न लोपेची सर्वथा॥६॥
तापसियांमाजी शंकर जाण । कीं यादवांमाजी रुक्मिणीरमण । कनकांमाजी जैसें रत्न । लोपविलिया लोपेना ॥७॥
सेनेमाजी प्रतापशूर । कीं आकाशांत जैसा दिनकर । कीं थिल्लरांत समुद्र । झांकिलिया झांकेना ॥ ८ ॥ अज्ञानांत नि-
पुण श्रोता ॥ कीं हरिकीर्तनीं जैसा वक्ता । पक्षियांत राजहंस तत्त्वता । दुरूनि वोळखिती सुजाण ॥९॥ रंकांमाजी जै-
सा राव । कीं सकळ साधनांत शुद्धभाव । तैसा ब्राह्मणवंशीं जयदेव । निपुण वक्ता दिसतसे ॥१०॥ श्रुति शास्त्रें धुंडा-
ळून । पाहिलीं पुराणें संपूर्ण । तयांमाजी मुख्य साधन । हरिकीर्तन कलियुगीं ॥ ११ ॥ उद्धवासि सांगे रुक्मिणीरम-
ण । कलियुगीं करावें माझें भजन । ह्मणोनि जयदेवकवीनें कवन । गीतगोविंद ग्रंथ केला ॥ १२॥ पद्मपुराणींचा इ-
तिहास । त्यांत वर्णिला राधाविलास । गोकुळीं क्रीडला जगन्निवास । कृष्णावतारीं निजलीलें ॥ १३॥ आधींच श्री-
हरीचे गुण जाणा । त्यावरी जयदेवें केली पद्यरचना । सुवर्णाचिया कंकणा । रत्न कोंदणीं बसविलें ॥ १४ ॥ गीतगो-
विंद ग्रंथ केला । तो सकळलोकीं लिहून नेला । पाठ करूनि हरीची लीला । घरोघरीं गाताती ॥१५॥ पुष्पें असती ए-
के स्थळीं । परी सुवास धांवे भूमंडळीं । तैसाच ग्रंथ उर्वीस्थळीं । गीतगोविंद प्रकटला ॥१६॥ तों जगन्नाथीं राजा
एक । नाम तयाचें सात्त्विक । त्याणेंही ग्रंथ केला एक । जयदेवस्वामीसारिखा ॥१७॥ त्या ग्रंथाच्या करूनी प्रती । लो-
कांस पाठवी भूपती । ह्मणे पाठ करावा समस्तीं । या ग्रंथाचा निर्धारें ॥१८॥ ऐसें ऐकोनि वर्तमान । पंडित कोपले स-
र्वज्ञ । जगन्नाथीं मिळूनि सर्वजन । राजयासी बोलती ॥१९॥ ह्मणती तुवां जो ग्रंथ केला । तो तुझाचि तुज मानवला ।
जयदेवाचे साम्यतेला । आहे ह्मणोनि जल्पसी ॥ २० ॥ तरी सर्वज्ञ जे कां होती । ते स्वमुखें कीर्ति न वर्णिती । तूं सांग-
तोसी जनांप्रती । माझा ग्रंथ पाठ करा ॥ २१ ॥ विद्या आणि हरिकीर्तन । गुरुमंत्र आणि ब्रह्मज्ञान । पुष्पहार आणि
महारत्न । घ्या घ्या ह्मणतां मोल तुटे ॥२२॥ कस्तूरी आणि मैलागिरीचंदन । केशर आणि जवादी जाण । उत्तम क-
विता चतुरपण । स्वमुखें वर्णितां मूर्खत्व ये ॥२३॥ कन्या आणि मुक्ताफळ । पुस्तक आणि उंचवस्त्र केवळ । कृष्णागरु
आणि मलयानिल । लावणी लावितां मोल तुटे ॥२४॥ ब्राह्मण ह्मणती नृपनाथा । तुवां ग्रंथ केला वृथा । चित्तीं धरि-
ली अहंता । जगन्नाथासि न माने ॥२५॥ मग ह्मणे नृपवर । दोन्ही ग्रंथ आणा सत्वर । श्रीजगन्नाथासमोर । रात्रीं ठेवूं

भ० नेऊनी ॥२६॥ जयदेवें वर्णिले हरीचे गुण । म्हीं तैसेंच बोलिलों जाण । जो हरीस होईल अमान्य । बाहेर टाकूनि दे- अ.
ईल तो ॥ २७ ॥ दोनी ग्रंथ आणोनि सत्वर । ठेविले जगन्नाथासमोर । कुलुपें घालोनि बाहेर । पुजारी आले तेधवां
॥ २८ ॥ दुसरे दिवशीं प्रातःकाळीं । अवघी मिळोनि विप्रमंडळी । काकड आरतीस ते वेळीं । पुजारी आले राउळांत २
॥२९॥ तो जयदेवाचा ग्रंथ उत्तम । जवळी ठेवी पुरुषोत्तम । राजाचा अवमानून परम । टाकिला बाहेर देखती॥३०॥
जयजयकारें पिटिली टाळी । आनंदली विप्रमंडळी । अधोवदन ते वेळीं । खालीं पाहे नृपनाथ ॥३१॥ पंडित ह्मणती
राजयाला । क्षीरनीराचा निवाडा झाला । वेदांत आणि कोकशास्त्राला । साम्यता कैशी येईल ॥३२॥ राजहंस आ-
णि काग । कीं सर्वज्ञपंडित आणि मांग । बेगड आणि सुवर्ण चांग । साम्यता कैशी येईल ॥३३॥ बाभूळ आणि चंद-
न । कीं मैळागिरी आणि हिंगण । सज्जन आणि दुर्जन । साम्यता कैशी येईल ॥३४॥ साधु आणि निंदक । कीं कपटी
आणि भाविक । इंद्र आणि रंक । साम्यता केविं होईल ॥ ३५ ॥ तैसें तुझें हें कवित । आणि जयदेवाचा गोविंदगीत ।
साम्यतेशीं नये निश्चित । जगन्नाथें टाकिला ॥३६॥ ऐसें ऐकोनि नृपवर । लज्जायमान झाला थोर । श्रीजगन्नाथास-
मोर । जाऊनि उभा राहिला ॥ ३७ ॥ जोडोनियां बद्धांजली । देवासी ह्मणे ते वेळीं । आज तुझी ब्रिरुदावली । जग-
न्नाथा कळलीसे ॥ ३८ ॥ नाम तुझें पतितपावन । तें असत्य वाटलें मजकारण । एकाचा अव्हेर करून । एकास आपुले
ह्मणविसी ॥३९॥ तूं सर्वघटीं समसमान । व्यापक अससी नारायण । भक्त अभक्त दोघेजण । तुझे सत्तेनें वर्तती ॥४०॥
सर्वांघटीं बिंबला अर्क । कीं गाईव्याघ्रांस जैसें उदक । तैसा तूं यदुनायक । सर्वांघटीं सारिखा ॥४१॥ शलभ आणि
गरुडास । समान जैसें आकाश । तैसाचि तूं जगदीश । सर्वांघटीं सारिखा ॥४२॥ अज्ञान आणि शाहाणें जाण । माते-
सि बाळक समान । तैसा तूं पतितपावन । सर्वांघटीं सारिखा ॥४३॥ राजा आणि रंक दीन । दोघांसि सारिखेंच चां-
दणें जाण । तैसा तूं रुक्मिणीरमण । सर्वांघटीं सारिखा ॥४४॥ जयदेवाचे मुखें बोलता । तूंचि होसी जगन्नाथा । आ-
णि माझे देहीं चालविता । कोण अनंता सांगें मज ॥४५॥ ऐसें असतां जगन्नाथा । तुवां टाकिलें माझिया ग्रंथा । तरी
मी प्राण देईन आतां । ऐसें बोले नृपवर ॥४६॥ ऐसें ऐकोनि करुणावचन । प्रसन्न झाला नारायण । राजयाचे ग्रंथांतून ।
चोवीस श्लोक घेतले ॥४७॥ जयदेवाचे ग्रंथीं लिहून । तत्काळ ठेवी जगज्जीवन । राजयाचें समाधान । इतुकेन झालें
तेधवां ॥४८॥ यावरी जगन्नाथक्षेत्रीं । एक ब्राह्मण होता अग्निहोत्री । त्याचे उदरीं पद्मावती । कन्यारत्न जन्मलें॥४९॥
पद्माक्षी ऐसें जाण । तिचें रूप दिसे लावण्य । ह्मणोनियां द्विजोत्तम । नाम ठेवी पद्मावती ॥ ५० ॥ ब्राह्मण विचारी पा.
मानसीं । कन्यालावण्यगुणराशी । तरी हे जगन्नाथासी । मनोभावें अर्पावी ॥५१॥ रूपलावण्य देखोन । तीस मागों ४
येती द्विजोत्तम । तयांसि सांगे ब्राह्मण । कृष्णार्पण हे केली ॥५२॥ ऐसें कळलें सकळांस । थोर जाहली दिवसेंदिवस ।
स्वप्नीं जाऊनि जगन्निवास । ब्राह्मणासी काय बोले ॥ ५३ ॥ जगन्नाथ ह्मणे विप्रासी । कन्या अर्पिली तुवां मजसी ।

तरी मी बौद्धरूपें जनांसी । कलियुगांत राहिलों ॥ ५४ ॥ आतां जयदेव कवि पूर्ण । माझाच अंश असे जाण । सालं-
कृत कन्यादान । तयालागीं अर्पावें ॥ ५५ ॥ ऐसें होतांचि स्वप्न । चित्तीं हर्षला ब्राह्मण । जयदेवस्वामीस पाचारून ।
लग्ननिश्चय पैं केला ॥ ५६ ॥ ब्राह्मणीं घटितार्थ पाहिले । गुण छत्तीसही उतरले । सर्वेंच सकळ साहित्य केलें । अलं-
कारांसमवेत ॥ ५७ ॥ देवकप्रतिष्ठा ब्राह्मणभोजन । केलें निर्विघ्नाचें पूजन । अंतःपट धरूनि ब्राह्मण । मंगलाष्टकें बो-
लती ॥ ५८ ॥ केशवा नारायणा माधवा । गोविंदा गोपाळा देवाधिदेवा । मधुसूदनारे माधवा । वधूवरांसी रक्षीं तूं
॥ ५९ ॥ कृष्ण विष्णो वामन रामा । भक्तकैवारिया गुणधामा । बलिबंधना त्रिविक्रमा । वधूवरांसी रक्षीं तूं ॥ ६० ॥ गो-
कुळपालका द्वारकावासी । पंढरीशा हृषीकेशी । जगत्पालका सद्गुणराशी । वधूवरांसी रक्षीं तूं ॥६१॥ वैकुंठवासिया
रुक्मिणीरमणा । क्षीरसागरीं शेषशयना । भक्तपालका गुणनिधाना । वधूवरांसी रक्षीं तूं ॥ ६२ ॥ राघवेशा अयो-
ध्यावासी । संकटीं रक्षिता निजभक्तांसी । अष्टकें ह्मणोनि ऐसीं । लग्न लाविलें ब्राह्मणीं ॥६३॥ झाला एकचि ज-
यजयकार । वाद्यें वाजती अपार । सोहळा करून दिवस चार । जन वऱ्हाडी गौरविले ॥ ६४ ॥ असो आतां जगन्ना-
थीं । जयदेवस्वामींनीं केली वस्ती । नित्य हरीचे गुण वर्णिती । कीर्तन करिती सप्रेमें ॥६५॥ तंव एक होता सावकार ।
प्रेमळ भाविक अति उदार । जयदेवें पाहूनि अधिकार । तयासी अनुग्रह दीधला ॥६६॥ अविश्वासी आणि कृपण । पाहे
लोकांचे दोषगुण । परद्रव्याभिलाषी पूर्ण । ऐसा शिष्य करूं नये ॥ ६७ ॥ अनाचारी परम खळ । पितृद्रोही अति चांडा-
ळ । परदारालुब्ध केवळ । ऐसा शिष्य करूं नये ॥६८॥ अति वाचाळ बहुभाषण । जयासी नावडे हरिकीर्तन । अनुभ-
वाविण सांगे ब्रह्मज्ञान । ऐसा शिष्य करूं नये ॥६९॥ वेदशास्त्रांचा विश्वास नाहीं । संतवचन नायके कांहीं । सर्वांभूतीं
दया नाहीं । ऐसा शिष्य करूं नये ॥७०॥ तैसा नव्हे सावकार । परम भाविक अति उदार । गुरुसेवेसी अति तत्पर । का-
यावाचामनेंसी ॥ ७१ ॥ जयदेवस्वामीसी विनंती करी । तुह्मी चलावें माझिये घरीं । स्वामीस बैसवूनि रथावरी । नगरा
नेला आपुल्या ॥७२॥ श्रीहरीचें गुणकीर्तन । आत्मचर्चा ब्रह्मज्ञान । सत्समागमावांचून । प्राप्त नव्हे सर्वथा ॥७३॥ क्षमा
शांति दया पूर्ण । निष्कामबुद्धि यज्ञ दान । सत्समागमावांचून । प्राप्त नव्हे सर्वथा ॥७४॥ उदार धैर्य निष्ठा ज्ञान । प्रा-
णायाम वज्रासन । सत्समागमावांचून । प्राप्त नव्हेचि सर्वथा ॥ ७५ ॥ ह्मणोनि जयदेवस्वामीस । सावकारें नेलें घरास ।
सेवा करी रात्रदिवस । अति उल्हासें करूनी ॥७६॥ जयदेवस्वामी तया नगरीं । रात्रदिवस कीर्तन करी । जड अज्ञान
दुराचारी । तेही भक्तीस लाविले ॥७७॥ एक मास तेथें राहून । सावकारासि बोले वचन । निरोप द्यावा आह्मांलागून ।
जगन्नाथासी जावया ॥७८॥ जयदेवासी बोले सावकार । माझे मस्तकीं ठेवा जी कर । कृपा असोंद्या सेवकावर । निरं-
तर ऐसीच ॥७९॥ बैसवून कनकासनीं । पूजा केली प्रेमेंकरूनी । सावकार विचारी मनीं । गुरुदक्षिणा काय द्यावी ८०
रत्नें रुपें आणि सुवर्ण । स्वामीस मृत्तिकेसमान । परी गुरुमातेकारण । कांहीं द्रव्य पाठवावें ॥८१ ॥ स्वामीस न कळ-

तां जाण । नाना परींचीं दिव्यरत्नें पूर्ण । मुक्ताहार भूषणें सुवर्ण । रथावरी घातलीं ॥ ८२ ॥ त्यावरी घालूनि आसनें । जयदेवासि बैसविला सन्मानें । सवें मनुष्य देऊनि शहाणे । बोळवीत चालिला ॥ ८३ ॥ मनुष्यासी सांगे ते अवसरीं । तुवां जाऊनि यांचे घरीं । पद्मावतीच्या चरणावरी । नमन माझें सांगिजे ॥ ८४ ॥ स्वामीस नकळतां जाण । म्यां दिधलीं वस्त्रें भूषण । हीं गुरुमातेस समर्पून । मागुती येईं सत्वर ॥८५॥ बोळवूनि जयदेवासी । सावकार आला नगरासी । तों दोघे चोर ते दिवसीं । तयामागून चालिले ॥ ८६ ॥ तस्करांसि कळलें वर्तमान । जयदेव गेला येथून । सावकारें केलें गुप्तदान । ह्मणून दोघे चालिले ॥ ८७ ॥ सवें मनुष्य दीधला सावकारें । तो जयदेवासि काय बोले । माझे घरीं अति जरूरें । कार्य असे आजि एक ॥ ८८ ॥ ऐसें ऐकोनि वचन । जयदेव बोले त्यालागून । तुवां मागें परतोनि जाऊन । कार्यसिद्धी करावी ॥८९॥ दासी दास आणि कांता । पशु वृक्ष जाण तत्वतां । किडाभुंगी योनी हिंडतां । पराधीन जिणें कीं ॥ ९० ॥ ह्मणोनियां जयदेवासी । दया उपजली चित्तासी । आज्ञा देऊनि मनुष्यासी । मागुता घरासी पाठविला ॥९१॥ एकलाचि रथ हांकित । जात असे अरण्यांत । तों दोघे चोर अकस्मात । मागून आले तेधवां ॥ ९२॥ येऊनि जयदेवासमोर । तस्करीं केला नमस्कार । बक जैसे गंगातीर । वेष्टोनियां बैसती॥९३॥ तैसे अकस्मात दोघेजण । दोहींकडे चालिले त्वरेन । जयदेवासी कळलें चिन्ह । तस्करांचें तेधवां ॥ ९४ ॥ कुटिल कपटी दुराचार । शठ तस्कर आणि जार । अभाविक निंदक खल नर । दुरून सुजाण ओळखिती ॥९५॥ जयदेवासी कळलें चिन्ह । तस्करांसी बोले वचन । काय इच्छी तुमचें मन । तें पुरवीन ये काळीं ॥९६॥ वस्त्रें अलंकार भूषणें । नानापरींचीं दिव्य रत्नें । रथावरी आहेत जाणें । तुह्मांसी अर्पण हीं केलीं ॥ ९७॥ द्रव्यापाशीं आति अनर्थ । द्रव्यामुळें प्राणघात । ह्मणोनि जयदेवें टाकूनि रथ । पुढें सत्वर चालिला ॥ ९८॥ तस्कर विचारिती स्वमनीं । जयदेव गेला रथ टाकुनी । पुढें सावकारासी सांगूनी । आह्मांसि शिक्षा करवील ॥९९॥ तरी याचा करून प्राणघात । आपण घेऊनि जाऊं रथ । ऐसें ह्मणोनि त्वरित । समीप आले धांवूनी ॥१००॥ मागुती दोघे विचार करीत । याचा न करावा प्राणघात । दोन्ही चरण आणि हात । तोडोनि पेंवांत टाकिला ॥ १ ॥ रथ घेऊनियां चोर । नगरा गेले सत्वर । जयदेवें अंतरीं श्रीधर । प्रेमभावें आठविला ॥ २॥ ज्ञानदृष्टीं विचार करित । ह्मणे देहासीच असे घात । आत्माराम तो अलिप्त । सुखदुःखावेगळा ॥३॥ देह सकळ रोगांचें घर । देह कामक्रोधांचें मूळ साचार । त्रिगुणांचे विकार । देहापासून उठती पैं ॥ ४ ॥ याकारणें देहातीत । जयदेव होऊनि त्वरित । अंतरीं आठविला श्रीभगवंत । क्षीरसागरविलासी जो ॥ ५॥ तों क्रौंचराजा तये दिवसीं । वनांत आला शिकारीसी । रात्र झाली तयासी । अरण्यांत हिंडतां ॥ ६ ॥ तंव त्या पेंवांत ते वेळां । अकस्मात प्रकाश देखिला । राजा सत्वर चालिला । पहावयासी तेधवां ॥ ७॥ तों परमतेजस्वी देदीप्यमान । विष्णुभक्त बैसला धरूनि ध्यान । मुखीं करीत नामस्मरण । राम कृष्ण गोविंद ॥ ८॥ ऐसें देखोनि नृपवर । तयासि घातला साष्टांग



नमस्कार । न्याहाळूनि पाहे सत्वर । तों करचरण छेदिले ॥९॥ राजा भयभीत झाला । जयदेवासी काय बोलिला । स्वामी ऐसी आपणाला । कां अवस्था घडली हे ॥ ११० ॥ जयदेव राजासी बोलत । ऐसाच आहें मी उपजत । करचरणविरहित । सकळ इंद्रियांवेगळा ॥११॥ राजा विचारीत मनीं । विष्णुभक्त आहे पूर्णज्ञानी । शिबिकेंत स्वामीस बैसवूनी । नगरासि गेला आपुल्या ॥१२॥ बैसवूनि कनकासनीं । पूजा केली प्रीतीकरूनी । जयदेवास विनीत होऊनी । त्यांचा अनुग्रह घेतला ॥१३॥ आपुले सिंहासनीं बैसवूनी । सेवकांसि सांगे तेक्षणीं । स्वामीची सेवा प्रतिदिनीं । समाज्ञेनें करावी ॥१४॥ सेवक ह्मणती नृपनाथा । भाग्योदय झाला आतां । संतदर्शन कीर्तन कथा । श्रवणीं पडेल आमुचे ॥ १५॥ तंव कोणे एके दिवसीं । राजा विचारी मानसीं । कांहीं साधन स्वामीसी । पुसावें आजि जाऊनी ॥१६॥ जयदेव बैसले सिंहासनीं । राजा विनवी कर जोडोनी । कांहीं सेवा मजलागूनी । कृपा करूनि सांगावी ॥१७॥ जयदेव ह्मणे राजयास । त्वां भजावें संतांस । याहूनि साधन विशेष । नसे आणिक नृपनाथा ॥ १८॥ घरास येती संतसज्जन । तयांसि द्यावें इच्छाभोजन । वस्त्रें द्रव्य सुवर्ण भूषण । सांगती तीं अर्पावीं ॥१९॥ ऐसी करितां संतसेवा । संतोष वाटे वासुदेवा । संतसेवक आवडती देवा । लक्ष्मीहूनि विशेष ॥१२०॥ राजा ह्मणे स्वामीसी । कैसें वोळखावें संतांसी । हें सर्वथा नकळे मजसी । अज्ञानदर्शेंकरूनियां ॥२१॥ यावरी पद्मावतीरमण । ह्मणे ऐक संतचिन्ह । ऊर्ध्वत्रिपुंड्र द्वादश टिळे जाण । कंठीं भूषण तुळसीचें॥२२॥ ऐसे ते चिन्हीं वैष्णवजन । त्यांसि रिघावें अनन्य शरण । ऐसें ऐकोनियां वचन । अवश्य ह्मणे नृपनाथ ॥२३॥ गुरु आज्ञा वंदोनि शिरीं । राजा संतांची सेवा करी । कीर्ति ऐकोनि ते अवसरीं । वैष्णव येती घरासी ॥ २४॥ वृक्ष देखोनि छायेसी । पांथ येती वस्तीसी । कीं चारा देखोनि पक्षी । उल्हासें येती त्या ठायीं ॥२५॥ दातयाची कीर्ति ऐकून । धांवून येती याचकजन । कीं पिपीलिका साखर देखोन । अतिउल्हासें धांवती ॥२६॥ धेनु येतां रानांतून । वत्सें धांवती त्वरेंकरून । कीं महापर्वत देखोन । मेघ आनंदें वर्षती ॥२७॥ घनगर्जना ऐकोनि कानीं । मयूर नाचती आनंदेंकरूनी । कीं युद्ध देखोनि रणकंदनीं । प्रतापी शूर धांवती ॥२८॥ तैसें राजाचें भक्तिचिह्न । पाहावया येती संतजन । आधीं जयदेवासी भेटोन । राजदर्शन मग घेती ॥२९॥ राजा देखोनि संतजन । तयांसी घाली लोटांगण । चातुर्मास्य घरीं नेऊन । इच्छाभोजन देतसे ॥१३०॥ जें जें वैष्णव मागत । तें तें तयांसी देत नृपनाथ । वस्त्रें भूषणें अपरिमित । द्रव्य देत मागती तें ॥ ३१॥ असो ऐसें वर्तमान । तस्करांसि कळलें जाण । जयदेवाचे करचरण । ज्यांनीं तोडून टाकिले ॥३२॥ ह्मणती आपण होऊनि संत । दृष्टीं पाहूं नृपनाथ । द्रव्य देईल अपरिमित । ऐसी युक्ती योजिली ॥३३॥ जयदेव आहे तये ठायीं । हें तयांसि ठाऊक नाहीं । संतवेष धरिला पाहीं । कपटीयांनीं तेधवां ॥३४॥ घेऊनि गोपीचंदन । द्वादश टिळे रेखिले जाण । तुळसीमाळा गळां घालून । घवघवित दिसताती ॥३५॥ मुनीश्वरापरीस जाण । बकाचें सुंदर दिसे ध्यान । कीं कर्दळीपरीस दुरून । शेर हिरवे दीसती

॥३६॥ सुवर्णापरीस लखलखित । बेगड जैसें दुरूनि दीसत । नातरी केशरी रंगांत । पतंगी दीसत आगळा ॥३७॥ हरिदासांपरीस जाण । गोरियाचें सुंदर गायन । कीं रुप्यापरीस दुरून । शिंपले उन्हांत चमकती ॥ ३८॥ तैसे दुरोनि घवघवित । तस्कर दिसती साधुसंत । परी कपट आहे अंतरांत । हें कोणासी कळेना ॥३९॥ नगरासी येऊन दोघेजण । राजदर्शनासी चालिले त्वरेन । हातीं माळा धरून । विरक्तपण दाविती ॥ १४० ॥ राजमंदिरास जाऊनी । पुढें पाहती विलोकुनी । तों जयदेवस्वामी सिंहासनीं । अवचित त्यांणीं देखिला ॥४१॥ जीवीं झोंबला चिंताग्नी । दोघे खुणा दाविती नयनीं । ह्मणती अग्निकुंडांत येऊनी । आपुल्या आपण पडलों कीं ॥४२॥ ज्याचे छेदिले हातपाय । तो जयदेवकवी येथें आहे । आपुलें कपट आपुल्यासि पाहें । फळा आलें तत्काळ ॥४३॥ कपोता आणि कपोतीस । पारधी गेला मारावयास । तों महासर्पें डंखिलें तयास । तैसें होईल वाटतें ॥४४ ॥ पुढें होतांचि दोघेजण । जयदेवें वोळखिले दुरून । दृष्टादृष्ट होतांचि जाण । खूण परस्परें बाणली ॥ ४५॥ निर्वैर होऊनि सर्वांभूतीं । जयदेव वर्ते सहजस्थिती । ज्याचे अंगीं क्षमाशांती । मूर्तिमंत वसतसे ॥४६॥ शत्रु भासती मित्रासमान । पराचे नेणे दोषगुण । ब्रह्मरूप भासे जन । हेंचि लक्षण संतांचें ॥४७॥ आपली संपदा आणि धन । तस्करीं नेलें ऐकून । चित्तीं वाटे समाधान । हेंचि लक्षण संतांचें ॥४८॥ आपुलें आणि पराचें बाळ । रडतां देखोनि तत्काळ । दोहींची सारखी कळवळ । हेंचि लक्षण संतांचें ॥४९॥ रायें दीधलें वस्त्रभूषण । कीं रंकें आणिलें भाजीचें पान । दोहींचा संतोष समान । हेंचि लक्षण संतांचें ॥ १५० ॥ असो जयदेवस्वामी तयेवेळीं । शत्रु येतां देखे जवळी । सत्वर उडी टाकिली । सिंहासनाखालती ॥५१॥ तंव त्यांणीं सत्वर येऊन । धरिले जयदेवाचे चरण । हें देखोनि पद्मावतीरमण । आलिंगित तयांसी ॥५२॥ जयदेव ह्मणे सेवकांसी । संत आले नगरासी । जाऊनि सांगा रायासी । यांचा सन्मान करावा ॥५३॥ ऐसें वचन ऐकूनी । रायासि सांगीतलें सेवकांनीं । रायें येऊनि तेच क्षणीं । नमन केलें तयांसी ॥ ५४॥ नानापरी उपचारें । पूजा केली नृपवरें । भोजन घालोनी सत्वरें । तयांसी विनंती करीतसे ॥५५॥ ह्मणे तुमची इच्छा असेल जोंवरी । तों काळ क्रमावा माझे घरीं । ऐसें ऐकोनि ते अवसरीं । अवश्य राहूं ह्मणती ते ॥५६॥ रात्रीं विचार दोघे करिती । शेवटीं कैसी होईल गती । उपचार कांहीं न रुचती । ऐसें बोलती परस्परें ॥५७॥ निर्दय अविंधाचे गांवीं । चाळवूनि मनुष्य पोषिती पाही । शेवटीं करिती त्याची ममई । तैसें होईल वाटतें ॥५८॥ नळिकेवरी येऊनि बैसला । रावा जैसा पिंजऱ्यांत पडिला । तैसें आजि आपणाला । झालें ऐसें वाटतें ॥ ५९ ॥ उंडीस देखोनि मासा भुलला । गिळितां कंठीं गळ टोंचला । तैसें आजि आपणाला । होईल ऐसें वाटतें ॥ १६० ॥ रात्रदिवस निरंतर । चिंता करिती वेषधर । कृश झालें शरीर । जैसा क्षयरोग लागला ॥६१॥ तंव कोणे एके दिवसीं । राजा पुसे जयदेवासी । एक विनंती पायांसी । आहे माझी स्वामिया ॥६२॥ वरकड संत घरासि येती । स्वामी तयास दुरून नमिती । यांजला लोटांगणें क्षितीं । दंडवत कां



तुह्मीं घातलें ॥ ६३॥ नानापरीचे उपचार । मीही करितों निरंतर । परी कृश झालें शरीर । दिवसेंदिवस तयांचें ॥६४॥ जयदेव ह्मणे नृपनाथा । विषयभोग नावडती संतां । विरक्तांसी माया ममता । विषयतुल्य वाटत ॥६५॥ आणीक येती वैष्णवजन । परी हे विरक्त सर्वांहून । तुझें भाग्य उत्तम जाण । ह्मणोनि येथें राहिले ॥६६॥ आतां जरी ते जाऊं ह्मणती । तरी आज्ञा द्यावी तयांप्रती । स्वइच्छेनें द्रव्य मागती । तितुकें तयांसी अर्पावें ॥ ६७॥ अवश्य ह्मणे नृपवर । स्वामीस केला नमस्कार । एके दिवसीं वेषधर । आज्ञा मागती जावया ॥६८॥ ह्मणती आह्मी तीर्थवासी । आतां जाऊं स्वस्थळासी । राजा ह्मणे तयांसी । काय इच्छा मज सांगा ॥६९॥ ऐसें ह्मणतां नृपवर । काय बोलती वेषधर । दोन रथ भरूनी सत्वर । द्रव्य द्यावें आह्मांसी ॥ १७० ॥ राजा ह्मणे आज्ञा प्रमाण । स्वामी मागती तें देईन । वस्त्रें अलंकार भूषण । वेषधरांसी अर्पिलीं ॥ ७१ ॥ द्रव्य देऊन दोन रथ । समागमें दीधले दूत । कर जोडोनी विनवीत । बहु विनीत होऊन ॥ ७२॥ मग जयदेवासी पुसोनि त्वरित । वेषधारी झाले मार्गस्थ । दूर गेले अरण्यांत दूत । करिती प्रश्न त्यांजला ॥७३॥ ह्मणती आमुचे राजमंदिरीं । साधुसंत येती भारी । सर्वांपरीस तुह्मांवरी । कृपा विशेष स्वामींची ॥ ७४॥ हे आशंका आमचे चित्तीं । ह्मणोनि स्वामीस करितों विनंती । ऐकोनि वेषधारी ह्मणती । दूतांप्रती तेधवां ॥ ७५॥ ह्मणती मागें पूर्वाश्रमीं । आह्मीं आणि तुमचे स्वामी । एक राजा होता दुष्टकर्मी । तयापासीं राहिलों ॥ ७६॥ याचें नांव जयदेवप्रधान । आह्मीं होतों सेवकजन । कांहीं अपराध होतां जाण । राजा यावरी क्षोभला ॥७७॥ क्रोधें आह्मांस आज्ञा करी । यासी अरण्यांत न्यावें दूरी । शिरच्छेद करावा सत्वरीं । ऐसें आह्मांसी सांगीतलें ॥७८॥ ऐसी आज्ञा होतांचि त्वरित । आह्मीं यास नेला अरण्यांत । याचा न करूनि प्राणघात । करचरण तोडिले ॥ ७९ ॥ टाकूनि दीधला पेंवांत । परतोनि गेलों नगरांत । आह्मींही झालों विरक्त । तया दिवसापासोनी ॥ १८० ॥ राजसेवा टाकोनि त्वरित । आह्मी झालों विष्णुभक्त । तीर्थाटनें करित करित । तुमचे नगरा पातलों ॥८१॥ राजमंदिरीं येतांचि जाण । परस्परांस बाणली खूण । जयदेवासी दीधलें जीवदान । तेणें उपकारें दाटला ॥ ८२ ॥ आह्मीं वांचविलें त्यालागुनी । ह्मणोनि आला लोटांगणीं । रायास उपदेश करूनी । आमुची सेवा करविली ॥ ८३ ॥ ऐसें बोलतां तये क्षणीं । थरथरां कांपे मेदिनी । असत्यापरी पाप कोणी । थोर नसे सृष्टींत ॥ ८४ ॥ पृथिवी उकलोनि सत्वर । तयामाजी गेले वेषधर । सेवकांसी चमत्कार । वाटला फार तेधवां ॥ ८५ ॥ ह्मणती अनर्थ झाला थोर । आतां काय करावा विचार । शिक्षा करील नृपवर । ह्मणून भय वाटलें ॥ ८६ ॥ एक ह्मणती निर्भय जाऊन । सत्य सांगावें वर्तमान । ऐसें ह्मणोनि सेवकजन । परतोनि आले नगरासी ॥ ८७ ॥ येऊनि जयदेवस्वामीजवळी । वर्तमान सांगीतलें सकळीं । जयदेवाचे नेत्रकमळीं । अश्रुपात लोटले ॥८८॥ ह्मणे हे कृष्णा पतितपावना । भक्तवत्सला रुक्मिणीरमणा । माझे शत्रूंसी जगज्जीवना । अधोगतीस कां नेलें ॥८९॥ विरोधी भक्त तुझा रावण । त्यास दीधलें सायुज्यसदन । माझे शत्रूंस मनमोहन ।

अधोगतीस कां नेलें ॥ १९० ॥ शिशुपाळें अन्याय केले शत । त्यासि झालासि कृपावंत । माझिया शत्रूंसी अधोगति त्वरित । कां दीधली दयाळा ॥ ९१ ॥ कंस चाणूर पूतना । यांसी नेलें मोक्षसदना । माझे शत्रुंस मधुसूदना । अधोगतीस कां नेलें ॥९२॥ ऐसें ऐकूनि करुणावचन । संतोषला जगज्जीवन । तत्काळ येऊन श्यामघन । जयदेवासी भेटला ॥ ९३॥ चतुर्भुज रूप सगुण । प्रसन्न झाला नारायण । जयदेवाचे करच्चरण । तत्काळ फुटले तेधवां ॥९४॥ पुष्पक धाडोनि सत्वर । वैकुंठास नेले वेषधर । भक्तमहिमा बहु थोर । ब्रह्मादिकां कळेना ॥९५॥ जयदेवासी ह्मणे रुक्मिणीपती । धन्यधन्य तुझी भक्ती । क्षमा दया आणि शांती । तुझे अंगीं वसती कीं ॥९६॥ शत्रु मित्र सारिखे जयासी । तया आधीन मी हृषीकेशी । ऐसें ह्मणून वैकुंठवासी । अदृश्य झाला तेधवां ॥ ९७॥ जयदेवासि चरणकर । फुटले देखोनि नृपवर । चित्तासि वाटला चमत्कार । कर जोडोनी पुसतसे ॥ ९८ ॥ मागील वृत्तांत जो झाला । तो जयदेवें रायासी सांगीतला । जयजयकारें ते वेळां । वैष्णव नामें गर्जती ॥९९॥ रायें शिबिका पाठवूनी । पद्मावती आणविली तत्क्षणीं । पतिव्रता लावण्यखाणी । इंदिरेचा अवतार ॥२००॥ वस्त्रें भूषणें अलंकार । पद्मावतीस दीधले मुक्ताहार । गुरुमातेसी नमस्कार । भावें नृपवर घालीतसे ॥१॥ जाऊनियां एकांतसदनीं । कांतेसि सांगे तयेक्षणीं । पद्मावती जयदेवराणी । गुरुमाता आमुची ॥ २ ॥ आपुल्या अंगें हिची सेवा । रात्रदिवस करावी तुवां । भ्रतारवचन ऐकोनि तेव्हां । अवश्य ह्मणे नितंबिनी ॥ ३ ॥ रायें विचारूनि अंतरीं । तत्काळ सेवक केले दुरी । जयदेवाची चाकरी । अंगें आपुल्या करीतसे ॥ ४ ॥ तंव कोणी एके दिवशीं । राजस्त्रिया बैसल्या सभेसी । पद्मावती सद्गुणराशी । मुख्यस्थानीं शोभत ॥ ५ ॥ सरितेंत श्रेष्ठ भागीरथी । कीं पतिव्रतेंत सावित्री सती । नातरी सकळ मंत्रांत गायत्री । मुख्य मंडन शोभतसे ॥६॥ सुगंधामाजी कस्तूरी । कीं अलंकारांत गळसरी । तैसी पद्मावती नारी । मुख्यासनीं बैसलीसे ॥७॥ तों अकस्मात दूत येऊन । तेथें सांगती वर्तमान । राजस्त्रियेचा बंधु सुजाण । शांत झाला येकाळीं ॥ ८ ॥ चित्तीं धरून निजपती । त्याची स्त्री निघाली सती । ऐकूनि तटस्थ झाल्या युवती । नवल करिती ऐकोनि ॥९॥ पद्मावती बैसली निवांत । देखोनि सकळांसी नवल वाटत । राजकांता विनवीत । कर जोडून तेधवां ॥ २१० ॥ ह्मणे चित्तीं धरूनि निजपती । पतिव्रता निघाली सती । ऐसें ऐकोनि तुमचे चित्तीं । नवल कांहीं वाटेना ॥११॥ त्यजोनियां माया ममता । सती निघाली पतिव्रता । सप्तजन्म तोचि भर्ता । ते निजकांता पावत ॥१२॥ ऐकोनि ह्मणे पद्मावती । ऐसें कासया निघावें सती । पुढें जातां निजपती । कधीं भेटेल कळेना ॥ १३ ॥ भ्रताराचें ऐकोनि मरण । आपण तत्काळ द्यावा प्राण । सूर्य मावळतां जैसे किरण । अस्त होती तयासवें ॥१४॥ ऐसें बोलतां पद्मावती । राजकांता विस्मित चित्तीं । ह्मणे अनुभवाविण बोलती । असत्य वाटलें तयांसी ॥ १५॥ अनुभवाविण ब्रह्मज्ञान । शरीर जैसें प्राणेंविण । ईश्वरकृपेविण बोलणें । वृथा तैसें दीसत ॥ १६ ॥ वरधन्यावांचूनि घर । कीं नासिकावांचूनि वक्र । महत्वावांचोनि कारभार । वृथा जैसा दीसत



॥ १७ ॥ वंध्या कांता दिसे उत्तम । कीं धनलुब्धाचें वृथा प्रेम । वृक्षावांचूनि दुरूनि ग्राम । बुभुक्षित दिसतसे ॥ १८ ॥ निजभक्तांवांचूनि देव । कीं सेनेविण जैसा राव । साधन नसतां शुद्धभाव । वृथा जैसे निष्फळ ते ॥ १९ ॥ पद्मावती बोलतां तैसीं । असत्य वाटलें राजकांतेसी । बोलावून प्रधानासी । विचार तयासी सांगीतला ॥२२०॥ ह्मणे ऐक एक वचन । असत्य बोलें मजकारण । जयदेवस्वामी मेले ह्मणोन । वार्ता पाठवीं नगरांत ॥ २१ ॥ तंव कोणे एके दिवशीं । राजा चालिला वनक्रीडेसी । शिबिकेंत बैसवून जयदेवासी । अरण्यांत पैं गेले ॥२२॥ तंव प्रधानें काय केलें । नगरांत मनुष्य पाठविलें । व्याघ्रें जयदेवा मारिलें । ऐसें सांगा ह्मणोनी ॥ २३ ॥ अशुद्धें वस्त्रें भिजवून । मागें पाठवी प्रधान । ऐसी वार्ता ऐकोन । राजकांता रडतसे ॥ २४ ॥ कपट धरूनि अंतरीं । रडत आली राजसुंदरी । जेथें पद्मावती सुकुमारी । धांवोनि आली त्या ठायां ॥ २५ ॥ ह्मणे बाई अनर्थ जाहला । जयदेवस्वामी व्याघ्रें मारिला । पद्मावती पुसे तिजला । सत्य सत्य ह्मणोनी ॥ २६ ॥ येरी ह्मणे त्रिवार सत्य । जयदेव मारिले यथार्थ । पद्मावतीनें ऐकोनि मात । प्राण सोडिले तत्काळ ॥२७॥ सूर्यास्त होतांचि जाण । सवेंच मावळती जैसे किरण । कीं दीपक विझवितां त्वरेन । प्रभा लोपे तत्काळ ॥२८॥ पौर्णिमा झालिया पाठीं । जैशा चंद्राच्या कळा तुटती । कीं पुष्पें चोळितां निजहस्तीं । सुवास जाय तत्काळ ॥२९॥ तैसें जयदेवाचें मरण । ऐकोनि तत्काळ दिधला प्राण । राजा नगरास आला फिरून । तों अनर्थ जाहला ॥२३०॥ प्रधानासि पुसोनि मात । ऐकिला सकळ वृत्तांत । ह्मणे कांतेसि मारावें त्वरित । तरी स्त्रीहत्या घडेल कीं ॥३१ तरी अग्निकाष्टें भक्षून । आतां आपलाच द्यावा प्राण । नगराबाहेर महा अग्न । प्रदीप्त केला तत्काळ ॥ ३२ ॥ जयदेवस्वामीस नमस्कार । करावया आला नृपवर । ह्मणे स्वामिया अनर्थ थोर । मजपासून घडला कीं ॥ ३३ ॥ अंतरसाक्ष जयदेव पूर्ण । कळलें सकळ वर्तमान । रायासि दीधलें आश्वासन । ह्मणे प्राण न द्यावा ॥३४॥ पद्मावतीचें प्रेताजवळी । जयदेव आले तये वेळीं । टाळविणा घेऊनि करकमळीं । राधाविलास आरंभिला ॥ ३५ ॥ चोवीस अष्टपद्या प्रसिद्ध जनीं । जयदेवें गाइल्या तये क्षणीं । मग सावडीं नामें गाऊनी । हरिरंगणीं नाचतसे ॥३६॥ केशवा नारायणा मुकुंदा । भक्तवत्सला आनंदकंदा । गोकुळपालका जगद्वंद्या । पाव आतां सत्वर ॥३७॥ गजेंद्राची ऐकोनि करुणा । सत्वर पावलासी जगज्जीवना । प्रऱ्हादरक्षका मनमोहना । पाव आतां सत्वर॥३८॥ द्रौपदीलज्जानिवारणा । पांडवरक्षका मधुसूदना । गोपीजनमानसरंजना । पाव आतां सत्वर॥३९॥ अनाथनाथा रुक्मिणीवरा । भीमातीरवासी दिगंबरा । पतितपावना जगदुद्धारा । पाव आतां सत्वर ॥२४०॥ ऐशी करुणा ऐकोन । सत्वर पावला नारायण । जयदेवास आलिंगून । काय वरदान देतसे ॥ ४१ ॥ तुझ्या अष्टपद्या अखंड गाती । कीं आवडीकरून ऐकती । तयांपासी लक्ष्मीपती । कर जोडोनि उभा असे ॥४२॥ ऐसें देऊनि वरदान । काय करीत जगज्जीवन ॥ पद्मावतीस आलिंगून । सावध केली तेधवां ॥ ४३ ॥ प्रेत उठतांचि सत्वर । जाहला एकचि जयजयकार । विमानीं बैसोनी सुरवर । पुष्पवृष्टि करिताती

॥ ४४ ॥ सकळां संतोष जाहला थोर । प्रेमें गर्जती वैष्णववीर । जयदेवस्वामींस नमस्कार । भावें नृपवर घालीतसे ॥४५॥ जयदेव चरित्र अतिउत्तम । गाती ऐकती भाविकजन । त्यांस संकटीं रुक्मिणीरमण । स्मरतां पावेल तत्काळ ॥४६॥ जो व्यासावतार परिपूर्ण । शत्रुमित्र जयासी समान । त्याचें चरित्र अतिपावन । मतीसारिखें बोलिलों॥४७॥ ग्वाल्हेरदेशीं अतिउत्तम । नाभाजी नागर ब्राह्मण । जो वैष्णवांसाजी शिरोमण । अवतार पूर्ण विधीचा ॥ ४८ ॥ भक्तचरित्र अति अद्भुत । त्याणें वर्णिलें यथार्थ । त्याचीं पदें पाहूनि निश्चित । ग्रंथ महाराष्ट्र लिहिला॥४९॥ सायखेडीयाचें वाहुलें । नाचवी त्या सूत्रें नाचलें । जयदेव आख्यान बोलिलें । माझिया मुखें तैसेंची ॥ २५० ॥ श्रीभीमातीरवासी रुक्मिणीरमण । पुंडलीकासी दीधलें वरदान । तो भक्तकैवारी जगज्जीवन । वक्ता जाण ये ग्रंथीं ॥५१॥ पुढिले अध्यायीं अतिविशेष । वैष्णव भक्त तुलसीदास । वक्ता वदविता श्रीनिवास । परिसा सावकाश भाविक हो ॥ ५२ ॥ दोनी कर ठेवूनि जघनीं । उभा राहिला चक्रपाणी । महीपती त्याच्या वरदानीं । गुणकीर्तनीं वर्णितसे ॥ ५३ ॥ स्वस्ति श्री भक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल भगवंत । प्रेमळ ऐका भाविक भक्त । द्वितीयाध्याय रसाळ हा ॥२५४॥ अ०२॥



श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । जयजय भक्तवत्सला आनंदकंदा । परमपुरुषा सच्चिदानंदा । जगदुद्धारा जगद्वंद्या । श्यामसुंदरा गोविंदा ॥१॥ जय भीमातटनिकटवासिया । पुंडरीकवरदा यादवराया । जघनीं कर ठेवूनियां । वाट पाहसी भक्तांची ॥ २ ॥ नाना पातकी चोर जार । ब्रह्मद्वेषी गोहत्यार । दर्शना येतांचि उद्धार । करिसी त्यांचा क्षणमात्रें ॥ ३ ॥ गजेंद्रपशु अति अज्ञान । संकटीं स्मरला तुजलागून । त्याचें ऐकोनि करुणावचन । सुदर्शन प्रेरिलें ॥ ४ ॥ शिक्षा करूनि नक्रासी । भेटी दिधली गजेंद्रासी । विमानीं बैसवितां तयासी । नक्र तुजसी हांसला ॥५॥ नक्र बोलिला तुजलागून । तुझें नाम पतितपावन । आणि माझा अव्हेर करून । जासी घेऊन गजेंद्रा ॥ ६ ॥ तरी पतितपावन बिरुद चरणीं । तें सोडूनि दे चक्रपाणी । ऐसी ऐकूनि नक्रवाणी । तोही विमानीं घातला ॥ ७ ॥ भक्त अभक्त दोघेजण । त्यांस दिधलें सायुज्यसदन । ऐसे वर्णितां तुझे गुण । आला शीण फणिवरा ॥ ८ ॥ तुझें गुणकथामृत । इंद्रादिदेवां नव्हे प्राप्त । अनन्यभावें प्रेमळ भक्त । कथासारामृत त्या देसी ॥९॥ कनवाळू माय कां जैसी । लेंकुरें बैसवोनि निजपंक्तीसी । ग्रास घाली तयांसी । मोह मानसीं धरूनी ॥१०॥ तेविं तूं आपले भक्तजना । कथामृत वर्षोनि पान्हा। ग्रास घालिसी जगज्जीवना । मनमोहना गोविंदा ॥११॥ ऐसे निजभक्त त्वां आपुले । कथामृतजेवणीं बैसविले । मीही याचक ते वेळे । दीन अन्नार्थी पातलों ॥ १२ ॥ कथामृतजेवण जेवितां । तृप्ती झाली निजभक्तां । त्यांचें उच्छिष्ट जगन्नाथा । मज अनाथा पाठवीं ॥१३॥ दीन दयाळा रुक्मिणीपती । तुझी अद्भुत ऐकून कीर्ती । तिष्ठत बैसला महीपती । प्रेम उचित पाठवीं ॥ १४ ॥ कलियुगीं भक्त अतिप्रेमळ । त्यांचीं चरित्रें अतिरसाळ । तूं बोलविसी घननीळ । तैसीं वर्णीन गोविंदा ॥ १५॥ आतां ऐका श्रोतेजन । क्षीरसागरीं शेषशयन । निजले असतां नारायण । तों भक्तजन पातले ॥ १६ ॥ उद्धव अक्रूर वाल्मीक । ध्रुव प्रऱ्हाद आणि शुक । जवळी येवूनि सम्यक । यदुनायक वंदिला ॥१७॥ तों वाल्मीकास ह्मणे जगदुद्धार । कलियुगीं दोष जाहले दुर्धर । त्वां मृत्युलोकीं धरून अवतार । करावा उद्धार जनांचा १८ माझे गुणनामकीर्तन । भविष्य कथिलें जें रामायण । तें संस्कृतवाणी नकळे जाण । अज्ञानजनां कलियुगीं ॥ १९ ॥ तरी मृत्युलोकीं अवतार धरून । भजनीं लावीं अवघे जन । ऐसें ऐकून वचन । केलें नमन वाल्मीकें ॥२०॥ उत्तरदेशीं हस्तनापुरीं । कनोजब्राह्मणाचिये घरीं । वाल्मीकऋषि ते अवसरीं । अवतार धरी निजलीलें ॥२१॥ आत्माराम नामाभिधान । धर्मशीळ पुण्यपावन । अकबर राजा होता जाण । करी सेवन तयाचें ॥२२॥ आत्माराम ब्राह्मण चतुर । रायाची कृपा तयावर । त्याचे उदरीं अवतार । घेतला सत्वर वाल्मीकें ॥ २३ ॥ जातकर्म नामकर्म । करिता जाहला द्विजोत्तम । तुलसीदास ठेवूनि नाम । खेळवी सप्रेम आवडीं ॥ २४ ॥ दिवसेंदिवस थोर जाहला । मायबापें व्रतबंध केला । द्वादश वर्षें त्याजला । ब्रह्मचारी ठेविलें ॥ २५ ॥ स्नानसंध्या वेदाध्ययन । विधियुक्त करविलें जाण । त्यावरी वधु विचारून । केलें लग्न तयाचें ॥२६॥ बाळत्व सरोनि जातां । तारुण्यदशा अंगा येतां । प्रीती जडली उभयतां ।

वियोग सर्वथा न साहे ॥ २७ ॥ नानावस्त्रें आणि भूषणें । मुक्ताहार दिव्य रत्नें । केशर कस्तूरी चंदन सुमनें । पीतवर्ण नागवेली ॥ २८॥ एला लवंगा जायफळ । भोग भोगीत नित्यकाळ । वेगळें होतां वियोगानळ । तुलसीदासा न साहे ॥ २९ ॥ तुलसीदासाची निजकांता । तिचें नाम देवीममता । अनन्यभावें पतिव्रता । सेवा करी तयाची ॥ ३० ॥ तंव कोणे एके अवसरीं । अकबरराजा चालिला स्वारीं । तुलसीदास सत्वरीं । समागमें पैं गेला ॥ ३१॥ तों मागें ममताई-कारण । मूळ आलें माहेराहून । ह्मणती तुझे मातेकारण । व्यथा दारुण जाहली ॥३२॥ डोळेभेट तीस देऊन । माघुती येईं फिरून । ऐसें ऐकोनि वचन । शोक करी आक्रोशें ॥ ३३ ॥ मातेची व्यथा ऐकोनि कानीं । घाबरी झाली तयेक्षणीं । मूळारी ह्मणती तिजलागूनी । असत्य आह्मी बोलिलों ॥३४॥ भेटीस झाले फार दिवस । तुज न पाठवी तुलसीदास । ह्मणून असत्य वचनास । बोलिलों आह्मी जाण पां ॥ ३५ ॥ ममताई ह्मणे तयांप्रती । स्वारीस गेले निजपती । तों मी जाऊनि मातृप्रती । भेटोन येईन सत्वर ॥ ३६॥ पुसोनि सासूसासऱ्यासी । ममताई गेली माहेरासी । तों तुलसीदास तेच दिवशीं । सायंकाळीं पातले ॥ ३७॥ मातेसि पुसोनि त्वरित । ऐकिला सकळ वृत्तांत । ह्मणे प्रिये मज कां येथ । टाकोनि गेलीस ये काळीं ॥ ३८ ॥ निद्रा न लागे करितां शयन । तेथूनि सत्वर निघाला जाण । पांच कोश रात्रीस चालोन । श्वशुरगृहासी पातला ॥३९॥ रात्र झाली प्रहर दोन । कपाटें अडकलीं असतां जाण । तुलसीदास विलोकून । पाहतां झाला सभोंवतें ॥ ४० ॥ तों महासर्प अतिविशाळ । लोंबत देखिला तत्काळ । हातीं धरूनि ते वेळ । उपरीवरी चढियेला ॥ ४१ ॥ मंदिरीं प्रवेशतां जाण । जागे झाले सेवकजन । पाहाती जंव विलोकून । तंव तुलसीदासा देखिले ॥४२॥ ममतादेवी लावण्यखाणी । जागी झाली तये क्षणीं । भ्रतारासि देखोनि नयनीं । चमत्कारून ऊठली ॥४३॥ भ्रतार ह्मणे लावण्यखाणी । कां आलीस मज टाकूनी । पांच कोश वाट चालूनी । तुजकारणें मी आलों ॥ ४४ ॥ कांता ह्मणे ते वेळां । यमुनेसी पूर तुंबळ आला । मंदिरीं प्रवेश कैसा झाला । हें मजला कळेना ॥ ४५ ॥ तुलसीदासें दिधलें उत्तर । तुझी माझी प्रीत थोर । उपरीवरून टाकिला दोर । तो धरून मी आलों ॥ ४६ ॥ ऐकोनि ह्मणे पतिव्रता । असत्य वचन कां बोलतां । म्यां कधीं उपरीवरुता । दोर नाहीं टाकिला ॥ ४७ ॥ सत्य असत्य नकळे जाण । ह्मणे दाखवा मजलागून । सवें घेऊनि सेवकजन । दीप लावूनि पाहती ॥ ४८ ॥ तों महासर्प अतिविशाळ । लोंबत देखिला ते वेळ । विस्मित झाले सकळ । नवल वाटलें तयांसी ॥ ४९ ॥ भ्रतारातें धरूनि करीं ॥ कांता पातली निजमंदिरीं । ह्मणे प्राणनाथा अवधारीं । वचन माझें ये वेळे ॥ ५० ॥ तूं शहाणा चतुर ह्मणविशी । परी विवेक नाहीं तुजपाशीं । अज्ञानमद अहर्निशीं । तुजपाशीं वसतसे ॥५१॥ मायबाप बंधु सज्जन । सर्व संपत्ती आणि धन । सांडोन एवढे रात्रीं येणें । मजकारणें कां केलें ॥५२॥ महासर्प जरी तुह्मांस डसता । तरी प्राणासि आपुल्या मुकता । अनित्य संसार प्राणनाथा । तुज सर्वथा कळेना ॥ ५३॥ माझा काम धरून । रात्रीं आलासी धांवोन । परी आह्मां स्त्रियांच्या

संगतीन । नाश बहुत पावले ॥५४॥ अहल्या सुंदर देखोन । इंद्र पातला लुब्ध होऊन । आह्मां स्त्रियांचे संगतीन । नाश बहुत पावले ॥५५॥ सीतेचा मनीं काम धरितां जाण । नाश पावला रावण । आह्मां स्त्रियांचे संगतीन । नाश बहुत पावले ॥ ५६ ॥ दीपाची झगमग देखोन । पतंग मरण पावती जाण । तेविं स्त्रियांचे संगतीन । नाश बहुत पावले ॥ ५७ ॥ हृदयीं नोळखतां आत्माराम । भ्रांत विषयीं धरिती काम । श्रीराम सकळांचा विश्राम । त्यासि अधम नेणती ॥५८॥ पुत्र दारा संपत्ति धन । प्राणियासी आवडती जीवाहून । त्याच रीतीं श्रीहरिचरण । आठवितां जाण सार्थक ॥ ५९ ॥ ममतादेवी ऐसें बोलतां । अनुताप जाहला निजचित्ता । सत्य माते ह्मणोनि कांता । तुलसीदासें नमियेली ॥६०॥ बाळकें धरितां खदिरांगार । माता राखी तयासी सत्वर । तैसा आजि उपकार थोर । मजकारणें त्वां केला ॥६१॥ ऐसें बोलोनि तिजकारण । तेथून सत्वर निघाला जाण । पूर्वजन्मींचें जें कारण । मागील सर्व आठविलें ॥६२॥ ह्मणे मी वाल्मीकि वैष्णव कीं । अवतार घेतला मृत्युलोकीं । श्रीरामचरित्रें गाऊनि सुखीं । जन भक्तीस लावावे ॥६३॥ विषयसुख नाशवंत । भोगीत गुंतलों होतों येथ । ऐसा अनुताप धरूनि चित्तांत । आनंदवनासी पातला ॥ ६४ ॥ करूनि भागीरथीचें स्नान । तीव्र मांडिलें अनुष्ठान । वर्जिलें अन्न फळ भक्षण । गलितपत्रें खातसे ॥ ६५॥ प्रातःकाळीं करूनि स्नान । करी श्रीरामाचें स्मरण । ह्मणे अयोध्यावासी जानकीजीवन । यावें दर्शन मजलागीं ॥६६॥ शौच करावयाकारण । अरण्यांत जातसे जाण । उरलें उदक तें टाकून । वृक्षातळीं देतसे ॥६७॥ द्वादश वर्षेंपर्यंत जाण । ऐसें करितां अनुष्ठान । अहोरात्र नामस्मरण । नाहीं खंडन क्षणमात्र ॥ ६८ ॥ तंव कोणे एके दिवशीं । तुलसीदास गेले शौचासी । उरलें उदक त्या स्थळासी । टाकूनियां दीधलें ॥६९॥ तों महाभयानक त्वरित । पिशाच देखिलें अकस्मात । दोनी कर जोडोनि तेथ । उभा ठाकला सन्मुख ॥ ७० ॥ तुलसीदासासी बोले वचन । प्रसन्न जाहलों तुजकारण । कांहीं मागशील वरदान । तुजकारणें देईन मी ॥७१॥ तुलसीदास ह्मणे त्यासी । तूं कोण हें सांग मजसी । काय प्रसन्न जाहलों ह्मणसी । हें मजसी कळेना ॥ ७२ ॥ येरू ह्मणे मी पिशाच जाण ॥ येथें असतों बहुत दिन । तुह्मीं उदक देतां टाकून । तें मी प्राशन करीतसे ॥७३॥ वापी कूप सरिता समुद्र । यांचें प्राशन करावया नीर । आह्मासि नाहीं अधिकार । तृषा फार लागतां ॥७४॥ द्वादश वरुषेंपर्यंत जाण । तुह्मीं मज करविलें उदकपान । कांहीं आज्ञा मजकारण । कराल तें देईन मी ॥ ७५॥ तुलसीदासाचें विस्मित मन । ह्मणे इच्छित होतों श्रीरामदर्शन । त्याचें फळ मजकारण । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥७६॥ चूतवृक्ष सायासें लाविला । तों वृंदावनफळें आलीं त्याला । तेविं अनुष्ठान करितां मजला । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥ ७७ ॥ इच्छित होतों नंदिनीदर्शन । तों सूकर ठाकलें पुढें येऊन । तेविं न होतां श्रीरामदर्शन । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥ ७८ ॥ शर्करेचें केलें अळें । त्यांत उगवलीं तुंबिनीफळें । तेविं अनुष्ठान करितां भलें । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥ ७९ ॥ राजहंस येतां चांग । तों अकस्मात देखिला काग । तैसा न

भेटतां श्रीरंग । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥८०॥ सत्संग पाहतां जाण । तों निंदक ठाकले पुढें येऊन । तेविं न भेटतां जानकीजीवन । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥८१॥ अध्यात्मविद्या इच्छितां मनीं । तों कोकशास्त्र ऐकिलें कर्णीं । तेविं न भेटतां चापपाणी । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥८२॥ कल्पतरूची छाया इच्छितां जाण । तों अकस्मात देखिलें सिंदीवन । तेविं न भेटतां रघुनंदन । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥ ८३ ॥ सिद्धांतज्ञान इच्छितां मनीं । तों पाखंडगाथा ऐकिली श्रवणीं । तेविं न भेटतां चापपाणी । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥८४॥ मुक्ताफळांच्या इच्छितां हारा । तों पुढें येऊनि पडिल्या गारा । तेविं न देखतां जानकीवरा । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥८५॥ इच्छितां क्षीराब्धिदर्शन । तों अकस्मात देखिलें थिल्लरी जीवन । तेविं न भेटतां रावणमर्दन । भूत प्रसन्न जाहलें कीं ॥८६॥ ऐकोनि पिशाच बोले वचन । तूं चतुर दिसतोसि विचक्षण । परी मज योग्य असेल तें मागणें जाण । संकोच मनीं न धरावा ॥८७॥ जया आपुलें कार्य साधणें । तेणें न ह्मणावें थोर लहाने । स्वाहागी अव्हेरितां जाणे । मुशींत सोनें आटेना ॥८८॥ सूक्ष्म दोरा अव्हेरितां । पुष्पहार नये वोवितां । लोहसुई हातीं न घेतां । अंगी सिवितां नये कीं ॥ ८९ ॥ सिंदीफडे अपवित्र ह्मणोनी । अव्हेरूं नये केरसुणी । नीचपदार्थ विचक्षणीं । कार्यसाधनीं घेतले ॥९०॥ तुलसीदास ह्मणे त्यासी । प्रसन्न झालों मज ह्मणसी । तरी आणिक इच्छा नसे मानसीं । श्रीरामासी भेटवीं ॥ ९१ ॥ रामनाम कानीं ऐकतां । पिशाच सरतसे मागुता । ह्मणे हीं अक्षरें मुखीं वदतां । नाश सर्वथा पावेन मी ॥ ९२ ॥ तुह्मी भेट इच्छितां चित्तीं । त्याचा सेवक तो मारुती । त्याचें दर्शन निश्चितीं । तुह्माप्रती करवीन मी ॥९३॥ तुलसीदास वचन बोलत । कोठें आहे वायुसुत । तो मज दाखवीं त्वरित । माझा हेत पुरवील तो ॥ ९४ ॥ पिशाच बोले वचन । तूं नित्य करिसी पुराणश्रवण । तेथें येतसे वृद्ध ब्राह्मण । तोचि जाण मारुती ॥ ९५ ॥ तो जरी ह्मणसील कोण । तेही तुज सांगतों खूण । सर्वांआधीं बैसे येऊन । सर्वांमागून जातसे ॥९६॥ हातीं काठी डोईस टोपी । जीर्ण वस्त्र आणि लंगोटी । ऐसें रूप देखसी दृष्टीं । वानरजेठी तोचि पैं ॥९७॥ ऐसें वचन बोलून । पिशाच अदृश्य झाला जाण । तुलसीदास परतोन । आश्रमासी पातला ॥ ९८ ॥ दुसरे दिवशीं करून स्नान । नित्य नेम नामस्मरण । जेथें होत पुराणश्रवण । तेथें गेला सत्वर ॥९९॥ तों अकस्मात वृद्ध ब्राह्मण । तेथें बैसलासे येऊन । पिशाचें सांगीतली खूण । तैसीं चिन्हें देखिलीं ॥ १०० ॥ पुराण समाप्त होतां जाण । श्रोते गेले सर्व उठोन । तयांमागून वृद्ध ब्राह्मण । धरूनि मौन निघाला ॥ १ ॥ तयासवेंच लागवेगें । तुलसीदास जातसे मागें । नगराबाहेर हनुमान वेगें । त्वरेंकरून जातसे ॥ २ ॥ एकांत देखोनि ते अवसरीं । ब्राह्मणाचे चरण धरी । ह्मणे स्वामी मजवरी । कृपा करीं समर्था ॥३॥ ब्राह्मण ह्मणे रे तूं कोण । स्पर्श केला मजकारण । मी तो अनाथ गरीब दीन । धरिले चरण कां माझे ॥ ४ ॥ तुलसीदास तयासी बोलत । तुह्मी रामभक्त कीं हनूमंत । ऐसें बोलोनि त्वरित । मारुती लागे चरणासी ॥ ५ ॥ हनूमंत विचारी मनीं । ह्मणे हा अवतरला वाल्मीकिमुनी । आलिंगन देऊन तेच क्षणीं । प्रेमेंकरून भेटले ॥६॥ तुलसीदासासी हनूमंत ह्मणे । प्रसन्न जाहलों तुजकारणें । येरू ह्मणे कृपादानें । इच्छित मन आहे कीं ॥ ७ ॥ श्रीरामाचें दर्शन । मजलागीं होय ऐसें करणें । अवश्य ह्मणोनि हनुमान । अदृश्य झाला तेधवां ॥ ८ ॥ हनूमंत ह्मणे श्रीरामाकारण । एक ऐका माझें वचन । तुलसीदास भक्त जाण । अवतार पूर्ण वाल्मीकीचा ॥ ९ ॥ सगुण दर्शन साक्षात । तयालागीं द्यावें निश्चित । ऐसा माझा आहे हेत । पुरवीं मनोरथ स्वामिया ॥११०॥ ऐकोनि मारुतीचें वचन । अवश्य ह्मणे रघुनंदन । सकळ वानर बोलावून । घेतलें सैन्य सांगातें ॥११॥ तुलसीदासाचे आश्रमावरूनी । त्वरें चालिले कोदंडपाणी । परी तो नोळखेचि तये क्षणीं । ह्मणे अविंध कोणी जातसे ॥१२॥ वानर दिसती महावीर । अविंध राजा श्रीरघुवीर । ऐसें देखोनि नमस्कार । तुलसीदासें न केला ॥१३॥ तयामागून वायुसुत । तुलसीदासाच्या आश्रमा येत । ह्मणे तुझा जैसा होता हेत । तो रघुनाथें पुरविला ॥ १४ ॥ येरू ह्मणे वायुसुता । मी भेटलों नाहीं रघुनाथा । मारुती ह्मणे रे आतां । आश्रमावरून गेला कीं ॥१५॥ तुलसीदास ह्मणे तो अविंध सत्य । आश्रमावरूनि गेला त्वरित । नाहीं देखिला रघुनाथ । अपूर्ण हेत राहिला कीं ॥ १६ ॥ हनूमंत ह्मणे ते अवसरीं । कामधेनु आली होती घरीं । ते अजा ह्मणोनि बाहेरी । चतुरा तुवां घातली ॥ १७ ॥ स्वइच्छें मार्गीं चालतां । तों परीस देखिला अवचिता । तो खडा ह्मणूनि तत्वता । कैसा टाकिला सुजाणा ॥ १८ ॥ रावा सुजाण चतुर भला । अवचित तुझिया आश्रमा आला । तो कपोत तुज भासला । ह्मणोनि पाळिला नाहीं कीं ॥ १९ ॥ कल्पतरूचें भेटलें जें वन । तें तुज भासलें सिंदीसमान । तेविं जातां श्रीरघुनंदन । तुवां वोळखिला नाहीं कीं ॥१२०॥ कीं महापर्वकाळीं दीन । अवचित घरा आला ब्राह्मण । तो अजापाळक ह्मणोन । अव्हेरिला तुवां कीं ॥२१॥ मुक्ताफळांचे हार देखोनी । ते तुज भासले काचमणी । तेविं जातां कोदंडपाणी । तुवां वोळखिलें नाहीं कीं ॥ २२ ॥ राजहंसाची गेली झांक । ते तुज भासले जैसे काक । तेविं जातां श्रीरघुनायक । तुवां नमिलें नाहीं कीं ॥ २३ ॥ निर्धनाघरीं भानवसीं । लक्ष्मी आली आपैसी । ते तयासी वाटली दासी । तैसें तुवां केलें कीं ॥२४॥ कीं निर्दैवें घर उकलितां । तों सुवर्णहोन लागले हाता । ते वाळू ह्मणोनि तत्वता । अव्हेरून टाकिले कीं ॥ २५ ॥ मैलागिरी शुद्ध चंदन । तो तुज भासला जैसा हिंगण । तेविं जातां रघुनंदन । तुवां वोळखिला नाहीं कीं ॥२६॥ पिनाकपाणी पार्वतीरमण । याचकरूप आला धरून । नाहीं दीधलें भिक्षादान । तैसें तुवां केलें कीं ॥ २७ ॥ तुलसीदास ह्मणे स्वामी । अन्याय लावितां मजलागुनी । परी विश्वंभर चक्रपाणी । विश्व व्यापूनी दिसेना ॥२८॥ सुवर्णाचे अलंकार । परी सुवर्ण न ह्मणती अज्ञान नर । नीरापासोनि होतें क्षीर । परी नीरा क्षीर न ह्मणावें ॥२९॥ नीर अवघेंचि आहे एक । परी चातक न घेती भूमीचें उदक । तेविं श्रीरामउपासक । स्वरूपें अनेक न मानिती ॥ १३० ॥ अयोध्यावासी जानकीजीवन । हातीं धरूनि धनुष्यबाण । जैसें वाल्मीकें वर्णिलें ध्यान । मजलागोनी तें दावा ॥३१॥ ऐसें ऐकोनियां वचन । मा-

रुती जाहला हास्यवदन । ह्मणे तुझे मनोरथ पूर्ण । श्रीरघुनंदन करील कीं ॥३२॥ ऐसें बोलोनि तयाप्रती । अदृश्य
जाहला मारुती । ध्यानांत आणोनि श्रीराममूर्ती । स्तवन प्रीतिं आरंभिलें ॥३३॥ जयजय अयोध्यावासिसीतारम-
णा । रावणांतका धनुष्यधारणा । पतितपावना दीनोद्धारणा । दानवमर्दना श्रीरामा ॥ ३४ ॥ श्रीराम ह्मणे गा मा-
रुती । आजि कां बहुत मांडिली स्तुती । काय मनोरथ धरून चित्तीं । स्तवन प्रीतिं आरंभिलें ॥३५॥ हनूमंत ह्मणेगा
श्रीरामा । भक्तकामकल्पद्रुमा । सगुणरूपा मेघःश्यामा । तुलसीदासासी भेटावें ॥ ३६ ॥ ऐकूनि मारुतीचें वचन ।
काय बोलिले रघुनंदन । कलियुगीं साक्षात दर्शन । त्याज कारणें होय कैसें ॥ ३७ ॥ हनुमंत ह्मणेगा हृषीकेशी । तो
अवतरला वाल्मीकि ऋषी । तुह्मींच आज्ञा दीधली त्यासी । जन भक्तीसी लावावे ॥ ३८ ॥ ऐकोनि मारुतीचें व-
चन । काय बोलिला रघुनंदन । तूं सांगसी तें ऐकेन । न मोडीं वचन कल्पांतीं ॥ ३९ ॥ श्रीराम सीता लक्ष्मण । स-
गुणस्वरूप अवतार धरून । हनूमंताचे समागमें जाण । श्रीरघुनंदन चालिले ॥ १४० ॥ पुढें होऊनि मारुतिभक्त ।
तुलसीदासासी सांगे मात । ह्मणे आजि तुझे मनोरथ । श्रीरघुनाथ पुरवील कीं ॥ ४१ ॥ मारुतीचे वचनास । ऐकोनि
हर्षला तुलसीदास । तों पुढें देखिला अयोध्याधीश । त्या सुखास पार नाहीं ॥ ४२ ॥ मुकुट विराजे देदीप्यमान । पी-
तांबरधारी घनःश्यामवर्ण । हातीं घेतलें धनुष्यबाण । श्रीरघुनंदन देखिला ॥ ४३ ॥ अनन्यभावें दंडवत । तुलसीदास
घाली त्वरित । कृपावंतें तुलसीभक्त । श्रीरघुनाथें आलिंगिला ॥ ४४ ॥ हनुमंत ह्मणे तूं दैवागळा । श्रीरामस्वरूप दे-
खिलें डोळां । मागें,त्वां जे वर्णिली लीला । ते जनां सकळां सांगावी ॥ ४५ ॥ योग याग वेदाध्ययन । कलियुगीं नव्हे
हें साधन । तरी नाममहिमा प्रकट करून । लावीं जन भक्तीसी ॥ ४६ ॥ श्रीरामासि सांगे सत्वर । याचे मस्तकीं ठेवा
कर । वचन ऐकोनि श्रीरघुवीर । अभय वर दीधला ॥ ४७ ॥ ऐसें देऊनि वरदान । अदृश्य जाहले सीतारमण । तुल-
सीदास प्रेमेंकरून । श्रीरामगुण वर्णितसे ॥४८॥ वाराणसीचे सकळजन । श्रवण करिती हरिकीर्तन । तुलसीदासासी
जाण । मठ बांधोन दीधला ॥४९॥ कोणी श्रीमंत भाविकजन । अनुग्रह दिधला त्यांकारण । ते नाना पदार्थ आणून ।
याचे आश्रमीं देताती ॥१५०॥ तुलसीदासाचिया पंक्तीं । सहस्र ब्राह्मण नित्य जेविती । दीन याचक अन्नार्थी । येतां
पावती संतोष ॥ ५१ ॥ जनांत प्रशंसा जाहली फार । द्रव्य आणूनि देती अपार । कनकपात्रें थोरथोर । रुपें अपार अ-
गणीत ॥ ५२ ॥ कोणी देत अथवा नेत । कोणी निंदित कोणी स्तवित । परी तुलसीदास अलिप्त । हर्षशोकांत पडेना
॥ ५३ ॥ जैसें आकाशाचे ठायीं । तीनही काळ येती पाहीं । परि तें संगदोषें कांहीं । लिप्त नाहीं सर्वथा ॥ ५४ ॥
ब्राह्मणभोजन जाहलियावर । होय कीर्तनाचा गजर । भाविक लोक येती फार । नामउच्चार करावया ॥ ५५ ॥
कपाटें मोकळीं ठेवून । निद्रा करिती सकळ जन । स्वप्न सुषुप्ति जागरण । श्रीरामचरण आठविती ॥५६॥ तों दोघे तस्कर
मिळोनी । विचार केला दृढ त्यांनीं । ह्मणती तुलसीदासाचे आश्रमीं । वर्जिता कोणी दिसेना ॥५७॥ तेथें जाऊनि नि-



र्भयचित्तें । सुवर्णपात्रांचें भरून भरतें । ओझें जाईल जें आपणातें । आपले हातें तें घेऊं ॥५८॥ हरिकीर्तन होतां जाण ।
निद्रित जाहले अवघे जन । तंव दोघे तस्कर येऊन । चोरीस जाण प्रवर्तले ॥ ५९ ॥ सुवर्णपात्रें घेऊनि करें । मोटा बां-
धिल्या अति सत्वरें । मस्तकीं घेऊनियां भारे । जाती चोर लगबगें ॥ १६० ॥ द्वारापाशीं लवकर येत । तों दोघे धनु-
र्धर बैसले तेथ । धनुष्यबाण धरून हातांत । प्रतापवंत बैसले ॥ ६१ ॥ तस्करांचें विस्मित मन । ह्मणती येथें नव्हतें कीं
रक्षण । तेथोनि सत्वर परतोन । उत्तर द्वारा पातले ॥ ६२ ॥ तों किरीटकुंडलें देदीप्यमान । हातीं घेऊनि धनुष्यबाण ।
तस्करीं देखिलें दुरून । लज्जायमान ते जाहले ॥ ६३ ॥ दक्षिण द्वाराजवळ गेले । तंव तेथेंही तैसेच बैसले । तस्करांसी
नवल वाटलें । परतोनि बैसले तैसेची ॥ ६४ ॥ विचार करिती दोघेजण । धनुर्धर जातील उठोन । मग सुवर्णपात्रें घे-
ऊन । सत्वर जाऊं घरासी ॥ ६५ ॥ ऐसें ह्मणूनियां तस्कर । उगेच बैसले घटिका चार । द्वारापाशीं सत्वर । मारुती
पाहती जाऊनी ॥ ६६ ॥ तों तैसेच बैसले दोघेजण । हातीं असती धनुष्यबाण । आकर्णओढी ओढून । ठाण मांडोनि
उभे कीं ॥ ६७ ॥ तस्कर जाहले भयभीत । सुवर्णपात्रें टाकिलीं समस्त । द्वारापाशीं मारुती जात । परी ते जाऊं न दे-
ती ॥ ६८ ॥ रात्र सरली चिंता करितां । अरुणोदय जाहला अवचितां । कांकड आरतीस तत्वतां । सकळ भक्त ऊ-
ठिले ॥६९॥ प्रातःस्मरण जाहलियावरी । तुलसीदास आले बाहेरीं । तों दोघे तस्कर सत्वरीं । येऊनि चरणीं लागले
॥१७०॥ क्षमा करा आमुचा अपराध । तस्कर जाहले सद्गद । तुलसीदास ह्मणे प्रसिद्ध । कोण तुह्मीं हें मज सांगा ७१
ते ह्मणती आह्मी तस्कर । चोरीस पातलों कीं साचार । तों द्वारापाशीं धनुर्धर । बैसले जाऊं न देती ॥ ७२ ॥ सुवर्णपा-
त्रांच्या बांधोनि मोटा । तिष्ठत बैसलों तुमचे मठा । ऐसा अपराध जाहला मोठा । क्षमा करीं तूं दयाळा ॥७३॥ तूं रा-
मभक्त परम उदार । रात्रीं ठेविसी मुक्तद्वार । ह्मणोनि निर्भय आह्मी चोर । पातलों सत्य जाण पां ॥ ७४ ॥ शिष्यसंप्र-
दायी बहुत जन । तुलसीदास पुसे त्यांकारण । द्वारापाशीं रक्षक कोण । मज नकळत ठेविले कां ॥७५॥ म्यां सांगितलें
तुह्मांप्रती । कोणी देती अथवा नेती । ते समान मानूनि चित्तीं । श्रीराम प्रीतीं भजा कीं ॥ ७६ ॥ शिष्य बोलती वाहुनि
आण । साक्ष आहेत तुमचे चरण । द्वारापाशीं रक्षक कोण । हें न जाण स्वामिया ॥७७॥ तस्कर बोलती वचन । किरी-
टकुंडलें विराजमान । पीतांबरधारी श्यामवर्ण । अजून बैसले आहेत कीं ॥७८॥ आश्चर्य वाटलें सकळांसी । येऊनि पा-
हती द्वारापाशीं । तंव कांहीं न दिसे तयांसी । नवल सकळांसी वाटलें ॥७९॥ तुलसीदासाचे नेत्र कमळीं । अश्रु आले ते
वेळीं । ह्मणे श्रीरामलक्ष्मण ये काळीं । द्वाररक्षक जाहले कीं ॥१८०॥ नाना योग वज्रासनीं बैसतां । प्राप्त नव्हेचि तीर्थें
करितां । त्या अयोध्यावासी रघुनाथा । द्वारपाळ म्यां केलें कीं ॥८१॥ एकपत्नी एक बाण । ज्याचा निश्चय एक वचन ।
तो रावणांतक रघुनंदन । द्वारपाळ येथें कां झाला ॥८२॥ चरण लागतां साचार । केला अहल्येचा उद्धार । तो कैवल्य-
दानी अति उदार । द्वाररक्षक जाहला कीं ॥८३॥ मग ह्मणे जयजय रघुवीरा । परमपुरुषा अति उदारा । नीलग्रीवशं-

भूच्या प्रियकरा । विश्वोद्धारा रामकृष्णा ॥८४॥ तूं लक्ष्मीकांत अति उदार । उपमन्यु मागतां किंचित क्षीर । त्वां ऐ-
कोनि तयाचें उत्तर । क्षीरसागर त्या देशी ॥८५॥ मांडीवरी बैसों नेदी पिता । ध्रुवबाळक रुसोनि जातां । तो अढळपदीं
रमाकांता । स्थापिला तुवां कौतुकें ॥८६॥ बिभीषण तुझा प्रियकर । तयासि दिधलें सुवर्णनगर । आणि सुवर्णपात्रें नेतां
तस्कर । कृपण थोर जाहलासि कीं ॥८७॥ मग ह्मणे तस्करांप्रती । जी इच्छा असेल तुमचे चित्तीं । तें घेऊनि जा सद-
नाप्रती । संकोच चित्तीं न धरावा ॥८८॥ ऐसें ऐकूनि उत्तर ॥ चरणा लागले तस्कर । कृपा करावी आह्मांवर । अभय-
कर ठेऊनी ॥८९॥ आह्मी तों पतित दुर्जन । वेष्टिलों होतों अविद्येनें । परी तुमचे संगतीचें महिमान । श्रीरामदर्शन जा-
हलें कीं ॥१९०॥ परिसाचा स्वाभाविक गुण । लोह लागतां करी सुवर्ण । तेविं तुझें आह्मी करितां छळण । श्रीरामदर्शन
जाहलें कीं ॥ ९१ ॥ तुझें दर्शन होतांचि जाण । दुर्बुद्धि गेली देहांतून । जैसा उदयास येतां दिन । तिमिर जाण दिसेना
॥ ९२ ॥ तुळसीदास ह्मणे त्यांस । तुमचें भाग्य अति विशेष । न करितां कांहीं आयास । दर्शन दिधलें श्रीरामें ॥ ९३ ॥
रानांत भाजी घेतां घेतां । तों अमृतवल्ली लागली हाता । कीं गांवदरीं गारा वेंचितां । परीस अवचितां सांपडला ९४
कांजी मागतां घरोघरीं । तों सुधारस आला पदरीं । सायास करितां दीपावरी । तों रविच घरीं पातला ॥ ९५ ॥ को-
कशास्त्र पाहतां पाहतां । तों वेदांतचि लागला हाता । काचमणी ओंवीत असतां । मुक्ताहार हाता आला ॥ ९६ ॥
बाभूळ पाहतां वनांतरीं । तों पुढें देखिला मैलागिरी । पाहूं जातां यमनगरी । तों वैकुंठपुरी देखिली ॥ ९७ ॥ ऐसें ऐ-
कोनि तस्कर । मागुती करिती नमस्कार । दुर्बुद्धी टाकुनी निरंतर । याच्या आश्रमीं राहिले ॥९८॥ श्रीभागवतीं कृ-
ष्णनाथ । उद्धवासी सांगे निजगुह्यार्थ । मत्प्राप्तीचा जया हेत । तेणें सत्समागम धरावा ॥ ९९ ॥ सत्समागमेंकरून ।
श्रवणीं पडे हरिकीर्तन । चोर जार होते दुर्जन । साधुजन ते जाहले ॥ २०० ॥ श्रवण कीर्तन नामस्मरण । नित्य घडे
त्यांकारण । ऐसें होतां बहुत दिन । तों नवल अपूर्व वर्तलें ॥ १ ॥ तुळसीदासाचे आश्रमासीं । ब्राह्मण बैसले भोजना-
सी । नानापरींचीं अन्नें तयांसी । घृतशर्करायुक्त वाढिलीं ॥ २ ॥ हातीं संकल्प घेतां जाण । विप्र बोलती ब्रह्मार्पण ।
तों द्वारापाशीं एक ब्राह्मण । काय बोले तें ऐका ॥ ३ ॥ प्रथम बोलोनि सीताराम । ह्मणे मी ब्रह्महत्यारी परम । कांहीं
द्या मज भिक्षान्न । ऐसें वचन बोलिला ॥ ४ ॥ वचन ऐकूनि सकळजन । तटस्थ बैसले ब्राह्मण । तुळसीदास बाहेर ये-
ऊन । दिधलें आलिंगन तयासी ॥ ५ ॥ विप्रासि धरूनियां हातीं । आणोनि बैसविला निजपंक्तीं । ह्मणे स्वामी कृपा-
मूर्ती । वचन माझें एक ऐका ॥ ६ ॥ सीताराम ऐसें वचन । तुह्मीं केलें उच्चारण । ब्रह्महत्यादिदोषतृण । तेव्हांच दग्ध
जाहलें कीं ॥ ७ ॥ ऐसें बोलूनि तयासी । ह्मणे ग्रास घ्यावा ब्राह्मणासी । ऐकतां ऐशिया वचनासी । विप्र तयासी बो-
लती ॥ ८ ॥ षट्शास्त्रीं निपुण पंडित । तुळसीदासासी काय बोलत । ब्रह्महत्यारी या पंक्तींत । कवण्या आधारें बैसवि-
लें ॥ ९ ॥ तुळसीदास ह्मणे त्यांसी । एक आधार आहे यासी । राम ह्मणतां निजवाचेसी । ब्रह्महत्या कैसी राहील

॥ २१० ॥ श्रीभागवतीं कृष्णनाथ । उद्धवासी सांगे निजगुह्यार्थ । नाममहिमा अति अद्भुत । कलियुगांत असे पैं ११
स्नानसंध्या करितां जाण । आधीं केले केशवनारायण । व्यंग होतां ब्रह्मकर्म जाण । विष्णुस्मरणें पूर्ण होय ॥ १२ ॥
पितृश्राद्ध सांग आचरतां । शेवटीं जनार्दनस्वरूपीं अर्पितां । हरिनामावांचूनि अन्यथा । कर्म सर्वथा न चाले ॥ १३ ॥
लग्ननिश्चय करितां जाण । घटितार्थ पाहतां छत्तीस गुण । शेवटीं लक्ष्मीकांतस्मरण । केल्यावांचोनि सरेना ॥ १४ ॥
अंतकाळीं प्रायश्चित्त घेती । शेवटीं नाम उच्चारिती । पार्वतीरमण कैलासपती । राम प्रीतीं जपतो कीं ॥ १५ ॥ महा-
पातकी गणिका जाण । राघव ह्मणे शुकाकारण । महादोष हेंचि तृण । नामवन्हीनें जळालें ॥ १६ ॥ भ्रष्टला ब्राह्मण
अजामिळ । त्याचा मांडला अंतकाळ । नारायण स्मरतां बाळ । दोष तत्काळ जळाले ॥ १७ ॥ ब्राह्मण ह्मणती वि-
चक्षणा । सत्य न वाटे आमुचे मना । कांहीं साक्ष दाखवी जनां । संशयखंडना तैं होय ॥ १८ ॥ तुळसीदास ह्मणे वि-
प्रांसी । कोणती साक्ष मागतां मजपाशीं । धरामर ह्मणती तयासी । नैवेद्य नंदीस दाखवावा ॥ १९ ॥ कैलासपति विश्वे-
श्वर । त्यापुढें आहे नंदिकेश्वर । अन्नपात्र भरूनि सत्वर । समर्पण तुह्मी करा कीं ॥ २२० ॥ प्रत्यक्ष नंदी पाषाणमूर्ती ।
नैवेद्य भक्षील तुह्मांहातीं । तरीच ब्रह्महत्यारीया पंक्तीं । आह्मीं बैसवूं ये वेळे ॥ २१ ॥ नाना दृष्टांत देऊनि आह्मांसी ।
नाममहिमा बहु सांगसी । प्रत्यक्ष साक्ष हे दाखविसी । सत्य मानसीं तैं वाटे ॥ २२ ॥ मुखें सांगतां साखरगोडी । रस-
नेची न पुरे आवडी । तेविं तूं सांगसी नामप्रौढी । परी विकल्पवोढी सोडीना ॥ २३ ॥ सुलाखणीनें टोंचूनि नाणें । खरें पा-
रखिती सज्ञान । तेविं साक्ष कांहीं दाखवून । संशयखंडन करावें ॥ २४ ॥ कां मोहऱ्यांस गुंडाळोनि सूत । टाकूनि पाह-
ती अग्निआंत । तेविं हरिनामाची प्रचीत । दावीं निश्चित आह्मांसी ॥ २५ ॥ कीं हिरा ठेऊनि ऐरणीवरी । पारखी घण
हाणिती वरी । तेविं नाममहिमा ये अवसरीं । दाखवीं सत्वर सुजाणा ॥ २६ ॥ ऐसी ऐकोनि विप्रवाणी । तुळसीदास हर्ष-
ले मनीं । अन्नपात्र सत्वर घेऊनी । विश्वेश्वरसदनीं चालिले ॥ २७ ॥ सकळ विप्र उठोन । तेही चालिले तयामागून । स-
भामंडपीं उभे राहून । कौतुक अवघे पाहती ॥ २८ ॥ अन्नपात्र घेऊनि करीं । तुळसीदास आले महाद्वारीं । हात जोडोनि
ते अवसरीं । नमन करिती साष्टांगें ॥ २९ ॥ ह्मणे जयजय चंद्रमौळी । नीलकंठा खट्वांगधारी । मृडानीवरा त्रिपुरारी । व-
चन अवधारीं दीनाचें ॥ २३० ॥ महाविष अतिदारुण । तुह्मीं केलें जैं प्राशन । सर्वांगाचें जाहलें दहन । नामस्मरण तैं केलें ३१
राम हीं अक्षरें दोनी जपतां । शीतळ जाहलासी विश्वनाथा । हें सत्य असेल तरी आतां । नैवेद्य भक्षिता होय नंदी ३२॥
ऐसी ऐकोनियां वाणी । नवल वर्तलें तये क्षणीं । पाषाणनंदी सत्वर उठोनी । श्वास टाकूनी फुंपत ॥ ३३ ॥ नैवेद्य भ-
क्षूनि सकळ । मग खादली पत्रावळ । कौतुक पाहती सकळ । धन्य काळ सुदिन तो ॥ ३४ ॥ ऐसें कौतुक दाखवूनि
त्वरित । नंदी बैसला निवांत । भक्तमहिमा अति अद्भुत । नकळे अंत श्रुतिशास्त्रां ॥ ३५ ॥ नामस्मरणीं वैष्णववीर ।
सकळ करिती जयजयकार । तुळसीदासासी नमस्कार । सकळ द्विजवर घालिती ॥ ३६ ॥ ह्मणती धन्य तूं वैष्णववीर ।

सिद्धांतज्ञानी अतिचतुर । पूर्ण वाल्मीकीचा अवतार । कळलें साचार आह्मांसी ॥३७॥ तारागणांत चंद्र वरिष्ट । कीं
पक्षियांमाजी गरुड श्रेष्ठ । कीं देवांमाजी वैकुंठपीठ । वैष्णववरिष्ठ तैसा तूं ॥ ३८॥ तापसांमाजी पिनाकपाणी । कीं
महर्षींमाजी व्यासमुनी । कीं सकळ गोपींत माता रुक्मिणी । तेविं वैष्णवजनीं तूं श्रेष्ठ ॥ ३९ ॥ कीं धनुर्धरांत जान-
कीवर । कीं सागरांमाजी क्षीरसागर । सिद्धांमाजी अनसूयाकुमर । वैष्णववीर तैसा तूं ॥ २४० ॥ चहूं मुक्तींत सा-
युज्यता । कीं यादवांमाजी कमलासनपिता । कीं पंडितांमाजी वेदांतवक्ता । तेविं भक्तजनांत तूं अससी ॥४१॥ कीं
नवग्रहांत सहस्रकर । कीं कवीश्वरांत उशना साचार । पर्वतांमाजी मेरु थोर । तेविं वैष्णववीर तूं होसी ॥४२॥ असो
यापरी करून स्तवन । आश्रमा आले सकळ ब्राह्मण । ब्रह्महत्यारी पंक्तीस घेऊन । केलें भोजन सकळिकीं ॥४३॥
वाराणसीचे सकळ जन । करिते जाहले नामस्मरण । सांडोनियां देहाभिमान । करिती श्रवण हरिलीला ॥ ४४॥ ऐ-
सा होतां बहुत काळ । तों नवल वर्तलें एक वेळ । सावकार होता जैतपाळ । शांत तत्काळ तो जाहला ॥४५॥ त्याची
स्त्री पतिव्रता । तिणें त्यजूनि मायाममता । चित्तीं धरूनी प्राणनाथा । सहगमनार्थ चालिली ॥ ४६॥ गंगातीरीं नि-
र्मळ वन । तेथें पेटविला महाअग्न । सौभाग्य नटोनि अहेवपण । ऐसी मिरवत निघाली ॥४७॥ तुलसीदासाचे गुंफेवरू-
नी । जाती जाहली तये क्षणीं । नमस्कार करावयालागूनी । आली ते क्षणीं एकलीच ॥ ४८॥ तुलसीदास करीत ना-
मस्मरण । तों तिणें केलें साष्टांगनमन । अष्ट पुत्र होऊत तुजलागून । आशीर्वचन दीधलें ॥ ४९ ॥ सती ह्मणे विष्णु-
भक्ता । शांत जाहला माझा भर्त्ता । चालिलें आतां सहगमनार्था । मायाममता सांडोनियां ॥२५०॥ अष्टपुत्रा सौ-
भाग्यवती । आशीर्वाद दिधला मजप्रती । हीं वचनें अन्यथा न होती । संशय मजप्रती वाटला ॥५१॥ ह्मणे मी नक-
ळत बोलिलों वचन ॥ तें सत्य करील रघुनंदन । ऐसें ऐकोनि सतीनें वचन । पुढती नमन घातलें ॥ ५२॥ भ्रतापाशीं
जातां सत्वर । तों उठोनि बैसला निजभ्रतार । सकळां संतोष वाटला थोर । जयजयकार मांडला ॥५३॥ भ्रताराशी
धरून हातीं । आश्रमास आली ते सती । तुलसीदासासी नमन प्रीतीं । पुन्हां मागुती घातलें ॥५४॥ वाराणसीचे स-
कळजन । तुलसीदासाचें करिती स्तवन । ह्मणती धन्य हा वैष्णवजन । तारक पूर्ण जडजीवां ॥५५॥ पाषाणनंदी जे-
वविला अन्नें । प्रेत उठविलें आशीर्वचनें । ऐशीं कोणी वर्तमानें । सांगे जाऊन रायासी ॥५६॥ अकबर राजा हस्तना-
पुरीं । त्यासी सांगितलें ते अवसरीं । कौतुक पहावया सत्वरीं । उपाव करी नृपनाथें ॥५७॥ चतुर प्रधान बोलावून ।
विचार सांगे त्यांलागून । ह्मणे तुलसीदास वैष्णवजन । मजलागून भेटवीं ॥५८॥ ब्रह्मज्ञानी अतिनिपुण । चतुर बो-
लका विचक्षण । तुलसीदासाचें वेधी मन । मूळ पाठवणें तयासी ॥५९॥ सवें देऊनि शिबिकारथ । येथें आणिजे त-
या त्वरित । कांहीं पहावी प्रचीत । कर्णीं मात ऐकिली ते ॥२६०॥ प्रधान ह्मणे आज्ञा प्रमाण । चतुर बोलके विचक्षण ।
संगें घेऊनि कांहीं सैन्य । आनंदवना पातले ॥६१॥ तुलसीदासाचे आश्रमासी । येऊनि राहिले ते दिवशीं । वर्तमान



सांगती तयासी । रायें तुह्मांस पाचारिलें ॥६२॥ तुह्मी वैष्णव प्रेमळ भक्त । कीर्ति ऐकोनि अति अद्भुत । दर्शनाचा ध-
रूनि हेत । रायें सत्वर पाठविलें ॥ ६३ ॥ ऐसें ऐकोनियां वचन । तुलसीदास विचारी मनालागून । ह्मणे ते देशींचे स-
कळजन । नामस्मरणीं लावावे ॥ ६४ ॥ निराश असतां वैष्णववीर । ते कां फिरती देशावर । तरी करावया जनांचा
उद्धार । आज्ञा साचार हरीची ॥६५॥ दुराचारी अज्ञानजन । स… वेष्टिले अविवेकरून । त्यांचें करावया उद्ध-
रण । साधुजन हिंडती ॥ ६६॥ असो रायें पाठविलें मूळ । वर्तमान ऐकिलें सकळ । तुलसीदास भक्त प्रेमळ । तेथोनि
तत्काळ निघाले ॥६७॥ करीत हरीनामाचा गजर । सत्वर पावले हस्तनापुर । राजा येऊनि समोर । चरणीं साचार
लागला ॥६८॥ तुलसीदासासी सिंहासनीं । रायें बैसविलें तये क्षणीं । सेवकांस सांगितलें कानीं । यालागीं जाऊं न
यावें ॥६९॥ षोडशोपचारेंकरून पूजा । तुलसीदासासी ह्मणे राजा । थोर प्रताप ऐकिला तुझा । ईश्वर दुजा ह्मणविसी
॥ २७० ॥ पाषाणनंदीस जेववविलें अन्न । प्रेत उठविलें आशीर्वाद देऊन । अघटित दिसे तव करणें । नकळे महिमान
आह्मांसी ॥७१॥ तुलसीदास ह्मणे तयालागुनी । हे तो श्रीरामाची करणी । मी तो अनाथ रामाचे चरणीं । चित्त ठे-
वूनी राहिलों ॥ ७२ ॥ ऐकोनि राजा बोले वचन । तो राम भेटवा मजलागून । नाहीं तरी तुजकारण । जाऊं नेदीं स-
र्वथा ॥७३॥ ऐसें बोलोनि त्या अवसरा । राजा गेला निजमंदिरा । ह्मणे साक्ष दावील तरी खरा । वैष्णववरा या मानूं
॥ ७४ ॥ तुलसीदास सिंहासनीं । बैसले असतां तये क्षणीं । सेवक ह्मणती त्यांलागुनी । तुह्मीं येथून न जावें ॥७५॥ श्री-
रामाचें दर्शन । रायासी करवावें न लागतां क्षण । नाहीं तरी तुह्मांलागून । जाऊं न देऊं सर्वथा ॥७६॥ ऐसें ऐकोनियां
वचन । केलें मारुतीचें स्तवन । हनूमंत तत्काळ येऊन । तुलसीदासासी भेटले ॥ ७७ ॥ ह्मणती संकट पडलें अतिदा-
रुण । ह्मणोनि केलें तुमचें चिंतन । आतां हें अरिष्ट निरसून । नाममहिमा वाढवा ॥ ७८ ॥ कौतुक मांडिलें हनूमा-
नें । पाचारिलें वानरसैन्य । महावीर अतिदारुण । गगनांतून निघाले ॥ ७९ ॥ जैसा वर्षाकाळ येतां ते क्षणीं । अभ्र
निघे गगनांतूनी । कीं पर्जन्य पडतां मेदिनी । तृणांकुर ऊठती ॥२८०॥ नातरी येतां दुर्भिक्षकाळ । गगनीं अकस्मात
येती टोळ । तेविं दहा सहस्र वानरदळ । अकस्मात प्रकटले ॥८१॥ हनूमंतासी करूनि नमन । वानर ह्मणती
त्यांकारण । काय आज्ञा आह्मांलागून । कृपा करूनं सांगावी ॥ ८२ ॥ हनूमंत ह्मणे त्यांकारण । तुह्मांसी पाचारिलें
यालागून । कांहीं आपुले स्वाभाविक गुण । रायाकारणें दाखवावे ॥८३॥ ऐसी आज्ञा होतांचि त्वरित । वानर ख-
वळले अति अद्भुत । उपरि माडियांवरी वेंघत । मोडूनि टाकिती कौतुकें ॥ ८४ ॥ महावृक्ष उपटोनि सत्वरीं । उच-
लून टाकिती मनुष्यांवरी । हलकल्लोळ हस्तनापुरीं । थोर आकांत जाहला ॥८५॥ कोणाचे तोडिले नाक कान । को-
णाची पिळून टाकिती मान । कोणाचा पाय धरून । जाती घेऊन ऊर्ध्वपंथें ॥८६॥ घागरी घेऊनि डोईवरी । नारी
जाती गंगातीरीं । त्यांचीं वस्त्रें हिरून सत्वरीं । नदीमाजी टाकिती ॥८७॥ त्याही विहिणी बिदीहूनि । चालतां ध-

रिती तये क्षणीं । गांठी देऊनि दाढीवेणी । जाती पळोनि वानर ॥८८॥ श्रीरामभजनीं विमुख जन । विष्णुभक्तांचें क-
रिती छळण । त्यांसी अकस्मात उचलून । कुत्सित न्हाणींत टाकिती ॥८९॥ शेट सावकार दुर्जन । कदा न करिती
अन्नदान । त्यांचीं भांडारें फोडून । जाती घेऊनि वानर ॥२९०॥ हाहाकार मांडिला थोर । मग प्रवेशले राजमंदिर ।
नाक कान तोडिती वानर । आकांत थोर मांडिला ॥९१॥ राजस्त्रिया पांचशत । नाटकशाळेंत बैसल्या समस्त । वा-
नर येऊनि अकस्मात । त्यांवरी करिती दीर्घशंका ॥९२॥ चोर जार कुटिल दुर्जन । त्यांस अकस्मात उचलोन । रा-
जमंदिरांत नेऊन । देती टाकून ऊर्ध्वपंथें ॥९३॥ वस्त्रें भूषणें हिरून घेती । गगनमार्गें उडोनि जाती । दीन गरीब जे
अन्नार्थी । त्यांसि देती संतोषें ॥९४॥ दरिद्री केले भाग्यवंत । व्यवहारी नागविले समस्त । असत्यवचन जे बोलत ।
वानर ताडिती तयांसी ॥९५॥ रायापाशीं येऊन । सत्वर सांगती सेवकजन । ह्मणती आलें वानरसैन्य । त्यानें प्रळय
मांडिला ॥९६॥ जैसें मेघ वर्षतां दारुण । अभ्र कोंदे भरूनि गगन । हस्तनापुरीं वानरसैन्य । तैसे रीतीं दिसतसे ९७
वानर क्षोभले प्रबळ । नगरीं मांडिला हलकल्लोळ । राजा ह्मणे प्रलयकाळ । आतांचि केवळ ओढवला ॥९८॥ को-
णी सज्ञान होते जन । ते सांगती रायाकारण । ह्मणती तुलसीदास वैष्णव जाण । त्याचें छळण न करावें ॥९९॥ वा-
नर क्षोभले असती थोर । पालथें घालिती हस्तनापुर । रायासि वाटला चमत्कार । अन्याय थोर म्यां केला ॥३००॥
अंबरीषाचें करितां छलन । दुर्वास पावला अपमान । तैसें झालें मजलागून । अन्याय मनें आठवला ॥१॥ तुलसी-
दासाचिया जवळी । राजा पातला तये वेळीं । जोडूनियां बद्धांजली । सन्मुख उभा राहिला ॥२॥ अकबर ह्मणे वि-
ष्णुभक्ता । वानरदळ आवरीं आतां । अज्ञानपणें मी नेणतां । तुज छळणार्था पातलों ॥३॥ द्रौपदीसतीचें करितां छ-
लन । अपमान पावला दुर्योधन । तैसें झालें मजलागून । तुझें छलन करितांचि ॥४॥ ऐसें ऐकूनि करुणावचन । तुल-
सीदास ह्मणे त्यांलागून । तुह्मी इच्छितां श्रीरामदर्शन । त्याचें सैन्य हें आलें ॥५॥ उदया येतां सहस्रकर । प्रभा फांके
पृथ्वीवर । तैसेच हे महावीर । पुढें पातले नृपनाथा ॥६॥ श्रवणापुढें उपजे आर्ती । कीं मननापुढें श्रवणभक्ती । सा-
क्षात्कारापुढें नृपती । निदिध्यास प्रकटे कीं ॥७॥ तेविं मागें येतां रघुवीर । पुढें पातले हे वानर । अठरापद्में दळभार ।
मागून सत्वर येतसे ॥८॥ अठरा पद्में आलिया जुत्पती । मागून येतील रघुपती । तुझे भाग्या नाहीं मिती । द-
र्शना येती श्रीराम ॥९॥ ऐकूनि राजा बोले वचन । मी पावलों श्रीरामदर्शन । ह्मणोनि धरिले दोनी चरण । ह्मणे म-
हिमा पूर्ण कळेना ॥११०॥ दहासहस्र वानरदळ । इहींच केला हलकल्लोळ । अठरापद्में येतां दळ । प्रलयकाळ होईल
कीं ॥११॥ ऐकोनि रायाचें करुणावचन । अदृश्य झालें वानरसैन्य । तुलसीदासाचे चरण । सकळ जन वंदिती ॥१२॥
एक संवत्सरपर्यंत । तुलसीदास राहिले तेथ । श्रीरामचरित्र अति अद्भुत । नित्य वर्णिती सप्रेमें ॥१३॥ हस्तनापुरींचे
सकळ जन । नित्य करिती नामस्मरण । जड मूढ होते अज्ञान । झाले सज्ञान सत्संगें ॥१४॥ अकबररायासी पुसोन ।

तुलसीदास निघाले तेथून । मथुरावासी श्रीकृष्ण । त्याचें दर्शन घ्यावया ॥१५॥ आधीं गोकुळासी येऊन । यमुना-
तीरीं केलें स्नान । घेऊनि श्रीकृष्णदर्शन । सत्वर तेथून निघाले ॥१६॥ मग येऊन वृंदावनीं । तेथें नमिले शार्ङ्गपाणी ।
एक मास तेथें राहुनी । हरिरंगणीं नाचत ॥१७॥ तेथून मथुरेसी आले । यमुनातीरीं स्नान केलें । श्रीकृष्णदर्शन घेत-
लें । वैष्णव भेटले सकळिक ॥१८॥ मथुरा गोकुळ वृंदावन । येथें वसती वैष्णवजन । नित्य करिती हरिकीर्तन । ना-
मस्मरण अहर्निशीं ॥१९॥ प्रियादास नागरब्राह्मण । परमभाविक वैष्णवजन । भक्तिज्ञानवैराग्यपूर्ण । त्याचे ठायीं
जाण असती ॥३२०॥ कलियुगीं झाले विष्णुभक्त । त्यांचीं चरित्रें अति अद्भुत । त्याचा ग्रंथ संस्कृत । प्रियादासें
लिहिलासे ॥२१॥ संतचरित्र ग्रंथ केला । तो तुलसीदासासी श्रुत झाला । प्रियादासासी एक वेळां । येऊनियां भेटले
॥२२॥ मग ह्मणे जी स्वामी । संतचरित्र लिहिलें तुह्मीं । तें ऐकिलें नाहीं आह्मीं । ग्रंथ आणोनी दाखवा ॥२३॥ प्रि-
यादास ह्मणे ते वेळे । चहूं युगींचे भक्त वर्णिले । परी तुलसीदासाचें चरित्र भलें । नाहीं लिहिलें या ग्रंथीं ॥२४॥ कलि-
युगींचे वैष्णवभक्त । तेही वर्णिले असती येथ । ह्मणूनि झाले चिंताक्रांत । तों नवल अद्भुत वर्तलें ॥२५॥ प्रियादासा-
सी नकळत । तुलसीदासाचें चरित्र । श्रीरामें येऊनि तेथ । आपुल्या हातें लीहिलें ॥२६॥ ग्रंथ करावया श्रवण । स-
कळ मिळाले वैष्णवजन । महाद्वारासी येऊन । सभारंगणीं बैसले ॥२७॥ चतुर सर्वज्ञ पंडित । तेही येऊन बैसले तेथ ।
प्रियादास प्रेमळ भक्त । वाचून दावीत तयांसी ॥२८॥ प्रियादासें ग्रंथ लिहिला । तो सकळवैष्णवीं मान्य केला । तुल-
सीदास ह्मणती बोलिला । तुमचे मुखें श्रीहरी ॥२९॥ ऐसें ऐकूनि संतवचन । प्रियादास ह्मणे त्यांलागून । तुलसीदा-
साचें चरित्र पूर्ण । लिहिलें येऊन श्रीरामें ॥३३०॥ श्रीरामाचें हस्ताक्षर । सकळ पाहती वैष्णववीर । भक्तमहिमा
थोर । श्रुतिशास्त्रांतें न वर्णवे ॥३१॥ वर्णितां श्रीहरीचे गुण । तटस्थ राहिलीं अठरा पुराणें । वाद घालिती षड्दर्शनें ।
त्यांसी महिमान कळेना ॥३२॥ ऐसें ग्रंथीं निरूपण । आवडीं करितां नित्यश्रवण । त्यासी श्रीरामाचें दर्शन । होईल
जाण निश्चयेंसी ॥३३॥ जो श्रीरामाचा प्रियकर । पूर्ण वाल्मीकीचा अवतार । त्याचें चरित्र श्रीरघुवीर । आपुले ह-
स्तें लिहीतसे ॥३४॥ मुळींचा ग्रंथ संस्कृत जाण । प्रियादासें केलें वर्णन । त्यावरी नाभाजीनें जाण । ग्वाल्हेरभाषेंत
लीहिला ॥३५॥ त्याचीं पद्यें ऐकोनि कानीं । ग्रंथ लिहिला महाराष्ट्रवाणी । जैसें दुग्धामाजी धारवणी । उदक थोडें
घालिती ॥३६॥ सुवर्णाचिये कोंदणीं । लाख बैसविती पुरवणी । तैसी माझी आर्षवाणी । संतसज्जनीं ऐकिली ॥३७॥
हें तुलसीदासाचें चरित्र पूर्ण । स्वयें वर्णिती भगवान । सद्भावें श्रवण करितां जाण । श्रीरामरूप ते होती ॥३८॥ श्री-
भीमातीरवासी रुक्मिणीपती । तोचि वक्ता ये ग्रंथीं । अभंगीं नाम महीपती । त्याणेंच निश्चितीं लिहविलें ॥३९॥
स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । तृतीयाध्याय रसाळ हा ॥३४०॥
अध्याय ॥३॥ ॥ओव्या॥ ३४०॥

॥ श्री भक्तविजय अध्याय ३ रा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्री गोपीजनवल्लभाय नमः । जयजय विश्वव्यापका जगदुद्धारा । मदनतात श्यामसुंदरा । नीलग्रीवमानसप्रियकरा । सर्वेश्वरा गोविंदा ॥ १ ॥ जय गोकुळवासिया गोरक्षका । यशोदेच्िया निजबाळका । विधिजनका कंसांतका । विश्वरक्षका गोपती ॥२॥ जय द्वारकावासी शार्ङ्गधरा । सायुज्यदानी अतिउदारा । समुद्रतनयेच्या प्रियकरा । विश्वेश्वरा विश्वपती ॥ ३ ॥ जय राधिकामानसरंजना । वैकुंठविहारी जगज्जीवना । पूतनांतका कालीयमर्दना । भवभंजना श्रीहरी ॥ ४ ॥ जय पुंडलीकवरदा रुक्मिणीरमणा । द्रौपदीलज्जानिवारणा । भक्तवत्सला करुणावना । विजयी राणा रघुपती ॥ ५ ॥ जय भक्तवत्सळा पंढरीनाथा । विश्वव्यापका लक्ष्मीकांता । तुवां साह्य होऊनि अनंता । वदवीं ग्रंथा मजलागीं ॥ ६ ॥ आतां ऐका श्रोते सज्जन । क्षीरसागरीं नारायण । उद्धवशुकांसी पाचारून । ह्मणे अवतार घेणें मृत्युलोकीं ॥ ७ ॥ ते ह्मणती पयोब्धिवासा । आह्मी न जाऊं कीं गर्भवासा । अयोनिसंभव हृषीकेशा । जन्म देईं आह्मांसी ॥ ८ ॥ ऐसें ऐकोनि जगज्जीवन । बाल्य दिधलें त्यांकारण । शुक्तिकेचे पोटीं घालून । वर्षते घनीं टाकिले ॥ ९ ॥ एक पडिला भागीरथींत । एक पडिला भीमरथींत । प्रवाहें वाहत येत । स्मरण करिती तें ऐका ॥ १० ॥ शिंपला पडिला भागीरथींत । तो राम राम स्मरण करीत । दुजा पडला भीमरथींत । तो विठ्ठल ह्मणत निजच्छंदें ॥ ११ ॥ रामभजन करि तो शुक । उद्धव पांडुरंगउपासक । प्रवाहीं वाहतां देख । काय कौतुक वर्तलें ॥ १२ ॥ दामाजीशिंपी वैष्णवजन । परम भाविक पुण्यपावन । भक्तिज्ञान वैराग्य पूर्ण । त्याचे ठायीं असती ॥ १३ ॥ चंद्रभागेचें करूनि स्नान । पांडुरंगाचें करी पूजन । ऐसा सारूनि नित्यनेम । यावरी भोजन करीतसे ॥ १४ ॥ गोणाई त्याची कांता । परमभाविक पतिव्रता । पंढरींत राहती उभयतां । श्रीजगन्नाथा आठवुनी ॥ १५ ॥ पोटीं नाहीं पुत्रसंतान । गोणाई ह्मणे पतीलागून । तुह्मीं पांडुरंगापाशीं जाऊन । एक पुत्र मागावा ॥ १६ ॥ दामशेटी ह्मणे तूं अज्ञान । आपण वृद्ध दोघें जण । देव कोठूनि संतान । आपणाकारणें देईल ॥ १७ ॥ किडीनें खादलें असतां बीज । पेरितां सिद्ध नव्हे काज । तेविं संतान मागतां तुज । नाहीं लाज सर्वथा ॥ १८ ॥ वर्षाऋतु गेलिया सरोन । कैसा इच्छितां वर्षेल घन । तेविं तूं इच्छिसी पुत्रसंतान । लज्जा मनीं न धरितां ॥ १९ ॥ आंबियाचे वृक्षासी । फळें न येती श्रावणमासीं । तेविं तूं इच्छिसी संतानासी । लाज मानसीं न धरितां ॥ २० ॥ स्नेहसूत्र सरतां जाण । दीपक सरसावी अज्ञान । तेविं तूं इच्छिसी संतान । लज्जा मनीं न धरितां ॥ २१ ॥ कांता ह्मणे प्राणनाथा । बुद्धिदोष मज ठेवितां । परी सर्वांवरिष्ठ ईश्वरी सत्ता । तुह्मी नेणते मज कळलें ॥ २२ ॥ रामावतारीं रघुनंदनें । समुद्रीं तारिले पाषाण । आह्मां वृद्धां देतां पुत्रसंतान । संकट तयासी कोणतें ॥ २३ ॥ वत्सहरण केलें विधीनें । तेव्हां स्वयें जाहला गाईगोपजन । वृद्धांसी देतां पुत्रसंतान । संकट तयासी कोणतें ॥ २४ ॥ दामशेटी ह्मणे कांतेसी । आतां जाऊन राउळासी । त्वां इच्छा धरिली आहे जैसी । ती देवासी सांगेन ॥ २५ ॥ मग महाद्वाराशीं जाऊन । देवासी केलें साष्टांगनमन । ह्मणे कांता इच्छी पुत्रसंतान । होईं प्रसन्न श्रीहरी

॥ २६ ॥ ऐसें बोलोनि वचन । निद्रा आली नलागतां क्षण । स्वप्नीं येऊन जगज्जीवन । ह्मणे पुत्रदान तुज दीधलें ॥ २७ ॥
उदईक भीमातीरीं जाण । जाशील करावया स्नान । वाहत येईल पुत्रसंतान । सत्वर घेऊन येईं तें ॥ २८ ॥ उद्धवाचा
अवतार जाण । कीर्तीनें भरील त्रिभुवन । विश्वोद्धारक वैष्णवपरम । नाम निजनामधारक जो ॥ २९ ॥ ऐसें ऐकतांचि
स्वप्न । घरासी गेला त्वरेंकरून । कांतेपाशीं वर्तमान । जाहलें तैसें सांगीतलें ॥ ३० ॥ दुसरे दिवशीं दामशेटी । सत्वर आला
भीमातटीं । स्नान करून उठाउठी । नित्यनेम सारिला ॥ ३१ ॥ तों भीमातटीं वाहत । शिंपला अकस्मात देखिला येत ।
दामशेटीनें जातजात । घेतला सत्वर तेधवां ॥ ३२ ॥ उकलोनि पाहतां तये क्षणीं । तों लावण्य बाळ देखिला नयनीं । जैसें
मातेच्या उदरांतूनी । येच क्षणीं उपजलें ॥ ३३ ॥ देखोनि चिंतावलें मन । ह्मणे यासी स्तनपान करवील कोण । तैसाच
वस्त्रांत गुंडाळून । आला घेऊन घरासी ॥ ३४ ॥ कांतेसी ह्मणे ते वेळां । तुज हा देवें पुत्र दीधला । गोणाईनें सत्वर घेतला ।
तों पान्हा फुटला निजस्तनीं ॥ ३५ ॥ वृद्धपणीं आला पान्हा । आश्चर्य वाटलें दोघांजणां । बाळक न्हाणोनि तयेक्षणां ।
प्रेमें पान्हा पाजिला ॥ ३६ ॥ प्रसन्न करून पुरुषोत्तमा । पुत्र मागितला मेघःश्यामा । ह्मणोनि नाम ठेविलें नामा । अद्भुत
प्रेमा तयावरी ॥ ३७ ॥ दिवसेंदिवस थोर जाहला । तों काय वर्तलें ते वेळां । दामशेटी हाटासि गेला । नामा पाठविला दे-
उळासी ॥ ३८ ॥ गोणाईनें नैवेद्य देऊनी । राउळासी पाठविला तयेक्षणीं । नामयासी ह्मणे जननी । नैवेद्य दावूनि येईंका
॥ ३९ ॥ सर्व पूजा घेऊन त्वरित । नामा आला देउळांत । मग देवासी घालोनि दंडवत । पूजा करीत निजांगें ॥ ४० ॥ स्नान
घालोनि सत्वर । मग नेसविला पीतांबर । चंदन पुष्पें उपचार । धूप दीप दाखविला ॥ ४१ ॥ नैवेद्याचें ताट आणून ।
पुढें ठेविलें नामयानें । हात जोडोनि देवासी ह्मणे । आतां भोजन करावें ॥ ४२ ॥ नामयाचे चित्तीं हाच भाव । नित्य
नैवेद्य भक्षी देव । चित्तीं नाठवे संदेह । हाचि भाव तयाचा ॥ ४३ ॥ ह्मणे जयजय कृपावंता । उशीर जाहला पूजा करि-
तां । ह्मणोनिया पंढरीनाथा । राग चित्ता आला कीं ॥ ४४ ॥ दामशेटी तुझा निजभक्त । हाटासि गेला आजि त्वरित ।
नैवेद्य दाखवावया येथ । मजला निश्चित पाठविलें ॥ ४५ ॥ तूं नैवेद्य जेविसी न आतां । तरी मजवरी कोपेल माता ।
काय अन्याय जगन्नाथा । न जेविसी आतां ह्मणोनि ॥ ४६ ॥ पाषाणमूर्ती जेवील कैसी । हा विकल्प नाहीं निजमान-
सीं । नामा स्फुंदे उकसाबुकसीं । ह्मणे हृषीकेशी जेवीं कीं ॥ ४७ ॥ देखोनि नाम्याचा शुद्धभाव । प्रसन्न जाहला दे-
वाधिदेव । नामयासी समजावूनि केशव । आलिंगन देतसे ॥ ४८ ॥ नाम्यानें नैवेद्य आणिला । तो प्रीतीनें देव जेवि-
ला । हरी ह्मणे नामयाला । ह्मणी कोणासी सांगसील ॥ ४९ ॥ नमस्कार करूनि देवासी । नामा आला निजगृहासी ।
माता ह्मणे तयासी । नैवेद्य कोणासी दीधला ॥ ५० ॥ नामा ह्मणे वो जननी । नैवेद्य जेविले चक्रपाणी । तों दामशे-
टी दुसरे दिनीं । बाजाराहूनि पातला ॥ ५१ ॥ कांतेसी पुसोनियां मात । ऐकिला सकळ वृत्तांत । दामशेटी जाहला
विस्मित । नवल अद्भुत वाटलें ॥ ५२ ॥ नामयासि ह्मणे ते क्षणीं । कैसा जेविला चक्रपाणी । राउळासि जाऊनि तये



क्षणीं । मजलागून दाखवीं ॥ ५३ ॥ पूजा घेऊनि त्या अवसरा । दोघे आले महाद्वारा । नमस्कार करूनि जगदुद्धा-
रा । पूजा सत्वर आरंभिली ॥ ५४ ॥ षोडशोपचारें करूनि पूजा । धूपदीप अर्पिले बोजा । नामा ह्मणे गरुडध्वजा । जे-
वीं आतां सत्वर ॥ ५५ ॥ नामयासि ह्मणे जगजेठी । सवें आला कीं दामशेटी । मी कदा न पडें याचे दृष्टी । तुजसी
भेटी देईन ॥ ५६ ॥ नामा ह्मणे देवा तूं कपटी । पित्यासि नेदीं ह्मणसी भेटी । कृत्रिमपण माझिये दृष्टीं । लीला जगजे-
ठी दाविसी ॥ ५७ ॥ ऐकोनि नामयाचें वचन । हांसों लागला जगज्जीवन । दामशेटीस भेट देऊन । केलें भोजन ते-
धवां ॥ ५८ ॥ पिता ह्मणे नामयासी । तूं जन्मलासि माझिये कुशीं । ह्मणोनियां हृषीकेशी । भेटला मजसी निजप्रीतीं
॥ ५९ ॥ यापरी करूनि समाधान । देवासि घातलें लोटांगण । नामयासी हातीं धरून । निजमंदिरीं पातला ॥ ६० ॥
कांतेसि सांगीतला वृत्तांत । सत्य जेविला वैकुंठनाथ । नाम्यास ह्मणों नये आप्त । असे निजभक्त देवाचा ॥ ६१ ॥ गो-
णाई ह्मणे तेवेळां । हा अयोनिसंभव उपजला । देवें कृपा करून तुह्मांला । पुत्र ह्मणोनी दीधला ॥ ६२ ॥ ऐसें समाधा-
न करूनि चित्तीं । नामयावरी धरिली प्रीती । सोयरीक पाहूनि निश्चितीं । लग्न केलें तयाचें ॥ ६३ ॥ नामा थोर हो-
तांचि जाण । पुत्र जाहला तयाकारण । बारशासाठीं जगज्जीवन । अहेर घेऊन पैं आले ॥ ६४ ॥ गोणाई पुसे देवासी ।
पुत्र जाहला नामयासी । त्याचें नांव हृषीकेशी । काय ठेवूं सांग पां ॥ ६५ ॥ ऐसें ऐकूनि वचन । काय बोले जगज्जी-
वन । नारायण ठेऊनि नाम । खेळवीं सप्रेम आवडीं ॥ ६६ ॥ नरनारी मेळवूनि ब्राह्मण । मग मांडिलें पुण्याहवाचन ।
नामयासि अहेर जगज्जीवन । निजप्रीतीनें देतसे ॥ ६७ ॥ साडीचोळी राजाईसी । पेहरण कुंची बाळकासी । अर्पूनि-
यां हृषीकेशी । निजमंदिरासी पैं गेले ॥ ६८ ॥ गोणाई ह्मणे नामयाकारण । आह्मी तो वृद्ध दोघेंजण । तूं करितोसि
हरिचिंतन । धरून ध्यान अहर्निशीं ॥ ६९ ॥ नामीं रूपीं जडलें चित्त । देहावरी नसशी क्षणमात्र । हृदयीं धरिला पं-
ढरीनाथ । त्याणें अंत पुरविला ॥ ७० ॥ संसारीं लागतसे सर्व कांहीं । एक पुत्र तूं जाहलासि विदेही । आतां म्यां क-
रावें कायी । ऐसें गोणाई बोलिली ॥ ७१ ॥ आणिक वैष्णव बहु आहेती । ते प्रपंचपरमार्थ चालविती । त्यांविरहित
तुझी स्थिति । ऐसें मजप्रती वाटतें ॥ ७२ ॥ लेंकुरें बाळें संसारीं । अन्नवस्त्र संकीर्ण घरीं । पिशुन हांसती दुराचारी ।
कैसी परी करावी ॥ ७३ ॥ ऐसें बोलतां निजमाया । अनुताप जाहला नामया । महाद्वारासी जाऊनियां । लोटांगण घा-
तलें ॥ ७४ ॥ ह्मणे पंढरीनिवासा श्रीहरी । मज कां घातलें संसारीं । दुःखरूप भवसागरीं । कां मुरारी मोकलिलें ॥ ७५ ॥
ऐकूनि नामयाचीं करुणावचनें । ह्मणे तुज गांजिलें आजि कवणें । आलिंगन देऊनि प्रीतीनें । पुसिले नयन तयाचे
॥ ७६ ॥ नामा ह्मणे देवराया । गोणाई गांजिती माया । मी आठवितों तुझिया पायां । करीं तूं छाया कृपेची ॥ ७७ ॥
देव ह्मणे नामयासी । तूवां असावें मजपाशीं । मग मायामोह तुजसी । कदा काळीं स्पर्शेना ॥ ७८ ॥ तूं तंव माझा अं-
श पूर्ण । मी तरी तुझें स्वरूप जाण । जेविं सागरांतूनि निघालें लवण । दिसे अभिन्न ज्ञानदृष्टीं ॥ ७९ ॥ सूर्य आणि त-

याचीं किरणें । भिन्न न होती वेगळेपणें । तैसा तुझा माझा प्राण । एकत्र जाण नामया ॥८०॥ दीप आणि प्रकाशज्योती ।
एकत्र असतां भिन्न दिसती । तैसी तुझी माझी प्रीती । असे निश्चितीं नामया ॥८१॥ गोडी आणि साखर । नये निवडितां
साचार । तेविं माझा तुझा विचार । अभिन्नपणें नामया ॥ ८२ ॥ रत्न आणि तयाची ज्योती । अभिन्न असतां भिन्न ह्म-
णती । तैसी तुझी माझी प्रीती । जाण चित्तीं नामया ॥८३॥ कीं अमूल्य जैसें मुक्ताफळ । वेगळा ह्मणती त्याचा ढाळ ।
तैसाचि तूं भक्त प्रेमळ । अभिन्न ह्मणतीं नामया ॥ ८४ ॥ कीं तीर्थ आणि गंगाजळ । वेगळें नव्हेच सर्वकाळ । तैसा अ-
भिन्न मी घननीळ । तुजसीं केवळ नामया ॥८५॥ कीं सुवर्ण आणि अलंकार । वेगळें नव्हेचि साचार । तैसा तुझा मा-
झा विचार । अभिन्नपणें नामया ॥ ८६ ॥ नाद निघाला घंटेंतून । तो तयाठायींच जाहला लीन । तेविं माझे ठायीं मि-
ळून । द्वैत खंडण करावें ॥ ८७ ॥ नामा ह्मणे हृषीकेशी । हें ज्ञान मजला काय सांगसी । तुझें नाम असतां वाचेसी । सं-
सारदुःखासी कोण गणी ॥ ८८ ॥ हृदयीं बिंबलें तुझें रूप । कोठें राहील भवताप । तूं संसारीं असतां मायबाप । नये सं-
ताप दृष्टीसी ॥ ८९ ॥ तूं देव मी भक्त जाण । मुखें करीन तुझें कीर्तन । जन्मोजन्मीं हेंचि मागणें । प्रेमदान मज देईं ९०
मोक्षसुख तूं थोर सांगसी । तें नये माझिया चित्तासी । वचनें ऐकोनियां ऐसीं । हृषीकेशी हासिन्नले ॥ ९१ ॥ रुक्मि-
णीस ह्मणे जगज्जीवन । नामयासी आवडे रूप सगुण । यासी सांगतां आत्मज्ञान । समाधान नव्हे कीं ॥९२॥ ऐसें ह्म-
णोनि हृषीकेशी । नामा धरिला हृदयासी । आलिंगन देऊन तयासी । मग पोटासीं धरियेला ॥९३॥ नामयास ह्मणे
वैकुंठवासी । तुझे घरींची नांदणुक कैसी । तें सांगावी मजपासीं । लज्जा मानसीं न धरितां ॥९४॥ ऐकोनि नामा बोले
वचन । तुझिया प्रसादें काय उणें । तुमचें घर वैकुंठभुवन । आह्मांशी मोडकें खोपट ॥९५॥ अष्टसिद्धि तुझिया दासी ।
आमुचे घरीं वसती घुशी । दिव्यांबरें तूं नेससी । आमुच्या मुलांसी वस्त्र नाहीं ॥९६॥ तूं क्षीरसागरीं शेषशयन । आ-
ह्मांस न मिळे तृणासन । तुह्मांस थाळें कनकवर्ण । आह्मांस पान जेवावया ॥९७॥ तुह्मां घरीं रौप्यसुवर्ण । आमुचे वि-
श्रांती तुझें नाम जाण । ऐसें ऐकोनियां वचन । मधुसूदन हांसले ॥९८॥ इकडे नामयाची कांता । आपुले घरीं करितां
चिंता । सासूस ह्मणे मजभोंवतां । स्फटिक निर्मिला होता कीं ॥ ९९ ॥ वस्त्र फाटकें अतिजीर्ण । भक्षावयास न मिळे
अन्न । दरिद्र भोगावयाकारण । तुमचे सदना मी आलें ॥ १०० ॥ सेवा भक्ती करितों ज्याची । तेणेंच पाठ घेतली आ-
मुची । संसारासी यावयाची । वाट कैसी दिसेना ॥ १ ॥ ऐसी नामयाची कांता । घरीं करीत असतां चिंता । करुणा
आली पंढरीनाथा । अनाथनाथा ते वेळीं ॥ २ ॥ नामयासी न कळतां जगजेठी । वाणी झाला केशवशेटी । निजभ-
क्तांची प्रीती मोठी । पावे संकटीं लवलाहें ॥३॥ सुवर्णहोनांची भरून गोणी । गरुडास ह्मणे चक्रपाणी । वृषभरूप तूं
धरूनी । चाल सदनीं नामयाच्या ॥ ४ ॥ द्रव्य घेऊनि हृषीकेशी । वर्तमान पुसे लोकांसी । मार्ग नामयाचे मंदिरासी ।
कोणता मज सांगावा ॥ ५ ॥ ऐसें ऐकूनियां वचन । ग्रामवासी हांसती जन । नामया घरीं नसतां अन्न । पाहुणा कोण



पातला ॥ ६ ॥ ह्मणती पैल तें वृंदावन । भोंवतें अपार तुळसीवन । पताका शोभती प्रकाशमान । तेंचि भुवन नामया-
चें ॥७॥ राजाईस ह्मणे मुरारी । पाहुणे आले तुझिया घरीं । आतां बाहेर येऊन झडकरी । यावें सत्वरी बैसावया ॥८॥
वचन ऐकतां कानीं । राजाई चिंतावली मनीं । पाहुणा आला असे कोठुनी । फजितखोर कळेना ॥ ९ ॥ करितसे त-
याची संपादणी । काय बोलतसे त्यालागुनी । घरीं नाहींत कीं घरधनी । जावें परतोनि निजवाटें ॥ ११० ॥ घरीं सि-
ळाल्या शेजारिणी । त्यांजवळ सांगे गार्‍हाणीं । जीव घेतला पाहुण्यांनीं । काय साजणी करावें ॥११॥ ऐका बाई न-
वलपरी । अखंड साधु येती घरीं । टाळ विणा घेऊनि करीं । सप्रेमभरें नाचती ॥ १२ ॥ सांडोनि लज्जा मान लौकिक ।
सांडोनि भेदाभेद देख । हृदयीं धरूनि यदुनायक । नाचती देख निजछंदें ॥ १३ ॥ घरधनी सांगे मजलागुन । संतांसि
घालावें भोजन । घरीं तिळभरी नसे अन्न । त्यांजकारणें कळेना । १४ । ऐसा संवाद श्रीहरी । उभा ठाकून ऐके द्वारीं । राजाईस
ह्मणे मुरारी । यावें बाहेरीं सत्वर ॥ १५ ॥ येरी पुसे द्वाराआडून । तुह्मीं कोठील असा कवण । आपुलें सांगा नामाभिधान । मज
कारणें येवेळे ॥ १६ ॥ ऐकोनि ह्मणे जगजेठी । माझें नांव केशवशेटी । आह्मांसी नामयाची प्रीत मोठी । आलों भेटीस
तयाचे ॥१७॥ तुमचे घरीं नाहीं अन्न । ऐसें ऐकिलें वर्तमान । नामा मित्र माझा जाण । आणिले होन त्यालागीं ॥ १८ ॥
ऐसें वचन ऐकोनि राजाई । बाहेर आली ते समयीं । बैसावयासि लवलाहीं । आ[illegible]नियां दीधलें ॥ १९ ॥ आधीं नि-
ष्ठुर बोलोनि वचन । मग करीतसे सन्मान । कौतुक देखोनि जगज्जीवन । ह[illegible]ने बोलती ॥ १२० ॥ ह्मणे द्रव्य दे-
खोनि मजकारणें । आतां नम्र बोलतीस वचनें । रिक्तपाणि याकारणें । कोठे न जावें सर्वथा ॥ २१ ॥ अहेरावांचोनि-
यां जाणा । न जावें कवणाचिया लग्ना । द्रव्यावांचोनि राजदर्शना । जाऊं नये सर्वथा ॥ २२ ॥ कन्या भगिनीचे भे-
टीस पाहीं । रिक्तपाणी न जावें कोणीही । सोयरे पिशुन यांचे गृहीं । विषमकाळीं न जावें ॥२३॥ रिक्तपाणि पर्वका-
ळीं । तीर्थीं न जावें कदाकाळीं । दर्शना देवाचे देउळीं । रिक्तहातीं नव जावें ॥२४॥ साधुगुरूच्या दर्शना जावें । तरी
तुळसीदळ किंचित न्यावें । मूठभरी पोहे सुदामदेवें । आणिले भावें मजलागीं ॥ २५ ॥ एवं आशाबद्ध अवघे जन ।
मीही तैसाचि वर्ते जाण । निरपेक्ष माझें भजन । नामा एक करीतसे ॥ २६ ॥ ऐसें ह्मणोनि हृषीकेशी ॥ काय बोलती
राजाईसी । आतां माझे नामयासी । झणीं न छळीं सर्वथा ॥२७॥ द्रव्य आणिलें गोणीभरी । हें सांठवीं निजमंदिरीं ।
सरोनि जातां निर्धारीं । मज पाचारीं सत्वर ॥ २८ ॥ नामयासि निरोप सांग माझा । आला होता मैत्र तुझा । ऐकू-
नि नामयाची भाजा । अधोक्षजा काय बोले ॥ २९ ॥ मी निष्ठुर बोलिलें तुह्मांप्रती । ह्मणोनि राग न धरावा चित्तीं ।
घरधनीयांस तुमची प्रीती । हें मजप्रती कळेना ॥१३०॥ भोजन करूनि जावें त्वरित । ऐकून ह्मणती वैकुंठनाथ । ना-
मयावांचूनि मी सत्य । नाहीं जेवीत सर्वथा ॥ ३१ ॥ ऐसें ह्मणोनि ते वेळीं । सत्वर चालिला वनमाळी । जाऊनियां
रुक्मिणीजवळी । वर्तमान सर्व सांगितलें ॥ ३२ ॥ इकडे राजाईलागून । चित्तीं वाटलें समाधान । ह्मणे सेवा केली घ-

रघनीयानें । देव प्रसन्न जाहला कीं ॥ ३३॥ गोणी फोडोनि सत्वरीं । होन घेतले ओटीभरी । बाजारांत जाऊन ते अ-
वसरीं । घातले पदरीं वाणियाचे ॥ ३४ ॥ जो जो पदार्थ संसारासी । लागतसे तें तूं जाणसी । ते सत्वर माझिया घरा-
सी । पाठवून देईं ये वेळे ॥ ३५॥ ऐसें ह्मणोनि तयाप्रती । घरासी आली सत्वरगती । वाणी विस्मित जाहला चित्तीं ।
ह्मणे साह्य श्रीपती यांस जाहला ॥ ३६॥ वस्त्रें भूषणें नानापरी । घृत तांदुळ गूळ सामग्री । पाठवून दिली तयाचे घरीं ।
हर्ष अंतरीं न समाये ॥ ३७ ॥ गोणाई बाहेर गेली पाही । तीस हें वर्तमान ठाऊक नाहीं । धान्य मिळवूनियां कांहीं ।
परतोनि घरा येतसे ॥ ३८॥ विचार करी निजमनीं । नामा गेलासे रुसोनी । आतां राउळासी जाऊनी । समजाऊनी
आणावा ॥ ३९ ॥ ऐसें ह्मणोनि ते अवसरीं । सत्वर आली महाद्वारीं । नमन करून गरुडपारीं । मंडपाशेजारीं पैं आ-
ली ॥ १४० ॥ पुढें पाहतां निजदृष्टीसी ॥ उभे देखिले हृषीकेशी । नामा घातला पाठीसी । गोणाईस देखूनि ॥ ४१ ॥
गोणाई ह्मणे जगजेठी । इकडे पाहे करून दिठी । नामयासी प्रीती लावून मोटी । पाडिली तुटी संसारा ॥ ४२ ॥ तुझे
संगतीनें गोविंदा । याणें सोडिला घरधंदा । संसारीं भोगितो आपदा । विषयस्वादा टाकूनी ॥ ४३ ॥ माया ममता
टाकून । याणें दृढ धरिले तुझे चरण । संसारा पडतां उणेपण । हांसती पिशुन आह्मांसी ॥४४॥ सांडोनियां देहबुद्धि ।
उघडी भोगितसे समाधी । तुवां लाविला अद्वैतबोधी । संसारबुद्धी नाठवे ॥ ४५ ॥ तुझे संगती जे लागले । ते आपु-
ल्या ऐसे तुवां केले । ते परतोनि संसारा आले । नाहीं देखिले ऐकिले कीं ॥ ४६ ॥ मजसीं करून इष्टतुटी । नामा घा-
तला आपुले पाठी । घरीं कांता होतसे कष्टी । करुणा जगजेठी तुज नये ॥ ४७ ॥ आमचा घात करूनि जाणा । ना-
मयाची तुज ये करुणा । तुझी भीड रुक्मिणीरमणा । मी धरीना येवेळीं॥४८॥ममता धरूनियां मोठी । नवमास म्यां
वाहिला पोटीं । निराशा केली जगजेठी । पाडिली तुटी संसारा ॥ ४९ ॥ तूं उदार ह्मणविसी आपणा । तरी सांगें दी-
धलें काय कोणा । तुझी कीर्ति जगज्जीवना । माझिया मना नये कीं ॥१५०॥ पोहे घेऊनि मूठभरी ॥ सुदाम्यासि
दिधली हेमपुरी । दिधल्यावांचूनि मुरारी । कोणा सत्वरीं न पावसी ॥ ५१ ॥ बलाढ्य देखोनि रावण । मग फितवि-
ला बिभीषण । त्याचे घरचा भेद घेऊन । लंका दान दीधलें ॥ ५२ ॥ द्रौपदीस संकट पडतां जाण । आधीं घेतलें भा-
जीपान । मग ऋषींस घालोनी भोजन । उदारपण मिरविसी ॥५३॥ ऐसे तुझे हे अवगुण । शेष शिणला करितां ले-
खन । म्यां भीड धरिली ह्मणोन । तुझें देवपण राहिलें ॥ ५४ ॥ ऐकूनि गोणाईचें उत्तर । हांसों लागला शार्ङ्गधर ।
ह्मणे तूं व्यर्थ आह्मांवर । क्रोध साचार करितेसी ॥ ५५॥ माझे पायीं बळेंचि जडला । विदेही नामा तुझा वेडा ।
आपुला असतां दाम कुडा । परासी झगडा कासया ॥ ५६ ॥ ममता धरूनियां पोटीं । नामयासि पाहसी पुत्रदृ-
ष्टी । आह्मांस करून इष्टतुटी । बोलसी होंटीं अपशब्द ॥ ५७ ॥ तुझी ममता असेल कांहीं । तरी निज
पुत्रासी घेऊन जाईं । आह्मांवरी निमित्त पाहीं । व्यर्थ कांहीं न ठेवीं ॥ ५८ ॥ मुळींच फळ देंटीं पिकलें । वारा लाग-



तां खालीं पडलें । नामयाचें निमित्त भलें । तैसें आलें मजवरी ॥ ५९ ॥ मी अज अव्यय अजित पूर्ण । गुणातीत हो-
तों जाण । नामयाचे आवडीकारण । साकार सगुण जाहलों कीं ॥१६०॥ नव्हतें आकाश वायु नीर । नव्हती पृथ्वी
तेज अनळ । नव्हते ब्रह्मा विष्णु हर । निराकार जैं होतें ॥ ६१ ॥ तैंचा जिवलग सांगाती । नामयासी माझी अत्यंत
प्रीती । आतां तूं भांडसी कवणे रीती । हें मजप्रती कळेना ॥ ६२ ॥ जैसी वृक्षासि फळें आलीं । माळियें तोडूनी ने-
लीं । ज्याचीं त्यास नाहीं भोगलीं । तुटी पडिली निजकर्मे ॥६३॥ तेविं मी वृक्ष जगदाकार । प्रेमळनामा अमृतफळ ।
तोडून घेतलें त्वां तत्काळ । त्याची तळमळ मज वाटे ॥ ६४ ॥ गोणाई ह्मणे जगजेठी । बहु थोर बोलसी गोष्टी । ख-
डे घालून माझे पोटीं । इष्टतुटी करितोसी ॥ ६५॥ नानापरीचे कष्ट करूनी । कुणबी पिकविती जैसी धरणी । आय-
ताचि राजा दंड करूनी । होतसे धनी वांटिया ॥ ६६ ॥ तेविं म्यां कष्ट करूनि फार । नामा वाढवूनि केला थोर । आ-
यता धनी शार्ङ्गधर । होसी साचार पुंडपणें ॥ ६७॥ ऐकोनि गोणाईचें वचन । हांसोनि बोले जगज्जीवन । ह्मणे ईस
आतां बरवेपणें । समजावणें मज लागे ॥ ६८॥ नाहीं तरी अपकीर्ती । माझी करील ही निश्चितीं । ऐसें ह्मणूनि रुक्मि-
णीपती । उत्तर पुढती देतसे ॥ ६९ ॥ गोणाईस ह्मणे घननीळ । तुझें सुकृत अतिनिर्मळ । ह्मणोनि पोटीं भक्त प्रेमळ ।
आला तत्काळ तूझिया ॥ १७० ॥ कमलोद्भव सावित्रीचे पोटीं । नारद वैष्णव जगजेठी । तेविं तूं आणि सभाग्य दा-
मशेटी । नामा पोटीं अवतरला ॥७१॥ कीं दैत्यवंशीं कयाधु-उदरीं । प्रऱ्हाद भक्त अवतार धरी । तेविं विष्णुदास तुझे
उदरीं । विश्वोद्धारी जन्मला ॥ ७२॥ कीं छप्पन्नकोटी यादवांत । वैष्णव वरिष्ठ उद्धव भक्त । तेविं शिंपियांचे वंशां-
त । नामा निश्चित अवतरला ॥ ७३ ॥ कीं सिद्ध साधु योगी जाण । तयां वरिष्ठ अनसूयानंदन । तेविं तूं सभाग्य दि-
ससी जाण । नामा चिद्रत्न पुत्र तुझा ॥ ७४ ॥ कीं उत्तानचरण नृपती । त्याची कांता ज्येष्ठ सुनीती । ध्रुव पुत्र प्रसवे
निश्चितीं । वश मजप्रती केलें जेणें ॥ ७५ ॥ कीं अंजनी मातेचिया कुशीं । हनूमंत जन्मला वानरवंशीं । तैसाचि ना-
मा सद्गुणराशी । तुझे उदरासी आला कीं ॥ ७६ ॥ धन्य गोणाई तुझें भजन । पोटासि आले वैष्णवजन । तुझें भाग्य व-
र्णावें कोणें । करविलें स्तनपान नामयासी ॥ ७७ ॥ नामा धरून निजउदरीं । विश्रांति घेतली शेजेवरी । तुझे भाग्या-
ची थोरी । मज निर्धारीं न वद्वे ॥७८॥ भोजन करितां नामयासी । सवें घेऊन तूं जेविसी । तुझिया सुकृताच्या रा-
शी । तूंचि जाणसी स्नेहाळे ॥ ७९ ॥ जो सर्वांवरिष्ठ अजित पूर्ण । तो मी वर्णीं तुझे गुण । ऐसी भाग्याची तूंचि धन्य ।
नामा निधान पुत्र तुझा ॥ १८० ॥ गोणाई ह्मणे जगज्जीवना । विश्वव्यापका मनमोहना । माझा मज देऊनि नामा ।
भजन प्रेमा असोंदे ॥ ८१ ॥ ऐसें ऐकूनि जगजेठी । वरती करूनि पाहे दिठी । नाम्यासी लावील प्रपंचवाटीं । ह्मणूनि
कष्टी होतसे ॥ ८२ ॥ उगाचि राहतां जगज्जीवन । गोणाईस कळलें चिन्ह । सर्वांवरिष्ठ तर्कज्ञान । ऐसें सज्ञान बोलती
॥८३॥ चौदा विद्या अभ्यास करितां । सकळचातुर्यं हातासि येतां । तर्कज्ञान चित्तीं नसतां । व्यर्थ सर्वथा जाणिजे ८४

राजसभेस पांडित्य करणें । न्यायनीति विचारणें । सभा पाहूनि उत्तर देणें । तरी तार्किकज्ञान असावें ॥ ८५ ॥ शरीर-
संबंध करावयासी । कीं व्यवहार करितां आणिकांसी । पुस्तक वाचितां वाचकासी । तार्किकज्ञान असावें ॥ ८६॥ इ-
ष्टत्व करावें कोणाप्रती । निजगुज बोलतां एकांतीं । पुस्तक लिहितां लेखकाप्रती । तार्किकज्ञान असावें ॥ ८७ ॥ पात्र
पाहूनि दान करणें । कीं रोगी पाहून औषध देणें । सभा पाहोनि कीर्तन करणें । तरी तार्किकज्ञान असावें ॥८८॥ असो
मागील अनुसंधान । उगाच राहतां जगज्जीवन । राही रुक्मिणी बोलावून । देत गाऱ्हाणें त्यांपाशीं ॥८९॥ सत्यभामा
कालिंदी सती । जवळ बोलावून निजप्रीतीं । गोणाई ह्मणे तयांप्रती । माझी वचनोक्ती ऐकावी ॥९० ॥ दीनदयाळ तु-
मचा पती । श्रुतिशास्त्रें ज्यासी वर्णिती । तरी माझिया मुलास लावून प्रीती । विदेहस्थिती कां केली ॥ ९१ ॥ माझा ए-
कुलता एक बाळ । भजनीं लावियला सर्वकाळ । ऐसा नाटकी हा घननीळ । तुह्मी सकळ जाणतसां ॥ ९२ ॥ शुक-
सनकादिक थोर । साधुसंत योगीश्वर । यांसी ठाउका विचार । आमुचा घरचार मोडला ॥९३॥ आह्मी दुर्बळ
अनाथ दीन । घरीं नाहीं वस्त्र अन्न । नाम्यासि लाविलें आपुलें ध्यान । तुह्मांकारणें कळों या ॥ ९४ ॥ देव देखिले
ऐकिले फार । चौकस भोजनीं समजणार । परी या ऐसा अगोचर । कोणीं साचार न देखों ॥९५॥ कुळदेव ह्मणवितां
आपणिया । तरी नित्य पडों याचे पायां । उगेंच मैंदावें करूनियां । छळितो वायां आह्मांसी ॥ ९६॥ भीड धरिली म्यां
जोंवरी । ह्मणोनि राहिली याची थोरी । मर्यादा तुटलियावरी । चौघाचारी नेईन मी ॥९७॥ दर्शन होतांचि तये क्ष-
णीं । जीवित्वाची करितो हानी । एक पुत्र तो लाविला ध्यानीं । काय साजणी करावें ॥९८॥ वृत्तांत ऐकिला कीं स-
कळ । आतां प्रार्थूनि घननीळ । तयासि सांगोनि तत्काळ । माझी तळमळ निरसावी ॥ ९९ ॥ तुह्मी अवघ्या मिळोनि
कामिनी । घरासि आणावा चक्रपाणी । काय आहे त्याचे मनीं । ऐसें साजणी पुसावें ॥२००॥ पुढती बोले नामया-
सी । कांगा येथें बैसलासी । आतां बळेंच नेईन तुजसी । हृषीकेशी देखतां ॥ १ ॥ नाम्या चोर तूं संसारीं । जगन्मो-
हन हा असे वैरी । उभा ठाकोनि विटेवरी । प्रपंच बोहरी करितसे ॥ २ ॥ अरे या नाटक्या जगदुद्धारा । पुंडलीकानें
दीधला थारा । ह्मणवोनि न येसि तूं मंदिरा । प्रपंच मातेरा केला कीं ॥३॥ तरी आतां तुज नेल्याविण । कदा न जाय
मी येथून । ऐसा धरिला अभिमान । पंढरी गिळीन अवघी हे ॥ ४ ॥ अगा ये रूपलावण्या । प्रत्युत्तर दे शाहाण्या । उ-
गाच बैससी यादवराण्या । हे घरघेण्या विठ्ठला ॥ ५ ॥ गोणाई ह्मणे जगज्जीवना । विश्वव्यापका भक्तभूषणा । माझी
गोष्ट तुझिया मना । करुणाघना नये कीं ॥ ६ ॥ नामा देऊनि माझे हातीं । जगीं वाढवीं निजकीर्ती । ऐसें ऐकोनि श्री-
पती । काय वचनोक्ती बोलत ॥७॥ ह्मणे ऐक गोणाबाई । आपुले पुत्रासि घेऊन जाईं । आह्मांवरी निमित्त पाहीं । व्य-
र्थ कासया ठेविसी ॥८॥ हातीं धरून नामयासी । विठ्ठल ह्मणती गोणाईसी । घेऊनि जाईं निजपुत्रासी । निजमंदिरा
येवेळे ॥ ९ ॥ याणें टाकिली ममता माया । मजवरी वेहरण आलें वायां । घेऊनि जाईं आपुले ठायां । व्यर्थ कासया





बोलसी ॥ २१० ॥ ऐसें ह्मणोनि श्रीपती । नामा आणोनि दीधला हातीं । गोणाबाई सत्वरगती । सदनाप्रती चालिली
॥ ११ ॥ मार्गीं चालतां निजमाया । काय बोलतसे नामया । शरण गेलासि पंढरीराया । प्रपंच माया टाकूनी ॥ १२ ॥
ऐकोनि गोणाईची मात । नामा उगाच खालीं पाहात । नेत्रांतून अश्रु पडत । प्रेमयुक्त तेधवां ॥१३॥ नामयासी हातीं
धरूनी । घरा त्वरित आली जननी । तों राजाबाई निजसदनीं । स्वयंपाकासी निघाली ॥१४॥ नानापरींचीं दिव्या-
न्नें । नवविध रचिलीं पक्वान्नें । ह्मणे चोज केलें जगज्जीवनें । हरुषें पूर्ण वोसंडे ॥१५॥ हांडे भांडीं द्रव्यराशी । वस्त्राभरणें
निजकांतेसी । अनुताप जाहला चित्तासी । नामयाचे तेधवां ॥ १६ ॥ जैसा मृग पडलिया फांसीं । घाबरा होय निज-
मानसीं । द्रव्य देखोनि नामयासी । गती तैसीच जाहली ॥ १७ ॥ कीं दीपकासि लागतां प्रभंजन । तेच क्षणीं दिसे
तेजहीन । तेविं नाम्याचें उद्विग्न मन । वैभव देखोनि जाहलें ॥ १८॥ कीं सुंदरासि होतां कुष्ट प्राप्त । देखोनि कंटाळे
त्याचें चित्त । तेविं वैभव देखोनि वैष्णवभक्त । कंटाळती निजमानसीं ॥ १९ ॥ कीं ग्रहण लागतां वासरमणी । तेज-
हीन दिसे तये क्षणीं । तेविं माया वैभव देखोनि । म्लानवदन जाहला ॥ २२० ॥ कीं मेघांसि लागतां दक्षिणवारा ।
ते विरून जाती दिगंतरा । तेविं नामयाचे हृदयांबरा । विक्षेप त्वरा पावला ॥ २१ ॥ कीं पराजय ऐकोनि नृपनाथ ।
विक्षेपें भरे तयाचें चित्त । तेविं वैभव देखोनि विष्णुभक्त । चिंताक्रांत जाहला ॥ २२ ॥ कीं श्रीशुक बैसले अनुष्ठानीं ।
रंभा देखोनि कंटाळे मनीं । तेविं नामा संपत्ती देखोनि । उद्विग्न मनीं जाहला ॥ २३ ॥ मातेसि पुसे निजप्रीती । को-
ठोनि आली धनसंपत्ती । गोणाई ह्मणे मजप्रती । नाहीं निश्चिती ठाउकें ॥ २४ ॥ कांता ह्मणे नामयासी । उशीर जा-
हला भोजनासी । तरी स्नान करूनि वेगेंसी । प्रसादासी बैसावें ॥ २५ ॥ नामा विस्मित जाहला मनें । आज कां नम्र
बोलली वचनें । ह्मणे धनधान्य घरीं देखोनि । समाधान निजकांते ॥ २६ ॥ द्रव्य नसतां आपुले पदरीं । बंधु ह्मणती
आमचा वैरी । पिशुन हांसती दुराचारी । ऐसी परी मायेची ॥२७॥ निजोडा पुत्र देखोनि नयनीं । पिता कंटाळे तये
क्षणीं । ह्मणे आमचे पोटीं येऊनी । अपकीर्ति जनीं तुवां केली ॥ २८ ॥ शेजारी लोक होती कष्टी । ह्मणती उगाच प-
डतो आमुचे दृष्टी । कन्या भगिनीच्या जातां भेटी । लज्जित पोटीं त्या होती ॥ २९ ॥ दुर्बळ भ्रतार असतां जाण । कां-
ता नेदीच आलिंगन । पुत्र ह्मणती आह्मांकारण । करूनि ऋण ठेविलें ॥ २३० ॥ एवं अवघे सुखाचे सांगाती । विष-
मकाळीं अव्हेरिती । दीनबंधु रुक्मिणपती । नामयास प्रीती तयाची ॥ ३१ ॥ कांतेसि पुसे तये क्षणीं । कोठूनि
आणिली द्रव्यगोणी । येरी न बोले तयेक्षणीं । मौन धरूनि राहिली ॥ ३२ ॥ ह्मणे यासी सांगतां ये अवसरीं । आ-
तांच वांटील वरचेवरी । ऐसें जाणून निर्धारीं । प्रत्युत्तर न बोले ॥ ३३ ॥ तंव जनी नामयाची दासी । जवळ
येऊनि वेगेंसी । चरणीं लागून नामयासी । सांगे तयासी वृत्तांत ॥ ३४ ॥ ह्मणे राजाबाई होतां कष्टी । सत्वर पा-
वले जगजेठी । वाणी होऊनि केशवशेटी । गोणी लोटी द्रव्याची ॥ ३५ ॥ होऊनि कानडा लिंगाइत । आला होता

वैकुंठनाथ । अंगणीं ठाकून बोलिला मात । पाहुणा त्वरित आलों कीं ॥ ३६ ॥ राजाई पुसे त्यालागून । तुमचें सांगा नामाभिधान । ऐसें ऐकूनि करुणाघन । काय वचन बोलिला ॥ ३७ ॥ मधुरोत्तरीं राजीवनेत्र । ह्मणे नामा आमुचा परममित्र । नाम पुससी स्वतंत्र । घनःश्यामगात्र मज ह्मणती ॥३८॥अन्नवस्त्र संकीर्ण येथ । ऐसी ऐकोनी कानीं मात । गोणीभर होन त्वरित । घेऊनि निश्चित पातलों ॥ ३९ ॥ सरोनि जातां द्रव्यगोणी । आणीक येईन घेऊनी । नामयाचें छळण कोणी । आजपासूनी न करावें ॥ २४० ॥ गोणी लोटोनि रुक्मिणीपती । आतांच गेले सत्वरगती । नामयाचे नयनपातीं । अश्रुपात डळमळती ॥ ४१ ॥ ह्मणे हे कृष्णा पतितपावना । भक्तवत्सला भक्तभूषणा । करुणासिंधो जगज्जीवना । मनमोहना श्रीविठ्ठला ॥ ४२ ॥ तूं अज अजित अव्यय । मायातीत निरामय । अनाथनाथ करुणालय । मजकारणें शिणलासि कां ॥ ४३॥ योगसाधनें करितां हठीं । कदां न पडसी तयांचे दृष्टी । आजि तूं वाणी केशवशेटी । मजसाठीं जाहलासि कां ॥४४॥ दीनदयाळे कृष्णाबाई । तुज म्यां संकट घातलें नाहीं । ऐसें असतां लवलाहीं । धांवून पायीं आलासि कां ॥ ४५ ॥ कामिक भक्त तुज भजती । त्यांसी न देसी धनसंपत्ती । मी न मागतां रुक्मिणीपती । धांवूनि प्रीती आलासि कां ॥ ४६ ॥ सागरीं वर्षला जरी मेघ । तरी कोणता तयाचा उपयोग । तेविं होन दीधले श्रीरंगें । मज निजांगें न मानती ॥ ४७ ॥ ऋद्धिसिद्धि राज्यसंपत्ती । सलोकतादि चारी मुक्ति । टाकोनि पाय आठवीं चित्तीं । तुझे श्रीपती निशिदिनीं ॥ ४८ ॥ तीर्थव्रतें योगसाधन । जप तप अनुष्ठान । कांहींच नेणें तुझें नाम । गातसें सप्रेम निशिदिनीं ॥ ४९ ॥ यापरी करूनियां स्तवन । बोलाविले गांवीचे ब्राह्मण । द्रव्यसामग्री वस्त्रें भूषण । द्विजांकारणें दीधलीं ॥ २५० ॥ उपाधीरहित होऊन नामा । सद्भावें भजे पुरुषोत्तमा । ज्याचे आवडीचा प्रेमा । नेणे ब्रह्मा सर्वथा ॥ ५१ ॥ अहो संतचरित्रग्रंथ जाण । हेंच पंढरीक्षेत्र पुरातन । शुद्ध सात्विक वैष्णवजन । तेच येऊन पाहती ॥ ५२ ॥ नवज्वर अंगीं असतां जाण । तयासि न रुचे पक्वान्न । तेविं ज्यास पाहिजे दाराधन । त्यास हें चरित्र रुचेना ॥ ५३ ॥ निष्काम असती जे विरक्त । त्यांसीच आवडे हा ग्रंथ । येर तमोगुणी जे अभक्त । त्यांस हें चरित्र रुचेना ॥ ५४ ॥ कावळ्यांस पाहिजे मांसचारा । ते कासया येतील क्षीरसागरा । तेविं अभक्तांसि हा ग्रंथ खरा । न रुचे बरा जाणिजे ॥ ५५॥ सत्वगुणी जे मराळ । त्यांसी लागती रसाळ बोल । ज्यांचे हृदयीं सप्रेम बोल । विकल्प तळमळ नसेची ॥५६॥ पुढील अध्यायीं रस अद्भुत । शुक अवतार कबीरभक्त । तयाचें चरित्र रसाळ बहुत । परिसोत भक्त निज प्रेमें ॥ ५७॥ त्यांचीं चरित्रें युक्तिप्रयुक्ती । वर्तलीं तैसींच बोलिंजेती । अभंगीं नाम महीपती । नवल संतीं हें केलें ॥ ५८ ॥ स्वस्तिश्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ परिसोत भाविक भक्त ॥ चतुर्थाध्याय रसाळ हा ॥ २५९ ॥ ओंव्या ॥ अध्याय ॥ ४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । ऐका श्रोते सावधान । कथा सुरस अतिपावन । गोड पाहतां अमृताहून । उपमा गौण वाटतसे ॥१॥ पवित्रपणें वर्णूं थोरली । तरी गंगेहून दिसे आगळी । विस्तीर्णपणें पाहतां भली । उपमा निराळी नसेची ॥२॥ गांभीर्यपणें पाहतां जाण । सखोल दिसे समुद्राहून । उदार कल्पतरूहून । राव रंक सारिखे ॥३॥ शीतळपणें पाहतां सुक्तीं । तरी उपमेसि गौण निशापती । अमूल्य तरी रत्नज्योती । त्याही झांकिती निजतेजें ॥ ४ ॥ मान्यत्वपणें पाहतां जाण । तरी सुखें गातो पंचवदन । दुर्लभ तरी इंद्रादिगण । इजकारणें धुंडिती ॥५॥ ऐसी भक्तकथा पवित्रजाण । सादर ऐका भाविकजन । मागील अध्यायीं निरूपण । केलें श्रवण सकळिकीं ॥६॥भीमरथींत शिंपला वाहत । तो गोणाईस लाधला नामा भक्त । दुजा पडिला भागीरथींत । वाहत जात अतिवेगें ॥७॥ वाराणशीस गंगेतटीं । लागला मणिकर्णिकेचे घांटीं । जो शुक अवतार महाहटी । नये पोटीं गर्भवासा ॥८॥ अयोनिसंभव होऊनि सगुण । मुखें करित नामस्मरण । शिंपल्यांतून ध्वनी मिधे पूर्ण । राम राम अहर्निशीं ॥ ९ ॥ तंव तमालमोमीन अकस्मात । सूत धुवावयास आला तेथ । निजदृष्टीनें खालीं पाहत । तों शिंपला अवचित देखिला ॥ १० ॥ उदकांत जाऊनि तेक्षणीं । शिंपला पाहे उकलोनी । तों बाळक देखिलें नयनीं । संतोष मनीं वाटला॥११॥केलें नसतां कांहीं साधम । तों अवचित सांपडलें निधान । धुंडितां थिल्लर जीवन । तों क्षीरसागर देखिला ॥१२॥ काचमणी ओंवितां तत्काळ । अकस्मात देखिलें मुक्ताफळ । शुक्तिका वेंचितां निर्मळ । तों रत्न आंत सांपडलें॥१३॥पाहूं जातां यमनगरी । तों दृष्टी देखिली वैकुंठपुरी । वस्तीस झोंपडी पाहतां बरी । तों हेममंदिरीं प्रवेशला ॥१४॥ पहावयास जातां डफगान । तों पुढें ऐकिलें हरिकीर्तन । कीं ऐकावयासी गेला भांडण । तों सामगायन होतसे ॥१५॥ शिंदीवरी करितां आदरू । तों अंगणीं उगवला कल्पतरू । संगतीस लागतां चोर जारू । तों आले सद्गुरू भेटावया ॥१६॥ तेविं प्रपंचव्यवहार करितां देख । गंगेंत सांपडलें निजबाळक । जो कलियुगीं अवतरला श्रीशुक । विश्वोद्धारक जगद्गुरू ॥१७॥पालवीं घेऊनि निजप्रीती । घरासि गेला सत्वरगती । हर्षें वोसंडोनि चित्तीं । कांतेप्रती सांगतसे ॥१८॥ ह्मणे बत्तीसलक्षणी लावण्यभरित । बाळक सांपडलें गंगेंत । याचा प्रतिपाळ तूं निश्चित । करीं त्वरित निजकांते ॥१९॥ ऐसें ऐकतां तेसमयीं । कांतेस पान्हा फुटला पाहीं । स्तनपान करवूनि लवलाहीं । हर्षें हृदयीं वोसंडे ॥२०॥ अविंधवंशीं वैष्णव थोर । ह्मणोनि नाम ठेविलें कबीर । मायबापें तयावर । प्रीति अपार करिताती ॥२१॥बाळक करी नामस्मरण । ऐकोनि आश्चर्य करिती जन । ह्मणती हा तमालमोमीन । काय पुण्य आचरला ॥२२॥ वैष्णवभक्त तपागळा । याचे उदरासी कैसा आला । एक ह्मणती अदृष्ट त्याला । सानुकूळ जाहलें कीं ॥२३॥ अदृष्ट जाहलिया सानुकूळ । कासया पाहिजे विद्याबळ । नीचयोनींत जन्मले खळ । त्यांसी वंदिती सकळ प्रारब्धें॥२४॥तेविं याचें भाग्य अघटित । पोटासि आला विष्णुभक्त । क्षेत्रवासी लोक समस्त । ऐसें बोलती परस्परें ॥२५॥ असो कांहीं होतें जन्मांतर । ह्मणोनि पोटासि आला कबीर । दिवसेंदिवस जाहला थोर । लग्न केलें तया-

चें ॥२६॥ मातापिता कबीराप्रती । प्रपंचव्यवहार शिकविती । परी तें नये त्याचे चित्तीं । प्रपंचवृत्ती मानेना॥२७॥ना-
ठवे आपुलें आणि परावें ।सम विषम नाहीं ठावें । ब्रह्मादिक रंकराव । सारिखा भाव तयांवरी ॥२८॥ पुढें पडिल्या द्र-
व्यराशी । इच्छा न वाटे घ्यावयासी । तस्कर नेतां निजद्रव्यासी । रक्षण तयासी करीना ॥२९॥ यापरी कबीर करितां
भजन । प्रपंचासी येतसे उणें जाण । दुराचारी हांसती पिशुन । वर्तणूक देखोन कबीराची ॥ ३० ॥ केळी बोरीस एके-
ठायीं । लावितां सौख्य नपडे कांहीं ।अग्नि जळ एकत्र पाहीं । नांदतील कैसीं मित्रपणें ॥३१॥ वेश्या आणि पतिव्रता ।
कृपण आणि उदारदाता । निंदक आणि बुद्धिमंता । वैर चाले परस्परें ॥३२॥ मक्षिका आणि पक्कान्न । यांसि कैंचें बर-
वेपण । कीं अजापाळक आणि पंडितजन । मित्रपणें न राहती ॥ ३३ ॥राहु आणि निशापती । कीं पतंग आणि दीपक-
ज्योती । कीं समुद्र आणि अगस्ती । प्रीति कैशारीती घडेल ॥३४॥ श्रीकृष्णचरित्र वाचितां जाणा । नयेच शिशुपाळा
चे मना । श्रीरामप्रताप ऐकतां रावणा । सौख्य नवाटे ज्यारीती ॥३५॥ विष आणि अमृतासी । अखंड वैर चाले त्यांसी ।
तेविं प्रपंच आणि परमार्थासी । विकल्प मानसीं सर्वदा ॥३६॥ असो आतां बहुभाषण । कबीर करितसे हरिभजन । तों
प्रपंचांत येतसे उणें जाण । हांसती पिशुन तयासी ॥३७॥ हृदयीं धरिलासि श्रीपती । तुझी तों ऐसी विदेहस्थिती । आतां
प्रपंच कवणे रीती । चालेल हें कळेना ॥३८॥ पाजणी करून तये दिवसीं । मागीं बैसविलें कबीरासी । परी देहबुद्धीनाठवे
तयासी । रामभजनीं विनटला ॥३९॥ ध्यानांत आणूनि श्रीराममूर्ती । लाविलीं दोन्हीं नेत्रपातीं । नामरूपीं जडली वृ-
त्ती । देहाकृती नाठवे ॥ ४० ॥ तों माता येऊन तयाजवळी । सावध करीत तयेवेळीं । ह्मणे कबीरा तुज येकाळीं । काय
जाहलें कळेना ॥४१॥ माता मारील सत्वरीं । ह्मणोनि आला देहावरी । सावध होऊनि ते अवसरीं । हातभरी विणिये-
ला ॥४२॥ सवेंच जाहली विदेहवृत्ती । हृदयीं बिंबली श्रीराममूर्ती । ऐसें देखोनि अयोध्यापती । आपण बैसत विणाव-
या ॥४३॥ ह्मणे हा लागला माझे ध्यानीं । माता मारील यालागुनी । ह्मणूनियां धनुष्यपाणी । शेला विणीत बैसला ४४
जो क्षीरसागरविलासी । ब्रह्मांडनायक वैकुंठवासी । तो कबीराचिया मागासी । विणावयासी बैसला॥४५॥ योगी वै-
सले वज्रासनीं । लवकरी नये त्यांचे ध्यानीं । तो कबीराची भक्ती देखोनी । शेलाविणीत बैसला ॥४६॥श्रुति शास्त्रें क-
रितां पठण । प्राप्त नव्हेचि तीर्थाटन । तो द्वारकावासी भक्तभूषण । शेला विणीत बैसला ॥४७॥ सनकादिक मुनी जया
सी । ध्यानांत आणिती अहर्निशीं । तो हरी कबीराचे मागासी । विणावया बैसला ॥४८॥ ज्याचे हृदयीं धरूनि चरण ।
समुद्रतनया करी सेवन । जो नीलग्रीवाचें प्रियभूषण । शेला विणीत बैसला॥४९॥ तंव सावध होऊनि ते अवसरीं । क-
बीर आला देहावरी । विचार करूनि निज अंतरीं । लागे लवकरी विणावया ॥५०॥ सावध होतोंचि सत्वर । ध्यानांत
आला जानकीवर । मागुती निवांत होऊन कबीर । तों शार्ङ्गधर विणीतसे॥५१॥जेव्हां होय विदेह स्थिती । तेव्हां वि-
णीत रुक्मिणीपती । कांहीं होतां देहस्फूर्ती । दुरोनि पाहती कौतुक ॥ ५२ ॥कबीर आणि शार्ङ्गधर । दोघांजणीं विणि-



लें अंबर । जेविं गंगेसी सरस्वतीचें नीर । असे साचार अभेदत्वें ॥५३॥ तेविं देवभक्त दोघे मिळोनी । वस्त्र विणिलें तेच
क्षणीं । घडी करून निजसदनीं । मातेपाशीं दीधली ॥५४॥ माता ह्मणे कबीरासी । आतां जाईं बाजारासी । शेला वि-
कून वेगेंसी । द्रव्य घेऊनि येईं कां ॥५५॥ अवश्य ह्मणोनि ते अवसरीं । कबीर निघाला सत्वरीं । शेला घेऊनि निजकरीं
जाऊनि बाजारीं बैसला ॥५६॥ लाऊनियां नेत्रपातीं । हृदयीं चिंती श्रीराममूर्ती । मुखें गातसे रामकीर्ती । विदेहस्थि-
ती होऊनी ॥५७॥ शेला आणिला विकावयासी । हा आठव नाहीं निजमानसीं । हृदयीं धरूनि हृषीकेशी । जपे राम
मानसीं निजप्रेमें ॥५८॥ व्यवहारी आले बाजारीं । कबीर बैसला त्यांशेजारीं । परी शेल्यासी सत्वरी । गिराईक कोणी
नयेची ॥५९॥ जो देवाधिदेव वैकुंठनाथ । शेल्यासी लागले त्याचे हात । घेणारासी अमूल्य दिसत । दृष्टी पाहतां दुरो-
नी ॥६०॥ पांचांत वस्त्र घेणारासी । द्विगुणमोलाचें दिसे त्यासी । दहांत घेऊं ह्मणतां मानसीं । दिसे तयासी विसांचें ६१
पंचविसांत जे घेणार । तयांसी दिसे पन्नासांवर । शत अर्धाचें पाहणार । दुप्पट मोलाचें त्यां दिसे ॥६२ ॥ पांचशत सह-
स्राचे जोहरी । तयांसि दिसे सहस्रावरी । अमूल्य ह्मणोनी ते अवसरी । उगेचि दुरून पाहती ॥६३॥ ह्मणती पुसावें यासि
जरी । तरी द्रव्य नाहीं आपुले पदरीं । कोणी सावकार येती जोहरी । त्यांसी दिसे लक्षावरी मोलाचें ॥ ६४ ॥ एकाकडे
एक पाहत । पुढें जाती बाजारांत । ह्मणती हा कबीर भक्त । अमूल्य वस्त्रें विणितो कीं ॥६५॥ द्रव्य नसतां आमुचे पदरीं ।
उगेच आलों हाटबाजारीं । ऐसें बोलोनि नरनारी । जाती सत्वरीं लगबगें ॥६६॥ ज्याची जैशी शक्ती जाण । तैसेंच दि
से त्या कारण । कबीरापाशीं गिऱ्हाईक कोण । न पुसे येऊन ह्मणोनियां॥६७॥ जो वस्त्र जैसें घेऊं ह्मणे । तैसेंचि दिसे त्या
कारणें । जैसें जीवमात्रीं चैतन्यें । वसे जैसें तैसियापरी ॥ ६८॥ मोहरी कांदा ऊंस जाण । बीज पेरूनि घातलें जीवन ।
ज्याचे जैसे होते गुण । उदक तैसेंचि जाहलें कीं ॥६९॥कीं अनेक वाद्यें वाजती घोषें । तयासारिखेंच होय आकाशें । क-
बीराचें वस्त्र तैसें । भिन्नत्वें दिसे सकळांसी ॥७०॥ नातरी एकचि सुवर्ण । अलंकारीं दिसे भिन्नपण । कीं जितुकें जो घा-
ली ईंधन । दिसे कृशान तेवढाची ॥७१॥ कीं नापित दावीत आरसा । पाहणार पाहती तैसा । कबीराचा शेला तैसा । घे-
णारासी दिसतसे ॥७२॥ दुरूनि दृष्टी पाहूनियां । ह्मणती शक्ति नसे घ्यावया । जवळी द्रव्य नसतां वायां । व्यर्थ कासया
पुसावें ॥७३॥ ऐसें जन बोलोनि त्वरित । उगेच जाती बाजारांत । श्रीरामभजन कबीरभक्त । प्रेमयुक्त करीतसे ॥ ७४ ॥
अस्तमानासी जातां दिनकर । वोसरत चालिला बाजार । नेत्र उघडोनि कबीर । भोंवतें साचार विलोकी ॥ ७५ ॥ ह्मणे
घरा गेले सकळ लोक । शेल्यासी नाहीं ग्राहिक । आतां आश्रमासी जातां देख । माता मारील मजलागीं ॥७६॥ ऐसें ह्म-
णूनि विष्णुभक्त।उगाच बैसला निवांत । तों एक वोस घर अकस्मात । नयनीं त्वरित देखिलें ॥ ७७ ॥ कबीर उठोनि स-
त्वरगती । जाऊनि बैसला एकांतीं । श्रीरामभजन निजप्रीती । सप्रेमगती करितसे ॥७८॥ सासू गांजील ह्मणून । लपोनि
बैसे जैसी सून । तेविं मातेचे भयें करून । बैसलासे एकांतीं ॥७९॥ कीं ध्रुवासी मायेनें हाणिली लाथ । रुसोनि गेला अर-

ण्यांत । तेविं उदास होऊनि कबीरभक्त । वोसघरांत बैसला ॥८०॥ कीं त्यजूनि सकळ कर्मास । संन्यासी होती परमहंस।
तेविं संसारीं होऊन उदास । वोसघरांत बैसला ॥८१॥ ऐशापरी तो विष्णुदास । प्रवेशलासे घर वोस । निष्ठा देखोनि ज-
गन्निवास । सत्व पहावयास पातला ॥८२॥ अतिवृद्ध होऊनि ब्राह्मण । वस्त्र नेसला फाटकें जीर्ण । हिंव सुटलें अतिदा-
रुण । पौषमाघा सारिखें ॥८३॥ कबीराचें पहावया उदारपण । ह्मणोनि कांपतसे जगज्जीवन । करीत बैसला होता भ-
जन । तों पातला ब्राह्मण तया ठायीं ॥८४॥ हरिचंद्ररायापासीं त्वरित । छळावया पातला गाधिसुत । कीं श्रियाळापासीं
कैलासनाथ । होऊन अतीत पातला ॥८५॥ अंबरीषाचें सत्व ऐकोनी । छळावयासि पातले दुर्वासमुनी । कीं बळीचें सत्व
पहावया नयनीं । वामन होऊनि देव आले ॥८६॥ तया रीती तोचि ब्राह्मण । कबीरासी बोले दीनवदन । ह्मातारा मी
अनाथ दीन । वस्त्राविण पीडलों कीं ॥ ८७ ॥ तूं विष्णुभक्त अति उदार । सीतकाळ पडिला थोर । कांहीं वस्त्र असेल तर ।
द्यावें सत्वर मजलागीं ॥८८॥ ऐसें ह्मणतां वैकुंठवासी । कबीर विचारी निजमानसीं । नाहीं ह्मणतां ब्राह्मणासी । हानी
सत्वासी होईल ॥ ८९ ॥ मग अर्धशेला फाडोनि सत्वर । ब्राह्मणासी देत कबीर । सप्रेम भजन निर्धार । करिता झाला ते-
धवां ॥९०॥ वस्त्र पांघरून चक्रपाणी । बाहेर आले तयेक्षणीं । विचार करिती निजमनीं । मागुती जाऊनि पाहवें ॥ ९१॥
ऐसें बोलोनि शार्ङ्गधर । मलंगवेषें झाला फकीर । माथां शोभती जटाभार । चरणीं तोडर गा[रमणि॥९२॥ हातीं तसबी
घेऊनि माळ । डोळे आरक्त केले विशाळ । सत्व पहावया घननीळ । चाले तत्काळ अतिवेगें॥९३॥ सुवर्ण मलिन देखतां
दृष्टी । पहावया घेती कसवटी । कीं भ्रमित नाणें असेल पोटीं । सुलाख ठोंचिती निजबळें॥९४॥ किंवा अमूल्य हिरा दे-
खोन । त्यावरी परीक्षक मारिती घन । तेविं कबीराचें पहावया मन । फकीर होऊन देव आले ॥ ९५ ॥ अट्टहास करूनि
देख । उभा ठाकूनि मारिली हांक । कबीरासि ह्मणे वस्त्र एक । द्यावें त्वरित आह्मांसी॥९६॥ खुदा निराकार निर्गुण । तुज
नाहीं त्याची आठवण । तयासि सांडोनि रामभजन । किमर्थ येथें करितोसी ॥९७॥ ऐसी ऐकोनियां वाणी । कबीर बो-
ले मंजुळवचनीं । ह्मणे निराकार सगुण दोनी । अभिन्नपणें असती कीं ॥९८॥ तूप थिजलें कीं विघुरलें । परी घृतपणा ना-
हीं मुकलें । कीं अलंकार करितां सुवर्ण भलें । नाहीं मुकलें निजतेजा ॥९९॥ तेविं अव्यक्त जें कां अविनाश । तेंच आलें
आकारास । भक्तकार्यासि जगन्निवासें । सगुण वेष धरियेला॥१००॥ ऐसें बोलतां वैष्णववीर । मागुती काय बोले फकी-
र । कांहीं वस्त्र असेल जर । द्यावें सत्वर मजलागीं ॥१॥ अर्धशेला होता उरला । तो वेगें काढूनि त्यास दीधला । उपाधी-
रहित होऊनि बैसला । फकीर गेला झडकरी ।२। सरोनि गेलिया वर्षाकाळ । आकाश जैसें दिसे निर्मळ । कीं डांख गा-
ळितांच तत्काळ । दिसे सोज्वळ कांचन ॥३॥ मैलागिरी भुजंगें सोडिला । कीं चंद्रमा राहूनें उगळिला । तेविं उपाधिर-
हित भला । कबीर बैसला भजनास ॥ ४ ॥ कीं गंगेचा वोहटलिया पूर । दिसे जैसें निर्मळ नीर । कीं समुद्रांतून काढिला
मंदराचळ । राहिली खळखळ तयाची ।५। तेविं ग्राहिक नये शेल्यासी । ह्मणोनि चिंता होती मानसीं । ते निरसली ह्म-



णोन उल्हासी । कबीर मानसीं संतोषला ॥६॥ यापरी करूनि समाधान । करित बैसला श्रीरामभजन । ऐसें ऐकूनि ज-
गज्जीवन । काय करी तें ऐका ॥७॥ ब्राह्मणवेषें हृषीकेशी । गेला कबीराचे घरासी । बोलावून त्याचे मातेसी । वृत्तांत
तियेसी सांगत ।८। ह्मणे कबीर बैसला बाजारासी । गिऱ्हाइकें पुसती शेल्यासी । परी तो उत्तर नेदीच त्यांसी । मौन वा-
चेसि धरियेलें ॥९॥ उदंड आले घेणार । परी त्यांसी नेदी प्रत्युत्तर । ध्यानांत आणूनि सीतावर । भजन साचार करितसे
।११०। बाजार अवघा ओसरला । मग एक ब्राह्मण बोलाविला । अर्ध शेला फाडूनि त्याला । त्याणें दीधला जननीये
॥ ११ ॥ शेष राहिलें जें अंबर । मग बोलाविला एक फकीर । अर्धशेला सत्वर । दीधला साचार तयासी ।१२। वोसवरीं
पाहून एकांत । भजन करित बैसला तेथ । दुरून देखिला म्यां वृत्तांत । आलों त्वरित सांगावया ।१३। माझे मनींचा भाव
पूर्ण । कीं तुमचें असावें कल्याण । परी कबीर संसारांत मन । न घालीच जननीये ।१४। ऐसें बोलतां वैकुंठवासी । ऐकोन क्रो-
ध आला मातेसी । ह्मणे आतां येईल मंदिरासी । ताडीन तयासी निजकरें॥१५॥ ऐकूनि बोले मनमोहन । तो गृहीं लव-
कर नयेचि जाण । वृश्चिक अन्याय करितां पूर्ण । बैसे लपून आनठायीं॥१६॥ तो बैसलासे एकांतीं । चल दाखवितों तु-
जप्रती । वृद्धेसी धरूनियां हातीं । चाले श्रीपती लवलाहें॥१७॥ सत्वर आलीं दोघेंजण । जेथें कबीर करीत स्मरण । वृद्धे-
सी दाखवी दुरून । जगज्जीवन तेधवां ।१८। बैसला होता जिये सदनीं । तेथें रामनामाची निघे ध्वनी । जैसा नारदें अनु-
ष्टानीं । वाल्मीकिमुनी बैसविला ॥१९॥ कीं अशोकवनीं बैसली सीता । सप्रेमें भजे रघुनाथा । कीं जटायु रावणें गांजि-
तां । रामभजन करितसे॥१२०॥ कबीर बैसला तैशारीती । ध्यानांत आणूनि श्रीराममूर्ती । मुखें गात राम कीर्ती । विदे-
हस्थिती होउनी ॥२१॥ सांडोनियां मानापमान । सांडूनि लौकिक अभिमान । सांडूनि इंद्रियांचें विषयध्यान । करी
कीर्तन निजमुखीं ।२२। तों माता आली सदनांत । दुरून दाखवी वैकुंठनाथ । आपण बाहेर राहून त्वरित । पाहे कौतुक
भक्ताचें ।२३। माता ह्मणे कबीराला । शेला आणूनि दावीं मजला । नाहीं तरी येवेळां । शिक्षा करीन तुजलागीं ।२४। तंव
तो नेदीच प्रत्युत्तर । रामभजनीं मन जाहलें स्थिर । माता आणि द्विजवर । आलीं हें साचार कळेना ॥२५॥ नामरूपीं
जडलें चित्त । ह्मणूनि जाहला देहातीत । माता होऊन क्रोधयुक्त । काय बोलत निजपुत्रा ।२६। अरे तूं मैंदपणें येथ । भ-
जन करिसी प्रेमयुक्त । हें ऐकूनि वैकुंठनाथ । वृद्धेसी बोलत तेधवां॥२७॥ तूं अपशब्द बोलसी ओठीं । परी माया येतसे
तुझे पोटीं । आतां हातीं घेऊनि शिंपटी । शिक्षा करीं पुत्रासी।२८। ऐकोनि कबीराची माया । ह्मणे कांहीं मदिसे मारा-
वया । देयें शिंपटी काढोनियां । तिचे हातीं दीधली ॥२९॥ सक्रोध होऊनि ते अवसरीं । मारी कबीराचे पाठीवरी । तंव
तो नाहीं देहावरी । रामभजनीं विनटला।१३०। कौतुक वर्तलें ते अवसरीं । तें परिसावें भक्तचतुरीं । मारितां कबीराचे
पाठीवरी । बाहेर श्रीहरी कांपत।३१। ह्मणे तूं मारितेसी निजबाळ । ते माझे पाठीवरी आले वळ। आतां पुरे वो तत्काळ।
ऐसें घननीळ बोलिला।३२। जैसी मूळीं लागतां कुठारधारा । वृक्ष कांपतसे थरथरां । तेविं शिक्षा करितां भक्तकबीरा।

जगदुद्धारा जाहलें कीं।३३।कीं दुर्जनें गांजितां बाळकासी। तें दुःख झळंबे निजमायेसी। तेविं शिंपटी मारितां कबी-
रासी। हृषीकेशी कांपत॥३४॥नातरी सैन्य आटतां सकळ। राजा होतसे व्याकुळ। तेविं गांजितां भक्त प्रेमळ। दीनद-
याळ कांपत।३५।कीं पाडस पडिलिया फांसीं। ते व्यथा वाटे हरिणीसी। तेविं गांजितां निजभक्तासी। हृषीकेशी घा-
बरले॥३६॥कीं समुद्र देखोनि अगस्तीसी। भयें कांपे निजमानसीं। तेविं मातेनें मारितां कबीरासी। वैकुंठवासी घाब-
रले।३७।मग ह्मणे रुक्मिणीकांत। आतां पुरे करीं वो मात। ऐसें ह्मणोनि अनंत। काय बोलत तेधवां॥३८॥ह्मणे मी छ-
ळावयासि गेलों बळीतें। तंव द्वारपाळचि जाहलों तेथें। तेविं माझें कपट मज भोंवतें। आलें निरुतें फळासी॥३९॥उदंड
भाविक भक्त थोर। परी कोणी दीधला नाहीं मार। मजहूनि वरिष्ठ भक्त कबीर। कळलें साचार येकाळीं॥१४०॥मग
ह्मणे सीतारमण। यासि रूप दावावें सगुण। ब्राह्मणवेषें केलें छळण। याजकारणें कळेना।४१।विप्रवेष तत्काळ टाकून।
हातीं घेतलें धनुष्यबाण। मुकुट विराजे देदीप्यमान। आकर्णनयन विराजती॥४२॥कर्णीं कुंडलें अतिसोज्वळ। हृदय
विशाळ माज चिवळ। कंठीं कौस्तुभ अतिनिर्मळ। शोभे माळ वैजयंती।४३।कांसे कसिला पितांबर। चरणीं नूपुरें वां-
की तोडर। सीतेसहित जानकीवर। प्रकट जाहले तेधवां॥४४॥कबीर नेत्र पाहे उघडोनी।तों उगवले कोटी वासरमणी
ऐसेंरूप देखतां नयनीं।मिठी चरणीं घातली॥४५॥मग ह्मणे वैकुंठवासी। तूं उतरलासी माझिये कसीं। आतां मी नवि-
संबें तुजसी।जेंविं बाळकासी निजमाय॥४६॥सुलाखणीं टोंचून नाणें। गांठीसी बांधिती सज्ञान। कीं अमूल्य हिऱ्या-
सी मारूनि घण। भांडारगृहीं ठेविती॥४७॥तेविं तुज लाविला कसवटीं। आतां ठेवीन हृदयसंपुटीं। सदा पाहेन कृपा-
दृष्टी। ऐसें जगजेठी बोलिला॥४८॥कबीराचे मातेसि जगज्जीवन। सप्रेम देत आलिंगन। ह्मणे तुझें भाग्य मजकारण।
न वर्णवेची सर्वथा॥४९॥ ऐसें ह्मणतां हृषीकेशी। हर्ष वाटला निजमातेसी। कबीरा धरून पोटासी। क्षेम तयासी दी-
धलें॥१५०॥ह्मणे बा तुझ्या पुत्रपणें। मज जाहलें श्रीरामदर्शन। मातेनें कबीर हातीं धरून। गेली घेऊन निजगृहीं।५१
मग ह्मणे श्रीसीतारमण। माझें हृदयीं करीं चिंतन। ऐसें ह्मणोनि जगज्जीवन। अदृश्य जाहले तेधवां॥५२॥ अहो संत-
चरित्रग्रंथ साचार। हेंचि मानस सरोवर। सभाग्य श्रोते भक्त चतुर। येती सत्वर या ठायां॥५३॥मुक्ताफळचारा पाहि-
जे ज्यांस। ते बैसती येथें राजहंस। अभक्त द्वेषी निंदिती वायस। नाहीं विश्वास ज्यांचिर्त्ती॥ ५४॥ ते तर खडेच खाती
प्रीतीं। ज्यांसी मुक्ताफळें नरुचतीं। तेविं अभक्तां नुपजे भक्ती। विकल्प धरिती मनांत॥५५॥ परी तें असो आतां सज्ज-
नीं। अवधान द्यावें मजलागुनी। जेविं बाळक बोले बोबड्या वचनीं। ऐकोनि जननी संतोषे॥ ५६॥ डोळसांचा भाग
ऐकुनि कानीं। आंधळे चालती चांचपोनी। तेविं मी बोलें आर्षवाणी। कृपे करूनि तूमच्या॥५७॥ तुह्मींच उजळोनी
माझी मती। ग्रंथ वद्वीतसां सप्रेमयुक्तीं। आरंभीं नांव महीपती। लिहिलें ग्रंथीं निजकृपें॥५८॥ स्वतिश्रीभक्तविजय-
ग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ परिसोत भाविक भक्त। पंचमाध्याय गोडहा॥ १५९॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥



श्रीगणेशाय नमः। श्रीकृष्णाय नमः। आजचि दिवाळी दसरा पातला सण। सर्वेंद्रियां सौख्यकारण। त्यांतही श्रो-
तयांचे श्रवण। सभाग्य पूर्ण भासती॥१॥ सर्वांस समान निशापती। परि चकोरें आधीं तृप्त होती। तेविं भक्तकथा
वाचितां युक्तीं। श्रवणें दिसती सभाग्य॥२॥कीं वऱ्हाडी मिळाले अपार। त्यांत वरमायेचा मान थोर। कीं आका-
शीं उगवतां दिनकर। कमळिणी आधींच विकासती॥३॥ नातरी अंबरीं मेघ वोळतां देख। आधीं तृप्त होती चात-
क। कीं पुष्पांचा मकरंद सुरेख। भ्रमर आधींच सेविती॥४॥ नातरी करितां पुण्याहवाचन। आधीं गणपतीचें होय
पूजन। कीं शंकरें वांटितां चौदा रत्नें। आधीं दीधला मान विष्णूसी॥५॥ तेविं भक्तकथारसउत्पत्ती। वाढितां स-
भाग्यांचे पंक्ती। श्रवण आधींच तृप्त होती। ऐसें मजप्रती वाटतें॥६॥ श्रवण झालिया होय मनन। मननापाठी नि-
दिध्यासन। मग साक्षात्कारासी येऊन। होय विज्ञान साधक॥७॥ एवं ज्ञानेंद्रियांत वरिष्ठ श्रवण। त्यासि करावें क-
र्णभूषण। तरी भक्तकथा अमूल्यरत्न। करूं कोंदण हेमतगटीं॥८॥ सगुण साकार कुंडलें वळोनी। लेववूं श्रोतयांचे
कर्णीं। जीं सिद्धांतज्ञानें अमूल्यपणीं। ज्ञानप्रकाशें तळपती॥९॥ मग संतुष्ट होऊन रुक्मिणीरमण। अक्षय देईल व-
रदान। जे वर्णील निजभक्तांचे गुण। कामना मनीं हीच धरिली॥ १०॥ आतां ऐका भाविक प्रेमळ। कथा पुढें ती
बहुरसाळ। कबीरासी भेटोनि घननीळ। आले तत्काळ मंदिरा॥ ११॥ मागें गांजिलें मातेनें। तेव्हां तीस होतें अ-
ज्ञान। झालिया श्रीरामदर्शन। समाधान झालें कीं॥ १२॥ करीत होती सासुरवास। ती कांहींच न बोले तयास।
कृपा करितां जगन्निवास। अरिष्टें निरसती सर्वही॥ १३॥ रायाची कृपा होतां जाण। तयास मानिती प्रधान जन।
कीं सासूस आवडती असली सून। जन हेळणा न करिती तिची॥ १४॥श्रीगुरुकृपा होतांचि जाण। तयासि न बाधे
जन्ममरण। कीं सरस्वती जालिया प्रसन्न। पाखंडी वाद न घालिती॥ १५॥ जयासी सुधारस लाधला जाण। रोग
न बाधी त्याकारण। कीं प्रसन्न असतां गजवदन। नये विघ्न त्यापाशीं॥१६॥तेविं कृपा करितां अयोध्याधीश। माता
न करी सासुरवास। दिव्यज्ञान होऊनि तीस। हरिभजनीं विनटली॥ १७॥ उदास होऊन असे अंतरीं। संसारीं रा-
हाटे लोकाचारीं। नामस्मरण निरंतरीं। सप्रेम भरीं करितसे॥ १८॥ अन्नवस्त्र घरीं नसतां। मनांत कांहीं न वाटे चिं-
ता। कबीराची स्त्री पतिव्रता। सती अनसूयेसारिखी॥ १९॥ दीप आणि प्रकाशज्योती। अभिन्नपणें सदा असती।
कां अक्षर आणि अर्थ निश्चिती। द्वैत चित्तीं न घडे त्यां॥२०॥ कीं चपळा आणि मेघ जाण। दोनी नांदती ऐक्यपणें।
तेविं कबीरकांता दोघेंजण। एकचित्तें वर्तती॥ २१॥ कीं गोडी साखर जयारीती। वेगळेपणें कदा न होती। कीं शशी
तुटतां वाढतां रीतीं। कळा तैसीच होतसे॥ २२॥ तेविं कबीर येऊन संसारीं। सुख दुःख मानी समसरी। तैसीच कां-
ता निर्धारीं। निजमानसा आकळोनी॥ २३॥ तंव भक्तिज्ञान वैराग्य पुतळा। तिचे उदरीं गर्भ संभवला। नवमास हो-
तांचि तिजला। पुत्र झाला कबीरासी॥२४॥तो उपजतांचि वैराग्यशीळ। शुचित्वपणें अति निर्मळ। उदार ज्ञानी नि-

श्वय अढळ । माझीं तळमळ चित्तासी ॥ २५ ॥ बारा दिवस होतांचि जाण । कमाल ठेविलें नामाभिधान । ऐकूनि पि-
त्याचें कीर्तन । तैसेंचि भजन करितसे ॥ २६ ॥ सात वर्षें होतां जाण । पित्यासि बोले नम्र वचन । ह्मणे द्वारके जावया
कारण । आज्ञा द्यावी मजलागीं ॥ २७ ॥ ऐकोनि पुत्राचें वचन । कबीर बोलिला त्याकारणें । ह्मणे तूं आपले मनोरथ
पूर्ण । करून येई सत्वर ॥ २८ ॥ लहान वय असतां जाण । करूं इच्छी तीर्थाटन । हें देखोनि कबीराचें मन । उल्हासयु-
क्त तेधवां ॥२९॥ जैसा राजयाचा निजबाळ । जिंकूं इच्छितां भूमंडळ । पित्यासि हर्ष वाटे तत्काळ । तैसें वाटलें कबी-
रासी ॥ ३० ॥ कीं चंद्रमा देखोनि कळायुक्त । सागरासी भरतें दाटत । तेविं कमाल तीर्था जात । कबीर भक्त आनंदला
॥३१॥ कीं तांडव करितां गजानन । आनंदें डोले पंचवदन । कीं सरस्वतीचें ऐकोनि गायन । कमलोद्भव संतोषे॥३२॥
तेविं पुत्र देखोनि वैराग्यभरित । उभयतां जाहलीं हर्षयुक्त । नमस्कार करूनि त्वरित । कमाल भक्त चालिला ॥ ३३ ॥
मार्गीं चालतां सुपंथीं । मुखीं गातसे नामकीर्ती । लज्जायमान लौकिकस्थिती । नयेच चित्तीं तयाच्या ॥ ३४ ॥ नाव-
डे वस्त्र भूषण । रसनेसी नावडे उत्तम अन्न । नावडे दांभिक राजदर्शन । श्रीरामभजना वांचोनी ॥ ३५ ॥ कबीरपुत्र
कमाल भक्त । ऐसें जाणती लोक समस्त । नगरासी जातां सामोरे येत । ऐकोनि मात निजकर्णीं ॥ ३६ ॥ जैसा
ब्रह्मपुत्र नारदऋषी । कीर्तननिष्ठ अहर्निशीं । तैसाच कमाल दिवसनिशीं । रामभजनीं विनटला ॥ ३७ ॥
ग्रामवासी देखोनि जन । गांवांत नेती सन्मानेंकरून । एकरात्र तेथें राहून । हरिकीर्तन करितसे ॥ ३८ ॥ या-
परी तो विज्ञानस्थिती । द्वारकेसि गेला सत्वरगती । तों पुढें देखिलें तीर्थ गोमती । अनुताप चित्तीं जाहला ॥ ३९ ॥
अनुतापेंविण तीर्थाटन । तरी व्यर्थचि येरझार केली जाण । पोटीं नसतां पुत्रसंतान । तरी कासया वतन साधावें। ४० ।
द्रव्य नसतां कांहीं पदरीं । तरी व्यर्थ कां जावें बाजारीं । चित्तीं प्रेम नसलें जरी । तरी कासया कीर्तन करावें ॥ ४१ ॥
लवणाविण रांधिलें अन्न । रुची नयेच त्याकारणें । कीं कृपणाचे गांठीचें धन । सत्पात्रीं जाण न पडेची ॥४२॥ शौ-
र्य तेज क्षत्रियासि नसतां । कासया शस्त्र बागवावें वृथा । कीं कृपणाची मैत्री करितां । सौख्य सर्वथा न पडेची ।४३।
गायत्री मंत्र नसतां जाण । कासया ह्मणावें ब्राह्मण । कीं अलंकार घातले संपूर्ण । परी मंगळसरीविण व्यर्थची ।४४।
तर्कज्ञान नसतां पोटीं । व्यर्थचि कळा चौसष्टी । कीं भूतदयेविण ओंठीं । ज्ञानवटवटी कासया ॥४५॥ कीं ई-
श्वरकृपा नसतां जाण । वाचांच कवित्व केलें लेखन । तेविं अनुताप न होतां पूर्ण । तीर्थाटन फळेना ॥ ४६ ॥ काम-
क्रोध मदमत्सर । हे दोष देहींचे दुर्धर । अनुताप नसतां साचार । तीर्थीं न्हातां न जाती ॥ ४७ ॥ असो कबीरपुत्र ते
अवसरीं । उभा ठाकोनि गोमती तीरीं । नमस्कार घालोनि सत्वरी । वंदन करी निजप्रेमें ॥ ४८ ॥ मग जळांत प्रवे-
शोन । करिता जाहला सचैलस्नान । ह्मणे गंगे मम दोष निरसून । जन्ममरण खंडावें ॥४९॥यापरी करूनियां स्नान ।
द्वादश टिळे गोपीचंदन । लाऊनि गळां तुळसीभूषण । घालिता जाहला तेधवां ।५०।ध्यानांत आणोनि द्वारकानाथ ।



मानस पूजा केली त्वरित । मग दर्शनासी राउळांत । जातसे त्वरित निजप्रेमें ॥५१॥ मग महाद्वारीं येऊन । स-
त्वर घातलें लोटांगण । मग अंतरगाभारां रिघोन । श्रीकृष्णचरण वंदिले ॥ ५२ ॥ नेत्र उघडोनि सप्रेमयुक्ती । ध्या-
नांत आणिली श्रीकृष्णमूर्ती । मुखीं गावोनि नामकीर्ती । मंगल आरती पैं केली ॥५३॥ यापरी तो कमाल भक्त । चार
मास राहिला द्वारकेंत । नित्य हरीचे गुण वर्णित । करूनी कवित्व निजप्रेमें ॥ ५४ ॥ ज्ञानचर्चा सत्समागमेंकरून ।
त्रिकाळ देवाचें दर्शन । चार मास लोटतां पूर्ण । निघे तेथूनि सत्वर ॥ ५५ ॥ नमस्कारूनि रणछोडमूर्ती । लोटांगण
घातलें निजप्रीती । ह्मणे देवा पुनः मागुती । दर्शन मजप्रती देइजे ॥ ५६ ॥ ऐसें ह्मणोनि ते अवसरीं । तेथूनि निघाला
झडकरी । मार्गीं जातां चित्रकूटनगरी । देखोनि भीतरीं प्रवेशला ॥ ५७ ॥ तेथें विष्णुदास सावकार । परम भाविक
होता उदार । तेणें येऊनि नमस्कार । घातला सत्वर निजप्रीतीं ॥ ५८ ॥ होऊनियां आर्तभूत । घरासी नेला कमाल-
भक्त । चरण धुवोनि प्रेमयुक्त । भोजन त्वरीत घातलें ॥५९॥ रात्रीं मांडिलें हरिकीर्तन । गांवींचे सर्व मिळाले जन ।
प्रेमयुक्त करितां श्रवण । तटस्थ होऊनि राहिले ॥ ६० ॥ सावकार विचारी मानसीं । ह्मणे आतां काय द्यावें यासी । पुढें
ठेवितां द्रव्यराशी । नये चित्तासी तयाच्या॥ ६१ ॥एक हिरा होता भांडारगृहीं । त्वरें आणोनि लवलाहीं । कमालासि
बैसवून ठायीं । ठेविला पायीं तयाचे ॥ ६२ ॥ ह्मणे हा लहान रत्न दीप्ती । प्रकाशें लोपे दीपज्योती । घरासी जाऊन स-
त्वर गती । सदनाप्रती ठेवावा ॥ ६३ ॥ निशाकाळीं ठेवितां समोर । तरी कदा न पडे अंधकार । कमाल ह्मणे मजवर ।
कोपेल कबीर अनुतापें ॥ ६४ ॥ हिरा गार आह्मांलागुन । दृष्टीस सारखीं दिसती जाण । तुह्मीं कासया आग्रह करून ।
मजकारणें देतसां ॥ ६५ ॥ द्रव्य अर्पावें ब्राह्मणांसी । हिरे रत्नें नृपवरासी । अन्नदान भूतमात्रांसी । तूं जाणसी विचक्ष-
णा ॥ ६६ ॥ कोल्हाटी भांडनटनागर । यांसी अंगावरील द्यावा उतार । अनुष्ठानीं जे पवित्र नर । सिधा साहित्य त्यां-
सि द्यावें ॥ ६७ ॥ श्रीपादास मिष्टान्नभोजन । काषायवस्त्र द्यावें कौपीन । आह्मीं उदास वैष्णव जन । संतुष्ट मन सर्वदा
॥ ६८ ॥ कांहीं इच्छा नसतां मानसीं । बळेंच हिरा कासया देसी । पक्वान्न वाढावें धालियासी । तें क्षुधार्थीयासि कां न
द्यावें ॥ ६९ ॥ सागरीं वर्षला महाघन । परी चाड नाहीं त्याजकारणें । तेविं तुवां व्यर्थ मजलागून । हिरा आणोनि दी-
धला ॥ ७० ॥ ऐसें बोलतां कमालभक्त । सावकार घाली दंडवत । कौपिनीचे पदरीं त्वरित । त्यासी न कळत बांधिला
॥ ७१ ॥ तेथोनि सत्वर उठोनी । परतोनि आला आनंदवनीं । निजमंदिरीं येऊनी । लागला चरणीं कबीराचे ॥ ७२ ॥
पुढें ठेवोनि हिरा लाल । वर्तमान सांगे पुत्र कमाल । ऐकोनि कबीर जाहला व्याकुळ । पडला तत्काळ मूर्छित ॥ ७३ ॥
चित्तीं अनुताप जाहला पूर्ण । दीर्घस्वरें करी रुदन । तों कांता बाहेर येऊन । धरिले चरण पतीचे ॥७४॥ कबीरासि ह्म-
णे पतिव्रता । आज कासया कष्टी होतां । काय विपरीत देखोनि आतां । अनुताप चित्ता वाटला ॥७५॥ पुत्राकडे पाठ
करूनी । कांतेसी सांगे तेक्षणीं । आजि आपुला वंश बुडोनी । गेला ऐसें मज वाटे ॥ ७६ ॥ कमाल आपुला पुत्र खरा ।

नाम विकूनि आणि हिरा । ह्मणोनि आज दुःखसागरा । पडलों जाण निज कांते ॥ ७७ ॥ कस्तूरी विखरूनि बाजारीं । राख बांधिली जैसी पदरीं । कीं निपुण शास्त्रज्ञ दवडोनि दूरी । मातंग घरीं आणिला ॥ ७८ ॥ कीं भागिरथीची कुपी लवंडोनी । रजकसौंदणीचें घेतलें पाणी । कीं तीर्थवासी दवडोनि मंदिरींहुनी । तस्कर आणोनि बैसविला ॥७९ ॥ कीं सांडोनि विष्णुउपासन । मसणीं केलें वेताळसाधन । वेदांताचें पुस्तक देऊन । कोकशास्त्र आणिलें ॥ ८० ॥ देऊनि मलयगिरीचंदन । त्याचे पालटें घेतला हिंगण । कीं कुटिळासी शेजार देऊन । तपोधना दवडिलें ॥ ८१ ॥ नातरी उश्चैःश्रवा देवोनि साचार । रजकापासूनि घेतला खर । कीं सुधारस देऊनि परिकर । ताक पात्रीं घेतलें ॥ ८२ ॥ तेविं निजपुत्रानें कामिनी । विपरीत केलें वाटतें मनीं । रामनाम विक्रय करूनी । हिरा घेऊनी आला हो ॥ ८३ ॥ ह्मणोनि दुःख वाटलें मनीं । मूर्छना येऊनि पडिलों धरणी । ऐकूनि तेव्हां पित्याची वाणी । कमाल तेथोनी निघाला ॥८४ ॥ परतोनि आला सावकारापाशीं । हिरा दिधला जाऊनि तयासी । माघुती येऊन घरासी । मातापित्यांसी वंदिलें ॥ ८५ ॥ सांगीतला सकळ वृत्तांत । ऐकोन कबीर उल्हासयुक्त । जेविं शिष्य होतांचि विरक्त । सद्गुरुनाथ संतोषती ॥८६॥ कीं आरोग्य बाळका देखोनि नयनीं । हर्षें वोसंडे निजजननी । कीं लवकुशांचा प्रताप ऐकोनी । श्रीराम मनीं संतोषे ॥ ८७ ॥ तेविं उपाधीरहित देखोनी । कमाल आलिंगिला तेचक्षणीं । तेणें मिठी घालूनि चरणीं । श्रीरामभजनीं विनटला ॥८८॥ तंव कोणे एके अवसरीं । मिळोनि संत मादी बरी । तीर्थवासी ते सत्वरीं । आले घरीं कबीराच्या ॥ ८९ ॥ प्रहररात्र होतांचि जाण । घरासि आले साधुजन । उभयतां पुढें होऊन । केलें नमन साष्टांगें ॥ ९० ॥ बैसावयासि ते अवसरीं । ऊर्णावस्त्र आणिलें सत्वरीं । कमाल संतांसी विनंती करी । बैसा यावरी स्वामिया ॥ ९१ ॥ संत देखोनियां जाणा । हर्ष वाटला तिघांजणा । जेविं सनकादिक देखोनि नयनां । शचीरमणा आनंद ॥ ९२ ॥ कीं बहुत दिवस पडलें आवर्षण । मग वर्षला जैसा अपार घन । सुखी झाले प्रजाजन । तैसें वाटलें कबीरासी ॥ ९३ ॥ रोगियासि पाजिला सुधारस । कीं चंद्रामृत लाधलें चातकांस । कीं स्नेहसूत्र घालितां दीपकास । सोज्वळ दिसे निजतेजें ॥९४॥ कीं कीर्तन ऐकोनि स्वानंदभरित । आनंदें डोलती प्रेमळ भक्त । कीं अशोकवनीं भेटतां हनुमंत । स्वानंदभरित जनकात्मजा ॥९५॥ तेविं संत देखोनि निजदृष्टीसी । हर्ष वाटला कबीरासी । एकांतीं जाऊनि निजकांतेसी । ह्मणे भोजन संतांसी घालावें ॥ ९६ ॥ हे वैष्णवभक्त तीर्थवासी । आले आपुल्या घरासी । मंदिरीं निजतां उपवासी । तरी हानी सत्वासी होईल ॥ ९७ ॥ घरीं तिळभरी नसे अन्न । संकट पडलें अतिदारुण । ऐसें ऐकूनियां वचन । कांता बोलिली तें ऐका ॥ ९८ ॥ कबीरासी ह्मणे प्राणनाथा । कांहीं उपाय न दिसे आतां । शेजाऱ्यापाशीं उसण्यासि जातां । तरी ते सर्वथा नदेती ॥ ९९ ॥ अन्न विकत घ्यावें बाजारीं । तरी द्रव्य नाहीं आपुले पदरीं । पुत्रासी घेऊनि बरोबरी । जावें चोरी करावया ॥१००॥ सामग्री असेल संपूर्ण । त्या वाणियाचें फोडावें दुकान । चोरी करूनि आणावें अन्न । घालावें भोजन संतांसी ॥ १ ॥



अवश्य ह्मणोनि कबीरभक्तें । असिलता घेऊन सांगातें । पाहार घेतली कमाल भक्तें । निघे त्वरित लगबगां ॥ २ ॥ सत्वर बाजारीं येऊन । वाणियाचें फोडिलें दुकान । निजपुत्रासी आंत घालून । आपण बाहेर राहिला ॥ ३ ॥ रात्र झाली दोन प्रहर । वाणियासि निद्रा लागली घोर । बाहेरूनि पुत्रासि सांगे कबीर । कार्य सत्वर साधावें ॥ ४ ॥ कमाल विलोकी दुकानासी । तों दृष्टी देखिल्या द्रव्यराशी । वस्त्रें भूषणें निज नयनासीं । देखोनि मानसीं कंटाळला ॥ ५ ॥ मग कणिक तांदूळ आणि गूळ । डाळ घृत शर्करा घेऊनि सकळ । बाहेर दीधलें तत्काळ । कबीरापाशीं तेधवां ॥ ६ ॥ हळदी हिंग जिरें लवण । शाका पत्रें सर्व घेऊन । संतांसि पाहिजे जितुकें अन्न । तितुकेंच दीधलें बाहेरी ॥ ७ ॥ गंगेचें उदक देखोनि बहुत । जवळ गेला तृषाक्रांत । तो तहानेपुरतें पिऊनि त्वरित । निघे सत्वर ज्यारीतीं ॥ ८ ॥ कीं पात्रीं अन्न वाढिलें बहुत । परी क्षुधार्त पोटापुरतें खात । कीं करतलभिक्षा संन्यासी करित । ते ग्रासावांचूनि न घेती ॥ ९ ॥ कीं कीर्तन ऐकूनि वैष्णव भक्त । दोष टाकूनि सद्गुण घेत । कीं राजहंस बैसोनि पाणियांत । क्षीर सेवित निवडोनी ॥ ११० ॥ तेविं वस्त्रें भूषणें तये क्षणीं । द्रव्यराशी देखिल्या नयनीं । तें सर्वही कमालें त्यागोनी । सामग्री घेऊनि निघाला ॥ ११ ॥ बाहेर निघावें जों त्वरित । तों विचार आठवला मनांत । वाणी तो जाहला निद्रित । सावध त्वरित करावा ॥१२॥ निश्चिंतपणें निजला वैरी । त्यासि अकस्मात मारिलें जरी । कीं मागें भलत्याची निंदा करी । तरी नरकीं घोरीं पडेल तो । १३ । रणीं पळत्यापाठी लागतां । कीं निश्चिंतपणें चोरी करितां । नांदत्याघरासि अग्नि लावितां । तरी नरकीं अघोरीं पडेल तो ॥ १४ ॥ तरी आपण सज्ञान वैष्णव भक्त । पाप पुण्य मनासी सर्व कळत । आतां वाणियासि सावध करूनि निश्चित । जावें सत्वर पळोनी ॥ १५ ॥ मग धैर्य धरोनियां पोटीं । जवळी पातला उठाउठी । वाणियाची पाठी थापटी । ह्मणे सावध शेटी असावें ॥१६॥ आह्मी तस्कर दोघेजण । मागून फोडिलें दुकान । जातों सामग्री घेऊन । तुह्मांकारणें कळों द्या ॥ १७ ॥ वाणी बैसला उठोनी । कमाल पळे त्वरेंकरोनी । छिद्रांतूनि निघतां तयेक्षणीं । तों चरण दोनी धरियेले ॥ १८ ॥ नाभीपर्यंत बाहेर गेला । तों अकस्मात सावकारें धरिला । जैसा मृग उडतां फांसीं पडला । पारधीयाचे वनांत ॥ १९ ॥ कीं मानससरोवरीं राजहंस गेला । तों ससाण्यानें अवचितां धरिला । कीं नळिकायंत्रीं सांपडला । रांवा जैसा निजभ्रांती ॥१२०॥ कीं चक्रव्यूह रची कौरवपाळ । त्यांत सांपडला सुभद्रेचा बाळ । कीं पुष्पवाटिकेंत हिंडतां कोकिळ । धरिली जैसी हिंसकें ॥२१॥ तेविं कमाल पळतां लवलाहीं । वाणियानें वोढोनि धरिला पायीं । मग कमालबाळ त्यासमयीं । पित्यासी काय बोलत ॥२२॥ ह्मणे रामकार्यासी वायुसुत । नेतां द्रोणगिरीपर्वत । वाटेसि विंधोनि पाडी भरत । तैसेंचि जाहलें आपणासी ॥२३॥ आतां वाणी बाहेर येऊनी । बाजारीं करील शंखध्वनी । नगरवासी लोक ऐकोनी । येतील धांवोनी पहावया ॥ २४ ॥ आपण गांवींचे तस्कर । सर्व जाणती नारीनर । तरी छेदूनियां माझें शिर । जावें सत्वर मंदिरा ॥ २५ ॥ मायाममता धराल मनीं । तरी निजसत्वाची होईल

हानी । चोरीची मात ऐकतां कानीं । संत सदनीं नबैसती ॥ २६ ॥ जारिणीची कानीं ऐकोनि मात । पतिव्रता जैशा उ-
ठोनि जात । कीं मातंग येतां मंदिरांत । शास्त्रज्ञपंडित नराहती ॥ २७ ॥ कीं सद्गुरूची निंदा ऐकोनि कानीं । सज्ञान उ-
ठती तेथूनी । तेविं चोरीची मात ऐकोनी । जाती उठोनि संतसाधु ॥ २८ ॥ तरी आतां ऐक गा विष्णुभक्ता । शांतिसा-
गरा सद्गुणभरिता । त्यजूनिं सर्व मायाममता । शिर छेदीं निजहस्तें ॥ २९ ॥ ऐकोनि पुत्राची वचनोक्ती । कबीर सं-
तोषे स्वचित्तीं । असिलता घेऊन हातीं । शिर कापून घेतलें ॥ १३० ॥ सामग्रीची मोट उचलोनी । घरा गेला त्वरें क-
रूनी । कांतेपाशीं जाऊनी । वर्तमान सांगीतलें ॥ ३१ ॥ कबीराचें धैर्य सांगतां प्रीतीं । कुंठित जाहली सकळ मती ।
दृष्टांत योजूनि महीपती । श्रोतयांप्रती बोलत ॥ ३२ ॥ जेविं श्रियाळाचे मंदिरासी । पाहुणे आले कैलासवासी । न-
रमांस मागतां भोजनासी । निजपुत्रासी वधियेलें ॥ ३३ ॥ तैसेंचि केलें वैष्णववीरें । हाही दृष्टांत येथें नपुरे । श्रिया-
ळासी छळिलें पार्वतीवरें । ह्मणोनि पुत्र वधियेला ॥३४॥ संतीं न मागतां भोजन । निज बाळ वधिला कबीरानें । ह्म-
णऊनि उपमा दिसे ते गौण । चतुर सर्वज्ञ जाणती ॥ ३५ ॥ पृथ्वी ऐसें घनवट कोण।कीं आकाशाची थोरीव पूर्ण । अ-
श्वत्था ऐसा पूज्यमान । वृक्ष कोठोनी पहावा ॥ ३६ ॥ गरुडाऐसा पक्षी नसे तत्त्वतां । भागीरथीहून नसे थोर सरिता।
सागराहूनि सखोलता । अन्य सरोवर असेना ॥ ३७ ॥ कल्पतरूऐसें फळ काय । कीं कामधेनूवरिष्ठ कोण गाय । अन-
सूयेऐसी न दिसे माय । त्रिभुवनीं पाहे धुंडितां ॥३८॥ चंद्राऐसें प्रकाशमान । गगनीं नक्षत्र दिसे कोण । कीं दैत्यवंशीं
बळीहून।दाता उदार नसे कीं ॥३९॥कीं वाल्मीका ऐसा आत्मबुद्धीनें । भविष्यकर्ता कवि कोण । कीं मारुतीऐसा वा-
नर जाण । धुंडितां त्रिभुवनीं दिसेना ॥ १४० ॥ असो बहु बोलोनि काय काज । ज्याची उपमा त्यासीच साजे।कबी-
राऐसा भक्तराज । धुंडितां मज दिसेना ॥ ४१ ॥ सामग्री ठेऊनि धरणीसी । शिर दिधलें कांतेपाशीं । मोह दाटोनि नि-
जमायेसी । अश्रु नयनीं लोटले ॥ ४२ ॥ ह्मणे बा तूं दैवागळा । संतकारणीं देह लाविला । संसारीं येऊन श्रीराम जो-
डिला । उद्धार केला वंशाचा ॥ ४३ ॥ ऐसें ह्मणोनि कबीरकांता । धैर्यबळें आवरी चित्ता । साहित्य घेऊन तत्त्वता ।
स्वयंपाकासी निघाली ॥ ४४ ॥ नवविधा रांधोनि पक्वान्नें । संतांसि घातलें भोजन । ह्मणे धन्य आजिचा सुदिन । दे-
खिले चरण संतांचे ॥ ४५ ॥ तृणासनें घालोनि ते अवसरीं । कबीर संतांची सेवा करी । तों उदयासि पातला तमारी ।
साधु झडकरी ऊठिले ॥ ४६ ॥ प्रातःस्मरण जाहलिया जाण । स्नानासि गेले वैष्णवजन । इकडे वाणी बाहेर येऊन ।
शंखनाद करीतसे ॥ ४७ ॥ बोंब ऐकूनि सकळ लोक । धांऊनि आले तत्कालिक । तस्कराजवळी येऊन देख । पहाते
जाहले तेधवां ॥ ४८ ॥ ह्मणती शिराचि नेलें कापून । आतां यास ओळखील कोण । वाणियासी बोलती वचन । तुझें
प्राक्तन विचित्र ॥ ४९ ॥ तस्करीं मारूनि नेला चोर । तुजला रक्षी सर्वेश्वर । नाहीं तरी विघ्न साचार । आलें होतें आ-
जि हें ॥ १५० ॥ जवळी द्रव्य असतां पाहें । एकटा निद्रा करूं नये । द्रव्यापाशीं महाभय । अखंड राहे सर्वदा ॥ ५१ ॥



द्रव्य आशा धरिली जरी । सखे बंधू होती वैरी । द्रव्य तारी द्रव्य मारी । दोनी परी असती कीं ॥ ५२ ॥ राजद्वारीं कों-
डितां जाण । द्रव्य सोडवी त्याकारण । तस्कराचें शिरच्छेदन । द्रव्याकरितां झालें कीं ॥५३॥ तुझें सुकृत होतें कांहीं ।
ह्मणोनि वांचलासि ये समयीं । कीं ते तस्कर नसती पाहीं । भले सज्जन असतील ॥५४ ॥ दुकानीं होत्या द्रव्यराशी ।
वस्त्रें भूषणें टाकोनि कैसी । सामग्रीच घेऊन थोडीसी । गेले हें नवल वाटतें ॥ ५५ ॥ असो यापरी त्रिवध जन । नाना-
परीचें बोलती वचन । वाणियानें सत्वर जाऊन । राजयापाशीं सांगितलें ॥ ५६ ॥ह्मणे दोघे तस्कर येऊन । माझें फो-
डिलें दुकान । अन्नसामग्री घेऊन । पळोनि जातां धरिले म्यां ॥ ५७ ॥ दुसरा तस्कर होता जाण । शिरचि कापूनि नेलें
त्याणें । ऐसें ऐकूनियां वचन । सकळ जन हांसती ॥ ५८ ॥ राजा जाहला क्रोधायमान । आज्ञा करी सेवकांकारण ।
ह्मणे तस्करासी शूळीं देऊन । शिक्षा करणें येवेळे ॥५९॥ ऐकोनियां सेवक पाहीं । क्रोधें धांवले लवलाहीं । कमालाचें
धड ते समयीं । शूळावरी घातलें ॥ १६० ॥ मृत प्रेतासी दंड करणें । बुद्धिमंतासी वाद घालणें । परदेशीं कलह करणें ।
हें कुलक्षण सज्ञाना ॥ ६१ ॥ इकडे गंगातीरीं साधुसंत । स्नानास गेले होते त्वरित । देवतार्चन करून निश्चित । आले
त्वरित आश्रमा ॥ ६२ ॥ कबीरासी पुसोनि त्वरेंसी । पुढें चालिले तीर्थवासी । नमस्कार करूनि संतांसी । बोळवाव-
यासी चालिला ॥ ६३ ॥ कांता करीतसे रुदन । संतांसी घालोनि लोटांगण । ह्मणे आतां स्वामींचे चरण । कधीं
दृष्टीं पडतील ॥ ६४ ॥ संतांसी बोलोनि नम्रवचन । बोळवीत चालिलीं दोघेजण । नगराबाहेर येतां जाण । नवल
वर्तलें अद्भुत ॥ ६५ ॥ मार्गीं चालतां अतित्वरित । शूल देखिला अकस्मात । त्यावरी शिराविण घातलें प्रेत । देखती
संत दुरूनी ॥६६॥ क्षण एक उभे राहूनि पाहत । तों नवल वर्तलें अति अद्भुत । कमालें दोनी जोडोनी हस्त । साधु संत
नमस्कारिले ॥६७॥ विपरित देखोनि ते अवसरीं । नवल करिताती नरनारी । शिराविण प्रेत नमस्कारी । अद्भुत परी
वाटतें ॥ ६८ ॥ कबिरासी पुसती साधुसंत । आह्मांसी नमस्कारी प्रेत । शिर नसतां कुडी आंत प्राण कैसे ठेविले ।६९।
वृक्ष तोडितां सत्वरगतीं । शाखा कैशा टवटवती । पक्ष उपडितां कैशा रीतीं । द्विज उडताती निराळीं ॥१७०॥ तारा
तुटोनि गेलिया जाणा । कैसा वाजेल ब्रह्मवीणा । तेविं प्रेतासी देखोनि चेतना । वाटे मना विपरीत ॥७१॥ हात जो-
डूनि ते अवसरीं । कबीर संतांसी विनंती करी । भीष्म पडला शरपंजरीं । प्राण देहीं रक्षिला कीं ॥७२॥ दुःख सांगाव-
या अर्जुनाजवळी । अभिमन्यु पडला रणमंडळीं । धैर्य धरूनि तेवेळीं । प्राण देहीं रक्षिले ॥ ७३ ॥ नातरी जटायु गां-
जितां रावणें । प्राण व्याकुलित यातनें । परी घ्यावया श्रीरामदर्शन । प्राण देहीं रक्षिले ॥ ७४ ॥ तैसाचि वैष्णव होता
तस्कर । तुमचे पायीं हेत थोर । एकदां करावा नमस्कार । ह्मणूनि प्राण ठेविला ॥ ७५ ॥ तो मनोरथ पुरला संपूर्ण ।
तुमचें जाहलें त्यासि दर्शन । आतां नाशवंत देह टाकून । अक्षयपदीं राहिला ॥ ७६ ॥ ऐकोनि संत बोलती वचन । तो
तस्कर होता तरी कोण । मग कबीरें सकळ वर्तमान । सांगीतलें संतांसी ॥७७॥ मग काय बोलती वैष्णवजन । आह्मीं

मागितलें नसतां भोजन । कमालाऐसा बाळ सगुण । मारूनि कैसा टाकिला ॥७८॥ ऐकोनि बोलती वैष्णववीर । नाशवंत अवघा संसार । जितुका दिसतो आकार । तितुका जाणार शेवटीं ॥७९॥ कमाल जरी म्यां मारिला नसता । तरी काय तो अमर होता । ऐसी ऐकोनियां वार्ता । कृपा संतां उपजली ॥१८०॥ कबीरकांतेसी बोलती संत । शिर दाखवीं आणूनि त्वरित । ऐसी ऐकोनियां मात । गेली त्वरित मंदिरा ॥८१॥ निजपुत्राचा मस्तक घेत । संतांपाशीं आणिला त्वरित । देखोनि जाहले सद्गदित । दयावंत संत ते समयीं ॥८२॥ धड काढोनि सत्वरीं । मस्तक ठेविलें त्यावरी । कौतुक पाहती नरनारी । नवल वर्तलें तें ऐका ॥८३॥ संतीं मस्तकीं ठेवितां कर । सावध जाहला कबीरपुत्र । कमाल उठोनि सत्वर । घाली नमस्कार संतांसी ॥८४॥ वाराणसीचे सकळ जन । कबीरासी घालिती लोटांगण । ह्मणती हा वैष्णव परम सज्ञान । तारक पूर्ण जडजीवां ॥८५॥ संतीं देऊन वरदान । तीर्थाटनासी केलें गमन । पुढील अध्यायीं निरूपण । कथा सुरस अवधारा ॥ ८६॥ संतचरित्र ग्रंथसार । हेंच पंढरीक्षेत्रींचें राउळ सुंदर । अवीट घननीळ विटेवर । अक्षयी उभा राहिला ॥८७॥ संत साधु वैष्णवजन । प्रेमें करिती सत्कीर्तन । तेथें मी पतित अज्ञान । घ्यावया दर्शन आलों कीं ॥८८॥ प्रांजळ ओंव्या फुलें तुळसी । करीं घेऊनि सद्भावेंसी । महीपती लागला चरणासी । प्रेम उचित मागावया ॥८९॥ स्वस्तिश्रीभक्तविजय ग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । षष्ठाध्याय रसाळ हा ॥ १९०॥ अध्याय ६ ॥ ओंव्या १९०॥

श्रीगणेशाय नमः।श्रीकृष्णाय नमः। ऐका संतचरित्र ग्रंथसार । हाचि पयोब्धि क्षीरसागर । नाना दृष्टांत हे जलचर । सप्रेम जीवनीं धांवती॥१॥ आवडीच्या लाटा उसळती । ज्ञानाकाश भेदूं पाहती । भाविक मेघ धांवोनि येती । जीवन पीती कथानक॥२॥ मग संसारतापेंकरून । संतप्त झाले होते जन । त्यांवरी वर्षती जाऊन।स्वानंदजीवन ते वेळीं॥३॥श्रीपांडुरंग कृपाचंद्र थोर । तो उदयासी येतां साचार । मग या सागरासी अपार । सप्रेम भरतें आवरेना॥४॥कीर्तनप्रसंग पर्वकाळीं जाण । जो या ग्रंथसागरीं करील स्नान । त्याचा भवरोग दारुण । जाईल जाण निश्चयेंसी ।५।मागील अध्यायीं कथा पवित्र । संतीं उठविला कबीरपुत्र । पुढें काय वर्तलें चरित्र।श्रोतीं पवित्र परिसावें।६।एके दिवशीं कमालतात ।रात्रीं चालिला बाजारांत । श्रीरामभजन प्रेमयुक्त।करीतसे तेधवां।७।वीणा घेऊनियां करीं । मंजुळ स्वरें कीर्तनकरी । श्रीरामरूप आठवूनि अंतरीं । सप्रेमभरीं गातसे॥८॥ मोह ममता मानाभिमान । दुराशा टाकूनि निजमन । सांडोनि अहंता मीतूंपण । श्रीरामचिंतन करीतसे।९।तों एक वाणीण बाजारांत । दळीत बैसली असे तेथ । तें दृष्टी देखोनि कबीरभक्त द्रवलें चित्त तयाचें।१०।उभा ठाकूनि ते अवसरीं । दीर्घस्वरें रुदन करी । देखोनि हांसती नर नारी।नवल करिती तेधवां ॥११॥एकपुसती कबीरासी । कांगा येथें रुदन करिसी । कोणें गांजिलें आहे तुजसी । सांग आह्मासी येवेळे॥१२॥ ऐसें बोलती लोक अपार । परी कोणासी नेदी प्रत्युत्तर । ह्मणे माझ्या दुःखाचा परिहार । यांचेनी साचार नव्हे कीं।१३।शिणल्यापाशीं सांगतां दुःख । तरी अधिकचि वाटे संताप । दर्दुरें मैत्र केलिया सर्प । सौख्य अणुमात्र नेदीच तो॥१४॥मद्यपीयासी विवेक नीती । चतुर पंडित नपुसती । रोगियापासोनि औषध न घेती । तार्किक जैसे सर्वथा॥१५॥नातरी तृषा लागतां अपार । चातक नपीती नदीचें नीर । कीं चंद्रउदयाविण साचार । चकोर तृप्त होतीचना ॥१६॥कीं खळ अज्ञान असतां श्रोता । प्रेमोल्हासें नवदेचि वक्ता । कीं पान्याचे मोतियां सर्वथा । राजहंस चित्ता न आणिती॥१७॥कीं मातंग देखोनि दुरून । द्विज न देती आशीर्वचन । कीं निंदकापाशीं एकांत जाण । चतुर सज्ञान न सांगती।१८।तेविं मायालोभी अज्ञान नर । कबीरासी पुसती विचार । परी तो नेदीच प्रत्युत्तर । रुदन करी अनुतापें॥१९॥नानापरीचे त्रिविध जन एकमेकांसी बोलती वचन । कबीरासी वेड लागलें ह्मणून । उगाच रडतो बाजारीं॥२०॥तंव निपट निरंजन ते समयीं। अवचित आले तयेठायीं । कबीरासी पुसती लवलाहीं । किमर्थ शोक मांडिला।२१।नेत्र उघडोनि जंव पाहे । तंव ज्ञानसागर पुढें उभा आहे । मग धैर्य धरूनि लवलाहें । बोलता जाहला तेसमयीं॥२२॥ह्मणे यांसी सांगतां साचार । कांहीं करितील परिहार । ऐसें ह्मणोनि भक्तकबीर । बोलता जाहला तेधवां ।२३।जेविं सद्वैद्यासी व्यथा सांगतां जाण । रोगियाचें उल्हासयुक्त मन । कीं मायेपाशीं सासुरवासिण । दुःखसांगतां न वंची ।२४।कां संशय वाटला चित्तासी । तो सच्छिष्य सांगे श्रीगुरूसी । तेविं कमालतात निपटयासी । सांगता जाहला तेधवां ।२५।कबीर ह्मणे सद्गुरुमूर्तीं । अनुताप जाहला माझे चित्तीं । कृपावंतें पुसिलें प्रीतीं । तरी सांगतों रीती ते ऐका।२६।जांतें । फिरतां देखिलें जाण । त्यामाजीं पीठ

होताति कण । तैसीच गती मजकारण । भवचक्रांत पडिलिया ।२७।ह्मणोनि भय वाटलें देख । अट्टहास्यें मांडिला शोक तुह्मावांचूनि भवदुःख । कोण निवारील आमुचें।२८।ऐकोनि निपट बोले त्यासी।व्यर्थ कां उगाच शोक करिसी ।जांतें फिरतां देखोनि तुजसीं । अनुताप चित्तासी वाटला॥२९॥तरी येचविषयीं विष्णुभक्ता। संशय निरसीन तुझा आतां आधार टाकूनि भोंवतें फिरतां । काळचक्रीं पीठ होती।३०।खुंटियासी कण लागोनि राहिले । ते काळचक्रीं पीठ नाहीं जाहले । तेविं श्रीरामभजनीं जे विनटले । ते काळें ग्रासिले नाहींत कीं।३१।तूं तर सत्वधीर वैराग्यशीळ । शांतिक्षमेचा होसी अचळ । आणि स्वप्नींचें भय देखोनि तळमळ । व्यर्थ कासया करितोसी।३२।ऐसी ऐकूनियां मात।कबीर जाहला सावचित्त । प्रेमभावें आलिंगित । एकमेकांसी तेधवां।३३। येरयेरांसीं नमस्कार । प्रेमें घालिती वैष्णववीर । मग कबीर तेथोनि सत्वर । आश्रमासी पातला।३४। नानापरीचे प्रबंध कवित । नित्य हरीचे गुण वर्णित । आनंदभरें प्रेमयुक्त ।नित्य करीत कीर्तन।३५।तंव कोणे एके अवसरीं । निजमानसीं विचार करी।ह्मणे सद्गुरु न करितां संसारीं । तो प्रेतवत प्राणी ह्मणावा॥३६॥कांतेविण प्रपंच करणें । मंदिर शून्य बाळकाविणें । कुंकुमाविणें अलंकार लेणें । व्यर्थ जैसें दीसत ३७ फळें न येतां वृक्ष वाढला । कीं पुरुषार्थाविण राव जन्मला । लवण नसतां स्वयंपाक केला । व्यर्थ जैसा अलवण।३८। आयुष्येंविण तारुण्य शरीर । कीं द्रव्यावांचूनि सावकार । महत्वावांचूनि कारभार । व्यर्थ कासया उगाची ।३९। मेघावांचूनि वर्षाकाळ । कीं जीवनेंविण तळें विशाळ । कीं तीर्थावांचूनि पर्वकाळ । कुग्रामांत पडियेला ।४०। कणावांचूनि जैसीं कणसें । धन्यावांचूनि शून्य परिवार दिसे । प्रेमावांचूनि कीर्तन जैसें । गौरियाचें गायन ।४१। मर्यादेविण मित्रपण । कीं भूतदयेविण जैसें ज्ञान ।कीं अनुतापाविणें संन्यासग्रहण । व्यर्थ कासया करावें ॥४२॥ द्रव्यावांचोनि भोग विलास । कीं नेमावांचूनि व्रत कायेस । शांती नसतां महापुरुष । व्यर्थ कासया ह्मणविती ।४३। चंद्रावांचूनि चातकें जाण । दिसती जैसीं शोभाविहीन । तेविं सद्गुरूवांचोनि नरदेहा येणें । वृथाचि येरझार केली कीं ।४४। तरी रामानंद स्वामी संन्यासी । सद्भावें शरण जावें त्यासी । विचार करूनि निजमानसीं । निश्चय करूनि राहिला ।४५। अनेक राजे देखोनि नयनीं । विचार करी जनकनंदिनी । मग श्रीरामरूप देखोनी । मनेंकरून वरियेला ।४६। श्रीकृष्णध्यान ऐकोनि भीमकात्मजा । वरूं पाहे अधोक्षजा । तेविं रामानंदाचे चरणरजा । धरिली आशा कबीरानें ॥४७॥ मग एकांत पाहूनि एकदिनीं । सत्वर उठिला तयेक्षणीं । रामानंदाचे आश्रमीं जाउनी । चरणीं प्रेमें लागला ॥४८॥ उभा ठाकोनियां दुरी। रामानंदासी विनंती करी । ह्मणे स्वामी मजवरी । कृपा करावी समर्था ।४९। ऐसी कबीराची वाणी । ऐकोनि बोटें घातलीं कानीं । गुंफेमाजी जाऊनी । एकांत आसनीं बैसले ।५०। कबीर ठाकोनि बाहेरी । काय बोले मधुरोत्तरीं । दीन अनाथ ठाकलों द्वारीं । अभय देऊनि तोषवा ।५१। मग ह्मणे कबीरासी । तूं जन्मलासी अविंधवंशीं । उपदेश द्यावया आह्मासी । अधिकार नाहीं सर्वथा ।५२। भूमी पाहोनि बीज पेरणें । सत्पात्र पाहूनि दान करणें । वर पाहूनि कन्या देणें । स-

ज्ञजन जाणती ।५३। कबीर बोले ते समयीं । माझा निश्चय तुमचे पायीं । काया वाचा मनें पाहीं । वंचिलें नाहीं सर्वथा ।५४। चंद्राचा हेत चकोरावरी । अनन्य प्रीती नसली जरी । परी अमृतवर्षाव तयावरी । ईश्वर करी निजनिष्ठें ।५५। कमळणीवरी अनन्यप्रीती । उदय न होतां न करी गभस्ती । परी त्या विकासातें न पावती । अन्य प्रीती लावूनी ॥५६॥ मातीचा द्रोण केला जाणे । कोळियास भाव फळला तेणें । तेविं मी काया वाचा मनें । स्वामीचे चरण धरियेले ॥ ५७ ॥ ऐसें ह्मणोनि स्वामीप्रती । पुनः दंडवत घातला प्रीतीं । घरासी गेला सत्वरगती । अनन्य प्रीती लावोनी ।५८। एकांतीं बैसूनि एके दिनीं । विचार करित निज मनीं । ह्मणे स्वामीच्या मुखेंकरूनी । रामनाम ध्वनी ऐकावी ।५९। आणि चरणरज लागती जेणेंकरून । ऐसा उपाय रचावा कवण । मग मार्गावरी गार खणोन । केलें शयन ते ठायीं ।६०। मानससरोवरींच्या कमळणी । निशाकाळीं जाती मिळोनी । ह्मणती कधीं उगवेल वासरमणी । उल्हास मनीं होईल ।६१। कीं तृषा लागतां अपार । चातक इच्छी जळधर । तैशा रीतीं भक्त कबीर । वाट पाहे श्रीगुरूची ।६२। कीं येतां पौर्णिमेचा सुदिन । चकोर इच्छिती चंद्रदर्शन । कीं क्षुधातुर बाळक जाण । वाट पाहे जननीची ।६३। कीं अवर्षण पडतां अपार । प्रजा इच्छिती जळधर । तैसी रामानंदाची भक्त कबीर । वाट पाहे निजप्रीतीं ॥६४॥ तंव मागील रात्र घटिका चार । राहिली असे साचार । रामानंद स्वामी सत्वर । गंगास्नानासी चालिले । ६५। चालत जातां वेगेंसीं । पाय लागला कबीरासी । राम राम ह्मणोनि वाचेसीं । चरण कोणासी लागला ।६६। वचन ऐकोनि साचार । उभा ठाकला भक्त कबीर । ह्मणे स्वामी मजवर । कृपा अपार आजि केली ।६७। सहज भाळीं लागले चरण । राम राम हा मंत्र श्रवण । मज ऐसा सभाग्य जाण । त्रिभुवनीं कोणी दिसेना ॥६८॥ अनंत जन्मीं सुकृत केलें । त्याचें फळ आतां पावलें । आजि जन्ममरण माझें टळलें । सद्गुरुचरण लागतां । ६९ । प्राक्तन साह्य होतांचि जाण । सिकतेचीं होती दिव्यरत्नें । आडांतील क्षार असतां जीवन । अमृता ऐसें तें होय ।७०। रामानंद स्वामीसमोर । सप्रेम नाचे भक्त कबीर । मनीं वाटला आनंद थोर । स्वानंदें निर्भर जाहला ।७१। भुकेलियासि मिळालें मिष्टान्न । कीं झाड सुकतां वर्षला घन । कीं आयुष्यहीनासी अमृतपान । शचीरमणें पाजिलें॥ ।७२। दुर्बळासी सांपडल्या द्रव्यराशी । कीं दिव्यरस लाधला रोगियासी । नातरी सत्संग जोडतां साधकांसी। आनंद मानसीं नसमाये॥७३॥कीं सासुरवासिणीस भेटली माय । कीं दुर्बळा जोडली कामधेनु गाय । कीं प्रतापें भद्रीं बैसतां राय । आनंद होय तयासीं ।७४। गौतमासि लाधली गोदावरी ती । स्वानंदभरित झाला चित्तीं । कीं भगीरथें आणिली भागीरथी । आनंद चित्तीं वाटला॥७५॥कीं वनांत असतां अंजनीसुत । अकस्मात भेटला श्रीरघुनाथ । कीं नारद देखतां सत्यवतीसुत । स्वानंद भरितजाहला ॥ ७६ ॥ यापरी कबीराचें मन । पावलें असे समाधान । रामानंद स्वामी हांसोन । विस्मित मनीं जाहले ॥७७॥ मौन धरून ते समयीं । स्नानासि गेले लवलाहीं । ह्मणे कबीराऐसा निश्चय पाहीं । कोणाचा नाहीं देखिला॥७८॥तरी करून याचें छळण । कसवटीस लाऊनि पहावें मन । पोटीं हीनकसी असेल सोनें ।

तें परीक्षक तावून पाहती ॥७९॥ कीं अहिरणीवरी ठेवूनि हिरा । घण मारूनि पाहती खरा । कीं सूत गुंडाळूनि मोहरा । टाकिती बरा अग्नींत ॥ ८० ॥ कीं विश्वामित्रें करूनि छळण । हरिश्चंद्राचें पाहिलें मन । कीं श्रियाळापाशीं उमारमण । अतीत होऊनि पातला॥८१॥ कीं शरपंजरीं पडिला कर्ण । तेथें दान मागावया गेला कृष्ण । तेविं बाह्यात्कारें राग धरून । पाहूं मन कबीराचें ॥८२॥तंव एके दिवशीं बाजारांत । कबीर आनंदें गात नाचत । आनंदाश्रु नेत्रीं वाहत । सप्रेमभरित तेधवां॥८३॥प्रेमें नाचत निजछंदें । ह्मणे माझा गुरु रामानंद । त्याचे हृदयीं चरणारविंद । धरितां आनंद मानसीं॥८४॥ ऐसा सप्रेमें गातां जाण । रामानंद ऐकती दुरून । पायींच्या खडावा काढून । क्रोधेंकरून काय बोले॥८५॥माझा शिष्य उगाच ह्मणसी । कधीं उपदेश दीधला तुजसी । कोण साक्षी ठेविले यासी । हें आह्मासी सांगावें ॥८६॥ ऐसें ह्मणोनि ते अवसरीं । पादुका हाणिली मस्तकावरी । जैसी माता बाळकावरी । बाह्यात्कारें कोपत॥८७॥ कीं वरिवरी राग धरून । माता कन्येसी दे शिकवण । कीं विद्या यावी ह्मणून । करी ताडन कुळगुरु ॥८८॥ कां सकळ रोग व्हावया वाव । बळेंचि पशूसी देती डाव । कां सुवर्णासि देऊनि ताव । परीक्षा घेती सुजाण॥८९॥तेविं कबीराचा पहावया निर्धार । पादुका हाणीतली मस्तकावर । भडभडां वाहतसे रुधिर । परी कबीर थोर संतोषला॥९०॥ह्मणे ऐकाजी चित्त देउनी । उपदेश दीधला मजलागुनी । तेव्हां साक्षी नव्हतें कोणी । ह्मणोनि स्वामीनीं निर्भर्त्सिलें ॥९१॥ आतां देखतां सकळ लोकां । माझे शिरीं दीधली पादुका । ठावें असोंद्या सकळिकां । ऐसें लोकां सांगतसे ॥९२॥आप पृथ्वी वायु जाण । आकाश तेज नारायण । यांसी साक्षी ठेवून । तुमचे चरण सेविले म्यां ॥९३॥ ऐसें बोलतां कबीर भक्त । संतोषले सद्गुरुनाथ । कबीरापाशीं जाऊनि त्वरित । मस्तकीं हात ठेविला ॥ ९४ ॥ तुझा निश्चय पाहतां जाण । माझें कसीं उतरलें मन । आतां रामकृष्ण मंत्र जपोन । करीं भजन अहर्निशीं॥९५॥ऐसें बोलतां सद्गुरुनाथ । कबीर जाहला आनंदभरित । नानापरीचे प्रबंध कवित । गुण वर्णित श्रीरामाचे।९६।सांडोनि दुराशा लौकिकमान । सांडूनि इंद्रियांचें विषयध्यान । सांडूनियां ज्ञानाभिमान । करी कीर्तन अहर्निशीं।९७।वाराणशीचे सकळजन । कबीरासि ह्मणती धन्यधन्य । ऐसी प्रतिष्ठा होतांचि जाण । हें दुर्जनाकारणें असह्य।९८।सज्जनाची कीर्ती ऐकोनि कानीं । दुर्जन साशंकित होती मनीं । जेविं उदया येतां वासरमणी । दिवाभीत मनीं लज्जित।९९।कीं चंद्रोदय देखोनि दृष्टीं । तस्कर होती परमकष्टी । कीं दात्याची कीर्ती ऐकोनि मोठी।कृपण जळती पोटांत॥१००॥कीं पतिव्रतेची कीर्ती ऐकोनी । पोटीं संतापती जैशा जारिणी । कीं वेदांतज्ञान ऐकोनि कानीं । पाखंडी जळती मनांत ॥ १ ॥ तेविं कबीराची प्रतिष्ठा होतांचि जाण । निंदक पाहूं इच्छिती उणें । मग एकांतीं मिळोनि अवघे जण । विचार दुर्जन करिताती ।२।ह्मणती संतसेवा करितां अद्भुत । थोर वाढला कबीर भक्त । तेणें निजपुत्र वधिला स्वहस्तें । संतीं त्वरित उठविला ॥३॥ त्या दिवसापासून । यास नमिती सकळ जन । आतां कबीरास न कळतां जाण । संत सज्जन आणावे ॥ ४ ॥ त्याच्या नांवें पत्र लिहूनी । वैष्णव आणावे एके दिनीं । असंख्य संत देखोनि नयनीं । कबीर पळून जाईल ॥५॥ एकदांचि येतां अतिमेळा । तयास येईल कंटाळा । मग संत शापितील त्याला । शब्द आपणाला लागेना ॥ ६ ॥ दैत्य देवांत लावूनी भांडण । कौतुक पाहे ब्रह्मनंदन । कीं कौरवपांडवांत कळी लावून । शकुनी दुरून विलोकी ॥ ७ ॥ तेविं संत बोलावूनि अपार । अपमानावा भक्तकबीर । ऐसा दुर्जनीं विचार । केला साचार ते काळीं ॥ ८ ॥ कबीराच्या नांवें पत्र लिहूनी । हरिद्वारीं पाठविलें त्यांनीं । मथुरा गोकुळ वृंदावनीं । द्वारकापट्टणीं समवेत ॥ ९ ॥ एकमासीं एकेच दिवसीं । बोलाविलें वैष्णवांसी । आणिक बैरागी क्षेत्रवासी । मूळें तयांसी पाठविलीं ॥ ११० ॥ एकमेकांसी विचार करिती।कळों न द्यावें कबीराप्रति।असावध असतां संत येती।मग कोण गती करील तो॥११॥एकेच तिथीस जेवेळां । लक्षावधी मिळेल मेळा।मग कोण असे सत्वागळा।अन्न त्यांजला पुरवील ॥१२॥ पदरचें द्रव्य वेंचूनि जाण । बोलाविले वैष्णव जन।अपाय रचिती दुर्जन।कबीराचें उणें पहावया१३दुर्योधनें वेंचून तपासी।दुर्वासपाठविला पांडवापाशीं।तेविं दुर्बुद्धी धरूनि मानसीं।अगणित संतांसी पाचारिलें१४असो कबीराचें पत्र ऐकोनि कानीं।मस्तकीं वंदिलें संतजनीं।पत्रीं नेम लिहिला जे दिनीं। त्याच तिथीस पातले॥१५॥पूर्व पश्चिम दक्षिणेहून । अगणित आले संतजन । कबीरें त्यांसि करूनि नमन । दिधलें आलिंगन निजप्रीतीं ॥ १६ ॥ असंख्य वैष्णवांचा मेळा । नयनीं देखोनि संत तोषला । ह्मणे आजिचा सुदिन उगवला । देखिले डोळां वैष्णव ॥ १७ ॥ तंव कुटिल मान तुकाविती । आतां होईल कैसी गती । एकाकडे एक पाहून हांसती । टाळिया पिटिती परस्परें ॥१८॥ ऐसें संकट देखोन । अयोध्यावासी जानकीजीवन । ह्मणे निजभक्तांचें पडतां उणें । आपणाकारणें न साहे ॥ १९ ॥ कबीर तो निःसंग निराळा । अगणित आला संतमेळा । तरी आपण साह्य होऊनि त्याला । सांभाळ केला पाहिजे ॥ १२० ॥ क्षेत्रींचे वैष्णव उठाउठीं । उतरले येऊनि गंगातटीं । ऐसें देखोनि जगजेठी । पावला संकटीं कबीरासी ॥ २१ ॥ जितुके आले वैष्णव वीर । तितुके आपण जाहला कबीर । अनंत रूपें शार्ङ्गधर । धरिता जाहला तेधवां ॥ २२॥ कबीराचीं रूपें धरून हरी । निजभक्तांची सेवा करी। कौतुक पाहती दुराचारी । अद्भुत परी देखोनि ॥ २३ ॥ एकमेकांचा हात धरूनी । मेळ्यांत पाहती तयेक्षणीं । तों अनंत कबीर देखोनि नयनीं । विस्मित मनीं जाहले ॥ २४ ॥ निजभक्तांची करितां सेवा । बहु उल्हास वाटे देवा । अनंत रूपें धरिलीं तेव्हां । अकळभाव तयाची ॥ २५ ॥ कौतुक पाहती नारीनर । जिकडे तिकडे भक्त कबीर । संतसेवेसी होऊनि सादर । समाचार घेतसे ॥ २६ ॥ कोठें करीत चरणक्षालन । कोठें संतांसी घाली स्नान । कोठें देवपूजेसी चंदन । उगाळून देतसे ॥ २७॥ कोठें उभा जोडल्या करीं । कोणाचें चरणसंवाहन करी । कोठें संतांच्या पादुका धरी । लाघवी हरी तेधवां ॥२८॥ कोणापुढें करी गायन।कोणासी घालीतसे भोजन । कोणासी विडे करून । जगज्जीवन देतसे ।२९। कोणासी निजवुनी पलंगावरी । आपण बैसला त्यांशेजारीं । कोणासी प्रत्युत्तर मुरारी । मधुरोत्तरीं बोलत ॥ १३० ॥ कोणासी भांग घोंटूनी । कुसुंबा पाजी चक्रपाणी । कोणासी गुडगुडी भरूनी । पाजी आणूनि निजप्रीतीं ॥३१॥ को-

णासी ह्मणे अनाथोद्धार । मंदिरा चलावें सत्वर । कोणासी ह्मणे वारंवार । कृपा मजवर असोंद्या ॥ ३२ ॥ कोणासी ला-
वी गोपीचंदन । पुढें दावीतसे दर्पण । कोणासी तुळसी माळा करून । अंगें श्रीराम घालीतसे ॥ ३३ ॥ कोणासी केशर
चंदन उटी । चर्चित बैसला जगजेठी । कोणासी कस्तूरी ललाटीं । सुरेख भ्रुकुटी रेखित ॥ ३४ ॥ कोणासी वस्त्रें भूषण ।
अंगीं लेववी जगज्जीवन । कोणासी एकांतीं नेऊन । आत्मज्ञान पुसतसे ॥ ३५॥ कोणाच्या पादुका घेऊन शिरीं । भा-
वें धरीत मस्तकावरी । कोणापुढें लाघवी हरी । गायन करी संगीत ॥ ३६ ॥ कोणासी घालोनि तृणासन । निद्रा कर-
वी जगज्जीवन । कोणासी तलफ होतां जाण । अफिण आणून देतसे ॥ ३७ ॥ कोठें अगणित जेविती पंक्ती । तेथें वाढी
जगत्पती । कोणासी पाणी श्रीपती । पाजीत प्रीतीं निजछंदें ॥ ३८ ॥ कोठें तुळसी माळा करूनी । गळां घालीत चक्र-
पाणी । कोठें पंखा हातीं घेउनी । शीतळपवनीं रंजवीत ॥ ३९ ॥ कोठें निजवूनि संतजन । रगडीत बैसला जगज्जीवन ।
कोठें पुस्तक वाचितां जाण । करी श्रवण निजप्रीतीं ॥ १४० ॥ कोणी चालिले स्नानासी । त्यांसवें जात हृषीकेशी । को-
णासी ह्मणे वैकुंठवासी । कार्य मजसी सांगावें ॥ ४१ ॥ कोणासी करवीत उपहार । जवळ बैसला शार्ङ्गधर । कोणासी
वारीत चामर । रुक्मिणीवर उभा असे ॥ ४२ ॥ जैसा एकचि वासरमणी । सर्वांघटीं अलिप्त बिंबोनी । तैसा व्यापक
चक्रपाणी । कबीररूपें नटलासे ॥ ४३ ॥ मागें बाळपणीं कृष्णमूर्ती । गौळणीनें धरिला हातीं । यशोदेसी सांगावया येती ।
तें अनंत मूर्ती प्रकटल्या ॥ ४४ ॥ कीं कौरवपंक्तीसी द्रुपदबाळा । वाढितां दुर्जनीं छळिलें तिला । पात्रासी द्रौपदी आपण
जाहला । अपमानिलें दुर्योधना ॥ ४५ ॥ तेविं कबीराची देखोनि भक्ती । असंख्यात रूपें धरी श्रीपती । नर नारी कौतुक
पहाती । देखोनि करिती आश्चर्य ॥ ४६ ॥ वाराणसी क्षेत्रांत । त्रिरात्र राहिले वैष्णवभक्त । तोंपर्यंत वैकुंठनाथ । सेवा करीत
निजप्रीतीं ॥ ४७ ॥ वस्त्रें भूषणें सकळांसी । निजांगें देत हृषीकेशी । जया चित्तीं वासना जैसी । तैसा तयासी होतसे ४८
मग बोळवूनि वैष्णवजन । अदृश्य जाहले सीतारमण । कबीरापासी सकळ दुर्जन । येऊन चरणा लागले ॥ ४९ ॥ ह्मण-
ती तूं वैष्णवभक्त । आह्मीं छळणा केली बहुत । परी साह्य होऊनि श्रीरघुनाथ । अद्भुत कीर्ती वाढविली ॥ १५० ॥ दी-
पकाचें तेज गहन । पतंग विझवितां न विझे जाण । कीं खद्योताचे द्वेषेंकरून । सूर्यनारायण झांकेना ॥ ५१ ॥ कीं लाक्षा-
जोहरीं पांडवांप्रती । कौरवीं जाळिल्या न जळती । वडवानळें जाळिलें समुद्राप्रती । परी तो कदापी जळेना ॥ ५२ ॥ ऐसें
ह्मणूनियां त्वरित । मागुती घातलें दंडवत । विकल्प द्वेष टाकूनि निश्चित । सप्रेम गात गुण नामें ॥ ५३ ॥ पुढील अध्या-
यीं रुक्मिणीवर । जो भक्तभूषण कृपासागर । तो ज्ञानेश्वररूपें अवतार । घेईल साचार मृत्युलोकीं ॥ ५४ ॥ तेच्चि कथा
नवरस उत्पत्ती । वाढीन आर्तांचिये ताटीं । सभाग्य प्रेमळ जे क्षुधार्ती । तेचि सेविती निजप्रेमें ॥ ५५ ॥ विकल्प मक्षिका
उडवूनि दुरी । कथारस सेविजे भक्तचतुरीं । महीपती तुमचा आचारी । प्रार्थना करी निजप्रेमें ॥ ५६ ॥ स्वस्तिश्रीभक्त-
विजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । सप्तमाध्याय रसाळ हा ॥ १५७ ॥ अध्याय ॥ ७ ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । आजिचा सुदिन दिवस भला । जैं संतचरित्र ग्रंथ देखिला । श्रोते आणि वक्त-
यांला । सुधारस लाधला निजप्रेमें ॥ १ ॥ भक्तकथेसी सुधारस ह्मणणें । हाही दृष्टांत येथें दिसे गौण । अमृत सेवितां
शचीरमण । अक्षयपदीं कोण राहिला ॥ २ ॥ जे कथारस सेविते जन । ते अक्षयपदीं राहिले जाण । करितां भक्तक-
थाश्रवण । जन्ममरण निवारे ॥ ३ ॥ गंगेची उपमा यावी यासी । तरी तेही नतुकेच कथारसीं । जैं कर्वतीं घ्यावें त्रिवेणी-
सी । मोक्ष जीवासी तैं होय ॥ ४ ॥ तैसें नव्हे हरिकीर्तन । श्रवणेंचि होती श्रोते पावन । ह्मणोनि कथारस निरूपण ।
चतुर सर्वज्ञ जाणती ॥ ५ ॥ सूर्याहूनि अति सोज्वळ । कीं चंद्राहून वाटे शीतळ । आकाशाहूनि अति निर्मळ । भक्त
प्रेमळ जाणती ॥ ६ ॥ आतां ऐका देऊनि चित्त । विरिंचि आणि कैलासनाथ । क्षीरसागरीं अकस्मात । दर्शना येती
हरीच्या ॥ ७ ॥ तयांसी ह्मणे क्षीराब्धिजावर । मृत्युलोकीं घेऊं अवतार । निवृत्ति सोपान ज्ञानेश्वर । लीला साचार
दाखवूं ॥ ८ ॥ त्रिवर्ग बंधू एके ठायीं । जन्म घेऊं लवलाहीं । आदिमाया मुक्ताबाई । भगिनी होईल आपणां ॥ ९ ॥
तंव गंगातीरीं क्षेत्र अद्भुत । आपेगांव जगविख्यात । तेथील कुळकर्णी गोविंदपंत । असे निजभक्त विष्णूचा ॥ १० ॥
निराबाई त्याची कांता । परम भाविक पतिव्रता । ते गरोदर जाहली असतां । पुत्र इच्छा धरियेली ॥ ११ ॥ मूर्तिमंत
वैराग्य डोळस । आले तिच्या उदरास । भक्ति नवविधा भरले मास । प्रसूत जाहली तेधवां ॥ १२ ॥ तंव भक्तिज्ञान वै-
राग्य पुतळा । मूर्तिमंत पोटीं उपजला । मायबापांसी आनंद जाहला । निजपुत्रासी देखोनी ॥ १३ ॥ बारा दिवस लो-
टतां जाण । विठोबा ठेविलें नामाभिधान । अष्ट वर्षें होतां संपूर्ण । मौंजीबंधन पैं केलें ॥ १४ ॥ वेद शास्त्र करूनि प-
ठण । काव्यव्याकरणीं जाहला निपुण । मनांत इच्छा धरिली त्यानें । तीर्थाटन करावें ॥ १५ ॥ अनुताप धरूनि चि-
त्तासी । पुसे मातापितयांसी । आतां आज्ञा द्यावी मजसी । पुष्करतीर्थासी जावया ॥ १६ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ।
वडिलांस वाटलें समाधान । मग विठोबानें करूनि नमन । सत्वर तेथोनी निघाला ॥ १७ ॥ वैराग्य नुपजे चित्तास ।
तरी वायां गेला शास्त्राभ्यास । थोर कर्ण बधिरास । असोनि काय उपयोगी ॥ १८ ॥ कीं मयुराचे अंगीं जाण । सर्वत्र-
चि दिसती नयन । परी एकले दृष्टीविण । काय कारण तयांचें ॥ १९ ॥ अजाकंठींचे वाढले स्तन । कीं सावरीचें दा-
टलें वन । कीं गौरियाचें सुंदर गायन । कीं तरुण्यपण विधवेचें ॥ २० ॥ नासिकाविण जैसें वक्र । कीं महत्वावांचूनि
कारभार । पुरुषत्वावांचूनि जैसा नर । व्यर्थचि थोर वाढला ॥ २१ ॥ तेविं शास्त्राभ्यास उदंड केला । आणि अनुताप
चित्तासि न जाहला । जेविं बक अनुष्ठानीं बैसला । मत्स्य गिळावयाकारणें ॥ २२ ॥ ह्मणोनि अनुताप धरूनि मना ।
विठोबा चालिला तीर्थाटना । माया ममता टाकोनि जाणा । हरिभजनीं विनटला ॥ २३ ॥ आधीं येऊन द्वारावती ।
स्नान केलें श्रीगोमती । मग पाहोन श्रीकृष्णमूर्ती । दंडवत प्रीतीं घातलें ॥ २४ ॥ देवें धरिला मत्स्यावतार । मारूनि
उद्धरिला शंखासुर । महामुक्तीचें माहेर । गेला सत्वर त्या ठायां ॥ २५ ॥ तेथूनि पिंडारकासी आला । तंव मंगळहु-

डा पुढें देखिला । द्वारकेचा कळस पाहिला । मग चालिला तेथोनी ॥२६॥ सुदामपुरी दृष्टीं देखोन । मूळमाधवासी आ-
ला जाण । जेथें रुक्मिणीचें लग्न । भीमकनृपवरें लाविलें॥२७॥अवतार संपविला श्रीकृष्णें । तें भालुकातीर्थ वंदिलें जा-
ण । मग प्रभासलिंगा तेथून । गेला सत्वर तेधवां ॥ २८ ॥ वंदोनि सोरटी सोमनाथासी । त्वरें चालिला वेगेंसी । मुचकुं-
दाची गुंफा कैसी । तेही दृष्टीसी देखिली॥२९॥भस्म केला कालयवन।तें स्थान दृष्टीस पाहून । मग धवलपुरीस येऊन।
विश्रांतिस्थान देखिलें ॥३०॥ आणीक मार्गींचीं महातीर्थें । पुराणप्रसिद्ध जगविख्यातें । तींही वंदोनि समस्तें । सप्तशृं-
गासी पातला ॥ ३१ ॥ आदिमाया वंदोनि जाण । अरुणावरुणेसि केलें स्नान । मग प्राची गोदावरी तेथून । जाहला दे-
खोन निजसुखी ॥३२॥ कपालेश्वर देखोनी नयनीं । त्र्यंबकासि आला तेथोनी ॥ कुशावर्तीं स्नान करूनी । गंगाद्वार वं-
दिलें ॥ ३३ ॥ सव्य घालूनि ब्रह्मगिरी । हर्ष वाटला निज अंतरीं । मग येऊनि भीमाशंकरीं । सुस्नात जाहला अनुतापें
॥ ३४ ॥ नित्यानित्य चालतां जाण । मुखें करीत हरिकीर्तन । तेथोनि अलकावतीस्थान । सत्वर आला त्या ठायां ३५
चक्रतीर्थीं करूनि स्नान । करीत बैसला देवतार्चन । तों तेथील सिधोपंत ब्राह्मण । स्नानासि जाण पातला॥३६॥ब्रह्म-
चारी दृष्टीं देखोन । साष्टांग घातलें लोटांगण । तुमचें सांगा नामाभिधान । केलें आगमन कोठोनी ॥ ३७ ॥ ऐकू-
नि ह्मणे ब्रह्मचारी । आपे गांव गंगातीरीं । तेथील वृत्ती आमची बरी । वृद्धाचारी ह्मणताती ॥ ३८ ॥ मातापिता दोघें
जण । तेथें वृद्धें असती जाण । द्वारकादितीर्थें करून । अलकावतीस पातलों ॥ ३९ ॥ ह्मणे धन्य आजिचा सुदिन ।
जाहलें स्वामीचें आगमन । आतां मंदिरास येऊन । आश्रम पवित्र करावा ॥ ४० ॥ ऐसें ह्मणूनि सिधोपंत । घरासि
घेऊन गेले त्वरित । भोजन घालोनि पंचामृत । निद्रा करवीत तयासी ॥ ४१ ॥ तंव स्वप्नीं येऊनि श्रीपंढरीनाथ । सि-
धोपंतासी काय बोलत । ब्रह्मचारीयासी सालंकृत । कन्यादान करावें ॥४२॥ ऐसें होतांचि स्वप्न । चित्तीं वाटलें स-
माधान । स्नानसंध्यादि नेम सारून । दृष्टांतवचन सांगितलें ॥४३॥ ब्रह्मचारी वचन बोलत । तुह्मीं सांगतां तें यथा-
र्थ । परी आह्मांसी आज्ञा पंढरीनाथ । नकरीच कीं सर्वथा ॥४४॥ सिधोपंत बोले वचन । तरी आजिचा दिवस येथें
राहून । सत्य असेल तरी तुह्मासि स्वप्न । होईल जाणा निश्चयेंसी ॥ ४५ ॥ वृंदावनीं आसन घालूनी । निद्रा केली तये
क्षणीं । संकल्प विकल्प येतां मनीं । तंव काय स्वप्न देखिलें ॥ ४६ ॥ विश्वव्यापक पंढरीनाथ । ब्रह्मचारीयास स्वप्नीं
सांगत । चारी अवतार मूर्तिमंत । इच्या उदरा येतील ॥४७॥ तरी माझी आज्ञा वंदोनि शिरीं । कन्यादान अंगीका-
रीं । ऐसें देखोनि ब्रह्मचारी । उठोनि सत्वरीं बैसला ॥ ४८ ॥ ब्राह्मणासि पुसतां जाण । घटित आले छत्तीस गुण।मग
लग्नतिथी नेमून । सर्व साहित्य करविलें ॥ ४९ ॥ देवक प्रतिष्ठा ब्राह्मण भोजन । केलें निर्विघ्नाचें पूजन । मंगळवाद्यें
वाजती जाण । पुण्याहवाचन होतसे ॥५०॥ नानापरीचीं दिव्यान्नें निर्मून । घातलें ब्राह्मणांसी भोजन । करूनि सी-
मांतपूजन विप्र बोलती मंगळाष्टकें ॥५१॥ जयजय मुकुंदा मुरारी । पुराणपुरुषा मधुकैटभारी । भक्तभूषणा ना-



नापरी । वधूवरांसी रक्षीं तूं ॥ ५२ ॥ जयजय शंखासुरमर्दना । जयजय कूर्मरूपा समुद्रमंथना । वराहवेषा हिरण्या-
क्षभंजना । वधूवरांसी रक्षीं तूं ॥ ५३ ॥ जयजय नृसिंह प्रऱ्हादरक्षका । जय वामनरूपा बलिछलका । जय परशुधरा
सहस्रबाहु अंतका । वधूवरांसी रक्षीं तूं ॥ ५४ ॥ जयदशरथ कुमरा निशाचरमर्दना । जय गोकुळनाटकानंदनंदना ।
जय बुद्धरूपा जनार्दना । वधूवरांसी रक्षीं तूं ॥ ५५ ॥ जय कल्किरूपा म्लेच्छमर्दना । धर्मस्थापका जगज्जीवना।जय
पुंडरीकवरदा रुक्मिणीरमणा । वधूवरांसी रक्षीं तूं ॥ ५६ ॥ ऐसीं मंगळाष्टकें ह्मणून । विप्र बोलती सावधान। नाना-
परीचीं वाद्यें लावून । पाणिग्रहण पैं केलें ॥५७॥ चार दिवस सोहळा करून ॥ सिधोपंतासी केलें नमन ॥ ह्मणे आषा-
ढमासीं पंढरीस जाणें । श्रीपांडुरंगदर्शन घ्यावया ॥ ५८ ॥ मग कुटुंबासहित तयासी । घेऊन चालिला यात्रेसी । स्नान
करून चंद्रभागेसी । श्रीपुंडरीकासी नमियेलें ॥ ५९ ॥ आणिक क्षेत्रांची उपमा जाण । पंढरीस देतां दिसे गौण । चंद्रा
ऐसें नक्षत्र कोण । गगनीं सोज्वळ दिसेना ॥ ६० ॥ सुवर्णा ऐसी धातु कोणती । कीं विष्णु वरिष्ठ कोणाची कीर्ती । कीं
कौस्तुभाहून रत्नदीप्ती । सोज्वळ धुंडितां दिसेना ॥ ६१ ॥ नंदी वरिष्ठ वृषभ कोण । कीं शंकरा ऐसा तपस्विगण । गीते
वरिष्ठ शास्त्र जाण । धुंडितां त्रिभुवनीं नाढळे ॥ ६२ ॥ रामकृष्णनामा वरिष्ठ । मंत्र कोणी न दिसे श्रेष्ठ । कीं भागवतध-
र्मा ऐसा वरिष्ठ । धर्म आन असेना ॥ ६३ ॥ तेविं पंढरी ऐसें भूमंडळीं । क्षेत्र न दिसे नेत्रकमळीं । जें दृष्टीं देखतांचि त-
त्काळीं । पर्वत जळती पापाचे ॥ ६४ ॥ ह्मणाल मोक्षदायक सप्तपुरी । त्याहून वरिष्ठ कैसी पंढरी । तरी येथें अभिमा-
नाची होय बोहरी । न उरे उरी मीपणाची ॥ ६५ ॥ आणिके तीर्थीं करितां स्नान । विशेष वाढतो अभिमान । पंढरी दे-
खतांचि दुरून । खळासि पांझर सुटती ॥ ६६ ॥ असो हें माहात्म्य वर्णितां । पुढें विशेष वाढेल कथा । सिधोपंत घेऊ-
नि जामाता । पंढरी क्षेत्रांत राहिला ॥ ६७ ॥ टाळ विणे मृदंग वाजती । वैष्णव प्रेमें गाती नाचती । हें कौतुक देखोनि
कैलासपती । स्वानंद प्रीतीं डुलत पैं ॥ ६८ ॥ करूनि क्षेत्रप्रदक्षिणा । महाद्वारासि आले जाणा । गरुडपारीं लोटांग-
णा । विठ्ठलें साष्टांग घातलें ॥ ६९ ॥ कन्या जामात दोघांप्रती । सिधोपंतें धरून हातीं । चरणावरी सत्वर गती । नेऊ-
नियां घातलीं॥७०॥ देवासि देऊन आलिंगन । मग धरिले दृढ चरण । महोत्साह जाहलिया तेथून । सिधोपंत चालि-
ले ॥ ७१ ॥ कन्या कुटुंब सहपरिवारीं । जाता जाहला अलकापुरीं । विठोबा ह्मणे रामेश्वरीं । जाऊन सत्वरीं येईन मी
॥ ७२ ॥ अंतर जाणूनियां तयाप्रती । निरोप दिधला सिधोपंतीं । ह्मणे यात्रा करून सत्वर गती । यावें पुढती आश्रमा
॥ ७३ ॥ पांडुरंगासी करूनि नमन । सत्वर निघाला तेथोन । पुराणप्रसिद्ध मुख्यस्थान । अनुक्रमेंचि पहातसे ॥ ७४ ॥
श्रीशैलपर्वत मल्लिकार्जुन । पाहिला निवृत्तिसंगम जाण । देखतां पापराशी भस्म होती तत्क्षण।अगाध महिमान तया-
चें ॥७५॥ मार्गीं चालतां सत्वर गती । हृदयीं चिंतित विठ्ठलमूर्ती।मुखीं गात नामकीर्ती । सप्रेमगतीं करूनी ।७६। अ-
हो बळ नरसिंह वासुदेव । गिरि पर्वतीं व्यंकटराव । अरुणाचल पाहूनि सर्व । चिदंबरासी नमियेलें ॥ ७७ ॥ तें स्थान

पाहूनि जाण । मग पाहिलें गोकर्ण । हाटकेश्वरींकरूनि स्नान । सत्वर तेथून निघाले ॥७८॥ सीताशुद्धीस हनुमंत गे-
ला । ज्या पर्वतावरून उडाला । तें स्थान पाहूनियां डोळां । तेथूनि निघाला सत्वर ॥ ७९ ॥ जनार्दन पाहूनि डोळां ।
सत्वर रामेश्वरासि आला । आपुला हेतु पूर्ण केला । मग निघाला तेथूनी ॥८०॥ कोल्हापुरास येऊन । पंचगंगेचें के-
लें स्नान । लक्ष्मीदर्शन घेऊन । केलें गमन तेथोनी ॥ ८१ ॥ मग कृष्णातीरास येऊन । माहुलीसंगमीं केलें स्नान । स-
त्वर तेथूनि परतोन । अलकापुरीं पातला ॥८२॥ सिधोपंतासी आलिंगन । दीधलें परमप्रीतीकरून । तेणें साष्टांग क-
रूनि नमन । वंदिलें चरण तयाचे ॥ ८३ ॥ चार रात्री तेथें राहून । सिधोपंतासि बोले वचन । आतां मातापितयांचें
दर्शन । घ्यावें ऐसें वाटतसे ॥८४॥ जरी आज्ञा घाल मजप्रती । तरी आतां जाऊं सत्वरगती । अवश्य ह्मणूनि सिधो-
पंतीं । तयाप्रती काय बोलिले ॥ ८५ ॥ आपुले कांतेसहवर्तमान । घ्यावें वडिलांचें दर्शन । आह्मीं येतसों बोळवण ।
भेटीकारणें तयांच्या ॥ ८६ ॥ मग कन्याजामात घेऊनि पाहीं । सिधोपंत आले आपेगांवीं । गोविंदपंतासी लव-
लाहीं । येऊनियां भेटले ॥ ८७ ॥ विठ्ठलें वंदोनि मातापिता । क्षेम दीधलें उभयतां । सिधोपंतीं साकल्य कथा । वर्त-
मान सांगितलें ॥ ८८ ॥ ऐशी ऐकोनियां वाणी । निराबाई संतोषली मनीं । जेविं जनकात्मजा पर्णोनी । अयोध्येसि
आला रघुनाथ ॥ ८९ ॥ मग श्रीरामसीता देखोनि दृष्टीं । आनंद न माये कौसल्ये पोटीं । तेविं पुत्र सून देखोनि दृष्टीं ।
मातेसी संतोष वाटला ॥ ९० ॥ कीं भीमसहोदर अर्जुन । द्रौपदीस आणी पण जिंकून । देखोनि कुंती हर्षायमान । तै-
सें येथें जाहलें ॥९१॥ वस्त्रें भूषणें उभयतांसी । सिधोपंत देत सन्मानेंसी । आज्ञा मागोनि आळंदीसी । परतोनि आले
तेधवां ॥९२॥ कांहीं एके दिवशीं जाण । मातापिता दोघेंजण । देह सांडूनि वैकुंठभुवन । पावतीं झालीं तेधवां ॥९३॥
संसारचिंतेचा विटाळ । कदा न धरीच विठ्ठल । जैसे येतां तीनी काळ । समसमान सर्वांसी ॥ ९४ ॥ कीं सरिता भरू-
नि मिळतां देख । समुद्र नव्हेचि अधिक । कीं उष्णकाळीं आटतां उदक । उणा कदापि दिसेना ॥ ९५ ॥ तेविं सुखदुः-
खें दोनी सरसीं । विठोबा लेखी निजमानसीं । हें वर्तमान सिधोपंतासी । कळों आलें तेधवां ॥ ९६ ॥ खेद होईल जा-
मातास । ह्मणोनि घ्यावा परामर्श । माघुती आपेगांवास । परतोन आले तेधवां ॥ ९७ ॥ मग ह्मणे जामातासी । तुह्मीं
तो विरक्त उदासी । सर्व पदार्थ संसारासी । नित्यानित्य पाहिजे ॥९८॥ तरी कृपा करूनि मजवरी । आतां चला अ-
लकापुरीं । तुम्चें चालविणार हरी । परी लोकाचारीं विपरीत ॥९९॥ अवश्य ह्मणतां निजकन्येंसी । सवें घेतलें जा-
मातासी । सिधोपंत अतिवेगेंसी । अलकावतीस पातले ॥ १०० ॥ क्षेत्रवासीं राहतां जाण । चित्तासि वाटलें समाधा-
न । नित्य करी हरिकीर्तन । साधुदर्शन अहर्निशीं ॥ १ ॥ आषाढीकार्तिकीएकादशी । पंढरीस जातसे यात्रेसी । बहु-
काळ लोटतां तयासी । संतान होतां दिसेना ॥ २ ॥ मग विठोबा ह्मणे निजकांते त्वरित । उदास जाहलें माझें चित्त ।
तरी वाराणसीस जाऊं यथार्थ । संन्यासग्रहण करावया ॥ ३॥ ऐसें वाटतें ममानसीं । आज्ञा मागतों तुजपासीं । रखु-



माई उत्तर नेदी तयासी । चिंताक्रांत होऊनियां ॥ ४॥ मग पित्यापाशीं येऊन त्वरित । सांगितला सकळ वृत्तांत । आ-
ज्ञा मागती प्राणनाथ । संन्यासग्रहण करावया ॥ ५॥ सिधोपंत ह्मणे तिजकारण । पोटीं नसतां पुत्रसंतान । कदा न
करावें संन्यासग्रहण । ऐसें वचन श्रुतीचें ॥ ६ ॥ झणी आज्ञा देशील त्यासी । ऐसें सांगतसे पिता तिसी । रखुमाबाई
निजचित्तासी । सावध असे सर्वदा ॥ ७ ॥ तंव कोणे एके दिवशीं । विठोबा ह्मणे निजकांतेसी । स्नानास जावया गंगे-
सी । आज्ञा द्यावी मज आतां ॥ ८ ॥ दुश्चितपणें असतां जाण । अवश्य कांता बोले वचन । समाधान मनीं पावून ।
आनंदवनासी पावला ॥ ९ ॥ जैसा गारोड्यापासोनि नाग सुटला । अरण्यांत वारुळीं प्रवेशला । कीं पिंजऱ्यांतून
रावा उडाला । जाऊनि बैसला वृक्षावरी ॥ ११० ॥ कीं कुटिलाचे सभेंतून । उठतां साधूसि समाधान । कीं पतिव्रता
जारिणींतून । आली पळून एकांतीं ॥ ११ ॥ कीं व्याधपाशांतून त्वरित । कुरंग पळे अकस्मात । कीं निंदकग्रामांतून सं-
त । महाक्षेत्रांत चालिला ॥१२॥ कीं रंभेपासून शुकमुनी । दूर पळाला उठोनी । कीं अगस्तिऋषीचे उदरांतूनी । सागर
बाहेर निघाला ॥१३॥ यापरी मानूनिया समाधान । वाराणसीस आला जाण । त्रिवेणीसंगमीं करून स्नान । अनुताप
मनीं धरियेला ॥ १४ ॥ माधवपूजा करूनि जाण । प्रयागासि केलें माघस्नान । तेथून माघुती परतोन । पुष्करासी पा-
तला ॥ १५॥ संत साधु वैष्णवजन । तेथें अखंड वसती जाण । गीता आख्यान करितां श्रवण । संन्यास योग ऐकि-
ला ॥ १६॥ ह्मणे हा दुस्तर संसार । दुर्धर माया अनिवार । जन्ममरण चुके येरझार । ऐसा विचार करावा ॥ १७ ॥
मग श्रीरामाश्रम संन्यासी । सद्भावें शरण गेला त्यासी । संन्यासदीक्षा द्यावी मजसी । ह्मणोनि चरणासी लागला
॥ १८ ॥ तेणें पूर्वाश्रमानुसंधान । विचारिलें याजकारण । कांता पुत्र बंधुजन । परिवार कोण असे कीं ॥ १९ ॥ येरू
ह्मणे मी एकला असें । दारापुत्रादि पाश नसे । ह्मणोनि अनुतापासरिसें । स्वामीसी शरण आलों सद्भावें ॥ १२० ॥
संत देखोनि विरक्त । अवश्य ह्मणती सद्गुरुनाथ । मंत्रदीक्षा देऊनि त्वरित । संन्यासग्रहण संपादिलें ॥ २१ ॥ यापरी
विठ्ठलें चतुर्थाश्रम । वाराणसीस घेतला जाण । परस्परें वर्तमान । सिधोपंतासी श्रुत जाहलें ॥ २२ ॥ संन्यास घेतला
ऐकोनि कानीं । रखुमाबाई चिंताक्रांत मनीं । ह्मणे प्राणनाथा मज ये वनीं । टाकोनि कासया दीधलें ॥२३॥ पांडव-
वियोगें जैसी द्रौपदी सती । कीं नळवियोगें रडे दमयंती । कीं हरिश्चंद्राविण तारामती । दुःखानळें आहाळे ॥ २४ ॥
सत्यवानासी येतां मरण । सावित्री सांडूं पाहे प्राण । कीं जयदेवाचें ऐकोनि निर्वाण । पद्मावती मूर्छित ॥ २५ ॥ तेविं
कानीं ऐकूनि संन्यासवार्ता । रडे आक्रोशें पतिव्रता । समाधान करितां मातापिता । मग धैर्यें चित्ता आवरिलें ॥२६॥
सार्थक करावें संसारीं । मग अश्वत्थाची सेवा करी । अनुष्टान देखोनियां भारी । जाहली बोहरी दोषांची ॥ २७ ॥
संन्यास दिधला भ्रतारासी । ते श्रीपाद आले आळंदीसी । रखुमाबाई देखोनि त्यांसी । नमस्कारासी पातली ॥२८॥अ-
श्वत्थाचे पारावरी । श्रीपाद बैसले ते अवसरीं । रखुमाबाई येऊन सत्वरीं । नमस्कारी सद्भावें ॥२९॥अष्टपुत्रा सौभाग्य-

वती । आशीर्वाद दिधला तिजप्रती । ऐसें ऐकोनियां चित्तीं । परम आश्चर्य वाटलें ॥ १३० ॥ रखुमाबाई हांसतां चि-
त्तासी । श्रीपाद पुसती तियेसी । ह्मणती माते विनोद तुजसी । किमर्थ चित्तीं वाटला ॥ ३१ ॥ ह्मणे सौभाग्यदायक पु-
त्रवती । आशीर्वाद दिधला मजप्रती । तो भ्रताराविण सुफळ निश्चितीं । कैसा होईल यतिराया ॥ ३२ ॥ भ्रतारें सांडो-
नि मजकारण । अनुतापें केलें संन्यासग्रहण । तुह्मीं दिधलें आशीर्वचन । ह्मणोनि चित्तीं विकल्प ॥ ३३ ॥ अग्निकुंडांत
पेरिलें बीज । कीं खडकीं वर्षला मेघराज । तेविं आशीर्वाद देतां मज । नाहीं कांहीं विचारिलें ॥ ३४ ॥ अंधासी दा-
विला दर्पण । कीं बधिरापुढें केलें गायन । कीं रोगियासी वाढितां पक्वान्न । विचार मनें न करितां ॥ ३५ ॥ इंधन नसतां
अग्नि फुंकिला । कीं स्नेहेंविण दीप सरसाविला । कृपणावरी शब्द टाकिला । याचकें जैसा व्यर्थची ॥ ३६ ॥ वर्षला न-
सतां मेघराज । व्यर्थचि भूमींत पेरिलें बीज । कीं आयुष्य नसतां रसराज । वैद्यें कासया पाजावा ॥ ३७ ॥ चंद्रबळ न-
सतां वधूकारण । ज्योतिष्यें कासया दिधलें लग्न । कीं अस्तास गेलिया दिन । मग अर्घ्यदान कासया ॥ ३८ ॥ तेविं ध्या-
नीं नाणितां कर्मगती । आशीर्वाद दिधला मजप्रती । असत्य नोहे हे वचनोक्ती । विनोद चित्तीं वाटला ॥ ३९ ॥ ऐसें
बोलतां रखुमाबाईसी । आश्चर्य वाटलें श्रीपादासी । ह्मणे संन्यास देणारासी । प्रायश्चित्त देणें लागेल ॥ १४० ॥ त-
रुण स्त्री संतानहीन । टाकूनि घेतां संन्यासग्रहण । तरी गुरुशिष्य दोघांकारण । शास्त्रीं दंड बोलिला ॥ ४१ ॥ खाणखुण
पुसतां निवाडें । तो शब्द येतसे आपणाकडे । ह्मणे पुसावयासी गेलों सांकडें । तों वेहरण मजकडे आलें कीं ॥ ४२ ॥
कलंक असतां निजांगासी । चंद्रमा हांसे तारागणासी । कीं क्षारत्व असोनि सागरासी । शब्द गंगेसी ठेवित ॥ ४३ ॥
कीं कडवट मुख असतां पाहीं । पक्वान्नासी शब्द ठेवी । कीं गर्भांधासी दृष्टि नाहीं । आणि भानूसी दोष ठेवित-
से ॥ ४४ ॥ सरळ नासिक आपुलें नसतां । आरशावरी कोप तो वृथा । कीं दीपकाखालीं अंधार असतां । प्रकाश
दावी आणिकासी ॥ ४५ ॥ तेविं आह्मींच केलें अनुचित । आणिकासि शब्द ठेवितों व्यर्थ । आतां इच्या दोषें माझें
सुकृत । विलया जाईल वाटतें ॥ ४६ ॥ रखुमाबाईस पुसे ते क्षणीं । तुझीं आप्त असती कोणी । येरी उभी
कर जोडोनी । नम्र वचनें बोलत ॥ ४७ ॥ माता पिता बंधु बहिणी । सर्व आहेत मजलागुनी । परी भ्रतारवियोगें
ये जनीं । निढळवाणी दिसतसें ॥ ४८ ॥ मग आज्ञापिलें श्रीपादें तियेतें । पित्यासि पाचारूनि आणी येथें । घरा
जाऊनि त्वरितें । सिधोपंतासि आणिलें ॥ ४९ ॥ दृष्टीं देखोनि यतीश्वर । घाली साष्टांग नमस्कार । अर्घ्य पाद्य पूजा
उपचार । भोजन सत्वर सारिलें ॥ १५० ॥ पुसे उभा कर जोडून । कोठोनि स्वामीचें आगमन । पुढारें कोठवर आहे गमन ।
मजकारणें सांगिजे ॥ ५१ ॥ श्रीपाद बोलती ते अवसरीं । आमुचा आश्रम काशीपुरीं । हेत धरूनि रामेश्वरीं । दक्षिणदेशा
पातलों ॥ ५२ ॥ तों तुमचे आत्मजेनें येथ । सकळ सांगितला वृत्तांत । आतां वाराणसीस त्वरित । परतोनि जाणें ला-
गेल ॥ ५३ ॥ श्रीपाद ह्मणती शास्त्रयुक्त । इच्या दोषें आमुचें सुकृत । विलया जाईल समस्त । ह्मणोनि सत्वर परतावें



॥ ५४ ॥ रखुमाबाईस सवें घेउनी । तुह्मीं चलावें आनंदवनीं । ऐसें ह्मणतां तये क्षणीं । सिधोपंत चरणीं लागले ॥ ५५ ॥
ह्मणती तुह्मी दयावंत । शीघ्र कीजे गमनार्थ । कन्येसि घेऊनि त्वरित । सिधोपंत निघाले ॥ ५६ ॥ मग जाऊन वारा-
णसीसी । श्रीपाद गेले आश्रमासी । पाचारून चैतन्यासी । पूर्व वृत्तांत पुसिला तेव्हां ॥ ५७ ॥ गृहस्थाश्रमीं तुज हो-
ती कांता । किंवा नव्हती सांग आतां । आह्मांपाशीं असत्य बोलतां । उरी सर्वथा न ठेवीं ॥ ५८ ॥ सत्य सांगावें मज-
प्रती । ह्मणोनि अभय दिधलें हातीं । ऐकोनि चैतन्य सद्गुरूप्रती । प्रतिउत्तर देतसे ॥ ५९ ॥ जैसें बाळक अपराध करि-
त । सक्रोधें जननी त्यासि पुसत । तें भीतभीत मातेसी सांगत । त्यापरी बोलत सद्गुरूसी ॥ १६० ॥ कीं प्रजेनें अनुचित
कर्म केलें । शिक्षा करून रायें पुसिलें । मग भीतभीत बोलती वर्तलें । तैसेंचि झालें चैतन्या ॥ ६१ ॥ नातरी कुपथ्य करी
रोगी जाण । वैद्य पुसे क्रोधायमान । मग व्याधिभयें वर्तमान । सत्य वदे रोगी जैसा ॥ ६२ ॥ कीं कनिष्ठ स्नुषा करि-
तां घरचार । शिक्वणींत पडलें कांहीं अंतर । सासूसी कळतां समाचार । भयेंकरून जेविं सांगे ॥ ६३ ॥ तेविं शाप
देईल यतीश्वर । ह्मणोनि अंतरीं भय थोर । भीतभीत प्रत्युत्तर । सद्गुरूसी देत तेधवां ॥ ६४ ॥ ह्मणे तरुणकांता संतान-
हीन । सत्याचि टाकूनि आलों जाण । श्रीपादें ऐकोनियां वचन । रखुमाबाईस बोलाविलें ॥ ६५ ॥ चैतन्यासि सांगे ते
अवसरीं । निजकांतेचा अंगीकार करीं । स्वदेशा जाऊनि सत्वरीं । स्वधर्माचारीं वर्तावें ॥ ६६ ॥ अविधि कर्माचें भय
मानिसी । विकल्प चित्तीं झणी धरिसी । माझी आज्ञा प्रमाण तुजसी । हृषीकेशी साह्य तुज ॥ ६७ ॥ ऐसा आशीर्वाद
होतां जाण । चैतन्यानें वंदिले चरण । निजकांतेसी हातीं धरून । स्वदेशासी चालिला ॥ ६८ ॥ अगस्तीची आज्ञा
वंदोनि शिरीं । विंध्याचळ पडला पृथ्वीवरी । तेविं सद्गुरूचें वचन मान्य करी । चैतन्य सत्वरीं निघाला ॥ ६९ ॥ क-
न्या जामात दोघेजण । सिधोपंत आले घेऊन । वर्तमान ऐकतां सकळजन । हांसती पिशुन सकळिक ॥ १७० ॥ ह्मण-
ती संन्यास घेतलियावरी । कैसा झाला घरचारी । एक ह्मणती दोष पदरीं । ह्मणोनि विपरीत जाहलें ॥ ७१ ॥ एक ह्म-
णती विषयलंपट । एक ह्मणती कृपण कंटक । एक ह्मणती याचें मुख । पाहूं नये सर्वथा ॥ ७२ ॥ आधीं सुधारस घेऊन ।
मग केलें मद्यपान । तेविं संन्यासदीक्षा त्यागोन । झाला निमग्न प्रपंचीं ॥ ७३ ॥ कीं आधीं वेदांत अभ्यासिले । मग
कोकशास्त्र हातीं धरिलें । तेविं वैराग्य टाकूनि बळें । परतला प्रपंचदुःखांत ॥ ७४ ॥ सांडोनि विष्णूचें उपासन । मग
वेताळ साधूनि केला प्रसन्न । कीं पहिला क्षेत्रवास टाकून । राहिला येऊन कुग्रामीं ॥ ७५ ॥ टाकूनि विप्रांची संगती ।
अनामिकांसी लाविली प्रीती । तेविं वैराग्यलाभ टाकून निश्चितीं । प्रपंचभ्रांतीं पडियेला ॥ ७६ ॥ यापरी निंदिती
सकळ जन । परी चैतन्यासी चित्तीं समाधान । जेविं पर्वतावरी वर्षतां घन । न जाय वाहून कदापि ॥ ७७ ॥ दंदशू-
काचे भयेंकरून । गरुड न जाय जैसा उडोन । कीं श्वान भुंकतां जैसा वारण । उद्विग्न नव्हेची ॥ ७८ ॥ ऐकोनि समु-
द्राची गर्जना । अगस्ती भय न धरी मना । कीं खद्योततेज देखोनि नयना । गभस्ती चिंता न धरीच ॥ ७९ ॥ तेविं ज-

ननिंदेचे येतां लोट । शांति उदरीं भरी घोंट । कामक्रोधांची मोडिली वाट । करणी अचाट निरुपम ॥१८०॥ द्विजीं घातलें वाळीत । आप्तवर्गीं सांडिलें त्वरित । खोपट बांधोनि अरण्यांत । कांतेसहित राहिला ॥८१॥ कुटुंबपोषणाकारण । भिक्षा मागोनि मेळवी अन्न । रात्रंदिवस नामस्मरण । नाहीं खंडन क्षणमात्र ॥८२॥ गीताभागवतश्रवणमनन । अखंड चित्तीं समाधान । ऐसीं द्वादश वर्षें लोटतां जाण । पोटीं संतानें जाहलीं ॥८३॥ तिघे पुत्र कन्या एक । ऐसी संतती होतां देख । ऐकतां नामें सकळिक । होती पावन जडमूढ ॥८४॥ प्रथम अवतार मृडानीपती । त्याचें नाम ठेविलें निवृत्ति । विष्णु अवतार जन्मला क्षितीं । तया ह्मणती ज्ञानदेव ॥८५॥ विरिंची अवतार सोपान । आदिमाया मुक्तारूपें जाण । होतांचि वाटलें समाधान । रखुमाबाईस तेधवां ॥८६॥ पुढिले अध्यायीं सुरस कथा । ते सादर परिसावी सभाग्यश्रोता । जेविं चकोर चंद्रामृत सेवितां । एकाग्रचित्तें पाहती ॥८७॥ नातरी नादलुब्ध मृग होऊनी । देहभान जाय विसरूनी । तयाच रीतीं श्रोतेजनीं । सादर कर्णीं ऐकावें ॥८८॥ कीं तृषा लागतां चातकासी । जलधर वर्षे स्वइच्छेंसी । तेविं आवडी धरूनि चित्तासी । कथा नवरसी ऐकावी ॥८९॥ अहो भक्तकथा अनिर्वाच्यगहन । वदवीतसे रुक्मिणीरमण । जेविं मृदंगांतूनि निघे ध्वन । परी वाजविल्याविण वाजेना ॥१९०॥ तेविं चर्मवेष्टित हें वक्र । परी ग्रंथ वदवी राजीवनेत्र । महीपती उगा निमित्तमात्र । संत सज्ञान जाणती ॥९१॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । अष्टमाध्याय रसाळ हा ॥१९२॥



श्रीगणेशाय नमः । श्रीरुक्मिणीरमणाय नमः । धन्य काल सुदिन आजिचा । जे भक्तचरित्र वर्णिती वाचा । श्रवणीं ऐके तो दैवाचा । प्रेमभक्तीचा अधिकारी ॥१॥ ऐका संतकथेचीं अक्षरें । हृदयीं रिघतां कर्णद्वारें । शांति क्षमा अंगीं संचरे । वैराग्यभरेंकरूनी ॥२॥ कानीं ऐकतांचि हे गोष्टी । भूतदया उपजे पोटीं । विकल्प पळे उठाउठी । ज्ञानदृष्टीं करूनी ॥३॥ ग्रंथसंग्रह करितां घरीं । त्यांचीं विघ्नें पळती दूरी । सुदर्शन घेऊन श्रीहरी । नानापरी रक्षितसे ॥४॥ जे भक्तकथा अखंड गात । तयांसी भेटेल रुक्मिणीकांत । श्रोतयांचे मनोरथ । पूर्ण होतील तत्काळ ॥५॥ मागील अध्यायीं निरूपण । श्रोतीं ऐकिलें सावधान । निवृत्ति ज्ञानदेव सोपान । मुक्ता माया अवतरली ॥६॥ परी निंदा करिती सकळ लोक । ह्मणती यांचें न पहावें मुख । अवकुळीं जन्मले बाळक । लागला कलंक ब्रह्मकर्मा ॥७॥ दिवसेंदिवस जाहले थोर । दिसों लागले उपवर । मायबापांसी विचार । पडला साचार तेधवां ॥८॥ कांता ह्मणे भ्रतारासी । चिंता वाटे निजमानसीं । व्रतबंधदीक्षा पुत्रांसी । द्यावी विप्रांसी पुसोनी ॥९॥ मग ब्रह्मसभा करूनि एके दिनीं । चैतन्य विनवी कर जोडूनी । स्वामी अपराध क्षमा करूनी । परिसा विनवणी दीनाची ॥१०॥ धर्मशास्त्रीं विचारूनि नीत । आह्मांस द्यावें प्रायश्चित्त । ह्मणोनि साष्टांग दंडवत । विप्रांसी घाली तेधवां ॥११॥ तंव ज्येष्ठपुत्र निवृत्ति ह्मणत । तुमचे दर्शनें आह्मी मुक्त । साहीजणांसी प्रायश्चित्त । सांगा त्वरित ये समयीं ॥१२॥ शास्त्रज्ञ पंडित श्रेष्ठ ब्राह्मण । ग्रंथीं पाहती विचारून । देहांतप्रायश्चित्त असे जाण । उपाय आन दिसेना ॥१३॥ मग ह्मणती धरामर । कर्वतीं घालावें शरीर । अथवा गोरांजन अघोर । घ्यावें साचार अनुतापें ॥१४॥ यावांचूनि प्रायश्चित्त आन । बोलिलें नाहीं तुम्हाकारण ॥ ऐसें ऐकोनियां वचन । अनुताप मनीं धरियेला ॥१५॥ नमस्कार करून विप्रांसी । तेथूनि निघाला वेगेंसी । दारा पुत्र कन्या गृहासी । टाकोनियां चालिला ॥१६॥ मागें न पाहेच परतोनी । विप्र आश्चर्य करिती मनीं । ह्मणती अनुतापतीर्थीं न्हावोनी । दुरितें जाळूनि टाकिलीं ॥१७॥ अनुतापाहूनि प्रायश्चित्त । शास्त्रीं बोलिलें नाहीं निश्चित्त । सद्गुरुकृपेनें त्वरित । शुचिर्भूत जाहला कीं ॥१८॥ मग विप्रांसी ह्मणे निवृत्ति । आमुची सांगा कवण गती । कोणता दंड शास्त्ररीतीं । आह्मांप्रती बोलिला ॥१९॥ ऐसें ऐकोनियां वचन । विप्र ह्मणती त्याकारण । आतां प्रतिष्ठानीं जाऊन । शुद्धिपत्र आणावें ॥२०॥ निवृत्ति ह्मणे ब्राह्मणांसी । काय जाऊनि सांगूं त्यांसी । वर्ण याती कुळ आह्मांसी । बोलावयासी ठाव नाहीं ॥२१॥ वैश्य क्षत्रिय ना ब्राह्मण । अविनाश जुनाट पुरातन । निजबोध निघोट स्वरूप जाण । असे आमचें सर्वदा ॥२२॥ नहों आप तेज ना गगन । मही मारुत महत्तत्व जाण । विराटस्वरूप नामाभिधान । आह्मांकारणें न ह्मणवे ॥२३॥ नहों देवगण यक्ष किन्नर । नहों ऋषि ना निशाचर । नहों सगुण निर्विकार । निराकारही न ह्मणवे ॥२४॥ निवृत्ति ह्मणे ज्ञानेश्वरा । आमुची ऐसीच परंपरा ॥ पैठणीं जाऊन द्विजवरां । काय आह्मीं सांगावें ॥२५॥ मग ज्ञानदेवें दिधलें उत्तर । विधीविरुद्ध जो चाले नर । तयासी दूषण सा-

चार । शास्त्रीं विचार बोलिला ॥ २६ ॥ जरी जीवन्मुक्त जाहले ज्ञानी । तरी विहितधर्म न सांडावा त्यांनीं । आणि-
कासि दावावा आचरूनी । साधुजनीं निजांगें ॥ २७ ॥ अविधी जें कां आचरण । तें जाणिजे परम दूषण । ज्याचा
स्वधर्म करावा त्याणें । वेदनारायण बोलिला ॥ २८ ॥ ज्ञानदेव ह्मणे जी निवृत्ति । ऐसी धर्मशास्त्रीं पद्धती । ह्मणोनि
सलगी तुह्मांप्रती । प्रत्युत्तर दीधलें ॥ २९ ॥ यावरी सोपान बोले वचन । याती कुल काय प्रमाण । भक्तीविण श्रीह-
रिचरण । प्राप्त न होती सर्वथा ॥ ३० ॥ दुर्वास वसिष्ठमुनि गौतम । व्यास वाल्मीकि अगस्ति परम । पांडवांचें कुळ
उत्तम । कवणें शास्त्रीं ह्मणितलें ॥ ३१ ॥ उत्तम कुळीं जरी जन्मला । श्रुति अभ्यास उदंड केला । परी भक्तीविण वायां
गेला । शास्त्रीं वंदिला नाहीं तो ॥ ३२ ॥ तरी भक्ति अनुसरे भगवंतीं । उत्तम पाहिजे कासया याती । ऐसें ज्ञानदेवा-
प्रती । सोपानदेव बोलिला ॥ ३३ ॥ यापरी संवाद परस्पर । करूनि दिधलें प्रत्युत्तर । ब्राह्मणांसी करूनि नमस्कार ।
सत्वर तेथूनि निघाले ॥ ३४ ॥ जाऊनियां गोदातीरीं । तीर्थयात्रा संपादिली सारी । मग प्रवेशोनि ब्रह्मपुरीं । नम-
स्कारिलें द्विजवरां ॥ ३५ ॥ ब्राह्मणसभा करूनि श्रेष्ठ । होतें तैसें सांगितलें स्पष्ट। ऐकोनि ह्मणती ब्राह्मण वरिष्ठ । हे
तो भ्रष्ट कळलें कीं ॥ ३६ ॥ पत्र वाचितांचि त्वरित । सकळां वृत्त जाहलें श्रुत । ह्मणती हे संन्याशाचे सुत । यांसी
प्रायश्चित्त चालेना ॥ ३७ ॥ शूद्रासी घालितां गंगास्नान । तो काय होईल शुद्ध ब्राह्मण । खापरासी परीस लागतां
सुवर्ण । नव्हेचि जाण सर्वथा ॥ ३८ ॥ भाजल्या बीजा घालितां जीवन । अंकुरदशेसि नये जाण । आयुष्यहीनासि
औषध देऊन । व्यर्थ कासया पहावें ॥ ३९ ॥ तेविं तीर्थव्रतें प्रायश्चित्त मेळीं । हे शुद्ध नव्हती कदाकाळीं । ऐशी सकळ
विप्रमंडळी । बोलती जाहली तेधवां ॥ ४० ॥ परी एकचि उपाय यांतें । बोलिला असे शास्त्रमतें । तो करितील तरी
यांतें । प्रायश्चित्त कासया ॥ ४१ ॥ श्रीहरीसी जाऊन शरण । सर्वांभूतीं करावें भजन । गोखर गजादि श्वान । समस-
मान वंदावे ॥ ४२ ॥ सूकर आणि अंत्यज याती । एक्याच भावें नमिजेती । ब्रह्मभावना धरूनि चित्तीं ॥ नमन प्रीतीं
करावें ॥ ४३ ॥ ऐसी ऐकूनियां वाणी । निवृत्ति संतोषले मनीं । ज्ञानदेव सोपानालागुनी । परमानंद वाटला ॥ ४४ ॥
ह्मणती जैसें होतें आमुचे चित्तीं । तैसीच निघाली धर्मनीती । मुक्ताबाईस वचनोक्ती । मानली प्रीतीं निजमनें ॥ ४५ ॥
ऐशीं ऐकूनि नामाभिधानें । आश्चर्य मानिलें सर्व ब्राह्मणें । ह्मणती ज्ञानदेव तुह्मांकारणें । किमर्थ आह्मीं वदावें ॥ ४६ ॥
श्रुतीचा अभ्यास केला प्रीतीं । किंवा जाहली पुराणव्युत्पत्ती । ह्मणूनि ज्ञानदेव तुह्मांप्रती । कैशा रीतीं ह्मणावें ॥ ४७ ॥
अंगीं करणी नसतां पाहें । उगेंचि थोर ह्मणूनि काय । स्तनीं दुग्ध नसतां गाय । शिंगाळ काय करावी ॥ ४८ ॥ दृष्टी-
विण नयन थोर । कीं मान्यतेविण धरिला भार । अंगीं पुरुषार्थ नसतां नर । व्यर्थ कासया वाढला ॥ ४९ ॥ भूतदये-
विण ब्रह्मज्ञान । कीं प्रेमाविण गायन । कीं लवणावांचूनि रांधिलें अन्न । रुची नदेच सर्वथा ॥ ५० ॥ शौर्य धैर्य नसतां
अंगीं । कासया जावें रणरंगीं । निष्काम नसतां जगीं । विरक्त कासया ह्मणावें ॥ ५१ ॥ परस्परें बोलती वचन । ना-

वापाशीं काय कारण । तंव एक ह्मणे पखाल घेऊन । महिषीपुत्र येतसे ॥ ५२ ॥ त्याचेंही नाम ठेविलें ज्ञान । ऐसें ऐ-
कोनियां विप्रवचन । ज्ञानदेव ह्मणे कर जोडून । माझें वचन अवधारा ॥ ५३ ॥ रेडिया आणि आह्मांत कांहीं । भेद
पाहतां किंचित नाहीं । आत्मा व्यापक सर्वां देहीं । भूतमात्रीं सारिखा ॥ ५४ ॥ अनंत घट भरिले जीवनीं । तितुक्यांत
बिंबला वासरमणी । तैसा व्यापक चक्रपाणी । भूतमात्रीं सारिखा ॥ ५५ ॥ अठराभार वनस्पति देख । एकचि जळ मूळीं
व्यापक । तैसाचि तो रमानायक । भूतमात्रीं सारिखा ॥ ५६ ॥ कीं एकचि सुवर्ण साचार । परी भिन्न दिसती अलंकार ।
तैसा व्यापक श्रीधर । भूतमात्रीं सारिखा ॥ ५७ ॥ कीं एकाचि तंतूची विणणी । वस्त्रें दिसती भिन्नपणीं । तैसाची व्यापक
चक्रपाणी । भूतमात्रीं सारिखा ॥ ५८ ॥ ऐकूनि बोलती ब्राह्मण । वायां करिसी वाचाळपण । महिषासि आसुड घे-
ऊन । क्रोधेंकरून मारिती ॥ ५९ ॥ तंव थरथरां कांपे ज्ञानेश्वर । वळ उमटले पाठीवर । ऐसें देखोनि द्विजवर । काय
उत्तर बोलती ॥ ६० ॥ रेडिया तुह्मां नाहीं भेद । तरी याचे मुखीं बोलवा वेद । ऐकूनि द्विजवरांचा शब्द । भक्त अभेद का-
य करी ॥ ६१ ॥ महिषापाशीं येऊनि सत्वर । त्याचे मस्तकीं ठेविला कर । ह्मणे ऋग्वेद बोलोनि सत्वर । धरामर तोषवावे
॥ ६२ ॥ ऐसें बोलतां त्वरित । नवल वर्तलें अतिअद्भुत । न्यायपूर्वक श्रुति बोलत । महिषीपुत्र तेधवां ६३ चारी वेद बोलो-
नि मुखीं । सकळ ब्राह्मण केले सुखी । ऐसें कौतुक मृत्युलोकीं । नाहीं कोणीं देखिलें ॥ ६४ ॥ अमृत जातां रोगियापो-
टीं । व्याधी पळे उठाउठी । कीं कामधेनूचे कृपादृष्टीं । दरिद्र कष्टी करीना ॥ ६५ ॥ अंधासि सूर्य प्रसन्न जाहला । तरी
काय एक न दिसे त्याला । कीं सरस्वतीनें मूकयाला । वर दीधला कृपेनें ॥ ६६ ॥ कीं प्रसन्न होतां गणपती । चौदा वि-
द्या करतलामल होती । कीं मृडानीवराचे संगतीं । योग साधिती अष्टांग ॥ ६७ ॥ तेविं ज्ञानदेवाचे वरदहातीं । रेडा
निजमुखें वदला श्रुती । सकळ ब्राह्मण आश्चर्य करिती । अनुताप चित्तीं धरूनी ॥ ६८ ॥ आह्मीं पढलों वेदांत । उपनिष-
दादि भाग समस्त । परी अंगीं ऐसें सामर्थ्य बहुत । ईश्वरें नाहीं दीधलें । ६९ । देखिलें ऐकिलें नव्हतें कोणी । तें साक्षात्
आजि दाविलें नयनीं । सृष्टींत अघटित वर्तली करणी । जेविं विरंचीपासूनि घडेना ॥ ७० ॥ हे तिनी देवांचे अवतार
पाहीं । आदिमाया ते मुक्ताबाई । यांसि प्रायश्चित्त नचले कांहीं । जेविं गंगेस नाहीं विटाळ ॥ ७१ ॥ आह्मीं आणिकां-
सि सांगूं बहुत । परी आपण नाचरों यथार्थ । धन मान इच्छितां जनांत । जन्म व्यर्थचि दवडिला ॥ ७२ ॥ यांसारिखे
ब्राह्मण थोर । सृष्टींत न देखों साचार । ऐसें समस्त द्विजवर । ह्मणते जाहले तेधवां ॥ ७३ ॥ धन्य यांची मातापिता ।
सुकृतें आचरलीं उभयतां । यापरी नवल करून चित्ता । विप्र निवांत राहिले ॥ ७४ ॥ यावरी ज्ञानदेव बोलत । स्वामि
हें तुमचेंचि सामर्थ्य । आह्मीं तो अज्ञान यथार्थ । चरणप्रताप तुमचा ॥ ७५ ॥ पैठणींचे जन समस्त । सप्रेमभावें
वेधले बहुत । ह्मणती धन्य वैष्णव भक्त । संसारीं विरक्त सर्वदां ॥ ७६ ॥ नित्य करूनि गंगास्नान । वेदांतव्याख्या पुराण-
श्रवण । रात्रीं होत हरिकीर्तन । करिती श्रवण सकळिक ॥ ७७ ॥ चमत्कार देखोनि अद्भुत । मान्य करिती जन समस्त ।

ऐसें होतां दिवस बहुत । नवल अद्भुत वर्तलें॥७८॥निवृत्ति ज्ञानदेव मुक्ताबाई । राहिलीं होतीं जयाठायीं । तेणें पितृश्रा-
द्ध लवलाहीं । एके दिवशीं आरंभिलें ॥७९॥ द्विजांसि देतां आमंत्रण । विप्र ह्मणती त्याकारण । यतीश्वराचीं मुलें जा-
ण । तुवां ठेविलीं निजगृहीं ॥ ८० ॥ याकरितां तुझिया घरासी । आह्मी न येऊं भोजनासी । वचनें ऐकूनियां ऐशीं । नि-
जमानसीं चिंतावला॥८१॥घरास येऊन त्वरेनें । उगाचि बैसला उद्विग्नमनें । मग ज्ञानदेव त्याजकारणें । वर्तमान पुस-
तसे ॥८२॥ ह्मणे आजि कां चिंताक्रांत । उगेंचि बैसलां निवांत । ऐसी ऐकूनियां मात । विप्र बोलत तेधवां ॥८३ ॥ ह्मणे
आजि वडिलांची पुण्यतिथ । विप्र भोजनासी नाहीं येत । ह्मणूनि उद्विग्न जाहलें चित्त । उगाचि निवांत बैसलों॥८४॥
ज्ञानदेव ह्मणे विप्रासी । चिंता न करावी निजमानसीं । साक्षात पितर भोजनासी । येथें येतील तत्काळ॥८५॥तुह्मीं स्व-
स्थ करूनि चित्त । मंदिरीं करा पाक निश्चित । ऐसी ऐकूनियां मात । आश्चर्य वाटलें तयासी॥८६॥मग स्नानसंध्या सा-
रून । शुचिष्मंत जाहला जाण । नानापरींचीं पक्वान्नें करून । पात्रें वाढूनि सिद्ध केलीं ॥८७॥ ज्ञानदेवें टाकूनि अक्षत ।
पितर आणिले साक्षात । पादपूजा करूनि त्वरित । मुख्यासनीं बैसविले॥८८॥ वस्त्रें भूषणें अलंकार । तुळसीपत्रें सुमन-
हार । द्वादशटिळे यज्ञोपवीत सुंदर । हिरण्य दक्षिणा दीधली ॥८९॥ ऐशा उपचारेंकरून पूजा । धूप दीप अर्पिला वो-
जा । देखोनि नवल वाटलें द्विजां । आश्चर्य करिती मनांत ॥९०॥ पितृस्वरूपी जनार्दन । ऐसा संकल्प सोडितां जाण ।
साक्षात पितर जेविती अन्न । प्रीतीकरूनि तेधवां ॥ ९१ ॥ रुचीस पडे तें सेविती । तृप्त जाहली सकळ पंक्ती । करशुद्धी
देऊनि तयांप्रती । तांबूल दक्षिणा समर्पिली॥९२॥स्वस्थाने वास ह्मणतां जाण । अदृश्य झाले पितृगण । पैठणींचे सकळ
ब्राह्मण । परस्परें बोलती॥९३॥ह्मणती ज्ञानदेवें नवल केलें । साक्षात पितर जेवविले । मृत्युलोकीं हें कौतुक भलें । देखि-
लें ऐकिलें नाहीं कीं ॥९४ ॥ कर्मठपणाचा अभिमान । धरूनि टाकिलें आमंत्रण । तों अंगेंचि येऊन पितृगण । दक्षिणा
घेऊन गेले कीं ॥९५॥ जैसा नीलग्रीवें नैवेद्य खादला । उगाच गुरव निवांत राहिला । तैसें आजि आपणाला । झालें ऐसें
वाटतें ॥९६॥ कीं सूर्यप्रतिमा अंगेंचि येऊनी । वासरमणी गेला घेऊनी । ज्योतिषी आशावंत मनीं । लाळ घोंटीत रा-
हिला ९७ कीं यज्ञाजवळील दानबळ । घेऊनि गेला क्षेत्रपाळ । भांडारी करी तळमळ । नचले बळ तयाचें ९८ कीं अं-
गेंचि येऊन इंद्रादिगण । गेले होमद्रव्य घेऊनि । उगाच राहिला कृशान । तैसेंचि झालें आपणांसी।९९।साक्षात पिशा-
च येऊन । घेऊनि गेले जैसें सांडण । पंचाक्षरी अलाभ मानून । क्षुधातुराचि राहिला ॥ १०० ॥ तेविं हिरण्यदक्षिणा प-
क्वान्नें । घेऊनि गेले पितृगण । आपण धरिला अभिमान । नाडलों तेणें सर्वस्वें ॥ १ ॥ धन्य हा निवृत्ति ज्ञानेश्वर । धन्य
सोपान वैष्णव थोर । आदिमायेचा अवतार । मुक्ताबाई साक्षात ॥ २ ॥ हे देवत्रय मूर्तिमंत । यांसी नचले प्रायश्चित्त ।
कीं जगद्गुरु देहातीत । जीवन्मुक्त असती हे ॥३ ॥ पत्र लिहून ऐशा रीतीं । दिधलें सोपानाचे हातीं । महिषीपुत्र वदला
श्रुती । तैसीच रीती हे असे ॥ ४ ॥ लोहदंडासि परिस लागतां जाण । तो अक्षयी झाला कनकवर्ण । तैसाच रेडा वेदांत-



ज्ञान । अहोरात्र वदतसे ॥५॥ ध्रुवा दिधलें अढळपद हरीनें । कदा नचळे त्याचें आसन । तेविं महिषीपुत्रास अक्षय ज्ञा-
न । ज्ञानदेवें दीधलें ॥६॥ क्षीरसागरीं बसविला उपमन्य । तो अखंड करी पयःपान । तेविं महिषीपुत्र मुखेंकरून । अ-
खंड निगम वदवीतसे ॥७॥ कीं योगी बैसले वज्रासनीं । ते सेवीत अखंड उन्मनी । तेविं महिषीपुत्र प्रेमेंकरूनी । वेदांत-
ज्ञानीं निमग्न ॥ ८ ॥ ऐसें जाणोनि ज्ञानेश्वर । निवृत्तीसी करिती विचार । महिषाचें ज्ञान अनिवार । कर्ममार्ग बुडवील
हा ॥९॥ श्रुतीचे गर्भ गुप्त असती । ते स्पष्ट सांगेल लोकांप्रती । उडवील कर्मठांची भ्रांती । मग राहती यज्ञमार्ग॥११०॥
ऐसें सांगूनि निवृत्तीसी । नमस्कार केला ब्राह्मणांसी । रेडा मागूनि तयांपाशीं । पुसोनि विप्रांसी निघाले ११ गांवाबा-
हेर निघतां जाण । बोळवीत चालिले ब्राह्मण । अश्रुपातें भरले नयन । देती क्षेम प्रीतीनें॥१२॥सद्गद होऊनियां चित्तीं ।
एकमेकांतें उत्तर बोलती । ह्मणती ज्ञानेश्वराचे संगतीं । उत्तम काळ क्रमियेला॥१३॥एक अर्धकोशपर्यंत । नरनारी आ-
ल्या बोळवित । तयांसि ज्ञानेश्वर विनवित । परतोनि जावें मंदिरा १४ मागुती करून नमस्कार । मग परतले नारीनर ।
निवृत्ति सोपान ज्ञानेश्वर । आणि बहीण मुक्ताबाई ॥ १५ ॥ मार्गीं चालती स्वानंदभरित । सप्रेम हरीचे गुण वर्णित ।
नानापरी चातुर्यकवित । नवरस उत्पत्ति करिताती ॥१६॥ महालय क्षेत्रीं येऊनी । वास्तव्य केलें तये स्थानीं । प्रवरा-
तीर्थीं स्नान करूनी । मोहनीराजासि भेटले ॥ १७॥ तेथें गीतेवरी प्राकृत टीका । ज्ञानेश्वरी केली देखा । जडमूढ अ-
ज्ञानां सकाळिकां । मार्ग सोपा दाविला ॥ १८॥ आधींच कनक सोज्वळ जाण । त्यावरी केलें रत्नकोंदण । कीं धान्या-
चें रांधिलें पक्वान्न । रसने रुची कळावया ॥ १९ ॥ कीं सुवर्णाचे अलंकार केले । ते सुंदरा अंगीं जैसे शोभले । कीं सूक्ष्म
बीज विस्तारलें । फळीं फुलीं शोभत ॥ १२० ॥ कीं कल्पतरूची महिमा होती गुप्त । ती कल्पनेनें केली सुशोभित । कीं
पूर्ण कळेनें अमृत वर्षत । चकोरांप्रती चंद्रमा ॥२१॥ तेविं गीतेचा अर्थ सखोल गहन । त्यावरी केलें प्राकृत लेखन । स-
ज्ञान प्रेमळ भाविक जन । तयांस ज्ञानी व्हावया ॥ २२ ॥ तंव सद्गुरुनाथ निवृत्ती । ज्ञानदेवासि ह्मणती निजप्रीतीं ।
आपुले स्वबुद्धीचिये मतीं । अमृतानुभव करावा ॥ २३ ॥ अवश्य ह्मणोनि तयेक्षणीं । मस्तक ठेविला सद्गुरुचरणीं ।
मग स्वात्मबुद्धीनें विचारुनी । अमृतानुभव ग्रंथ केला ॥ २४ ॥ विरिंचीचा अभिमान व्हावया गलित । गोवत्सें नि-
र्मी कृष्णनाथ । तेविं अहंबुद्धि पाखांडी जल्पत । अनुभवामृत त्यासाठीं ॥ २५ ॥ मग आदिशक्ती ह्माळसेप्रती । नम-
स्कारूनि निजप्रीतीं । स्वदेशा जावया निश्चितीं । तेथून सत्वर निघाले ॥ २६ ॥ मार्गीं चालतां चौघेजण । सप्रेम क-
रिती नामस्मरण । रात्रीं नगरांत उतरून । हरिकीर्तन करिताती ॥ २७ ॥ मायाममता मानापमान । सांडोनि देहाचा
अभिमान । ब्रह्मादि पिपीलिकादीकरून । लेखिती समान समदृष्टीं ॥ २८ ॥ मार्गीं चालतां एके दिनीं । उतरले आ-
ळंदीचिये वनीं । वेद वदला तो तयेस्थानीं । पशु शांत जाहला ॥ २९ ॥ तयासि बैसवून समाधी । पावविला सायुज्य-
पदीं । संत दयाळु कृपानिधी । अभयवरदी सर्वदा ॥ १३० ॥ मग समाधीचें करूनि पूजन । त्यावरी केलें सिंदूरलेपन ।

ह्मसोबा ऐसें नामाभिधान । अद्यापि स्थान आहे तें ॥ ३१ ॥ अलकापुरीस जावयासी । तेथोनि निघाले वेगेंसी । मु-
क्ताबाई ह्मणे निवृत्तीसी । जन्मभूमीसी पहावें ॥ ३२ ॥ आळंदीसी येतां जाणा । आनंद वाटला सकळजनां । प्रेमभावें
वंदिती चरणां । क्षेमालिंगन देताती ॥ ३३ ॥ प्रतिष्ठानीं झाला वृत्तांत । तो आधींच लोकांसि होता श्रुत । सोपानदेवें
दाखविलें पत्र । ऐकूनि विस्मित सकळिक ॥ ३४ ॥ पत्रीं लिहिलें साचार । हे तिघे देवांचे अवतार । ऐसें ऐकूनि द्विज-
वर । तटस्थ झाले मानसीं ॥ ३५॥ पैठणींचें पत्र ऐकोन । मान्य करिती सकळ ब्राह्मण । जेविं बृहस्पतीचे आज्ञेंकरून ।
इंद्रादिदेव वर्तती ॥ ३६॥ कीं श्रीव्यासमुखींचें पुराण प्रमाण । मानिती पंडितजन । कीं सच्छिष्य गुरुआज्ञेंकरून । अ-
ध्यात्मज्ञान अभ्यासी ॥३७॥ कीं समीर जैसा धांवे जिकडे । मेघही तैसा पडे तिकडे । कीं मनासि लागली ज्याची चा-
ड । इंद्रियें तैसींच राहाटती ॥ ३८॥ कीं वासरमणी जिकडे जाय । आदित्यवृक्ष तैसाचि होय । कीं ओघाऐसें जीवन
पाहे । धांवत जाय चपळत्वें ॥ ३९ ॥ समीर जाय ज्या दिशेप्रती । पताका तिकडेच फडकती । गायनाऐसींच वाद्यें वा-
जती । अवसानगती टाकूनी ॥१४०॥ तेविं प्रतिष्ठानकरांचे अनुमतें । ब्राह्मण वंदिती तयांतें । तिन्ही देव अवतरले सत्य ।
ऐसें बोलती परस्परें ॥४१॥ सप्रेम करितां हरिकीर्तन । श्रवण करिती सकळ जन । ह्मणती हे आह्मांकारण । अवतरले स-
द्गुरू ॥४२॥ तंव एक विसोबाचाटी ह्मणून । बहु कुटिल होता ब्राह्मण । तो या चौघांजणांकारण । रात्रंदिवस निंदीतसे ४३
ह्मणे हे संन्याश्याचे पुत्र । यांचें न पहावें वक्त्र । ऐसें ह्मणोनि अहोरात्र । निजमानसीं जल्पतसे ॥ ४४ ॥ पतंग जेविं स्व-
भावरीतीं । विझवूं पाहे दीपकाप्रती । कीं खद्योत ह्मणे हा गभस्ती । नाहीं ऐसाचि करीन ॥४५॥ कीं प्रल्हादासी देखतां न-
यनीं । हिरण्यकशिपू जल्पे मनीं । कीं धर्माची कीर्ति ऐकूनि कानीं । दुर्योधन मनीं संतापे ॥४६॥ कीं रामप्रतापाची ऐक-
तां मात । दशकंठ जेविं संतापत । कीं ग्रंथ देखतां प्राकृत । द्वेषें पंडित निषेधिती ॥४७॥ कीं संपूर्ण देखतां निशापती । तस्कर
त्याची हेळणा करिती । कीं सहदेवमतासी हेळसिती । द्वेषेंकरून ज्योतिषी ॥४८॥ त्याचपरी विसोबाचाटी । अखंड पा-
हे क्रोधदृष्टीं । कोठें पडतां दृष्टादृष्टीं । होतसे कष्टी हे देखोनी ॥४९॥ ह्मणे हे संन्याश्याचे बाळक । यांचें कदा न पहावें मु-
ख । दृष्टादृष्टी होतां देख । आपणाऐसे करितील ॥१५०॥ तंव कोणे एके काळीं । सण आला दिपवाळी । निवृत्तिदेव तेवे-
ळीं । मुक्ताबाईस बोलिला ॥५१॥ ह्मणे उत्तम मांडे करूनी । भोजन घालीं आह्मांलागुनी । अवश्य ह्मणोनि तेक्षणीं । शि-
धा साहित्य आणिलें ॥५२॥ मांडेरांधणें आणावयासी । जातसे कुलालशाळेसी । मार्गीं जातां दृष्टीसी । विसोबा अव-
चित देखिला ।५३। भेणें भेणें ते समयीं । आड लपाली मुक्ताबाई । येरू धांवूनि लवलाहीं । तिजकारणें बोलत ।५४। ह्मणे
कवण्या कार्यासि धांवत । जातीस हें मज सांग त्वरित । मुक्ताबाई ऐकूनि मात । चळचळां कांपत तेधवां ॥ ५५ ॥ जैसा
वारण देखतां दृष्टीं । कमळिणीस भय उपजे पोटीं । कीं ससाणा देखतां दृष्टीं । कोकिळा कांपे थरथरां ।५६। कीं हरीणी
वनांत धुंडितां जीवन । दृष्टीस व्याध देखिला दुरून । कीं गौतमी देखतां पंचानन । भयें कांपत चळचळां ।५७। तेविं भ-



य पावूनि अपार । तयासि देत प्रत्युत्तर । कुलालशाळेसि सत्वर । जातें खापर आणावया ।५८। मांडे करावया त्वरित ।
आज्ञा केली निवृत्तिनाथें । ऐसी ऐकूनियां मात । विसोबा हांसत तेधवां ॥५९॥ मुक्ताबाईस करूनि ताडन । कुलाला-
सि सांगे जाऊन । खापर देशील इजलागून । तरी शिक्षा करीन तुज आतां ॥ १६० ॥ माझें द्रव्य आहे तुह्मांवर । तें आ-
तांच मागेन सत्वर । वचन ऐकून चिंतातुर । कुलाल जाहला तेसमयीं ॥ ६१॥ कोठें प्राणांश नसतां जाण । संसारीं लो-
कांचें द्रव्य देणें । शरीरीं रोग जाहला दारुण । तरी ईश्वरक्षोभ जाणावा ॥६२॥ गृहस्थाश्रमीं दरिद्र देख । कीं वृद्धपणीं
होय पुत्रशोक । पूज्यस्थानीं निंदिती लोक । तरी देवक्षोभ जाणावा ॥६३॥ अभ्यास केला जन्मवर । समयीं नाठवे प्र-
त्युत्तर । विकल्प चित्तीं उठती फार । तरी ईश्वरक्षोभ जाणावा ॥६४॥ वैरियां सांपडे आपलें वर्म । त्याचसारिखे बोल-
ती सकळ जन । चित्तीं संताप वाढतां जाण । तरी ईश्वरक्षोभ जाणावा ॥६५॥ अन्नावांचूनि कुटुंबवत्सल । प्रवासी करी
तळमळ । घरीं कांता करी हळहळ । तरी देवक्षोभ जाणावा ॥ ६६ ॥ वृद्धपणीं गात्रें विकळ । पुत्र न घेती समाचार सक-
ळ । कांता करीतसे तळमळ । तरी ईश्वरक्षोभ जाणावा ॥६७॥ असो बहुत काय व्युत्पत्ती । ज्यांचें कर्म तेंचि भोगिती ।
विसोबाची ऐकून वचनोक्ती । कुलाल उगाचि राहिला ॥६८॥ तों मुक्ताबाई येऊन तेथ । कुलालासी वचन बोलत ।
मांडे करावया त्वरित । खापर देईं आह्मांसी ॥६९॥ कुलाल ह्मणे ते अवसरीं । रांधण नाहीं आमुचे घरीं । आवा भाज-
लियावरी । घेऊन जाईं सत्वर ॥१७०॥ ऐसें ऐकोनि निजमाया । आश्रमा आली परतोनियां । चिंताक्रांत होऊनियां ।
करुणस्वरें रडतसे ॥ ७१ ॥ तों स्नान करून सत्वर । मठा आले ज्ञानेश्वर । मुक्ताबाईचा करुणस्वर । श्रवणीं अवचित प-
डियेला ॥ ७२ ॥ ज्ञानदेवें धरून पोटासी । करें कुरवाळूनि भगिनीसी । ह्मणे किमर्थ कष्टी होसी । सांग मजपाशीं
सत्वर ॥ ७३ ॥ ह्मणे मांडेरांधणें आणावयासी । जात होतें कुलालगृहासी । तों विसोबा मार्गीं भेटोनि मजसी । ताड-
न केलें सक्रोधें ॥ ७४ ॥ त्याणेंच सांगितलें कुलालासी । कीं खापर न द्यावें मुक्ताईसी । मग मी येऊन आश्रमासी ।
शोक करीत बैसलें ॥ ७५ ॥ मज आज्ञा केली निवृत्तिनाथें । आजि मांडे करावे स्वहस्तें । ह्मणोनि बैसलें चिंताक्रांत ।
कैसी मात करावी ॥ ७६ ॥ तंव विसोबाचाटी बाहेरून । गवाक्षद्वारें पाहे दुरून । साकल्य ऐकावया वर्तमान । उभा
ठाके बाहेरी ॥ ७७ ॥ मग ज्ञानदेव ह्मणे मुक्ताबाईसी । व्यर्थ तूं कां चिंता करिसी । आह्मीं त्याचे स्वभावासी । काय
उपाय करावा ॥ ७८ ॥ मग योगधारणा करूनी । ज्ञानदेवें पेटविला पंचाग्नी । ज्वाळा निघती मुखांतूनी । आरक्त न-
यन दीसती ॥७९॥ जांबूनदतप्तसुवर्ण । तैसी पाठ आरक्तवर्ण । विसोबा बाहेर उभा राहून । कौतुक दृष्टीं पहात ॥१८०॥
मग मुक्ताबाईस ह्मणे ज्ञानेश्वर । मांडे करावे पाठीवर । तिणें साहित्य आणोनी सत्वर । लाटिले अरुवार तेधवां ॥८१॥
क्षण एक न लागतां जाण । मांडे सिद्ध केले तिणें । ज्ञानदेवें जठराग्न । शांत केला तेकाळीं ॥८२॥ स्वानंदताटीं साचा-
र । सप्रेमभक्तीचें वाढिलें क्षीर । शांतिसुख तेंचि साखर । गोडी अपार जयेची ॥८३॥ त्यांत स्वानुभवाचे मांडे चु-

रून । चौघें बैसलीं समागमें जाण । निवृत्ति ज्ञानदेव सोपान । चौथी बहिण मुक्ताबाई ॥ ८४ ॥ श्रीहरि भोक्ता ह्मणू-न । ग्रास घेती अवघेजण । विसोबा बाहेर उभा राहून । कौतुक दृष्टीं पहातसे ॥८५॥ अनुताप धरून चित्तीं । ह्मणे ह्या केवळ ईश्वरमूर्ती । म्यां व्यर्थ छळिलें यांप्रती । विचार चित्तीं न केला ॥ ८६॥ रत्न हिरे यांची लागली खाणी । ते मज भासले काचमणी । घेऊन विकल्पाची गोफणी । चिंतामणीच झोंकिला ॥८७॥ कल्पतरूचें देखोनि झाड । हिवर ह्मणोनी लाविली कुन्हाड । अमूल्य हिरे आंधळ्यापुढें । दगडासारिखे तयासी ॥८८॥ कुपींत घातलें गंगाजीवन । उन्मत्तासि भासलें मद्यपान । कीं जवळ येतां निधान । दिसे कृशान निर्दैवा ॥८९॥ श्रीकृष्ण परब्रह्म अवतार जाणा । दुर्योधन ह्मणे आमुचा मेहुणा । तेविं म्यां विकल्प धरून मना । व्यर्थ छळणा केली कीं ॥ १९० ॥ ऐसा अनुताप धरू-न । ह्मणे आतां यांस जावें शरण । बळें उच्छिष्टप्रसाद भक्षून । आपुलें स्वहित करावें ॥ ९१ ॥ ऐसें ह्मणोनियां त्वरित । धांवत आला आश्रमांत । जेवीत बैसले होते जेथ । आला त्वरित त्या ठायां ॥ ९२ ॥ ज्ञानदेवें तयेक्षणीं । ताट ठेविलें लपवोनी । येणें बळेंचि झडप मारूनी । ग्रास उचलूनि घेतला ॥ ९३ ॥ मुखांत घालितां सत्वर । काय बोलती ज्ञानेश्व-र । तूं कां होसीगा खेचर । सर परता वेगेंसी ॥९४॥ ऐसी ऐकूनियां वाणी । हाचि उपदेश धरिला मनीं । परापश्यंती-मध्यमेहुनी । वैखरीपरता सरतसे ॥ ९५ ॥ चहूं वाचातीत जें असे । तेथें मिळाला समरसें । अविद्येचें काळवसें । समूळ गेलें तेधवां ॥ ९६ ॥ नाद निघाला घंटेंतून । तयेच स्थानीं जाहला लीन । तेविं स्वरूपीं समरस होऊन । अभिन्नप-णें राहिला ॥ ९७ ॥ मग जोडूनियां दोनी कर । मस्तक ठेविला चरणावर । ज्ञानदेवें जाणोनी अंतर । अभय वर दीधला ॥ ९८ ॥ होतां नारदाचें दर्शन । वाल्मीकें टाकिला तामस गुण । तेविं ज्ञानदेवाचे संगतीकरून । सात्विक लक्षण आलें कीं ॥ ९९ ॥ सर परता खेचरा ऐसें । ज्ञानदेवें ह्मणितलें तयास । विसोबाखेचर नाम त्यास । तैंपासून ह्मणताती ॥ २०० ॥ पुढें कथा अतिसुरस । श्रोतीं परिसावी सावकाश । श्रवणीं पडतां सकळ दोष । जाती उदास होऊनी ॥ १ ॥ जैसा उगवतां वासरमणी । तिमिर जाय मावळोनी । तेविं भक्तविजय पडतां श्रवणीं । अविद्या हरपोनी जातसे ॥ २ ॥ कीं लोहालागीं परिस लागतां जाण । नामरूप पालटे न लागतां क्षण । तेविं भक्तकथा करितां श्रवण । प्रपंचभान जातसे ॥ ३ ॥ त्यांचीं चरित्रें अनिर्वाच्य जाण । वदविता श्रीरुक्मिणीरमण । महि-पतीस आलें पाईकपण । निमित्तकारण व्हावया ॥ ४ ॥ स्वस्तिश्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । नवमाध्याय रसाळ हा ॥ २०५ ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीरुक्मिणीकांताय नमः । आजि दैवदशेसि जाहला उदय । जें श्रवणीं ऐकिला भक्तविजय । हा आ-नंद वाचेसी बोलतां नये । सांगूं काय निजमुखें ॥ १ ॥ कल्पतरु उगवला अंगणी । तया फळें आलीं चिंतामणी । कीं सुधा-रस वर्षला घनीं । मेदिनीवरी अपार ॥ २ ॥ कीं द्वादश तरणी एक वेळे । शीतळ होऊन उदया आले । कीं सकळ सरिता अ-मृतजळें । वाहूं लागल्या पृथ्वीवरी ॥ ३ ॥ कीं हिरे रत्नें चिंतामणी । एकसरें उघडली खाणी । लुटाची हे सभाग्य नरांनीं । आळस समूळ दवडोनियां ॥ ४ ॥ कीं हिरेरत्नांसारिखी जाण । वाळूचि जाहली नलगतां क्षण । कीं बरडगोटे चिंतामण । परी अभंग जाहलेकीं ॥ ५ ॥ संकल्प विकल्प नाना परी । तें दरिद्र पळोनि गेलें दूरी । ह्मणोनि प्रेमामृतलहरी । प्राप्त जाहली श्रोतयां ॥ ६ ॥ अमृताहूनि विशेष जाण । प्रेमामृत वाटे मजकारण । जे अमर करिती अमृतपान । ते वांच्छिती प्रेमामृत ७ अमृतपान देव करिती । तेही कल्पांतीं नाश पावती । परामृत जे सेविती । ते अक्षयी होती चिरंजीव ॥ ८ ॥ ह्मणूनि अवधा-न करूनि प्रबळ । कथा ऐका भक्तप्रेमळ । श्रवणीं पडतां दोष सकळ । विलया जाती क्षणार्धें ॥ ९ ॥ तंव कोणे एके दिवशीं । ज्ञानदेव आले पंढरीसी । इच्छा धरिली निजमानसीं । नामदेवासी भेटावें ॥ १० ॥ मंदिरीं प्रवेशतांचि जाण । दुरून देखि-लें नामयानें । साष्टांग घातलें लोटांगण । प्रेमेंकरून भेटले ॥ ११ ॥ यथोपचारेंकरून पूजा । ह्मणे भाग्योदय आजि जाह-ला माझा । ह्मणोन ज्ञानियांचा राजा । आश्रमा आला निजकृपें ॥ १२ ॥ कीं पूर्वपुण्य फळासि आलें । साक्षात पांडुरंग भे-टले । संसारकर्मीं जे गुंतले । मोहें मातले जड जीव ॥ १३ ॥ त्यांचा करावया उद्धार । स्वामींनीं घेतला अवतार । ऐसें ह्म-णूनि नमस्कार । पुनः साष्टांग घातला ॥ १४ ॥ ज्ञानदेव ह्मणे नामयास । तुझें भाग्य असे विशेष । अखंड सन्निध हृषीकेश । पार भाग्यासी न देखों ॥ १५ ॥ प्रेमसुखगोडी तुज फावली । आशातृष्णा हे मावळली । तूं जन्मलासि ज्याचे कुळीं । वंशा-वळी पवित्र ते ॥ १६ ॥ कांहीं एक जीवींचें गुज । ऐकशील तरी सांगेन तुज । नामयासी हातीं धरून सहज । अंतरमंदिरीं पैं नेलें ॥ १७ ॥ ह्मणे जीवन्मुक्त जाहलिया पावन । न सांडिजे गुरु देव तीर्थभजन । भूतळींचीं तीर्थें संपूर्ण । तुझिया संगतीनें पहावीं ॥ १८ ॥ ऐसा हेत धरून चित्तीं । तुझे भेटीस आलों प्रीतीं । माझे मनोरथ पूर्ण होती । किंवा न होती मज सांग ॥ १९ ॥ ऐसें वचन ऐकूनी । नामा उद्विग्न जाहला मनीं । ह्मणे पंढरीक्षेत्र टाकूनी । तीर्थाटनीं कां जावें ॥ २० ॥ सुधारस लवंडोनि दूरी । कांजी मागावी घरोघरीं । कीं अमूल्य टाकूनि कस्तूरी । राख पदरीं कां घ्यावी ॥ २१ ॥ कल्पतरुच्छाया टाकून । कासया पहावें शिंदीवन । पात्रीचें सांडोनि पक्वान्न । गलितपत्रें कां खावीं ॥ २२ ॥ राजहंस दवडोनियां दूरी । कासया काग आणावे घरीं । हिरे रत्नें टाकूनि पदरीं । वाळू कासया भरावी ॥ २३ ॥ टाकूनियां सामगायन । कासया ऐकावें डफ-गान । कामधेनूसी दवडून । अजा कासया आणावी ॥ २४ ॥ ऐसा निश्चय मनें करून । मग ज्ञानदेवासी बोले वचन । मीं नाहीं आपुल्या स्वाधीन । ह्मणूनि चरण वंदिले ॥ २५ ॥ पाळिलों पोशिलों जयाचा । काया वाचा ह्मणवितों त्याचा । जो प्राणवल्लभ रुक्मिणीचा । पुंडलीकाचा वरदानी ॥ २६ ॥ मी सर्वभावें तया आधीन । तुह्मीं पुसावें त्यास जाऊन । आज्ञादी-

धल्या मजलागून । मानीन वचन तयाचें ।२७। ज्ञानदेव ह्मणे नामयासी । तुझा भाव कळला मजसीं । चतुर सर्वज्ञ उदार होसी । भक्तिज्ञानाचा आगरू ।२८। मग आलिंगन देऊनि सत्वर । नामयाचा हातीं धरिला कर । ह्मणे राउळासि जाऊन सत्वर । आज्ञा मागूं उभयतां॥२९॥नामयासि घेऊन ते अवसरीं । ज्ञानदेव आले महाद्वारीं । लोटांगण गरुडपारीं । प्रेमभावें घातलें ॥३०॥ मग अंतरगाभारां येऊन । विटेवरी देखिले नारायण । देवासि देऊनि आलिंगन । वंदिले चरण सद्भावें ।३१। मनींचा भाव होता पोटीं । तो देवासि सांगे गुजगोष्टी । वचन ऐकून जगजेठी ।हांसों लागले तेधवां ।३२। ज्ञानदेवासि ह्मणे घननीळ । तूं चिद्रूप आहेस केवळ । स्फटिकाऐसा होसी निर्मळ । सर्व संगासी अलिप्त ॥ ३३ ॥ तूं आत्मरूप साक्षात जाण । तुज कासया तीर्थाटन।सूर्याचे अंगासी उटणें । कासयासी लावावें।३४। चंद्रासि शीतळ उपचार।कासया करावे वारंवार।क्षीरसागरासि पाहुणेर।कवण्या अर्थें करावा॥३५॥हिमकरासि विंझणवारा ।कासया पाहिजे सकुमारा।चंदनासि कोणत्या उपचारा।चर्चूनियां निववावें।३६। गजवदनासि विद्याभ्यास । करणें नलगेचि सायास । चौसष्टी कळा सरस्वतीस । शिकवणें नलगे सर्वथा॥ ३७॥ तेविं ज्ञानदेवा तुजकारणें । कासया पाहिजे तीर्थाटन । वायां विचार करूनियां मनें । व्यर्थ कासया हिंडसी ।३८। येरू ह्मणे जी सत्यसत्य। तुह्मीं सांगतसां यथार्थ । परी नामया ऐसा प्रेमळ भक्त । घडावी संगत मज याची॥३९॥ याचे संगतीचें घेऊन सुख । देहाचें करावें सार्थक। ऐसें ह्मणोनि चरणीं मस्तक । ठेविला देख निजप्रीतीं॥४०॥मग हांसोनियां पंढरीनाथ । नामयाकडे पाहून बोलत । ज्ञानदेव परब्रह्म मूर्तिमंत । तुझी संगत इच्छितसे ॥४१॥ तरी यासवें जाऊनि त्वरित । मागुती यावें शीघ्रवत । जैसा चित्तीं असेल हेत। तैसें सार्थक करावें ॥४२॥ तरी आसनीं शयनीं चालसी जेव्हां । माझा विसर तुज न पडावा।नामया जीवींचिया जीवा।मजवरी लोभ असोंदे ॥४३॥ ऐसें ह्मणोनि जगजेठी । सद्गदित झाला निजकंठीं।मग ज्ञानदेवाकडे दृष्टी । करूनियां बोलत ॥४४॥ तूं तंव सर्वज्ञ सुखमूर्ती । एक मागणें आहे तुजप्रती । ते आठवण असों द्यावी चित्तीं । ऐसें श्रीपती बोलिले ॥४५॥ निजकृपेनें वाढला नामा।यावरी माझा नित्यप्रेमा । एकवेळ परती होय रमा।परी याचा वियोग नकरीं मी ॥४६॥ परी तुवां संकट घातलें जाण । मज नमोडवे तुझें वचन । नामयापरतें कांहींच जाण।प्रिय मज असेना ॥४७॥ नामयाचा हात धरूनि श्रीपती । घातला ज्ञानदेवाचे हातीं । यासी न विसंबें अहोरात्रीं । सांभाळ प्रीतीं करावा ॥४८॥ माझें कंठींचें रत्न चोखडें । मागसी तूं घालून सांकडें । आरुष साबडें नामा वेडें । तरी मागें पुढें सांभाळीं ॥४९॥ यावज्जन्मपर्यंत कांहीं । नाम्यासि वेगळा केला नाहीं । तुझिये भिडेस्तव पाहीं । आज लवलाहीं पाठवितों ।५०। ऐसें बोलतां रमाकांत । कंठ जाहला सद्गदित । डोळ्यामाजी अश्रुपात । भरूनि आले तेधवां ।५१। मग मस्तक ठेऊनि चरणावरी।ज्ञानदेव चालिले झडकरी । नामयासी धरूनि करीं । आले तीरीं चंद्रभागेच्या ॥५२॥ उभयतांहीं करून स्नाना । पुंडलीकासि केली प्रदक्षिणा । नमस्कारूनियां चरणा । पैलतीरा उतरले ॥५३॥ नामयासि बोळवूनि सत्वर । राउळा आले शार्ङ्गधर । तों रुक्मिणी घेऊन कनकपात्र । चरण धुवायासी पातली ॥५४॥श्रीमुख पाहे न्याहाळून । तों अश्रुपातें भरले नयन । घर्मे सर्वांग भिजलें जाण । जगन्माता विस्मित ॥५५॥ मस्तक ठेऊनि चरणावरी।रुक्मिणी पुसे ते अवसरीं । आजि अवस्था विपरीत भारी। नवल अंतरीं मजवाटे॥५६॥ऐकुनि रुक्मिणीचें वचन।काय बोलत जगज्जीवन । नामयाचे वियोगबाणें जाण। हृदय दुखंड जाहलें॥५७॥त्याची मजला बहुप्रीती । ह्मणूनि उद्वेग वाटला चित्तीं । कवणें सुखें माझी मती । स्थिर नव्हेची सर्वथा॥५८॥ इष्ट मित्र सोयरे सज्जन । नामयासी नाहीं मजवांचून। तो कैसा राखील आपुला प्राण । ते चिंता दारुण मज वाटे॥५९॥ मज कृपणाचें गांठीचें धन । प्रेमळ नामा भक्तनिधान । ज्ञानदेव याचक येऊन । दान घेऊन गेलाहो ॥६०॥ नामा वृद्धपणींचें बाळ । मज आवडे सर्वकाळ । ज्ञानदेवें वोढोनि तत्काळ । बळेंचि नेलें तीर्थाटना६१मी जगदाकार वृक्ष जाण ।नामा माझें मूळींचें जीवन । ज्ञानदेव जळदैवत येऊन । तेणें आकर्षोनि नेलें हो ।६२।मज सुकतीया वृक्षा कारण। नामा बोळला आनंदघन । ज्ञानदेव येऊन प्रभंजन । दूर घेऊन गेलाहो॥६३॥ऐकुनि रुक्मिणी बोले वचन। ज्याचे मुखीं तुमचें नामोच्चारण । शोक दुःख मोह जाण । त्याकारणें न बाधिती ६४ ऐकूनि ह्मणे जगज्जीवन । तूं सत्यचि बोललीस वचन । परी भक्तांवांचून एक क्षण । मजकारणें कंठेना ॥६५॥ मी अव्यक्त निराकार जाण । भक्तांलागीं जाहलों सगुण । माझे भक्तासवैकुंठस्थान । बैसावया निर्मिलें॥ ६६ ॥ माझिया भाग्याचे वांटेकरी । निज भक्तचि जाण अधिकारी । त्यांचिया जीवींचें झडकरीं । मीच एक जाणतों ॥ ६७ ॥ माझे जीवींचिया खुणा । भक्तांवांचूनि न कळती जाणा । ऐसें रुक्मिणीसि वैकुंठराणा । सद्गद होऊनी सांगतसे ॥ ६८ ॥ अहंता टाकूनि सर्वस्वें । मजसी मीनले समरसें । जेविं दीपक आणि प्रकाश । अभिन्नपणें असती कीं ॥ ६९ ॥ कीं किरण आणि गभस्ती । एकत्रपणें सदा असती । कीं कनक आणि कांती । एकत्र असती सर्वदा ॥ ७० ॥ ऐसे विज्ञानी जे भक्तराज । नामा तयांचा असे चरणरज । त्याचा वियोग जाहला आज । ह्मणून मज दुःख वाटे७१ ऐसें ह्मणूनि तये क्षणीं । देव मूर्छित पडिले धरणीं । विव्हल जाहली विश्वजननी।माता रुक्मिणी तेधवां७२ सवेंच धीर धरूनि मना । सावध करी देवासी जाणा । मग पाचारूनि भक्तजनां । त्यांकारणें सांगतसे ॥ ७३ ॥ एकाएकीं उमासा येऊनी । मूर्छित पडिले चक्रपाणी । तुह्मीं कांहीं उपचार करूनी । पुसा येऊनी संनिध ॥ ७४ ॥ मग पल्लवें घालोनि वारा । भक्त पुसती त्या अवसरा । आजि कां व्याकुळ कृपासागरा । जगदुद्धारा झालेती ॥ ७५ ॥ ऐकूनि निज भक्तांचें वचन । धैर्यबळें सांवरून प्राण । सावध होऊनि जगज्जीवन । सद्गद होऊन बोलत ॥ ७६ ॥ ह्मणे नामयावांचूनि मज कांहीं । आन पदार्थ नावडे पाहीं । आलिंगन देऊनि हृदयीं । धरावा ऐसें वाटतें ॥ ७७ ॥ मी अखंड करितों भक्तकाज । हेंही ह्मणतां वाटे लाज । नामयानें कधीं संकट मज । घातलें नाहीं सर्वथा ॥ ७८ ॥ धर्मार्थ काम मोक्ष जाण। नाहीं दिधले त्यालागून । जन्मोनियां सेवा ऋण । गेला बांधूनि मजलागीं ॥ ७९ ॥ काम क्रोध मद मत्सर । हे वैरी मारून दुर्धर । आपुलेनि पुरुषार्थें संसार । जिंकिला जाण तयानें ॥ ८० ॥ लोभ दंभा धरूनि दूरी । माया मोह सांडि-

ले वैरी । नाना दैवतांची थोरी । जयाच्या चित्तीं नावडे ॥ ८१ ॥ आणिका देवांसी नमन । नामा न करी मजवांचून ।
त्याच्या जीवास विश्रांति एकक्षण।आन न दिसेची सर्वथा।८२।मार्गीं चालतां त्याजकारण।आला असेल भागशीण।
कोण पुसेल भूक तहान । चिंता दारुण मज वाटे ।८३।ऐसें बोलतां शार्ङ्गधर । भक्त गर्जती जयजयकार । सप्रेमें लोटले
चरणावर । आनंदें निर्भर होऊनी ॥८४॥ तेथूनि आले गरुडपारीं । आनंदें नाचती ते अवसरीं । पुनः लोटांगण घालून
सत्वरीं । नमन करिती साष्टांगें ॥८५॥ ऐसें देखोनि जगज्जीवन । किंचित झाले सावधान । तों इकडे नामा क्षणक्षण ।
मागें परतोनि पाहतसे ॥८६॥ह्मणे देवा मोकलिलें मातें । न येसी बोळवीत सांगातें । ऐसें ह्मणून तयातें । मूर्छना आली
ते वेळे॥८७॥मातेचा वियोग होतां जाण । बाळ आक्रोशें करी रुदन । कीं हरिणीस पाडस चुकोन । दाही दिशा धुंडि-
तसे ॥ ८८ ॥ कीं क्षुधातुर तळमळी अन्नेंविण । कीं तृषाक्रांत धुंडी जीवन । कीं चातकासी लागे तहान । पाहे वाट मे-
घाची ॥८९॥नातरी अमावास्येचे रातीं । चकोर धुंडी निशापती । कीं जळावांचूनी तळमळती । मीन जैसे उष्णका-
ळीं ॥९०॥ कांसवीचे बाळांसि लागतां भूक । माता दृष्टीस न पडे सन्मुख । तेविं पांडुरंगवियोगें नामा देख । जाहला
विव्हल ते समयीं ॥९१॥ ह्मणे चिंताक्रांत पडिलों वनीं । न दिसे माझें जिवलग कोणी । तूंचि माझी जनकजननी । च-
क्रपाणी धांव आतां ॥९२॥इष्ट मित्र बंधु चुलता । तूंचि होसी पंढरिनाथा । तूंचि माझी कुळदेवता । अनाथनाथा श्री-
विठ्ठला ॥९३॥ तूंचि माझें मोक्षसाधन । अंतरसाक्ष तूं चैतन्यघन । साच कीं लटिकें वचन । तूंचि जाणसी श्रीविठ्ठला
॥ ९४ ॥ कृपासागरा जगजेठी । नामा तुजविण होतसे कष्टी । त्यावर करूनि कृपादृष्टी । हृदयसंपुटीं असावें ॥९५॥ ऐ-
सा नामा विव्हल होऊन । करुणाशब्दें बोलतां वचन । मग ज्ञानदेवें संबोधून । बोलते जाहले तें ऐका ॥९६॥ प्रेम जिव्हा-
ळा तुझे पोटीं । असतां कां होसी हिंपुटी । तुझ्या हृदयीं असोन जगजेठी । वायांचि कष्टी न व्हावें ॥ ९७ ॥ विचारून पाहे
भक्तराजा । तुझ्याच हृदयीं आनंद तुझा । सगुण साक्षात देव वोजा । तूंचि होसी निर्धारें ।९८। मृग नाभींत सुगंध असो-
न । वायां धुंडीत फिरे वन । तेविं तूं आत्मस्वरूप नेणोन । वियोगदुःखें शिणतोसी ॥९९॥ कीं निर्दैवाच्या मंदिरांत । द्रव्य
पुरिलें असे अगणित।तें न देखतां उपवास करित। तैसेंचि तुज जाहलें कीं।१००।ऐकूनि नामा बोले वचन। विटेवरी जों-
डिले समचरण । तें परब्रह्म साक्षात सगुण । मजकारणें दाखवा ॥१॥ कांसे वेष्टिला पीतांबर । जघनीं ठेविले दोनी कर।
तो भक्तकैवारी जगदुद्धार । मजकारणें दाखवा ॥२॥ जें सनकादिकांचें निजध्यान । नीलग्रीवाचें प्रियभूषण । तो रु-
क्मिणीकांत जगज्जीवन । मजकारणें दाखवा ॥३॥ नारद तुंबरू ज्यालागूनी । सप्रेमें गाती दिवसयामिनी । तो पुंडली-
काचा वरदानी । मज आतांचि दाखवा॥४॥मी नेणें योग युक्तिसाधन । माझी विश्रांति जगज्जीवन। तो न भेटतां माझे
प्राण । जाऊं पाहती ज्ञानदेवा॥५॥ येरू ह्मणे रे प्रेमळ भक्ता । त्याविण ठावाचि न दिसे रिता । भेदभाव सांडूनि आतां । हृ-
दयीं अद्वैता वोळखावें ॥६॥ ऐकूनि नामा बोले उत्तर । चातक न घेती नदीचें नीर । आकाशांतूनि वर्षे धार । तेंच सेवि-



ती निजप्रीतीं॥७॥तेविं विश्वीं भरला चक्रपाणी । हे लटकीच वाटे मज काहाणी । जेविं पतिव्रता न ऐकती कानीं । प-
तीवांचूनि येर कथा ॥ ८ ॥ यावरी ज्ञानदेव बोलत । जे कां अक्षर अद्वैत । ज्ञानी ज्यासी उपासित । तोचि हृदयस्थ
तुझ्या कीं ॥ ९ ॥ यावरी नामा बोले वचन । मज आवडे रूप सगुण । दृष्टीं पाहतां निवती लोचन । श्रवणीं कीर्तन ऐ-
कावें ॥११०॥निर्धार देखोनि ज्ञानदेवो । ह्मणे धन्य धन्य तुझा शुद्धभावो । ऐसा नित्यानित्य पाहाहो । सांगती अनुभव
एकमेकां॥११॥प्रेमसुखाचिया गोष्टी । लाविती अनुभवकसवटी । अनिवार होय सुखवृष्टी । आनंद पोटीं न समाये १२
ज्ञानदेव ह्मणे नामयासी । तुवां स्वाधीन केला हृषीकेशी । तो भक्तिमार्ग मजपाशीं । विस्तारेंसी सांगावा ॥१३॥ कवण
रीतीं करावें भजन । कैसें करावें श्रवण मनन। कैसें आहे निदिध्यासन।धृती धारण कोणतें तें ॥१४॥कासया ह्मणावी वि-
श्रांती । हें सविस्तर सांगावें मजप्रती । बहुत दिवस उत्कंठा पोटीं । जे तुजसी गोष्टी पुसावी ॥१५॥ तुज जो लाधला अ-
नुभव । तो सांगावा साधन उपाव । नामयाप्रती ज्ञानदेव । कर जोडूनि विनवीत ॥ १६ ॥ ऐसें ऐकूनियां वचन । नामयानें
धरिले दृढचरण । कंठ सद्गदित होऊन । काय वचन बोलत॥१७॥मीं नेणेंचि बहु व्युत्पत्ती । ह्मणोनि निरविलें तुह्मांप्रती ।
माझा कर रुक्मिणीपती । तुमचे हातीं देतसे ॥१८॥ मी नेणता बहु अज्ञान । आणि तुह्मी पुसतां अध्यात्मज्ञान । कल्पतरु
याचक होऊन । कृपणमंदिरा पातला॥१९॥हिमालयासी झाला उबारा।ह्मणे मज पालवीं घाला वारा।कीं भास्कर ह्मणे
माझिया घरा।दीप लावून आणा कीं॥१२०॥आकाश ह्मणे मजकारण । स्थळ रहावया द्या विस्तीर्ण । कीं रायापाशीं पृ-
थ्वी येऊन । लिहून इनाम मागतसे॥२१॥कीं इच्छित अपांपतीचें मन । थिल्लरीं जाऊनि करावें स्नान।कीं कामधेनु पयः-
पान । बरडगायीस मागतसे ॥२२॥ तेविं तुह्मी घेऊन लहानपण । मजला पुसतां अध्यात्मज्ञान । ऐसें बोलूनि नामयानें ।
धरिले चरण ते वेळे॥२३॥ज्ञानदेव बोलिले वचनोक्ति । कांहीं शंका न धरी चित्तीं ।सांडोनि द्वैतभावरीती । अनुभवमती
वदावी ।२४। नामया तुझे सरळ बोल । सिंधूहूनि भासती खोल । स्वानंदजळाची सांचली वोल । सुशीतळ नित्य नवी २५
ते आतांचि ऐकावी सत्वर । श्रवण जाहले क्षुधातुर। तरी ज्ञानामृत साचार।वर्षों दे सत्वर यांवरी॥२६॥तूं विश्रांतीचें वि-
सावतें अंग । ह्मणूनि केला तुझा संग । नामया तूं भक्त अंतरंग । केला श्रीरंग आधीन॥२७॥ एक प्रेमरसावांचून । कासया
पाहिजे उदंड ज्ञान । जैसीं नक्षत्रपदींचीं थोर स्थानें । अहोरात्र हिंडती॥२८॥ध्रुवनक्षत्र दिसे लहान । परी अढळ अक्षयीं
बैसलें जाण । तेविं नामया तुझें अल्पज्ञान । ह्मणूं नयेचि सर्वथा ॥२९॥ कृशानु थोर वाढला जरी । तरी निर्मळ प्रकाश न-
व्हेचि मंदिरीं । दीपकतेजाचिये बरोबरी । तो कैसा करी सांगपां॥१३०॥शार्दूलाचें अंग दिसतें सान । परी तयाचे दृष्टीस
न टिकती वारण । तेविं नामया तुझें ज्ञान । शौर्यतेजें वरिष्ठ कीं ॥३१॥ औषधी बहुत आणिल्या भारी । तयांस अमृताची
नये सरी । तेविं तुझिया ज्ञानाची बरोबरी । शास्त्राधिकारी न करिती ॥३२॥ पल्हाटीचें पुष्प सुवासहीन । परि राया रंका
तेंचि भूषण । तेविं नामया तुझें ज्ञान । विश्वोद्धारक दिसताहे ॥३३॥ तें ऐकावया प्रेमभरित।उत्कंठित जाहलें माझें चित्त ।

आतां मौन सांडूनि त्वरित । माझें आर्त पुरवावें ॥ ३४ ॥ ऐसें बोलतां ज्ञानेश्वर । नामदेव देत प्रत्युत्तर । ह्मणे माझा अनुभव साचार । परिसा सादर स्वामिया ॥ ३५ ॥ अंगीं असावें वैराग्यबळ । सर्वांभूतीं दया अढळ । मीतूंपणाची खळखळ । प्रपंच तळमळ नसावी । ३६ । ऐशी स्थिति होतांच जाण । तयासि ह्मणावें शुद्ध भजन । अंगीं जरी हें नसेल चिन्ह । तरी व्यर्थ साधन कासया ॥ ३७ ॥ बाह्यात्कारें केलें नमन । अंतरीं आठविले दोषगुण । जेविं मक्षिकासमवेत पक्वान्न । अति आदरें जेविला । ३८ । उत्तम मध्यम नाठवे जाण । तेंचि जाणावें अखंड नमन । अंतरीं स्वानंदाचें जीवन । नाहीं खंडन तयासी ३९ विश्वीं विश्वंभर व्यापला जाण । निश्चळ बोधें स्थिरावे मन । याचि नांवें ह्मणिजे ध्यान । आनंदघन अक्षयी । १४० । आतां कैसें करावें श्रवण । स्वामींनीं पुसिलें मजकारण । जेविं नादलुब्ध होऊनि हरण । जाय विसरून देहभाव ॥ ४१ ॥ तया रीतीं तल्लीन मन । करूनि ऐकावें हरिकीर्तन । श्रवणभक्ति याजकारण । ह्मणती सज्ञान अनुभवी ॥ ४२ ॥ व्यवहारीं ठेऊनियां चित्त । कृपण जैसा द्रव्य सांचित । त्याच रीतीं विचारी स्वहित । मनन निश्चित या नांव ॥ ४३ ॥ आतां निदिध्यास तो कैशा रीतीं । जेविं परपुरुषीं लाऊन प्रीती । जारिणी मंदिरीं राहाटती । लौकिकस्थितीसारिख्या ४४ चातक वसे भूमंडळीं । परी त्याचें लक्ष मेघमंडळीं । कमळिणी राहिल्या सरोवरीं । परी भास्करावरी मन त्यांचें ॥ ४५ ॥ कीं धेनु चरत असतां डोंगरीं । परी चित्त ठेविलें वत्सावरी । कीं मन ठेवून द्रव्यावरी । कृपण बाजारीं हिंडतसे । ४६ । नातरी चित्त ठेवूनि चोरीवर । सोनार घडिती अळंकार । कीं दूरी असोन चकोर । रोहिणीवर लक्षिती ॥ ४७ ॥ कीं कुंभ घेऊनि शिरावरी । मोकळ्या हातें चालती नारी । लक्ष ठेवूनि दुडियेवरी । लोकाचारीं बोलत ॥ ४८ ॥ कीं चित्त ठेवूनि पुष्पावर । मिलिंद आकाशीं देत गुंजार । तेविं बाह्यात्कारें करूनि संसार । अंतरीं श्रीधर असावा ॥ ४९ ॥ सर्व भावें विठ्ठल चित्तीं । रूप पाहावें सर्वांभूतीं । रज तम टाकून निश्चितीं । सप्रेम चित्तीं असावें ॥ १५० ॥ असंग होऊनि एकट । सत्वशील ज्ञानी सुभट । सप्रेम भक्ती एकनिष्ठ । तेचि श्रेष्ठ ह्मणावे ॥ ५१ ॥ एकांतीं बैसोनि नित्य नेमानें । करावें श्रीहरीचें कीर्तन । याविरहित केलीं जीं साधनें । तीं बंधनें जाणावीं ॥ ५२ ॥ काया वाचा मनोभाव । म्यां सांगीतला आपला अनुभव । हेंही वदविता पंढरीराव । रुक्मिणीनाहो श्रीविठ्ठल ॥ ५३ ॥ ऐसी ऐकूनि वचनोक्ती । ज्ञानदेव जाहले विस्मित चित्तीं । ह्मणे विष्णुभक्त उदंड असती । पुढेंही होती अपार ॥ ५४ ॥ परि नामयाचे बोल अघटित । हें वाउगें न ह्मणावें किंचित । आजि अमृतवर्षाव निश्चित । जाहला त्वरीत आह्मांवरी ॥ ५५ ॥ हे अपार सुखविश्रांती । कोणासी न घडेचि कल्पांतीं । मनांत विचारून संतीं । उपपत्ती चित्तीं असोंद्या ॥ ५६ ॥ होती शास्त्रवक्ते व्युत्पन्न बहुत । होती बुद्धिमंत बहुश्रुत । होती कर्मनिष्ठ विद्यावंत । होती सर्वश्रेष्ठ पूज्य लोकीं ॥ ५७ ॥ जाणता कवित्व कुशळ कळा । चपळ वाचाळ जरी जाहला । पाठक साधक जरी असला । परी नामया ऐसा न देखों ॥ ५८ ॥ आत्मज्ञानीही योगयुक्त । कोणी असेल जीवन्मुक्त । ध्यानीं बैसती निष्ठावंत । परी नामया ऐसा न देखों ॥ ५९ ॥ योगी बैसले वज्रासनीं । विरक्तपणेंही वर्तोत जनीं । परी नामयाऐसा पाहतां नयनीं । त्रिभुवनींही दिसेना १६०

नामयाच्या भक्तीच्या खुणा । कदा न कळती इतर जनां । विटेवरी ठाकला पंढरीराणा । त्या रुक्मिणीरमणावांचूनियां ॥ ६१ ॥ यापरी संवाद नित्यानित्य । मार्गीं करिती स्वानंदभरित । तों हस्तनापुरा अकस्मात । तीर्थें करीत पातले ॥ ६२ ॥ नामदेव प्रेमें करून । गात असे श्रीहरीचे गुण । नगरासमीप येतां जाण । पहाती जन सकळिक ६३ अद्भुत प्रेमा ऐकून कानीं । नामयासी येती लोटांगणीं । टाळ विणे मृदंग घेऊनी । संकीर्तनीं नाचती ॥ ६४ ॥ नामयाचें कीर्तन ऐकून । अमित मिळाले विश्वजन । दिंड्या पताका घेऊन । समारंभ मांडिला ॥ ६५ ॥ गरुडटके निशाण भेरी । वाद्यें वाजती अति गजरीं । आनंद मांडला हस्तनापुरीं । जयजयकारीं नामघोषें ॥ ६६ ॥ तों अविंधराजा नगरांत । तेणें ऐकिला वृत्तांत । पंढरीहूनि नामा भक्त । तीर्थें करीत पातला ॥ ६७ ॥ तो नगरामाजी कीर्तन करी । तेणें वेधिल्या नरनारी । मात ऐकूनि ते अवसरीं । राजा अंतरीं क्रोधावला ॥ ६८ ॥ जैसा उदयासी येतां रोहिणीवर । मनीं जल्पती उगेच तस्कर । कीं दृष्टीं देखतां सहस्रकर । निशाचर संतापती ॥ ६९ ॥ नातरी वेदांतज्ञान ऐकूनी । मतवादी उगेच जल्पती मनीं । तेविं राजयाचे अंतःकरणीं । द्वेष बहुत उपजला ॥ १७० ॥ मग ह्मणे नामयाची हरिकथा । सत्वर जाऊनि पहावी आतां । प्रचीत नये तरी तत्त्वतां । पाखंड मता ह्मणावें ७१ ऐसें ह्मणोनि दुराचारी । कीर्तनामाजी आला सत्वरीं । जैसा ब्रह्मसभेमाझारी । मातंग झडकरी पातला ॥ ७२ ॥ नातरी स्पर्शावया ब्राह्मणाचें अन्न । पाकशाळेंत पातलें श्वान । कीं तारुण्यदशेंत दारुण । महारोग उद्भवला ॥ ७३ ॥ तैसाचि दुर्बुद्धी अकस्मात । येऊनि ठाकला कीर्तनांत । तंव नामा श्रीहरीचे गुण वर्णीत । सप्रेमभरित तेधवां ॥ ७४ ॥ टाळ मृदंग विणे सुस्वर । नादें दुमदुमिलें अंबर । त्यांतही टाळियांचा गजर । रंग अपार वोढवला ॥ ७५ ॥ तंव तेथें अविंधें केलें काय । कीर्तनरंगीं वधिली गाय । नामदेवासी बोलिला काय । गातोसी काय कुफराणा ॥ ७६ ॥ धेनु उठविशील येथ । तरी तुह्में गायन मानूं सत्य । नाहीं तरी तुजही येथ । आपुले हातें वधीन ॥ ७७ ॥ ऐसें बोलतां दुराचारी । चिंताक्रांत नरनारी । विक्षेप वाटले निजअंतरीं । प्रेमरंग वितळला ७८ जैसें पक्वान्न पात्रीं वाढिलें । त्यांत अकस्मात विष पडिलें । कीं पुस्तक वाचितां विझविलें । दीपकासी जैसें पतंगें ॥ ७९ ॥ कीं दरिद्रियासी सांपडलें निधान । त्यांत विवसी झाली निर्माण । कीं सुस्वर गातां अलाप जाण । तों कंठांत कफ दाटला ॥ १८० ॥ कीं लक्षगुणित क्षेत्र पिकलें । त्यावरी घाला घातला टोळें । कीं गृहीं मंगलकृत्य मांडलें । तों क्षय तत्काळ पातला ॥ ८१ ॥ कीं चकोर लक्षितां रोहिणीवर । तों आडवा राहू आला सत्वर । कीं अगस्तीनें प्राशितां सागर । सकळ जळचरें तळमळती ॥ ८२ ॥ ऐशा रीतीं विक्षेप पाहीं । श्रोतयांसी वाटला ते समयीं । उगेच निवांत बैसले ठायीं । नचले कांहीं त्यांपुढें ॥ ८३ ॥ अविंध ह्मणे नामयासी । कधीं ही गाय तूं उठविसी । कांहीं प्रमाण करून मजशीं । मग आपुल्या हरीस आळवीं ॥ ८४ ॥ ऐसें ऐकूनि वैष्णववीर । तयासी देत प्रत्युत्तर । आजपासूनि दिवस चार । लागती साचार नृपनाथा ॥ ८५ ॥ ऐसें ऐकूनि ते अवसरीं । राजा गेला आपुले घरीं । नामदेव अंतरीं आठवून श्रीहरी । धांवा करी अट्टाहासें ॥ ८६ ॥ जय दीनदयाळा पतितपावना । भक्तवत्सला करुणा-

घना । अंतरसाक्षिया गुणनिधाना । भक्तभूषणा गोविंदा ॥ ८७ ॥ जयविधिजनका पयोब्धिवासा । सगुण स्वरूपा
हृषीकेशा। पुंडलीकवरदा पंढरीशा । जय अविनाशा जगद्गुरू ८८ जय राघवेशा रावणांतका । नंदनंदना कंसच्छेदका ।
कोरवअभिमान निर्दाळका । पांडवरक्षका श्रीकृष्णा ॥८९॥ जय गुणसमुद्रा आनंदघना । द्रौपदीलज्जानिवारणा । रु-
क्मिणीकांता कमललोचना । भक्तभूषणा पांडुरंगा । १९० । ऐसा नामा प्रेमभरित । कीर्तनामाजीं शोक करीत । कंठ जा-
हला सद्गदित । पडती अश्रुपात नेत्रकमळीं ॥९१॥ श्रवणासी आले विश्वजन । तेही तैसेच करिती रुदन । एक दिवसपर्यंत
जाण । बैसले होते ते ठायीं ॥९२॥ दिनकर येतां उदयासी । उठोनि गेले निजगृहासी । जैसे दुर्भिक्षकाळीं याचकांसी । दां-
भिक दाते मोकलिती ९३ नातरी इंद्रियें होतांचि विकळ । विषय टाकिती विलासी नर । कीं तोटा देखोनि दिजारदार ।
देश परगणा टाकिती ॥९४॥ कीं शीतकाळ येतांचि जाण । मेघ पळती गगनांतून । कीं लागतां सूर्यकिरण । पतंगीं रंग उ-
डतसे ॥ ९५॥ कीं राजा रणांत पडतां जाणा । टाकूनि पळे जेविं सेना । कीं आयुष्य सरतां प्राणां । कुडी सांडूनि जागें लागे
॥ ९६ ॥ कीं दरिद्र येतां गृहस्थांप्रती । पिशुन सोयरे मोकलिती । कीं वृद्धपण येतांचि निश्चितीं । इंद्रियें मोकलिती नरातें
॥९७॥ तेविं नामदेवाचें कीर्तन । श्रवण करीत होते जन । अरिष्ट देखोनि अति दारुण । गेले उठोनि सकळिक ॥९८॥ गौत-
मीमस्तक मांडीवरी । घेऊन नामा रुदन करी । ह्मणे पंढरीनाथा श्रीहरी । पाव सत्वरीं मज आतां ॥९९॥ कीं रुक्मिणी-
जवळी जाहलासी निद्रित । ह्मणून उशीर लागला बहुत । कीं प्रेमळ भक्तांच्या कीर्तनांत । श्रवण करीत बैसलासी । २०० ।
कीं योगियांचे ध्यानीं । गुंतलासी चक्रपाणी । कीं आणिक संकट घातलें कोणीं । तेथें गुंतोनि राहिलासी ॥१॥ कीं सगुण
उपासक पूजा । घेत बैसलासी अधोक्षजा । कीं अमृतपानासी इंद्रराजा । घेऊन गेला तुजलागीं ॥२॥ कीं यात्रा मिळाली
पंढरीसी । निजभक्त आले दर्शनासी । ह्मणूनियां हृषीकेशी । उशीर फार लाविला ॥ ३ ॥ नाना अलंकार वस्त्रभूषणें क-
रून । पूजा करिती श्रीमंत जन । तेथेंचि होऊन तल्लीन । माझा विसर पडला कीं । ४ । ऐसा चार दिवसपर्यंत । अहोरात्र धां-
वा करित । धरणी शिंपिली समस्त । अश्रुपातें करूनी ॥५॥ ह्मणे देवा धांव सत्वर । नाम्यासी ग्रासूं पातला काळ । जैसें मी-
नासी नसतां जळ । होऊनि व्याकुळ तळमळी । ६। ऐसे करुणाशब्द ऐकूनि कानीं । तत्काळ पावला चक्रपाणी । नामयाचे
हृदयभुवनीं । प्रकट जाहले तेधवां ॥७॥ तत्काळ उठविली गाय । नामदेवासि ह्मणे सावध होय । तेणें धरून दृढपाय । बो-
लिला काय तें ऐका ॥८॥ ह्मणे बा कवणिया काजा । गुंतलासी अधोक्षजा । चार दिवस गरुडध्वजा । अंत माझा पाहिला
कीं ९ देव ह्मणेरे नामया । तुवांचि प्रतिज्ञा केली वायां । चार दिवस लागती ह्मणूनियां । व्यर्थ कासया बोलिलासी २१०
येच समयीं सत्वर । उठवीन ऐसें वदतास जर । तेव्हांच धांवून साचार । आलों असतों तुजपाशीं ११ तुझाचि संकल्प फ-
ळला तुज । व्यर्थ कां शब्द ठेविशी मज । तुह्मां आधीन मी अधोक्षज । वर्तें सहज निजप्रीतीं १२ भक्तमुखीं जें निजवचन ।
तें यथार्थ लागे मजकारण । वाल्मीकें भविष्य कथिलें जाण । तैसेंचि वर्तणें मजलागीं ॥१३॥ आरशांत पाहती पाहणार ।



तों तैसेंच दिसे त्यासमोर । तेविं मज जैसे भाविती नर । मी जगदुद्धार तैसा तयां ॥१४॥ कीं काश्मीराचें जैसें लिंग । ज्या-
वरी ठेविजे तेंताचि रंग । तेविं भक्ताधीन मी श्रीरंग । आवडीसारिखा होतसें ॥१५॥ ऐसें बोलोनि तयेक्षणीं । अदृश्य जा-
हला चक्रपाणी । नामा पाहे नेत्र उघडोनी । तों गाय उठोनि बैसली ॥१६॥ ऐसें कौतुक देखोनि त्वरित । रायासी लोक सां-
गती मात । नवल ऐकूनि अति अद्भुत । आवेंध तेथें पातला ॥ १७ ॥ कापूनि टाकिलें गायीचें शिर । ती उठविली देखोनि
नृपवर । नामदेवासी नमस्कार । घाली साचार ते समयीं ॥ १८ ॥ आनंद वाटला सकळजनां । ह्मणती धन्य नामा वैष्णव
जाणा । ब्रह्मादिक देवगणां । जयाचा प्रेमा न वर्णवे ॥ १९ ॥ जयजयकारें पिटिली टाळी । आनंदली भक्तमंडळी । नामा
उठोनी तेवेळीं । भावें वनमाळी ओंवाळिला ॥२२०॥ आरती होतांचि सत्वर । सकळ करिती जयजयकार । ह्मणती धन्य
हा वैष्णववीर । शार्ङ्गधर वश केला ॥२१॥ पुढें श्रोतीं देऊनि चित्त । कथासंगमीं व्हावें रत । जैसी गंगा सागरांत । समरस
होय निजप्रीतीं ॥२२॥ किंवा मानससरोवरीं येऊनी । राजहंस निवडिती दुग्धपाणी । तेविं विकल्पनीर टाकूनी । प्रेमा-
मृतपय सेविजे ॥ २३ ॥ तुह्मीं अवधान दिधलें सांग । तरी कथेसी येईल अद्भुत रंग । मग प्रसन्न होऊनि पांडुरंग । करील
भयभंग दासांचा । ॥२४॥ जो दीनदयाळ रुक्मिणीकांत । पुढें वदवील ग्रंथार्थ । महीपती त्याचा मुद्रांकित । निरोप सां-
गे श्रोतयां २५ स्वस्तिश्री भक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । दशमाध्याय रसाळ हा ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय १० वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । श्रोते हो ऐका सावधान । तुह्मांसी लाधलें अमृतपान । जे भक्तकथा अद्भुत ग-
हन । प्राकृत होऊनि विकासली ॥ १ ॥ जैसें विप्रांचे घरीं पक्वान्न जाहलें । तें सकळ यातीचे उपयोगीं पडलें । कीं क-
नकाचे अलंकार केले । सुंदर अंगीं शोभावया ॥ २ ॥ कापुसाचें अंबर विणिलें जाण । तें सकळांसी सीतनिवारण ।
कीं नवनीत कढवून ठेवितां पूर्ण । न नासेची सर्वथा ॥ ३ ॥ कीं रत्नें कोंदणीं बैसविलीं । तीं लेणाराचे उपयोगा पड-
लीं । कीं अमृतबीजें भूमींत पेरिलीं । तीं विस्तारलीं कोटिगुणें ॥ ४ ॥ पाषाण फोडून रचिलें देऊळ । त्यांत बैसविला
जाश्वनीळ । तैसाच हा ग्रंथ प्रांजळ । जाहला केवळ सकळिकां ॥ ५ ॥ नातरी विकल्प आणूनि चित्तीं । ह्मणाल प्रौ-
ढी सांगशील किती । तरी मी सलगीनें तुह्मांप्रती । सप्रेम मतीं बोलिलों ॥ ६ ॥ मजवरी निमित्त ठेवूनि वायां । नका
उपेक्षूं भक्तविजया । दोष टाकूनि गुण घ्यावया । अधिकार तुह्मां आहे कीं ॥ ७ ॥ येरवीं महीपती मंदमती । रासनां-
वें एकचि येती । ग्रंथ वदविता श्रीरुक्मिणीपती । निश्चय चित्तीं असोंद्या ॥ ८ ॥ सूत्रदोरी तुटलियावरी । बाहुलें ना-
चेल कैशापरी । वारा निवांत राहिला जरी । तरी वृक्ष सर्वथा डोलेना ॥ ९ ॥ गताध्यायीं निरूपण काय । नामदेवें
उठविली गाय । राजा येऊनि वंदिले पाय । आनंद जाहला सर्वांसी ॥ १० ॥ चमत्कार दाखवून वेगेंसी । निघाले पु-
सोनि सर्वांसी । मार्गीं चालतां दिवानिशीं । स्मरण मानसीं हरीचें ॥ ११ ॥ ज्या ज्या देशीं जाती तीर्था । तेथें तैसीच
करिती कविता । भाषापरत्वें अमोलिकता । गुण वर्णिती हरीचे ॥ १२ ॥ नानादेशींचीं तीर्थें बहुत । विस्तारें सांगतां
वाढेल ग्रंथ । नामदेवें विलोकून त्वरित । आनंदवनासी पैं आले ॥ १३ ॥ करूनि भागीरथीचें स्नान । घेतलें विश्वेश्व-
राचें दर्शन । इतुकेन कृतार्थ होऊन । परम उल्हास मानसीं ॥ १४ ॥ चतुर्मास राहिले तेथ । तों नवल वर्तलें आति अ-
द्भुत । कबीराचे घरीं अकस्मात । साधु संत पातले ॥ १५ ॥ रात्र जाहली दोन प्रहर । निद्रित जाहले नारीनर । तों अ-
कस्मात वैष्णववीर । निजदृष्टीं देखिले ॥ १६ ॥ कबीर कांता दोघेजण । उठोनि केलें साष्टांगनमन । घर मोडकें अ-
तिजीर्ण । कूड मोडोनी गेला असे ॥ १७ ॥ घरीं नाहीं तिळभर अन्न । उपवासी मुलें निजलीं जाण । तयांखालील बो-
ऱ्या काढून । संतां बैसणें घातलें ॥ १८ ॥ कबीर ह्मणे निजकांतेसी । कांहीं नैवेद्य करावा यांसी । अवश्य ह्मणे भ्रता-
रासी । परी चिंता मानसीं उद्भवली ॥ १९ ॥ ह्मणे धान्य तो नाहीं निजमंदिरीं । उसणें कोणीच न देती नगरीं । मग
धैर्य करूनि निज अंतरीं । चालिली बाजारीं एकटी ॥ २० ॥ मार्गीं चालतां अतित्वरेनें । मुखें करीत श्रीरामभजन ।
ह्मणे अन्न न मिळे जरी करितां प्रयत्न । तरी सत्वा हानी होईल ॥ २१ ॥ मग वाणियाचे ओळीस येऊन त्वरित । स-
भोंवतें जंव विलोकित । तंव एक्या दुकानांत अकस्मात । वाणी जागृत देखिला ॥ २२ ॥ सन्निध जाऊनि ते अवसरीं ।
तयासि बोले मधुरोत्तरीं । पाहुणे संत आमुचे घरीं । तीर्थें करीत पातले ॥ २३ ॥ शिधासाहित्य पाहिजे त्यांसी । उ-
शीर न करावा यावयासी । द्रव्य सांगाल तें तुह्मांपाशीं । आणोनिया देईन ॥ २४ ॥ वाणी ह्मणे तिजकारण । तूं कोणा-

ची आहेस कवण । येरी बोले प्रतिवचन । मधुरोत्तरें तयासी ॥ २५ ॥ अविंधवंशीं वैष्णववीर । तो कबीर माझा निजभ्रतार । ऊठ सामग्री दे सत्वर । साधुसंत भुकेले ॥ २६ ॥ ऐसें बोलतांचि सुंदर । वाणी झाला कामातुर । जेविं अहल्या देखोनि शचीवर । करी अविचार मानसीं ॥ २७ ॥ कीं पार्वती देखोन सुंदर । कामें व्यापिला भस्मासुर । कीं विश्वजननीस दशकंधर । पापदृष्टीं जेविं पाहे ॥ २८ ॥ नातरी पांडवजाया द्रौपदी सती । तिशीं दुर्योधन धरी कुमती । तैसा वाणी पापमती । कबीरकांतेसी बोलत ॥ २९ ॥ ह्मणे माझे मनोरथ करिसी पूर्ण । तरी सामग्री देईन तुजकारण । द्रव्य आणि वस्त्रें भूषण । मागशील तें देईन मी ॥ ३० ॥ कांहीं संकोच धरिसी मनीं । तरी माघुती जायीं परतोनी । ऐकोनि दुर्जनाची वाणी । विचार मनीं करीतसे ॥ ३१ ॥ ह्मणे नाहीं ह्मणतां याजकारण । तरी आणिक कोठें न मिळेचि अन्न । संतांसि पडतां उपोषण । सत्वास हानि होईल ॥ ३२ ॥ समय पडेल तैसें वर्तणें । प्रसंगाऐसें उत्तर देणें । सभा पाहून कीर्तन करणें । बीज पेरणें भूमीऐसें ॥ ३३ ॥ हरिश्चंद्र राजा सत्वगुणी । डोंबाघरीं वाहे पाणी । तारामती तयाची राणी । क्लेश भोगूनि राहिली ॥ ३४ ॥ वाऱ्याऐसें उपणावें भूस । बुडतां धरावी अंत्यजकांस । दुष्काळीं अन्न कृपणास । मागणें लागे याचकां ॥ ३५ ॥ साधावया संसारकाज । अविंधसेवा करिती द्विज । प्रसंगीं उदेला कलिराज । तो वर्तवी सहज अघटित ॥ ३६ ॥ स्वधर्म आणि अधर्म जाण । शास्त्रीं बोलिले मनुष्याकारण । जेणें जोडती श्रीहरिचरण । तरी अधर्म अवश्य करावा ॥ ३७ ॥ माता पिता तीर्थ जाण । ज्येष्ठबंधु त्याचि समान । कुळगुरु आणि अभ्यागत जाण । आज्ञा प्रमाण ययांची ॥ ३८ ॥ जरी ऐकता भरत मातृवचन । तरी कैसे जोडते श्रीरामचरण । प्रऱ्हादें पित्यासि अव्हेरून । नरहरी प्रसन्न केला कीं ॥ ३९ ॥ बळीनें नायकोनि शुक्रवचन । वामनासी अर्पिलें त्रिपाददान । कीं गौळणी भ्रतारांसी टाकून । जाहल्या तल्लीन श्रीकृष्णरूपीं ॥ ४० ॥ मोडूनि प्राणनाथाचें वचन । ऋषिपत्न्यांनीं नेलें अन्न । जरी धरिलें असतें शास्त्रवचन । तरी श्रीहरिचरण अंतरते ॥ ४१ ॥ तेविं शास्त्र विचारितां मानसीं । संत साधु राहतील उपवासी । तरी वचन देऊन वाणियासी । निजकार्यासी साधावें ॥ ४२ ॥ मग अयोध्यावासी जानकीजीवन । तो अंतरसाक्ष चैतन्यघन । त्याचें करितां नामस्मरण । अरिष्ट निरसेल सर्वही ॥ ४३ ॥ मग कबीरपत्नी धैर्य धरून । वाणियासी बोले प्रतिवचन । आधीं सामग्री दे मजकारण । मग मी येईन निश्चयेंसी ॥ ४४ ॥ रात्र बहुत लोटलिया जाण । घरीं उपवासी साधुजन । उशीर लागतां मजकारण । निद्रित होतील वैष्णव ॥ ४५ ॥ ऐसें ऐकतां वाणियास । चित्तीं न वाटेच विश्वास । जेविं दुर्योधनाचे दृष्टीस । सात्विक कोणी दिसेना ॥ ४६ ॥ आंधळ्यासि आंधळें दिसे जाण । तस्करासि चंद्रमा भासे मलिन । रोगी ह्मणे हें मिष्टान्न । कडवट कासया रांधिलें ॥ ४७ ॥ कृपणासि नाहीं भूतदया । मांसभक्षकासि कैंची माया । क्षयरोगि भासि दिव्यकाया । स्वप्नींही दृष्टी नये कीं ॥ ४८ ॥ खळासि कैंचा प्रेमरस । साधु न भेटे निंदकास । ब्राह्मणआचार अंत्यजास । सत्य न भासे सर्वथा ॥ ४९ ॥ तेविं कबीरकांतेच्या वचनासी । प्रमाण न मानी निश्चयेंसी । ह्मणे

भाक देशील जरी मजसी । सत्य मानसीं तैं वाटे ॥ ५० ॥ ऐकूनि दुर्बुद्धीचें वचन । धैर्यबळें आवरिलें मन । ह्मणे यासी न देतां वचन । सामग्री पदरीं नये कीं ॥ ५१ ॥ मग भाक देऊनि ते अवसरीं । सर्व साहित्य घेतलें पदरीं । सत्वर जाऊनि निजमंदिरीं । साहित्य करी निजप्रेमें ॥ ५२ ॥ मग कबीरकांतेसि संत बोलती । आह्मी स्वहस्तें पाक करूं निश्चितीं । मग पाकपात्रें घेऊनि प्रीतीं । स्वयंपाक करिती वैष्णव ॥ ५३ ॥ नानापरींचीं पक्वान्नें । सप्रेमभरीं रांधिलीं जाण । मग नवरस पात्रीं वाढून । पूजाविधान आरंभिलें ॥ ५४ ॥ गंधाक्षता सुमनहार । परिमळद्रव्यें उपचार । धूपदीप दाखवूनि सत्वर । भावें नमस्कार घातले ॥ ५५ ॥ सप्रेमभावें यथारुचित । साधुसंत जाहले तृप्त । मग कबीरपत्नीनें निजकांत । एकांत मंदिरीं बोलाविला ॥ ५६ ॥ कांता ह्मणे कबीरासी । तुह्मीं असावें संतांपाशीं । म्यां भाक देऊन वाणियासी । सामग्री वेगेंसी आणिली ॥ ५७ ॥ त्याचे मनोरथ करावया पूर्ण । आज्ञा द्यावी मजकारण । उशीर होतां उगवेल दिन । मग सत्वासि हानी होईल ॥ ५८ ॥ ऐकूनि ह्मणे कबीरभक्त । मीही येतों तुजसांगात । त्या वाणियाचा उपकार बहुत । आह्मांवरी जाहला असे ॥ ५९ ॥ आजि संतांसि मिळालें अन्न । हें तंव त्याचेंच होय पुण्य । त्याच्या उपकारा उत्तीर्ण । नव्हे आमचेन सर्वथा ॥ ६० ॥ तुजही उपाय बरा सुचला । संतकारणीं देह लाविला । आतां स्कंधीं घेऊन तुजला । नेऊनि घालितों ते ठायीं ॥ ६१ ॥ महापर्जन्य पडतां मेदिनी । तमें दाटली घोर रजनी । एकलें जातां तुजलागुनी । भय निजमनीं वाटेल ॥ ६२ ॥ ऐसें ह्मणोनि ते अवसरीं । कांतेसि बैसविली स्कंधावरी । कबीर जावया बाजारीं । चाले झडकरी लगबगें ॥ ६३ ॥ मार्गीं चालतां दोघेजण । सप्रेम करिती श्रीरामभजन । ह्मणती धन्य आजिचा सुदिन । वैष्णव घरासि पातले ॥ ६४ ॥ ऐसें बोलतां एकमेकांसी । सत्वर आलीं दुकानापाशीं । कबीर ह्मणे निजकांतेसी । जातों घरासी मी आतां ॥ ६५ ॥ घरीं असती साधुसंत । उठोनि जातील अकस्मात । मी त्यांजपाशीं जातों त्वरित । चरणसेवा करावया ॥ ६६ ॥ तुवां संकोच न धरावा किंचित । पुरवीं वाणियाचे मनोरथ । ऐसें ह्मणोनि कबीर भक्त । गेला त्वरित घरासी ॥ ६७ ॥ तंव वाणी कामातुर होऊन । वाट पहात बैसला जाण । ह्मणे रात्रीं एकटी येऊन । गेली टकवून मजलागीं ॥ ६८ ॥ ऐसें दुराचारी बोलतां । तों पुढें देखिली कबीरकांता । हर्ष वाटला तयाचे चित्ता । सत्य वचनार्था केलें वो ॥ ६९ ॥ स्वस्थानीं बैसतां जाण । वाणी बोलिला तिजकारण । कर्दमें भरले नाहींत चरण । वर्षतां घन अपार ॥ ७० ॥ हे आशंका माझिये चित्तीं । तरी सत्यचि सांगावें गुणवती । वचन ऐकोनि ते सती । वाणियाप्रती काय बोले ॥ ७१ ॥ ऐक गा शेटिया गुणवंता । यथार्थ सांगतें मी आतां । तुजशीं देऊन वचनार्था । साधुसंतां तोषविलें ॥ ७२ ॥ वैष्णव पावले समाधान । हें तव तुझेंच जाहलें पुण्य । तुझा उपकार आह्मांवरी पूर्ण । न फिटेची सर्वथा ॥ ७३ ॥ मी पतिव्रता ह्मणवितें जाण । भ्रतार-आज्ञा मज प्रमाण । तुजला दिधलें भाकदान । संकट जाणोनी ते वेळीं ॥ ७४ ॥ कबीर माझा प्राणनाथ । तयासि सांगितला वृत्तांत । तेणें स्कं-

धीं वाहूनि मातें । आणिलें सत्वर तुजपाशीं ॥ ७५ ॥ आपण परत गेला मागुती । आतां तुवां सोडूनि आपली भ्रांती । काय कामना असेल चित्तीं । पुरवीं त्वरित ये समयीं ॥७६॥ ऐसें बोलतां सत्वराशी । अनुताप जाहला वाणियासी । ह्मणे म्यां येऊनियां नरदेहासी । सार्थक कांहींच न केलें ॥७७॥ चौऱ्यायसी लक्ष हिंडोनि पाहीं । अवचित आलों मनुष्यदेहीं । येथेंही विचार न करूनि कांहीं । विषयावर लंपट जाहलों कीं ॥ ७८ ॥ कबीर विरक्त उदार जाण । त्याचे कांतेचें केलें छळण । जेविं लोहशस्त्र हातीं घेऊन । तुलसीवनाचि कापिलें ॥७९॥ कीं हातीं घेऊन कुदळी । यज्ञशाळा बळेंचि पाडिली । कीं शिवपूजा लोटोनि दिधली । लत्ताप्रहारेंकरूनियां ॥ ८० ॥ कीं अमृतकुंभ उलंडिला । कीं शालिग्राम फोडोनि टाकिला । कीं वटपिंपळ देखोनि तोडिला । कुठारशस्त्रेंकरूनियां ॥ ८१॥ गंगा उतरूनि गेलों अन्नात । कीं वाचे निंदिलें श्रीभागवत । तैसेचि दोष घडले मातें । कबीरभक्त छळतांची ॥८२॥ कांतेसि देईल भोगदानीं । ऐसा भ्रतार न दिसे कोणी । धन्य हे माता सद्गुणखाणी । आदिजननी जगदंबा ॥ ८३॥ ऐसा अनुताप धरून मनीं । नमस्कार केला तिजलागुनी । ह्मणे मी बाळक तूं जननी । अपराध न गणीं सर्वथा ॥ ८४ ॥ अज्ञानपणें मीं नेणतां । छळणा केली तुझी तत्त्वतां । सर्व क्षमा करूनियां आतां । अभयदान मज देईं ॥८५॥ मज बाळकासि धरोनि करीं । घालीं कबीराचे पायांवरी । ह्मणूनि मस्तक चरणावरी । पुनः मागुती ठेविला ॥८६॥ ऐसें ऐकूनि करुणावचन । ह्मणे धन्य वाणिया तुझें मन । नवनीताऐसें मृदु जाण । मजकारणें भासत ॥ ८७॥ उदंड केल्या दुष्कर्मराहाटी । शेवटीं अनुताप उपजला पोटीं । तरी दुरितें गेलीं उठाउठीं । बोलिलें श्रेष्ठीं शास्त्रमत ॥ ८८॥ आधीं केलें विषभक्षण । त्यावरी लाधलें अमृतपान । तरी अपाय निश्चित चुकला जाण । ऐसें सर्वज्ञ बोलती ॥८९॥ ह्मणूनि ऐक गा धैर्यवंता । अनुताप जाहला तुझिया चित्ता । तेव्हांचि भवरोग तत्त्वतां । गेला परता पळोनी ॥९०॥ आतां तुज आणि कबीरासी । भेटी करीन मी वेगेंसी । ऐसें ऐकोनि वाणियासी । परम आल्हाद वाटला ॥९१॥ सांडोनि दांभिक अभिमान । टाकूनि रजतमोगुण । टाकोनियां मोह भ्रम । सात्विक लक्षण दृढ धरिलें ॥ ९२ ॥ यापरी होऊनि शुद्ध सोज्वळ । दुकान टाकिलें तत्काळ । निघे तेथोनि उतावेळ । मायाजाळ तोडूनी ॥ ९३॥ कबीरकांतेच्या समागमें जाण । सत्वर आला नलगतां क्षण । मग अनन्यभावें साष्टांगनमन । प्रेमेंकरून घातलें ॥९४॥ ह्मणे मी अज्ञान बाळक नेणत । अनंत अपराध केले सत्य । ते क्षमा करूनी अभयहस्त । दिधला पाहिजे निजदासा ॥९५॥ अंतरसाक्ष कबीरें पूर्ण । अनुतापयुक्त वोळखिलें चिन्ह । मग वाणियासि आलिंगन देऊन । अभयवरदान दीधलें ॥९६॥ भाव विश्वास ज्ञानशीळ । उदास विरक्त सर्वकाळ । ऐसा कबीरभक्त प्रेमळ । दीनदयाळ सर्वांसी ॥ ९७॥ वाणियासि अनुताप होऊन । करिता जाहला श्रीरामभजन । संतसंगाचें महिमान । नकळे जाण श्रुतिशास्त्रां ॥ ९८॥ कबीराची कीर्ति अति अद्भुत । नामदेवासि जाहली श्रुत । मग ज्ञानदेवासि सांगोनि मात । आले भेटीस कबीराच्या ॥९९॥ नामा ज्ञानदेव देखोनि नयनीं । नमस्कार घातला साष्टांग धरणीं । कबीरासि आनंद वाटला मनीं । प्रेमेंकरूनी भेटले ॥ १०० ॥ मग बैसावयाकारण । भूमीवरी घातलें तृणासन । प्रेमामृतें सजळनयन । झाले अतती दोघांचे ॥ १॥ ज्ञानदेव ह्मणे नामयासी । मागील आठव धरीं मानसीं । क्षीरसागरीं आज्ञा कैसी । दिधली तुह्मांसि नारायणें ॥२॥ तूं तरी उद्धव साक्षात । शुक अवतार कबीरभक्त । शुक्तिकेपोटीं अवतार सत्य । तुह्मीं घेतला मृत्युलोकीं ॥ ३॥ भक्तिमार्ग जाहला मलिन । प्रपंचीं बुडाले अवघे जन । त्यांचें करावया उद्धरण । कर्मभूमीसी आलेती ॥ ४ ॥ ऐसें बोलतां ज्ञानेश्वर । उभयतां करिती नमस्कार । अंतरींची खूण परस्पर । कळों आली तयांसी ॥ ५ ॥ ज्ञानदेव ह्मणे कबीरासी । पंढरीक्षेत्र दक्षिणदेशीं । तेथें पुंडलिकाचे भेटीसी । वैकुंठवासी पातले ॥६॥ साक्षात्परब्रह्मरूप सगुण । लीलानाटकी जगज्जीवन । जो नामयाचें प्रेमजीवन । उभा ठाकला विटेवरी ॥७॥ तुह्मीं येऊनि एके दिनीं । तें आदिक्षेत्र पाहावें नयनीं । ऐकोनि ज्ञानदेवाची वाणी । कबीर चरणीं लागला ॥८॥ कबीर ह्मणे ज्ञानदेवासी । एकादशीस कार्तिकमासीं । अगत्य येऊं दर्शनासी । वचन तयासी दीधलें ॥९॥ कबीरासी पुसोनि तये क्षणीं । सत्वर निघाले तेथूनी । पुढें सुरसकथा सज्जनीं । सादर कर्णीं ऐकावी ११० जैसा तृषाक्रांत सेवी जीवन । कीं भुकेला जेवीं मिष्टान्न । तेविं भक्तकथेसी लाऊनि मन । सादर ऐका भाविक हो ११ एक प्रेमभाव धरितां चित्तीं । तरी अनंत लाभ हाता येती । श्रोतयांसी विनवी महीपती । होय सुखप्राप्ति स्वानंदें॥१२॥ स्वस्तिश्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । एकादशाध्याय रसाळ हा ॥ ११३॥ अध्याय ११ ॥ ओंव्या ११३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्री भक्तविजय अध्याय ११ रा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगोपालकृष्णाय नमः । आज सुकाळ जाहला त्रिभुवनीं । जे भक्तविजयमेघ वोळला गगनीं। इतर
चिदाकाशीं गर्जना करूनी । स्वानंदजीवन वर्षत ॥१॥ सत्वशील जे कां चातक । ते आधींच तृप्त जाहले देख ।
जे जन त्रिगुणात्मक । त्यांसी धान्यें अनेक निपजलीं ॥ २ ॥ केवळ तमोगुणी पशुसमान । त्यांसि उठलें अपार तृण ।
सखोल भूमी पडलें जीवन । तें पडलें उपयोगीं बहुतांच्या ॥ ३॥ अनार्तांच्या खडकावरी । वाहूनि गेलें वरिचे वरी ।
तो लोट येऊनि सत्वरीं । ज्ञानसागरीं राहिला ॥४॥ तेथें सज्ञान भाविक जन । तेचि तळपत होते मीन । स्वानंद लो-
ट येतां जीवन । प्रेमआल्हादें क्रीडती ॥ ५ ॥ मागील अध्यायीं कथिली गोष्टी । कबीरनामयाची जाहली भेटी ।
चतुर्मास क्रमूनि गंगातटीं । मग तेथूनि परतले ॥ ६॥ गया प्रयाग पाहूनि सत्वरीं । येते जाहले अयोध्यापुरीं । मथु-
रा गोकुळ देखोनि झडकरी । द्वारावतीस पैं गेले ॥ ७ ॥ परतोनि येतां मार्गीं जाण । मारवाड देश लागला कठिण ।
तृषाक्रांत होऊनि दोघे जण । धुंडिती जीवन सेवावया ॥ ८ ॥ तंव एक कूप देखिला अवचित । सखोल पाहतां नकळे
अंत । उदक घ्यावया उपाव तेथ । कवण युक्ति करावी ॥ ९ ॥ मग नामयासि ह्मणे ज्ञानदेव । मज साध्य असे एक उ-
पाव । लघिमेचें करून लाघव । प्रवेश केला कूपांत ॥ १० ॥ उदक प्राशून ते अवसरीं । सत्वर निघाला बाहेरी । नाम-
यासि तृषा लागली भारी । परि उपाय कांहीं न सुचेची ॥ ११ ॥ ज्ञानदेव ह्मणे तयाप्रती । तूं चिंतातुर कासया चित्तीं।
उदक आणूनि तुजप्रती । आतांच देईन सत्वर ॥ १२ ॥ लघिमालाघव करावयासी । उपाय ठाउका नाहीं तुजसी ।
आतां द्वैतभाव न धरून मानसीं । उदकप्राशन करावें ॥ १३ ॥ माझे हातींचें घ्यावया जीवन । चित्तीं न धरावा अन-
मान । आत्मा व्यापक चैतन्यघन । सर्वांघटीं एकची ॥ १४ ॥ नामा बोले प्रत्युत्तरीं । विठ्ठल आत्मा सर्वांतरीं । तरी
माझी चिंता दूरी । तो काय न करी स्वामिया ॥ १५ ॥ धीर धरून नावेक । दृष्टीस पाहावें कौतुक । मग नेत्र लाऊनि-
यां देख । यदुनायक आठविला ॥ १६ ॥ हृदयीं आणूनि पांडुरंगमूर्ती । नामा बोभाय सप्रेमगतीं । धांव धांव गा रु-
क्मिणीपती । कां मजप्रती मोकलिलें ॥ १७ ॥ तूंचि माझा मातापिता । तूंचि इष्ट मित्र बंधु चुलता । तूंचि माझी कु-
ळदेवता । आजि कां अनाथा मोकलिलें ॥ १८ ॥ तूंचि माझें संपत्तिधन । तूंचि माझें सिद्धांतज्ञान । तूंचि माझें योग-
साधन । आणीक न जाणें सर्वथा ॥ १९ ॥ आतां झडकरी येईं धांवत । ह्मणी पाहशील माझा अंत । अनाथनाथा कृ-
पावंत । मज दीनातें सांभाळीं ॥ २० ॥ ऐसें ह्मणतां तेवेळीं । अश्रु लोटले नेत्रकमळीं । ह्मणे धीर न धरवे वनमाळी ।
जीव तळमळी तुजविणें ॥ २१ ॥ कायावाचामनेंकरून । मी तुझें बाळक अज्ञान । आज तृषा लागतां जाण । जाऊं
शरण कोणासी ॥ २२ ॥ पुंडलीकवरदा रुक्मिणीरमणा । जन्मुनि ह्मणवितों तुझा पोसणा । आतां मोकलितां करुणा-
घना । लाज कवणासी येईल ॥ २३ ॥ अनाथनाथ ह्मणूनी । ऐसें वर्णिलें वेदपुराणीं । ती कीर्ती लटिकी आजिचे दि-
नीं । येईल होऊनि दिसताहे ॥ २४ ॥ नक्रें गांजितां गजेंद्रासी । सत्वर धांवला हृषीकेशी । तैसाचि मजला आजिचे

दिवशीं । अतिवेगेंसी पावावें ॥ २५॥ द्रौपदीस संकट पडतां जाण । सत्वर पावलासी तिजलागून । तें अवघेंचि कृपा-
ळुपण । गेलास विसरून दिसतसे ॥ २६॥ तीर्थासी पाठवितां रुक्मिणीपती । दिधलें ज्ञानदेवाचे हातीं । आज कां उ-
दास धरून वृत्ती । कृपामूर्ती येसीच ना ॥ २७॥ कृपाळु तूं जगदीश । ह्मणी करिसी माझा त्रास । धांवधांव नामा
कासाविस । जाहला उदास तुजविण ॥ २८॥ जरी तूं न येसी आजि येथें । तरी पिशुन हांसतील सर्व मातें । आतां
धांवूनि त्वरित । मज दीनातें सांभाळीं ॥ २९॥ इकडे भूवैकुंठपंढरपुरीं । निजभुवनीं असतां श्रीहरी । निजभक्ताचें
आर्त्त अंतरीं । नित्यानित्य सारिखा ॥ ३० ॥ कृपेचा वोसर असतां पोटीं । तंव रखुमाईस ह्मणे जगजेठी । एक वेळ
नामा पडतां दृष्टी । मग जीवापरता न करतों ॥ ३१ ॥ रुक्मिणी ह्मणे जी देवराया । आजि कां तयाची आली मा-
या । काय कष्ट जाहलें नामया । ह्मणोनि तुह्मी उद्विग्न ॥ ३२ ॥ ऐकूनि ह्मणे जगज्जीवन । आजि माझा लवतो डा-
वा लोचन । वामबाहु करितो स्फुरण । ह्मणोनि चिंता वाटते ॥ ३३॥ उद्वेग चित्तीं बहु वाटती । कवण्या भक्तासी
कष्ट होती । हें कळेना मजप्रती । ऐसें श्रीपती बोलिले ॥ ३४ ॥ वाजता वारा न लागे त्यांसी । माझिया राजसां
निजभक्तांसी । नकळे तहान भूक त्यांसी । लागली मज कळेना ॥ ३५ ॥ वचन ऐकोनियां रुक्मिणी । नावेक
पाहे विचारूनी । तंव नामयाचा शोकशब्द कानीं । अकस्मात पडियेला ॥ ३६ ॥ मग ह्मणे देवाधिदेवा । तृषा-
क्रांत नामा करितो धांवा । वेगें जाऊनि सांभाळावा । विलंब न करावा क्षणभरी ॥ ३७॥ ऐसें ऐकतांचि वचन । वेग
केला मनाहून । तंव गडगडीत कूप भरून । उचंबळोनि वर आला ॥ ३८॥ कौतुक देखोनि ज्ञानदेव । ह्मणे हें जाहलें
अभिनव । नाम्यानें केला ऋणी देव । कैशा रीतीं कळेना ॥३९॥ मग सावध करून तये क्षणीं । आलिंगिला प्रीतीक-
रूनी । ह्मणे तुज पावला चक्रपाणी । अघटित करणी दाविली ॥ ४० ॥ नळें पाषाण तारिले उदकीं । कां दंड तापवि-
ला वसिष्ठादिकीं । कीं गाधिसुतें प्रतिसृष्टि केली कीं । आपल्या जैसी प्रतापें ॥ ४१ ॥ कीं भगीरथें प्रयत्नयुक्तीं । भूत-
ळीं आणिली भागीरथी । कां प्रसन्न करून उमापती । गोदा आणिली गौतमें॥४२॥त्याहूनि अघटित केलें पाहे । हस्त-
नापुरीं उठविली मृतगाय । आतां तृषाक्रांत होतां पाहे । पाताळगंगा आणिली ॥ ४३॥ ऐसें बोलोनि नामयाप्रती ।
किंचित आणिली देहस्फूर्ती । मग उदक प्राशूनि निगुती । ज्ञानदेवासि बोलत ॥४४॥ ह्मणे मी जी घ्यावी आळ । ती
पुरवितो देव सकळ । कधीं देखेन तमालनीळ । निवतील डोळे तें माझे ॥ ४५॥ यावरी ज्ञानदेव बोलत । योगी बैसले
समाधिस्थ । तयांसि देखोन माझें चित्त । विश्रांति न पावेच सर्वथा ॥ ४६॥ तुह्मीच लागली अत्यंत प्रीती । आणिक
कांहीं नाठवे चित्तीं । तूं विष्णुभक्त सप्रेममूर्ती । रुक्मिणीपती वश केला ॥ ४७॥ केशव परमात्मा तुजजवळ । धन्य
नामया तुझें कुळ । धेनू देखोनि तान्हें बाळ । संतोष वाटे ज्या रीतीं ॥४८॥ तैसे देखोनि तुझे सद्गुण । सप्रेमें आनंदे मा-
झें मन । तीर्थयात्रा नावडे जाण । तुझें कीर्तन ऐकतां ॥ ४९ ॥ श्रुतिस्मृति आणि पुराणें । वेडावलीं हरीचे गुणें । वि-



सर्जिलीं योगध्यानें । तुझें प्रेम देखोनी ॥ ५० ॥ ऋषिगण आणि गंधर्व । विरिंची आदि इंद्रादिदेव । लक्षितां अरूपा-
चा ठाव । सप्रेमभाव धरूनी ॥ ५१ ॥ तयांसी प्राप्त नव्हेचि जाण । तो त्वां केला आपुले स्वाधीन । ऐसें ज्ञानदेवें ह्मणू-
न । धरिले चरण नामयाचे ॥ ५२ ॥ नामा जाहला तृषाक्रांत । ते स्थळीं अद्यापी कूप वाहात । यात्रा मारवाड देशांत ।
मार्गशीर्षांत भरतसे ॥५३॥ तें तीर्थमाहात्म्य वर्णितां सार । तरी ग्रंथ वाढेल थोर । असो ज्ञानदेव नामा सत्वर । निघते
जाहले तेथूनी ॥ ५४ ॥ नानादेशींचीं तीर्थें अनेक । दृष्टीस देखती सवेग । बद्रिकाश्रम देखोनि सांग । हिमाचळासी
पातले ॥ ५५॥ देखिला वोढ्याजगन्नाथ । जेथें बौद्धरूपें देव नांदत । कलियुगीं चमत्कार अद्भुत । अद्याप होती ते ठा-
यीं ॥ ५६॥ पाहूनि ओंकारममलेश्वर । केदारासि गेले सत्वर । मग उज्जयिनीस महंकाळेश्वर । देखिला साचार नि-
जदृष्टीं ॥ ५७॥ तें स्थळ पाहूनि नयनीं । परतले मग तेथुनी । परळी वैजनाथ देखोनी । सोरटीसोमनाथासी पावले
॥ ५८॥ श्रीशैलपर्वतीं मल्लिकार्जुन । वसत तेथें पार्वतीरमण । साठ वरुषेंपर्यंत जाण । वाट पाहे भक्तांची ॥ ५९ ॥ तें
स्थान देखोनि सत्वर । मग पाहिला घृष्णेश्वर । सेवाळतीर्थींचा महिमा थोर । नये साचार वर्णितां ॥ ६० ॥ मग ना-
सिकत्र्यंबकासी येऊन । कुशावर्त्तीं केलें स्नान । पंचवदनासी करूनि नमन । सत्वर तेथूनि निघाले ॥ ६१ ॥ पश्चिम
समुद्र देखोनि सत्वरीं । मग पावले श्रीभीमाशंकरीं । जनार्दन वंदोनि रामेश्वरीं । जाते जाहले तेधवां ॥ ६२ ॥ ऐसीं ए-
काहूनि एक आगळीं । तीर्थें आहेत भूमंडळीं । त्यांत हीं वरिष्ठ जीं बोलिलीं । पुराणप्रसिद्ध नामांकित ॥ ६३॥ अयो-
ध्या मथुरा आणि कांती । काशी द्वारावती अवंती । सातवी पुरी मोक्षदाती । पाहिल्या प्रीतीं अनुतापें ॥ ६४ ॥ आ-
णि बारा ज्योतिर्लिंगें थोर । इतुकींच सांगीतलीं साचार । इतर राहिलीं पृथ्वीवर । तीं पुस्तकीं कोठवर ल्याहावीं॥६५॥
जेविं दृष्टीस पाहतां निशापती । नक्षत्रें अनायासेंच दिसती । कीं वृक्ष उपडोनि देतां हातीं । शाखा येती अनायासें
॥ ६६ ॥ कां सुधारस प्राशितां त्वरित । सकळ औषधी आल्या त्यांत । कीं पठन करितांचि वेदांत । कळती अर्थ श्रुतीचे
॥ ६७॥ कीं अश्वत्थ नमितां साचार । वनस्पती पूजिल्या अठरा भार । नातरी दृष्टीस पडतां धरणीधर । इतरही नाग
देखिले ॥६८॥ कीं विष्णूसी वाहतां तुळसीहार । त्यांत आले षोडशोपचार । कीं दृष्टीं देखतां मृडानीवर।सकळ ताप-
सी देखिले ॥ ६९ ॥ कीं ऐरावताचें होतां दर्शन । सकळ पृथ्वीचे देखिले वारण । कीं तृप्त जाहलिया शचीरमण । इतर
सुरगण तोषती ॥ ७० ॥ नातरी दृष्टीं देखतां विनतासुत । सकळ अंडज आले त्यांत । कीं नयनीं पाहतां हिमालयपर्व-
त । स्थावर विदित जाहले कीं ॥ ७१ ॥ तेविं मोक्षदायक सप्तपुरी । आणि द्वादशलिंगांची वर्णिली थोरी । अन्यतीं-
र्थें असती महीवरी । तींही घडलीं अनायासें ॥७२॥असो रामेश्वर दृष्टीं देखोनी । उभयतां परतले तेथूनी । प्रेमळ भक्त
आणि ज्ञानी । नागनाथासी पैं आले ॥ ७३॥ माघवद्यचतुर्दशीस । शिवरात्रीपर्वकाळ विशेष । नामा ज्ञानदेव त्या
स्थळास । येते जाहले अवचित ॥ ७४ ॥ जेविं चैत्रशुद्धप्रतिपदेसी । साठसंवत्सर आले घरासी । कीं माघशुद्ध द्विती-

येसी । आला घरासी धर्मराव ॥ ७५ ॥ कीं अक्षयतृतीयेसि जाण । पाहुणे आले पितृगण । कीं वरदचतुर्थीकारण ।
गजवदनचि पातला ॥ ७६ ॥ श्रावणशुद्धपंचमीस । फणिवराचि आला घरास । नातरी चंपाषष्ठीस । ह्माळसाकांत ने-
टले ॥ ७७ ॥ कीं माघशुद्धसप्तमीस जाणा । भास्कर आला पाहुणा । कीं जन्माष्टमीस यादवराणा । पहुडला पाळणां
येऊनी ॥ ७८ ॥ कीं रामनवमीस कौसल्यासुत । खेळत पातला अकस्मात । नातरी विजयादशमीस । आली त्वरित
जगदंबा ॥ ७९ ॥ कीं आषाढीएकादशीप्रती । दृष्टीस देखिली श्रीविठ्ठलमूर्ती । प्रेमळभक्त आनंद मानिती । संतोष
चित्तीं न समाये ॥ ८० ॥ कीं कार्तिकशुद्धद्वादशीस । श्रीकृष्ण येती वृंदावनास । कीं मृडानीनायक त्रयोदशीस । प्र-
दोषकाळीं पैं येती ॥ ८१ ॥ कीं श्रावण अमावास्येसि साचार । गोठणीं आला नंदिकेश्वर । त्यापरीच नामा आणि ज्ञा-
नेश्वर । शिवरात्रीस पातले ॥ ८२ ॥ पुण्यक्षेत्र अवंढानागनाथ । दुजा कैलास ह्मणती भक्त । त्यास्थळीं पातले ते त्वरित ।
प्रेमानंदें ते काळीं ॥ ८३ ॥ तये तीर्थीं करूनि स्नान । सारिला नित्यनेम जाण । महाद्वारीं लोटांगण । सप्रेमभावें घात-
लें ॥ ८४ ॥ मग अंतरगृहीं निजप्रीतीं । दर्शना चालिले सत्वरगतीं । नागनाथासी पुनरावृत्ती । दंडवत घातलें ॥ ८५ ॥
ह्मणती अनाथनाथा पार्वतीवरा । स्मशानवासी खट्वांगधरा । कैलासपति दिगंबरा । विश्वेश्वरा विश्वपती ॥ ८६ ॥ ऐ-
सें ह्मणोनि तेवेळीं । मौळ स्पर्शिलें करतळीं । प्रेमळ जाणूनि चंद्रमौळी । संतुष्टला निजचित्तीं ॥ ८७ ॥ मग नामदेवें
येऊनि महाद्वारीं । कीर्तन आरंभिलें ते अवसरीं । टाळवीणा घेऊनि करीं । गर्जत गजरीं नामाचे ॥ ८८ ॥ हृदयीं चिं-
तून विठ्ठलमूर्त्ती । दोनी लाविलीं नेत्रपातीं । किंचित नाठवेचि देहस्फूर्तीं । विदेहस्थिती जाहलासे ॥ ८९ ॥ सांडो-
नियां मानापमान । सांडोनि दांभिकलोकाचरण । सांडूनि वासनेचें लक्षण । करी कीर्तन निजप्रीतीं ॥ ९० ॥ सां-
डोनियां भेदाभेद । द्वैतकल्पनेचा करून छेद । तोडूनि आशापाशबंध । नाचे स्वानंदप्रीतीनें ॥ ९१ ॥ टाळ मृदंग वी-
णा वाजत । सप्रेमभावें कीर्तन होत । जन मिळाले असंख्यात । श्रवण करावया आवडीं ॥ ९२ ॥ जैसा पौर्णिमेसी
रोहिणीकांत । संपूर्णकळा सुशोभित । देखोनि सागरा भरतें येत । प्रेम आल्हादें जैसें कां ॥ ९३ ॥ कां स्नेहसूत्र घालितां
फार । दीपक उंचावे होय थोर । अर्घ्यदान देतां द्विजवर । होय दिनकर जेविं सुखी ॥ ९४ ॥ कां सुधारस करितां पा-
न । देह राहे अमर होऊन । कीं उदार दाता वांटितां धन । याचक जाण आल्हादती ॥ ९५ ॥ नातरी पर्जन्य वर्षतां
जाण । अरण्यांत उंचावे जैसें तृण । कीं ब्राह्मणां मिळतां मिष्टपक्वान्न । परम संतुष्ट होताती ॥ ९६ ॥ तेविं नामयाचें
कीर्तन ऐकून । सुखी होती श्रोतेजन । प्रेम आल्हादें ऐकतां गुण । नेत्रीं अश्रु पडताती ॥ ९७ ॥ कंठ होऊनि सद्गदित ।
अंग जाहलें रोमांचित । श्रोतयांची विदेहस्थिति । जाहली निश्चित ते समयीं ॥ ९८ ॥ राजयानें टाकितां शौर्यतेज ।
सेना तैसीच होय सहज । कां मनेंच सांडितां विषयलाज । मग इंद्रियेंही विसरती ॥ ९९ ॥ तेविं नामदेवें टाकितां दे-
हभान । श्रोत्यांसी तैसें जाहलें जाण । श्रवणीं ऐकतां श्रीहरीचे गुण । विदेही होऊन बैसले ॥ १०० ॥ ध्यानांत आणू-



श्रीगणेशाय नमः । श्रीगोपाळकृष्णाय नमः । ऐका श्रोते नवल अद्भुत । आजि रसनेसि लाधलें परमामृत । ह्मणोनि तु-
ह्मांऐसे भाग्यवंत । नाहीं दिसत निजदृष्टीं ॥ १ ॥ देवांत श्रेष्ठ वैकुंठनाथ । त्यासही आवडती प्रेमळभक्त । तीं भक्तचरित्रें
अति अद्भुत । जाहलीं प्रकट निजभाग्यें ॥ २ ॥ संतचरित्रें गातां ऐकतां । संतोष वाटे रुक्मिणीकांता । जैसा रोहिणीपती-
चा उदय होतां । क्षीरसागर उल्हासे ॥ ३ ॥ कीं गजवदनाची करितां स्तुती । शंकरपार्वती संतुष्ट होती । कीं शिष्यास हो-
तां ज्ञानप्राप्ती । सद्गुरु डोलती निजप्रेमें ॥ ४ ॥ नातरी निजबाळकाचे वर्णितां गुण । जननीस वाटे समाधान । कीं नारदाचें
वर्णितां विरक्तपण । कमलोद्भव संतोषे ॥ ५ ॥ तेविं भक्तचरित्र प्रशंसितां । संतोष वाटे जगन्नाथा । मग प्रसन्न होऊन श्रो-
ता वक्ता । अक्षयपदा पाववी ॥ ६ ॥ ह्मणोनि सभाग्य तुह्मांकारण । यास्तव ह्मणितलें असें जाण । विष्णुपदाहूनि लाभ
कोण । थोर न दिसेची सर्वथा ॥ ७ ॥ मागिले अध्यायीं कथा रसाळ । आंवढ्यानागनाथीं फिरलें देऊळ । कौतुक देखोनि
विप्र सकळ । तटस्थ जाहले मानसीं ॥ ८ ॥ कैलासपतीस नमस्कारूनी । उभयतां निघाले तेथूनी । मग पंढरपुरास परतो-
नी । येते जाहले तेधवां ॥ ९ ॥ जैसी कन्या सासुरवासिनी । माहेरास चालिली परतोनी । उल्हास वाटे तिचे मनीं । तैसेंच
जाहलें नामया ॥ १० ॥ कीं गोवत्साची पडतां तुटी । तंव माय देखिली उठाउठी । लगबग धांवे तिचे पाठीं । तैसेंच जा-
हलें नामया ॥ ११ ॥ नातरी बाळक खेळतां बिदीसी । परतोनि जाय मातेपाशीं । हर्षें वोसंडे मानसीं । तैसेंच जाहलें ना-
मया ॥ १२ ॥ कीं पाडस क्रीडावया गेलें । परतोनि हरिणीपाशीं चालिलें । तें चित्तीं हर्षें वोसंडलें । तैसेंच जाहलें नामया
॥ १३ ॥ यापरी संतोष मानूनि चित्तीं । उभयतां चालिले सत्वरगतीं । सन्निध येतां अवचितीं । कळस दुरून देखिला १४
पंढरी दृष्टीस पाहिली जेव्हां । साष्टांग नमस्कार घातला तेव्हां । क्षेमालिंगन देतां बरवा । उल्हास वाटला दोघांसी १५
मग टाळ वीणा करीं घेऊन । सप्रेम करिती हरिकीर्तन । महाद्वारीं येऊन जाण । पुनः दंडवत घातलें ॥ १६ ॥ जैसी काठी
देतां टाकूनी । निश्चितपणें पडे धरणीं । तैसाच नामा लोटांगणीं । विदेही होऊन पडियेला ॥ १७ ॥ मग ज्ञानदेवें उठवूनि
सत्वर । किंचित आणिला देहावर । आपुले हातीं धरूनि कर । चालिला सत्वर पुढारा ॥ १८ ॥ मग शेजारमंडपीं येऊन ।
मागुती जेव्हां केलें नमन । तंव सिंहासनाखालीं उतरून । जगज्जीवन पुढें आला ॥ १९ ॥ नामयासी धरून पोटीं । सद्गदित
जाहला जगजेठी । इडापीडा घेऊनियां दिवटी । वोवाळूनि सांडिली ॥ २० ॥ मग नामा सद्गद होऊनी । अश्रु वाहती न-
यनीं । चरणकमळीं मस्तक ठेऊनी । मंजुळ वचनीं बोलत ॥ २१ ॥ ह्मणे बहुत शिणलों जगजेठी । आतां पाहें कृपादृष्टीं ।
तुजविण बहु जाहलों हिंपुटी । अंत पोटीं दिसेना ॥ २२ ॥ अज्ञानदशा होती अंतरीं । ह्मणोनि हिंडलों दारोदारीं । परि पं-
ढरीऐसें स्वप्नांतरीं । सौख्य कोठेंच दिसेना ॥ २३ ॥ उदंड तीर्थें प्रौढी अनेगें । परि माझें मन लागलें चंद्रभागे । दीनदयाळे
पांडुरंगें । करिसी भवभंग दासांचा ॥ २४ ॥ गरुडटके आणि पताका । जेथें नाहींत यदुनायका । त्या देवासि देखोनि शं-
का । माझ्या मनीं वाटतसे ॥ २५ ॥ त्यातें पाहतां नेत्रपातीं । मजला वाटे तुझी खंती । मग तुझें रूप आठवोनि चित्तीं । र-

हात होतों निवांत॥२६॥इष्टमित्र बंधु आप्त। तूंचि माझें कुळदैवत। ऐसें सांगूनि मग निवांत।नामा उगाच राहिला २७
यावरी ह्मणे रुक्मिणीपती। मजला फार होती खंती। निद्रा नयेच अहोरातीं। तुझी वाट पाहातसें॥२८॥ नामया गेला
होतासि दूरी। तैं उदास दिसे हे पंढरी। आणि तुझा विसर क्षणभरी। माझे अंतरीं न पडेची॥२९॥ आतां दृष्टीपासून नि-
राळा। नको जाऊं भक्ता प्रेमळा। माझे स्वरूपीं लावूनि डोळा। बैसें निश्चळ होऊनी॥३०॥तुज माझी अत्यंत गोडी। म-
जही तुझी बहुत आवडी। गोडी गुळातें न सोडी। तैशीच चोखडी निजप्रीती॥३१॥नातरी कमळिणी आणि गभस्ति।
एकमेकांची आवडी धरिती। तैशीच तुझी माझी प्रीती। जाण निश्चितीं नामया ३२ कीं चातक आणि जलधर। एक-
मेकां न पडे विसर। तेविं तुझी माझी प्रीत थोर।असे साचार नामया ३३ नातरी चंद्र आणि अपांपती। एकमेकांची अ-
त्यंत प्रीती। तैशी नामया तुझी संगती। माझे चित्तीं तूं तैसा ३४कीं तान्हया आवडे निजजननी। माता न विसंबे त्याला-
गुनी। तैसें तुझे माझे माझे मनीं। द्वैत स्वप्नीं नसेची ३५कोणी कापडी पडतां दृष्टी। तयासी पुसें तुझी गोष्टी। माझा नामा
तुमचे दृष्टीं। पडला होता कीं सुखरूप ३६ तहान भूक लागतां जाण। मजविण त्याची जाणेल कोण। अथवा जीवींची
निजखूण। कवणासी सांगेल तो ३७ तो खंती करून जीवा। करीत असेल माझा धांवा। दिवसनिशीं आणीक हेवा।
नसे ठाऊक तयासी॥३८॥मजविण नामयाकारण। कोण पुसेल भागशीण। कोणाचे साउलिये बैसोन। विश्रांती घे-
ईल क्षणभरीं॥ ३९॥ ऐसें ह्मणून जगजेठी। संतांसि सांगे गुजगोष्टी। मजविण नामा होऊनि कष्टी। प्राण कंठीं धरि-
ला असे॥ ४०॥ मग बाहें कवळूनि जगज्जीवन। नामयासि दिधलें आलिंगन। मग कुरवाळूनियां वदन। नेत्र पुसिले
निजकरें॥ ४१॥ सुमन तुळशीची काढूनि माळा। घातली नामयाचे गळां। सर्वांग सादर घनसांवळा। कृपादृष्टीं पा-
हातसे॥ ४२॥ तंव भेटीस आले वैष्णव वीर। निवृत्ति आणि ज्ञानेश्वर। सोपान विसोबा खेचर। नरहरि सोनार निज-
भक्त॥४३॥ऐसे मिळूनि तयेक्षणीं। लोटांगणें घातलीं धरणीं। नामयासि आलिंगन देऊनी। जयजयकारें गर्जती ४४
तंव निर्जर येऊनि गगनीं। अनिवार सुमनें टाकिलीं त्यांनीं। जयजयकारें गर्जोनि ध्वनी। प्रेमानंदें डोलती॥४५॥क्र-
प्सिरण आणि गंधर्व। चतुर्मुख इंद्रादि देव सर्व। दृष्टीस सुख व्यावया सर्व। आले तत्काळ ते समयीं॥ ४६॥ तंव पंचार-
ती घेऊनि करीं। रुक्मिणी आली सत्वरी। देवभक्त ते अवसरीं। वोवाळिले निजप्रीतीं॥ ४७॥ धरूनि नामयाची ह-
नुवटी। माता पाहे कृपादृष्टीं। तंव नामयासि पुनः जगजेठी। काय गोष्टी बोलत॥ ४८॥ ह्मणे नामया ऐक मात। तीर्थें
पाहिलीं तुवां समस्त। जन्मा येऊनि केलें स्वहित। पुरविलें आर्त मनींचें॥४९॥ आतां यात्रा व्हावया संपूर्ण। करीं ना-
मया उद्यापन। विधियुक्त आचरून। हेतु संपूर्ण करावे॥ ५०॥ तुवां बहुत कष्ट केले देख। तयांचें होईल सार्थक। सां-
गतों हें नामया ऐक। देव बोलत निजप्रीतीं॥ ५१॥ अनेक तीर्थें केलीं जाण। त्यांचें न करितां उद्यापन। जैसें षड्रस
रांधिलें अन्न। शेवटीं भोजन न केलें॥५२॥ कां पुराणें ऐकिलीं बहुत। तीं मननाविणें गेलीं व्यर्थ। नातरी अलंकार घ-



डिले सुयुक्त। न लेतां व्यर्थची॥५३॥ नातरी आरोग्य व्हावया काया। औषध घेतलें नामया। परी पथ्य न करितां वा-
यां। उपयोगी न पडे सर्वथा॥५४॥ तेविं सप्तपुन्यासमवेत। तीर्थें पाहिलीं तुवां बहुत। उद्यापन न करितां जाती व्यर्थ।
असे शास्त्र या रीतीं॥५५॥ तरी पुण्यक्षेत्र हें पंढरी। भूवैकुंठमहीवरी। जे विख्यात चराचरीं। उपमा द्यावया नसेची
॥५६॥ द्विजांसि अन्न अर्पितां येथ। तरी मी कल्पपर्यंत होतसें तृप्त। आतां क्षेत्रवासी ब्राह्मण समस्त। आणावे त्वरित
भोजना॥ ५७॥ पूजा करूनि उपचारेंशीं। षड्रस भोजन द्यावें त्यांसी। तांबूल दक्षिणा द्विजवरांसी। निजभावेंशीं अ-
र्पावीं॥ ५८॥ ऐसें बोलोनि श्रीपती। मग नामयासि धरूनि हातीं। अंतरमंदिरीं सत्वरगतीं। घेऊनि गेला तेधवां॥५९॥
मग हास्यवदन शार्ङ्गधर। रुक्मिणीस बोले करुणाकर। नामयासि माझी प्रीती थोर। न करवे दूर सर्वथा॥६०॥ नाना
तीर्थें करून। आज करितों उद्यापन। ऐसें ह्मणतां जगज्जीवन। जगन्माता बोलत॥६१॥ ह्मणे जी ब्रह्मांडनायका। ना-
मा तुमचा परम सखा। माया ममता टाकूनि देखा। भजतो एका निजभावें॥६२॥सर्व उद्योग टाकिले यानें। कोण क-
रील उद्यापन। तुह्मांसि बांधिलें सेवा करून। अहंता ममता टाकूनी॥ ६३॥ अनंत जन्म घेऊनि पाहीं। यानें जोडिलें
सुकृत कांहीं। तें अवघेंचि तुमचे पायीं। निक्षेपिलें निजप्रीतीं॥ ६४॥ घेऊन अपार जळलोट। सरिता सागरीं झाल्या
प्रविष्ट। तैसा नामा एकनिष्ठ। अनुसरला तुह्मांसी॥ ६५॥ ह्मणोनि याचें कौतुक सांग। करावें लागेल आपुलेनि अंगें।
ऐसें ऐकतांचि श्रीरंग। हास्यवदन जाहले पैं॥६६॥ रुक्मिणी ह्मणे जी पुरुषोत्तमा। अद्भुत नामयाचा प्रेमा। निजमुखें
वर्णूं न शके ब्रह्मा। नित्य नवा अनुपम॥६७॥ आतां सत्वर जावे चक्रपाणी। नामयासि सवें घेऊनी। आमंत्रण ब्राह्म-
णांसी देऊनी। शीघ्र आलें पाहिजे ६८ सर्वसिद्धि अनुकूल असतां। करणें नलगे कांहीं चिंता। इच्छामात्रें पंढरीनाथा।
काय न होय तुमचेनी।६९।कामधेनूच्या पाडसासी। चरणें न लागे डोंगरासी। कीं दीपसायास भास्करासी। करणें न
लागेची सर्वथा।७०। कीं अवर्षण पडेल ह्मणूनियां। उदधीस चिंता कासया। सुधारस सदां सेवी तया। पथ्य कासया
पाहिजे७१शीतळ उपचार व्हावयास।चंद्रें करावे कां सायास। कीं काव्यरचना सरस्वतीस।होणें अवघड कासया ७२
करावया विघ्नाचें निवारण। गजवदनासी नलगे प्रयत्न। कीं हातींचें पाहावया कांकण।दर्पण कासया पाहिजे७३तेविं
नामयाची करावया समाराधना।आयास न लागती जगज्जीवना। ऐसें ऐकूनि वैकुंठराणा।जाता जाहला ते समयीं७४
नामयाचा हात धरूनि करकमळीं। सत्वर चालिले वनमाळी। सवें घेऊनि भक्तमंडळी। समारंभें करूनियां॥७५॥ नि-
वृत्ति आणि ज्ञानेश्वर। सोपान विसोबाखेचर। चोखा नरहरीसोनार। वंका काठीकार तो॥ ७६॥ दोहीं बाहीं सनका-
दिक। चालती पहात कौतुक। नामयाचे पाठीसी यदुनायक। चालत देख निजप्रीतीं॥७७॥ पाठीसी चालावया का-
य कारण। तेंही तुह्मांस सांगतों खूण। नामयाचे लागावया रजचरण। जगज्जीवन इच्छीतसे॥ ७८॥ ऐसें ऐकूनियां व-
चन। आशंका धरितील विचक्षण। देव भक्तांचे रजचरण। कैशा रीतीं इच्छील॥७९॥ तरी तीर्थावळींत साचार। स्व-

मुखें बोलिला जगज्जीवन । तोचि धरूनियां आधार । म्यांही लिहिलें तैसेंचि ॥ ८० ॥ येरवीं शरणागतां शरण । स्वमुखें
बोलिला जगज्जीवन । तो करुणासागर कृपाघन । काय एक करीना ॥ ८१ ॥ दीनबंधु दीननाथ । बिरुदावली जगवि-
ख्यात । ह्मणऊनि श्रोतीं आशंकित । सर्वथा चित्त न कीजे॥८२॥ असो काय बोलोनि बहुत । निजखूण जाणती वैष्णव
भक्त । विप्रांसि द्यावया आमंत्रण त्वरित । रुक्मिणकांत चालिले॥८३॥निजदासांचा अभिमान । सिद्धी न्यावया ज-
गज्जीवन । गृहस्थ व्यापारी ब्राह्मण । जाहले यजमान भक्तांचे ॥ ८४ ॥ वैष्णवांसहित यादवराणा । करीत क्षेत्रप्रदक्षि-
णा । ब्राह्मणांसी पाहतां वैकुंठराणा । वाळुवंटासी पातले ॥ ८५॥ तो अनाथनाथ रुक्मिणीवर । दीनदयाळ करुणा-
सागर । दृष्टीस देखतां द्विजवर । केला नमस्कार सद्भावें ॥८६॥ पंडित वैदिक ब्राह्मण । सदाचारी श्रोते निपुण । दृष्टीस
देखोनी जगज्जीवन । विस्मित मन तयांचें ॥ ८७॥ गृहस्थरूप धरिलें जगज्जीवनें । परि न लोपती षड्गुणैश्वर्यचिन्हें ।
जैसें पितळेमाजी सोनें । न झांकेचि सर्वथा ॥ ८८ ॥ कथिलामाजी रुपें निर्मळ । कीं प्रपंचांत भक्त प्रेमळ । पाषाणांत प-
रिस केवळ । न झांकेचि सर्वथा॥८९॥ कीं बनस्पतीमाजी जैसी तुळसी । सरितेमाजी गंगा जैसी । तेविं निजभक्तमेळीं
वैकुंठवासी । न झांकेचि सर्वथा॥९०॥हिरकण्यांमाजी हिरा दिसे । कीं पक्वान्नताटीं सुधारस । कीं नक्षत्रामांजी भासे ।
चंद्रमा जैसा सोज्वळ॥९१॥तेविं वैष्णवमेळीं शार्ङ्गधर । देखोनि विस्मित द्विजवर । मग काय बोलती मधुरोत्तर । सौ-
ख्य अपार मानुनी ॥९२॥ तुमचें स्वरूप देखोन । त्रिविधताप मावळले जाण । आपुलें सांगा नामाभिधान । केलें आग-
मन कोठोनी ॥९३॥ कवण वृत्ति साचार । कवण चालवा व्यापार । कोठें योजिलें बिढार । ऐसा विचार कळोंद्या॥९४॥
ऐसी ऐकूनि द्विजवाणी । काय बोलती चक्रपाणी । माझें कुळ आणि वृत्ति दोनी । या भक्तांसी ठाउकी ॥ ९५ ॥ मी तो
अजित असंग । परि अनंतजन्मीं यांचाचि संग । यांचें आमचें निजांग । निकट वोळखी सर्वदा॥९६॥ आणि साक्ष क-
रूनि तुमचे चरण । यथार्थ बोलतों सत्यवचन । नामयाचा मी मैत्र जाण । अंतरंग सर्वदा ॥९७॥कांहीं आशंका असेल
चित्तीं । तें गुज पुसावें संतांप्रती । निःसंदेह करून वृत्ती । भोजनासी आलें पाहिजे॥९८॥बिऱ्हाड घेतलें देउळांत । नाम
पुसाल तरी अनंत । स्नानविधी करूनि त्वरित । यावें शीघ्र भोजना॥९९॥ ऐसी ऐकूनि अमृतवाणी । भूदेव आनंदले म-
नीं । अवश्य ह्मणोनि तये क्षणीं । पाकसिद्धि कराविली ॥१००॥ ऐकूनियां जगज्जीवन । देउळासि आले परतून । रुक्मि-
णीपाशीं वर्तमान । जाहलें तैसें सांगती ॥१॥ ह्मणे प्राणवल्लभे ऐक मात । विप्रांसि प्रार्थूनि आलों समस्त । परी कर्मठ अ-
भिमानी आह्मांस । नोळखतीच सर्वथा ॥ २ ॥ माझें देखोनि स्वरूपतेज । तयांसि वाटलें अतिचोज । त्यांणीं कुळवृत्ति
पुसिली मज । म्यां सांगितलें काज सकळिक ॥ ३ ॥ मी त्यांसि बोलिलों स्ववाचा । सांगाती आहें संतांचा । जिवलग
मैत्र नामयाचा । आहें साचा अंतरंग ॥ ४ ॥ बिऱ्हाड पुसिलें द्विजवरीं । सांगितलें म्यां देउळाभीतरीं । नाम पुसतांचि
सवत्रीं । अनंत ऐसें सांगीतलें ॥ ५ ॥ ऐसी सांगीतली संकेतखूण । परि तयांसी नव्हेचि आठवण । ऐसें बोलूनि जगज्जी-



नि जगजेठी । आल्हादें टाळिया पिटिती । विठ्ठलनामें गर्जना करिती । आनंद चित्तीं न समाये ॥ १ ॥ तंव विप्रीं क-
रून स्नान । सर्वांगासी भस्म चर्चून । रुद्राक्षमाळा गळां घालून । धोत्रें वोलीं पांघुरले॥२॥ अर्घ्योदक घेऊनि करीं । पूजा
घेतली षोडशोपचारीं । अभिषेक करावयासी सत्वरीं । महाद्वारासी पैं आले ॥ ३॥तंव तेथें नामा कीर्तन करित । प्रेमा-
नंदें गात नाचत । यात्रा मिळाली अगणित । न दिसे मार्ग जावया ॥४॥ वरिवरी केलें संध्यास्नान । अंतरीं विकल्पें वि-
टाळे मन । लोकांसि ह्मणती आह्मांलागून । स्पर्श कराल व्हा परते ॥ ५ ॥ अंतरीं असतां क्रोध खळ । त्यांसि अवघेंचि
भासे अमंगळ । दृष्टीस कोणी न दिसे निर्मळ । विकल्पजाळीं पडियेले ॥ ६ ॥ हरिकीर्तनीं विटाळ नाहीं । तैसाचि ब्रह्म-
सभेचिये ठायीं । शिवविष्णूचे दर्शनास पाहीं । जातां विटाळ न मानावा ॥ ७ ॥ गीता भागवत पुस्तकासी । स्पर्शे ह्म-
णेल तो पापराशी । दूषण ठेविल वेदांतासी । तोही तैसाचि जाणावा ॥८॥ ऐसें न जाणून ते समयीं । ब्राह्मणीं चि-
कित्सा मांडिली पाहीं । सक्रोध होऊनि लवलाहीं । लोकांसि बोलती अपशब्द ॥९॥ ह्मणती व्यर्थचि कांरे गागतां ।
टाळ्या पिटोनि हांका मारतां । हें तंव पंढरीसचि होय मान्यता । नागनाथासि नावडे ॥ ११० ॥ ज्याचें त्यासच बो-
ललें जाण । दुग्धांत कासया पाहिजे लवण । भाजीस शर्करा लावितां जाण । रुचि नयेची सर्वथा ॥ ११ ॥ कर्णासि
दावितां परिमळ । तया नयेचि तो केवळ । नेत्रांलागोनि गोष्टी प्रांजळ । व्यर्थ कासया सांगाव्या ॥ १२॥ जिव्हेसि
दाविला आरसा । तीस पाहतां न दिसे सहसा । नेत्रांसि दावितां स्वादरसा । नये जेवितां तयासी ॥१३॥ तेविं कैला-
सपती उमारमण । त्यासि नावडे हरिकीर्तन । आतां पंढरीस जाऊन । नाचा निर्लज्ज होऊनी ॥ १४ ॥ ऐसें बोलतां
द्विजवर । श्रोते देती प्रत्युत्तर । भिन्न न ह्मणावे हरिहर । तुह्मीं विचार करून ॥ १५ ॥ जैसें तीर्थ आणि जळ । भिन्न नसे-
चि अळुमाळ । नातरी गोडी आणि गुळ । अभिन्न केवळ सर्वदा ॥१६॥ दीप आणि प्रकाश जाण । पुष्प मकरंद नव्हती
भिन्न । कीं वासरमणी आणि किरण । अभिन्नपणें असती ॥१७॥ कीं मेघ आणि जळ । भिन्न न ह्मणावे केवळ । कीं रत्न
आणि त्याची कीळ । निवडूं नये सर्वथा ॥१८॥ कीं पक्वान्न आणि त्याचा स्वाद । दोहींत निवडावा काय भेद । नातरी
वाद्य आणि नाद । असती अभेद सर्वदां ॥ १९ ॥ तेविं शिव विष्णु दोनी एक । ऐसें बोलती सर्वज्ञ लोक । कीर्तन ऐकूनि
मदनांतक । आनंदें डोलत निजप्रीतीं ॥ १२० ॥ ऐकूनि श्रोतयांचें उत्तर । संतप्त जाहले द्विजवर । आह्मांसी ज्ञान सां-
गती पामर । चित्तीं बडिवार धरूनी ॥२१॥ आह्मी ब्राह्मण उंचवर्ण । शास्त्राधिकारी सर्वज्ञ । नामदेवाचें सिद्धांतज्ञान ।
आमुचे मना नये कीं ॥ २२॥ आतां सत्वर जावें येथून । नाहीं तरी करूं ताडन । ऐसें बोलतांचि ब्राह्मण । कोणीच उ-
त्तर न देती ॥ २३ ॥ विलंब जाहला शिवपूजेसी । मार्ग न होय जावयासी । एक ह्मणती नामयासी । पिटोनि लावा
सत्वर ॥ २४ ॥ स्पर्श झाला आपणाकारण । तरी पुनः करूं सचैलस्नान । ऐसें ह्मणून दोघेजण । कीर्तनरंगीं प्रवेशले २५
जैसें दान देतां सत्पात्राप्रती । कुपात्र चित्तीं चरफडती । तेविं नामयाच्या कीर्तनाप्रती । विप्र अवचित चालिले ॥२६॥

सक्रोधें ह्मणती नामयाला । व्यर्थ कासया गलबला मांडिला । शिवदर्शनालागीं जावयाला । मार्ग आह्मां न फुटेची ॥ २७ ॥ तुवां टाकूनि देहभान । आपुल्याऐसेचि केले जन । आमुचें बुडविलें कर्माचरण । सिद्धांतज्ञान कथूनियां । ॥ २८ ॥ आतां देउळामागें उभा राहून । तेथें निर्लज्ज करी गायन । नामदेवें ऐकूनि वचन । केलें नमन विप्रांसी ॥ २९ ॥ अवश्य ह्मणूनि बोलून उत्तर । तेथूनि निघाला वैष्णववीर । कीर्तनरंग साचार । वितळोनि गेला ते समयीं ॥ १३० ॥ जैसा कुंभ भरला तीर्थेंकरून । त्यांत मद्य पडे येऊन । कीं दुग्धामाजी घालितां लवण । नासोनि जाय तत्काळ ॥ ३१ ॥ कीं उगाळूनि ठेविला चंदन । तयांत अवचिता पडला लसुण । कीं कस्तूरींत कालविला हिंगण । नाश होय सहजची ॥ ३२ ॥ तेविं उठोनि चालतां विष्णुदास । वितळोनि गेला कीर्तनरस । देखोनि श्रोतयांच्या चित्तास । वाटले क्लेश बहुतची ॥ ३३ ॥ जैसें पक्वान्न पात्रीं वाढिलें । तें अवचित कागें उचलिलें । कीं प्रवासाहूनि येतां भलें । तस्करें लुटिलें अवचित ॥ ३४ ॥ यापरी विषाद मानून मनीं । सभा उठिली तेथूनी । नामदेवाच्या मागूनी । जाते जाहले सकळिक ॥ ३५ ॥ शिवालयाचे पृष्ठभागीं । नामदेवाचे सत्संगीं । जाऊनि बैसले कीर्तनरंगीं । अवघेची तेधवां ॥ ३६ ॥ अस्तमान होतां दिनकरासी । किरणही जाती तयासरसीं । कीं नृपवर जातां अरण्यासी । सेनाही सरसीं जातसे ॥ ३७ ॥ कीं ज्या दिशेस धांवे पवन । मेघही तिकडेच करी गमन । तेविं नामदेवाचे मागून । श्रोतेजन आले कीं ॥ ३८ ॥ आल्हादें गर्जोनि ते वेळीं । हरिनामें पिटिली टाळी । विष्णुदासाचे नेत्रकमळीं । अश्रुपात लोटले ॥ ३९ ॥ ह्मणे धांव वेगीं पतितपावना । अनाथनाथा रुक्मिणीरमणा । मज विदेशीं जगज्जीवना । कां मोकलून दीधलें ॥ १४० ॥ आज हरिणीनें टाकिलें पाडस । कीं पक्षिणी विसरली अंडजास । कीं निजमायेनें बाळकास । अरण्यांत टाकिलें ॥ ४१ ॥ चातकांसि मेघ विसरला । कीं चकोरांवरी चंद्र क्षोभला । नातरी कमळिणीवरी राग धरिला । वासरमणीनें ज्यापरी ॥ ४२ ॥ आज चैतन्यें देहासि टाकिलें । कीं दृष्टीनें नेत्रांसी अव्हेरिलें । कां वायूनें प्राणासि मोकलिलें । तैसेंचि जाहलें विपरीत ॥ ४३ ॥ अहो पंढरपुरनिवासिनी । विठाबाई कुळस्वामिनी । माझा विसर तुजलागूनी । कवणेपरी पडियेला ॥ ४४ ॥ समुद्रवलयांकित हिंडोनी । सकळ तीर्थें पाहिलीं नयनीं । परि तुजऐसें दृष्टीं कोणीं । दैवत नाहीं देखिलें ॥ ४५ ॥ समचरण कटिकर । ठाण गोजिरें सुकुमार । पाहतां ध्यान दिगंबर । समूळ विरे देहभान ॥ ४६ ॥ टाळ वीणा मृदंग वाजती । गरुडटके पताका शोभती । दृष्टीस पाहतां नेत्रपातीं । लवों विसरती चपळत्वें ॥ ४७ ॥ ऐसा नामा सद्गदित । होऊनि चिंतिला रुक्मिणीकांत । तों नवल वर्तलें अति अद्भुत । ऐका पवित्र भाविकहो ॥ ४८ ॥ नवलक्ष पताका स्वर्गींहूनी । उतरल्या जैशा सौदामिनी । कीर्तनरंगीं येऊनीं । उभ्या ठाकल्या अकस्मात ॥ ४९ ॥ त्या नवलक्ष ध्वजा नव्हेति केवळ । नवविध भक्तीचें उतरलें फळ । कीं नवरसचि होऊनि प्रांजळ । आले तत्काळ कीर्तनीं ॥ १५० ॥ ऐसें कौतुक देखोन । विस्मित जाहले सकळजन । तटस्थ पाहत राहिले नयन । नाठवे



देहभाव कोणासी ॥ ५१ ॥ तेणें आनंद विष्णुदासासी । उल्हासूनि निजमानसीं । विठ्ठलनामें करून हर्षी । नाचे कीर्तनीं निजप्रेमें ॥ ५२ ॥ कृष्णपक्षींची यामिनी । दाटली होती तमेंकरूनी । पताकातेजें दिशा भरूनी । कोंदाटल्या सकळिक ॥ ५३ ॥ नामयामनीं आल्हाद थोर । टाळियानादें भरलें अंबर । देव वर्षती पुष्पसंभार । कौतुक अपार जाहलें ॥ ५४ ॥ आनंदें कर उभारूनी । टाळया चुटक्या वाजविती ध्वनी । चौसष्टी कळा उभ्या राहूनी । तटस्थ पाहती कौतुकें ॥ ५५ ॥ तंव नामा कल्पी निजमनांत । सर्व साहित्य अनुकूल येथ । करीतसे पंढरीनाथ । परी न्यून दिसे एकची ॥ ५६ ॥ नागनाथें विमुख होऊनी । पाठ दिधली हरिकीर्तनीं । काय अपराध आला घडोनी । मजकडूनि कळेना ॥ ५७ ॥ शिवालय असतें समोर । तरी कथेसि रंग येता फार । कां न पावेच रुक्मिणीवर । कोप मजवर कां धरिला ॥ ५८ ॥ ह्मणे जयक्षीरसागरविहारा । लक्ष्मीकांता अति उदारा । अनाथनाथा करुणाकरा । पाव सत्वर मजलागीं ॥ ५९ ॥ जय गजेंद्रमोचका करुणालया । विधिजनका यादवराया । नाममात्रें निरसोनि माया । पाव सत्वर मजलागीं ॥ १६० ॥ उपमन्यें घेतली आळ । त्यासि दिधला क्षीरसागर । तैशा रीतीं होऊनि दयाळ । पाव सत्वर मजलागीं ॥ ६१ ॥ द्रौपदीची रक्षावया लाज । तिजला केली चतुर्भुज । तैसाचि कृपाळु होऊन आज । पाव सत्वर मजलागीं ॥ ६२ ॥ अविंधें मारिली कीर्तनीं गाय । तैं तुज संकट घातलें माय । तेव्हां पावलीस लवलाह्य । जीवविली धेनु क्षणमात्रें ॥ ६३ ॥ तृषा लागतां वनांतरीं । तैं तूं पावलासि झडकरी । आतां कां निष्ठुर अंतरीं । नयेसी लवकरी विठ्ठला ॥ ६४ ॥ मजकडे करून पाठी । राउळीं बैसला धूर्जटी । आतां पाहूनि कृपादृष्टीं । पाव जगजेठी मजलागीं ॥ ६५ ॥ ऐसा नामा सप्रेमभरित । कीर्तनामाजी विलपत । तों नवल वर्तलें अद्भुत । परिसा भक्त भाविकहो ॥ ६६ ॥ पूर्वाभिमुख होतें देऊळ । तें पश्चिमेस फिरलें तत्काळ । आश्चर्य करिती लोक सकळ । धन्य काळ सुदिन तो ॥ ६७ ॥ प्रेमानंदें पिटोनि टाळी । आनंदली भक्तमंडळी । ह्मणती चंद्रमौळी ये काळीं । नामया निश्चयें पावला ॥ ६८ ॥ नामयाचें ऐकोनि कीर्तन । देउळासमवेत पार्वतीरमण । पश्चिम दिशेस मुख करून । करीत श्रवण निजप्रीतीं ॥ ६९ ॥ नामयाची भक्ती अद्भुत । देखोनि श्रोते आनंदभरित । तयांप्रती नामा विनवित । कर्ता दयाळ श्रीहरी ॥ १७० ॥ शिवरात्रीचे यामिनींत । कीर्तन केलें अति अद्भुत । तों वासरमणी उदयास येत । तेजयुक्त देखिला ॥ ७१ ॥ पूजा विसर्जन होतांचि जाण । देउळाबाहेर आले ब्राह्मण । तों सन्मुख नामयाचें कीर्तन । प्रेमानंदें होतसे ॥ ७२ ॥ तीर्थीं करूनि प्रातःस्नान । देऊं पाहती अर्घ्यदान । ह्मणती पश्चिमदिशे सहस्रकिरण । उदयासि आला दिसताहे ॥ ७३ ॥ कीं आपणा पडली दिशाभुली । कीं जागृतीनें भ्रांती पडली । नातरी नामयासि चंद्रमौळी । प्रसन्न जाहला वाटतें ॥ ७४ ॥ मग विवेक करूनियां चित्तें । पहाते झाले सभोंवते । तों तीर्थ तैसेंचि पाहती खालतें । न दिसे समवेत त्याठायीं ॥ ७५ ॥ देऊळमात्र फिरूनि देख । जाहलें नामयासन्मुख । आणि दिव्यपताका अनेक । चपळेऐशा दीसती ॥ ७६ ॥ ऐसें देखोनि सत्वर ।

आश्चर्य करिती द्विजवर । ह्मणती नामयाचा पार । ब्रह्मादिकां कळेना ॥ ७७ ॥ आपण धरूनि कर्माभिमान । वायांच केलें त्याचें छळण । ऐसा अनुताप मनीं धरून । कीर्तनरंगीं पातले ॥ ७८ ॥ नामयास ह्मणती द्विजवर । धन्य तूं प्रेमळ वैष्णववीर । पूर्ण उद्धवाचा अवतार । कळलें साचार आह्मांसी ॥ ७९ ॥ नाहीं ऐकिलें देखिलें नयनीं । तैसीच करून दाविली करणी । धन्य नामया तुझी जननी । सभा सभाग्यें आथिली ॥ १८० ॥ ऐसी अद्भुत तुझी कीर्ती । फांको आतां त्रिजगतीं । पृथ्वी चंद्र आणि गभस्ती । जोंवरी दिसती साकार ॥ ८१ ॥ तोंवरी हें तुझें चरित्र । मुखें गाती भक्त पवित्र । कानीं ऐकती त्यांचे श्रोत्र । पावन होती क्षणमात्रें ॥ ८२ ॥ ऐसें बोलोनि द्विजवर । सद्भावें करिती नमस्कार । ह्मणती नामया तुझा पार । ब्रह्मादिकां न लागेची ॥ ८३ ॥ दुर्वासें अभिमान धरून । अंबरीषाचें केलें छळण । संकट जाणोनि जगज्जीवन । गर्भवास अंगीं सोशिले ॥ ८४ ॥ कीं प्रतिष्ठानींचे द्विजवर । तींहीं छळिला ज्ञानेश्वर । मग रेड्यामुखीं साचार । वेद जैसे बोलविले ॥ ८५ ॥ तैसेंच अघटित तुवां केलें । शिवालयासि साक्षात फिरविलें । तंव नामयानें नेत्र उघडिले । सद्गद होऊनि तेधवां ॥ ८६ ॥ मग प्रेमें करूनि आरती । ओवाळिला रुक्मिणीपती । साष्टांग नमस्कारून प्रीतीं । खिरापती तेव्हां वांटिल्या ॥ ८७ ॥ पताका उडोनि तये क्षणीं । सत्वर गेल्या वैकुंठभुवनीं । उर्ध्वमुख करूनि नयनीं । जन पाहाती कौतुक ॥ ८८ ॥ शिवालय फिरविलें ते अवसरीं । तें तैसेंचि असे अद्यापवरी । भक्ताभिमानी श्रीहरी । संकट निवारी निजांगें ॥ ८९ ॥ देवांत श्रेष्ठ रुक्मिणीकांत । कीं वैष्णवामाजी नामा भक्त । याचे साम्यतेसी निश्चित । नाहीं दिसत त्रिभुवनीं ॥ १९० ॥ उपमा द्यावी अमृतास । ऐसा कोणता आहे रस । सागराचे उपमेस । सरिता कोठोनि आणावी ॥ ९१ ॥ पुढील अध्यायीं रस अद्भुत । ग्रंथ वदवील रुक्मिणीकांत । महीपती त्याचा मुद्रांकित । शरणागत संतांचा ॥ ९२ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । द्वादशाध्याय रसाळ हा ॥ १९३ ॥ अध्याय १२ ॥ ओव्या १९३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

अ० १२ समाप्त.

वन । हास्यवदन जाहले ॥ ६ ॥ रुक्मिणी ह्मणे शार्ङ्गधरा । सदा भेद तयांचे अंतरा । विद्या अभिमान असतां बरा । जगदुद्धारा न भेटती ॥ ७ ॥ याति कुळ पवित्र ह्मणऊनी । अनुताप नव्हे त्यांचे मनीं । त्यांसि दर्शन चक्रपाणी । कैशापरी घडेल ॥ ८ ॥ कामीळ होतां नेत्रासी । पीतवर्ण चंद्र भासे त्यासी । कीं नवज्वर असतां शरीरासी । कडवट अन्नासी तो ह्मणे ॥ ९ ॥ तेविं कर्मठपणाचा अभिमान । असतां न रुचे भक्तिज्ञान । सद्भावाविण तुमचें दर्शन । नव्हेचि जाण सर्वथा ॥ ११० ॥ निजभाग्येंकरूनि देवदेवा । सांपडलासि वैकुंठीचा ठेवा । आजि नामयाच्या निजदैवा उजरी जाहली वाटतें ॥ ११ ॥ ऐसें बोलतां विश्वजननी । तों नवल वर्तलें तये क्षणीं । साहित्य करावयालागूनी । अष्ट सिद्धी पातल्या ॥ १२ ॥ इच्छामात्रें तया अवसरीं । येऊनि ठाकल्या महाद्वारीं । त्यांहीं सिद्ध करून सर्व सामग्री । चंदनसडे घातले ॥ १३ ॥ भागवतधर्मैं संमार्जन करुनी । गुढिया उभविल्या वृंदावनीं । नवविध पताका लाविल्या गगनीं । कौतुक नयनीं दाखविलें ॥ १४ ॥ भवनें श्रृंगारूनि सायासें । ह्मणती कोण पुण्य केलें विष्णुदासें । निर्गुणासि लाविलें लोभपिसें । विस्मित मानसें सकळांचीं १५ मोतियांचे चौक रंगमाळा । दीपावळी उजळिल्या ते वेळां । अभिनव मांडिलासे सोहळा । भक्तप्रेमळाकारणें ॥ १६ ॥ आनंद मांडिला अतिगजरें । हर्षैं वाजती मंगळतुरें । भक्त गर्जती जयजयकारें । स्वानंदभरें तेधवां ॥ १७ ॥ मग नामयास ते वेळे । मंगळमार्जन करविलें । विधिमंत्रोक्त आरंभिलें । पुण्याहवाचन तेधवां ॥ १८ ॥ सत्यभामा राही रुक्मिणी । येती अक्षय्यवाणें घेऊनी । जैशा विद्युल्लता मेघसदनीं । सतेजपणें चमकती ॥ १९ ॥ मग विष्णुदासासि अहेर । स्वहस्तें करी शार्ङ्गधर । वस्त्रें भूषणें अपार । लेववी श्रीधर निजप्रीतीं ॥ १२० ॥ परमानंदें सुंदरी । कौतुक पाहती नरनारी । जीवें भावें ते अवसरीं । वोवाळिती विष्णुदासा ॥ २१ ॥ निजदासाचा संभ्रम । निजांगें करी मेघःश्याम । अनाथनाथ सर्वोत्तम । करुणासिंधु दीनाचा ॥ २२ ॥ धन्य नामया तुझी भक्ती । ऐसें समस्त जन बोलती । तुझिया सुखाची अगम्यप्राप्ती । विरिंचीस अगम्य ॥ २३ ॥ तंव पाकनिष्पत्ति जाहली जाण । मग पाचारिले सकळ ब्राह्मण । महाद्वारासी येतां त्यांकारण । दिधलीं आसनें बैसावया ॥ २४ ॥ विप्रपूजा करावयासी । निजांगें बैसले हृषीकेशी । तंव निर्जर येऊन आकाशीं । एकमेकांसी बोलती ॥ २५ ॥ ह्मणती आपणासी ठकविलें । विष्णुभक्तांनीं सौख्य लुटिलें । अमृतपान करितों भलें । परी अंतरलें प्रेमामृत ॥ २६ ॥ जैशी सलोकता मुक्ति घेतां । तों पुढें अंतरली सायुज्यता । कीं धीटपाठकवित्व पाहतां । तों प्रासादिकता अंतरली ॥ २७ ॥ नातरी नित्यकर्म करितां भलें । तैं नैमित्तिक अंतरलें । कां कामनिक साधन जों साधिलें । तों निष्काम हातींचें गेलें कीं ॥ २८ ॥ नातरी तीर्थें पाहतां भूमंडळीं । तों मातृसेवा अंतरली । कां क्षुद्रदैवतांची सेवा केली । तों विष्णुपूजा गेली हातींची ॥ २९ ॥ कीं आंवतिल्या द्विजा घालितां भोजन । तों अतिथी विमुख गेला जाण । कीं अमरपदीं बैसतां आपण । तों भक्तिप्रेम अंतरलें ॥ १३० ॥ ऐसे आकाशीं निर्जर । एकमेकांसी करिती प्रत्युत्तर । तों महाद्वारीं शार्ङ्गधर । विप्रपूजेसी बैसले ॥ ३१ ॥ जांबूनद जें कां सुवर्ण । ज्या-

वरी केलें रत्नकोंदण । ऐसे जडित पाट मांडून । तयांवरी ब्राह्मण बैसविले ॥३२॥ मग आपुले हस्तें रुक्मिणीरमण । करी विप्रांचें चरणक्षालन । पीतांबरें पुसोनि जगज्जीवन । हृदयीं धरी निजप्रीतीं ॥३३॥ अंगुष्ट लाऊनि नेत्रांप्रती । मग स्वस्थानीं बैसवी द्विजपंक्ती । मग तीर्थ सेवूनि निजप्रीतीं । वैकुंठपती संतोषे ॥३४॥ अष्टगंधाची देऊन उटी । तुळसीमाळा घातल्या कंठीं । कस्तूरीटिळे ललाटीं । लावी जगजेठी स्वहस्तें ॥३५॥ सप्रेम पूजी वैकुंठनायक । दशांगधूप दावी देख । रत्नज्योती उजळोनि दीपक । ओवाळी देख निजप्रीतीं ॥३६॥ मग दोंभागीं मांडोनियां पंक्ती । सुवर्णपात्रें ठेविलीं पुढती । द्विजांसि वाढी रुक्मिणीसती । अनन्यप्रीतींकरूनी ॥३७॥ नानापरीचीं द्विव्यान्नें जाण । चतुर्विध वाढिलीं संपूर्ण । मग नामयासी पाचारून । संकल्प त्याहातें सोडविला ॥३८॥ भक्त गर्जोनि जयजयकार । ह्मणती भोक्ता रुक्मिणीवर । ऐसें ह्मणोनि सत्वर । प्राणाहुती घेतल्या ॥३९॥ भर्ता भोक्ता आणि करविता । स्वयें आपणचि जाहला कर्त्ता । तेथें सकळ पूर्णकामता । कांहीं न्यूनता नसेची ॥ १४० ॥ जेथें दिवाकराचें प्रयोजन । तेथें अंधकार येईल कोठून । कीं सरस्वतीचें गायन । ऐकतां निद्रा न येची ॥४१॥ कीं उदधीचा विवाह होतां । उदकाची करावी कां चिंता । कीं उष्णकाळीं रोहिणीकांता । विंजणा कासया पाहिजे ॥ ४२ ॥ कीं लोहघनासी लावितां परिस । मग पुट देणें नलगे त्यास । नातरी इंद्रभुवनीं करितां वास । व्याधी त्यास न होती ॥ ४३ ॥ नातरी ज्ञानेश्वरी शुद्ध ग्रंथांत । संशय पाहतां न दिसे तेथ । तेविं नामयाचे प्रयोजनांत । न्यूनता कोठेंचि दिसेना ॥ ४४ ॥ आपण निजांगें रुक्मिणीवर । प्रार्थना करीत वारंवार । वचन ऐकोनि मधुरोत्तर । होती द्विजवर बहु सुखी ॥४५॥ ह्मणे कवळेंकवळें नाम वाचे । घेत असावें अच्युताचें । सुखरूप भोजन त्या नराचें । असे साचें द्विजवरां ॥ ४६ ॥ यापरी आनंदयुक्तमनें । जाहलीं सकळांचीं भोजनें । विप्रांसि करशुद्धी जगज्जीवनें । दिधली असे ते समयीं ॥ ४७ ॥ द्विजांसि बैसवूनि आसनीं । विडे दिधले त्रयोदशगुणी । कीं आवडीचें आर्त तये क्षणीं । रूपा आलें मूर्तिमंत ॥ ४८ ॥ कीं विष्णुभाग्यें सगुण जाहलें । तें नामयाचे भेटीस आलें । ह्मणोनि चिदानंद भलें । उभेंचि भुललें निजप्रीतीं ॥ ४९ ॥ मग जोडोनियां दोनी कर । द्विजांसि विनवी शार्ङ्गधर । ह्मणे तुमाचिया दृष्टीसमोर । प्रसाद घ्यावा मज वाटे ॥१५०॥ हेचि माझी असे प्रीती । ह्मणूनि स्वामींस करितों विनंती । क्षणैक स्वस्थ होऊनि चित्तीं । कृपामूर्ती बैसावें ॥५१॥ आमुचें भोजन जाहलियावर । मग दक्षिणा देऊं सत्वर । संतुष्टमानसें अंगीकार । करूनि जावें निजमंदिरा ॥ ५२ ॥ मनांत विचारी श्रीपती । आधींच दक्षिणा देतां हातीं । तरी विप्र येथें न बैसती । उठोनि जाती न सांगतां ॥५३॥ जैसे अहेर ओपिल्याविण । सोयरे न जाती लग्नांतून । कीं याचक दान घेतल्याविण । संतुष्टमन न होती ॥ ५४ ॥ ऐसें विचारूनि चित्तीं । ब्राह्मणांसि ह्मणे श्रीपती । नामयाचे योगें मजप्राप्ती । तुमची सेवा घडली,कीं ॥ ५५ ॥ तुह्मी केवळ ब्रह्मबीज । ब्रह्मादिकां असां पूज्य । तरी कृपादृष्टीं पाहूनि मज । सांभाळावें द्विजवरहो ॥ ५६॥ ऐसें बोलतां चक्रपाणी । विप्रांसि वाटली अमृतवाणी । मग संतुष्ट होऊनि निजमनीं । आनंदभरित जाहले ॥ ५७ ॥ मग ह्मणती धरामर । तुह्मी श्रमलेति बहु थोर । भोजनासि लागला उशीर । करितां उपचार द्विजांचे ।५८। तुह्मीच होऊनि सर्वव्यापक । करणें सार्थक केलें निक । न्यून पदार्थ पाहतां एक । नये दृष्टीसी सर्वथा ५९ आज दृष्टीस देखिला नवलाव । स्वामीचा आदर अभिनव । नम्रता आणि गौरव । पाहतां दिसे निरुपम ॥ १६० ॥ मग चहूं वेदींचे ब्राह्मण । महामंत्र उच्चारून । मंत्राक्षता देऊन । आशीर्वचन बोलती ।६१। विजयी होऊन सर्वकाळ । आमचा करावा प्रतिपाळ । आकल्पपर्यंत चिरकाळ । ब्रह्मांडभुवनीं असावें ॥ ६२ ॥ पीतांबरीं घेऊनि मंत्राक्षता । घातल्या नामयाचे माथां । ह्मणे हेंचि प्रेम तुझिया चित्ता । सर्वकाळ असावें ॥६३॥ आतां वैष्णव घेऊनि निजपंक्तीसी । भोजन करावें सद्गुणराशी । आह्मी स्वस्थ करूनि मनासी । तुह्मापाशीं बैसतों ॥६४॥ ऐसें बोलतां धरामर । अवश्य ह्मणती शार्ङ्गधर । मग सुवर्णपात्रीं ओगरून प्रकार । रुक्मिणी सत्वर पातली ॥६५॥ मग कनकपात्र घेऊन पाहीं । सत्यभामा आली लवलाहीं । आपोशन घालितां ते समयीं । नवल मांडलें अद्भुत ॥ ६६ ॥ मग आपुले पंक्तीस शार्ङ्गधरें । बोलाविले उद्धव अक्रूर । नारद आणि दुजा तुंबर । हे पार्थीकर निजपंक्तीं ६७ नामा उभा महाद्वारीं । त्यासि पाचारिलें सत्वरीं । तंव तो नाहीं देहावरी । सप्रेम अंतरीं वोसंडला ॥ ६८ ॥ निजबोधें दाटला निश्चित । देखोनि धांवले पंढरीनाथ । जैसी धेनु देखोनि अपत्य । वोरसोनि येत सत्वरीं ॥ ६९ ॥ मग चहूंभुजीं जगज्जीवन । उचलूनि देत आलिंगन । नामयासि सावध करून । सप्रेम क्षेम दीधलें ॥ १७० ॥ मग धरून बाहुवटीं । भोजनासि बैसविला ताटीं । स्फुंदोनि होतसे हिंपुटी । तेव्हां जगजेठी कुरवाळी ॥ ७१ ॥ स्वानंद ग्रास घालितां मुखीं । तंव तो तन्मय परमलक्षी । निजबोधरूपें एकाएकीं । होऊनि अंतरीं निश्चित ॥ ७२ ॥ मग धरूनि गरुडध्वज । नामयासि सांगे गोष्ट गुज । ह्मणे जिवलगा गोष्टी बोल मज । द्वैतलाज टाकोनी ॥ ७३ ॥ अंतरींचें गुज पाहतां स्पष्ट । तरी गगनासि नाहीं पाठपोट । तैसाचि मजशीं एकवट । अससी निकट नामया ॥ ७४ ॥ तुझें तेंचि जाण माझें । माझें तेंचि असे तुझें । एकविधचि दिसे सहजें । नामया समज अंतरीं ॥ ७५ ॥ परतोनि दृष्टी मजवरी । जिवलगा पाहे निजअंतरीं । मी जो अव्यक्त निर्धारीं । तो तूंचि आहेसी वाटतें ॥ ७६ ॥ हा तुझा अद्भुत सोहळा । दृष्टीस पाहे उघडोनि डोळां । ज्ञानदीप आहे कीं जवळा । भक्तप्रेमळा तुजपाशीं ॥ ७७ ॥ तुझिये भेटीकारणें । हर्षें पातले भक्तराणे । तयांसी करी सुखाचें पारणें । अमृतवचनें बोलोनी ॥ ७८ ॥ केवळ परमानंदमूर्ती । तोचि हा जाण निवृत्ती । सर्व सुखाचा सांगाती । ज्ञानदेव दृष्टीं पाहे तूं ॥ ७९ ॥ परत्र हा सोपानेश्वरू । केवळ परलोकींचें तारूं । भाग्यवंता याचा आदरू । अमृतवचनें करावा ॥ १८० ॥ ऐसें ह्मणोनि रुक्मिणीवरें । नामयासि आश्वासिलें करें । तेणें मस्तक आदरें । चरणावरी ठेविला ॥ ८१ ॥ ह्मणे जन्मोजन्मीं प्रेमदान । हेंचि देईं मजकारण । ऐसें ऐकोनियां वचन । जगज्जीवन हांसले ॥ ८२ ॥ ऐसा तो भक्तवत्सल । नामयामुखीं घाली कवळ । क्षीणभाग पुसे गोपाळ । दीनदयाळ दासांचा ॥ ८३ ॥ जो सनकादिकांचे शिरीं । अभयहस्त ठेवित

हरी। त्या हस्तेंचि पूतनारी। नामयासी कुरवाळी ॥ ८४ ॥ नामयासि ह्मणे वनमाळी। सांडी जीवींची सर्व काजळी। विश्रांतीसी आहें मी जवळी। तुज सांभाळीन सर्वदा ॥ ८५॥ मार्गीं कष्ट झाले फार। वियोगयोगें वाळलें शरीर। उतरोनि गेला मुखचंद्र। नेत्र निसूर जाहले कीं ॥ ८६॥ तहानभूक नेणेचि कोणी। दूर गेलासि जैंपासूनी। तुजविण आवडेना नयनीं। दुजें कांहींच मजलागीं ॥८७॥ धीर न धरवे ह्मणोनी। दाही दिशा अवलोकीं नयनीं। माझा विष्णुदासनामा येऊनी। कधीं भेटेल ह्मणतसें ॥ ८८॥ उतावीळ होऊनि अंतरीं। तुजला पाहतसें गरुडपारीं। न दिससी ह्मणोनि महाद्वारीं। भीमातीरीं पहातसें ।८९। नाहीं तरी पद्मतीर्थपदीं। तुजला पहातसें वेणुनादीं। कोठें न लागतां तुझी शुद्धी। वाटे खंती मज फार ॥१९०॥ मी भोजना बैसतां जगज्जीवन। कीं अनुदिनीं करितां अमृतपान। तैं होय तुझी आठवण। येशील धांवून ह्मणूनियां ॥ ९१ ॥ उतावीळ धांवून येसी। सप्रेमें आलिंगन मज देसी। कीं जीवींचें निजगुज सांगसी। हे इच्छा मानसीं धरितसें ॥९२॥ ऐसें बोलतां कृपावंतें। करुणरसा दाटलें भरतें। जेविं जननीस बालक होय आवडतें। देखोनि तें संतोषे ॥ ९३॥ तयाच रीतीं वैकुंठराणा। नामयासि वर्षला प्रेमपान्हा। तो ब्रह्मरस सेवितां जाणा। नये वीट सर्वथा ९४ ऐशा रीतीं चक्रपाणी। निजभक्तांची पुरवी आयणी। मग कौतुक मांडिलें तये क्षणीं। तें परिसा कानीं भाविकहो॥९५॥नामयाचें उच्छिष्ट ते वेळीं। आवडीनें खात वनमाळी। हें देखोनि विस्मित विप्रमंडळी। अधोवदनें पाहती ॥ ९६॥ आश्चर्य मानोनि धरामर। एकमेकांसि देती प्रत्युत्तर। आतां काय करावा विचार। बुडविलें साचार निजकर्म ॥९७॥ यांच्या स्त्रियांनीं वाढिलें अन्न। नेणवे जातीचा आहे कोण। नव्हे क्षत्रिय ना ब्राह्मण। वैश्यशूद्रही न ह्मणवे ॥९८॥ याची अघटित आहे कळा। दिसे चहूं वर्णांवेगळा। कैसी हे विस्मृति पडली सकळां। अनुपम लीला देखोनी ॥ ९९॥ आतां हाचि निश्चय करावा साचा। हा मायबाप नामयाचा। काया मनें आणि वाचा। लोभ तयाचा करीतसे ॥ २०० ॥ मंत्राक्षता घेऊन पीतांबरीं। घातल्या त्या नाम्याचे शिरीं। संकल्प सोडितां झडकरी। त्यासी पुढारी केलें कीं ॥१॥ बरें अरिष्ट होतें निर्माण। तेंचि आलें कीं घडोन। आतां कोणी कोणास प्रतिवचन। बोलूं नका सर्वथा २ पुढील अध्यायीं शार्ङ्गधर। द्विजांसि बोलेल उत्तर। सिद्धांतज्ञानी श्रोते चतुर। परिसा चित्त देऊनी ॥ ३॥ जैसा हिरा बुडे अहिरणींत। तयास हिरकणी बाहेर काढीत। तेविं अनुभवज्ञानें सभाग्यसंत। तेचि जाणती निजखूण ॥ ४॥ अन्नापरीस क्षुधाचि गोड। ह्मणोनि आर्तांचें पुरे कोड। अंतःकरणीं जरी नसती चाड। तरी न लागती गोड हरिकथा ॥ ५॥ हे तीर्थावळीची टीका सार। वदविता श्रीरुक्मिणीवर। महीपती तयाचा दास किंकर। ह्मणवी साचार निजप्रीतीं ।६। स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। त्रयोदशाध्याय रसाळ हा ॥ २०७॥ अध्याय १३ ॥ ओंव्या २०७ ॥



श्रीगणेशाय नमः। श्रीगोपालकृष्णाय नमः। आजि आनंद वाटला आमच्या मना। जे नामयाची मांडिली आराधना। त्याचे पंक्तीस भोजना। तुह्मां सज्जना पाचारिलें ॥ १ ॥ स्वानंदाचे कनकताटीं। नवरस अन्नें वाढिलीं गोमटीं। वैष्णवभक्त सेविती निकटीं। अक्षयी होती चिरंजीव ॥ २॥ ये पंक्तीस बैसले कोणकोण। निवृत्ति ज्ञानदेव सोपान। गोराकुंभार वैष्णव जाण। आणि सांवता नरहरी ॥ ३॥ उद्धव अक्रूर नारद तुंबर। आणिक अपार वैष्णववीर। एक पंक्तीस शार्ङ्गधर। बैसवी साचार तयांसी ॥४॥ ब्रह्मरस आवडीं सेवितां। तृप्ती जाहली सकळ संतां। त्यांचें उच्छिष्ट अवचितां। पडलें आम्हुच्या मुखांत ॥५॥ तो महाप्रसाद चमत्कारिक। लाधतां जाहलें कौतुक। निजभक्तकथा अमोलिक। वाचेसी येत निजप्रेमें ॥ ६॥ जैसें बीज पेरावें भूमींत। पुढें तैसींच फळें येत। तेविं संतकृपेनें त्वरित। त्यांचीं चरित्रें लाधलीं ॥७॥आतां ऐका श्रोतेजन। मागील अध्यायीं निरूपण। नामयाचें उच्छिष्ट जगज्जीवन। अति आवडीं सेवित ॥८॥ ब्राह्मण देखोनि ते अवसरीं। विस्मित जाहले निजअंतरीं। ह्मणती हा अकर्मकारी। कोण निर्धारीं कळेना ॥ ९॥ याचे घरीं सेविलें अन्न। सत्कर्मासी मुकलों जाण। आतां कोणीकोणास प्रतिवचन। न बोलावें सर्वथा ॥१०॥ प्रवासीं केलें भिक्षाटन। दुष्काळीं भक्षिलें शूद्रान्न। अज्ञानपणींचें जारपण। सांगूं नयेचि सर्वथा॥११॥मैत्र बोलिला एकांत गोष्टी। कृपणासी धन पडिलें दृष्टीं। संसाराची अकर्मराहाटी। सांगूं नये सर्वथा ॥१२॥ द्विजांसि घालितां सहस्रभोजन। अवचित अन्नासि स्पर्शलें श्वान। दृष्टीस देखतां सज्ञान। सांगूं नये सर्वथा ॥१३॥ तंव एक बोले द्विजोत्तम। आपले अंगीं नसतां कर्म। कासया करावें कोडें वर्म। सत्यधर्म लपवूनी ॥१४॥ नकळत दोष अकस्मात। घडतां चाले प्रायश्चित्त। जघन्य होतां जनांत। दोष न राहती क्षणमात्र ॥ १५॥ अवगुण असला आपणांत। तो अनुताप सांगावा जगांत। निंदा करित असतां लोक समस्त। दोष नासती यायोगें ॥ १६॥ तरी आतां निःसंशयचित्त। यासीच घालावें वाळित। आपण त्रिपदा जपोनि त्वरित। शुचिष्मंत असावें ॥१७॥ अज्ञानभ्रमें आह्मासि पाहे। नाहीं बोलिला प्रत्यवाये। धर्मशास्त्रीं हा उपाय। सिद्ध असे सर्वांसी ॥१८॥ ऐसा करूनि विचार। मौनें चालिले द्विजवर। मग तयांसी शार्ङ्गधर। पाचारीत ते वेळीं ॥ १९ ॥ मग ह्मणे रुक्मिणीकांत। कां आशंकित जाहलें चित्त। म्लानमुखेंकरून समस्त। जातसां त्वरित लगबगें ॥ २०॥ काय आशंका तुमचे मनीं। ते मज सांगा कृपा करूनी। गुज सांगतां संशय मनीं। तिळमात्र न धरावा ॥ २१ ॥ ऐसें ह्मणोनि जगज्जीवनें। हिरे रत्नें आणि सुवर्ण। तुळसीदळ मिश्रित करून। दक्षिणा भिजवून दीधली ॥२२॥ मग नामयासी उचलून ते अवसरीं। घातला ब्राह्मणांचे चरणावरी। ह्मणे कृपा असोंद्या याजवरी। ऐसें मुरारी बोलिले ।२३। आणि आशंका वाटलीसे सहज। तेही निवेदन करावी मज। ऐसें बोलतां गरुडध्वज। वदती द्विज तेधवां २४ शिंपी ह्मणती नामयातें। प्रत्यक्ष बोलती निगुतें। तुह्मी कैसे तयातें। घेऊन बैसलां निजपंक्तीं ॥ २५॥ आपला सांडूनि आचार। त्याशीं केला अन्नव्यवहार। उच्छिष्ट भक्षिलें साचार। चित्तीं विचार न केला ॥२६॥ कवण लोभ धरून चि-

त्तीं । तुह्मांसि लागली नामयाची प्रीती । निजकृपेची अद्भुत गती । आह्मां निश्चितीं कळेना ॥२७॥ आह्मीं विचार केला अंतरीं । तों दिसोन आला वेषधारी । लीला अद्भुत वोडंबरी । क्षणक्षणा पालटे ॥ २८ ॥ वर्णाश्रमधर्म पाहीं । तो न दिसेच तुमचे ठायीं । निर्धार न समजे कांहीं । विचार देहीं केलिया ॥ २९ ॥ वंद्य निंद्य निजदृष्टीसी । सारिखेच भासती तुह्मांसी । द्वैतकल्पना निजमानसीं । कदाकाळीं स्पर्शेना ३० आपल्या ऐसेंच विश्वजन । तुह्मी जाणतसां निश्चयेंकरून । जैसें परिसासी लोह सुवर्ण । निजदृष्टीं सारिखें ॥ ३१ ॥ कीं गंगा आणि वोहळ जाण । सागरासी सारखे दोघेजण । कीं व्याघ्रगायीस समसमान । उदक लेखी दोहींतें ३२ कीं शीत उष्ण पर्जन्यकाळ । आकाशासि सारिखे तिन्ही वेळ । नातरी बिदी नदी आणि वोहळ । मेघासि जेविं सारिखे ॥ ३३ ॥ कीं कल्पवृक्षासि जाण । राजारंक तत्समान । नातरी मैलागिरी चंदन । शीतळ सर्वांसी सारिखा ॥ ३४ ॥ कीं चोर जार सज्जनांवर । सारिखाचि प्रकाशे दिनकर । तेविं वंद्य निंद्य तुह्मांसी नर । समानचि भासती । ३५ । आपणा ऐसेचि सर्वजन । सर्वांसि भासे समान । जेविं धर्मरायासी नष्ट कोण । धुंडितां एक दिसेना । ३६ । ब्राह्मणवेष धरिला तुह्मीं । यावरी विश्वास धरिला आह्मीं । परी भाव अंतरींचा स्वामी । आह्मां स्पष्ट कळेना ॥ ३७ ॥ आपुलें स्वहित पाहूनी । पापपुण्य विचारावें मनीं । वेदवचन सत्य करूनी । विधियुक्त वर्तावें ॥ ३८ ॥ तुह्मी तो सर्वज्ञ संपन्न । सर्वशास्त्रीं दिसतां निपुण । आतां वेदवचनासि देऊन मान । कर्माचरण करावें ॥ ३९ ॥ ते सांडोनि सर्व व्युत्पत्ती । नामयासी बहु लाविली प्रीती । ऐसें आह्मांसि निश्चितीं । कळों आलें ये समयीं ४० ऐकूनि द्विजवरांची मात । काय बोलती रुक्मिणीकांत । नामयासि जेवविलें सांगात । हा दोष आह्मांस न ठेवावा ॥ ४१ ॥ चैतन्य चालक सर्वगत । वंद्य निंद्य कोणा ह्मणावें येथ । पुण्य पाप आह्मां निश्चित । बाधूं न शके सर्वथा ॥ ४२ ॥ मी शुद्ध बुद्ध निरंजन । सर्व व्यापक चैतन्यघन । अंतरसाक्ष असोनि जाण । अलिप्त असें सर्वांसी ॥ ४३ ॥ देह ह्मणाल शिंपियाचें । तरी वोडंबर पंचतत्त्वांचें । जेविं आकाशीं अभ्र साचें । नसतें भासे ज्या रीतीं ॥ ४४ ॥ नामा ऐसें नामदेवा । कोणत्या वदावें अवयवा । हें निर्धारूनि भूदेवा । सांगा भाव मजलागीं ॥ ४५ ॥ तरी तेजीं किंवा जीवनीं । धरणीं पवनीं अथवा गगनीं । दोष होतां तुमचे नयनीं । गोचर जाहला निजयुक्तिं ४६ तुह्मी वेदवक्ते ब्राह्मण । सर्व शास्त्रीं असा निपुण । परि ब्रह्मनिष्ठतेचें लक्षण । पावले नाहींत सर्वथा ॥ ४७ ॥ भेदभ्रम तुमचा गेलाचि नाहीं । संदेहचि वाढला देहीं । नामयानें संकल्प सोडितां पाहीं । विचारणा नाहीं तैं केली । ४८ । कीं शिंपियाचें अन्न सेवावयासी । अधिकार बोलिला नाहीं आह्मांसी । यालागीं वारंवार तुह्मांसी । प्रार्थूनि खूण सांगतसें ॥ ४९ ॥ नामयाचे प्रसंगें मज । सेवा घडली तुमची आज । ऐकोनि तुमचे मनीं उमज । जाहला नाहीं ते समयीं ॥ ५० ॥ प्रसाद दिधल्या मंत्राक्षता । त्या नामयाचे टाकिल्या माथां । मज निरालंबासी अवलंबता । निष्कामासि ह्मणतां सकाम ॥ ५१ ॥ मी अकर्ता असें यथार्थ । तुमचेन जाहलों कृतार्थ । ऐकूनि माझा वचनार्थ । अजून वोळख धराना ॥ ५२ ॥ निःसंदेह भोजन केलें तुह्मीं । उरलें शेष स्वीकारिलें आह्मीं । यासि प्रा-



यश्चित्त शास्त्रधर्मीं । विधियुक्त कवण मज सांगा ॥ ५३ ॥ माझा तंव निश्चय हाचि जाण । या हरिदासाचे पदरजःकण । आणि तुमचें चरणतीर्थ सेवून । होय पुनीत सर्वदा ॥ ५४ ॥ याविरहित जें साधन । व्रतें तपें आणि दान । ते वायांच दिसती मजकारण । जगज्जीवन ह्मणतसे ॥ ५५ ॥ तयासींच मी सत्य मानी । भक्त असोत अथवा ज्ञानी । तया न विसंबें निर्वाणीं । जैसी तान्हया निजमाय ॥ ५६ ॥ कृपण न विसंबे धनासी । कीं हरिणी जैसी पाडसासी । कीं लांवपक्षिणी अंडजांसी । मानस वेधोनी सर्वदा ॥ ५७ ॥ कीं मीन जैसा जळाप्रती । न विसंबे अहोरातीं । तेविं निजभक्त माझे चित्तीं । असती निश्चितीं द्विजवरहो ॥ ५८ ॥ ते भक्त माझें अंतरंग । ज्ञानोक्ति लेऊनि सौभाग्य । भक्ति आणि वैराग्य । प्रेमरस अखंड सेविती ॥ ५९ ॥ संतसंग हा त्यांलागूनी । अखंड अमृत संजीवनी । वज्रकवच अनुराग लेवोनी । अखंड निर्भय असती ॥ ६० ॥ धर्म अर्थ काम मोक्ष जाण । दृष्टीसि नाणिती भक्तजन । चारी मुक्ती त्यांजकारण । तुच्छ मानसीं वाटती ॥ ६१ ॥ माझें नाम गाती आनंदें । हींच त्यांचीं अनुहत वाद्यें । निजलक्षाचें ताट प्रसिद्ध । आंत दीप उजळले ॥ ६२ ॥ इंद्रपदाचें सौख्य जाण । नाशिवंत भासे त्यांकारण । जैसी अभ्रच्छाया देखोन । सज्ञान शाश्वत न मानिती ॥ ६३ ॥ देखोनियां राजमंदिर । सुरवाड न घेती वस्तिकर । कीं मृगजळाचा देखोनि पूर । सज्ञान मिथ्या मानिती ॥ ६४ ॥ यापरी होऊनि उदास । न धरिती अमरपदींची आस । ह्मणोनि अखंड माझा वास । हृदयीं असे तयांचे ॥ ६५ ॥ ऐसे भक्त धुंडितां आह्मां । एक शिंपी दिसतो नामा । जेणें अंतरीं माझा प्रेमा । अनुभवून ठेविला ॥ ६६ ॥ ह्मणूनि त्याचें उच्छिष्ट जाण । सेविलें निजप्रीतींकरून । ब्रह्मरसाची उपमा गौण । दिसोनि येतसे तयासी ॥ ६७ ॥ आणि मुक्तिक्षेत्र पंढरपुर । सकळ तीर्थांचें भांडार । उपमेसि पाहतां पृथ्वीवर । आणिक न दिसे सर्वथा ॥ ६८ ॥ जीवनमुक्त आणि ज्ञानी । जो भक्तांमाजी अग्रगणी । तो हा पुंडलीक मुनी । बैसला ध्यानीं परलक्षी ॥ ६९ ॥ आणि हे भीमा दक्षिणवाहिनी । कीं हे अमृतसंजीवनी । कीं सौख्यराशीची स्वामिनी । स्वानंदजीवनीं विलसती ॥ ७० ॥ हे चंद्रभागा पाहतां दुरून । गर्भवासासी नलगे येणें जाणें । मंदाकिनीस देखोन । राहिली लाजून तैसीच ॥ ७१ ॥ भय पावूनि मानसीं । भागीरथी मिळाली समुद्रासी । आणि भोगावती पाताळासी । अति वेगेंशीं पैं गेली ॥ ७२ ॥ ऐशा क्षेत्रीं माझे दास । वस्तीस राहून रात्रंदिवस । अखंड करिती नामघोष । प्रेम उल्हासेंकरूनियां ॥ ७३ ॥ हर्षें निर्भर होऊनि मनीं । नामानाचे हरिकीर्तनीं । हें सौख्य धुंडितां त्रिभुवनीं । कोठें न दिसे तयासी ॥ ७४ ॥ द्विजांसि ह्मणे पुरुषोत्तम । सकाम अथवा निष्काम । वाचे वदे जो माझें नाम । तो सखा परम आप्त माझा ॥ ७५ ॥ जीवाहूनि मज आवडता । तयासि न करीं मी परता । तोचि माझी कुळदेवता । पूजीं सद्भावें तयासी ॥ ७६ ॥ मी सच्चिदानंद वनमाळी । बोलंगे हरिदासांचे कुळीं । हे जगीं प्रसिद्ध बिरुदावळी । निजभक्तमेळीं वसतसें ॥ ७७ ॥ मज निजभक्तांचें बहु वेड । त्यांचें अवचित उच्छिष्ट पडे । उभा राहून मी तयांपुढें । मुखांत घालीं निजप्रीतीं ॥ ७८ ॥ तें मज वाटे अतिगोमटें । सेवितां स्वादिष्ट गोड वाटे । उ-

च्छिष्टयोगें मोठें थाटें । शरीर माझें अखंड ॥ ७९ ॥ माझी सोज्वळ बाळकांती । अखंड यश आणि संपत्ती । पुष्टी तुष्टी
सदा असती । उच्छिष्टासाठीं भक्तांच्या ॥ ८० ॥ ते संत सोयरे भेटती जाण । तैं माझी दिवाळी सुख सण । जैसें चकोरां
होतां चंद्रदर्शन । प्रेमानंदें उल्हासती ॥८१॥ ह्मणोनि बहुत आर्त्तचित्तें । नामयासि जेवविलें सांगातें । हें अन्यथा नव्हे-
चि यथार्थ । पुढती विचार कोणता ॥ ८२ ॥ ऐसें बोलतां रुक्मिणीवर । ब्राह्मण देती प्रत्युत्तर । ह्मणती तूं गुणसमुद्र । क-
ळलें साचार आह्मांसी ॥ ८३ ॥ तरी वेदीं जे जे बोलिले धर्म । तें तें आचरावें विहितकर्म । ज्याचा जैसा वर्णाश्रम । तो-
चि तेणें आचरावा ॥ ८४ ॥ तरी आचार जाणिजे प्रथम । हाचि ब्राह्मणाचा स्वधर्म । शौच आणि नित्यनेम । सत्यव-
चन बोलावें ॥८५॥ तप तेंचि शमदम जाण । भूतदया असावी पूर्ण । आणि स्वस्वरूपीं अनुसंधान । अखंडाकार असा-
वें ॥ ८६ ॥ स्नान संध्या देवतार्चन । अग्निहोत्रीं होम देणें । यावरी करावें अध्ययन । संतुष्टमनेंकरूनियां ॥ ८७ ॥ वैश्व-
देव आणि अतिथिपूजा । नैवेद्य ब्रह्मयज्ञ करावा वोजा । तेणेंकरूनि अधोक्षजा । संतोषवावें मानसीं ॥ ८८ ॥ ऐशा रीं-
तीं सारूनि नेम । यावरी करावें भोजन । तृतीयप्रहरीं पुराणश्रवण । संतुष्टमनें करावें ॥ ८९ ॥ स्वानंदभरित होऊनि म-
नीं । विश्वास असावा वेदवचनीं । तुह्मी तो सर्वज्ञ संपन्न गुणी । विचारा मनीं निजहित॥९०॥आपुला स्वधर्म टाकिला
जर । तरी कैशा रीतीं तरतील नर । जळचरांनीं त्यागितां नीर । तरी जीवनोपाय कोणता ॥ ९१ ॥ बाळक न घे मातेचे
स्तन । तरी यासी उपाय नाहीं आन । पक्षियें अंतराळ सांडितां जाण । तरी कोठें गमन करावें ॥९२॥ कमळिणी भास्क-
रा न पाहती । तरी कैशापरी विकासती । जरी भ्रमर आमोद न सेविती । तरी सुखी होती कैसेनी ॥९३॥ सांडोनि शर्क-
रेची राशी । कैसी सौख्य पावेल माशी । तेविं स्वकर्म सांडितां ब्राह्मणासी । अपाय दिसतो पुढारां ॥ ९४ ॥ तरी आतां
सांडोनि अभिमान । अनुतापें शुद्ध करावें मन । उभयलोकीं कीर्ति वाढे जाण । तैसें आचरण करावें ॥ ९५ ॥ चंद्रभा-
गेसि जाऊन । मंत्रोक्तविधीं करावें स्नान । ब्राह्मणासि देऊनि सुवर्णदान । पुण्याहवाचन करावें ॥ ९६ ॥ ऐकें गा चतु-
रविचक्षणा । करावी क्षेत्रप्रदक्षिणा । सकलकुल पवित्र जाणा । तेणें तुमचें होईल ॥ ९७ ॥ उच्छिष्ट भक्षिलें नामयाचें ।
येणेंचि दोष हरतील तुमचे । वचन ऐकोनी द्विजवरांचें । अवश्य ह्मणे जगदात्मा ॥ ९८ ॥ ब्राह्मणांसि ह्मणे हृषीकेशी ।
तुमची आज्ञा प्रमाण मजसी । परी एक मागणें तुह्मांपाशीं । कायावाचा ह्मणतसें ॥९९॥ द्विजांसि ह्मणे घननीळ । ना-
मयाचा करावा सांभाळ । याज ऐसा भक्तप्रेमळ । धुंडितां मज दिसेना ॥ १०० ॥ तुह्मी सदाचारी ब्रह्मवादी । तीर्थरूप
तुमची वाङ्नदी । सत्यवचनजळामधीं । सुस्नात जाहलों स्वामिया ॥ १ ॥ मी आदि अजित अधोक्षज । परी विश्वास
आहे तुमचा मज । तुह्मी माझें परमपूज्य । परमदैवत असा कीं ॥ २ ॥ तुह्मी ह्मणतां करा स्नान । तरी त्याचें चतुर्विध ल-
क्षण । तेंचि विशद तुह्मांलागून । यथायुक्त सांगतसें ॥३॥ पुराण आणि हरिकीर्तन । आवडीं करावें श्रवणमनन । सर्वां-
हून उत्तम स्नान । यासीच जाण बोलिजे ॥ ४ ॥ अनुभव आणि निदिध्यासन । मग आत्मसाक्षात्कार जाण । याही वरि-



ष्ट कोणी स्नान । बोलिलें नाहीं सर्वथा ॥५॥ आतां अंतर्बाह्य शुचिर्भूत । हें दुजें स्नान ह्मणिजे यांत । दैवयोगें ज्यासी सा-
धत । आणिक साधन नलगे त्यां ।६। समस्त इंद्रियें करूनि स्वाधीन । करावें वासनेचें दंडन । हें तिजें जया घडे स्नान । म-
ग कासया अनुष्ठान पाहिजे ॥७॥ सर्वांभूतीं करुणा जाण । हें सर्वांवरिष्ठ चवथें स्नान । सहस्रांत एक सज्जन । विरळा को-
णी साधीतसे ॥८॥ पांचवें स्नान पुसाल कवण । तरी उदकेंकरूनि करावें स्नान । हें लौकिकार्थ अंघूळ जाण । याजकारणें
बोलिजे ॥ ९ ॥ काम क्रोध आणि लोभ । भेद मोह आणि दंभ । वसती देहीं स्वयंभ । हे जलस्नानें न जाती ॥ ११० ॥ तरी
विवेक वैराग्य बुद्धी । यांसीच निवटिजे आधीं । संतसंगें चित्तशुद्धी । साधकजनीं करावी ॥ ११ ॥ अनंतजन्मांचें नि-
श्चित । यासीच ह्मणिजे प्रायश्चित्त । ज्याचे वाचेसी नेमनित्य । रामकृष्ण गोविंद॥१२॥परि तुमची भावना जैसी । तैसी-
च फळेल तुह्मांसी । नामा आमुच्या चित्तासी । निष्कलंक दिसताहे ॥१३॥ ऐसें ह्मणूनि पहाहो । ब्राह्मणासी प्रार्थी देव-
रावो । ह्मणे वासनेचा संदेहो । फेडा तुह्मी सकळिक ॥ १४ ॥ चंद्रभागेसी जाऊनि त्वरित । तुह्मी आह्मी वैष्णवभक्त । कें-
सें घाल प्रायश्चित्त । तें मी घेईन सर्वथा ॥ १५ ॥ लीलानाटकी रुक्मिणीरमण । जो निजभक्तांचें प्रियभूषण । लीलावो-
डंबरीं खेळ खेळोन । दावी कौतुक दासांसी ॥ १६॥मग नामयाचा हात वनमाळी । धरूनियां हृदयकमळीं । समारंभें ते
वेळीं । सत्वर चालले चंद्रभागे ॥ १७॥ नरनारी येऊनियां देख । पाहात असती कौतुक । इंद्र आणि ब्रह्मादिक । ठाकले
उभे तेधवां ॥ १८ ॥ संतमेळीं शार्ङ्गधर । पुढें चालले सत्वर । त्यांचे पाठीसी द्विजवर । चालताती लगबगां॥ १९ ॥ ऐशा
रीतीं वैकुंठनाथ । चंद्रभागेसि आले त्वरित । केला पुंडलिकासि प्रणिपात । वैष्णव गर्जती नामघोषें।१२०।मग द्विजव-
रांसि करूनि प्रदक्षिणा । विधियुक्त आरंभिलें स्नाना । जो मृडानीवराच्या नये ध्याना । तो तिल दर्भ सुमना लावितसे
॥ २१ ॥ गोमय भस्म लाविलें जाण । मंत्र वेदोक्त ह्मणती ब्राह्मण । पीतांबरधारी जगज्जीवन । दावी कौतुक दासांसी २२
पृष्ठीवरी सोडिले कुरळ । कमलनेत्र आतिविशाळ । जो रुक्मिणीवल्लभ भक्तवत्सल । दावी कौतुक दासांसी ॥२३॥ ना-
नापरिचीं अनुष्ठानें । जयालागीं करिती योगसाधनें । तो क्षीराब्धिवासी जगज्जीवन । प्रायश्चित्त घेत निजप्रीतीं॥२४॥
नाममात्रें जो निरसी दोष । करी भक्तांचा भवनाश । तो पुंडलीकवरद जगदीश । प्रायश्चित्त घेत निजप्रीतीं॥ २५॥ श्रु-
तिशास्त्रें धुंडितां जाण । ज्याचें न कळेचि महिमान । त्या निष्कळंकासी ब्राह्मण । प्रायश्चित्त देताती ॥२६॥ ज्याचे च-
रणांगुष्ठापासून । पवित्रगंगा निघाली जाण । त्यासि उदकांत उभें करून । प्रायश्चित्त देताती॥२७॥ जो अचल अढळ
अविनाश पूर्ण । विश्वव्यापक चैतन्यघन । त्यासी गोमय भस्म लाऊन । प्रायश्चित्त देताती॥२८॥ जो वैकुंठविहारी हृ-
षीकेश । निजभक्तभूषण जगदीश । त्यावरी आणोनि नसताचि दोष । प्रायश्चित्त देताती॥२९॥मग प्रयोगेंकरूनि स्ना-
न । पीतांबर केला परिधान । ब्राह्मणांचें तीर्थ घेऊन । मस्तकीं वंदिलें निजप्रीतीं॥१३०॥निजभक्तांसि अभिवंदन । करी
निजांगें जगज्जीवन । मग करूनि संध्यास्नान । नित्यनेम सारिला ॥ ३१ ॥ ब्राह्मणांची पूजा करुन । यथाविधीं दिधलें

दान । द्विजांसी ह्मणे जगज्जीवन । केलें सनाथ मजलागीं ॥ ३२ ॥ तुमचें आवडीचें आर्त । तें म्यां पुरविलें त्वरित । आ-
तां विकल्प संशय मनांत । आणूं नका सर्वथा ॥३३॥ तुमचें साधिलें सर्व काज । आतां अगन्यरूप माना मज । ऐसें बो-
लूनि गरुडध्वज । काय करी ते समयीं ॥३४॥ द्विजांसि निरोप देऊनि त्वरित । आपण आले राउळांत । सवें असती स-
मस्त भक्त । आनंदें गर्जती नामघोषें ॥३५॥ मग सत्यभामा राधा रुक्मिणी । विस्तारून आणिती विविध वोणीं । भक्त-
मंडळींत चक्रपाणी । बैसले भोजनीं निजप्रीतीं ॥ ३६ ॥ जेविं तारागण सभोंवतीं । मध्यें शोभतो निशापती । तेविं वैष्ण-
वमेळीं स्वानंदयुक्ती । रुक्मिणीपती बैसले ॥३७॥सकळांमुखीं जगज्जीवन । ग्रास घाली प्रीतीकरून । उच्छिष्ट पीतांबरें
करून । सांवरीतसे निजप्रीतीं ॥ ३८ ॥ भोजन करूनि निजप्रीतीं । विडे दिधले भक्तांप्रती । मग सुखशेजे रुक्मिणीपती ।
निजपर्यंकीं पहुडले॥३९॥आज्ञा मागोनि देवासी । वैष्णव गेले आश्रमासी । भजन करिती निजमानसीं ।प्रेमयुक्त आ-
ल्हादें ॥ १४० ॥ तों ब्रह्मवीणा घेऊनि करीं । नारद पातले झडकरीं । गायन करित सुस्वरीं । मधुरोत्तरीं रसाळ ॥४१॥ जें
निर्मळ आणि नाम मंगळ । उल्हासें गात भक्त प्रेमळ । सन्निध येऊनि उतावेळ । पांडुरंग नमियेला ॥ ४२ ॥ जो वैराग्या-
चा निजपुतळा । कीं प्रेमसुखाची निजकळा । तो नारद अकस्मात देखिला । रुक्मिणीकांतें तेधवां ॥ ४३ ॥ क्षेमालिंगन
देऊन प्रीतीं । ब्रह्मसुतासि ह्मणे श्रीपती । तुझें गायन मजप्रती । अनुपम्य वाटतसे ॥ ४४ ॥ वचन ऐकूनी त्वरित । नारद
जाहले सद्गदित । नेत्रीं पडती अश्रुपात । आल्हादें गात गुण नाम ॥ ४५ ॥ जयपुंडलीकवरदा अनाथनाथा । भीमातीर-
वासिया रुक्मिणीकांता । करुणासागरा स्वानंदभरिता । रक्षिसी भक्तां निजांगें ॥४६॥ जय कमललोचना श्रीरंगा ।
भक्तभूषणा अक्षय अभंगा । विश्वोद्धारका पांडुरंगा । असंगसंगा निर्विकारा ॥ ४७ ॥ जय क्षीरसागरविलासिया ।
विधिजनका वैकुंठराया । निजभक्तांची वारिसी माया । नाममात्रेंकरूनियां ॥ ४८ ॥ जयजय करुणासागरा जग-
जेठी । उभा राहिलासी भीमातटीं । भाविक भक्त येतां भेटी । कृपादृष्टीं पाळिसी त्यां ॥ ४९ ॥ यापरी नारदें करून
स्तवन । मग वोंवाळिला रुक्मिणीरमण । विसर्जन करूनि कीर्तन । घातलें दंडवत साष्टांगें ॥१५०॥ चंपकतुलसींची
मिश्रितमाळा । देवें घातली नारदाचिया गळां । देवासि पूजोनि तेवेळां । ब्रह्मसुत निघाले तेथूनी ॥ ५१ ॥ इकडे
राधा येऊनि रखुमाईजवळी । निजगुज पुसे ते वेळीं । ह्मणे माझे हृदयकमळीं । नवल अद्भुत वाटतें ॥५२॥ आजि का-
य अपवाद वांया । आला होता भक्तसखया । ह्मणोनि प्रायश्चित्त घेऊनियां । केली आपणया देहशुद्धी ॥५३॥ हे आ-
शंका माझे चित्तीं । ह्मणोनि पुसतसें तुह्मांप्रती । कर्माकर्म अव्यक्तमूर्ती । केशापरी अडखळ ॥ ५४ ॥ सूर्य कोंडिला अं-
धारांत । कीं थिल्लरीं बुडेल सरितानाथ । कीं गंगा कोंडेल कूपांत । ऐसें विपरीत जाहलें कीं ॥ ५५ ॥ चंद्रासी होईल उ-
बारा । नातरी पिंजऱ्यांत कोंडेल वारा । कीं सागरासी देखोनि थरथरां । अगस्ती केविं कांपेल ॥ ५६ ॥ नक्षत्रतेजें वा-
सरमणी । कैसा जाईल लपोनी । कीं सुधारस रोगेंकरोनी । मृत्यु कैसा पावेल ॥५७॥ घटांत सांठवेल आकाश । कीं व-

५८

ज्राचि कांपेल पर्वतास । तरी कर्मबंधनें हृषीकेश । कोंडेल मजला वाटतें ॥५८॥ कां बीज पेरिलें भर्जित । तें वाढेल टव-
टवित । तरी आपुला प्राणनाथ । कर्मबंधीं गुंतेल ॥५९॥ हें मज बाई सांगा सकळ । कोणें चाळविला घननीळ । तुह्मीं स-
र्वज्ञ आणि वडिल । सांगा अज्ञानाकारणें॥१६०॥ रुक्मिणी ह्मणे वो आरज । नामयासाठीं गरुडध्वज । सांडोनि थोर-
पणाची लाज । कर्म सहज अंगिकारी॥६१॥ऐकें नेणते सुजाणी । हा अनाथनाथ चक्रपाणी । भुललासे भक्तीलागुनी ।
ते याजवांचूनी असेना॥६२॥ह्मणोनि सच्चिदानंद उभे । भुलले नामयाचेनि लोभें । कर्में शुभें आणि अशुभें । अंगिका-
रिलीं आवडीं ॥ ६३ ॥ तरी आवडीचा सोस पाहें । जनांत न करी कोण काये । हा प्रसिद्ध अनुभव जनासी आहे । तो
तुज माये सांगेन ॥६४॥ आंधळें पांगळें अनर्गळ । मुकें बोबडें असेल बाळ । परी जननीस त्याची कळवळ । येत तत्का-
ळ निजलोभें॥६५॥निजप्रीतीनें होऊनि वेडें । त्यासीच खेळवी लाडें कोडें।परी दुजयाचें बाळ चोखडें । तें तिज न मा-
ने सर्वथा ॥ ६६ ॥ कांहीं विकृती न मानून मनीं । ह्मणे यासी दृष्टी लागेल झणी । इडापीडा घेऊन जननी । वदन चुंबी-
त तयाचें ॥ ६७ ॥ तैसीच प्रीती धरून मनीं । निजभक्त सांभाळी चक्रपाणी । याती कुळ न विचारी मनीं । प्रिय मानी
जीवाहून॥६८॥मागील अनंतजन्मांचा । काया मनें आणि वाचा । ऋणानुबंध तेव्हांचा । आहे साचा निजप्रीती॥६९॥
त्यांची देवास बहू प्रीती । तूट नव्हेचि कल्पांतीं । जिवलग नामा सांगाती । मानिला प्रीतीं केशवें ॥१७०॥ ऐकोनि रु-
क्मिणीचें वचन । राधेस वाटलें समाधान । मौनेंच करूनिया नमन । गेली आपुले मंदिरा ॥ ७१ ॥ तों इकडे नारदमुनी
सत्वरीं । पातला सत्यभामेचे घरीं । सन्मान करूनियां ते सुंदरी । सुखासनीं बैसवित ॥ ७२ ॥ तयासी पुसे कृष्णअंगना ।
नवल वाटे माझिया मना । थोरीव सांडूनि वैकुंठराणा । कीर्तनरंगीं नाचत ॥७३॥ आणि मागें कवणिये जन्मीचें । ऋ-
ण घेतलें नामयाचें । ह्मणोनि कोड नानापरीचें । पुरवी त्याचें घननीळ॥७४॥आणि या पुंडलिकाचें प्रेमरंग । उभें ठाक-
ले श्रीरंग । लोटलीं अठ्ठावीस युगें सांग । परि शीण नयेची ॥ ७५ ॥ उभें करूनिं जगदुद्धारा । कदा न पाहे पाठमोरा ।
वचन न बोले निष्ठुरा । विश्वोद्धारा कष्टविलें ॥ ७६॥ ऐसें असतां शार्ङ्गधर । उभेच राहिले विटेवर । आणि राखे बळीचें
द्वार । अंतरीं विचार न करितां ॥७७॥ आवड देखोनि निजअंतरीं । पांडव रक्षिले नानापरी । भक्तकार्यासी मुरारी ।
लाज अंतरीं न धरीच ॥ ७८ ॥ एकला हा माधव । निजांगें करी थोर लाघव । भक्तकार्यासी केशव । वांयांचि काया
शिणवीतसे ॥ ७९ ॥ ऐसे निजभक्त ये काळीं । उदंड असतील भूमंडळीं । किती त्यांची नामावळी । तुह्मांजवळीं सांगूं
मी॥१८०॥ह्मणूनि चिंता थोर चित्तीं । वाटतसे मजप्रती । आमुचे स्वामीतें शिणविती । निजभक्त प्रीती लाऊनी॥८१॥
ऐसें बोलतां सत्यभामेतें । नारद ह्मणे ऐक माते । जें मी वचन सांगेन तूंतें । तें यथार्थ चित्तें मानावें ॥ ८२ ॥ हा निराकार
जगज्जीवन । अवतार घ्यावया हेंचि कारण । भक्त रक्षावे नानायत्न करून । ह्मणोनि सगुण जाहला असे ८३ घ्यावया
चराचराचे भार । पृथ्वी जाहली असे साकार । कीं प्रकाश पाडावया जनावर । भास्कर जैसा अवतरला॥८४॥नातरी

करावया दहन पचन । ह्मणोनि अवतरला जठराग्न । कीं गाईची करावया क्षुधाहरण । निपजविलें तृण तयांसाठीं ॥ ८५ ॥ कीं अंडजयातीस फिरावयासी । आकाश करी हृषीकेशी । कीं विश्रांती घ्यावया विश्वजनासी । निशी निर्मिली साचार ॥८६॥ नातरी सुंदरांगीं ल्यावया भूषणें । ह्मणूनि निपजविलीं दिव्यरत्नें । कीं आयुष्यहीनाचे वांचवावया प्राण । ह्मणोनि सुधारस निर्मिला ॥ ८७ ॥ तेविं निजभक्तांचें करावया काज । सगुण जाहला अधोक्षज । सोडोनियां थोरपणाची लाज । लीला सहज दावीतसे॥८८॥हा अनाथनाथ भक्तवत्सल । कृपासिंधू दीनदयाळ । भीद वागवितो घननीळ । तूं जाणसी सकळ सुजाणे॥८९॥तया अंबरीषाचे गर्भवास । निजांगें सोशी हृषीकेश । बळीचें द्वार राखी उदास । लज्जा मनांत न धरितां॥१९०॥विकिला पायिक होऊन साचा । काया मनें आणि वाचा । सांभाळ करी पांडवांचा । पती तुमचा कृपाळू ॥ ९१ ॥ होऊनि नंदाचा नंदन । गोकुळीं रक्षितसे गोधन । आणि गोपाळांचें उच्छिष्ट घेऊन । पाहात चाखूनि निजप्रीतीं ॥९२॥विघ्न देखोनि कडोविकडीं । आपण निजांगें घाली उडी । निजभक्तांचें बंधन तोडी । कीर्ति चोखडी हे त्याची ॥९३॥आह्मी सकळ भक्त जाण । त्याचेच अंश असों पूर्ण । परि आजि साक्षातरूप सगुण । नामयासाठीं अवतरला ॥ ९४ ॥ यापरी भामेसि समजाउनी । सत्वर गेला नारदमुनी । तों मंचकापाशीं येऊन रुक्मिणी । चक्रपाणी वंदिला॥९५॥सद्भावें चरणीं ठेऊनि माथा । काय पुसतसे पंढरीनाथा । सर्वांपरीस तुमच्या चित्ता । काय आवडतें मज सांगा ॥ ९६ ॥ भक्तवत्सला वैकुंठनायका । हे माझे जीवींची फेडा आशंका । अष्टांगयोग साधिती देखा । नससी निका ते ठायीं ॥ ९७ ॥ योगी बैसले समाधिस्थ । तेथें न रंजे तुमचें चित्त । वैकुंठभुवनीं नाहीं प्रीत । कळलें निश्चित मजलागीं॥९८॥ तेथींचे सुख भोग विलास । नावडती तुमचे चित्तास । चित्त अखंड उदास । कवण्या गुणें मज सांगा ॥ ९९ ॥ सायुज्यता मुक्ती देऊनी । योगी बुडविले निर्गुणीं । याहूनि सखे तुमचे कोणी । मजलागुनी कळेना २०० पोटींचा पुत्र चतुरानन । स्तविती तुह्मांसी चतुरपणें । चारी वेद अठरा पुराणें । तुमचे सद्गुण वर्णिती ॥१॥ परि ते उबगोनी चित्तीं । शब्द बोलती नेति नेति । षड्दर्शनें वाद घालिती । परी अनुपम्य ख्याती न कळे त्यां॥२॥ऐसें ऐकोनि रुक्मिणीसी । काय बोलती हृषीकेशी । माझे जीवींचें तूं नेणसी । सुजाण ह्मणविसी आपणीया ॥ ३ ॥ परी काया वाचा मनें निश्चित । तुज सांगतों जीवींची मात । नामयावरी माझी प्रीत । असे निश्चित सर्वदा ४ आणि जीवींची खूण आज । मी सांगतों तेचि तुज । जेकां भाविक भक्तराज । तेचि मज आवडती ॥५॥ मी निराकार निर्गुण । नामरूपासी आलों जाण । निजभक्तांचें करावया कारण । साकार सगुण जाहलों कीं ॥६॥ निजभक्त आवडती माझिया जीवा । भक्त ज्ञानीयांचा विसावा । भक्त माझे सुखाचा ठेवा । असों दे ठावा तुजलागीं ॥ ७ ॥ माझिया भाग्याचें भूषण । निजभक्त असती सुजाण । भक्तचि माझें गुणनिधान । सर्वदा आधीन मी त्यांचे॥८॥ भक्तचि माझी यशकीर्ती । भक्तचि माझे सुखमूर्ती । भक्त भेटतां सकळ पुरती । मनकामना माझिया ॥ ९ ॥ मज आणि भक्तां वेगळिक । कल्पांतींही नव्हे देख । माझे भज-



नीचें निजसुख । भक्तचि एक जाणती॥२१०॥मी भक्तांचें नाम घ्यावें । तयांचें रूप मनीं ध्यावें । भक्तसुख दृष्टीं पाहावें । वेळोवेळां निजप्रीतीं॥११॥भक्तीं माझे चिंताचे चरण । त्यांणीं माझेच गावे गुण । निष्कामबुद्धीं माझें भजन । तेचि करिती सर्वदा ॥१२॥ धर्म अर्थ काम मुक्तिचारी । देतां भक्त न घेती करीं । संसारवोझें मजवरी । भक्त न घालिती सर्वथा ॥१३॥ मी भक्तांचें अंतर । भक्त सोयरे माझे निर्धार । मजहूनि भक्त उदार । दिसती चौसार मज दृष्टीं ॥ १४ ॥ ह्मणोनि नामयाचें आर्त्तजीवा । जवळून कोठेंचि न जावा । हेंचि आवडे मज केशवा । आणिक हेवा नसेची॥१५॥ ऐसें बोलतां रुक्मिणीवर । तंव उदयासि आला दिनकर । पुढें वर्तलें तें भक्तचतुर । परिसा सादर निजकर्णीं ॥१६॥ हा भक्तिरस निरुपम । चतुर्दशाध्यायीं केलें कथन । जेविं एकादशस्कंधीं श्रीकृष्ण । उद्धवासि सांगे भागवतीं ॥१७॥ त्या ग्रंथीं एकुणतिसावा अध्याय सुरस । निखिल वोतिला ब्रह्मरस । तेविं भक्तविजयीं विशेष । चतुर्दश अध्यायीं बोलिला ॥१८॥ ह्मणाल प्राकृत तुह्मीं उत्तरें । आणि उपमा देसी गीतेची थोरें । तरी तसें नव्हे जी साचारें । परिसा विचारें निजकर्णीं॥१९॥ तीर्थावळीमाजी साचार । स्वमुखें बोलिले श्रीज्ञानेश्वर । त्या वचनाचा धरूनि आधार । म्यांही तैसेंच निरूपिलें २२० आणि प्राकृत संस्कृत वाणी । अर्थ पाहतां सारिखा जनीं । जेविं गौतमी गाय नामें दोनी । दुग्ध एकचि जाणावें ॥२१॥ कीं पयोब्धि सागर दोनी ह्मणतां । परी उदकासि नाहीं भिन्नता । ह्मणोनि सामान्य प्राकृत ग्रंथा । पंडितीं सहसा न ह्मणावें ॥ २२ ॥ पुढील अध्यायीं सुरस वाणी । ग्रंथ वदवील चक्रपाणी । महीपती तयाचा अभयदानी । निर्भय मनीं सर्वदा ॥ २३ ॥ स्वस्ति श्री भक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । चतुर्दशाध्याय रसाळ हा ॥ २२४ ॥ अध्याय १४ ॥ ओंव्या २२४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्री भक्तविजय अध्याय १४रा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीरुक्मिणीपांडुरंगाय नमः । ऐका श्रोतेहो सादर । आजि प्रसन्न जाहला रुक्मिणीवर । ह्मणोनि भ-
क्तकथा सविस्तर । प्रकट केल्या भूमंडळीं ॥ १ ॥ चातकासाठीं मेघ वोळला । कीं चकोरालागीं चंद्र उदेला । कीं जळ-
चरांसी उचंबळला । सागर जैसा उल्हासें ॥ २ ॥ कीं निववावया सज्जनाचें अंग । चंदन अवतरला निजांग । कीं सुखी
व्हावया सर्वही जग । भास्कर आला उदयासी ॥ ३ ॥ कीं विष्णुपूजा व्हावया संपूर्ण । अपार उठिलें तुळसीवन । नातरी
संतुष्ट करावया उमारमण । बिल्ववृक्ष जेविं वाढला ॥ ४ ॥ कीं संतुष्ट व्हावया घ्राण । वसंतकाळीं प्रकटलीं सुमनें । कीं
सुखी व्हावया विश्वजन । वर्षला घन भूमंडळीं ॥ ५ ॥ कीं गौतमाचें हरावया दुरित । गोदा आली भूमंडळांत । कीं नि-
र्जर करावया तृप्त । प्रकटलें अमृत सागरीं ॥ ६ ॥ तेविं तुह्मां आर्तभूतांकारण । भक्तकथा जाहली निर्माण । असो मा-
गील निरूपण । ऐका सादर भाविकहो ॥ ७ ॥ रुक्मिणीस ह्मणे शार्ङ्गधर । मज निजभक्तांची प्रीती थोर । त्याहूनि विशेष
नामयावर । कृपा अपार सर्वदा ॥ ८ ॥ ऐसा संवाद चक्रपाणी । करितां उगवला वासरमणी । तों सर्व भक्त मिळूनी । द-
र्शनासी पातले ॥ ९ ॥ नामघोषें जयजयकार । करूनि घालिती नमस्कार । जैसा कमळिणीवरी भ्रमर । घाली गुंजारव नि-
जप्रीतीं ॥ १० ॥ कीं देखोनि मातेप्रती । बाळकें जेविं सन्निध येती । कीं हरिणी देखोनि पाडसाप्रती । आनंद चित्तीं न
समाये ॥ ११ ॥ नातरी कृपणा सांपडतां धन । प्रेमें आल्हादे त्याचें मन । तेविं सांवळें स्वरूप देखोन । वैष्णवजन सुखा-
वले ॥ १२ ॥ ध्यानीं स्वरूप जें देखिलें । तेंचि अंतरीं कोंदलें । तेणें आनंदें लोटले । अश्रुपात नेत्रांसी ॥ १३ ॥ अनुभव बो-
लतां त्या सुखाचा । कवीची कुंठित जाहली वाचा । दृष्टांत द्यावया साचा । शोधितां कैसा भूमंडळीं ॥ १४ ॥ शर्करेची
गोडी सेविलियाविण । सांगतां नये तियेचि खूण । तेविं विष्णुपदींचें सुख जाण । वैष्णव जाणती अनुभवें ॥ १५ ॥ मग
आलिंगन देऊन वनमाळीं । निजभक्त धरिला हृदयकमळीं । सादर होऊनि सांभाळीं । कृपादृष्टीं सकळांसी १६ कम-
लनेत्र घनसांवळा । भक्त पाहती वेळोवेळां । तो अनुपम सुखसोहळा । वाचेसी नये बोलतां ॥ १७ ॥ ऐसा उदार देवाधि-
देव । रुक्मिणीस सांगे जीवींचा भाव । भोजनासी आणावे भूदेव । प्रेमादरेंकरूनी १८ चंद्रभागेचे तटीं जाऊनी । प्रा-
यश्चित्त घेतलें कालचे दिनीं । तेव्हांचि संकल्प केला मनीं । विप्र भोजनासी आणावे ॥ १९ ॥ तरी क्षेत्रवासी धरामर ।
जे स्वधर्मशील साचार । तयांसि प्रार्थूनि वारंवार । आणावें सत्वर मंदिरा ॥ २० ॥ जयाचे दर्शनेंकरूनी । पाप ताप जा-
य जळोनी । सकळ कामना पूर्ण होऊनी । स्वानंदघन वर्षत ॥ २१ ॥ षड्रस भोजन त्यांस देऊनी । संदेह निरसावा आ-
जिचे दिनीं । चतुर्भुज रूप दाखवूनी । कौतुक अद्भुत करावें ॥ २२ ॥ संतसंगाचा महिमा थोर । जगीं कीर्ति वाढेल
फार । ऐसा रुक्मिणीशीं शार्ङ्गधर । करी विचार निजप्रीतीं ॥ २३ ॥ अवश्य ह्मणे जगन्माता । विप्रांसि द्यावी
अक्षता । सर्वसिद्धि अनुकूलता । चिंता किमर्थ करावी ॥ २४ ॥ मग हांसोनिया पंढरीनायक । नामयासी ह्मणे वचन
ऐक । पुढती कौतुक आणिक । करणें आहे तुजलागीं ॥ २५ ॥ ऐसें बोलतां जगज्जीवन । नामा देत प्रतिवचन । ह्मणे तु-

ध्या ॥ ३१ ॥ सर्वांह्य व्यापक । त्र[illegible]

मची अंतरींची खूण । मीच जाणे केशवा॥२६॥नामयासि बोले चक्रपाणी । आलिंगन दे मजलागूनी । जिवलगा आ-
तां जवळूनी । जाऊं नको सर्वथा ॥ २७ ॥ तुझें प्रेम पाहतां जाण । आर्तें न धाये माझें मन । तुज देखतां दृष्टीभरून । हो-
य पारणें नेत्रांसी ॥ २८ ॥ तुझाच मज लागला छंद । हा बहुजन्मींचा ऋणानुबंध । ह्मणूनि न तुटे प्रीतिवाद । वेधला
गोविंद निजप्रेमें ॥ २९ ॥ नेणों त्वां काय पुण्य केलें । व्रत तप अनुष्ठान साधिलें । नातरी देह कर्वतीं घातलें । किंवा
केलें तीर्थाटन ॥ ३० ॥ कीं सकळ माया त्यजूनी । चित्त सावरिलें कोंडूनी । ह्मणवूनि मज वश करूनी । हृदयामाजी
सांठविलें ॥ ३१ ॥ काय पदार्थ तुज देईजे । कैसेन उतराई होईजे । ऐसें कांहींच न देखिजे । सकळ त्रिभुवन धुंडितां
॥ ३२ ॥ शरीर प्राणाचें जाण । तुवां देवूनि बळिदान । दे लें बहुत निर्वाण । मजकारणें भक्तराया ॥ ३३ ॥ मी तुझा ह्मण-
वितों श्रीरंगे । जरी दास्य करावें निजांगें । तरी तुज कांहींच नलगे । देणें घेणें पदार्थ ॥ ३४ ॥ नामा ह्मणे ते अवसरीं ।
तूं अनाथनाथ भक्तकैवारी । ह्मणूनि देवा मजवरी । करिसी लोभ निजप्रीतीं॥ ३५॥ मग भक्तवत्सल हृषीकेशी । निर्भय
असतां निजमानसीं । सवें घेऊनि निजभक्तांसी । अक्षता द्यावयासी चालिले ॥ ३६ ॥ जो योगियांचें निजध्यान ।
सकळ देवांचें देवतार्चन । तो विप्रांसी द्यावया आमंत्रण । कुंडलतीर्थासी पातला ॥ ३७ ॥ तंव तेथें अवघेचि लहान-
थोर । मिळाले असती धरामर । ह्मणती आपला यजमान साचार । न येचि सत्वर दर्शना ॥३८ ॥ काल प्रायश्चित्त देतां
जाण । घालूं केलें ब्राह्मणभोजन । परी अजुन नयेचि आमंत्रण । ऐसें परस्परें बोलती ॥ ३९॥ तों सवें घेऊन भक्तमंडळी।
अकस्मात पातले वनमाळी । ब्राह्मणांसि देखोन नेत्रकमळीं । नमस्कार घातला साष्टांग ॥ ४० ॥ मग ह्मणे जगज्जीवन।
सकळ सांडोनि देहभान । निःसंदेह होऊनि जाण । आलें पाहिजे भोजना ॥ ४१ ॥ तुह्मी दिधलें अभय वचना । ते पूर्ण
करावी माझी वासना । स्नानसंध्या सारूनि जाणा । शीघ्र आलें पाहिजे ॥ ४२ ॥ ऐसें ऐकूनि मधुरोत्तर । संतुष्ट जाहले
द्विजवर । मग काय बोलती प्रत्युत्तर । ऐका सादर निजकर्णीं ॥ ४३॥ आह्मी तरी तुमचे आश्रित । हें सत्यचि माना य-
थार्थ । ये क्षेत्रीं राहून तुह्मांस । आशीर्वाद देतसों ॥ ४४ ॥ गोब्राह्मणांचा प्रतिपाळ । करीत असा सर्वकाळ । स्वामी तो
दीनदयाळ । विश्वलोक बोलती ॥४५॥ तुह्मी तो महाराजेश्वर । आह्मी तुमचे द्विजवर ।। कृपादृष्टीं निरंतर । सांभाळी-
त असा कीं ॥ ४६ ॥ तुमचा आदर मुखीं सांगतां । तरी निरुपमचि तत्वतां । वेदवचनासी मान्यता । अखंड देतां निज-
प्रीतीं ॥ ४७ ॥ तेचि भाक आपुली देवें । जतन करावी सर्वभावें । नामया चित्तीं प्रेम द्यावें । कृपाळाघवें आपुल्या ।४८।
ऐसें ऐकूनि अनाथबंधू । जो सकळांचा जीवनकंदू । निजभक्तांचा सौख्यसिंधू । जो का आनंदू योगियांचा ॥४९॥ ह-
र्षनिर्भर होऊनि चित्तीं । देउळा आले सत्वरगतीं । मग रुक्मिणीपाशीं अतिप्रीतीं । सकळ वृत्त सांगितलें ॥ ५० ॥ ह्मणे
धन्य दिवस आजिचा । उदया आला सोनियाचा । ह्मणूनिं सोहळा निजभक्तांचा । मांडिला साचा निरुपम ॥ ५१ ॥
रुक्मिणीस ह्मणे जगज्जीवन । पाचारिले सकळ ब्राह्मण । स्नानसंध्या करूनि जाण । येती सत्वर भोजना ॥ ५२ ॥ आ-



जिचें कौतुक अभिनव । निरुपम नम्रता गौरव । ऐसें बोलोनि देवाधिदेव । हास्यवदन जाहले ॥ ५३ ॥ रुक्मिणी ह्मणे
हृषीकेशी । त्यांचें पुण्य आलें फळासी । ह्मणोनि दर्शन द्विजवरांसी । जाहलें अनायासें तुमचें ॥५४ ॥ तंव नित्यनेम
सारून सत्वर । राउळा आले द्विजवर । नमस्कार करूनि शार्ङ्गधरें । आसनावरी बैसविले ॥५५॥ मग पूजा करावया-
लागुनी । पुढारी जाहले चक्रपाणी । निजहस्तें चरण क्षाळूनी । तीर्थ मस्तकीं वंदिलें ।५६। गंधाक्षता सुमनमाळा । धूप-
दीप दाखवी सांवळा । बुका तुळसी नाना परिमळा । अर्पी द्विजवरां निजप्रीतीं ॥ ५७॥ मग पात्रें विस्तारूनि श्रीरंग ।
लेह्य पेय वाढी सांग । उदक घेऊनि सवेग । संकल्प श्रीरंग सोडीतसे ॥ ५८॥ आपोशन देऊन द्विजवरांसी । प्रार्थना क-
रूनि वैकुंठवासी । ह्मणे भोजन करितां ग्रासोग्रासीं । गोविंदासी स्मरावें ॥५९॥ ग्रासोग्रासीं करी जो स्मरण । तो जेवि-
लाचि उपवासी जाण । ऐसें द्विजांसि रुक्मिणीरमण । आपुले मुखें बोलिले ॥ ६० ॥ असो आनंदभरित द्विज सगळे ।
तृप्त जाहले ते वेळे । करशुद्धी आणि विडे दिले । घननीळें सर्वांसी ॥ ६१ ॥ मग दिव्यरत्नें प्रकाशज्योती । त्यांही उ-
जळोनी आरती । स्वस्थानीं बैसल्या द्विजपंक्ती । ओंवाळी श्रीपती तयांसी ।६२। मग जोडोनि दोनी कर । विनंती करी
शार्ङ्गधर । आजिचा प्रसंग निरंतर । नये साचार पूढती ॥६३॥ पदरीं होल्या पुण्यकोटी । तुह्मां आह्मांसि झाल्या भेटी ।
भरली परमानंदें सृष्टी । ऐसें जगजेठी बोलिले ॥६४॥ आतां आह्मी आणि संतजन । एके पंक्तीं करूं भोजन । तुह्मी स्व-
स्थ करूनि अंतःकरण । बैसा क्षणभरी सुखरूप ॥ ६५ ॥ ऐसें ह्मणूनि ते वेळीं । पाचारिली भक्तमंडळी । कौतुक लाघवें
ते वेळीं । ब्राह्मण पाहाती कौतुक ॥ ६६ ॥ विमानीं बैसूनि सकळिक । कौतुक पाहाती ब्रह्मादिक । सकळ देव घेऊन दे-
ख । शचीनायक पातला ॥ ६७ ॥ योगी तळमळ करिती चित्तीं । भक्तिसुख नाहीं आह्मांप्रती । नामयासि तुष्टोनि रु-
क्मिणीपती । सप्रेमगती दिधली त्या । ६८ ।मग निजपंक्तीस शार्ङ्गधर । बोलावी निवृत्ति ज्ञानेश्वर । सोपान सांवता भ-
क्तथोर । जगमैत्र सखा जिवलग ॥ ६९ ॥ आसंद सुदामा भक्तथोर । प्रेमळ वैष्णव विसोबाखेचर । तैसा नरहरी सोना-
र । आले साचार भोजना ॥ ७० ॥ चोखामेळा आणि वंका । जनका केवळ प्राणसखा । ज्याची आवडी यदुनायका ।
असे सर्वदा निजप्रेमें ॥७१॥ सकळ वैराग्याचा मेरू । तो निजभक्त गोराकुंभारू । ज्यासी आवडता डिंगरू । शार्ङ्गधरू
ह्मणतसे ॥ ७२ ॥ ऐसे सकळ थोर साने । बोलाऊनि भक्तराणे । पूजा केली जगज्जीवनें । निजप्रीतीनें तेधवां ॥ ७३ ॥ जो
सर्वांवरिष्ठ जगज्जीवन । तोही करी निजभक्तपूजन । नामा विस्मित होऊन । निजप्रीतीनें पुसतसे ॥ ७४ ॥ ह्मणे देवा
चोज वाटतें चित्ता । आजि सागर पूजी सरिता । कीं चंद्र नक्षत्रां भोंवता । प्रदक्षिणा घालीतसे ।७५। कीं वैनतेय अंडज
याती । पूजीत बैसे निजप्रीतीं । नातरी पार्वतीरमण कैलासपती । नंदीस प्रार्थी निजप्रेमें ॥७६॥ कीं नृपवर करी प्रजांचें
पूजन । कीं देवांस प्रार्थी शचीरमण । तेविं तूं वरिष्ठ जगज्जीवन । देशी सन्मान निजदासां ॥७७॥ हांसोनि बोले रुक्मि-
णीरमण । मज तुह्मींच दिल्हें थोरपण । सरिता नसत्या जरी निर्माण । तरी समुद्र कैसा वाढता ॥ ७८॥ नक्षत्रें नसतीं स-

च्या ॥ ३१ ॥ सबाह्य व्यापक । [illegible]

भौंवतीं । तरी चंद्रासि शोभा न येती । निर्माण नसती अंडजयाती । तरी गरुडास न ह्मणते वरिष्ठ ॥ ७९ ॥ नंदी नसता जरी निर्माण । तरी धूर्जटीस वागवितें कोण । नातरी तेतीस कोटी नसतां गण । तरी इंद्रासि सन्मान कोठोनी ॥ ८० ॥ प्रजांनीं राजास थोर केलें । तेवि तुमचेनि नांवरूप मज आलें । ऐकूनि भक्त विस्मित जाहले । निजमानसीं तेधवां ८१ तंव सत्यभामा राही रुक्मिणी । विस्तारून आणिती विविध बोणीं । भक्तमंडळींत शार्ङ्गपाणी । कैशापरी शोभला ८२ सप्तसागरांत क्षीरसागर । कीं नक्षत्रांमाजी रोहिणीवर । कीं अलंकारांत कौस्तुभ थोर । झळके साकार सतेज ॥ ८३ ॥ अष्टधातूंत जैसें कांचन । कीं चुणियांमाजी जैसें रत्न । तैसा भक्तमंडळींत जगज्जीवन । षड्गुणैश्वर्य दिसतसे ॥ ८४ ॥ सकळांसुखीं रुक्मिणीवर । कवळ देतसे वारंवार । उच्छिष्ट पडतां सत्वर । पीतांबरें सांवरित ॥ ८५ ॥ तें सुख देखोनि दिठीं । विरिंची तेव्हां लाळ घोंटी । ह्मणती नामयास तुष्टला जगजेठी । न पाहे दिठीं आह्मांतें ॥ ८६ ॥ ऐशा रीतींकरून सोहळे । भोजन जाहलें खेळे मेळें । ब्रह्मरसेंकरूनि धाले । सकळ संत तेधवां ॥ ८७ ॥ तंव विमानीं बैसोनि सुरवर । आनंदें करिती जयजयकार । पुष्पवृष्टी अपार । करिते जाहले ते समयीं ॥ ८८ ॥ तो सुवास न सांठे गगनीं । विप्र आश्चर्य करिती मनीं । ह्मणती जीवित्वाची हानी । आली होऊनि दिसताहे ॥ ८९ ॥ अद्भुत उसळला प्रेमरंग । हा नव्हेचि जाणा ज्ञानमार्ग । नव्हेचि तामस वैराग्य । आलें भक्तिभाग्य रूपासी ९० तंव एक ह्मणती यथार्थ वाचें । हा पांडुरंगचि आहे साचें । मानवासी असेल कैंचें । एवढें भाग्य अघटित ॥ ९१ ॥ हा गुणवंत नव्हेचि सर्वथा । क्रियाकर्मासी अकर्ता । यासी देतां प्रायश्चित्ता । कैशा रीतीं घडेल ॥ ९२ ॥ अंत्यज ब्राह्मण दोघेजण । गंगेमाजीं करितां स्नान । परि तीसी विटाळ जाहला ह्मणून । वदों नयेची सर्वथा ॥ ९३ ॥ कीं नाना याती पृथ्वीवर । स्वइच्छा करिती व्यवहार । तीसी नाहीं लहानथोर । शार्ङ्गधर तैसा असे ॥ ९४ ॥ नातरी उदयासि येतां भानु । प्रकाश सर्वांसी समानु । तैसाचि हा जगज्जीवनु । भूतमात्रीं सारिखा ॥ ९५ ॥ कां पर्जन्य वर्षतां पृथ्वीवर । त्यासि सारिखे भूमी डोंगर । तैसाचि हा यदुवीर । भूतमात्रीं सारिखा ९६ हा निर्गुणरूपी शार्ङ्गधर । यासी नाहींच आपपर । याती कुळाचा विचार । नाहीं साचार याळागीं ॥ ९७ ॥ षड्वर्गसंबंध लावितां पाहीं । कदा न लागती याचे ठायीं । विकल्पाचें नांवचि नाहीं । याजपाशीं सर्वथा ॥ ९८ ॥ काया मनें आणि वाचा । सोयरा जिवलग दीनाचा । तैसाच उदार मनाचा । लोभ अपार भक्तांसी ॥ ९९ ॥ यासी अनुसरले सर्वकाळ । तयांचे तोडी मायाजाळ । संसारजाळीं भक्त प्रेमळ । गुंतों नेदीच सर्वथा ॥ १०० ॥ पाहावया नामयाची माता । तुमचे आमचे दृष्टीदेखतां । नानापरीचे वाद घालितां । शिणली बहु मनांत ॥ १ ॥ हा नाटकलाघवी हृषीकेशी । नामा घातला पाठीसी । माझा ह्मणूनि पोटासी । आलिंगोनी धरियेला ॥ २ ॥ याचें रूप पाहतां सुंदर । निजदेहाचा पडे विसर । चरण आठवितां साचार । चित्त भुलोन जातसे ॥ ३ ॥ यासी जातां अनन्य शरण । त्याचें निवारी जन्ममरण । ऐसें द्विजवरांचें वचन । ऐकोनी जगज्जीवन हांसत ॥ ४ ॥ मग गृहस्थवेष पालटोन । दाविता झाला रूप सगुण । नामयासि देऊनि आ-



लिंगन । हृदयीं धरिला निजप्रीतीं ॥ ५ ॥ मग अभय देऊनि ब्राह्मणांसी । निजरूप दावी हृषीकेशी । तें ध्यान वर्णावयासी । सारजा कुंठित होतसे ॥ ६ ॥ तंव मस्तकीं दिव्यरत्न किरीटी । कस्तूरी मळवट लल्लाटीं । सांवळा सकुमार जगजेठी । पाहती दृष्टीं द्विजवर ॥ ७ ॥ मयूरपिच्छांचिया वेंटी । मकराकार कुंडलें गोमटीं । सकळ संतां कृपादृष्टीं । रुक्मिणीपती पाहातसे ८ जे पुंडलिकाच्या पुण्यराशी । पाहूनि आले आकारासी । जो कां क्षीरसागरविलासी । वैकुंठवासी आदिदेव ९ मंदस्मित वदन निर्मळ । दशनीं फांकती रत्नकीळ । ऐसें रूप घनसांवळें । निवती डोळे पाहतांची ११० त्या सुखाचे अधिकारी देख । प्रेमळभक्तचि असती एक । ध्यानीं आणोनि यदुनायक । घेती अनेक प्रेमसुख ११ कौस्तुभ वैजयंतीमाळ । हृदयीं पदक अतिसोज्वळ । तुळसीमंजिऱ्या अतिकोमळ । दीनदयाळ ल्यालासे । १२ । हृदयीं श्रीवत्सलांछन । तेंचि प्रीतीचें निजभूषण । श्यामतनूसी चर्चिला चंदन । राजीवनयन शोभतसे १३ शंखचक्र घेऊनि करीं । कर ठेविले कटीवरी । श्यामतनु पीतांबरधारी । जें ध्यान अंतरीं भक्तांच्या ॥ १४ ॥ लक्ष्मीसहित श्रीहरी । समपद ठाकले विटेवरी । महादैत्य दानव भारीं । रुळती तोडरीं असंख्य ॥ १५ ॥ ऐसें दिव्य तेज प्रकटलें । तेणें ब्रह्मांड उजळिलें । दिनकरमंडळही लोपलें । निजतेज देखोनि तेधवां ॥ १६ ॥ संत आणि सकळ ब्राह्मण । देखती चतुर्भुजरूप सगुण । द्विजवर आश्चर्य करून । तटस्थ राहिले निवांत ॥ १७ ॥ पक्षी कीटक पशु नर । पाषाण आणि तरुवर । दृष्टीस पाहती धरामर । तों विठ्ठलरूप दिसतसे ॥ १८ ॥ आप तेज आणि गगन । मही मारुत पांचही जाण । दृष्टीस पाहती ब्राह्मण । तों विठ्ठलरूप दिसतसे ॥ १९ ॥ नाना याती पशू जीव । रवि चंद्र नक्षत्रें सर्व । नाना दैवतें अभिनव । विठ्ठलरूप दिसतसे ॥ १२० ॥ सभामंडप रंगशीळ । जयविजय द्वारपाळ । गरुडखांब महाद्वार । विठ्ठलरूप दिसतसे ॥ २१ ॥ गरुडटके पताका कळस । टाळ मृदंग नामघोष । पायऱ्या वोवऱ्या द्विजवरांस । विठ्ठलरूप दीसती ॥ २२ ॥ रजतमसत्त्वगुण । जीव चैतन्य आणि मन । ध्यानांत पाहतां विचारून । तों विठ्ठलरूप दिसताहे ॥ २३ ॥ वटबीज एक पेरिलें । तें अनंतरूपें विस्तारलें । कां वासरमणीचें तेज एकलें । जैसें व्यापिलें पृथ्वीवरी ॥ २४ ॥ कीं सकळ रसांत एक जीवन । नातरी ब्रह्मांडव्यापक एक पवन । कीं अनेक देहीं एक जठराग्न । व्यापक असे ज्या रीतीं ॥ २५ ॥ कीं अनंत नेत्र दृष्टी एक । एक अवधान स्वर अनेक । कीं दश इंद्रियांत व्यापक । अभासे जैसे पाहतां ॥ २६ ॥ तैसा एक रुक्मिणीवर । रूपें नटला चराचर । दृष्टीस पाहतां द्विजवर । तटस्थ जाहले मानसीं ॥ २७ ॥ विश्वरूप नटला जगज्जीवन । दृष्टांत द्यावया पाहावा कोण । कृष्णावतारीं मनमोहन । व्रजांगनांनीं धरियेला ॥ २८ ॥ यशोदेपाशीं येतां जाण । देखत्या जाहल्या अनंत कृष्ण । तैशा रीतीनें ब्राह्मण । विश्वरूप पाहती ॥ २९ ॥ एकचि व्यापिलें केशवराजें । दृष्टीस पाहतां न दिसे दुजें । देहबुद्धी राहिली सहजें । विराली लाज अंतरीं ॥ १३० ॥ प्रकटला परमानंद बोध । वाटला सकळांसी आनंद । राहिला अवघा द्वंद्वभेद । अंतरीं स्वानंद सकळांच्या ॥ ३१ ॥ सबाह्य व्यापक त्रिजगतीं । अंतरीं कोंदली श्रीकृष्णमूर्ती । जे योगियांची सुखविश्रांती । विप्र पाहती नि-

जप्रेमें ॥३२॥ सप्रेमभावें संतसज्जन। एकमेकांसी देती आलिंगन। हर्षें निर्भर होऊन । जयजयकारें गर्जती ॥३३॥ अपार देखोनि सुखविश्रांती। सकळ तन्मय जाहले चित्तीं। ब्रह्मानंद सोहळा श्रीपती। भोगवी प्रीतीं निजदासां ॥ ३४ ॥ द्विजांनीं टाकिलें देहभान। त्यांसी सावध करी जगज्जीवन। नामयासि उचलोन। चरणावरी घातलें ॥३५॥ जो भक्तवत्सल जगजेठी। सकळांसि पाहे कृपादृष्टीं। ब्राह्मणांसी गुजगोष्टी। सांगे निकट बैसोनी ॥ ३६॥ द्विजांसि ह्मणे केशवराज। ऐका जीवींचें निजगुज। निजभक्त अनुसरले मज। प्रपंचलाज टाकूनी ॥ ३७ ॥ मी यांचेनि सेवाऋणें। बांधलों असें संपूर्ण। भक्ताधीन असें जाण। नाहीं स्वाधीन आपुल्या ॥ ३८ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान। सर्वांभूतीं भजती मजकारण। अल्पता करूनि देहभान। केलें स्वाधीन मज त्यांनीं ॥३९॥ हा जगमित्र टाकूनि संसारा। जाहला आमचा परम सोयरा। मज कोंडोनि हृदयमंदिरा। नये माघारा देहबुद्धी ॥ ४० ॥ हा सांवता माळी माझा दास । भजनीं धरून विश्वास। भूतमात्रीं मी पाहातसे। मजचि एक निजप्रेमें ॥ ४१ ॥ बारा दिवसांचा होतां बिदी। मायेनें टाकिला वेणुनादीं। तो हा वासरा अद्वैतबोधी। होऊनि मज भजतसे ॥ ४२ ॥ निजभक्त विसोबाखेचर। आणि हा नरहरी सोनार। माझे भजनीं निरंतर। गोरा कुंभार असे कीं ॥ ४३ ॥ घरदार त्यजोनि सकळ। तोडिले यानें मायाजाळ। तो हा सुदामा भक्त प्रेमळ। वाटे कळवळ मज याची ४४ चोखामेळा आणि वंका। प्रेमळ भक्त माझा जनका। मजवांचूनि अन्य सखा। नसेच कोणी तयांसी ॥ ४५ ॥ सर्व संग टाकूनि जीवें। मज अनुसरले ऐक्यभावें। मजवांचूनि आणिका भाव। कोणे ठाईं न धरिती ४६ ऐसे एकेकाचे उपकार। वर्णावे ते कोठवर। ऐसें विप्रांसि शार्ङ्गधर। प्रेमआल्हादें सांगती ४७ सकळ भक्तांचा चरणरज। प्रेमळ नामा भक्तराज। ऐसें ऐकूनिया द्विज। आश्चर्य करिती निजमनीं ॥ ४८ ॥ ते भाग्याचे पूर्ण सागर। काय बोलती मधुरोत्तर। ह्मणती आह्मासी माहेर। जोडलासी विठ्ठला ॥४९॥ आतां मागणें हेंच पंढरीनाथा। तोडीं आमची प्रपंचममता। चरणाचा वियोग सर्वथा। न होय ऐसें करावें ॥१५०॥ न लागती भुक्ती आणि मुक्ती। नलगे कांहीं धनसंपत्ती। जन्मोजन्मीं संतसंगती। आह्मां श्रीपती असोंदे ॥५१॥ वेदशास्त्र करितां पठण। बहिर्मुख जाहलें मन। बुद्धीचें चलन अभिमानें। केलें असे आमुच्या ॥५२॥ तुह्मी न कळतां प्रेमखूण। धिग् धिग् तें जाणपण। तुह्मी कृपा नसतां जाण। कासया सन्मान जाळावा ॥ ५३ ॥ आह्मी ब्राह्मण उंच वर्ण। याच भ्रांतीनें ग्रासलों जाण। प्रेमस्वाद अंतरलों तेणें। थोर बंधन अहंतेचें ॥ ५४ ॥ हे अवघी तुह्मीचा माया। आह्मां भुलवी पंढरीराया। वाहूनि गेलों होतों वायां। परी त्वां देवराया रक्षिलें ॥ ५५ ॥ अपराधाचिया कोटी बहुत। आह्मा घडल्या अति अद्भुत। तूं कृपाळू पंढरीनाथ। केलें सनाथ पतितांसी ॥ ५६ ॥ दीननाथ नाम ठेविलें। तें बिरुद आजि साच केलें। आह्मा पतितांसि उद्धरिलें। दर्शन दिधलें निजकृपें ॥ ५७ ॥ काय संचित होतें आमचें। पुण्य अनंतजन्मींचें। ह्मणोनि दर्शन देऊन साचें। बोलसी वाचे निजप्रीतीं ॥ ५८ ॥ संचित बीज पेरिलें जाण। संतसंगाचें वरी जीवन। अनंत फळें त्यालागून। आलीं पूर्ण

देवराया ॥५९॥ दुर्धर तोडोनी मोहपाश। निजरूपीं केला सौरस। तुझी लीला वर्णितां वाचेस। श्रुतिशास्त्रांस अगम्य ॥ १६० ॥ तापत्रय वणवा होता जळत। तो विझवूनियां अवचित। आह्मा आर्तांसी प्रेमामृत। बळेंचि पाजिलें स्वामिया ॥ ६१ ॥ आतां मागणें हेंचि जगजेठी। ऐसेंचि रूप असावें दिठीं। आणि निरंतर संतांची भेटी। कामना पोटीं हेचि धरिली ॥ ६२ ॥ अखंड प्रेम असावें चित्तीं। तुझे भजनीं लागावी प्रीती। मग गर्भवास होतां आह्माप्रती। नयेचि कधीं कंटाळा ॥६३॥ तूं अनंत ब्रह्मांडनायक। कर्ता करविता होसी एक। तुझे गुणांचा करितां लेख। श्रुतिशास्त्रें कष्टलीं ॥ ६४ ॥ आमचे अवगुण मानसीं। आतां न धरीं हृषीकेशी। माझे ह्मणोनि संतांसी। निरवावें दयाळा ॥ ६५ ॥ तुझे दासाचे व्हावें दास। आणिक चित्तीं नाहीं आस। त्यांचे चरणरज अंगास। लागती आमच्या ऐसें करी ॥६६॥ हेंचि आमचें तपव्रत। क्रिया कर्म जाण निश्चित। तुझे भजनीं असावी प्रीत। प्रेमयुक्त निजनामीं ॥ ६७ ॥ ऐकोनि द्विजवरांचें उत्तर। संतोषले शार्ङ्गधर। कृपा करूनी अपार। मग भेटले सकळांसी ॥ ६८ ॥ आलिंगन देऊन ब्राह्मणांसी। काय बोलती वैकुंठवासी। ज्ञानदेव जें सांगेल तुह्मासी। ते खूण मानसीं असोंद्या ॥६९॥ सकळ सर्वज्ञांचा राव। तो आत्मा माझा ज्ञानदेव। तो सांगेल जीवींचा अनुभव। तेथें सद्भाव असोंद्या ॥ १७० ॥ ते खूण अंतरीं स्वभावें। सुलभ होईल सर्वभावें। मग दृढ धरूनियां जीवें। करावी जतन सर्वांनीं ॥ ७१ ॥ ते निजकळा हातासि येतां जाण। मग नलगेचि तीर्थाटन। वेदशास्त्र अभ्यसन। कांहीं नलगेची सर्वथा ॥७२॥ मग कासया पाहिजे तपसायास। करणें नलगेचि कायाक्लेश। संतसंगीं धरितां विश्वास। नासती दोष क्षणमात्रें ॥७३॥ वज्रासनीं बैसावें नेहटीं। कांहींच नलगे खटपटी। वास करणें गिरिकपाटीं। वृथा चावटी कासया ॥ ७४ ॥ कासया करावें उग्रतप। नलगेचि कांहीं मंत्र जप। संतसंगें त्रिविध ताप। निवतील सर्व क्षणमात्रें ॥ ७५ ॥ नलगे भस्मोद्धूलन फार। नलगे वाढवणें जटाभार। लोकाचारीं दांभिक पसर। करणें नलगेची सर्वथा ॥ ७६ ॥ सर्वांभूतीं करुणाभरित। जिव्हेसि असावें नामामृत। तेव्हांचि मन होईल निवृत्त। क्षणमात्र न लागतां ॥ ७७ ॥ क्रिया कर्म करितां खटपट। परी प्रेमेंविण येतो वीट। हे आत्मज्ञानासी नव्हे वाट। वृथा कटकट कर्मठा ॥ ७८ ॥ साधनावांचूनियां जाण। हाचि मार्ग बहु सोपान। प्रेमें करावें हरिकीर्तन। राम कृष्ण गोविंदा ॥७९॥ तीर्थ व्रतें तपें चोखडीं। कीर्तनापुढें तीं बापुडीं। सांडोनि थोरपणाची प्रौढी। लाजोनि गेलीं सकळिक ॥१८०॥ तो हा प्रसिद्ध राजयोग। सर्वांवरिष्ठ असे चांग। अखंड धरूनि संतसंग। वाचेसि नाम असावें ॥८१॥ संकल्प विकल्प चित्तासी। येऊं न द्यावा मानसीं। मनोभावें संतांसीं। शरण जावें सद्भावें ॥८२॥ ऐशा रीतीं जगज्जीवन। विप्रांसि सांगे गुह्यज्ञान। अवश्य ह्मणोनी ब्राह्मण। वंदिती चरण देवाचे ॥ ८३ ॥ ज्ञानदेवासि ह्मणे रुक्मिणीवर। तुह्मांस निरविले हे द्विजवर। यांचे मस्तकीं ठेऊनि कर। अक्षयी वर असोंदे ॥ ८४ ॥ अवश्य ह्मणोनी ज्ञानेश्वर। भावें नमिला रुक्मिणीवर। अनुभव पावती ऋषीश्वर। तैसेंचि निर्धारें सांगें मी ॥ ८५॥ हें वेदाचें गुह्यज्ञान। कीं वैराग्याचें जीवन। कीं विदा-

काशींची खूण। परम गुह्य जाणावें ॥ ८६॥ कीं हें शुद्धज्ञानाचें गुज। ना तरी मोक्षमुक्तीचें बीज। कीं हा सकळ मंत्र-राज। मंगळनिधी प्रकटला ॥ ८७॥ नामयाचें प्रेम अद्भुत। हृदयामाजी होतें गुप्त। तें भूमंडळीं जगविख्यात। कथा प्रकट जाहली कीं ॥ ८८॥ हें श्रवणाचेंही निजश्रवण। कीं मननाचेंही निजमनन। नातरी आवडीचें निदिध्यासन। अनुसंधान नामयाचें ॥८९॥ हेंचि विचाराचें निवडिलें सार। कीं धृतीचाही निजनिर्धार। नातरी स्वरूप साक्षात्कार। उघड केला भूमंडळीं ॥ १९०॥ कीं हें भक्तिरसाचें लाघव। नातरी भावाचें निजवैभव। कीं सन्मानाचें निजगौरव। प्रकट जाहलें लोकांत ॥ ९१॥ कीं यशाचा प्रकाश थोर। कीं परत्रींचाही पार। नातरी कीर्तीचा विस्तार। येऊन समोर ठाकला ॥ ९२॥ हें सकळ धर्मांचें जीवन। कीं पवित्राचेंही पावन। नातरी हें अधिष्ठान। आनंदाचें जाणावें ९३ हें योगसिद्धीचें पीयूष। कीं भक्तजनाचें सौरस। नातरी पूर्ण आयुष्य। निष्कामतेचें जाणावें ॥९४॥ हे देवभक्तांचे निज सोहळे। कीं हें अमृत शिगे आलें। आवडीकरून जीहीं सेविलें। ते अक्षय जाहले अनायासें ॥ ९५॥ हे तीर्थावळी करितां श्रवण। गर्भवासा नलगे येणें। ह्मणोनि याचें कीर्तन। आवडी करून ऐकावें ॥ ९६॥ यासि न ह्मणावें प्राकृत। नव्हे पाठांतर कवित्व। हा केवळ उपनिषदर्थ। ब्रह्मरसचि प्रकटला ॥ ९७ ॥ येथें जाणीव शाहाणीवता। कोणी न करावी तत्वता। सांडोनि व्युत्पत्तीची ममता। सादर श्रवणार्थी असावें ॥९८॥ हें सात्त्विकाचें निजसाधन। यासी भोक्ते संतजन। ऐसें ज्ञानदेववचन। तीर्थावळींत बोलिले९९त्याचीं पदें आणूनि ध्यानीं। म्या लिहिली आर्षवाणी। ह्मणोनि शब्द विचक्षणीं। न ठेवावा सर्वथा ॥ २००॥ पुढें कूर्मदासचरित्र जाण। सुरस कथा अति गहन। श्रोतीं स्वस्थ करूनि मन। चित्त देऊनि ऐकावें ॥१॥ जो विश्वव्यापक रुक्मिणीरमण। वक्ता वदविता जगज्जीवन। भक्तविजय ग्रंथ पावन। त्याचे इच्छेनें होतसे ॥ २ ॥ स्नेहसूत्र घालितां सहज। दीपक दिसतो तेजःपुंज। तेविं बुद्धि प्रकाशूनि गरुडध्वज। ग्रंथ वदवी निजप्रेमें ॥ ३ ॥ जो पतितपावन अनाथनाथ। जड मूढ तारिले असंख्यात। महीपती त्याचा मुद्रांकित। भजन करितो निजप्रेमें ॥४॥ स्वस्तिश्री भक्तविजय ग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविक भक्त। पंचदशाध्याय रसाळ हा ॥५॥ अध्याय १५ ॥ ओव्या २०५॥ श्री गोपालकृष्णार्पणमस्तु ॥





श्रीगणेशाय नमः। श्रीकृष्णाय नमः। आजिचा दिवस सुदिन मंगळ। जे तीर्थासम पर्वकाळ। भक्तकथा वाचितां प्रेमळ। घडती सकळ अनायासें ॥१॥ नातरी तीन शतें साठ व्रतें। विधियुक्त केलीं समस्तें। कीं अश्वमेध घडले शतें। निष्कामबुद्धी निजनिष्ठें ॥ २॥ नातरी उग्रतपें बहुत केलीं। कीं सकळ दैवतें आराधिलीं। कीं दुष्काळीं अन्नदानें घडलीं। क्षुधार्तीयासि अनायासें ॥ ३॥ कीं विधियुक्त घडला चतुर्थाश्रम। कीं तृषाक्रांतासि पाजिलें जीवन। कीं मातापितयांची सेवा पूर्ण। केली सकळ निजप्रीतीं ॥ ४ ॥ इतुकीं पुण्यें भक्तकथेसी। श्रोतयां लाधती अनायासीं। मग प्रसन्न होऊनि हृषीकेशी। अक्षय पदासी ठेविले ॥ ५॥ ह्मणऊनियां सर्वज्ञजनीं। अवधान यावें मजलागुनी। जैसी मोहरी वाजतां ऐकूनि कानीं। फणिवर डोलती निजप्रेमें ॥ ६ ॥ कीं नादलुब्ध मृग होऊन। जाय विसरूनी देहभान। तेविं भक्तकथा करितां श्रवण। जगज्जीवन संतोषे ॥ ७ ॥ एक कूर्मदासनामें ब्राह्मण। परमभाविक होता जाण। तयासि नव्हते करचरण। प्रतिष्ठानीं राहातसे ॥ ८॥ तो सूर्यरथींचा अरुण। करावया हरिभजन। ब्राह्मणवंशीं अवतार पूर्ण। त्याणें घेतला यासाठीं ॥ ९॥ परी उपजत नाहीं चरणकर। दिवसेंदिवस जाहला थोर। तों गांवांत ऐकूनि कीर्तनगजर। गेला सत्वर तया ठायां ॥१०॥ तेथें टाळ वीणे मृदंग वाजती। प्रेमभावें वैष्णव गाती। देखोनि हर्ष वाटला चित्तीं। बैसला प्रीतीं श्रवणार्थ ॥११॥ पंढरीमाहात्म्य अतिसुरस। सप्रेम वर्णिती हरिदास। श्रवण करितां कूर्मदास। अतिउल्हासे निजमनीं ॥ १२॥ मग जोडूनियां दोनी कर। तयांसी बोले मधुरोत्तर। ह्मणे श्रीपंढरीस गेलों जर। तरी रुक्मिणीवर नेईल कीं ॥१३॥ ऐसें ऐकूनियां वचन। हांसों लागले सकळ जन। ह्मणती तुज नसती करचरण। कैसा जाशील कळेना ॥१४॥ पक्ष नसतां अंडजांस। केविं आक्रमितील गगनास। कीं नेत्र नसतां मनुष्यास। कैसा चढेल डोंगरीं ॥१५॥ नातरी बधीर असतां श्रवण। कैसें करावें हरिकीर्तन। कीं कंठ बैसला तरी गायन। कैशा रीतीं करावें ॥१६॥ आपले पदरीं नसतां धन। सुखी न होती याचकजन। कीं विद्याभ्यास नसतां पूर्ण। कैसा सन्मान होईल त्याचा ॥ १७॥ मन नसतां आपले आधीन। तरी कैसें घडेल योगसाधन। कीं सद्गुरुकृपा नसतां पूर्ण। तरी आत्मज्ञान नव्हे कीं॥१८॥ तेविं तुजला नाहींत करचरण। आणि पंढरीस करूं ह्मणसी गमन। हें ऐकूनि आमुचें मन। साशंकित जाहलें॥१९॥ आह्मांसि सर्व संपत्तीधन। शरीरही आरोग्य होतें जाण। परी घडलें नाहीं तीर्थाटन। ह्मातारपणपर्यंत ॥२०॥ आणि तुवां वासना धरिली ऐसी। परी भरंवसा न वाटे आह्मांसी। करचरण नाहींत तुजसी। कैसा जासी कळेना ॥२१॥ कूर्मदास ह्मणे त्यांसी। नरदेह लाधला अनायासीं। येथें न जातां पंढरीसी। तरी पुढें चौऱ्यायशी चुकेना२२ ऐसा अनुताप धरूनि अंतरीं। तेथूनि निघाला झडकरी। गांवापासोनि कोसभरी। खुरडत गेला तेधवां ॥२३॥ मारुतीच्या देउळांत। जाऊन उतरला गांवांत। क्षुधा तृषा लागली बहुत। चिंताक्रांत जाहला ॥२४॥ ह्मणे पंढरीनाथा रुक्मिणीकांता। मज सांभाळी तूं अनाथा। तुजवांचूनि बंधुचुलता। माय बाप दिसेना ॥ २५॥ तूंचि माझा प्राणजीवन। कोण सांभाळी भूकताहान। ऐसें ऐकूनि करुणावचन।

जगज्जीवन पातला ॥ २६ ॥ खिस्ती होऊन पंढरीनाथ । तेथें पातला अकस्मात । कूर्मदासासी वैकुंठनाथ । काय बोलत तेधवां ॥२७॥ तुह्मांस नाहींत करचरण । कोठें करितांजी प्रयाण । आपुलें सांगा नामाभिधान । मजकारणें ये समयीं २८ येरू ह्मणे पंढरीस । इच्छा वाटते जावयास । नांव पुसिलें आह्मास । तरी कूर्मदास जाणिजे ॥२९॥ वचन ऐकूनि श्रीपती । संतोषले परम चित्तीं । ह्मणे अनायासें अह्मां संगती । लाधली अवचिती निजभाग्यें ॥ ३० ॥ कूर्मदास वचन बोलत । मी तंव करचरणरहित । तुह्मास आमुची संगत । कोण्या उपयोगीं पडेल ॥३१॥ तुह्मी कोठें करितां गमन । सांगा आपुलें नामाभिधान । ऐसें ऐकूनि मनमोहन । काय वचन बोलिला ॥३२॥ विठोबाखिस्ती मजकारण । अवघे बोलती विश्वजन । पंढरीस आमुचें दुकान । तेथवर जाणें लागतें ॥ ३३ ॥ कूर्मदास ह्मणे तयाप्रती । तुह्मी तो जाल सत्वरगतीं । आह्मांसि कैसी संगती । लाधेल ऐसें कळेना ॥३४॥ मग ह्मणे शार्ङ्गधर । आह्मांसि जाणें आहे स्थिर । देणें घेणें व्यवहार । मार्गीं करावा लागतो ॥ ३५ ॥ कोश अथवा अर्धकोश । वस्तीस राहतों सावकाश । आतां तुमचे संगतीस । अंतर नेदींच सर्वथा ॥ ३६ ॥ ऐसें बोलतां चक्रपाणी । कूर्मदास संतोषला मनीं । मग स्वयंपाक करूनियां ते क्षणीं । भोजन घातलें तयासी ॥३७॥ कूर्मदासासि राजीवनेत्र । पांघरावयास देत वस्त्र । मग ह्मणे धन्य पंढरीक्षेत्र । तेथें भक्त पवित्र नांदती ॥ ३८ ॥ कूर्मदासासि जगजेठी । रात्रीं बोले गुजगोष्टी । मार्गीं चालतां जाहला कष्टी । उठाउठी न चालवे ॥३९॥ उदईक तुह्मीं राहाल जेथ । आह्मीही सत्वर येऊं तेथ । भोजनाविषयीं चिंताक्रांत । कांहीं न व्हावें मानसीं ॥४०॥ आह्मी हिंडतों याकारण । यात्रेस जाती अनाथदीन । त्यांचा हिरोन घ्यावा शीण । भूक ताहान पुसावी ४१ ऐसें बोलतां रुक्मिणीपती । तों उदया पातला गभस्ती । मग कूर्मदासासि उठवून प्रीतीं । काय बोले तेधवां ॥ ४२ ॥ मार्ग दाखवितों तुह्मासी । गमन करावें वेगेंशीं । सांयकाळीं बिराडासी । अगत्य येऊं सत्वर ॥ ४३ ॥ ऐसें ह्मणोनि रुक्मिणीपती । अदृश्य जाहले सत्वरगतीं । कूर्मदास मार्गाप्रती । गमन करितसे तेधवां ॥ ४४ ॥ अस्तमानपर्यंत जाण । कूर्मदास करी गमन । ग्रामासमीप येऊन । वाट पाहे द्विजाची ॥ ४५॥ तों सत्वर येऊनि घननीळ । तैसाच केला प्रतिपाळ । ऐसा निज दीनदयाळ । करी सांभाळ तयाचा ॥ ४६ ॥ सन्निध ग्राम नसेल जर । तेथें निर्माण करी दुजा सत्वर । परी निजभक्तांसि शार्ङ्गधर । कष्टों नेदीच सर्वथा ॥४७॥ ऐशा रीतीं चतुर्मास । चालत असतां कूर्मदास । तों अकस्मात लहुळास । कार्तिकमासीं पातले ॥ ४८ ॥ कार्तिक शुद्ध दशमीसी । यात्रा चालिली पंढरीसी । कूर्मदास देखोनि मानसीं । चिंतावला तेधवां ॥४९॥ एकादशी पातली जवळ । मज नाटोपे तो सोहळ । करचरणेंविण पांगुळ । दीनदयाळ अंतरला ॥५०॥ ह्मणे उदईक एकादशी । वैष्णव जातील वेगेंशीं । मी पांगुळ परदेशी । निढळ पडलों एकला ॥५१॥ मज असते जरी चरण । तरी यांजसवें करितों गमन । ऐसा चिंताक्रांत उद्विग्न । जाहला असे मानसीं ॥ ५२ ॥ चपळाचिया सवें जाण । पांगुळासी न करवे गमन । उदारा ऐसें कृपणासि दान । देतां नयेचि सर्वथा ॥५३॥ कीं क्षुधार्त्तयाचे बरोबरी । रोगी जेवील केसिया परी । कीं भास्करतेजाची सरी । चंद्र कैसी करील ॥ ५४ ॥ सुवर्णमोलाचिया समान । अन्य धातू न येती जाण । कीं पक्वान्नस्वादाच्या समान । कदन्न जैसें नये कीं ॥ ५५ ॥ कामधेनूचें ऐश्वर्य पाहें । इतर पशूंसी जैसें नये । कल्पतरूची सरीं काये । आणिक तरुवरांसी येईल ॥ ५६ ॥ तेवि यात्रेकरियां बरोबरी । मज चालतां न उरे उरी । ह्मणोनि कूर्मदास अंतरीं । चिंताक्रांत जाहला ॥ ५७ ॥ मग अंतरीं करूनि विचार । निरोप पाठवी सत्वर । ह्मणे यात्रेकरूहो माझा नमस्कार । रुक्मिणीवरासी सांगावा ॥ ५८ ॥ मी परदेशी अनाथदीन । करचरण नाहींत मजकारण । एकादशीस तुमचें दर्शन । होतां न दिसे सर्वथा ॥५९॥ लहुळापासून सातकोश । पुढें पंढरी राहिली असे । तरी सात दिवस यावयास । पाहिजेत मजलागीं ॥ ६० ॥ आतां येथवर येऊनि जगजेठी । मज सांभाळीं कृपादृष्टीं । मी तुझे भेटीविण कष्टी । होतसें पोटीं बहुतची ॥ ६१ ॥ चातक इच्छिती जलधर । कीं चंद्र पाहती चकोर । तैसाचि मी निरंतर । तुझी वाट पाहातसें ॥ ६२ ॥ कीं वत्सें धुंडिती धेनूसी । कीं अंडज पाहे पक्षिणीसी । तैसा कूर्मदास तुजसी । निजमानसीं चिंतितसे॥ ६३ ॥ गोत वित्त आधार कांहीं । तुजवांचूनि आणिक नाहीं । धनसंपत्ती विठाबाई । तुजविण कांहीं दिसेना ॥ ६४ ॥ अनाथनाथ कृपासागर । तूं ह्मणविसी शार्ङ्गधर । तरी आतां येऊनि येथवर । करी उद्धार दीनाचा ॥ ६५ ॥ ऐसी करुणा सांगूनी । यात्रेकऱ्यांसी करी विनवणी । निरोप सांगोनि चक्रपाणी । सत्वर येथें पाठवा ॥ ६६ ॥ अवश्य ह्मणून उतावेळ । वारकरी चालिले तत्काळ । विठ्ठलनाम घोष सकळ । करिते जाहले तेधवां ॥६७॥ इकडे पंढरपुरीं महाद्वारीं । नामदेव कीर्तन करी । टाळदिंडी घेऊनि करीं । सप्रेम गजरीं डुल्लत ॥ ६८ ॥ रामकृष्ण ऐसीं नामें । आवडीं उच्चारूनियां प्रेमें । विरक्त होऊनि मनोधर्में । श्रीहरिगुण गातसे ॥ ६९ ॥ सांडोनि सकळ अभिमान । नाचे धरूनियां कान । विठ्ठलमूर्तीचें ध्यान । हृदयामाजीं आठविलें ॥ ७० ॥ श्रीहरीचे गुण उत्तम । जन्म नाम आणि कर्म । घोळोनियां निजप्रेम । गात असे सुखरूप ॥ ७१ ॥ जें निजभक्तां विश्रांति सहज । कीं ज्ञानियांचें निजगुज । नातरी निजमुक्तीचें बीज । मोक्षदायक ह्मणती जें ॥ ७२ ॥ कृष्णा विष्णु मेघःश्यामा । मुकुंद मुरारी पुरुषोत्तमा । अच्युता नरहरी घनःश्यामा । विजयी रामा रघुपती ॥ ७३ ॥ जय जय गोवर्धनोद्धारा । जय जय गोपीमनोहरा । जय जय भक्तकरुणाकरा । दीनोद्धारा पांडुरंगा ॥ ७४ ॥ जय जय सकळ मंगलाधीशा । पातकभंजना हृषीकेशा । अमरपाळका सर्वेशा । अक्षयवेषा अभंगा ॥ ७५ ॥ परमानंदा श्रीपती । तूंचि आदि मध्य अंतीं । सज्जनांची सुखसंपत्ती । तुजविण श्रीपती असेना ॥ ७६ ॥ दीनबंधो पंढरीनाथा । तूंचि माझा श्रोतावक्ता । तूंचि प्रेमसुखाचा दाता । मज अनाथाकारणें ॥ ७७ ॥ ऐसा नामा ते अवसरीं । अंतरीं आठवूनि श्रीहरी । ह्मणे भवश्रमांतून श्रीहरी । काढीं लवकरी गोविंदा ॥ ७८ ॥ मग संतुष्ट होऊनि रुक्मिणीरमण । चहूं भुजीं दिधलें आलिंगन । पद्मकरें कुरवाळूनि वदन । जगज्जीवन संबोखी ॥ ७९ ॥ मग संतांसि ह्मणे मेघःश्याम । नामदेव याचें ठेविलें नाम । तेणें अनुभवोनि माझें प्रेम । मनोधर्में निवाला ॥८०॥ आणखी संत वैष्णवजन । मज आवडती जीवाहून । माझि-

या रूपीं बुडी देऊन । एकत्र होऊनि असती ॥८१॥ परी या सकळांहूनि विशेष जाण । नामया तुझे दिसती सद्गुण । प्रेमा-
मृताचा आनंदघन । अधिकाधिक दिसताहे ॥ ८२ ॥ हा ज्ञानदेव माझें जीवन । ज्ञानविज्ञानांचें मंडण । वैराग्याचा मेरु
जाण । निवृत्तिदेव निजदास ॥ ८३ ॥ स्वात्मबोधाचा पूर्ण सागर । तोहा सोपान भक्तथोर । रोहिदास विसोबाखेचर ।
गोराकुंभार निजभक्त ॥८४॥ निजभक्त परमानंद जोगा । आणिक हा जगमित्र नागा । विनटरामा वटेश्वर चांगा । मज
श्रीरंगा आवडती॥८५॥ आसंद सुदामा केशवदास। नरहरी सोनार भानुदास। हे मज आवडती विशेष । परी तुझिया प्रे-
मा अंत नाहीं ॥ ८६ ॥ भीष्म रुक्मांगद अक्रूर । उद्धव अर्जुन प्रऱ्हाद थोर । ध्रुव नारद आणि तुंबर । माझें अंतर जाणती
॥८७॥ हे सर्वदा विषयीं विरक्त । सहज असती जीवन्मुक्त । परी नामया तुझा अद्भुत । भाग्यमहिमा दिसताहे ॥८८॥ म-
जवर बहु या सकळांची प्रीती । हे अनंतजन्मींचे सांगाती । परी तुझा भाव माझे चित्तीं । आगळा ऐसें दिसताहे ॥ ८९ ॥
ऐसा संवाद करितां हरी । तों अकस्मात आले वारकरी । दिंड्या पताका घेऊनि करीं । जयजयकारें गर्जती ॥ ९० ॥ सवें
गरुडटकियांचा भार । मृदंग वाजती अपार । नामघोषें करितां गजर । भीमातीर दुमदुमिलें ॥ ९१ ॥ त्या सुखाचे निज-
सोहळे । पुंडलीक जाणे भक्तप्रेमळ । जेविं चंद्रामृताचे गळाळ । चकोरचि सेवूं जाणती ॥९२॥ नातरी मातेचे स्तनींचें प-
यःपान । बाळकचि एक सेवूं जाणे । कीं क्षीरसागरींचें महिमान । उपमन्यूवांचूनि कळेना ॥९३॥ कीं एकवट होतां दुग्ध-
पाणी । राजहंसचि घे निवडोनी । कीं प्रेमळभक्तांचे कीर्तनीं । सज्ञान जाणती अनुभवी॥९४॥ नातरी कमळपुष्पांचा म-
करंद । सेवूं जाणे एक मिलिंद । तेविं पंढरीक्षेत्रींचा परमानंद । भक्तपुंडलीक भोगीतसे॥९५॥ सप्रेमभावें महाद्वारीं । लो-
टांगण घालिती वारकरी । एकमेकांसि ते अवसरीं । आलिंगन देती निजप्रेमें ९६ पुढें विलोकितां सत्वर । तों दृष्टीस दे-
खिला शार्ङ्गधर । जघनीं ठेविले दोन्ही कर । कासे पीतांबर वेष्टिला ॥९७॥ ऐसा देखतां जगज्जीवन । आनंदले भक्तजन ।
सप्रेम देऊनि आलिंगन । मग श्रीचरण वंदिले ॥९८॥ जेविं सासुरवासिनि बाळा । माय देखतां हर्ष वाटे तिजला । तेविं
श्रीमुख पाहतां डोळां । आनंद झाला भक्तांसी ९९ मग विटेसहित दोन्ही चरण । कवळूनि मस्तक ठेविला जाण । शरीरीं
नाठवे मीतूंपण । तन्मय होऊनि राहिले॥१००॥ ह्मणती दृष्टीस पाहतां श्रीमुख । अनंतजन्मींचें विसरलों दुःख । तूंचि सर्व
सुखदायक । नाहीं आणिक दूसरें ॥ १ ॥ तंव एक स्मरण धरूनियां । निरोप सांगती देवराया । ह्मणती कूर्मदासें भेटावया ।
ल्हुळासी बोलाविलें त्यासी नाहींत चरणकर । सत्वर न चालवे येथवर । भेटीचें आर्त धरून थोर । तुमची वाट पाहा-
तसे ३ वचन ऐकोनी पंढरीनाथ । उतावेळ जाहले त्वरित । ह्मणती कूर्मदास निजभक्त । केव्हां भेटेल मजलागीं ४ अंत-
रींचे मनोरथ पूर्ण । जे भेटतील संतसज्जन । तयाविण इष्ट मित्र आन । कोणी जिवलग दिसेना ५ मग नामदेव आणि ज्ञा-
नदेव । निकट बोलावून देवराव । अंतरींचा निज भाव । सांगतसे तयांसी ६ बहु आर्त धरूनि पोटीं । कूर्मदास इच्छितो भे-
टी । तुह्मी आह्मी उठाउठी । जाऊं सत्वर त्या ठायां ७ मग दोघांजणांसि दोहों हातीं । धरूनियां सत्वरगतीं । चरणचाली



वैकुंठपती । निघते जाहले तेधवां ॥८॥ जो क्षीरसागर शेषशयन । जयासि वर्णिती श्रुतिपुराणें । तो लक्ष्मीकांत जगज्जी-
वन । चरणचाली जातसे ॥९॥ ब्रह्मादिक मुनि सहज । ज्याचे इच्छिती चरणरज । तो रुक्मिणीरमण गरुडध्वज । चरण-
चाली जातसे ॥११०॥ योगी बैसले वज्रासनीं । लवकर नये त्यांचे ध्यानीं । तो कूर्मदासाची भक्ति देखोनी । चरणचाली
निघाला ॥ ११ ॥ मार्गीं चालतां जगजेठी । तों अरण्यभेंडी देखिली दृष्टीं । मग सांवता माळीयाचे भेटी । उत्कंठित
पोटीं जाहले पैं ॥ १२ ॥ त्याचे भेटीस चक्रपाणी । त्वरें चालिले तये क्षणीं । ह्मणे कौतुक नामयालागुनी । आजिचे दिनीं
दाखवावें ॥ १३ ॥ मग तयासी ह्मणे केशवराज । बहुत तृषा लागली मज । ऐसें ह्मणूनि अधोक्षज । मळियामाजी
प्रवेशले ॥१४॥ दोघांसी ठेवून बाहेरी । ह्मणे उदक पिऊनि येतों सत्वरी । ऐसें ह्मणूनि श्रीहरी । सांवत्यापाशीं पातले १५
तंव त्यानें लाऊन नेत्रपातीं । हृदयीं चिंतिली श्रीविठ्ठलमूर्ती । मुखें गात नाम कीर्ती । विदेहस्थिती जाहलासे ॥१६॥ ऐसें
देखोनि शार्ङ्गधर । माथां ठेविला अभयकर । सावध करूनि सत्वर । आलिंगन दीधलें ॥ १७ ॥ तेणें देखोनि चक्रपाणी ।
मिठी घातली दृढचरणीं । प्रेमाश्रु लोटले नयनीं । आनंद मनीं न समाये ॥१८ ॥ ह्मणे धन्य दिवस आज सुवेळा । माय-
बाप म्यां देखिला डोळां । सुकुमार घनसांवळा । चरणीं चालत आलासी ॥ १९ ॥ मागुती चरणीं ठेऊनि माथा । विनंती
करी भक्त सांवता । बहुत शिणलासि पंढरीनाथा । सांभाळ करितां दीनांचा ॥१२०॥ आतां स्वस्थ करूनि मन । बैसें क्ष-
णभरी करितों पूजन । ऐसें ऐकोनी जगज्जीवन । काय बोलत तेधवां ॥ २१ ॥ भय पावूनि रुक्मिणीवर । सांवत्यासि देत
प्रतिउत्तर । माझे पाठीसी दोघे तस्कर । येती सत्वर लगबगें ॥२२॥ तयांच्या भेणें तुजपाशीं । येथें आलों लपावयासी । तूं
पूजा करूं इच्छितोसी । नवल मजसी वाटतें ॥ २३ ॥ वासरमणीसी लागलें ग्रहण । तयासि न रुचे अर्घ्यदान । कीं परच-
क्रीं वेढिलें जाण । तया रायासि भद्रासन रुचेना ॥ २४ ॥ कीं चिंता उद्भवली मानसीं । तैं उपचार न रुचे मानवांसी । स-
न्निध देखतां अगस्तीसी । भरतें सागरासी नये कीं ॥२५॥ तेविं तूं करूं ह्मणतोसि पूजन । परी स्वस्थ नाहीं माझें मन । आ-
तां कोठें तरी माझे प्राण । करीं जतन भक्तराया ॥ २६ ॥ सांवता ह्मणे ते समयीं । तूं सांठवशील कवणे ठायीं । ऐसा ठाव
दिसत नाहीं । त्रिभुवनीं पाहीं शोधितां ॥२७॥ वायु न सांठवे पिंजऱ्यांत । कीं आकाश न समाये घागरींत । नातरी वा-
सरमणी अंधारांत । कोंडेल कैसा गोविंदा ॥ २८ ॥ तापसांमाजी कैलासनाथ । कीं पक्षियांमाजी विनतासुत । नातरी
देवांमाजी शचीनाथ । न लोपेची सर्वथा ॥२९॥ मृत्तिकेमाजी कस्तूरी । कां वृक्षांमाजी मैळागिरी । कीं श्वापदांमाजी ग-
जकेसरी । न झांकेची सर्वथा ॥ १३० ॥ अश्वांमाजी उचैःश्रवा । कैसा लपेल देवाधिदेवा । लोहसंदुकेंत माधवा । परिस
कैसा झांकेल ॥ ३१ ॥ तेविं तूं सर्वांवरिष्ट श्रीहरी । अनंत ब्रह्मांडें तुझे उदरीं । तुज लपावया महीवरी । ठाव कोठेंच दिसे-
ना ॥ ३२ ॥ मग ह्मणे जगज्जीवन । ब्रह्मज्ञानाचा प्रसंग कोण । कोठें तरी मजकारणें । ठेवीं लपवोनि ये समयीं ॥३३॥ ऐसें
बोलतां हृषीकेशी । सांवता विचारी निजमानसीं । हृदयमंदिरीं वैकुंठवासी । निजप्रीतीं राहील ॥३४॥ मग खुरपें घेऊ-

भ० न सत्वरीं । उदर चिरिलें ते अवसरीं । हृदयसंपुटीं मुरारी । येऊनि झडकरी बैसला।३५।सांवता विचारी ते वेळां । तस्कर देखतील कीं घननीळा । ह्मणोनि लवलाहें चवाळा । उदरावरून बांधिलें ॥३६॥हृदयमंदिरीं जगजेठी । सांवत्यासी बोले गुजगोष्टी । तुझा उपकार फेडावया सृष्टीं । पदार्थ दृष्टीं दिसेना ॥ ३७ ॥ तंव श्रोते ह्मणती नवलाव । उदरीं कैसा सांठवला देव । हा आशंकेचा आह्मांस ठाव । प्राप्त झाला ये काळीं ॥ ३८ ॥ ऐकूनि श्रोतयांची वाणी । दृष्टांत योजून बोले वचनीं । तो लीलाविग्रही चक्रपाणी । अघटित करणी तयाची ॥ ३९॥ कृष्णावतारीं यशोदा सुंदरी । घुसळीत होती निजमंदिरीं । तेव्हां डेरियांत रिघोनि श्रीहरी । नवनीत झडकरी खादलें।१४०।कीं एक गोपी प्रेमें भुलोन । ह्मणे विकावयासि आणिला कृष्ण । तेंचि सत्य करावया वचन । देव मडक्यांत सांठवला ॥ ४१ ॥ तेविं सांवत्याची आवड देखोनि । हृदयीं सांठवले चक्रपाणी । ह्मणोनि आशंका श्रोतेजनीं । सर्वथा मनीं न धरावी ॥ ४२ ॥ असो आतां जगन्नाथ । सांवत्यासी बोले निजगुह्यार्थ । तुझा उपकार फेडावया येथ । न दिसे पदार्थ दृष्टीसी ॥४३॥ आतां माझेंचि स्वरूप होईं । नातरी सर्वस्वें मी घेईं । यापरतें आणीक कांहीं । यावयास नाहीं सर्वथा॥४४॥ मग ह्मणे भक्त सांवता । अगा ये स्वामी कृपावंता। आतां तुज मी जीवापरता । न करीं सर्वथा कल्पांतीं ।४५।ऐसें ह्मणोनि देवभक्त । समरस जाहले एकचित्त । जेविं भागीरथी यमुना त्वरित । जाहल्या एकत्र निजप्रीतीं ॥ ४६ ॥ कीं दुग्धांत संचरे जीवन । कीं शरीरांत सुरवाडला प्राण । तेविं निजभक्त उदरीं राजीवनयन । सुखसंतोषें बैसला ॥४७॥ नातरी चंद्रबिंबांत अमृत । सांठवलेंसे अत्यद्भुत । तेविं निजभक्त-उदरीं वैकुंठनाथ । बैसले एकत्र होऊनी ॥४८॥ कीं सुमनकळिकेंत मकरंद प्रीतीं । लपोनि राहिला जैशा रीतीं । तेविं निजभक्त-उदरीं रुक्मिणीपती । अद्वैतस्थितीं बैसले ॥ ४९ ॥ इकडे मळियाबाहेर नामाभक्त । मनांत जाहला चिंताक्रांत । ह्मणे अजूनि नये पंढरीनाथ । विलंब बहुत कां केला॥१५०॥उतावीळ होऊनि मजला । वाट पाहतां विलंब जाहला । कोठें माझा स्वामी गुंतला । मज टाकोनि वनांत।५१।तो पांडुरंग माझें जीवन । कीं सर्व सुखाचें निधान । तयासि आतां मजलागून । दाखवील कोण कळेना ।५२। कंठ होऊनि सद्गदित । सप्रेमें असे स्फुंदत । देह असे चांचरी जात। पाउलें उमगीत विठोबाची ॥ ५३ ॥ जैसा होऊनि तृषाक्रांत । जीवन धुंडी वनांत । कीं क्षुधातुर होऊनि अपत्य । वाट पाहात मायेची।५४।कीं पाडस चुकलें हरिणीसी । तें वनांत पाहे जननीसी । कीं द्रव्य हरपतां कृपणासी । तळमळ चित्तासी बहु वाटे॥५५॥कंठ होऊनि सद्गदित । नेत्रीं अश्रुपात वाहत । हृदय दोहीं करें पिटित । आंग टाकित धरणीये५६ ह्मणे विठोबा न येसी तत्काळ । माझे प्राण होताती व्याकुळ ॥ मोकलून जाऊं नको ये वेळ ॥ तुजला उचित नव्हे हें ॥५७॥ धरूनि पीतांबराचा सोगा । मी सरसाचि येतों पांडुरंगा । तुझे मनींचा भाव रुक्मिणीरंगा । कळला नाहीं मजलागीं ५८ ऐसा नामा विलपत । तों दृष्टी देखिला सांवता भक्त । प्रेमभावें नाम जपत । आनंदयुक्त तेधवां ॥ ५९ ॥ त्याचे चरणीं घालोनि मिठी । ह्मणे कोठें गेला जगजेठी । मी उतावेळ त्याचे भेटी । जाहलों पोटीं कासाविस १६० तंव सांवता विसरून





देहभान । हरिरूपीं जाहला तल्लीन । मी माझें हे आठवण । नाहीं भेदभान उरलें कीं ॥६१॥ हें चिन्ह देखोनि दृष्टीसी । ह्मणे विठोबा आहे याजपाशीं । स्वरूपानुभव कळला मानसीं । तैसेंचि तयासी देखिलें॥६२॥जैसें जार जारिणी दोघेंजण । दृष्टीस पडतां जाणती खूण । कीं तस्कर तस्करासी देखोन । जाणती चिन्ह अंतरींचें ॥ ६३ ॥ नातरी वक्त्याचें प्रेम अंतर । जाणतसे सज्ञान चतुर । कीं अदृश्य निधान असलें जर । देखती पायाळ निजदृष्टीं ॥ ६४ ॥ नातरी योगियांची राहटी । योगीच खूण जाणती दृष्टीं । तेविं सांवत्यापाशीं जगजेठी । कळलें पोटीं नामयाचे।६५।ह्मणेरे मज दुर्बळाचा ठेवा । सांवत्या कैसा गिळिला तुवां । जो सर्व सुखाचा विसांवा । आवडतो जीवा साझिया ।६६। एकदा दृष्टीसी मज दाखवीं । तेंचि रूप धरीन जीवीं । प्राण व्याकुळ जाहले पाहीं । तूं वांचवी दयाळा ।६७। मजवर करूनि कृपादृष्टी । बोल कांहीं स्वहितगोष्टी । मज भेटवी जगजेठी । मग शकुनगांठी बांधीन मी ॥ ६८ ॥ ऐसीं नामयाचीं करुणावचनें । ऐकूनियां जगज्जीवनें । सांवत्यासि ह्मणे मजकारणें । जिवलग नामा भेटवी ६९ मनांत ह्मणतसे रुक्मिणीकांत । अडकलों सांवत्याच्या पोटांत । आतां मज बाहेर त्वरित । निघतां नये सर्वथा ॥१७०॥ जैसा कोशकीटक जाण । आपुले हातें करी बंधन । मग निघतां नये त्याजकारण । तैसेंच जाहलें मज आतां ॥७१॥ नातरी शुक बैसला नळिकेवरी । तयासि न उडवे निर्धारीं । तैसीच मजला जाहली परी । अडकलों उदरीं सांवत्याच्या॥७२॥कीं कमळिणीची धरूनि प्रीति । भ्रमरें तेथें धरिली वस्ती । मग अस्तमाना गेलिया गभस्ती । जाहली गुंती तयासी ॥७३॥ तेविं सांवत्याचे हृदयकमळीं । मी अडकलों वनमाळी । बाहेर नामा तळमळी । जेविं मासोळी उदकाविण ॥७४॥ मग काय बोले हृषीकेशी । नामा दिसतो परदेशी । मजविण होतसे कासाविसी । भेटवी तयासी क्षणमात्र ॥७५॥ मग ह्मणे भक्त सांवता । सावध होईं विष्णुभक्ता । कृपा आली पंढरीनाथा । भेटतील आतां तुजलागीं ॥ ७६ ॥ उतावेळ झाले कमळापती । भेटोनि देतील विश्रांती । जवळीच देखशील निजप्रीतीं । खेद चित्तीं न धरावा ॥७७॥ तूं काय आचरलासि पुण्यराशी । सर्वांभूतीं भजिन्नलासी । ह्मणोनि कृपावंत हृषीकेशी । पावले अनायासीं तुजलागीं ॥७८॥ भक्तिबळें पंढरीनाथ । तुवां केला ऋणाईत । हें नवल देखोनि माझें चित्त । होय विस्मित भक्तराया ॥ ७९ ॥ तुवां गरुडटका खांद्यावरी । घेऊन केलीस पंढरीची वारी । कीं संतचरणरज वंदिले शिरीं । ह्मणोनि श्रीहरी तुष्टला ॥ १८० ॥ कीं दशमीस दिंडी घेऊनि पुढें । गोपाळ खेळले साबडे । हरिनाम घेऊनि चोखडें । वर्णिले पवाडे कीर्तनीं॥८१॥तो दृष्टीस देखोनि आनंदु । प्रसन्न जाहला तुज गोविंदु । मग तो अनंत कृपासिंधु । दीनबंधु तुष्टला ॥ ८२ ॥ कीं अनंतजन्मीं अनुताप जाहले । तुवां देह कर्वतीं घातलें । नातरी उग्रतप साधिलें । किंवा देखिलें महातीर्थ ॥ ८३ ॥ कीं परकारणीं वेंचिला प्राण । कीं एकादशीस केलें कीर्तन । तेथें तिष्ठत होता जगज्जीवन । जाहला प्रसन्न तुजलागीं ॥८४॥ ऐसा भाग्यमहिमा अद्भुत । जाणता एक पंढरीनाथ । ऐसें ह्मणोनि सांवताभक्त । चरणीं लोळत नामयाचे ॥८५॥ नामा ह्मणे त्या अवसरा । तूं माझे निजसुखाचा सोयरा । मज जीवदानीं वैष्णववीरा । तुजविण

दुसरा नसे कीं ॥८६॥ शकुन सांगितला जो मजला । तो आतांच साच करी वहिला । मज आणि माझ्या विठ्ठला । भेट करी तत्काळ ॥८७॥ ऐक प्रेमळा भक्तनाथा । मज धीर न धरवे सर्वथा । विपरीत देखोनि माझी अवस्था । करुणा चित्ता कां नये ॥८८॥ मग खुरपें काढोनि सत्वरीं । पोट चिरलें ते अवसरीं । पांडुरंग निघतांचि बाहेरी । नामा पाय धरी धांवोनी ॥८९॥ सद्गदित होऊनि घननीळ । नामयासि आलिंगिलें ते वेळ । घेऊनि पीतांबराचा अचळ । पुसिलें कपाळ निजहस्तें ॥१९०॥ मग हांसोनी पंढरीनाथ । नामयासि पुसे वृत्तांत । कां निर्बुज केलें चित्त । सांगें त्वरित मजलागीं ॥९१॥ मग मिठी घालोनि दृढ चरणीं । देवासि बोले मंजुळवाणी । तूंचि माझी जनकजननी । पावसी निर्वाणीं अखंड ॥९२॥ तूं परब्रह्म घनसांवळें । कवण्या मोहें पाळिसी लळे । हें मज सर्वथा न कळे । दीनदयाळे पांडुरंगे ॥ ९३ ॥ मग ज्ञानदेवासि जगज्जीवन । हांसोनि बोलति मृदुवचन । कूर्मदासाचें दर्शन । घ्यावें जाऊनि सत्वर ॥ ९४ ॥ त्याची भेट न होतां जाण । चित्तासि न वाटे समाधान । निजभक्त भेटती तो सुदिन । निवती लोचन तैं माझे ॥ ९५ ॥ ज्ञानदेव नामा निजभक्त । सांवता आणि पंढरीनाथ । चवघे धरूनि एक संगत । आनंदें चालती निजमार्गीं ॥९६॥ ऐकोनि आशंका धराल जीवें । जीं अधिक घेतलीं भक्तांचीं नांवें । तयांसि सांगोनि पंढरीरावें । लिहिलें असे यथार्थ ॥९७॥ तरी हा शब्द मजवरी । न ठेवावा भक्तचतुरीं । पतितपावन भक्तकैवारी । ह्मणवितो हरि प्रसिद्ध ॥९८॥ तरी पतित वाचेसि येत आधीं । त्या मागें पावन कृपानिधी । ह्मणोनि भक्तनामें आधीं । लिहिलीं पदसंधीयास्तव ॥ ९९ ॥ असो निजभक्तांच्या समागमेंकरून । आनंदें चालिले जगज्जीवन । तों कूर्मदासासी उत्तम शकुन । निजअंतरीं होतसे ॥ २०० ॥ जैसा मेघ वर्षतां मेदिनीं । पूर्वेसि चमके सौदामिनी । आणि उत्तरदिशेकडोनि । वायु मंजुळ येतसे ॥१॥ तेविं भेटीस येतो आनंदघन । ह्मणोनि उजवा लवतो लोचन । आणि घडिघडी बाहुस्फुरण । होती शकुन कूर्मदासा ॥२॥ जेविं वोरसोनी तान्ही गाय । वत्सापाशीं धांवूनि जाय । तैसेंचि आले पंढरीराय । आनंद न समाये अंतरीं ॥३॥ कूर्मदासें देखोनि जगज्जीवन । सद्भावें घातलें लोटांगण । देवोनि क्षेमालिंगन । चहूंभुजीं धरियेला ॥४॥ सप्रेमें भेटले भक्तजन । कूर्मदासासि ह्मणे रुक्मिणीरमण । कांहीं मागें वरदान । तुजकारणें देईन मी ॥ ५ ॥ ऐसें ऐकूनियां वचन । ह्मणे हेंच मागणें तुजलागून । तुह्मीं न जावें येथून । अभय वरदान देऊनी ॥ ६ ॥ अवश्य ह्मणोनी घननीळ । तेथेंचि राहिले चिरकाळ । पंढरी ऐसें क्षेत्र लहुळ । भक्त प्रेमळ जाणती ॥ ७ ॥ आषाढी कार्तिकीस पाहीं । यात्रा भरे तये ठायीं । भाविकभक्त लवलाहीं । जाती दर्शन घ्यावया ॥ ८ ॥ पुढिले अध्यायीं रसाळ कथन । श्रोतीं करावें स्वस्थ मन । जैसा कृपण पाहतां धन । होय तल्लीन निजप्रीतीं ॥९॥ तेविं कथेसि देऊनि अवधान । सादर परिसा भक्तजन । महीपती तुमचा रजःकण । वंदितो चरण निजप्रीतीं ॥ २१० ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । षोडशाध्याय रसाळ हा ॥ २११ ॥ अध्याय १६ ॥ ओंव्या २११ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । आजि नवल जाहलें अद्भुत । जे भक्तविजय पातला वसंत । ह्मणोनि सज्जनजन वनांत । गौरव बहु उदेलें ॥ १ ॥ अर्थाची प्रभा फांकतां जाण । बोधाचा शीतळ सुटला पवन । तेणें जिज्ञासुवृक्षासि अंकुरण । फुटों पाहे एकसरें ॥ २॥ अर्थार्थांच्या पल्लवशाखा । सज्ञानपुष्पें आलीं देखा । विज्ञानस्थिती अमोलिका । फळें आलीं अविनाश ॥ ३ ॥ ऐसें शृंगारूनि वन । दिसे अतिशोभायमान । त्रिविधतापें संतप्तजन । ते बैसले येऊन छायेसी ॥ ४ ॥ जीवन्मुक्त जे राजहंस । ते ये स्थळीं क्रीडावयास । निजभक्तकथा अतिसुरस । सेविती राजस निजप्रीतीं ॥५॥ कोणी अज्ञान आहेत जन । ते दुरूनि विलोकिती हें वन । पुष्पीं फळीं शोभायमान । देखतां संपूर्ण मन निवालें ६ मागिले अध्यायीं कथा गोमटी । कूर्मदासासी भेटले जगजेठी । तयासि सांभाळूनि कृपादृष्टीं । करीत सुखगोष्टी निजप्रेमें ॥ ७ ॥ आतां वैराग्यांमाजी शिरोमणी । राका कुंभार वैष्णवज्ञानी । त्याचें चरित्र रसाळवाणी । परिसा श्रवणीं भाविकहो ॥ ८ ॥ बांका तयाची कांता । परमभाविक पतिव्रता । कन्या जाहली लावण्यसरिता । वंका नाम तियेचें ॥९॥ तो गुजराथी कुंभार निश्चित । नांदत होता पंढरींत । भाजनें विकून नगरांत । भजन करीत श्रीहरीचें ॥ १० ॥ ऐसें होतां दिवस बहुत । नवल वर्तलें अघटित । हिरवीं भाजनें वाळवून निश्चित । माजघरांत ठेविलीं ॥ ११ ॥ तों घरीं मांजर व्याली जाण । डेरियांत पिलीं ठेविलीं तिणें । रात्रंदिवस घिरटी घालून । स्तनपान करवीतसे ॥१२॥ तंव कोणे एके दिवशीं । हिंडावया गेली बिळासी । कुलालें भाजनें आव्यापाशीं । नेलीं वेगेंशीं न कळतां ।१३। पिलीं होतीं जयांत । तोही डेरा घातला आव्यांत । इंधनें घालोनि त्वरित । कृशानु तेव्हां पेटविला ॥१४॥ प्रदीप्त जेव्हां जाहला अग्न । तंव मांजर आली फेरी करून । घरांत पाहे विलोकून । तों न पडत पिलीं दृष्टीसी ॥१५॥ बाहेर येऊन उठाउठी । आव्याभोंवतीं घाली घिरटी । कुलाल उमजला तेव्हां पोटीं । ललाट पिटी निजकरें ॥१६॥ कांतेस ह्मणे हायहाय । मजपासूनि घडला अन्याय । ते धांवत आली लवलाह्य । ह्मणे काय जाहलें हो ॥ १७ ॥ कंठ होऊन सद्गदित । राका कांतेप्रति सांगत । पिलीं होतीं भाजनांत । तीं मीं नकळत जाळिलीं ॥ १८ ॥ मोहें ओरडे त्यांची जननी । घिरट्या घाली आपुले सदनीं । काय करूं या संकटालागूनी । अंग धरणीं टाकिलें ॥१९॥ राका बांका उभयतां । ह्मणती धांवधांव पंढरीनाथा । लाक्षागृहीं पंडुसुतां । राखिलें जळतां कैशापरी ॥२०॥ कढईंत पडिलें मंडूक सान । तळीं पेटला बहु कृशान । तेणें केलें तुझें चिंतन । संकट जाणून ते वेळीं ॥२१॥ त्यास पावलासि रुक्मिणीकांता । उदक न तापेचि सर्वथा । तैशाच परी या आकांता । पंढरीनाथा पाव वेगीं ॥२२॥ अघटित संकट पातलें माय । परी तूं करिसील तें नव्हेचि काय । प्रऱ्हाद अग्नींत वांचला पाहे । तुझे पाय आठवितां ॥ २३ ॥ हे मार्जारयोनी तमोगुण । सर्वथा न घडे तुझें चिंतन । परी तूं कृपासागर चैतन्यघन । वांचवीं प्राण पिलियांचे ॥२४॥ कांता ह्मणे भ्रताराशी । कांहीं नवस करा देवासी । तेणें तरी हृषीकेशी । अतिवेगेंशीं पावेल ॥२५॥ राका बोले प्रतिउत्तर । अग्नींत पिलें वांचतील जर । मीं सर्वथा न करीं संसार । शार्ङ्गधर पावलिया ॥ २६ ॥ ऐसें कल्पोनियां अंतरीं । उभयतां निजलीं धरणी-

 वरी । ह्मणती धांव पाव श्रीहरी । संकट निवारीं दीनांचें ॥२७॥ नेत्रीं ढळढळां अश्रु वाहत । गात्रें विकळ पडलीं समस्त । 
धुळीनें भरलें अंग सत्य । वायु अद्भुत सुटलासे ॥ २८ ॥ आव्यांत धडकला कृशान । ह्मणोनि दोघे करिती रुदन । नाठवे
अणुमात्र देहभान । हरिस्मरण करितांची ॥ २९ ॥ सतीचें घेतलें असतां वाण । तों भ्रतार जाहला गतप्राण । मग कांतेसि
नाठवे देहभान । सहगमन करीतसे ॥ ३० ॥ असो दोन रात्रपर्यंत । आव्यामाजि कृशानु जळत । तोंपर्यंत कुलाल तेथ।प-
डला निश्चेष्ट मेदिनीं ॥३१॥ नवसासि पावेल श्रीहरी । ही आशा धरूनि अंतरीं । बांकाही तेथें रुदन करी । ह्मणे धांव स-
त्वरीं विठ्ठला ॥ ३२ ॥ तिसरे दिवशीं कृशानु शांत । होऊनि भाजनें दिसती समस्त । मांजर भोंवती घिरट्या घालित ।
मोहें आरडत अट्टहासें।३३।तों अघटित करी रुक्मिणीकांत।श्रोते परिसा भाग्यवंत ।आव्यामाजी पिलीं बाहात । जन-
नीची मात ऐकूनी ३४ कुंभार आणि त्याची कांता।पाहती जाहलीं उभयतां।तों आव्यामाजी डेरा होता।तो हिरवा अ-
वचिता देखिला ।३५। त्यांत मांजरीचीं पिलीं तीन । जिवंत देखिलीं निजदृष्टीनें । ह्मणे मज पावला रुक्मिणरमण । भ-
क्तभूषण कृपाळू ॥३६ ॥ तीन दिवसपर्यंत देख । नाहीं घेतलें अन्न उदक । सुकोन मुख गेलें अधिक । तें उल्हासें टवटविलें
॥३७॥दीपकास स्नेहसूत्र पावल्या सहज । तो जैसा दिसे तेजःपुंज । कीं उर्वीवरी वर्षतां मेघराज । तृणबीज वाढे जैसें ३८
नातरी कांसव न पाजितां पिलियांस । दृष्टीनेंच करी क्षुधेचा नाश । कीं द्रव्य सांपडतां कृपणास । चित्त उल्हासे तयाचें
॥३९॥कां पूर्वेस उगवतांचि वासरमणी । सरोवरीं विकासती कमलिनी । राकाकुंभाराचे मनीं । तैशाच परी उल्हास४०
सकळ पंढरीचे लोक बोलती । धन्य याची सप्रेमभक्ती । संकटीं पावला रुक्मिणीपती । अघटित कीर्ती हे जाहली॥४१॥
राका कांतेसि वचन बोलत । म्यां नवसिला होता पंढरीनाथ । कीं पिलीं वांचलीं अग्नींत । तरी प्रपंच निश्चित करीना
॥४२॥ संकटीं पावला जगज्जीवन । आतां कासया संसारभान । ऐसा अनुताप मनीं धरून । गांवींचे ब्राह्मण पाचारिले
॥४३॥ शुद्धभावार्थ धरूनि चित्तीं । घर लुटविलें विप्रांहातीं । आपण कौपीन नेसोनि प्रीतीं । कांतेप्रति एक दीधली ४४
उदरप्रवृत्तीकारण । काष्टें वेंचिती रानांतून । त्याचें अन्न विकत घेऊन । अतिथीस भोजन घालिती ॥४५॥ शेष राहिलें
जें मागें । तें कन्यासमवेत भक्षिती तिघें । अहोरात्र सप्रेमरंगें । चित्तीं पांडुरंग आठविती ॥ ४६ ॥ बिंदीच्या चिंध्या वेंचू-
नी । त्या गुंडाळूनि लिंगस्थानीं । याविरहित वस्त्र दिल्हें कोणी । तरी तें नयनीं न पाहाती ॥४७॥ शिंपियाचे दारापाशीं ।
चिंध्या वेंचित एके दिवशीं । तंव काय बोले नामवंशी । वैराग्य कासया घेतलें ॥ ४८ ॥ पलिते करावयासि जाण । चिर-
गुटें पाहिजेत आह्मांकारण । ऐसें बोलिला तो कृपण । अज्ञानपणें तयासी ॥ ४९ ॥ राका ह्मणे कांतेप्रती । जें निष्कारणीं 
पडिलें क्षितीं । तरी तें घेऊन भलत्या रीतीं । काया निगुती झांकिजे ॥५०॥ ब्राह्मणभोजन करूनि जाण । बाहेर टाकिती
उच्छिष्ट पान । तें ढोंगास गुंडाळून । गुदस्थान झांकिती॥५१॥ उदंड वैरागी आहेत जनीं । परि याचे साम्यतेसि न को-
णी । दृष्टांत योजितां कवीची वाणी । जाहली असे कुंठित ॥ ५२ ॥ पृथ्वीचें वजन करावया रोकडें । ऐसें विस्तीर्ण नाहीं

पारडें । तेविं भगवद्भक्तांचे पवाडे । वर्णितां वेडें मन होय।५३।भास्कर धरवेल मुष्टींत । समीर कोंडवेल पिंजऱ्यांत । परी
भगवद्भक्तांची अनुपमस्थिति । वर्णितां कुंठित होय वाणी ॥५४॥ परावे जीव वांचवावे प्राणें । यास्तव संसार टाकिला
कोणें । क्षुद्रदैवतांचीं करूनि आराधनें । पुत्र धन इच्छिती ॥ ५५ ॥ कच्चा पावशेर वांटीन शेरणी । गजांत लक्ष्मी दे भवा-
नी । जेविं गाजराची तुळा द्विजांसी अर्पूनी । अंतीं विमानीं बैसेन ह्मणे ॥ ५६ ॥ तैसा संसारिक नव्हे कुंभार राका । अ-
घटित नवस केला देखा । संकट पडलें वैकुंठनायका । निजभक्त सखा पावला॥५७॥जाज्वल्य अनुताप धरिला मनीं ।
जयाचे साम्यतेसि न पावे कोणी । वंका कन्या सुलक्षणी । स्नानालागोनि ते गेली ॥५८॥ तों नामयाची कन्या ते अव-
सरीं । धूत होती भीमातीरीं । वस्त्र आपटितां शिळेवरी । शिंतोडे बाहेरी उडताती ॥५९॥ वंका ह्मणे तिजलागुनी । ह-
ळूचि आपटी वो साजणी । मी आतांचि स्नान करूनी । मानसपूजनीं बैसलें ॥ ६० ॥ ते ह्मणे जातीचा कुंभार । आणि
सोवळें दिसतें फार । सुखाचा टाकूनि संसार।दारोदार हिंडतसां॥६१॥कामनिक भक्त तुझा पिता । नवस केला पंढरी-
नाथा । संकट घालोनि रुक्मिणीकांता । संसारगुंता उगविला ॥ ६२ ॥ वंका ह्मणे तिजलागोनी । रडका नामा प्रसिद्ध
जनीं । बौद्धरूप असतां चक्रपाणी । डोई फोडून बोलविला ॥ ६३ ॥ ऐसें बोलूनि येरयेरां । गेल्या आपुलाले घरां । तों
कीर्तनीं रिझवोनि रुक्मिणीवरा । नामदेव मंदिरा पातले ॥ ६४ ॥ भीमातीरीं जाहलें भांडण । तें वृत्त सांगीतलें आत्म-
जेनें । ह्मणे ताता तुजलागून । लाविलें दूषण ऐक तिणें ॥ ६५ ॥ ह्मणे कलियुगीं बौद्धावतार निश्चित । आणि राउळीं
जाऊनि नामा भक्त । डोई फोडोनि प्रेमयुक्त । रुक्मिणीकांत बोलविला ॥ ६६ ॥ आणि माझा पिता निरपेक्ष खरा ।
शुष्क काष्टांचा आणोनि भारा । तो विकूनियां बाजारा । भरितो उदरा आपुल्या ॥ ६७ ॥ कन्येचें वचन ऐकोनी । ना-
मदेव विस्मित जाहले मनीं । मग महाद्वारासि जाऊनी । चक्रपाणी प्रार्थिला ॥६८॥ ह्मणे देवा ऐक मात । राका कुंभार
तुझा भक्त । तो निरपेक्ष किंवा कामयुक्त । सांग त्वरित मजलागीं ॥ ६९ ॥ ऐसें पुसतां भक्तप्रेमळ । हांसुनि बोले घननी-
ळ । त्याजऐसा वैराग्यशीळ । न दिसे सकळ पृथ्वींत ॥७०॥ नामा ह्मणे वैकुंठपती । मज दाखवीं त्याची स्थिती । अवश्य
ह्मणोनि निजप्रीतीं । धरिला हातीं विष्णुदास ॥७१॥ रुक्मिणी नामा आणि सांवळा । तिघें चालिलीं तये वेळां । भास्क-
र मध्यान्हासि आला । द्वादशकळा तपतसे ॥७२॥तों अरण्यामाजी राका भक्त । काष्टें स्वहस्तें वेंचित । गुप्तपणें रुक्मि-
णीकांत । कौतुक पाहात दृष्टीस॥७३॥बांका तयाची निजकांता । परम भाविक पतिव्रता । कन्येसि घेऊन उभयतां।अ-
रण्यपंथा चालती ॥ ७४॥ दोन काष्टें एकसरसीं । अवचित पडिलीं दृष्टीसी । कोणीं ठेविलीं असतील तैसीं । ह्मणऊनि
तयासी न घेती ॥ ७५ ॥ वृक्षाअंगीं असलिया तत्वतां । तरी मोडून न घेती सर्वथा । आपसुखें पडलीं असतां । हळूच घे-
ती वेंचून ॥ ७६ ॥ भूमीवरी पाय पडतां देखा । जीवें जातील पिपीलिका । ह्मणूनियां कुंभार राका । पाहूनि चाले वनांत
॥७७॥हें कौतुक देखोनि दृष्टीसी । विस्मित जाहले हृषीकेशी । खुणावूनि रुक्मिणीसी । नामयासी बोलत ॥७८॥ ह्मणे

विषयीं विरक्त आहे देखा। माझा निजभक्त कुंभार राका। दांभिक लौकिक टाकूनि निका। निष्काम एका सज भजे ॥७९॥ नामा ह्मणे रुक्मिणी माये। यासी कांहीं देऊनि पाहें। हातींचें कंकण लवलाहें। नामयापाशीं दीधलें॥८०॥ त्रजूं न शके चतुरानन। ऐसें अमूल्य जडितरत्न। जयाचे मोलासि दिधलें त्रिभुवन। उरी नयेचि तेणें सर्वथा ८१ ऐसें कंकण काढोनि रुक्मिणी। टाकूनि देत त्या काननीं। त्यावरी शुष्ककाष्ठ उचलोनी। विश्वजननी ठेवितसे ८२ निजभक्त नामा वैष्णववीर। रुक्मिणी आणि शार्ङ्गधर। गुप्तरूपें वारंवार। विलोकुनियां पाहती ॥८३॥ तो राका आणि त्याची कांता। काष्टें वेंचिती उभयतां। सुवर्णकंकण लागलें तत्वतां। तें कादुक अवचिता उचलिलें। ८४। दृष्टीस पाहतां न्याहाळूनी। तों रत्नें जडलीं हेमकोंदणीं। जें अमूल्य पाहतां त्रिभुवनीं। साम्यतेसी नयनीं दिसेना॥८५॥ राका कुंभार अति विरक्त। काष्टें ढकलून दिधलें त्वरित। कांतेसि ह्मणे हा अनर्थ। दृष्टीं त्वरित पाहे तूं८६ती ह्मणे करितां ईश्वरभजन। पुढें बोढवलें हें विघ्न। कवणें सिद्धीआड येऊन। दिधलें कंकण आपणां।८७।आपण प्रपंच टाकोनियां। शरण गेलों पंढरीराया। हेम- कंकण कासया। पाहिजे वायां आपणासी ॥८८॥ त्यावरी काष्ठ पडलें होतें। तेंही टाकून दिधलें त्वरितें। जैसें श्वान शि- वतां अन्नातें। तें द्विज न घेती सर्वथा ॥८९॥ नीर पडतां धरणीं। तें चातक न घेती निंद्य ह्मणूनी। कां स्नेह मर्दितां अंगा- लागूनी। मक्षिका स्पर्श न करीच ॥ ९० ॥ तेविं प्रसन्न होऊनि रुक्मिणीमाता। कंकण दिधलें निजभक्ता। त्यावरी काष्ठ पडलें तत्वतां। तें टाकूनि उभयतां चालिलीं ॥ ९१ ॥ नामा ह्मणे जगज्जीवना। विश्वव्यापका भक्तभूषणा। राकाकुंभार तुझिया भजना। सप्रेमभावें विनटला ॥९२॥ सगुण साक्षात दर्शन। यासी यावें जी आपण। ऐसें ऐकतां रुक्मिणीरमण। हास्यवदन जाहले ॥ ९३ ॥ ह्मणे म्यां सांगीतली याची स्तुती। तैसीच आली कीं तुज प्रतीती। कीं अजून संशय वाटतो चित्तीं। सांग मजप्रती लवलाहें ॥ ९४ ॥ यावरी नामा उत्तर देत। निरपेक्ष राका प्रेमळभक्त। याचे साम्यतेसी निश्चित। माझेंही चित्तीं नये कीं।९५। मग नामा आणि हरि रुक्मिणी। प्रकट जाहलीं तिघेजण। राकाकुंभार पाचारून। दिधलें द- र्शन तयासी ॥९६॥ चतुर्भुज हरि सांवळा। कासे पीतांबर शोभे पिंवळा। मुकुटकुंडलें वनमाळा। देखिला डोळां साक्षात ॥९७॥ राका बांका उभयतांनीं। आलिंगन दिधलें तये क्षणीं। मग मिठी घालोनियां चरणीं। चक्रपाणी नमियेला।९८ आतां वैष्णवांमाजी अतिविरक्त। गोराकुंभार प्रेमळभक्त। त्याचें चरित्र अति अद्भुत। परिसा भक्तहो निजप्रीतीं॥९९॥ तारढोकी नामाभिधान। तया गांवीचें त्यास वतन। गृह दारा प्रपंच असोन। करित भजन श्रीहरीचें ॥१००॥ खातां जे- वितां गमन करितां। बसतां उठतां विश्रांति घेतां। प्रपंच धंदा मडकीं घडितां। पंढरीनाथा जपतसे॥१॥ कानीं ऐकतां प्र- पंचगोष्टी। नातरी चराचर पाहतां दृष्टीं। दश इंद्रियांची पाहतां राहाटी। चित्तीं जगजेठी अखंड ॥ २ ॥ बरें वाईट सुख दुःख जाण। नेणेचि कांहीं मानापमान। राव रंक आणि इतर जन। चित्तीं समान सारिखे ॥ ३ ॥ तंव कोणे एके दिवशीं। कांता गेली उदकासी। तानें बाळक खेळावयासी। अंगणामाजी सोडिलें ॥ ४ ॥ मृत्तिकेचें करूनि आळें।



चिखल केला तये वेळे। त्यावरी गोरा झांकोनि डोळे। तुडवीत बळें निजच्छंदें ॥ ५ ॥ हृदयीं चिंतिलीसे विठ्ठलमूर्ती। सप्रेम जळें अश्रु वाहाती। किंचित नाठवे देहस्फूर्ती। अद्वैतरूपीं विनटला ॥ ६ ॥ तों अंगणीं बाळक होतें खेळत। तें मृत्तिकेजवळी आलें रांगत। कर्दम गोळा करितां आंत। तेंही तुडविलें त्यासरिसें ॥ ७ ॥ कांता आली घेऊनि जी- वना। मोहें स्तनीं दाटला पान्हा। बाळक विलोकी अंगणीं। तंव तें नयना न दिसेचि ॥ ८ ॥ मग भ्रतारासन्निध येऊ- नी। तया पुसतसे तये क्षणीं। तुह्मांपाशीं अपत्य टाकोनी। जीवनालागोनि मी गेलें ॥ ९ ॥ तें कोठेंचि न दिसे आतां। वे- गीं सांगावें प्राणनाथा। खालीं दृष्टी करूनि पाहतां। तंव रुधिर अवचितां देखिलें ॥ ११० ॥ आस्थि मांस एके ठायीं। क- र्दमीं देखिलें ते समयीं। हृदय पिटोनि लवलाहीं। शोक करित आक्रोशें ॥ ११ ॥ मग भ्रतारासि काय बोलत। बाळक तु- डविलें मृत्तिकेंत। देहभाव नाहीं किंचित। कैसें विपरीत हें केलें॥१२॥ संसारासि घातलें पाणी। देव काढिला शोधोनी। आतां सत्वर जाऊन येथूनी। प्राण त्यागीन सत्वर ॥ १३ ॥ ऐसें ऐकोनि कठिणोत्तर। किंचित आला देहावर। ह्मणे ध्या- नभंग त्वां साचार। केला विचार न करितां ॥ १४ ॥ माझ्या हृदयकमळांत। बैसला होता रुक्मिणीकांत। तुवां विक्षेप घालोनि त्वरित। पंढरीनाथ दवडिला ॥ १५ ॥ यास्तव क्रोध धरूनि अंतरीं। चक्रदंड घेतला निजकरीं। कांतेस मारा- वया सत्वरीं। सन्निध आला ते समयीं ॥१६॥ येरी भयभीत होऊनी। भ्रतारासि बोले वचनीं। हातबोट लावाल मजला- गुनी। तरी तुह्मांसि आण विठोबाची ॥१७॥ शपथ ऐकोनियां कानीं। निवांत बैसला एके स्थानीं। क्षमा शांति धरूनि मनीं। नामस्मरणीं लागला ॥ १८ ॥ नरनारी मिळोनि वाडियांत। एकमेकांसी बोलती मात। ह्मणती बाळक तुडवि- लें चिखलांत। देखिलें विपरीत आजि आह्मीं ॥ १९ ॥ एक ह्मणती धडचि पिसा। भ्रतार तुझा जाहला कैसा। एक ह्मणती महिमाच ऐसा। श्रीहरिभजनीं लागतां ॥ १२० ॥ ऐसें नानापरीं त्रिविध जन। अपशब्द बोलती हेळणा करून। परी तो नायकोनी त्यांचें वचन। श्रीहरिभजन करितसे ॥२१॥ राजबिदींतून वारण। चालतां उदंड भुंकती श्वान। परी तो ध्यानीं न आणून। करी गमन यथासुखें ॥२२॥ कीं पंडितांच्या सभेंत। मूर्ख चावटी करी बहूत। परी नायकोनी त्या- ची मात। पाहाती शास्त्रार्थ निजदृष्टीं ॥ २३ ॥ नातरी अगस्त्य ऋषीस देखोन। पयोब्धि अट्टहास्यें करी गर्जन। परी तें कांहीं ध्यानीं न आणून। करी अनुष्टान निजनिष्टें ॥२४॥ कीं विनतासुताचिया समोर। क्रोधें फोंफावती विखार। परी तयासी भय अणुमात्र। न वाटेची सर्वथा॥२५॥ तेविं निंदा करितां नारीनर। परी गोरा नायके त्यांचें उत्तर। एकाग्र मन करूनि स्थिर। रुक्मिणीवर जपतसे।२६। निजपुत्र मातींत तुडविला। हाही आठव नाहीं त्याजला। ध्यानांत आणोनि श्रीविठ्ठला। संसारदुःखा न गणीच ॥ २७ ॥ कांहीं एक दिवस लोटतां। मनांत विचारी निजकांता। भ्रतारासी अबोला धरितां। शेवट सर्वथा नव्हेची ॥ २८ ॥ राजयापासोनि अन्याय जाहला। तरी प्रजांनीं काय करावें त्याला। तेविं पतीस शिक्षा करावयाला। अधिकार मजला नसे कीं ॥२९॥ चरणक्षालन करावयासी। सन्निध आली एके दिवशीं। येरू परता

सरोनि तिसी। काय बोलिला तें ऐका॥१३०॥हात बोट न लावी ह्मणऊन। शपथ घातलीस मजकारण। ती माझ्या वि-
ठोबाची आण। न मोडीच सर्वथा॥३१॥ कांता ह्मणे भ्रताराासी। मी अमर्याद बोलिलें तुह्मासी। तें क्षमा करूनि मजसी।
अंगीकारिलें पाहिजे॥३२॥ करितां प्रपंचखटपट। बोलिलें बरेंवाईट। तुह्मी बैसलेत धरूनि हट। तरी कैसा शेवट होईल
॥३३॥ आव्यांत मडकीं असतां देख। सहज लागती एकासी एक। तेविं प्रपंच करितां देख। बोलती अनेक अपशब्द ३४
गोरा ह्मणे तिजप्रती। पश्चिमेस उगवेल गभस्ती। परी मी निश्चय धरिला चित्तीं। कल्पांतींही सोडिना॥ ३५॥ समीर
अडकेल पिंजऱ्यांत। आकाश सांठवेल घटांत। तरी माझा नेम निश्चित। न टळे सर्वथा जाणवो॥३६॥ तृणामाजी झां-
केल कृशान। कीं मेघास भिऊन पळेल पवन। परी मी रुक्मिणीवराची आण। न मोडीच जाण सर्वथा ३७ सागरीं बुडे-
ल तुंबिनी फळ। बागुलासी भिऊन पळेल काळ। परी माझा निश्चय अढळ। न टळे सर्वथा कल्पांतीं॥ ३८॥ ऐसें बोलतां
वैष्णवभक्त। मग कांता राहिली निवांत। पोटीं नाहींच कीं अपत्य। चिंताक्रांत मानसीं॥३९॥ऐसा विचार करितां सत्र-
दिवस। ह्मणे दुसरा विवाह करावयास। तेणें तरी वाढेल वंश। मग माहेरासी पातली१४०मातापित्यासी ते तेळां। सक-
ळ वृत्तांत सांगीतला। ह्मणे भ्रतारानें टाकिलें मजला। वंश बुडाला दिसताहे॥४१॥ गोत्रज पाहत होते उणें। तैसेंच केलें
नारायणें। आह्मांसि हांसती सोयरेपिशुनें॥ बुडालें संतान ह्मणोनियां॥ ४२॥ माझा तो त्याग केला तयानें। आतां
करावें दुसरें लग्न। तरी गृहस्थिति न कळतां जाण। देईल कोण सवतीवरी॥ ४३॥ तरी कनिष्ठकन्या कुमारी घरीं। ते
माझ्या भ्रताराासी द्या नोवरी। ऐसें ह्मणोनि ते अवसरीं। चरण धरी पितयाचे।४४।ओंटी पसरूनि मायेजवळी। अश्रु-
पात आणिले नेत्रकमळीं। ह्मणे मी मागतें एवढी चोळी। बोळवण केली पाहिजे॥ ४५॥ ऐसीं करुणावचनें बोलतां।
अवश्य ह्मणती मातापिता। विप्र बोलावूनि तत्वतां। लग्ननिश्चय पैं केला।४६॥मग घरासि येऊन त्वरेनें। सर्व साहित्य
केलें तिणें। वस्त्रें अलंकार भूषणें। केलीं पूर्ण सिद्ध तेव्हां॥४७॥ मूळ पाठवूनि ते वेळे। सोयरे गोत्रज मिळविले। लग्न त-
त्काळ निघालें। वाद्यगजरेंकरूनी॥ ४८॥ वऱ्हाडी मार्गीं करिती चिंता। ह्मणती देवासाठीं टाकिली कांता। हें विप-
रीत आमुचे चित्ता। सर्वथा न माने गृहस्थहो॥४९॥ अविंधासि नावडे गायत्रीपूजन। खरासि नावडे लावितां चंदन।
तेविं निंदकासि वैष्णवजन। नावडती जाण सर्वथा॥१५०॥भ्रष्टासि नावडे शुद्ध आचार। अंत्यजासि नावडे शास्त्रवि-
चार। भूतांसि नावडे कीर्तनगजर। कीं विवेक मूर्खासी॥५१॥ रोगिया नावडे पयःपान। तस्करा नावडे निर्मळ
चांदणें। कृपणासि नावडे द्रव्यदान। बधिरासि गायन रुचेना॥५२॥ मांस खायिरासि कैंची माया। हिंसकासि नावडे
भूतदया। दरिद्रियासि कल्पतरुच्छाया। प्रारब्धकर्में नावडे॥५३॥ तेविं निजभक्तांची निष्ठा ऐसी। देखोनि नावडे अ-
भक्तांसी। असो यापरी लग्नासी। गेले सत्वर तेधवां॥५४॥ देवकप्रतिष्ठा करूनि जाण। जाहलें सर्वांचें भोजन। अंतः-
पट धरूनी ब्राह्मण। मंगळाष्टकें बोलती॥५५॥ लक्ष्मीकांतासि चिंतोनि सत्वर। सावधान ह्मणती द्विजवर। अंतःपट

सोडितांचि सत्वर। जाहला गजर वाद्यांचा॥५६॥ चार दिवस सोहळा करून। नगरांत निघाली मिरवण। सासूसा-
सरा दोघेंजण। विचार करिती मनांत॥५७॥ ह्मणती ज्येष्ठ कनिष्ठ दोघीजणी। कन्या दिधल्या यालागोनी। एकीची
नावड घेतली मनीं। हांसतील जन आपणांसी॥५८॥ दोनी नेत्र सारिखेचि जाण। तेविं दोघी आपल्यासि तत्समान।
तरी जामातासि घालोनि आण। पाळिग्रहण करावें॥५९॥ गोरियासि ह्मणती ते अवसरीं। कन्या उभयतां तुमचे पद-
रीं। यांचा सांभाळ संसारीं। बरोबरी करावा॥१६०॥ अधिक उणें होतांचि जाण। तरी तुह्मासि विठोबाची आण। ऐ-
कोनियां ऐसें वचन। अवश्य ह्मणे तयांसी॥ ६१॥ ह्मणे कृपा करितां जगज्जीवन। आपेआप तुटे बंधन। निजभक्तांसि
विषयाचरण। लागों नेदीच सर्वथा॥६२॥ ऐसा संतोष मानूनि चित्तीं। सदनासि आला सत्वरगतीं। वस्त्रें भूषणें कांते-
प्रती। देत सारखीं समान।६३। परी ज्येष्ठकांता जैशा रीतीं। तैसेंचि लेखी कनिष्ठेप्रती। ऐसी देखोनियां स्थिती। चिंता
करी मनांत॥६४॥ज्येष्ठकांता पुसे त्यासी। कनिष्ठ कां नये मनासी। येरू ह्मणे आण मजसी। तुझ्या बापें घातली॥६५॥
कीं अधिक-उणें करितां जाण। तुह्मांसि विठोबाची असे आण। ऐसें श्वशुर बोलिला वचन। तें म्यां दृढ धरियेलें।६६।
ऐसें भ्रतार बोलतांचि जाण। कनिष्ठकांता करी रुदन। ह्मणे बाई मजकारण। कैसें गोंवून टाकिलें॥ ६७॥ मग ती ह्मणे
मायबहिणी। कष्टी नको होऊं साजणी। निशाकाळीं दोघीजणी। चित्त पाहूं तयाचें॥६८॥ निशाकाळीं वैष्णवभक्त।
जाहला देखोनि निद्रित। कांता सन्निध येऊनि तेथ। शयन करिती शेजारीं॥ ६९॥ दोनी कर घेऊन सत्वरीं। उभयतां
ठेविती हृदयावरी। गोरा सावध होऊन सत्वरीं। आश्चर्य करी मनांत॥१७०॥ ह्मणे मनांत नसतां विषयध्यान। निज-
करें मोडोनि टाकिली आण। ऐसा अनुताप मनीं धरून। काय करिता जाहला॥७१॥ असिलता घेऊनि त्वरित। खां-
बासि बांधिले उभयहस्त। सदृढ करूनियां चित्त। कर तोडोनी टाकिले॥७२॥ भजन करीत बैसला सत्वर। तों उदया-
सी पावला दिनकर। कांता देखोनि थोंटे कर। शोक करिती आक्रोशें॥७३॥ ह्मणती विपरीत जाहलें जाण। आतां प्र-
पंचधंदा करील कोण। देशोदेशीं आह्मां हांसती पिशुन। वर्तणूक देखोनि आमुची॥ ७४॥ संतान वाढवावयाकारण।
ह्मणोनि दुसरें केलें लग्न। परी ईश्वरी क्षोभापुढें यत्न। काय चालती आमुचे॥ ७५॥ तेव्हां गोरा ह्मणे उभय कांतांप्रती।
वायांचि शोक कराल चित्तीं। शिरीं असतां रुक्मिणीपती। कासया खंती करावी॥ ७६॥ कामधेनू ऐसी गाय। सदैव
ज्याला लाधली होय। तयासि खाण्याची चिंता काय। करणें नलगे सर्वथा॥७७॥ कल्पतरुतळीं बैसतां जाण। अन्नव-
स्त्रासि कायसी वाण। तेविं प्रसन्न असतां रुक्मिणीरमण। संसारबंधन कायसें॥७८॥ नातरी परिस जोडलिया हातीं।
त्यासि काय उणे धनसंपत्ती। तेविं विठ्ठलनामीं जडल्या प्रीती। संसारगुंती बाधेना॥७९॥ कीं सुधारस प्राशन करितां
पोटभरी। सकळ व्याधि पळती दूरी। तेविं मुखीं जपतां रामकृष्णहरी। भवरोग निर्धारीं बाधेना॥१८०॥ यापरी कांते-
सि समजावून अखंड चित्तीं समाधान। अहोरात्र करी नामस्मरण। नाहीं खंडन क्षणमात्र॥८१॥ तों आली आषाढी

एकादशी । गोरियाचे आनंद मानसीं । कुटुंबासह यात्रेसी । पंढरीक्षेत्रीं पातला ॥८२॥ चंद्रभागेंत करूनि स्नान । घेतलें पुंडलीकाचें दर्शन । क्षणमात्रें प्रदक्षिणा करून । महाद्वारासी पातला ॥८३॥ दोघी कांतांसमवेत जाण । सद्भावें घातलें लोटांगण । देऊनि देवासि आलिंगन । वंदिले चरण सद्भावें ।८४। तंव टाळ दिंडी घेऊनि करीं । नामा उभा गरुडपारीं । प्रेमें आनंदें कीर्तन करी । उल्हास गजरीं नामाचे ॥८५॥ वीणे वाजती मृदंग । कीर्तनीं आला बहुत रंग । पुढें नाचती पांडुरंग । भक्तभवभंग कृपाळू ।८६। निवृत्ति ज्ञानदेव सांवता । सोपान जगमित्र पढियंता । सप्रेम नामयाची कथा । श्रवण करीत बैसले ॥८७॥ आणिक संत महंत सज्जन । बहुत मिळाले वैष्णवजन । प्रेमानंदें भजन कीर्तन । ऐकताती निजप्रीतीं ॥ ८८ ॥ तंव ऊर्ध्वहात करूनि देखा । नामदेवें करविल्या पताका । स्वमुखें सांगत सकळ लोकां । तैशाचि ध्वजा उभारिल्या ॥८९॥ प्रेम आल्हादें पिटोनि टाळी । हरिनामें गर्जती ते वेळीं । तंव गोरियाचे नेत्रकमळीं । अश्रुपात लोटले ।१९०। ह्मणे देवा रुक्मिणीकांता । मज कां मोकलोनि दिधलें आतां । थोंटे हात वरी करितां । लाज चित्ता वाटतसे ॥ ९१ ॥ कमललोचना कमळापती । तूंचि माझी धनसंपत्ती । तुजवांचोनि त्रिजगतीं । कोणी जिवलग दिसेना ।९२। तुजवरी घातला सर्व भार । आणिक नाहीं मज आधार । ऐशा रीतीं गोरा कुंभार । करुणा फार भाकीतसे॥९३॥ऐसी करुणा ऐकोनि त्वरित । सत्वर पावला रुक्मिणीकांत । गोरियाचे पहिल्यासारिखे हात । फुटले त्वरित ते समयीं ॥ ९४ ॥ आनंदें होऊनि निर्भरें । टाळ्या वाजवी नामगजरें । हें नवल देखोनि जयजयकारें । सकळ भक्त गर्जती । ९५ । ह्मणती भक्तांमाजी वैष्णववीर । गोराकुंभार भक्त थोर । यासि प्रसन्न रुक्मिणीवर । फुटले कर हरिकीर्तनीं ।९६। ऐसें कौतुक दृष्टीस देखतां । उठली गोऱ्याची ज्येष्ठकांता । हात जोडोनि पंढरीनाथा । काय बोले ते समयीं ॥९७॥ ह्मणे आपुले दासासि कृपादृष्टीं । तुवां पाहिलें जगजेठी । आणि मी बाळकाविण होतें कष्टी । करुणा पोटीं कां नये ॥९८॥ तूं कृपासागर जगज्जीवन । ऐसें बोलती भक्तजन । आह्मी कष्टी होतसों दीन । बाळक तान्हें न देखतां ॥९९॥ तुझें नाम घेतां रुक्मिणीपती । विदेही जाहला आमुचा पती । लेंकरूं तुडविलें घेऊनि मातीं । तें असे चित्तीं तुज ठावें ॥ २०० ॥ ऐसी करुणा ऐकोनि कानीं । प्रसन्न जाहले चक्रपाणी । रांगत बाळ सभेंतूनी । अकस्मात पातलें ॥ १ ॥ तें देखतांचि दृष्टीसी । आश्चर्य वाटलें सकळांसी । माय धांवूनियां वेगेंशीं । मोहें पोटाशीं धरियेलें ॥ २॥ मग ह्मणे माता रुक्मिण । आजपासून तुझी मोकळी आण । स्वस्त्रियांचा त्याग न करी जाण । आज्ञा प्रमाण आमुची ॥ ३॥ ऐसें बोलतां भीमकबाळी । आनंदली भक्तमंडळी । जयजयकारें पिटोनि टाळी । कीर्तनमेळीं डोलत ॥ ४ ॥ मग उजळूनि मंगलारती । वोवाळिला रुक्मिणीपती । पुढिले अध्यायीं रस-उत्पत्ती । सादर श्रोतीं परिसिजे ॥५॥ या निजभक्तकथा सुंदर । वदवील पुढें रुक्मिणीवर । महीपती तयाचा किंकर । ह्मणवी साचार निजप्रीतीं ॥ ६ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । सप्तदशाध्याय रसाळ हा ॥ २०७ ॥ अध्याय १७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । आजि अविद्यातिमिर गेलें हरपोनी । भक्तविजय उगवला वासरमणी । द्वैतभेदाचीं नक्षत्रें गगनीं । गेलीं लोपोनि निजतेजें ॥ १ ॥ तेणें ज्ञानप्रकाशें साचार । नवविध मार्ग जाहले गोचर । मग साधकजनीं करून विचार । श्रवणपंथें चालिले ॥२॥ एक कीर्तनमार्गें निश्चितीं । लागले प्रेमळाचे संगतीं । तेणें जडमूढ तारून प्रीतीं । केला श्रीपती स्वाधीन ॥३॥ एक मननाचिया वाटा । लक्षूनि चालिले चोंहटा । एक स्मरणाच्या दरकुटा । एकाग्र चित्तें बैसले ॥ ४ ॥ कोणासि आवडे पादसेवन । त्यांहीं त्याच पंथें केलें गमन । एक अर्चननगर देखून । चालिले सत्वर त्या ठायां ॥५॥ कोणी वंदनमार्गीं धरूनि प्रीती । तिकडेच चालिले सत्वरगतीं । एक आत्मनिवेदनाचे पंथीं । लागले निश्चितीं निजप्रेमें ॥ ६ ॥ ऐसे नवविध मार्ग प्रांजळ । साधकीं केले अतिचोखाळ । आणिकही भक्त प्रेमळ । लागले तत्काळ त्याच पंथीं ॥७॥ मागिले अध्यायीं कथा अद्भुत । गोरियासि फुटले हस्त । मृतबाळक रुक्मिणीकांतें । आणोनि दिधलें तयासी ॥ ८ ॥ मग गोरानें जोडोनि हात । सकळ संतांसि विनवीत । माझा आश्रम करावया पुनीत । चलावें त्वरित मंदिरा ॥९॥ बहुत आर्त देखोन । अवश्य ह्मणती संतजन । तेंच पायीं सत्वर गमन । करिते जाहले तेधवां ॥१०॥ गोरियाचे सदनाप्रती । वैष्णव आले सत्वरगतीं । परम हर्ष वाटला चित्तीं । नमन प्रीतीं करितसे ॥११॥ बैसावया तृणासन । देऊनि केलें चरणक्षालन । तें तीर्थ करितां प्राशन । संतोष मनीं वाटला ॥ १२ ॥ षोडशोपचारें पूजन करून । षड्रसीं घातलें भोजन । मुखशुद्धीस तुळसीपान । दिधलें आणून सकळांसी ॥१३॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान । नामा सांवता वैष्णवजन । मुक्ताबाई गुणनिधान । बैसलीं संपूर्ण स्वस्थानीं ॥ १४ ॥ ज्ञानदेव ह्मणे गोरियाकारण । तुवां घट बैसविले घालूनि आसन । यांत हिरवें भाजलें निवडोन । आह्मांकारणें सांगिजे ॥ १५ ॥ ऐसें बोलतां ज्ञानेश्वर । तर्केंचि जाणितला विचार । मग गोरियानें थापटी सत्वर । हातीं घेतली तेधवां ॥१६॥ सकळ संतांचे मस्तकावरी । थापटी हाणी ते अवसरीं । मौन धरून निज-अंतरीं । उगेच बैसले सकळिक ॥१७॥ नामयापाशीं येतां जाण । ह्मणे उगेंच कां करिसी मज ताडन । गोरा ह्मणे हें भाजन । हिरवेंचि आहे अद्यापी ॥ १८ ॥ तंव मुक्ताबाई ह्मणे त्यासी । गोऱ्या कैसें कळलें तुजसी । भला परीक्षक सुजाण होसी । जाणवलें मज निश्चित ॥१९॥ हिरे रत्न मुक्ताफळांसी । जोहरी परीक्षिती त्यांसी । तैसे कुंभार भाजनासी । निजदृष्टीसी वोळखती ॥२०॥ कीं रोगियास व्याधि असतां सहज । वोळखूं जाणे वैद्यराज । तेविं हिरवें भाजलें कळलें तुज । दृष्टीं देखतां क्षणमात्रें ॥ २१ ॥ ऐसी ऐकूनियां मात । गदगदां हांसती सकळ संत । नामा विरोनि गेला मनांत । चिंताक्रांत जाहला ॥२२॥ मग सत्वर उठोनि त्या अवसरा । नामदेव आले पंढरपुरा । मग भेटोनि रुक्मिणीवरा । जीवींचें निजगुज सांगत ॥२३॥ कंठ होऊनि सद्गदित । नेत्रीं वाहती अश्रुपात । ह्मणे देवा अपमानें बहुत । जाहला संतप्त जीव माझा ॥२४॥ मग हांसोनि जगज्जीवनें । नामयासि दिधलें आलिंगन । ह्मणे बोलिलें तुज कवण । सांग संकोच न धरितां ॥ २५ ॥ नामा ह्मणे हृषीकेशी । सन्मान सांगावा जनासी । आणि अपमान सांगावा मनासी । रीती

ऐसी असे कीं ॥ २६ ॥ यावरी बोले रुक्मिणीरमण । मी तुझे मनींची जाणतों खूण । तुजविण मज सखा सज्जन । न दिसे
आन सर्वथा २७ अत्यंत मित्रासी सांगतां गुज । चित्तीं येऊं न द्यावी लाज । ऐसें नामयासि अधोक्षज । बोलिले सहज
निजप्रीतीं ॥ २८ ॥ मग ह्मणे देवा ऐक मात । गोराकुंभार तुझा भक्त । तेणें घरा नेऊन संत । अघटित एक केलें कीं ॥ २९ ॥
बैसवूनि तृणासनीं । पूजा केली प्रीतीकरूनी । मग ज्ञानदेवें खुणावोनी । तयालागीं सांगीतलें ॥ ३० ॥ मग थापटी घेऊन
करीं । मारी सर्वांचे मस्तकावरी । परी मौन धरूनि अंतरीं । कोणी उत्तर न देती ॥ ३१ ॥ मजपाशीं येतां मारावया । भय
वाटलें देवराया । मग दूर होईं ह्मणितलें तया । तुझे पायां आठवूनी । ३२ । ऐसी ऐकतांचि मात । हांसूं लागले सकळ संत ।
ज्ञानदेव मुक्ताबाईसमवेत । करिती कुचेष्टा निजांगें ॥ ३३ ॥ गोरा ह्मणे मजलागून । हें हिरवेंचि आहे भाजन । ऐकूनि हां-
सले संतजन । लज्जायमान मी जाहलों ॥ ३४ ॥ मग उठोनि वेगेंशीं । सांगावया आलों तुजपाशीं । ऐसें सांगतां नामयासी ।
हृषीकेशी हांसले ॥ ३५ ॥ नामयासि ह्मणे जगज्जीवन । ते यथार्थ बोलिले तुजलागून । जो सद्गुरूसि न जाय शरण । अपक्क
ह्मणती तयासी ॥ ३६ ॥ ऐसें बोलतां चक्रपाणी । नामा विराला अंतःकरणीं । जेविं लवणावरी घालितां पाणी । जाय
विरून क्षणमात्रें ॥ ३७ ॥ कीं साखरेवरी घालितां जळ । विरून जाय तत्काळ । तेविं वचन बोलतां घननीळ । भक्तप्रेमळ
चिंतावला ॥ ३८ ॥ दक्षिण दिशेचा प्रभंजन । सुटतां अभ्र जाय विरून । तेविं शिकवण देतां जगज्जीवनें । नामा उद्विग्न
मानसीं ॥ ३९ ॥ मग पुढती देवासि बोले उत्तर । तूं करिशील दुःखाचा परिहार । ह्मणोनि गाऱ्हाणें सत्वर । सांगावया-
सी तुज आलों ॥ ४० ॥ तूं अवकृपा धरूनि पोटीं । त्यांसारिखीच मज सांगसी गोष्टी । आतां आह्मां ठाव जगजेठी ।
न दिसे कोठें बैसावया ॥ ४१ ॥ धरणीच उबगली वृक्षासी । तरी ठावचि नाहीं जावयासी । कीं मायेनें टाकितां बाळ-
कासी । तरी कोण तयासी सांभाळी ॥ ४२ ॥ कासवी न पाहे पिलियांप्रती । तरी तीं वांचतील कैशा रीतीं । राजा न क-
री न्यायनीती । तरी प्रजा पावती सुख कैसें ॥ ४३ ॥ तेविं तुह्मीच आजि चक्रपाणी । उदास केलें मजलागुनी । आतां दु-
जें त्रिभुवनीं । कोणी न दिसे तुजपरतें ॥ ४४ ॥ नामयासि बोले पंढरीनाथ । तुझें माझें एक चित्त । जेविं पुष्पामाजी मक-
रंद वसत । नाहीं द्वैत दोघांसी ॥ ४५ ॥ तेविं तूं माझा जीवप्राण । नको उदास बोलूं वचन । आतां सद्गुरूसि शरण जाऊन ।
द्वैतखंडन करावें ॥ ४६ ॥ नामा ह्मणे देवाधिदेवा । सद्गुरू मज कासया व्हावा । तूं सन्निध असतां केशवा । मग कैंचें जी-
वास बंधन ॥ ४७ ॥ व्रतें तपें यज्ञदानें । तुजलागुनि करावीं अनुष्ठानें । तुझी प्राप्ती व्हावयाकारणें । जावें शरण सद्गुरूसी
॥ ४८ ॥ अकस्मात मिळालिया शर्करा । मग कासया जावें बाजारा । कीं मुखीं पडतां पीयूषधारा । मग चरावया डोंग-
रा कां जावें ॥ ४९ ॥ कीं आयतेंच पक्वान्न आलें देख । मग कासया करावा स्वयंपाक । घरीं द्रव्य जोडल्या अनेक । का-
सया प्रवास करावा ॥ ५० ॥ तेविं तूं सन्निध असतां जगद्गुरू । मग कासया पाहिजे सद्गुरू । ऐकतां नामयाचा विचारू ।
शार्ङ्गधरू काय बोले ॥ ५१ ॥ अरे नामया ऐक वचन । मी रामावतारीं जाण । वशिष्ठासि जाऊन शरण । अध्यात्मज्ञान



पुशिलें ॥ ५२ ॥ कृष्णावतारीं सांदीपिनीसी । शरण गेलों सद्भावेंशीं । तेव्हांच आत्मज्ञान मजसी । प्राप्त जाहलें निश्चित
॥ ५३ ॥ यालागीं माझें ऐकशील वचन । तरी सकळ संतांसि होशील मान्य । ऐसें बोलतां जगज्जीवन । धरिले चरण ना-
मयानें ॥ ५४ ॥ ह्मणे देवा सांग मजसी । शरण जाऊं कोणत्या गुरूसी । ऐसें ऐकोनि हृषीकेशी । काय बोलिले तेधवां ५५
विसोबा खेचर शिवालयांत । जाहला असे निद्रित । त्याजसारखा ज्ञानी विरक्त । न दिसे जाण त्रिभुवनीं ॥ ५६ ॥ तरी
सत्वर जाऊनि तया ठायां । शरण जाईं त्या सद्गुरुराया । मग नमस्कारूनियां पायां । अश्रु नयनीं लोटले ॥ ५७ ॥ नामा
ह्मणे देवा तुजविण । मज कंठेना एक क्षण । यासि ह्मणसील काय प्रमाण । तरी तुह्मीच आण वाहतसें ॥ ५८ ॥ मग ह्मणे
शार्ङ्गधरू । नामया रक्षीं लोकाचारू । तुवां जरी न केला सद्गुरु । तरी अज्ञानी नर केविं तरती ॥ ५९ ॥ ऐसें बोलतां च-
क्रपाणी । नामा उठिला तये क्षणीं । परम कष्ट वाटले मनीं । कैशा रीतीं तें ऐका ॥ ६० ॥ जेविं श्रीकृष्ण उद्धवाकारण ।
एकादश स्कंधीं सांगोनि ज्ञान । बद्रिकाश्रमीं त्याजकारण । पाठवितां कष्ट पावले ॥ ६१ ॥ त्याचाचि अवतार साक्षात ।
कलियुगीं झाला नामा भक्त । ह्मणोनि योजूनि दृष्टांत । त्याचा त्यासीच दीधला ॥ ६२ ॥ व्रतांमाजी एकादशी । कीं
दैवतांमाजी हृषीकेशी । तीर्थांत चंद्रभागा ऐसी । उपमा द्यावयासी दिसेना ॥ ६३ ॥ जे उदंड करिती तीर्थाटन । परी
अधिकचि वाढे अभिमान । आणि चंद्रभागा पाहतां दुरून । निरभिमानी होय प्राणी ॥ ६४ ॥ हे मी काय वर्णूं थोरी ।
जाणती पंढरीचे वारकरी । वास्तव भीमरथीची थोरी । आणिका तीर्था नयेची ॥ ६५ ॥ चंद्रभागा ऐसें तीर्थ । आणि
पंढरी ऐसें क्षेत्र । नामा ऐसा भक्त पवित्र । नाहीं दिसत त्रिभुवनीं ॥ ६६ ॥ तो जातां सद्गुरूचे भेटी । देवाचा वियोग न
साहे पोटीं । मग ध्यानांत आणोन जगजेठी । उठाउठीं चालिला ॥ ६७ ॥ मल्लिकार्जुनाचे देउळांत । नामा येऊन
पाहे त्वरित । तों विसोबा खेचर निद्रित । जाहले असती ते ठायीं ॥ ६८ ॥ पायतन चढवोनि तेच क्षणीं । शाळुंकेवरी
ठेविले चरण दोनी । तें नामदेवें देखोनि नयनीं । विस्मित अंतरीं जाहला ॥ ६९ ॥ ह्मणे हाचि सद्गुरु मजकारणें । धुं-
डोनि काढिला रुक्मिणीरमणें । शिवमस्तकीं चरण ठेविले जेणें । उन्मत्त होऊनि निजेला ॥ ७० ॥ घेऊं जातां सद्गुरुद-
र्शन । तों प्रथम देखिला अवगुण । जेविं पहिला ग्रास घेतां जाण । तों मक्षिका देखिली अन्नांत ॥ ७१ ॥ कीं देशावरा-
सि जातां सत्वर । तों पुढें देखे रिती-घागर । कीं पुस्तकारंभीं साचार । प्रथमाक्षर चुकलें पैं ॥ ७२ ॥ घेऊं जातां सूर्यद-
र्शन । तों तयासि लागलें ग्रहण । कीं वधुवरांचें घटित पाहतां जाण । तों एकनाडी दिसोन आली ॥ ७३ ॥ कीं
द्वितीयेचा चंद्र पाहतां नयनीं । तों अभ्र कोंदलें गगनीं । तेविं सद्गुरु देखतां दुरूनी । अवगुण दृष्टीं देखिला ॥ ७४ ॥
मग सन्निध येऊनि विष्णुभक्त । विसोबासी काय वचन बोलत । तुह्मी ह्मणवितां साधुसंत । काय विपरीत हें
केलें ॥ ७५ ॥ साक्षात् शिव पार्वतीरमण । त्यावरी कैसे ठेविले चरण । ऐसें तुमचें ब्रह्मज्ञान । कळों आलें आ-
ह्मासी ॥ ७६ ॥ विसोबा बोले नामया पाहीं । चुकी पडली ये समयीं । सदाशिव नसे जया ठायीं । तेथेंचि ठेवीं पद आ-

तां ॥ ७७ ॥ माझें शरीर जर्जर देखा । उठावयासि नाहीं आवांका । तूं विष्णुदास भेटलासि सखा । सांगसी निका वि-
चार ॥ ७८॥ तरी जेथें नसेल पार्वतीरमण । तेथेंचि उचलोनि ठेवीं चरण । नामदेवें ऐकोनि वचन । निकट सन्निध पात-
ला ॥ ७९ ॥ मग निजकरें धरूनि पाय । उचलिता जाहला नामदेव । तों अवघा लिंगाकार ठाव । दिसों लागला तेधवां
॥ ८० ॥ जिकडे जिकडे चरण फिरवित । तिकडे तिकडे लिंगेंचि दिसत । तिळमात्र स्थळ न दिसे रितें । चित्तीं विस्मित
जाहला ॥८१॥ घंटा मृदंग साचार । अवघा शिवमय आकार । दर्शना आले नारीनर । ते पार्वतीवर दिसताती ॥ ८२ ॥
विलोकितां सद्गुरुचरण । तेही शिवमय दिसती जाण । आपणासि पाहे विचारून । तों शिवमय निजांगें॥ ८३ ॥ भोंवतें
विलोकी निजप्रीतीं । तों देउळासमवेत कैलासपती । नामा विस्मित होऊन चित्तीं । चरण मस्तकीं वंदिले ॥ ८४ ॥ मग
सद्गुरु ह्मणती ते अवसरीं । मजला कष्ट होती भारी । आतां चरण बरेबरी । ठेवीं लवकरी विष्णुभक्ता ॥ ८५ ॥ ऐकोनि
नामा बोले वचन । तुह्मी ज्ञानसागर चैतन्यघन । स्वामींचें करितां पादसेवन । शिवमय संपूर्ण भासतें ॥ ८६ ॥ जिकडे
तिकडे कैलासनाथ । अणुमात्र स्थळ न दिसे रितें । चित्तीं होऊन विस्मित । चरण मस्तकीं वंदिले ॥८७॥ विसोबा ह्मणे
नामयाकारण । ऐक शिवाचें निजध्यान । मग नंदभार्षेचि बोलून । संशय खंडन करितसे ॥८८॥ सुळु वदनें जयाका-
रण । उदानु नेत्र देदीप्यमान । अंगुळु हस्त शोभती जाण । त्याचें ध्यान सांगतों तुज ॥ ८९ ॥ मस्तक जयाचा पाहतां दृ-
ष्टीं । असे कैवल्या आगळी काठी ॥ आणि पवित्रूचे तळवटीं । चरण असती तयाचे ॥ ९० ॥ वर्णितां त्याचें महिमान ।
सेलु लज्जित जाहलें मन । पोकू बोलतां अर्थज्ञान । वेडावले मानसीं ॥९१॥ अठरा वर्णितां नव्हे लेख । तंव ढकारवदना-
चा आला देख । तेणें गुण वर्णितां सुरेख । जिव्हा दुखंड जाहल्या ॥ ९२ ॥ ऐसा न लागे त्याचा पार । मग अवारू जोडू-
नियां कर । ह्मणे मी ज्ञानेश्वराचा किंकर । याचे चरणीं विनटलों ॥ ९३ ॥ ऐसें सद्गुरुवचन ऐकतां । ठसावलें नामयाचे
चित्ता । जेविं अर्जुनासि विश्वरूप दावितां । अनुभव चित्तीं ठसावला ॥९४॥ मग नामा ह्मणे सद्गुरुमाय । आह्मां तारक
तुझेचि पाय । तुझे चरणवंदनें सोय । अवघें एकमय मज दिसे ॥९५॥ मग विसोबा उठोनि सत्वर । ठेविला मस्तकीं अ-
भयकर । तेव्हां नामयानें रुक्मिणीवर । हृदयकमळीं बोळखिला ॥९६॥ तंव एके दिवशीं सकळ संत । गरुडपारीं मिळा-
ले तयांत । नामयासी पंढरीनाथ । आलिंगन देतसे ॥ ९७॥ ह्मणे त्वां सद्गुरु केल्यावर । आमचा न घेसी समाचार । कैसें
मन करूनि निष्ठुर । राहिलास निरंतर त्यापाशीं ॥ ९८ ॥ यावरी नामा उत्तर देत । तुझेंच स्वरूप सद्गुरुनाथ । आतां मा-
झिया चित्तांत । द्वैत नसेचि सर्वथा ॥ ९९ ॥ ऐकून नामयाचें वचन । संतोषला रुक्मिणीरमण । सकळ संतांसि जगज्जी-
वन । काय बोलत तेधवां ॥ १०० ॥ आतां आमुचे नामयाकारण । ह्मणी ह्मणूं नका हिरवें भाजन । ऐसें बोलतां जगज्जी-
वन । कळली खूण ज्ञानदेवा ॥ १ ॥ आणिक रसाळ कथावाणी । श्रोतेहो सादर ऐका कानीं । परिसा भागवतें अनुष्ठान
करूनी । माता रुक्मिणी आराधिली ॥ २ ॥ प्रसन्न होऊनि आदिमाया । त्यावरी केली पूर्णदया । कृपादृष्टीं पाहूनियां ।



केली छाया कृपेची ॥ ३ ॥ सगुणस्वरूपें देऊनि भेटी । परिसा भागवत धरिला पोटीं । ह्मणे बाळका इच्छा गोमटी । ध-
रिली काय ते मज सांगे ॥ ४ ॥ धैरू अंतरीं करूनि विचार । मातेसि बोले प्रत्युत्तर । तुझे भजनीं चित्त स्थिर । निरंतर अ-
सावें॥५॥आणि उद्वेगाची मात । कदा न यावी निजमनांत । ऐसा माझा असे हेत । पुरवी मनोरथ जननीये॥६॥मग एक
परिस आणून झडकरी । दिधला तयाचिये करीं । ह्मणे यासि जीवावेगळा बूरी । कदा न करी भागवता ७ लोह लावि-
सील यास जितुकें । तुझे घरीं सुवर्ण तितुकें । मातेचें वचन ऐकूनि निकें । संतोष वाटला मनांत॥८॥जैसे शतक्रतु सायासें
करितां । मग अमरपदाचि आलें हाता । कीं दशग्रीवें अनुष्ठान करितां । लाधली अवचितां हेमनगरी ॥ ९ ॥ तेविं समा-
धान पावूनि चित्ता । नमस्कारिली आदिमाता । मग कमळजा त्याची कांता । परीस दिधला तिजपाशीं ॥ ११० ॥ लोह
आणूनि ते अवसरीं । तया लावोन पाहाती सत्वरीं । तों जांबूनद सुवर्ण झडकरी । जाहलें असे तेधवां ॥ ११ ॥ मग स-
माधान पावूनि कमळजा । ह्मणे जगन्माते पार न कळे तुझा । आह्मां दुर्बळांचिया काजा । तुजवांचूनि कोण पावे १२
दरिद्रदुःखें पीडिलों बहुत । तुवां केलें आजि कृतार्थ । ऐसें समाधान मनांत । उभयतांचे तेधवां ॥१३॥ कांतेसि एकांतीं
नेऊनी । ह्मणे हें न सांगावें कोणालागुनी । पडलिया संतांचे श्रवणीं । तरी मजलागोनी हांसती ॥ १४ ॥ उभयतां एक-
चित्त होऊन । घरांत भक्षिती उत्तमान्न । बाह्यात्कारीं लोकांलागून । दुर्बळावाणें दाखविती ॥ १५॥ तळघरीं ठेऊन ध-
नसंपत्ती । प्रत्यहीं पक्वान्नें भोजन करिती । बाह्यात्कारीं दाखविती । आपण विरक्त वैरागी ॥ १६॥ श्मश्रु बोडोनि भैंद
जैसे । यात्रेकर्‍यांस मार्गीं घालिती फांसे । कीं बहुरूपी सोंग आणिती जैसें । संन्याशीच श्रीपाद ॥ १७॥ नातरी सुला-
म्याची मोहर । सोज्वळ दिसे बाह्यात्कारीं । कीं जाराचा विशेष आचार । दिसे साचार जनासी ॥ १८॥ कीं पिंगळवे-
लीचें सुमन । नेत्रासि साजिरें दिसे दुरून । कीं कृपणमित्राचें सौजन्य । वरिच्छेवरी जाणावें ॥ १९ ॥ कीं अंतरीं नसतां
दैवतवारें । देवलसी डोले बाह्यात्कारें । कीं दृष्टी नसतां मयूरें । सर्वांगीं डोळे दाखविती ॥१२०॥ तैसाचि परिसा भाग-
वत । लोकांसि दिसे अतिविरक्त । परी गृहीं संपत्ति बहुत । परीक्षक जाणती ॥२१॥ जेविला अथवा उपवासी । हें कळे
पाहतां मुखासी । निष्कपटी किंवा रागेंसी । भाषणावरून समजे पैं ।२२। कीं स्नेहसूत्र आहे दीपकांत । हें प्रकाशावरून
कळत । चातुर्य अथवा मूर्खत्व । हें दृष्टीवरून कळताहे ॥२३॥ कीं कार्य करून आला त्वरेंसी । हें चतुर वोळखिती चाल-
ण्यापाशीं । श्रोता दुश्चित किंवा स्वस्थ मानसीं । हें वक्त्यासी कळताहे ॥२४॥ तेविं भागवताचें विरक्तपण । चतुर जाण-
ती सर्वज्ञ । सद्गुण अथवा दुर्गुण । न लोपे जाण सर्वथा ॥ २५ ॥ कमळजा त्याची गृहिणी । उदका चालिली एके दिनीं ।
चंद्रभागेचें भरून पाणी । परतोन येत मंदिरा ॥ २६ ॥ तों नामदेवाची निजकांता । राजाबाई पतिव्रता । वाटेसि भेट-
ली अवचितां । कमळजेसी तेधवां ॥ २७॥ तंव राजाई ह्मणे तिजकारण । मी सत्वर येतें उदक भरून । तोंपर्यंत या ठि-
काणीं जाण । उभें साजणी असावें ॥२८॥ ऐसें ह्मणूनि लवलाहें । उदक भरून आली पाहें । दोघीजणी एके ठायें । जा-

हल्या असती तेधवां ॥ २९ ॥ अन्नवस्त्राविण बहुत कष्टी । राजाई तिणें देखिली दृष्टीं । ह्मणे सखे जीवींच्या गोष्टी । उठाउठी सांगहो ॥१३० ॥ गुज सांगतां मैत्रिणीजवळी । लाजों नये कदाकाळीं । द्वैतकल्पना त्यागोनि सकळीं । खेळीमेळीं असावें ॥ ३१ ॥ यावरी राजाई बोले सहज । ऐक साजणी जीवींचें गुज । घरधन्यानें सांडूनि लाज । गरुडध्वज आराधिला ॥ ३२ ॥ नेणेंचि मान अपमानता । नाहीं लौकिक संसारचिंता । ध्यानांत आणूनि रुक्मिणीकांता । भजन करित अखंड ॥ ३३ ॥ अन्नवस्त्र संकीर्ण घरीं । कुटुंब बहु आहे पदरीं । उपाय करावा कैशापरी । तो सांग झडकरी मजलागीं ॥ ३४ ॥ ऐकून कमळजा बोले वचन । नामदेव करितो जयाचें भजन । त्याणें कांहीं प्रसन्न होऊन । दिधलें नाहीं तुह्मांसी ॥३५॥ फळ पुष्प जरी नये वृक्षासी । तरी कासया जीवन घालावें त्यासी । तेविं भक्षावया न दे हृषीकेशी । तरी कां भजनासी लागला ॥ ३६ ॥ विहिरीसि न लागतां जीवन । व्यर्थचि उकरायाचा शीण । तेविं प्रसन्न न होतां रुक्मिणीरमण । कासया आराधन करावें ॥ ३७ ॥ लग्नास नेदीच आहेरा । तरी कासया पाचारावा सोयरा । तेविं प्रसन्न न होतां रुक्मिणीवरा । आपण पुजारा कां व्हावें ॥३८॥ औषधाचा नये गुण । तरी कां करावा रसनेसि शीण । तेविं प्रसन्न न होतां रुक्मिणीरमण । कासया आराधन करावें ।३९। कां क्षेत्रांत कांहीं नव्हे पीक । कासया करावे कष्ट देख । तेविं प्रसन्न न होतां रमानायक । त्याचे गुण कां वर्णावे ॥१४०॥ माझिया भ्रतारें साजणी । प्रसन्न केली माता रुक्मिणी । तिणें परिस एक आम्हांलागुनी । कृपा करूनि दीधला॥४१॥लोह लाऊनि त्याकारण । गृहीं उदंड केलें सुवर्ण । तयाचे योगें मिष्टान्नभोजन । करितसों मंदिरीं ॥४२॥ यावरी ह्मणे राजाई । परिस कैसा असतो बाई । कमळजा म्हणे घरास येईं । तुज ते ठायीं दाखवीन॥४३॥ऐसें म्हणूनि त्या अवसरा । दोघी गेल्या आपुले घरा । तों एके दिवशीं तिच्या मंदिरा । राजाई सत्वर पातली ॥४४॥ मग परीस आणूनि लवलाहीं । तीस दाखवी ते समयीं । म्हणे यास क्षणभरीं घेऊन जाईं । लोहा लावीं निजहस्तें।४५। सुवर्णसांठा करूनि घरीं । दरिद्रदुःखातें दवडी दूरी । मागुती आणोनियां सत्वरीं । देईं माझा मजपाशीं॥४६॥आणि तुझे माझे भ्रतारासी । ह्मणी गोष्टी कळों न देसी । वचन ऐकूनि राजाईसी । समाधान वाटलें ॥४७॥ घरासि जाऊन ते अवसरीं । लोह धुंडितां निजमंदिरीं । सुई कातर चाती तिसरी । लावी झडकरी परिसासी ४८ मग सुवर्ण नेऊनि बाजारांत । त्याचें द्रव्य घेतलें त्वरित । सावकारासि देऊनि तेथ । सर्व साहित्य आणिलें ॥ ४९ ॥ वस्त्रें भूषणें पाकपात्रें अद्भुत । अन्नसामग्री घेतली बहुत । स्वयंपाक करावया त्वरित । हर्षयुक्त निघाली ॥ १५० ॥ तों दोनप्रहरीं नामदेव येऊन । कांतेसि पुसे वर्तमान । सामग्री आणिलीस कोठोन । तें मजकारणें सांगिजे ॥ ५१ ॥ येरी ह्मणे करा भोजन । पुसोनि काय प्रयोजन । संसारचिंता आजपासोन । तुह्मी न करावी मनांत ॥५२॥ यावरी नामदेव बोले वचन । सांगसी तरीच करीन भोजन । राजाई संकट देखोन । सांगती झाली तेधवां ॥५३॥ ह्मणे परिसा भागवत ब्राह्मणें । रुक्मिणी प्रसन्न केली तेणें । माता तुष्टोनियां तिणें । परिस दिधला त्यालागीं॥५४॥तुह्मी पांडुरंगाचें करितां स्मरण । घ-



रीं तिळभर नसे अन्न । लेंकुरें खाण्यावांचून । होती हैराण सर्वदा ॥५५॥ कमळजा त्याची अंतुरी । तिणें परिस दिधला क्षणभरी । त्यासि लोह लाऊनि झडकरी। सुवर्ण मंदिरीं सांठविलें॥५६॥तिची माझी मैत्री सहज । म्हणोनि परिस दिधला मज । आपुलें साधूनि घेतलें काज । आतां नेऊन देईन ॥ ५७॥ नामा म्हणे निजकांतेतें । परिस कैसा दाखवी मातें । येरी जाऊन मंदिरातें । आणूनि दावी तयासी ॥ ५८ ॥ हातींचा परिस हिरून सत्वरीं । घेऊनि गेला चंद्रभागेतीरीं । डोहांत टाकून झडकरी । विठ्ठल अंतरीं आठविला ॥ ५९ ॥ उपाधीरहित होऊन । करित बैसला नामस्मरण । राजाई चिंतातुर होऊन । करीत रुदन बैसली ॥१६०॥ तों येरीकडे परिसा भागवत । मंदिरासि आला त्वरित । परिस असे सांबळींत । तंव तो न दिसे त्या ठायीं ॥६१॥ कांतेसि ह्मणे लागलें वेड । कैसी हारविली जन्माची जोड । जे उदंड यत्न करितां अवघड । तरी तो न जोडे सर्वथा ॥ ६२ ॥ येरी ह्मणे राजाईनें जाण । नेला घडिभर मागोन । दरिद्रें पीडिली ह्मणोन । क्षणभर जाण दिधला म्यां ॥ ६३ ॥ परिसा ह्मणे कांतेलागुनी । तेंच भय होतें माझे मनीं । आतां सत्वर तेथें जाऊनी । घेऊनि येईं आतांच ॥ ६४ ॥ मग कमळजा त्वरेनें ते काळीं । नामदेवाचे गृहास आली । राजाईस पुसे ते वेळीं । कोठें ठेविली निजवस्तु ॥६५॥ येरी ह्मणे वो साजणी । अपराध घडला मजकडोनी । घरासि येऊनियां घरधनी । गेले घेऊनी बाहेर ॥ ६६ ॥ आतां येतील करून स्नान । मग मी तुमचा देईन आणून । कमळजा ह्मणे तिजकारण । आतांच सत्वर देइजे ॥६७॥राजाई चिंताक्रांत मानसीं । ह्मणे चाल जाऊं तयापाशीं । भीमातीरीं येऊन वेगेंसीं । नामयापाशीं पातल्या ॥ ६८ ॥ तंव त्याणें नेत्र झांकूनी । ध्यानांत आणिला चक्रपाणी । विठ्ठलनाम प्रेमें करूनी । जपत बैसला निजप्रीतीं ॥ ६९ ॥ कांता ह्मणे नामयाला । तुह्मी कोठें परिस ठेविला । कमळजा आली मागावयाला । इजला दिधला पाहिजे ॥ १७० ॥ ऐकोनि ह्मणे विष्णुभक्त । टाकून दिधला उदकांत । ऐसी ऐकोनियां मात । जाहल्या संतप्त उभयतां७१ दीर्घस्वरें दोघी रडती । हृदय पिटोनि आक्रंदती । नरनारी पाहावया येती । वृत्तांत पुसती तेधवां ॥ ७२॥ राजाई सांगतां वृत्तांत सकळ । परिसा भागवतासी कळलें तत्काळ । मग तो पिटीत वक्षःस्थळ । नामयापासीं पातला॥७३॥ लोकांसि सांगे ते वेळां । येणेंच परिस अभिलाषिला । आणि आह्मांसि ह्मणतो टाकिला । चंद्रभागेचे डोहांत ॥ ७४ ॥ नानापरीचे त्रिविध जन । दोघांसि निंदिती दोहीगुण । कोणी भाविक भक्तजन । करिती स्तवन नामयाचें ॥ ७५ ॥ ह्मणती सोनें आणि माती । विष्णुदासासी सारिखीं दिसती । परिसाचा अभिलाष चित्तीं । हा कल्पांतीं करीना ॥ ७६ ॥ कुटिल ह्मणती ते वेळां । मैंद घालिती तुळसीमाळा । ब्राह्मणाचा परिस अभिलाषिला । हा कैसा भला ह्मणावा ॥७७॥ परिसा होऊनि सद्गद । नामयासि बोले प्रसिद्ध । देवभक्त दोघेही मैंद । माझें घर कां बुडविलें ॥ ७८ ॥ विरक्त ह्मणविसी आपणास । आणि परिसाचा केला अभिलाष । ही गोष्ट मान्य संतांस । बरवें चित्तीं विचारीं ॥ ७९ ॥ यावरी ह्मणे विष्णुदास । आपणा कासया पाहिजे परिस । तुह्मीही आपणास उदास । बाह्यात्कारीं ह्मणवितां ॥ १८० ॥ ह्मणून चं-

द्रभागेचे डोहीं। टाकूनि दिधला लवलाहीं। असत्य वाटेल तरी ये समयीं। जाऊनि पाहें उदकांत ॥८१॥ ऐकोनि नामयाचें वचन। हांसों लागले सकळ जन। ह्मणती वाळूंत परिस कोण। वोळखी सुजाण कळेना॥८२॥मग उदकांत उडी टाकून देख। जनासि दाखविलें कौतुक। वाळू घेऊन ओंजळ एक। ह्मणे परिस बहु आणिले॥८३॥तुमचा कोणता तो पाहून। घ्या यांतील वोळखून। ऐकूनि नामयाचें वचन। सकळ लोक हांसती ॥ ८४ ॥ एक ह्मणती खडे परिस। समान दिसे याचे दृष्टीस। एक ह्मणती या समयास। प्रचीत पाहूं आपण ॥ ८५ ॥ मग सुया आणूनि मुष्टिभरी। खड्यासि लाविल्या झडकरी। तों तितुकेही परिस निर्धारीं। नवल अंतरीं वाटलें ॥ ८६ ॥ ह्मणती हात स्पर्शोनि खड्यांस। नामयानें केले परिस। ह्मणोनि हर्ष वाटला जनांस। धन्य धन्य ह्मणताती ॥ ८७ ॥ जयजयकारें भक्तमंडळी । प्रेमानंदें पिटिती टाळी। निंदक कुटिल मंडळी। अधोमुखें पाहती ॥ ८८ ॥ चमत्कार देखोनि ऐसा। अनुताप पावला भागवत परिसा। नामयास ह्मणे तुजऐसा। सभाग्य नसेच भूमंडळीं ॥ ८९ ॥ म्यां रुक्मिणीचें करूनि आराधन। एक परिस घेतला मागोन। त्याजसाठीं देत होतों प्राण। तुमचें महिमान न कळतां ॥ १९० ॥ तुमचे चरण लागती जेथें। सकळ ऐश्वर्य वोळंगे तेथें। आतां परिस नलगे मातें। अभयहस्तातें इच्छितों ॥ ९१ ॥ नामदेवें परिस काढिले होते। ते भिरकाविले उदकांत। परिसा भागवत शरणागत। जाहला अंकित नामयाचा ॥९२॥ विष्णुदासाचा उपदेश घेऊन। तयासि जाहलें दिव्यज्ञान। पुढें चरित्र रसाळ गहन। ऐकतां श्रवण सुखावती ॥ ९३ ॥ असो भक्तविजयग्रंथ विशेष। ह्याचि केवळ सुधारस। आवडीं सेविती तयांस। भवरोग सर्वथा बाधेना ॥ ९४ ॥ कीं संपूर्ण हेत हेचि पौर्णिमा। यांत भक्तविजय उगवला चंद्रमा। वैष्णवचकोरांच्या मना। परम आल्हाद वाटला ॥ ९५ ॥ अभक्त द्वेषी निंदकांस। न रुचे याचा दिव्यप्रकाश। ह्मणूनि द्वेषें निंदिती यास। नाहीं विश्वास अंतरीं ॥ ९६ ॥ असो तयांचें करितां वर्णन। वाग्देवीस व्यर्थचि शीण। आतां सत्वशील जे कां सज्जन। देवोत अवधान निजप्रीतीं ॥९७॥ श्रीभीमातीरवासी रुक्मिणीपती। व्यापूनि उरलासे त्रिजगतीं। त्याचे कृपेनें महीपती। निरूपण ग्रंथीं लिहितसे ॥ ९८ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। अष्टादशाध्याय रसाळ हा ॥ १९९ ॥ अध्याय १८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः। श्रीराधाकृष्णाय नमः। आज कार्तिकी एकादशी पर्वकाळीं। पंढरीस मिळाली भक्तमंडळी। त्यांसमवेत वनमाळी। भक्तविजयमेळीं पातले ॥१॥ शांति क्षमा नामें निश्चितीं। याचि चंद्रभागा भीमरथी। दया हेचि पुष्पावती। गोपाळपुरीं वाहतसे।२।उल्हास ह्याचि वेणुनाद। जेथें क्रीडे आनंदकंद। सद्भाव पुंडलीक प्रसिद्ध।लीला अगाध जयाची ॥३॥भक्तविजयग्रंथरसाळ। हेंच पांडुरंगाचें राउळ। रमणीय देखोनियां स्थळ। उभा घननीळ सांवळा ।४। सात्विक गुण उत्तम जाण। तेंचि शोभतें वृंदावन। त्यावरी कीर्तीच्या ध्वजा उभारून। शोभायमान दिसती पैं ।५। कळा चातुर्य उत्तम गुणी। तेचि जाणा माता रुक्मिणी। तिच्या प्रसादेंकरूनी। सप्रेम मनीं उल्हास ॥ ६ ॥ हें पुण्यक्षेत्र अति पावन। पहावयासि येती भाविक जन। ते टाकूनियां मानाभिमान। जीवन्मुक्तपणें वर्तती ॥ ७ ॥ परळी वैजनाथीं एक ब्राह्मण। जगमित्रनागा नामाभिधान। परम भाविक वैष्णवजन। कुटुंबासहित राहिला ॥ ८ ॥ ग्रामांत करूनि भिक्षाटन। मेळवून आणावें कांहीं धन। ऐशा रीतीं कुटुंबरक्षण। उदरपूर्ती करीतसे ॥९ ॥ सांडोनियां आशापाश। रात्रीस करी कीर्तन घोष। ग्रामींचे लोक श्रवणास। येती आवडीकरूनी ॥ १० ॥ देखोनियां वैराग्यभरित। त्याजवरी कृपा करिती समस्त। ह्मणती पांडुरंग अवतरला साक्षात। असे विरक्त संसारीं॥११॥ ऐसी प्रतिष्ठा होतांचि बहुत। निंदक चरफडती मनांत। अपमान व्हावयालागूनि त्वरित। उपाव करिती निजांगें ॥१२॥ जैसें वासरमणीस देखोनि नयनीं। खद्योत उगेचि जळती मनीं। कीं गंगेचा खळाळ ऐकूनी। रजकसौंदणी संतापे ॥ १३ ॥ कीं तुळसीवृक्ष पूजितां सांग। देखोनि संतापे जैसी भांग। नातरी कल्पतरूचा प्रताप अभंग। देखोनि सिंदीस कष्ट होती।१४।तेविं जगमित्राची ऐकतां स्तुती। निंदक उगेचि संतापती। ह्मणती याची होईल अपकीर्ती। ऐसा उपाय करावा ॥ १५ ॥ नानाकुतर्क करूनि अंतरीं। अपशब्द बोलती बहुतापरी। ऐकूनि तयाचे चित्तांतरीं। विकल्प तिळभरी नयेची ॥१६॥ एके दिवशीं कीर्तन करूनी। जगमित्रनागा निद्रित सदनीं। तंव दुर्जनीं अकस्मात येऊनी। खोपटासि अग्नी लाविला ।१७।मुलें लेंकरें अवघीं तेथ। निजलीं होतीं मंदिरांत। दृष्टीस देखोनि अपघात। मग पंढरीनाथ आठविला ॥१८॥ह्मणे धांव आतां रुक्मिणीकांता। दीनबंधु अनाथनाथा। तुजवांचोनि आह्मांसि रक्षिता। कोण असे ये समयीं।१९।ऐसी करुणा ऐकूनि श्रवणीं। सत्वर पावले चक्रपाणी। सुदर्शन हातीं घेऊनी। तयालागुनी रक्षिलें ॥२० ॥ तों बाहेर प्रदीप्त जाहला अग्नी। ग्रामवासी पाहाती नयनीं। भाविकभक्त जवळ येऊनी। शोक करिती आक्रोशें ॥२१॥ ह्मणती जगमित्र वैष्णवभक्त। कोणीं जाळिला अग्नींत। पावला नाहीं पंढरीनाथ। ऐसा आकांत देखोनी॥२२॥मग इंधन तितुकें जळोनि त्वरित। कृशानु तत्काळ जाहला शांत। तंव पूर्वदिशेस अकस्मात। भास्कर आला उदयासी ॥ २३ ॥ जगमित्र जळाला अग्नींत। नगरांत प्रकटली ऐशी मात। प्रातःकाळीं लोक समस्त। आले त्वरित पहावया ॥ २४ ॥ तों खोपट जळून वरच्यावरी। अग्नि विझाला ते अवसरीं। राख कोळसे तिळभरी। खालीं पडिले नसेची ॥ २५ ॥ आंत कुटुंबासहवर्तमान। करीत वे-

सला श्रीहरीचें भजन । हें कौतुक दृष्टीं देखून । आश्चर्य वाटलें सकळांसी ॥ २६॥ पांडव घातले लाक्षाजोहरीं । तयांसि रक्षिता जाहला हरी । तेविं जगमित्रास मुरारी । तैशाच परी पावला ॥२७॥ कीं प्रल्हाद टाकिला अग्नींत । तो न जळतां जैसा वाचलां तेथ । तेविं जगमित्रासी पंढरीनाथ । पावला कीं ये वेळीं ॥२८॥ कीं गाई गोपाळा भोंवता । वणवा लागला अवचितां । श्रीकृष्णें रक्षिलें निजभक्तां । तैसेंचि जाहलें ये काळीं ॥ २९ ॥ ऐसें बोलूनि परस्पर । जगमित्रासि घालिती नमस्कार । ह्मणती तूं ईश्वरी अवतार । कळलें साचार आह्मांसी ॥ ३० ॥ मग मिळोनि सकळ ग्रामवासी । विचार करिती एकांतासी । म्हणती इनाम जगमित्रासी । लिहून देऊं सकळिक ॥ ३१ ॥ त्याचाही चालेल योगक्षेम आपणासि घडेल महाधर्म । मग तुष्टोनियां पुरुषोत्तम । हरील भवभ्रम सकळांचा ॥ ३२ ॥ ऐसा विचार करूनियां । जगमित्रासि आले पुसावया । त्यानें उत्तर दिधलें तयां । बंधन कासया पाहिजे ॥३३॥ नगरांत करितां भिक्षाटन । तेणें होतसे कुटुंबरक्षण । तुह्मीं देतसां भूमिदान । मजकारणें नलगेची ॥ ३४ ॥ तृषा लागतां चातकांस । मेघ तत्काळ पावे त्यांस । तेविं अन्न आच्छादन हृषीकेश । आपुले दासांसी देतसे ॥ ३५ ॥ पक्षियां क्षुधा लागतां जाण । त्यांसि भलते ठायीं सांपडे कण । तेविं निजदासांचें रक्षण । तैशा रीतीं होतसे ॥ ३६ ॥ तो विश्वकुटुंबी जगज्जीवन । त्याच्या आश्रयें असतां जाण । तुमचें कासया भूमिदान । आह्मांकारणें पाहिजे ॥३७॥ नौका असतां बैसावयास । मग पोंहणाराची धरावी कां कास । सांडोनि भानूचा प्रकाश । कासया दीप उजळावे ॥३८॥ गृहीं कामधेनु असतां जाण । कासया करावें अजारक्षण । गंगेचें सन्निध असतां जीवन । कासया कूप खणावा ॥ ३९ ॥ तेविं भिक्षेचें सांडूनि अन्न पवित्र । तुमचें कासया पाहिजे क्षेत्र । ऐसें ऐकतां ग्रामस्थ सर्वत्र । तयाप्रती प्रार्थिती ॥४०॥ तुमचे नांवें देतों लिहूनी । मग निर्वाह करितील भलते कोणी । धान्य पिकेल जें मेदिनीं । तें धर्मकारणीं लागेल ॥ ४१ ॥ पत्रीं जगमित्राचें नाम । परळी वैजनाथग्राम । एक चाहूर यासि इनाम । ऐसें लिहून दीधलें ॥ ४२॥ मग अवघे कृषीवल मिळोनी । कष्ट करूनि पिकविती धरणी । धान्य होईल तें आणोनी । धर्माकारणें लाविती ॥४३॥ ऐसें असतां बहुत दिवस । तों विघ्न वोढवलें धर्मास । नूतन हवालदार ग्रामास । आला असे एके दिवशीं ॥ ४४॥ ग्रामवासी लोक समस्त । त्यासि भेटले येऊनि त्वरित । जगमित्राचा इनाम जप्त । केला असे तयानें ॥ ४५ ॥ लोक विनविती तयासी । आह्मीं स्वेच्छेनें दिधलें त्यासी । तूं कासया धर्मकार्यासी । आडवा होसी पापिष्टा ॥४६॥ऐसा उपदेश केला बहुत । परि कदा न द्रवे त्याचें चित्त । अविंधयाती अतिउन्मत्त । नायकेची कोणाचें ॥४७॥ मग जाऊनि त्याच्या गृहासी । ह्मणे तूं जगमित्र ह्मणविसी । तरी व्याघ्राचें दैवत आह्मांसी । दैवप्रतिष्ठेसी पाहिजे ॥४८ ॥ आज अस्तमानपर्यंत जाण । आणून देशील पंचानन । जगमित्र हें नामाभिधान । तरीच येईल प्रत्यया ॥ ४९ ॥ हें न होय जरी तुजकारण । तरी भक्षिला इनाम परत घेईन । ऐसें हरिभक्तासी तो वचन । दुराचारी बोलिला ॥५०॥ मग अवश्य ह्मणोनि तयाप्रती । अरण्यांत गेला सत्वरगतीं । ध्यानीं आणोनि रुक्मि-



णीपती । स्तवन प्रीतीं आरंभिलें ॥५१॥ ह्मणे जयजय अनाथबंधो करुणाकरा । भक्तवत्सला कृपासागरा । पतितपावना विश्वंभरा । दीनोद्धारा रामकृष्णा ॥ ५२ ॥ जय पंढरीशा रुक्मिणीपती । विश्वचालका चैतन्यमूर्ती । माझी करुणा ऐकोनि चित्तीं । धांव श्रीपती लवलाहें ॥५३॥ हवालदार माझा मित्र जाण । त्याचे कन्येचें आहे लग्न । व्याघ्राचें दैवत प्रतिष्ठेकारण । पाहिजे सत्य तयासी ॥५४॥ त्याच्या कार्यासि ये समयीं । देवाधिदेवा सत्वर येईं । नाहीं तरी तुझे पायीं । देह लवलाहीं ठेवीन ॥ ५५॥ ऐसी करुणा ऐकूनि कानीं । तत्काळ पावले चक्रपाणी । महाव्याघ्राचें रूप धरूनी । सत्वर आले तेधवां ॥ ५६ ॥ जगमित्रासी बोलती मात । कोणें गांजिलें तुजला सत्य । तो दाखवी मजला त्वरित । भक्षीन निश्चित तयासी ॥५७ ॥ ऐकोनि ह्मणे निजभक्त । हवालदार माझा परममित्र । लग्नकार्यालागोनि त्वरित । तुह्मालागीं पाचारिलें ॥५८॥ तरी शांती धरूनि केशवराजा । सत्वर चलावें त्याचे काजा । तूं जिवलग प्राण माझा । आणिक दुजा नसे कीं ॥५९ ॥ ऐकोनि ह्मणे चक्रपाणी । मजला धरूनि चाल सदनीं । ग्रामांत जाऊन तुजलागोनी । कौतुक नयनीं दावीन ॥६०॥ मग अंगवस्त्र गळां घालून । कंठीं धरिला पंचानन । ग्रामाकडे परतोन । येते जाहले तेधवां ॥६१॥ गोरक्षकीं देखोनि दृष्टीं । गांवांत चालिले उठाउठी । पळतां धीर न धरवे पोटीं । शब्दगोष्टी न बोलवे ॥ ६२ ॥ नगरासि येऊन सत्वरगतीं । लोकांस वृत्तांत सांगती । ह्मणती जगमित्र व्याघ्र धरून हातीं । सदनाप्रती येतसे॥६३॥ऐसें ऐकोनियां वचन । आश्चर्य करिती सकळजन । ह्मणती व्याघ्र आणिला कोठून । मिथ्या वचन बोलतसां ॥६४ ॥ एक ह्मणती नवल काय । तयासि ईश्वर असे साह्य । गृहासि अग्न लागतां पाह्य । वांचला कैसा ते वेळीं ॥ ६५॥ ऐसें लोक परस्परें बोलत । तंव आणिकही आली दुसरी मात । ह्मणती महाव्याघ्र घेऊनि त्वरित । जगमित्र ग्रामा येतसे ॥६६ ॥ भयभीत सकळ नारीनर । मग आड केलें ग्रामद्वार । दुर्गावरून सत्वर । लोक पाहती तेधवां ॥ ६७ ॥ तंव व्याघ्र देखोनि सत्वरीं । भयभीत जाहल्या नरनारी । कपाटें लाऊन सदनांतरीं । लपोनि बैसती व्याघ्रभयें ॥ ६८ ॥ एक उपरीवरी जाऊनी । दुरून व्याघ्र देखती नयनीं । ह्मणती जगमित्रासि भय मनीं । कैसें न वाटे सर्वथा ॥ ६९ ॥ ऐसें उत्तर ऐकोनि कानीं । सज्ञान ह्मणती त्यांलागोनी । अजून उमज तुह्मांलागुनी । कैसा न पडे कळेना ॥ ७० ॥ आपणास व्याघ्र दिसतो नयनीं । परि तो असेल चक्रपाणी । निजभक्त संकट ऐकूनि कानीं । आला धांवोनी सत्वर ॥ ७१ ॥ एक ह्मणती असत्य मात । तो व्याघ्रचि दिसतो यथार्थ । हवालदारासि भक्षावया त्वरित । आला निश्चित धांवोनी ॥ ७२ ॥ एक ह्मणती तैसें न होय । तो आह्मां सकळांचा करील क्षय । हवालदारें करूनियां अन्याय । आणिला काळ सकळांसी ॥ ७३ ॥ मग बोलावूनि तया दुर्जनासी । ग्रामवासी ह्मणती त्यासी । त्वां छळूनि जगमित्रासी । प्रळय गांवासी मांडिला ॥ ७४ ॥ रेणुकेसि गांजितां सहस्रार्जुन । सकळ क्षत्रियांसि वोढवलें विघ्न । तेविं तुमचे संगतीकरून । आह्मांसि मरण पातलें ॥७५ ॥ कीं रावणें करितां सीताहरण । सकळ राक्षसां आलें मरण । तेविं त्वां गांजितां वैष्णवजन । आकांत ग्रामांत वोढवला ॥ ७६ ॥ दुर्यो-

धनें छळितां द्रौपदीसती । सकळ राजे क्षय पावती । आह्मांसि जाहली तैसी गती । तुझे संगतीं लागतां ॥ ७७ ॥ नातरी मोहाळिच्या संगतीनें । वृक्षासि लागला कृशान । तेविं दुर्जना तुझ्या योगेंकरून । वोढवलें विघ्न सकळांसी ॥ ७८ ॥ ऐकूनि सकळांचि मात । दुर्जन जाहला भयभीत । मुलें लेंकुरें घेऊनी समस्त । लपोनि खोपटांत बैसला ॥ ७९ ॥ जैसा वृश्चिक अन्याय करूनी । ढेकुळाआड बैसे लपोनी । तैसाचि तो पापखाणी । भयभीत मनीं जाहला ॥ ८० ॥ तंव जगमित्र घेऊन व्याघ्रासी । सत्वर पातला ग्रामापाशीं । तों आड केल्या देखोनि वेशी । संकट तयासी पडियेलें ॥ ८१ ॥ व्याघ्रासि ह्मणे ते अवसरीं । कैसें जावें नगरांतरीं । ऐसें ऐकोनि भक्तकैवारी । आश्चर्य करी तेधवां ॥ ८२ ॥ एक हांक मारितां गडगडोन । ग्रामद्वार पडिलें जाण । आंत प्रवेशती दोघेजण । नरनारी दुरून पाहाती ॥ ८३ ॥ एक दीर्घस्वरें रुदन करिती । एक शंखध्वनी करून गर्जती । ह्मणती क्षोभला कैलासपती । लागतां संगती दुर्जनाचे ॥ ८४ ॥ ऐसा देखोनि आकांत । जगमित्र लोकांसि अभय देत । तुह्मी स्वस्थ करूनि चित्त । पाहा कौतुक निजनयनीं ॥ ८५ ॥ ज्याचें कर्म तोचि भोगिता । आपण कासया करावी चिंता । मनीं करून निर्भयता । रुक्मिणीकांता भजा कीं ॥ ८६ ॥ ऐसें वचन ऐकोनि जाणा । संतोष वाटला सकळजना । ह्मणती हवालदाराच्या घ्यावया प्राणा । पंचानना आणिलें ॥ ८७ ॥ जगमित्र आणि व्याघ्र सत्वरीं । पातले हवालदाराचे घरीं । हें देखोनि दुराचारी । थरथरां कांपे तेधवां ॥ ८८ ॥ महाव्याघ्र देखोनि दृष्टीं । खोपटासि लाविती मग ताटी । कांता लेंकुरें घेऊन पाठीं । वागवी मानसीं भयचिंता ॥ ८९ ॥ मग जगमित्र ह्मणे ते अवसरीं । दैवत घेऊनि आलों सत्वरीं । तुह्मी कां लपतां सदनांतरीं । सांगा लवकरी मजपाशीं ॥ ९० ॥ साक्षात दैवत देखोनि दृष्टीं । भ्रांतीची लाविली आड ताटी । पुढें उपाय तुमचे दृष्टीं । कैसा दिसतो मज सांगा ॥ ९१ ॥ नाना तीर्थें व्रतें तपें अवघड । करितांही देव दृष्टीआड । तो साक्षात देखोनि तुह्मी मूढ । कपाटें आड लावितां ॥ ९२ ॥ अष्टांगयोग साधितां जाण । प्राप्त नव्हेचि ज्याचे चरण । तें दैवत दृष्टीस देखोन । तुह्मी कां लपून बैसलां ॥ ९३ ॥ नानायोगयाग करितां ऋषी । लवकरी प्राप्त नव्हे तयांसी । तें दैवत आलिया गृहासी । भय कां तुह्मांसी वाटतें ॥ ९४ ॥ जे चंद्राहूनि शीतळ बहुत । जें अमृतासीही जीवावित । तें दृष्टीस देखोनि दैवत । भयभीत मनीं कां होतां ॥ ९५ ॥ तों व्याघ्र गर्जोनि ते अवसरीं । पुच्छ आपटी धरणीवरी । दुर्जन ऐकतांचि अंतरीं । भयभीत होतसे ॥ ९६ ॥ बळें उसळोनि वेगेंसी । भक्षूं पाहे निंदकासी । जगमित्र धरी तयासी । जेविं दरवेसी वानरा ॥ ९७ ॥ तैशाच रीतीं जगज्जीवन । जाहला असे भक्ताधीन । नाठवूनि आपलें देवपण । लीला दावी जनांत ॥ ९८ ॥ मारुती उसळोनि उड्डाळ घेत । ह्मणे दुर्जनासि भक्षूं दे त्वरित । हवालदार रडे सदनांत । लेंकुरांसमवेत ते समयीं ॥ ९९ ॥ कांता ह्मणे तयाप्रती । तूं बाहेर जाईं सत्वरगतीं । मुलें लेंकुरें तुजसंगतीं । मृत्यु पावतील दिसताहे ॥ १०० ॥ तुझें सहज ह्मातारपण । असे अखेर एकदां जाणें । तरी आतां सत्वर बाहेर होऊन । वांचों दे प्राण आमुचे ॥ १ ॥ ऐसा संवाद पडतां कानीं । सकळ आश्चर्य करिती मनीं । परस्परें टाळिया पिटोनी ।

हांसों लागले तेधवां ॥ २ ॥ मन जोडोनियां दोनी कर । करुणा भाकीत हवालदार । आतां कृपा करूनि मजवर । वांचवी सत्वर दयाळा ॥ ३ ॥ म्यां जे दुष्टबुद्धी धरिली । ते मज तत्काळ फळा आली । अपकीर्ति जगांत पसरली । ते वर्णिली नवजाय ॥ ४ ॥ तूं जगमित्र ह्मणविसी आपणा । तें सत्य कळलें माझिया मना । ह्मणोनि दीनपणें भाकितों करुणा । दे जीवदाना आह्मांसी ॥ ५ ॥ ऐसी ग्लानी ऐकूनि कानीं । जगमित्र चालिला परतोनी । व्याघ्रासी सवें घेऊनी । गेला काननीं सत्वर ॥ ६ ॥ मग एकांतीं जाऊन जगज्जीवन । धरिलें चतुर्भुजरूप सगुण । जगमित्रासि आलिंगन । निजप्रीतीनें दीधलें ॥ ७ ॥ पुढिले अध्यायीं अद्भुतरस । श्रोतीं स्वस्थ करावें मानस । जैसा कृपण मोजी धनास । होय तल्लीन निजचित्तीं ॥ ८ ॥ तैशा रीतीं अवधान । देऊनि करा ग्रंथश्रवण । भीमातीरवासी रुक्मिणीरमण । तुष्टेल तेणें तुह्मांवरी ॥ ९ ॥ तो पुराणपुरुष जगज्जीवन । वदविता ग्रंथनिरूपण । महीपती त्यास अनन्य शरण । वंदी चरण निजप्रीतीं ॥ ११० ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । एकोनविंशाध्याय रसाळ हा ॥ १११ ॥ अध्याय १९ ॥ ओंव्या १११ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय १९ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः। श्रीगोपालकृष्णाय नमः। निजभक्तकथा ऐकतां सुरस। सर्व सुखें अनायासें वोळंगती त्यास। श्रोत-
यांसि तुष्टोनि जगन्निवास। सायुज्यपदासी पाववी ॥ १ ॥ शांति क्षमा येऊन पाहीं। अखंड वसती त्याचे हृदयीं। आ-
णिक शुद्धसत्वगुण तोही। येत लवलाहीं निजप्रीतीं ॥ २ ॥ काम क्रोध पळती देहांतून। सकळ दुरितांचें होय दहन। न
धरूनि लज्जाभिमान। वर्णितां गुण हरिकीर्तनीं ॥ ३ ॥ ऋद्धि सिद्धि इंद्रपदासी। प्रारब्धें येतां न गणीच त्यासी। हें सा-
त्विक वैराग्य मानसीं। येईल तयासी अनायासें ॥ ४ ॥ ऐसा अंतरीं देखोनि नेम। मग प्रसन्न होईल पुरुषोत्तम। आपले
भजनीं देऊनि प्रेम। हरील भवभ्रम तत्काळीं ॥ ५ ॥ ऐसी भक्तकथेची गोडी थोरी। पार्वतीस सांगे त्रिपुरारी। ह्मणोनि
अवधान भक्तचतुरीं। यावें निर्धारीं निजनिष्ठें ॥ ६ ॥ जोगा परमानंदभक्त। बारसी ग्रामांत होता राहात। अखंड उदास
आणि विरक्त। वैराग्यभरित सर्वदा ॥ ७ ॥ रामकृष्ण नारायण। हेंच सर्वदा करित भजन। गांवांत करूनि भिक्षाटन।
कुटुंबरक्षण करितसे ॥ ८ ॥ अखंड वृत्तीस समाधान। नेणेंच कांहीं मानापमान। तोडोनि आशापाशबंधन। करी भ-
जन श्रीहरीचें ॥ ९ ॥ स्नान करूनी सत्वर। पूजा करीत षोडशोपचार। सात शतें नमस्कार। देवासि नित्य घालीतसे १०
गीतेचा श्लोक एक ह्मणून। मग करीतसे साष्टांगनमन। ऐशा रीतीं नित्यनेम सारून। मग भोजन करीतसे ॥ ११ ॥
कांहीं तरी नित्यनेम। केल्यावांचून भक्षील अन्न। तरी तो मनुष्य सूकरासमान। बोलिलें वचन धर्मशास्त्रीं ॥ १२ ॥ पशु
पक्षी हिंडतां जाण। त्यांसि कदा न घडे पापपुण्य। कीटक मुंगी श्वापदांकारण। शास्त्राचरण नसे कीं ॥ १३ ॥ अवचित
नरदेह लाधला पाहीं। त्याचें सार्थक करावें कांहीं। सत्समागमाविण नरदेहीं। ज्ञान नव्हेची सर्वथा ॥ १४ ॥ ह्मणाल सं-
सारधंदा करितां देख। नेमासि कैंची आराणुक। येचविषयीं सोडवणुक। असे एक ते ऐका ॥ १५ ॥ तीर्थें व्रतें तपें दानें।
अनुष्ठानें देहदंडणें। या सर्वांवरिष्ठ एक साधन करणें। श्रीहरीभजन करावें ॥ १६ ॥ नामस्मरणाविण विशेष कांहीं। क-
लियुगीं साधन बोलिलें नाहीं। जैसें मृत्युकाळाचे समयीं। अमृत जीववी सकळांसी ॥ १७ ॥ तरी संसारधंदा करितां
जाण। जो अखंड करील हरिचिंतन। त्याजपाशीं जगज्जीवन। बैसे येऊन निजप्रीतीं ॥ १८ ॥ असो बहु बोलुनि काय
व्युत्पत्ती। नाममहिमा सर्वज्ञ जाणती। अनुभवावांचूनि सांगतां युक्ती। न लागे चित्तीं सर्वथा ॥ १९ ॥ ऐसा हरिभज-
नाचा छंद। घेतसे जोगा परमानंद। हृदयीं चिंतून गोविंद। स्वानंदभरित सर्वदा ॥ २० ॥ तंव कोणे एके अवसरीं। व्य-
वसायी उतरले महाद्वारीं। मेघ वर्षला धरणीवरी। कर्दम बहुत जाहलासे ॥ २१ ॥ त्या चिखलांत परमानंद जोगा।
नमस्कार घाली पांडुरंगा। हृदयीं चिंतोनि रुक्मिणीरंगा। भक्तभवभंगा निजप्रीतीं ॥ २२ ॥ ऐसी निष्ठा देखोनि तेथ।
व्यवसायाचें द्रवलें चित्त। ह्मणे धन्य हा वैष्णवभक्त। वैराग्यविरक्त दिसतो कीं ॥ २३ ॥ मग दुकानांतून पीतांबर। एक
काढिला सत्वर। जोगयासि देऊनि सत्वर। केला नमस्कार निजप्रीतीं ॥ २४ ॥ ह्मणे स्वामी कृपानिधी। एवढें वस्त्र नेसावें
आधीं। मी शरणागत मंदबुद्धी। ऐसी ग्लानी करीतसे ॥ २५ ॥ जोगा बोले प्रतिउत्तर। आह्मासि कासया पीतांबर।

जीर्ण वस्त्र असेल जर । तरी द्यावें सत्वर मजलागीं ॥ २६ ॥ जीर्ण वस्त्र परिधान करून । भिक्षा मागूनि आणावें अन्न ।
तेणेंकरून निर्विघ्न । योग चाले आमुचा ॥ २७ ॥ मजलागीं आणिला पीतांबर । तो देवासि नेसवावा साचार । तेणें तु-
ह्मासि रुक्मिणीवर । कृपा अपार करील कीं ॥२८॥ ऐसें शिकविलें त्याकारण। परी तो नायकेचि अज्ञान । कोणा योग्य
काय दान । तें त्याजलागीं कळेना॥२९॥पक्षिया टाकावे उदक कण । पशूंस घालावें धर्मार्थ तृण। सत्पात्र पाहूनि द्रव्य-
दान । करिती सज्ञान अखंड।३०।वृक्षाचे मूळीं जीवन घालितां । संतोष होय त्याचिया चित्ता । आणि अन्नवस्त्र अया-
चिता । नेऊन द्यावें एकांतीं ॥ ३१ ॥ ऐसें न कळेचि व्यवसायासी । बळेंच पीतांबर नेसाविला त्यासी । आपण दुसऱ्या बा-
जारासी । गेला सत्वर तेधवां ॥ ३२ ॥ दिव्यवस्त्र करूनि परिधान । ओंचे खोंविले जोगियानें । कर्दमें वस्त्र भरेल ह्मणून ।
घाली जपून दंडवत॥३३॥मागें निर्भय टाकूनि अंग । नमस्कार घाली साष्टांग । ते अवघी निष्ठा सांडिली मग । अंतरला
योग वस्त्रलोभें।३४।दोनप्रहर तापला दिन । क्षुधेनें जाहला व्याकुळ प्राण।ह्मणूनि नमस्कार संपूर्ण ।जाहले नाहींत ते दि-
वशीं।३५। स्वेदपाझर देखोनि दृष्टीं । बहुत जाहलासे हिंपुटी।ह्मणे आजि नमस्कार घालितां कष्टी।किमर्थ होतों कळेना
३६मग विवेकें शोधोनि अंतर । ह्मणे वैरी दिसतो कीं पीतांबर। यासि पाहातां साचार।पडलें अंतर सेवेसी ३७ कीं पौर्णि-
मेचा निशापती।राहूनें गिळिला जैशा रीतीं । तेविं पीतांबरें मजप्रती।पडली भ्रांती दिसताहे३८कीं पात्रीं वाढिलें पक्का-
न्न । त्यासि अवचितां स्पर्शलें श्वान । तेविं हरिभक्तीसि महाविघ्न । पीतांबरपरिधानें केलें कीं ॥३९॥ नातरी गंगातीरीं
अश्वत्थ लाविला । त्यावरी आला वायूचा घाला । तैशापरी पीतांबर मजला । वैरी जोडला दिसे कीं ॥ ४० ॥ कीं कृ-
षीवलानें क्षेत्र पिकविलें । त्यावरी अकस्मात टोळ पडले । तेविं पीतांबरें विघ्न केलें । सुकृतासी पैं माझ्या ॥ ४१ ॥ कीं
संन्यासी करितां अनुष्ठान । त्यासि अवचित आलें राजान्न । तेविं माझे भक्तीलागून । पीतांबर शत्रू जाहला कीं॥४२॥
कैसा घडला हा अन्याय । आतां देहदंडन करावें काय । अरण्यांत जाऊन लवलाह्य । पंचाग्निसाधन करावें ॥ ४३ ॥
अथवा सेऊं गोरांजन । कीं पर्वतीं बैसावें जाऊन । किंवा अष्टांगयोगसाधन । आतां जाऊन करावें॥४४॥ नातरी जा-
ऊनि त्रिवेणीप्रती । देह घालावा करवतीं । तेणें तरी रुक्मिणीपती । भेटेल मजप्रती येऊनियां ॥ ४५ ॥ कीं करतलभिक्षा
मागून । करावें सकळ तीर्थाटन । तेणें तरी जगज्जीवन । कृपा करील मजवरी ॥ ४६ ॥ कीं हिमाचळासि जाऊन त्वरि-
त । तेथेंच वेंचावें आपुलें जीवित । तेणें तरी पंढरीनाथ । भेटेल निश्चित मजलागीं ॥ ४७ ॥ कीं अन्नोदक टाकूनी । उ-
पोषण करीत बैसावें आसनीं ।तेणें पुण्यें तरी चक्रपाणी । भेटेल येऊनि तत्काळ ॥४८ ॥ किंवा अग्निकाष्टें भक्षोनि त्व-
रित । घ्यावें देहांत प्रायश्चित्त । तेणें योगें तरी पंढरीनाथ । कृपावंत होईल कीं॥४९॥ऐसा अनुताप धरूनि चित्तीं । वि-
चार करी पुनः मागुतीं । देऊळाबाहेर सत्वरगतीं । येऊनियां बैसला ॥ ५० ॥ तों अपट वृषभ दोघेजण । कृषीवळ जा-
तसे घेऊन । त्यांचे गळां लोढणें बांधून । जातसे घेऊन वनांत ॥५१॥ जोग्यानें देखोनि ते वेळीं । तयासि पाचारिलें ज-

वळी । अनुतापें करूनि नेत्रकमळीं । अश्रुपात वाहती ॥ ५२ ॥ मग कुणबियासि काय बोलत बोल । ह्मणे आह्मासि दे-
ई दोनी बैल । दिव्यपीतांबर याचें मोल । देतों तत्काळ तुजलागीं॥५३॥कृषीवलानें अंतरीं विचारिलें । तों द्विगुण मो-
ल येतां देखिलें । अवश्य ह्मणोनि ते वेळे । बैल दिधले तयासी ।५४। जोग्यानें निश्चय करून।तयासि बोलिला नम्रवच-
न । ह्मणे धराटें घेऊन माझे चरण । शिवळट्यांसी बांधावे ॥ ५५ ॥ आणि सक्रोध होऊनि चित्तीं । आसुड मारी वृष-
भांप्रती । मग तूं जायी सदनाप्रती । न धरीं चित्तीं भय कांहीं ॥ ५६ ॥ अवश्य ह्मणोनि अविवेकी । शिवळट्यांस चरण
बांधिले शेखीं । आसुड मारितां एकाएकीं । बैल पळती अरण्यांत ॥ ५७ ॥ कंकर सरांटे पाषाण । शरीरा लागती अति
कठिण । तेणें सकळ त्वचा झडोन । गेली असे तयाची ॥५८॥ बैल बुझोनि जाती त्वरेनें । जेविं हरण पळे पारधिया दे-
खोन । तैशाच परी महाआरण्य । हिंडते जाहले तेधवां॥५९॥जोगा अनुताप धरूनि मनीं। देहदुःखासि कांहीं न गणी ।
ह्मणे ऐसेंचि दंडन मजलागूनी । आज अन्याय योग्य असे।६०। ऐसें समाधान मनीं मानून । सुखीं करित नामस्मरण ।
श्रीरामकृष्ण नारायण । पतितपावन करुणाब्धी ॥६१॥ जय रुक्मिणीमानसरंजना । पयोब्धिवासा शेषशयना । भक्त-
कैवारिया गुणनिधाना । जगज्जीवना पांडुरंगा ॥६२॥ ऐशा रीतीं स्मरण करित । कंठ जाहला सद्गदित । वृषभ पळती
अरण्यांत । त्यांमागें वोढत जातसे।६३।त्वचा गेली सर्व झडोन।आस्थि शरीरीं राहिल्या जाण। निमेषमात्रें जाईल प्रा-
ण । एवढें निर्वाण मांडिलें।६४।ऐशा समयीं आनंदयुक्त। जोगा सप्रेम भजन करित।करुणा ऐकोनि पंढरीनाथ । आले
त्वरित धांवूनी।६५।गजेंद्राची करुणा देखोनी । सत्वर पावले चक्रपाणी । कीं द्रौपदी गांजितां दुःशासनीं । आले धां-
वूनी ज्या रीतीं ।६६।तेविं जोग्याचें निर्वाण देखोनी । सत्वर धांवले चक्रपाणी । वृषभांच्या शिवळा काढोनी । दिधले
सोडूनी तत्काळ·६७ मग आपुले हस्तें सोडूनि चरण । तयासि दिधलें आलिंगन । कृपादृष्टीं पाहतांचि जाण । दिव्य-
शरीर जाहलें पैं६८ दिनकराचा उदय होतां । अंधकार न दिसेची सर्वथा।तेविं जगन्नाथ कृपा करितां । देहदुःखचिंता
निरसली६९जोग्यासि ह्मणे रुक्मिणीरमण।एवढें कां मांडिलें निर्वाण।कांहींच नसतां अन्याय जाण।केलें दंडन देहा-
सी ७० तुह्मी करितां अन्नपान । तें माझे मुखीं पडतें जाण।सहज करितसां गमनागमन।तेच प्रदक्षिणा आमुची७१ना-
तरी कोणासि बोलाल वचन।तेंचि माझें होतसे स्तवन।कीं सुखसंतोषें करितां शयन।तें साष्टांग नमन मज पावे७२ऐसें
असतां निजभक्तराया । एवढें निर्वाण केलें कासया । येरें मस्तक ठेऊनि पायां।ह्मणे करावी छाया कृपेची७३एके दि-
वशीं पंढरींत।देवें मिळवून निजभक्त ।जोग्याचा सकळ वृत्तांत।तयांजवळी सांगीतला७४साकल्य सांगतां वैकुंठनाथें।
आश्चर्य वाटलें सकळांतें । ज्ञानदेव ह्मणे हृषीकेशातें । तुझे लीलेसी अंत नाहीं ॥७५॥ एकाहूनि एक आगळे । निजभक्त
आपुल्यासि निर्माण केले । त्यांच्या प्रेमसुखाचे सोहळे । जाणसी घननीळ तूंचि एक ॥७६॥ आतां परिसा श्रोते चतुर ।
निजभक्त नरहरी सोनार । तेणें आराधूनि श्रीशंकर । प्रसन्न केला निजनिष्ठें ॥ ७७ ॥ प्रातःकाळीं उठोनि जाण । भीमर-

थीचें करी स्नान। त्यावरी मल्लिकार्जुनाचें पूजन। निजप्रीतीनें करितसे॥७८॥पंढरी क्षेत्रीं असोनि वास। न जाय विठ्ठ-
लाचे देउळास। एकेचि ठायीं धरून विश्वास। भजन उल्हासें करितसे॥७९॥ जेविं मेघ न दिसतां नयनीं। चातक न घे-
ती भूमीचें पाणी। तैसाच नरहरी शिवावांचूनी। दैवत कोणी न पूजी ॥ ८० ॥ कीं उदंड नक्षत्रें पाहतां दृष्टीं। कमळिणी
कदा न विकासती। जेव्हां दृष्टीस पडेल गभस्ती । संतुष्ट होती तेव्हांचि ॥८१॥ मातरी तान्हयास सातेवांचुनी। आ-
णिक नावडती सुंदर कामिनी। कीं पतिव्रतेसि दैवत कोणी। पतीवांचून पूज्य नाहीं ॥ ८२ ॥ तैसा कायावाचामनें क-
रून। नरहरी पूजित मल्लिकार्जुन। श्रीपांडुरंगाचें शिखर दुरून। दृष्टीं कदा न पाहे ॥ ८३ ॥ गणेशचतुर्थीचा निशाकर।
दृष्टीं न पाहती नारीनर। तैसाच नरहरी सोनार। न पाहे शिखर विठ्ठलाचें ॥ ८४ ॥ तंव एक्या सावकारें येऊनी। नवस
चिंतिला आपुले मनीं। मज पुत्र होईल सुलक्षणी। तरी देवासि कटिसूत्र वाहीन॥८५॥ तंव नवसासि पावला रुक्मिणी-
पती। त्यावरी यात्रेसि आला पुढती। देवदर्शन घेऊनि प्रीतीं। पुजाऱ्यासी पुसतसे ॥ ८६ ॥ जांबूनदाचें करूनि कोंदण।
त्यांत बैसविणार हिरे रत्न। ऐसा सोनार चतुर कोण। कटिसूत्र घडोन देईल ॥८७॥ पूजारी ह्मणती ते अवसरीं। तैसा च-
तुर एक नरहरी। त्यापाशीं जाऊन सत्वरीं। पुसा लवकरी ये समयीं॥८८॥मग हिरे रत्नें स्वर्ण घेऊनी। त्याजपाशीं दिध-
लें नेऊनी। नरहरी ह्मणे मोज आणुनी। यावें सत्वर मजपाशीं ॥ ८९ ॥ अधिक उणें होईल जरी। तरी शब्द न ठेवावा म-
जवरी। सावकार ऐकोनि अंतरीं। आश्चर्य मनीं करितसे ॥ ९० ॥ ह्मणे सन्निध देव असोन। यासि नावडे तयाचें दर्शन।
असो आपणासि काय प्रयोजन। मग मोज आणोन दीधलें ॥ ९१ ॥ नरहरीनें चातुर्येंकरूनी। हिरे रत्नें बैसविलीं कोंद-
णीं। कटिसूत्रातें सिद्ध करूनी। दिधलें नेऊनी त्यापाशीं ॥९२॥ मग अभिषेक करून गरुडध्वजा। षोडशोपचारें केली
पूजा। कटिसूत्र घालून पाहाती माजा। तंव तें न पुरेची सर्वथा ॥९३॥ नरहरीजवळ आणितां मागुती। त्याणें वाढवि-
लें करून युक्ती। देवाजवळ आणिलें पुढती। तंव ते अधिक दिसताहे ॥९४॥ अधिक करितां होय फार। प्रमाण करितां
माजा नपुरे। सावकार जाहला चिंतातुर। ह्मणे रुक्मिणीवर कां क्षोभला ॥९५॥ माझा शुद्धभाव नाहीं चित्तीं। कटि-
सूत्र न घेच श्रीपती। नरहरीपाशीं येऊन मागुती। काकुळती येतसे ॥९६॥ ह्मणे त्वां राउळासि येऊनी। दृष्टीं पाहावा
चक्रपाणी। कटिसूत्र आपुले हातें घालोनी। येई परतोनी मागुता ॥ ९७ ॥ तो ह्मणे आहें व्रतस्थ। गेलों नाहीं अद्यापि
तेथ। एक शंकरावांचूनि दैवत। नाहीं पाहत दृष्टीसी ॥ ९८ ॥ मग वस्त्र गुंडाळोनि नेत्रासी। नरहरी चालिला देउळा-
सी। देखोनि हांसती क्षेत्रवासी। आश्चर्य तयांसी वाटलें ॥ ९९ ॥ ह्मणती निधान दृष्टीं देखोन। दरिद्री जैसा झांकी नय-
न। तैसेंच नरहरीचें ज्ञान। आलें कळोन आह्मांसी॥१००॥कीं घरीं ठेऊनिया चिंतामणी। वायांचि हिंडावें तीर्थाटनीं।
तेविं घ्यावयासि देवदर्शन। नेत्र झांकून जातसे ॥ १ ॥ एक ह्मणती ज्वरितासी। पक्वान्न जैसें नावडे निश्चयेंसी। तेविं
नरहरीच्या ध्यानासी। वैकुंठवासी नये कीं ॥ २ ॥ एक ह्मणती ज्याचा तोचि जाणे। आपुल्यास काय प्रयोजन। ऐसे



नानापरीचे त्रिविधजन। परस्परें बोलती ॥३॥ असो यापरी सोनार नरहरी। सत्वर आला महाद्वारीं। सावकारें धरू-
नियां करीं। राउळांतरीं पैं नेला ॥ ४ ॥ एक हांसोनि बोलती वचन। देवासि साष्टांग घालीं नमन। एक ह्मणती तो न
घेचि दर्शन। कैसा चरण वंदील ॥ ५ ॥ आलियासि न घाली बैसणें। तो काय घालील मिष्टान्नभोजन। कीं प्रयोगा
नायकेचि करितां स्नान। तो दक्षिणादान करील काय ॥ ६ ॥ जो तुळसीस न घाली जीवना। तो काय करील प्रदक्षि-
णा। सज्जन देखोनि न करी नमना। तो सदना घेऊन न जाय ॥ ७ ॥ जो वाट सांगेना पथिकासी। तो मंदिरीं ठाव ने-
दीच त्यासी। जो स्वमुखें निंदी देवभक्तांसी। तो हरिकीर्तनासी न जाय ॥ ८ ॥ कर्णीं नायके गंगामाहात्म्य जाण।
तो कैसा करील सचैलस्नान। तेविं नरहरी न घेच देवदर्शन। तो कैसा नमस्कार घालील ॥ ९ ॥ असो यापरी
बोलती नरनारी। मग देऊळीं प्रवेशला नरहरी। हातें चांचपोनियां ते अवसरीं। देवास सत्वरीं पाहातसे ॥ ११० ॥ तंव
दशभुजा पंचवदन। गळां पन्नगांचें भूषण। मस्तकीं जटा शोभायमान। विभूतिचर्चन सर्वांगीं ॥ ११ ॥ गजचर्म व्या-
घ्रांबर। नीलकंठ मृडानीवर। तोच साक्षात विटेवर। उभा राहिला तया वाटे।१२। ह्मणे हें माझेंच आराध्य दैवत। आ-
णि म्यां नेत्र कां झांकिले व्यर्थ। ऐसा अनुताप धरूनि चित्तांत। सोडोनि पाहात निजदृष्टीं॥१३॥ तों विटेवरी उभा घ-
ननीळ। मस्तकीं मुकुट अति सोज्वळ। श्रीमुख साजिरें अति निर्मळ। कंठीं कौस्तुभ वैजयंती ॥ १४ ॥ आणि दिव्य कुं-
डलें मकराकार। हृदय विशाळ माज चिवळ। जघनीं ठेऊनि दोनी कर सोज्वळ। कांसे पीतांबर वेष्टिला ॥१५॥ सम-
चरण देखोनि दृष्टीं। नरहरी विस्मित झाला पोटीं। मागुतीं झांकोनि पाहतां दृष्टीं। तों हातासि धूर्जटी लागला ॥१६॥
सवेंच उघडिलीं नेत्रपातीं। तों दृष्टीस देखिला रुक्मिणीपती। मग अनुताप धरूनियां चित्तीं। नमस्कार प्रीतीं घातला
॥ १७ ॥ ह्मणे जयजय देवाधिदेवा। सकळ विश्वाच्या निजजीवा। जयजयाजी सदाशिवा। शरण केशवा तुज आलों
॥ १८ ॥ जयजयाजी कैलासवासा। जयजयाजी वैकुंठाधीशा। जयजयाजी भक्तपरेशा। अद्वैतवेशा जगद्गुरो ॥ १९ ॥
जय क्षीरसागरविलासिया। जय नीलकंठ श्मशानवासिया। जय भक्तवत्सला पंढरीराया। निरसीं माया भक्तांची
॥ १२० ॥ तुझा नेणोनि भक्तिमहिमा। म्यां धरिलें होतें द्वैतनामा। ते कल्पना निरसोनि मेघःश्यामा। अद्वैतप्रेमा वाढ-
विला।२१। ऐसी स्तुति ऐकोनि कानीं। नरहरीसि ह्मणे चक्रपाणी। तूं निजभक्त आवडसी मजलागूनी। उपाय ह्मणो-
नि रचियेला ॥ २२ ॥ आतां मज आणि सदाशिवासी। द्वैतभेद न धरीं मानसीं। ऐसें ह्मणतां हृषीकेशी। येरू चरणासी
लागला ॥२३॥ तैंपासोनि पांडुरंगें। मस्तकीं धरिलें असे लिंग। आपल्या दासांचा श्रीरंग। न करी मनोभंग सर्वथा २४
नरहरीचें चरित्र ऐकोनि कानीं। श्रोतयांनीं आशंका धरिली मनीं। म्हणती नामयाच्या समाराधनीं। संत भोजनीं बो-
लाविले ॥२५॥ तयांमाजी सोनार नरहरी। ऐकिला होता श्रवणद्वारीं। तरी तो शंकरें आपुले बरोबरी। आणिला होता
ते समयीं ॥२६॥ सवें घेऊनि पुत्रासी। पिता जाय जैसा भोजनासी। तैसें शंकरेंही निजभक्तासी। आणिलें होतें समागमें

धिती केशा रीतीं। जो कोणासि अत्यंत न लावी प्रीती।त्यासि वियोगखंती न बाधे॥७९॥नातरी द्रव्यलोभ सर्व त्यागिला। तरी तस्करभय न लागेचि त्याला। कीं सन्मानचि जेणें अव्हेरिला। त्यासि अपमान कासया होईल ॥ ८० ॥ जो आत्मस्तुति ऐकोनि न मानी सुख। त्यासि लोकनिंदेचें कायसें दुःख । जो लाभमात्रीं न मानी हरिख। त्यासि अलाभें उद्वेग नये कीं ॥ ८१ ॥ जो सुंदर तारुण्य देखोनी ।आपुले जीवीं श्लाघ्यता न मानी। त्यासि वृद्धपणाची जाचणी । कैशापरी होईल ॥८२॥ ऐसिया परी द्विजवरा। आह्मीं पापपुण्याचा मोडिला थारा। आतां दुरिताकरितां अघोरा। जाणें न लगेची सर्वथा ॥ ८३ ॥ वचनें ऐकूनियां ऐसीं। विप्र बोलत नामयासी। भूतदया नसतां मानसीं। ज्ञान सांगसीं बहुसाल ॥८४॥मी अन्नाविण पीडिलों ब्राह्मण। तूं न करिशील क्षुधाहरण। तरी आतां तत्काळ जाईल प्राण। सत्य जाण विष्णुभक्ता॥८५॥ नामा ह्मणे त्याजकारण। तुह्मी याल जरी आपुला प्राण। तरी तैसीच गती मजकारण। होईल जाण द्विजवरा ॥ ८६ ॥ ऐसीं वचनें ऐकूनी। लाघव करीत चक्रपाणी। गरगरां नेत्र फिरवूनी। मूर्छित अंगणीं पडियेला।८७। ऐसें देखोनि विष्णुदास। जवळी जाऊन पाहे त्यास। तंव राहिले श्वासोच्छ्वास। मुकला प्राणास ब्राह्मण ॥ ८८ ॥वृत्तांत ऐकोनि ते अवसरीं। वाडियांत मिळाल्या नरनारी। ह्मणती ब्रह्महत्या आपुले द्वारीं। कैशापरी करविली॥८९॥ ब्राह्मण मागत होता अन्न। दिधलें नाहीं त्यालागून। पुढें वोढवलें महाविघ्न। हें कैशानें निवारेल ॥ ९० ॥ एक ह्मणती हरिभक्तानें। उदंड सांगावें ब्रह्मज्ञान। परी मुष्टिभर अन्न कोणालागून। कदाकाळीं न देती ॥ ९१ ॥ यापरी निंदा करिती सकळ। परी नामयाचा निश्चय अढळ। ब्राह्मणाचें प्रेत तत्काळ। उचलोनि नेलें भीमातीरीं ॥ ९२ ॥ सरण रचोनि सत्वरीं। कुणप घातलें त्यावरी। आपण निजून शेजारीं।अग्नि लावून दीधला ॥ ९३ ॥ नवल करिती नारीनर। ह्मणती नामयाचा निश्चय थोर। याजसारिखा पृथ्वीवर। वैष्णव वीर दिसेना ॥ ९४॥ तो ब्राह्मण नव्हेचि श्रीपती। शांत होतांचि सत्वरगती। नामयाची श्रद्धा निश्चितीं। निघतसे सती तयासवें ॥ ९५॥ प्रदीप्त होतांचि कृशान। ब्राह्मण तत्काळ बैसला उठोन। चतुर्भुज रूप धरून। दिधलें आलिंगन नामयासी ॥ ९६ ॥ ह्मणे तुजऐसा निजभक्त जाण। धुंडितां न मिळे त्रिभुवन। अंबरीष रुक्मांगदाहून। दिसतो नेम अधिक तुझा॥९७॥ त्याणें नगरीच नेली वैकुंठासी। तूं विश्वोद्धारक जन्मलासी। ह्मणोनि आलिंगून हृषीकेशी। मोहें पोटासीं धरियेला ॥ ९८ ॥ अंबरीषानें व्रत केलें । दहा गर्भवास म्यां त्याचे साहिले। तुवां बौद्ध अवतारीं बोलविलें। सगुण केलें देह नसतां ॥ ९९ ॥ ऐसें बोलोनि चक्रपाणी। अदृश्य जाहले तत्क्षणीं। लोक आश्चर्य करिती मनीं। लागले चरणीं नामयाचे ॥ २०० ॥ श्रीभीमातीरवासिया रुक्मिणीकांता। पुढें बोलवीं निजभक्तकथा। तुजविण बुद्धीचा प्रकाशिता। आणिक सर्वथा नसेची ॥ १ ॥ तुझिया कृपेंकरूनि जाण। अक्षरें निघती मुखांतून। महीपती तुजला अनन्यशरण। वंदितो चरण निजभावें ॥ २ ॥ स्वस्तिश्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। विंशतितमोऽध्याय रसाळ हा।२०३। अध्याय२०श्रीकृष्णार्पणमस्तु।



श्रीगणेशाय नमः। श्रीराधाकृष्णाय नमः। जय क्षीराब्धिवासा शेषशयना। लीलाविग्रही रुक्मिणीरमणा। सगुणस्वरूपा भक्तभूषणा। गुणनिधाना श्रीविठ्ठला ॥ १ ॥ जय अनंत अवतारधरितया। चैतन्यरूपा करुणालया। अमरपाळका पंढरीराया। निरसीं माया भक्तांची ॥ २ ॥ जय सर्वव्यापका सर्वातीता। गजेंद्ररक्षका वैकुंठनाथा। निजभक्तांसि सुखदाता। तुजविण सर्वथा असेना ॥ ३ ॥ जयजय चित्तचालका चैतन्यघना। भक्तकैवारिया असुरदमना। पुंडलीकवरदा रुक्मिणीरमणा। जगज्जीवना पांडुरंगा ॥ ४ ॥ तूं विरिंचीचा निजजनिता। सर्व करूनि होसी अकर्ता। अणुरेणु इतुका ठाव रिता। न दिसे सर्वथा तुजविण ॥५॥ मजवरी कृपा करूनि आतां। पुढें वदवीं निजभक्तकथा। तुजविण साह्य जगन्नाथा। आह्मां अनाथा कोण असे॥६॥ मागील अध्यायीं कथा विशेष। परमानंद जोगा निजदास। त्याचें चरित्र अतिसुरस। वर्णियेलें असे पैं ॥ ७ ॥ शिवभक्त नरहरी प्रसिद्ध जनीं। तोही लाविला आपुले ध्यानीं। मग नामयासि छळोनि चक्रपाणीं। पाहिलें कसोनी मन त्याचें ॥ ८ ॥ पुढें पंढरीस एके दिवशीं। यात्रा भरली कार्तिकमासीं। त्यांत एक कुमारी वेगेंसीं। महाद्वारासी पातली ॥ ९ ॥ मायबापांसि ह्मणे ते अवसरीं। मी येथेंच राहीन निरंतरीं। आतां परतूनि माघारी। नये मंदिरीं तुमच्या ॥ १० ॥ ऐकूनि कुमारीचें वचन। आश्चर्य करिती सकळ जन। ह्मणती सप्तवरुषांत असोन। कैसें ज्ञान ईस जाहलें ॥ ११ ॥ मायबाप होती बहुत कष्टी। परी ते नायकेचि कांहीं गोष्टी। श्रीहरीनें पाहतां कृपादृष्टीं। ममता पोटीं नुपजेची ॥ १२ ॥ ऐसा निश्चय देखोन। वडिलांसि वाटलें समाधान। कन्येसि महाद्वारीं टाकून। गेले परतोन स्वदेशा ॥ १३ ॥ कुमारी देखोनि दृष्टीसीं। करुणा उपजली नामयासी। ह्मणे मायबापाविण परदेशीं। एकटी बैसलीस तूं कोण ॥ १४ ॥ तुझिया बापाचा कोण ग्राम। आपुलें आह्मांसि सांग नाम। काय वडिलांसि झाला श्रम। ह्मणोनि तुजला टाकिलें ॥ १५ ॥ येरी बोले प्रतिवचनीं। माझें नाम ह्मणती जनी। मायबाप चक्रपाणी। त्याविण कोणी असेना ॥ १६ ॥ वचन ऐकतां सरसी। दया उपजली नामयासी। हातीं धरूनि लेंकुरासी। निजमंदिरासी पातला ॥ १७ ॥ गोणाईस सांगितलें वर्तमान। हें बाळक चुकलें यात्रेंतून। मायबापाविण दिसतें दीन। इचें संरक्षण करावें ॥ १८ ॥ कृष्णावतारीं कुब्जा दासी। तेचि अवतरली कलियुगासी। मग यात्रेसि येऊन पंढरीसी। हरिभजनासी विनटली ॥ १९ ॥ दिवसेंदिवस जाहली थोर। तिजला पुसती नारीनर। तूं कोण आहेस साचार। सांग सत्वर आह्मांसी ॥२०॥ जनी उत्तर देतसे त्यांसी। ह्मणे मी नामयाची अनन्यदासी। त्याजविण मायबाप मजसी। आणिक नाहीं सर्वथा ॥ २१ ॥ संसारधंदा करितां जाण। अखंड करी हरिस्मरण। रात्रीं ऐकोनि हरिकीर्तन। तैसेंचि मनन करितसे ॥ २२ ॥ तों नवल वर्तलें एके दिनीं। नामदेव निजले होते सदनीं। पांच घटिका झाली यामिनी। तों मेघ गगनीं वोळला ॥२३॥ अपार सुटला प्रभंजन। तेणें खोपट गेलें उडोन। ऐसें देखोनि रुक्मिणीरमणें। सुदर्शन पाठविलें॥२४॥ह्मणे नामयाचे मंदिरावरी। क्षणभरी जाऊन करीं तूं फेरी। मीही मागून सत्वरीं। येतों लवकरी तुजपाशीं॥२५॥कुटुंबा-

सहित विष्णुभक्त । निजला होता मंदिरांत।तों विष्णुचक्र येऊनि तेथ।फेरे घालित चपलत्वें ।२६। भोंवता पर्जन्य वर्षला मोठा । परी याजवर न पडे थेंबुटा । दास लागतां निजभक्तिवाटा । निवारी संकटा लवलाहें ॥२७॥ऐसें करूनि रुक्मिणीपती । माग़ुती आले सत्वरगतीं । आपुले हातें रचोनि भिंती।छपरी निगुती शाकारिलें।२८ऐकोनि श्रोते ह्मणती चतुर । निजांगें येऊन शार्ङ्गधर । नामयाचें बांधिलें छपर।तरी दिव्यमंदिर कां न केलें२९तरी आपुले दासांसि श्रीपती । पडों नेदीच संसारग़ुती । बहुत देतां धनसंपत्ती । तरी उदासवृत्ती मोडेल३०पांडवांस निर्मिला दुर्योधन।तो अखंड करी त्यांचें छलन । संकट पडतां जगज्जीवन । आपण धांवणें करीतसे३१ह्मणे यांसि निर्भय ठेविलें जरी।तरी माझा आठव नव्हे अंतरीं।आपुले दासांसि मुरारी।भवसागरीं बुडों नेदी३२भक्तांस दिधलें उत्तम मंदिर।तरी माझे भजनीं पडेल अंतर। ह्मणूनियां सर्वेश्वर । नामया छपर देतसे ३३ अन्न बाधेल बाळकास । ह्मणोनि माता थोडेंच घाली ग्रास। तेवीं निजभक्तांसि जगन्निवास । संपत्ति विशेष नेदीच ॥ ३४॥ कीं वृक्षासि बहुत होतां जीवन। तयासि चढेल पिंगटवर्ण । ह्मणोनि माळी त्याजलागून । तितुक्याच पुरतें देतसे ॥ ३५ ॥ तेवीं निजभक्तांसि जगन्नाथ । पोटापुरतेंच अन्नवस्त्र देत । कवण्या उपायें त्यांचें चित्त। उदास ठेवी सर्वदा ॥ ३६ ॥ ऐका मागील अनुसंधान । निजांगें येऊनि जगज्जीवन। नामयाचें छपर शाकारून। कंबळ गोळा करीतसे ॥ ३७॥ जागृती येऊनि निजभक्त । बाहेर विलोकून जों पहात । तों दिव्यपीतांबर झळकत । चपळे ऐसा निजतेजें ॥ ३८॥ मग बाहेर येऊनि लवलाहें । सप्रेमें तेव्हां धरिले पाय । ह्मणे देवा करितोसि काय । एवढे रात्रीं येऊनी ॥ ३९ ॥ यावरी ह्मणे जगज्जीवन । अपार सुटला प्रभंजन । तुझें खोपट गेलें उडोन । तें म्यां येऊन शाकारिलें ॥ ४० ॥ तुवां सांडोनि संसारवृत्ती । माझे भजनीं धरिलीस प्रीती । यास्तव स्वांगें मीं श्रीपती । रचिल्या भिंती तत्काळ ॥ ४१ ॥ आलों नसतों जरी त्वरित । तरी मुलांलेंकुरांसि वाजतें सीत । तो गोणाईस राग येता बहुत । बोलती विपरीत मजलागीं ॥४२॥ ह्मणोनि मी भक्तराया । रात्रीं आलों धांवूनियां । वचन ऐकूनियां पायां । लागे सत्वर गोणाई ॥ ४३ ॥ नामयासि बोलतां गुजगोष्टी । तेथेंच रमले जगजेठी । जनी येऊनि उठाउठी । रगडी पाठी देवाची ॥ ४४ ॥ ह्मणे कृपासागरा मनमोहना । करुणालया जगज्जीवना । निजांगें प्रयत्न करूनि नाना । आह्माकारणें रक्षिसी ॥ ४५ ॥ मग नामयासि ह्मणे हृषीकेशी । क्षुधा लागली असे तुजसी । तरी उठीं सत्वर भोजनासी । घेईं आह्मांसी समागमें ॥ ४६ ॥ मग षड्रस ताटीं विस्तारूनि अन्न । सत्वर आणिलें गोणाईनें । एके ठायीं अवघीं जणें । करीत भोजन बैसलीं । ४७ ॥ गोविंद विठ्ठल नारायण । चवथा महादेव नामाभिधान । हे नामदेवाचे पुत्र जाण । घेत जगज्जीवन भोजना ॥ ४८ ॥ गोणाई आणि राजाई । नामा बैसवोनि एके ठायीं । निजभक्त घेऊन लवलाहीं । भोजन करीत बैसले ॥४९॥ ऐसें देखोनिया नयनीं । जनीस कष्ट वाटले मनीं । ह्मणे दीनदयाळा चक्रपाणी । मज कां निवडून टाकिलें ॥५०॥ सवें घेऊन सकळांसी । भोजन करीत बैसलासी । मी नीच ह्मणूनि हृषीकेशी । टाकून परदेशीं



दीधलें ॥ ५१ ॥ जैसा पाक करितां स्वयंपाकीण । हरळ काढी तांदुळांतून । कीं इक्षुदंडाच्या मुळ्यांतून । निवडोनि तृण काढिती ॥५२॥ तेवीं अवकृपा धरूनि पोटीं । मजवरी न करिसीं कृपादृष्टी । दासी जनी होतसे कष्टी । करुणा जगजेठी कां नये ५३॥ ऐसें ऐकूनियां वचन । नामयासि ह्मणे जगज्जीवन । रुची नेदीच आजि भोजन । काय कारण कळेना ॥ ५४ ॥ येरु ह्मणे चक्रपाणी । बाहेर कष्टी होतसे जनी । तिची ग्लानि ऐकूनि कानीं । जाहलेति मनीं विव्हळ ॥ ५५॥ जैसें अट्टहास्यें वत्स हंबरतां । गाईस चारा न रुचे सर्वथा । कीं पाळण्यांत बाळ रडतां । भोजन मातेसी नावडे ॥ ५३॥ कीं पक्षिणी वनांत वेंचितां कण । तिचें पिलियांपाशीं लागतें ध्यान । कीं पाडस न देखतां एक क्षण । हरिणीस चारा रुचेना ॥ ५७ ॥ कीं लोभियाचें दूर राहिलें धन । त्यासि न रुचे जेवीं पक्कान्न । तेवीं जनीचें न होतां समाधान । तुजला भोजन रुचेना ॥ ५८ ॥ देवें हात आखडितां । मग अवघीं जणें राहिलीं जेवितां । देखोनि राजाईच्या चित्ता । आश्चर्य वाटलें तेधवां ॥ ५९ ॥ हात धुवोनि चक्रपाणी । स्वस्थ बैसले तृणासनीं । गोणाईनें जनीस बोलावूनी । उच्छिष्टपात्र दीधलें ॥ ६० ॥ ब्रह्मादिक प्रसाद इच्छिती । त्यांसि कदापि नव्हेचि प्राप्त । तो जनीस लाधला अकस्मात । धरितां संगत नामयाची ॥ ६१ ॥ मग आर्ताचिये निजतार्टी । झांकूनि ठेविलें उठाउठी । वाट पहात आपुले खोपटीं । ह्मणे जगजेठी धांव आतां ॥ ६२ ॥ तो नामा आणि शार्ङ्गधर । निजले एके शेजेवर । निद्रित होतां भक्तचतुर । जगदुद्धार उठिले पैं ॥६३॥ हळूच येऊन जगज्जीवन । जनीस नम्र बोलती वचन । ह्मणे क्षुधा लागली मजलागून । ह्मणूनि आलों तुजपाशीं ॥ ६४ ॥ नामयासवें होतों जेवित । परी तुज बोलाविलें नाहीं तेथ । ह्मणोनि हात आंखडोनि त्वरित । अन्न तैसेंच टाकिलें ॥६५॥ जनी ह्मणे शार्ङ्गधरा । कृपासागरा रुक्मिणीवरा । एक शुद्ध भावावेगळें मंदिरीं । कांहींच नसे द्यावया ॥ ६६ ॥ गोणाईनें उच्छिष्ट आणूनी । दिधलें असे मजलागूनी । तें तुज देतां चक्रपाणी । शंका मनीं वाटतसे ॥ ६७ ॥ यावरी बोले रुक्मिणीकांत । तैसेंचि आणून देईं मातें । ज्याचें त्यास वाढितां मनांत । संकोच कांहीं न धरावा ॥ ६८ ॥ मघां जेवितांचि राहिलें जाण । त्यांत गुंतलें माझें मन । आतां झडकरी तेंचि अन्न । दे आणोन मजलागीं ॥ ६९ ॥ ऐसी सप्रेम ऐकोनि गोष्टी । वायांच आशंका धराल पोटीं । ह्मणाल उच्छिष्टासाठीं जगजेठी । क्षुधित पोटीं कां जाहला ॥७०॥ तरी जनीचा हेत करावा पूर्ण । आणिक तिजपाशीं नाहीं अन्न । ह्मणोनियां जगज्जीवन । उच्छिष्टभोजन मागती ॥ ७१ ॥ मग नामयाची निजदासी । तिणें बैसवोनि हृषीकेशी । उच्छिष्टपात्र वेगेंसीं । पुढें आणोनि ठेविलें ॥ ७२ ॥ जनीस सांगातें बैसवूनी । भोजन करिती चक्रपाणी । हें ऐकोनि माता रुक्मिणी । विस्मित मनीं होतसे ॥ ७३ ॥ जो क्षीरसागरविलासी । गरुडध्वज वैकुंठवासी । तो सवें घेऊनि निजदासासी । उच्छिष्ट भोजन करीतसे ॥ ७४॥ श्रुति शास्त्रें अखंड गाती । जयासि ध्यातसे कैलासपती । तो नामयाचें उच्छिष्ट प्रीतीं । एकांतीं बैसोनि खातसे ॥ ७५ ॥ नानायज्ञें करितां हवन । तेथें न घेचि तो अवदान । तो जनीस ह्मणे जगज्जीवन । तृ-

म जाहलों जेवितां ॥ ७६॥ मग हात धुवोनि लवलाहीं । निद्रा केली तये ठायीं । तों बाहेर येऊन गोणाई । नामदेवा-
सि बोलतसे॥७७॥ निद्रा लागतां तुजलागून । देव सत्वर गेले उठोन । जनीचे मंदिरास जाऊन । उच्छिष्ट भक्षिलें निज-
प्रीतीं ॥ ७८॥ विष्णुदास ह्मणे वो जननी । तो भक्तवत्सल चक्रपाणी । शुद्धभाव असतां मनीं । येत धांवोनि त्या ठायां
॥ ७९॥ न विचारीच याती कुळ । न ह्मणे कांहीं काळ वेळ । भाव देखोनि दीनदयाळ । जातसे तत्काळ धांवोनि ॥८०॥
फळें तोडून उठाउठी । आधीं चाखून पाहे भिल्लटी । आवडी देखोन जगजेठी । प्रीतीनें पोटीं घालितसे ॥ ८१ ॥ तो
जनीची भक्ति देखोनि पाहे । आपलें उच्छिष्ट आपणचि खाये । यासि नवल कोणतें माये । सांगों काय तुजलागीं
॥ ८२ ॥ हा संवाद ऐकोन जगज्जीवन । नामयापाशीं आला त्वरेनें । एकासनीं केलें शयन । निजप्रीतीनें तेधवां ॥ ८३ ॥
शेवटील रात्र उरली प्रहर । मागुती आले शार्ङ्गधर । बैसोनि जनीचे बाजेवर । ह्मणती ऊठ सत्वर लवलाहीं ॥ ८४ ॥
उशिर जाहला जनाबाई । ऊठ लवकर दळण घेई । जांतें झाडोन लवलाहीं । वाट तुझी पाहतों मी ॥ ८५ ॥ मानेखा-
लीं घालोनि हात । तीस उठवी जगन्नाथ । माथां पदर आपुल्या हातें । रुक्मिणीकांत घालितसे ॥ ८६॥ केश सांवरू-
नि ते अवसरीं । जनीस बैसविले जांत्यावरी । दळणाची पांटी सत्वरीं । आणोन ठेविली सन्निध ॥ ८७ ॥ मग ह्मणे रु-
क्मिणीकांत । जांतें वोढीन मीच सत्य । तूं निमित्तमात्र लावूनि हात । गाईं गीत निजप्रेमें ॥ ८८ ॥ ऐसें बोलतां हृ-
षीकेशी । सावध जाहली जनीदासी । प्रेमभावें अतिउल्हासीं । ओंव्या संतांसी गातसे ॥ ८९ ॥ निवृत्ति सोपान ज्ञा-
नेश्वर । सोयरे माझे परात्पर । तयांचे प्रसादें शार्ङ्गधर । कृपा मजवर करीतसे ॥ ९० ॥ विष्णुदास माझा पिता । राजा-
बाई जिवलग माता । गोराकुंभार सखाचुलता । कबीर सांवता बंधु माझे ॥ ९१ ॥ यांणीं अघटित केली करणी । काय
नवल वानूं साजणी । स्वाधीन करूनि चक्रपाणी । स्वानंदजीवनीं तृप्त जाहले ॥ ९२॥ प्रतिष्ठानीं छळितां द्विजवरें ।
अघटित केलें ज्ञानेश्वरें । रेडियामुखीं साचारें । श्रुति अपार बोलविल्या ॥९३ ॥ गोराकुंभार निजभक्त । ध्यानांत आ-
णूनि रुक्मिणीकांत । बाळक तुडविलें मृत्तिकेंत । परी नाहीं श्रुत तयासी ॥९४ ॥ विठोबाची मोडिली आण । ह्मणोनि
हात टाकिले छेदून । नामयाची कथा करितां श्रवण । पावला जगज्जीवन साजणी ॥९५॥ टाळिया वाजवितां फुटले
हात । अकस्मात बाळक आलें रांगत । अघटित तयाची मात । नवल वाटतें देखोनी॥९६॥निजभक्त सांवता भूमंडळीं ।
त्याचे भेटीस गेले वनमाळी । पोट फोडोनि तत्काळीं । हृदयकमळीं सांठविला ॥९७॥ अनंत ब्रह्मांडें जयाचे उदरीं ।
तो सांवत्यापोटीं लपाला हरी । नामदेव येऊनि सत्वरीं । तयासि बाहेरी काढिलें ॥ ९८॥ कबीर बंधु परदेशीं । दूर
नांदतो वाराणसीं । त्याचे समागमें हृषीकेशी । विणावयासी बैसला ॥९९ ॥ शिवरात्रिदिवशीं नामयानें । नागनाथीं
मांडिलें हरिकीर्तन । नवलक्ष पताका स्वर्गींहून । अकस्मात उतरल्या ॥ १०० ॥ प्रसन्न होऊनि कैलासवासी । देवालय
फिरविलें पश्चिमेसी । त्याची करणी अद्भुत ऐसी । श्रुतिशास्त्रांसी अगम्य ॥ १ ॥ ऐशा परी वोढितां जांतें । ओंव्या गा-



तसे प्रेमयुक्त । हें ऐकोनि पंढरीनाथ । आनंदें डोलत तेधवां ॥२॥ कर्णीं गीत ऐकोनि त्वरित । गोणाई आली अंगणांत ।
जनीसी ह्मणे दुसरी येथ । कोण आणिली दळावया ॥ ३ ॥ मोलकरीण किंवा शेजारीण । कोण आणिली सांग त्वरेनें ।
येरी कांहींच न बोले वचन । धरूनि मौन राहिली ॥४ ॥ मग गोणाईस क्रोध होऊन पोटीं । हातीं घेतली वेत्रका-
ठी । प्रवेशोनि जनीच्या खोपटीं । ह्मणे कोणासी गोष्टी बोलतेस ॥५॥ दुबळा संसार न पुरे कण । कोण आणली
मोलकरीण । धान्य घालिसी दळणांतून । आह्मांसि चोरून नित्यकाळीं ॥ ६ ॥ काठी मारितांच ते समयीं ।
देवाचे मस्तकीं लागली पाही । ह्मणे नाम माझें विठाई । आलें लवलाहीं दळावया ॥ ७ ॥ ऐसें वचन ऐकून । ना-
मयासि कळली निजखूण । मातेसि ह्मणे तो जगज्जीवन । तुजकारण कळेना ॥८॥ वचनें ऐकोनियां ऐसीं । लज्जित झा-
ली निजमानसीं।ह्मणे मीं ताडिला हृषीकेशी।मग परतोनि आश्रमा पातली॥ ९॥ह्मणे जनीचें भाग्य अतिअद्भुत ।स्वा-
धीन केला रुक्मिणीकांत । म्यां नेणतां जाऊनि तेथ । केलें विपरीत तें ऐका ।११०।ब्रह्मादिकां न पडे दृष्टीं । त्यासि म्यां
निजकरें मारिली काठी । जळोत या संसाराच्या गोष्टी । ह्मणोनि कष्टी होतसे ॥ ११ ॥ सकुमार परब्रह्म सांवळें । पाह-
तांचि निवती मन डोळे । तो रुक्मिणीकांत घननीळ।जनीची कळवळ करितसे।१२। इकडे भवखुंटियाचे भोंवतें । फि-
रत होतें वैराग्य जांतें । संचित मातृका वैरण बहुतें । दळिलीं त्यांत निजप्रीतीं ॥ १३॥नामरूपादि जें जें दिसत । तें तें द-
ळियेलें समस्त । अव्यक्तांत मेळवूनि व्यक्त । जनी निश्चित बैसली॥१४ ॥ मग पीठ भरूनी चक्रपाणी । ठेविते झाले तये
क्षणीं । किंचित उरली होती यामिनी । मग सुखशयनीं पहुडले॥१५॥जनीसि बोलतां प्रीतीकरून । निद्रित जाहले ज-
गज्जीवन । तों पूर्वदिशेस अरुण । उदयासि येतां देखिला ॥१६॥ मग नामयाची येऊन दासी । ह्मणे ऊठ सत्वर हृषीके-
शी । पूजारी येतील देउळासी । तेथें तुह्मांसी न देखती। १७॥कांकड आरतीस नसतां तेथें । बोभाट होईल नगरांत । ऐ-
सें ऐकोनि जगन्नाथ । उठिले त्वरित लगबगां।१८।सत्वर जातां जगज्जीवन । राहिलें नाहीं देहभान । आपुली सकला-
द विसरून । जनीची वाकळ पांघुरला ।१९। आणि दिव्य नवरत्नांचें पदक । एकावळीस वोविलें देख । तेथेंच विसरून
जगन्नायक । गेले सत्वर राउळा॥१२०॥कवाड उघडितां निजभक्तजन । दर्शना आले पूजा घेऊन । तों वाकळ पांघरू-
नि जगज्जीवन । उभा टाकला विटेवरी ॥२१॥ देखोनि आश्चर्य करिती सकळ । ह्मणती तमाळनीळें केलें नवल । कोणा-
ची आणिली वाकळ । आह्मांसि नकळे सर्वथा॥ २२॥ एक ह्मणती नाटकी मोठा । भक्ताभिमानी अति गाढा । निषेध
करूनि कर्मठा । सिद्धांत वाटा लावीतसे ॥२३॥ एक ह्मणती जगज्जीवना । भक्तभूषणा रुक्मिणीरमणा । क्षीराब्धिवा-
सा शेषशयना । वाकळ साजेना तुजलागीं ॥२४॥ एक बोलती तर्क करूनी । मोठी चंचळ दासी जनी । तिणें भुलवोनि
चक्रपाणी । घातली मोहनी निश्चित॥२५॥एक ह्मणती कुब्जादासी।श्रीभागवतीं वर्णिली जैसी । जनीची करणी तिज-
ऐसी । तुह्मां सर्वांसी कळोंया ॥२६॥ एक ह्मणती नामयासि सांगा जाऊनी । आवरी आपुली दासी जनी । तिनें घालू-

नियां मोहनी । शार्ङ्गपाणी भुलविला॥२७॥ऐसे नानापरी जन समस्त । तर्क करिती निजमनांत । पूजारी सचिंत जाऊ-
नि त्वरित ।वाकळ पाहती काढूनी २८तों पदक आणि एकावळी ।न दिसे त्याचें हृदयकमळीं ।ह्मणती उदारा वनमाळी।
धणी दिधली कोणासी२९ऐसें विनोदें बोलती वचन । जनीनें केलें शाहाणपण। वाकळ वाहोनि देवाकारण । पदकमा-
ळा घेतली ॥१३०॥ताकाचा नैवेद्य दाखवूनी । प्रसाद मागोनि घेतलें लोणी । रांजणींचें उदक देऊनी । अमृत सदनीं आ-
णिलें३१ जोहरियासि देऊनि गारा । त्याचे पालट घेतला हिरा।कृष्णांबर वाहूनि रुक्मिणीवरा ।पीतांबर घरा नेला कीं
॥३२॥कीं अर्कीचे दोडे वाहूनि निश्चितीं । प्रसन्न केला जैसा मारुती । अमृतफळें मागूनि प्रीतीं । तयापासून घेतली कीं
।३३। तेविं वाकळ वाहूनि ये काळीं । तोषविला वनमाळी । नेलें पदक एकावळी । नवविधरत्नें जडलीं जया ३४ पूजारी
ह्मणती करावें काय । कोणासि बोलावया नाहीं ठाव । कुलुपें असतां पंढरीराय । जातो कैसा कळेना ॥ ३५॥ ह्मणती ना-
मयाचे सदनीं । सत्वर जावें येच क्षणीं । बोलावूनियां दासी जनी।तिजलागोनी पुसावें३६ ऐसा विचार करूनि चित्तीं।
धांवत आले सत्वरगतीं । जनीस ह्मणती रुक्मिणीपती । तुझे संगतीं लागला ॥३७ ॥ नेणों कैसें घातलेंस मोहन । आमुचें
नावडे पूजा अर्चन । कांहीं तरी कवडाळ करून । जगज्जीवन भुलविला ॥ ३८॥ तुजसीं रतला घननीळ । आमचें सत्कर्म
बुडालें सकळ । आजचे रात्रीस दीनदयाळ । आले होते तुजपाशीं ॥ ३९ ॥ तुवां पदक एकावळी । घेऊनि वाकळ त्यासि
दीधली । ती आणोनि देईं ये वेळीं । नातरी शिक्षा तुज करूं १४० ऐसें ऐकोनियां वचन । येरी तत्काळ वाहे आण । म्यां
पदक घेतलें असेल जाण । तरी जावोत फुटोन नेत्र माझे ॥४१॥ झाडा घेतांच ते वेळीं । वस्त्रांत सांपडली एकावळी । ह्म-
णती लोहदंडाचे शूळीं । ईस तत्काळीं घालावें॥४२॥साक्षात्परब्रह्म गरुडध्वज । त्याचे अळंकार चोरिले आज । ह्मणो-
नि शिक्षा बोलिली सहज । सकळ द्विज बोलती॥४३॥ मग जनीस धरून उठाउठी । नेली चंद्रभागेचे कांठीं । येरी ध्या-
नांत आणूनि जगजेठी । करुणा पोटीं भाकीतसे ॥४४॥ ह्मणे पातितपावना शार्ङ्गधरा ।अनाथनाथा रुक्मिणीवरा । भ-
क्तवत्सला कृपासागरा । दीनोद्धारा जगदीशा।४५।मी परदेशीं अनाथ दीन । कोण करील माझें धांवणें। ऐकोनि जनी-
चें करुणावचन । जगज्जीवन पावले ॥४६ ॥ लोहशूळ रोंविला होता धरणीं । त्याचें तत्क्षणीं जाहलें पाणी । ऐसें कौतुक
देखतां जनीं । आश्चर्य जाहलें सकळांसी ॥४७॥ पूजारी विस्मित जाहले चित्तीं । ह्मणती धन्य जनीची भक्ती । स्मरण
करितांच रुक्मिणीपती । इजसी आकांतीं पावला ।४८। मिळोनि सर्व भक्तमंडळी । जयजयकारें पिटिली टाळी। ह्मण-
ती संकट पडतांचि तत्काळीं । पावे वनमाळी निजदासां ४९असो नवल वर्तलें एके दिनीं । मंदिरीं बैसोनि दासी जनी।
कवित्व रचोनि आपले मनीं । चक्रपाणी आठवितसे १५० मग हातीं घेऊनि दउत लेखणी । काय करिती चक्रपाणी।
जनीचें कवित्व पडतां श्रवणीं । ठेविती लिहूनी निजांगें ५१ह्मणाल नामयाच्या सदनाहूनी। कैसा शब्द पडतो श्रवणीं।
देउळीं बैसले चक्रपाणी । हे आशंका मनीं वाटे ५२तरी विश्वव्यापक जगज्जीवन । अंतरसाक्ष चैतन्यघन । निजभक्तां-



चे मनींची खूण । जाणता सर्वज्ञ तो एक ५३ द्रौपदीस छळितां दुःशासन । हस्तनापुरीं केलें चिंतन । तें द्वारकेसि जा-
हलें कैसें श्रवण । केलें धांवणें तत्काळ ५४ कीं गजेंद्रें करुणा भाकिली पोटीं । तें कैसें ऐकिलें वैकुंठीं । तेविं जनीचे शब्द
ज्ञानदृष्टीं । जाणे जगजेठी तत्काळ । ५५। निजभक्तांचें मनोगत । जाणता एक पंढरीनाथ । ह्मणोनि श्रोतीं आशंकित ।
सर्वथा चित्त न करावें ॥ ५६॥ मनांत ह्मणे रुक्मिणीपती । जनीचीं पदें मज आवडती । ह्मणोनि लेखणी घेऊन हातीं ।
बैसोन लिहिती निजांगें ॥५७॥ तों अकस्मात ज्ञानेश्वर । करावया आले नमस्कार । तयांसि देखोनि शार्ङ्गधर । चित्तीं
विचार आठविला ॥ ५८ ॥ मग दऊत लेखणी कागद । लपवूनि ठेवी गोविंद । सच्चिदानंद आनंदकंद । लीला अगाध
दाखवी ॥ ५९ ॥ ज्ञानदेवें येऊनि ते वेळीं । मस्तक ठेविला चरणकमळीं । ह्मणती एकांतीं बैसोन वनमाळी । काय लेखन
करीतसां ॥१६०॥ ऐकोनि ह्मणती पांडुरंग । मी जनीचे लिहितों अभंग । ऐसें बोलतांचि श्रीरंग । ज्ञानदेव मग हांसले
॥६१॥ ह्मणे जयजयाजी रुक्मिणीपती । जनीनें मांडिली तुमची स्तुती । ते आपुले हातीं लिहितां ग्रंथीं । नवल मजप्र-
ती वाटतें ६२ तीर्थें व्रतें दानें तपें सत्य।आपुले हातें लिहिलीं जरी बहुत । स्वमुखें सांगावया उचित । नसे जाण सज्ञाना
।६३। आणखी आपुले प्रताप वनमाळी । उदंड असतील भूमंडळीं । तरी आपण पत्रीं कदाकाळीं । लिहूं नयेची सर्वथा
।६४। तुमचीं चरित्रें रुक्मिणीपती । निजांगें लिहित सरस्वती । श्रुतिशास्त्रें गुण वर्णिती । पुराणें गाती पवाडे ।६५।व्या-
सवाल्मीकादि महाकवी । तुज वर्णून पावले पदवी । आणि जनीचीं पदें त्वां लिहावीं । हांसतील कवी या बोला॥६६॥
ऐसें ऐकोनि तये वेळे । घननीळ काय बोलिले । जनीचे शब्द प्रेमळ भले । वाटती रसाळ मजलागीं ॥ ६७॥ ते श्रवणीं
पडतांचि सत्य । लिहित बैसलों होतों येथ । तुज देखतांचि अकस्मात ।आशंका मनांत वाटली ॥ ६८॥ मग लगबगें
अतितांतड केली । कागद दऊत लेखणी लपविली । परी निजखूण तुज कैसी कळली । हें मज नकळेची सर्वथा ॥ ६९ ॥
ज्ञानदेव ह्मणे जगज्जीवना । तुझे अंतरींच्या निजखुणा । आह्मांवांचूनि भक्तभूषणा । आणिक कोणा न कळती॥१७०॥
जेविं पतीचिया मनोगता । जाणतसे एक पतिव्रता । कीं मायेची ममता । जाणत एक बाळक ॥ ७१ ॥ कीं कवीचें
रसाळ बोलणें । वोळखती जैसे विचक्षण । कीं अध्यात्मग्रंथींचें ज्ञान । जाणती सज्ञान अनुभवी ॥ ७२ ॥ कीं रोहि-
णीपतीच्या पूर्णकळा । चकोरासि कळती घननीळा । कीं ज्ञानेंद्रियाचा विषय सोहळा । मनचि गोपाळा जाणत-
से ॥ ७३ ॥ तेविं तुमचे जीवींचें निजगुज । आह्मां अखंड कळे सहज । ऐसें बोलतां ज्ञानराज । अधोक्षज हासिन्नले
॥ ७४ ॥ मग ज्ञानदेव ह्मणे जगजेठी । चला जाऊं नामयाचे भेटी । तुह्मांस जनीची प्रीती मोठी । हे सांगेन गोष्टी त्या-
पाशीं ॥ ७५ ॥ अवश्य ह्मणोनि रुक्मिणीपती । ह्मणे हेंचि आहे आमुचे चित्तीं । एकमेकांसि धरूनि हातीं । सत्वरगतीं
चालिले ॥७६ ॥ ज्ञानदेव आणि चक्रपाणी । विष्णुदासाच्या आले सदनीं । मग क्षेमालिंगन देऊनी । सुखासनीं बैसले
॥७७॥ घरासि येतां वनमाळी । तों तेथें आधींच मिळाली संत मंडळी । जेविं नृपवर बैसतां सभास्थळीं । सैन्य सकळी

ये तेथें ॥७८॥ कीं बैसला ऐकोनि शचीरमण । तयासि वेष्टिती सुरगण । कीं शंकराभोंवते तापसी जाण । बैसती येऊन निजप्रीतीं ॥७९॥ नातरी इंदिरा बैसे जेथें । सकळ सिद्धी बोळंगती तेथें । कीं कीर्तनरंगीं प्रेमळभक्त । धांवूनि येत आवडीं ॥१८०॥ कीं अमूल्य रत्न असे जेथें । सकळ परीक्षक मिळती तेथ । कीं कमळिणीचे पुष्पाभोंवतें । मिलिंद येती धांवूनी ॥८१॥ कीं दाता देखोनि नेत्रकमळीं । भोंवतीं मिळे याचकमंडळी । कीं शर्करेचे राशीजवळी । पिपीलिका येती धांवोनी ॥८२॥ तेविं नामदेवाचे मंदिरांत । बैसले देखोनि जगन्नाथ । तेथेंच मिळाले सकळ संत । आनंदयुक्त तेधवां ॥ ८३ ॥ देऊनि सकळां आलिंगन । नामयासि ह्मणे जगज्जीवन । जनीस आणावें बोलावून । घ्यावया दर्शन संतांचें ॥ ८४ ॥ मग गोणाई ह्मणे राजाईकारण । जनी बाहेर वळते शेण । तिजला ह्मणावें रुक्मिणीरमण । तुजकारण बाहाती ॥८५॥ निरोप ऐकूनि कानीं । सत्वर सांगे तिज जाऊनी । घरीं आले चक्रपाणी । तुजकारणें बाहाती॥ ८६॥ मग हात धुवोनियां त्वरित । जनी पातली वाडियांत । दृष्टीं देखोनि पंढरीनाथ । साष्टांग दंडवत घातलें॥८७॥ तेव्हां नामयासि ज्ञानदेव बोलत । आजि नवल देखिलें अति अद्भुत । जनीचीं पदें वैकुंठनाथ । होतें लिहित निजांगें ॥८८॥ यावरी बोले भक्तभूषण । जनीचीं पदें केलीं लेखन । येणें आह्मांस लहानपण । नाहीं आलें जाण सर्वथा ॥ ८९ ॥ मी आपुली वाहूनि आण । साक्ष ठेवितों तुमचे चरण । कीं जनीचें प्राकृतभाषण । हा स्वानंदरस जाणावा ।१९०। कीं स्वात्मसुखाचा आनंद । कीं ब्रह्मज्ञानाचा निजबोध । शुद्धसत्वाचा घेऊन कागद । लिहितों गोविंद निजप्रीतीं ॥ ९१ ॥ जनीचीं बोलणीं वाचील कोणी । मी तिष्ठेन तयाचे अंगणीं । ऐसें स्वमुखें चक्रपाणी । बोले सदनीं नामयाचे ॥९२॥ जो नित्य गाय जनीचे पदा । त्यासि संसारीं नव्हे आपदा । अंतीं तया सायुज्यपदा । नेईन मी निश्चयें ॥ ९३ ॥ ऐसें बोलतां वनमाळी । ज्ञानदेव हांसोन पिटी टाळी । जयजयकार केला सकळीं । तेथें संतमंडळी कोण होती ॥ ९४ ॥ वाराणसीहून आला कबीर । आणि चोखामेळा भक्त थोर । तिसरा रोहिदास चांभार । हे वैष्णववीर बैसले ॥९५॥ सज्जन पठाण निजभक्त । बयाकसाब अतिविरक्त । कमाल कुलारी महासंत । प्रेमयुक्त सर्वदा ॥९६॥ आणि मुकुंदराज झारेकरी । अखंड राहिला महाद्वारीं । गोणाई राजाई सुंदरी । जयजयकारीं गर्जिन्नल्या ॥ ९७ ॥ आणि नामा अंतरंग निजभक्त । मध्यें बैसला रुक्मिणीकांत । जेविं सेनेमाजी नृपनाथ । ऐश्वर्यें शोभत आगळा ॥ ९८ ॥ मग जनीस पुसती ज्ञानेश्वर । नामदेवें घेतले अवतार चार । प्रल्हाद अंगद उद्धव थोर । शार्ङ्गधर वश केला ॥ ९९ ॥ आणि तुवां कोणते जन्म घेऊन । केलें देवाचें आराधन । हें सकळ सांग आह्मालागून । संकोच मनीं न धरितां ॥२००॥ ऐकोनि नामयाची निजदासी । बोलायास जाहली सरसी । ह्मणे हयग्रीव जाहले हृषीकेशी । तैं याचे पायांसी जडलें मी ॥ १ ॥ मग अंबरीषाचे कैवारें । घेतले दहा अवतार । मत्स्य कच्छ वराह थोर । मारावया असुर महाबळी ॥ २ ॥ नरसिंह वामन परशुराम । मग जाहले दाशरथी राम । श्रीकृष्ण सर्वांचा विश्राम । आतां बौद्ध होऊनि बैसला ॥ ३ ॥ हे नाना अवतार धरिले देवें । तैं मी होतें याचे सवें । वचन ऐकोनि ज्ञानदेव । आश्चर्य करी अंतरीं ॥ ४ ॥ ह्मणे धन्य हे जनी दासी । इच्या अपार पुण्यराशी । प्रसन्न केला हृषीकेशी । ब्रह्मादिकांसी दुर्लभ जो ॥ ५ ॥ मग संतांसि ह्मणे चक्रपाणी । आतां लेखकांची करा वांटणी । जे शब्द निघती मुखांतूनी । ते लिहूनी ठेवावे ॥ ६ ॥ ज्ञानेश्वराचीं शब्दरत्नें । तीं लिहील सच्चिदानंद ब्राह्मण । निवृत्तीचा लेखक सोपान । जो अवतार पूर्ण विरिंचीचा ॥७॥ आणि मुक्ताबाईचे अभंग । ज्ञानदेवें लिहावे सांग । जोगा परमानंद अंतरंग । त्याचे विसोबा खेचरें लिहावे ।८। सांवता माळी भक्त वैष्णव । त्याचा लेखक काशिबा गुरव । कूर्मदासाचा काईत सुदेव । देवाधिदेवें निर्मिला ९ अनंतभट ब्राह्मण । तो चोखामेळियाचें करी लेखन । आणि नामया जनीचें बोलणें जाण । रुक्मिणीरमण लिहीतसे ॥२१०॥ ऐसी करून दिधली वांटणी । मग ज्ञानदेवासि ह्मणे चक्रपाणी । आतां जनीचे अभंग ऐकतां कानीं । संकोच मनीं न धरावा ॥ ११ ॥ ऐकोनि ह्मणती वैष्णववीर । समर्थें केलिया अंगीकार । शब्द ठेवी असा पृथ्वीवर । नाहीं साचार धुंडितां ॥ १२ ॥ अंधासि भास्करें धरिलें हातीं । तरी काय एक न दिसे तयाप्रती । कीं मुक्यासि प्रसन्न सरस्वती । झालिया श्रुती वदेल तो ॥ १३ ॥ तेविं तुमची कृपा होतांचि जाण । जनीसि दासी ह्मणेल कोण । ऐसें ऐकूनि जगज्जीवन । हास्यवदन जाहले ।१४। मग नामयानें उदक आणून । केलें सर्वांचें चरणक्षालन । षोडशोपचारें रुक्मिणीरमण । सप्रेमभावें पूजिला ॥ १५ ॥ विडे देऊन सकळांप्रती । साष्टांग नमस्कार घातले प्रीतीं । मग गोणाईस पुसोनि श्रीपती । अतिसत्वर चालिले ॥ १६ ॥ सवें घेऊन भक्तमंडळी । राउळीं प्रवेशले वनमाळी । सकळ वृत्तांत रुक्मिणीजवळी । सांगितला तेधवां ॥ १७ ॥ जो अनाथबंधु करुणाकर । भक्तवत्सल कृपासागर । करुणासिंधु शार्ङ्गधर । ह्मणवी साचार आपणासी ॥ १८ ॥ तो आपले दासांचीं चरित्रें । वक्ता वदविता राजीवनेत्र । महीपती बाहुलें निमित्तमात्र । सज्ञान पवित्र जाणती ॥१९॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । एकविंशाध्याय रसाळ हा ॥ २२० ॥ अध्याय २१ ॥ ओंव्या २२० ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय २१ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । आजि कल्पतरूच्या वृक्षाभोंवते । येऊनि बैसले सभाग्य श्रोते । ह्मणोनि मनोरथ अपुरते । कोणाचेही न राहती ॥ १ ॥ कीं लोह लागतां परिसासी । काळिमा कांहींच न राहे तयासी । तेविं भक्तकथा ऐकतां सुरसी । आशंका मनीं न राहे ॥ २ ॥ नातरी पयोब्धीचें करितां स्नान । सकळही तीर्थें घडती जाण । कीं वासरमणीचे प्रकाशेंकरून । सकळ पदार्थ दीसती ॥ ३ ॥ कीं सुधारस लाधतांचि हातीं । सकळ रोगव्याधी पळती । तेविं भक्तकथा जे ऐकती । त्यांसि भवदुःख चित्तीं बाधेना ॥ ४ ॥ नातरी प्रसन्न जाहलिया निशाकर । त्यासि न लागे जेविं उबारा । तेविं भक्तकथा ऐकतां चतुरा । कामक्रोध अंतरां न येती ॥ ५ ॥ मागिले अध्यायीं निरूपण । देवें केलें जनीचें स्तवन । आश्चर्य करूनि संतजन । जयजयकारें गर्जिन्नले ॥ ६ ॥ हें निरूपण ऐकूनि कानीं । प्रश्न केला श्रोतयांनीं । ह्मणती जनीसवें जोडला चक्रपाणी । संगतीकरूनि नामयाच्या ॥ ७ ॥ तरी याचा संप्रदाय असे कोण । कळला नाहीं आह्मांकारण । ऐसा संतजनीं केला प्रश्न । तरी तेंचि निरूपण अवधारा ॥ ८ ॥ तंव कोणे एके अवसरीं । शंकर बैसले क्षीरसागरीं । श्रीरामस्वरूप आठवूनि अंतरीं । नामस्मरण करिताती ॥ ९ ॥ मग पार्वती पुसे कैलासनाथा । तुह्मीं कोणाचें नाम जपतां । तुह्मांवरिष्ठ देव कोणता । संशय हाची मज वाटे ॥ १० ॥ ऐसें ऐकूनियां उत्तर । पार्वतीस ह्मणे सर्वेश्वर । मजवरिष्ठ दैवत थोर । जानकीवर श्रीराम ॥ ११ ॥ विरिंचि विष्णु भवानी । मजसहित जाहले त्यापासोनि । तेंचि स्वरूप आठवूनि मनीं । जपतों निशिदिनीं नाम त्याचें ॥ १२ ॥ ऐसें बोलतां त्रिपुरांतक । मनांत आश्चर्य करी अंबिका । ह्मणे मी अर्धांगीं असतां देखा । नाहीं विवेका आठविलें ॥ १३ ॥ कमळिणीच्या पुष्पाजवळ । दर्दुरी असतां सर्वकाळ । परी त्यांतील मकरंद अति निर्मळ । तीस न कळे सर्वथा ॥ १४ ॥ कीं मृगनाभीं कस्तूरी असोनी । तो वायांचि फिरे रानोरानीं । तेविं शंकरांगीं ज्ञान असोनी । तें मजलागोनी कळेना ॥ १५ ॥ मग जोडोनि दोनी कर । नीलकंठासि केला नमस्कार । ह्मणे तुह्मीं शुद्ध करून अंतर । जपतां रघुवीर अहर्निशीं ॥ १६ ॥ तें आपले जीवींचें निजगुज । कृपा करूनि सांगावें मज । वचन ऐकूनी कैलासराज । बोलती सहज निजप्रीतीं ॥ १७ ॥ एकांत देखोनि ते अवसरीं । पार्वतीस ह्मणे त्रिपुरारी । मी जपतों जयासि अंतरीं । तें तुज निर्धारीं सांगतों ॥ १८ ॥ मग मस्तकीं ठेऊनि अभयकर । उपदेश करी श्रीशंकर । तों पार्वतीस निद्रा लागली फार । विवेक साचार आठवेना ॥ १९ ॥ उपदेश करितां धूर्जटी । तेव्हां असावध होती गोरटी । गर्भ होता मत्स्यीचे पोटीं । त्यानें हुंकार दीधला ॥ २० ॥ क्षीरकल्लोळाच्या आंत । मकरीचे उदरीं होता गुप्त । त्यानें ऐकूनि अकस्मात । आठव चित्तीं धरियेला ॥ २१ ॥ जेविं कयाधु होती बंदीखानीं । तेथें अकस्मात आले नारदमुनी । उपदेश देतां कृपेंकरूनी । तो प्रल्हादानें गर्भांत ऐकिला ॥ २२ ॥ तेविं पार्वतीस सांगतां मदनारी । तो शब्द पातला मकरोदरीं । तो मत्स्येंद्रनाथ ते अवसरीं । विश्वोद्धारी जन्मला ॥ २३ ॥ तो साक्षात शंकर अवतारू । कीं वैराग्याचा महामेरू । कीं निजबोधाचा सागरू । तो जगद्गुरू अवतरला ॥ २४ ॥ जो ब्रह्मज्ञानी अति दक्ष । जो सायुज्यदानीं कल्पवृक्ष । कीं

सर्व जीवांचा अंतरसाक्ष । कमलदलाक्ष दूसरा ॥ २५ ॥ कीं निर्गुणाचें निजमंदिर । कीं तो चैतन्याचाचि आकार । कीं
पौर्णिमेचा निशाकर । वाढे साचार या रीतीं ॥ २६ ॥ तो देहीं असोनि वेगळा । कीं परब्रह्मच निजपुतळा । कीं तो उन्म-
नींचा जिव्हाळा । प्रकटलासे भूमंडळीं ॥ २७ ॥ तो उपजतांच मातेच्या उदरांतून । नाहीं विसरला सोहंध्यान ।
न लागतां अविद्याप्रभंजन । सत्वर तेथून निघाला ॥ २८ ॥ विचार करितां निजमनीं । ह्मणे सकळ तीर्थें
पाहावीं नयनीं । मग मत्स्येंद्रनाथ तेथोनी । गमन करी स्वइच्छें ॥ २९ ॥ ग्रामांत करून भिक्षाटन । मिळेल तैसें
भक्षावें अन्न । मागुती अरण्यांत जाऊन । एकांतस्थानीं बैसावें ॥ ३० ॥ ऐसी असतां उदासवृत्ती । द्वादश वर्षें
क्रमिलीं निरुती । तों अकस्मात एके नगराप्रती । सहजस्थितीं पातले ॥ ३१ ॥ भिक्षा मागतां घरोघरीं । कोठें न
टिके निमेषभरी । तंव एक सावकाराचे मंदिरीं । अकस्मात पातला ३२ अलख ह्मणोनि द्वारापाशीं । साद घाली अति
वेगेंसीं । ह्मणे भिक्षा असली तरी त्वरेंसीं । आणीं माते झडकरी ॥ ३३ ॥ मंजुळस्वर ऐकतां कानीं । सावकारकांता
विस्मित मनीं । ह्मणे धन्य अतीताची जननी । ऐसें निधान प्रसवली ॥ ३४ ॥ बाहेर येतां भिक्षा घेऊनी । तों दिव्य स्वरूप
देखिलें नयनीं । दोन मुद्रिका घातल्या कर्णीं । नक्षत्राऐशा तळपती ॥ ३५ ॥ सुवर्णाऐसी सुंदर कांती । त्यावरी चर्चिली
शुभ्रविभूती । कटीं मेखला विराजती । नयन शोभती आकर्ण ॥ ३६ ॥ ऐसें स्वरूप दृष्टीं देखोन । नमन केलें प्रीतीकरू-
न । ह्मणे स्वामी कोणीकडून । केलें आगमन मज सांगा ।३७। ऐकोनि मत्स्येंद्र बोले वाचा । शून्य निरंजन देश आमु-
चा । जाणता असेल तो दैवाचा । योगसुखाचा अधिकारी ॥ ३८ ॥ सावकारकांता बोले वचन । मजला नाहीं पुत्रसंता-
न । घरीं सर्व संपत्ती असोन । मंदिर शून्य दिसताहे । ३९ । चंद्रावांचूनी जैसी यामिनी । कीं वृक्षावांचूनि बुभुक्षित मे-
दिनी । कीं जीवन नसतां सरिता नयनीं । भयासुर दिसताहे ४० मेघावांचोनि पर्जन्यकाळ । वायां जाय जैसा निष्फ-
ळ । कीं शक्ती नसतां शरीर स्थूळ । व्यर्थचि काय वाढोनी ४१ पराक्रमेंविण जैसा नृपती । कीं करणी नसतां शास्त्रव्यु-
त्पत्ती । स्नेहसूत्राविण दीपकज्योती । सोज्वळ न दिसे सर्वथा ॥ ४२ ॥ प्रारब्धाविण चातुर्यकळा । कीं जीवनाविण ला-
विला मळा । तेविं संतानाविण संपत्तिसोहळा । व्यर्थचि दिसोन येतसे ४३ तरी जेणें होईल संतानवृद्धी । ऐसी मजला
सांगावी बुद्धी । वचन ऐकोनि एकांतसंधी । मत्स्येंद्रनाथ संतोषले ॥ ४४ ॥ मग निजमुखें मंत्रूनि विभूती । तत्काळ दि-
धली तिचे हातीं । ह्मणे ही भक्षितांचि तुजप्रती । पुत्र होईल निर्धारें ॥ ४५ ॥ जो विष्णु-अवतार साक्षात । दृष्टीं देखसीं
मूर्तिमंत । कोणासी न सांगतां हे मात । साधीं कार्यार्थ आपुला ॥ ४६ ॥ ऐसें सांगून मत्स्येंद्रजती । निघोन गेला सत्वर-
गतीं । सावकारकांतेनें विभूती । नेऊनि ठेविली देव्हारां ॥ ४७ ॥ मग बोलावूनि आपुल्या मैत्रिणी । ह्मणे माझें निजगु-
ज ऐका साजणी । एक अतीत येतां आमुचे अंगणीं । भिक्षा घेऊनि मी गेलें ॥ ४८ ॥ परमतेजस्वी देदीप्यमान । उदास
विरक्त पवित्र पूर्ण । ऐसें स्वरूप दृष्टीं देखोन । संतोष मनीं वाटला ॥ ४९ ॥ संतान नाहीं माझे पोटीं । ही त्यासि निवेदन



केली गोष्टी । मग तेणें पाहून कृपादृष्टीं । मंत्रोनि विभूती दीधली ॥ ५० ॥ ह्मणे हे भक्षितांच जाण । तुजला होईल पुत्र-
निधान । ऐसें सांगूनि मजकारण । आपण गेला सत्वर ॥ ५१ ॥ हे सत्य कीं असत्य करणी । यथार्थ सांगा मजलागूनी ।
तुह्मांवांचूनि जिवलग कोणी । आणिक साजणी दिसेना ॥ ५२ ॥ मैत्रिणी ह्मणती ऐक बाई । कानफाट्यांचा विश्वास
कायी । नाना चेटकें करून पाहीं । मनुष्य लवलाहीं भुलविती ॥ ५३ ॥ जरी विश्वास धरसील त्यांच्या बोला । तरी मु-
कसील आपुल्या संसाराला । आयुष्य चिंती निजभ्रताराला । प्रपंच भला त्याचेनी ॥ ५४ ॥ कानफाडे देवोनि विभू-
ती । श्वान करूनि मागें हिंडविती । रात्रीं कांता करूस भोगिती । ऐसी रीती तयांची ॥ ५५ ॥ ऐसें बोलोनि नानापरी ।
विकल्प घातला तिचे अंतरीं । ह्मणे विभूति घेऊन झडकरी । देई टाकून अग्नींत ॥ ५६ ॥ ऐकोनि शेजारिणीचें वचन ।
सासुसुनांत होय भांडण । बंधुबंधूंत वैर पडोन । विभक्त टाकिती मायबापां ॥ ५७ ॥ प्रत्यक्ष हानि जगामाजी । ग्रहक-
लह ह्या समूळ सेजी । जेविं क्षीरामाजी पडतां कांजी । नाश होय तत्काळ ॥ ५८ ॥ जैसें डांकाचे संगतींकरून । सुवर्ण
होय तत्काळ हीन । तेविं कुलवंतेसि कुलक्षण । परबुद्धीनें येतसे ॥ ५९ ॥ मग मत्स्येंद्रनाथाची बिभूत । तत्काळ टाकिली
चुलीआंत । जेविं विष ह्मणोनियां अमृत । खडकावरी रिचविलें ॥ ६० ॥ कीं वेदांतपुस्तक सांपडलें । तें कोकशास्त्र ह्म-
णोनि टाकिलें । कीं मुक्ताफळ भिरकाविलें । काचमणी ह्मणोनी ॥ ६१ ॥ कीं कल्पतरूचें निजबीज । अग्नीमाजी टा-
किलें सहज । नातरी सागराची आत्मजा । इंदिरा बळेंचि मोखंडिली । ६२ । कीं यज्ञाचा पुरोडाश लाधला । तो कैकेयी-
नें विकल्पें दवडिला । तेविं मत्स्येंद्रनाथें प्रसाद दीधला । तो नाहीं भोगिला प्रारब्धें ॥ ६३ ॥ ऐसिया गोष्टीस पुढती । द्वा-
दश वर्षें क्रमिलीं निगुती । तों फेरी करून मत्स्येंद्रजती । अकस्मात पातले ॥ ६४ ॥ स्वेच्छें हिंडतां नगरांतरीं । आले साव-
काराचे घरीं । अलख ह्मणोनि द्वारीं । साद घातली तेधवां ॥ ६५ ॥ शब्द ऐकतां गृहस्वामिनी । तत्काळ आली भिक्षा घे-
ऊनी । दृष्टादृष्टी होतां ते क्षणीं । मागील आठवणी पडियेली ॥ ६६ ॥ मत्स्येंद्र ह्मणे तयेप्रती । तुज मंत्रोनि दिधली विभूती ।
तो पुत्र सत्वरगतीं । आह्मांप्रती भेटवी ॥ ६७ ॥ ऐकोनि सावकारपत्नी । भयभीत जाहली मनीं । ह्मणे यथार्थ सांगतां यां-
लागूनी । करील शापोनि भस्म येथें ॥ ६८ ॥ मग मौन धरून न बोले कांहीं । मत्स्येंद्र ह्मणे सांग लवलाहीं । विभूती भक्षि-
ली किंवा कोणे ठायीं । टाकोनियां दीधली ॥ ६९ ॥ यावरी ह्मणे सावकारकांता । यथार्थ वचन ऐका आतां । परबुद्धि
कानीं ऐकतां । विकल्प चित्ता पावला ॥ ७० ॥ कांहीं कृत्रिम असेल चित्तीं । ह्मणोनि चुलींत टाकिली विभूती । ऐसी
प्रारब्धाची गती । प्रजापतीनें लिहिलीसे ॥ ७१ ॥ मत्स्येंद्र ह्मणे ते समयीं । राख टाकली कवणे ठायीं । तें सत्वर सांग
लवलाहीं । संकोच कांहीं न धरितां ॥ ७२ ॥ ह्मणे कृषीवलें खाणोनि खात । नेली ते जागा विस्तीर्ण बहुत । द्वादश वर्षें-
पर्यंत । गोंवर टाकितों ते ठायीं ॥ ७३ ॥ मग तत्काळ बाहेर जाऊनी । तें स्थळ दिधलें दाखवूनी । ह्मणे येथेंच राख बहुत
दिनीं । टाकित असों स्वामिया ॥ ७४ ॥ तेव्हां उकरड्यावरी जाऊन त्वरित । उभे ठाकले मत्स्येंद्रनाथ । अलख ह्मणतांचि

त्वरित। नवल अद्भुत वर्तलें ॥ ७५॥ गुरुजी आदेश ह्मणूनी। भूमींतून उठली प्रतिध्वनी। ऐसें ऐकतां सकळजनीं। आश्चर्य मनीं करिताती ॥ ७६॥ मग मत्स्येंद्रें सांगोनि तयेप्रती। मनुष्याकरवीं उकरवी माती। तों द्वादश वर्षांची सतेज मूर्ती। दृष्टीं अवचितीं देखिली ॥७७॥ जैसा पौर्णिमेचा निशाकर। तैसी सोज्वळकांति सुंदर। बत्तीसलक्षणी सुकुमार। जो साक्षात अवतार विष्णूचा ॥ ७८ ॥ साजिरें श्रीमुख आकर्णनयन। कर्णीं मुद्रिका शोभायमान। आधार नसतां घालोनि आसन। स्मरण करित बैसला ॥ ७९ ॥ नाहीं अंगासि लागली माती। देखोनि लोक आश्चर्य करिती। मग मत्स्येंद्र येऊन सत्वरगतीं। सावध करिती तयासी ॥ ८० ॥ मस्तकीं ठेवितां अभयकर। घातला साष्टांग नमस्कार। हातीं घेऊनि निजकुमर। मत्स्येंद्र सत्वर चालिले ॥८१ ॥ शेण भस्म जाहलें मिश्रित। द्वादश वरुषें होता त्यांत। ह्मणोनि नाम गोरक्षनाथ। निजप्रीतीं ठेविलें ८२ सावकार ह्मणे कांतेप्रती। निधान लागलें होतें हातीं। परी प्राक्तनाची विचित्रगती। नव्हतें संचितीं आमुच्या ॥ ८३ ॥ करुणा ऐकोनि मत्स्येंद्रनाथें। आशीर्वाद दिधला तयेतें। आणिक एक पुत्र तुह्मांतें। होईल निश्चित जाणिजे ॥ ८४ ॥ ऐसें बोलोनि तयांप्रती। गोरक्षातें धरिलें हातीं। मत्स्येंद्रनाथ सत्वरगतीं। तीर्थाटनाप्रती चालिले ॥ ८५ ॥ मार्गीं चालती अतित्वरित। मग मत्स्येंद्रासि ह्मणे गोरक्षनाथ। माझे मस्तकीं ठेवूनि हात। तारकमंत्र उपदेशीं ॥८६॥सद्गुरु ह्मणती ते समयीं। आमुची सेवाच केली नाहीं। तों उपदेश करावया अधिकार पाहीं। बाणिला नाहीं सर्वथा ॥ ८७॥ परीक्षेविण नाणें झडकरी। बांधो नये आपुले पदरीं। तेविं सच्छिष्यास उपदेश झडकरी। सज्ञान चतुरीं न द्यावा ॥८८॥ वाफा केलियाविण सहज। तेथें पेरूं नयेचि उत्तम बीज। तेविं परीक्षा पाहिल्याविण मज। नये तुज अंगीकारितां ॥८९॥ ऐसें ऐकोनियां वचन। गोरक्ष करी साष्टांगनमन। बोलतसे कर जोडून। मज आज्ञा प्रमाण स्वामींची ॥ ९० ॥ पुढें चालतां अतित्वरित। तों एक नगर देखिलें अकस्मात। बाहेर बैसोनि मत्स्येंद्रनाथ। गोरक्षा धाडी भिक्षेसी ॥ ९१ ॥ अलख ह्मणोनि बोले वचन। घरोघरीं मागतां भिक्षान्न। तों एकाचे घरीं ब्राह्मणभोजन। होत असे तेधवां ॥ ९२॥ गृहस्वामीण येऊन पुढां। पदरीं घातला पोळीवडा। ह्मणे बहुत भला कानफाडा। धरणें नाहीं घेतलें ॥ ९३ ॥ अल्पसंतुष्ट जो कां नर। तो केवळ ईश्वरी अवतार। ऐसें लोक परस्पर। बोलते जाहले तेधवां॥ ९४ ॥ मग बाहेर जाऊन त्वरित। मत्स्येंद्रासि घातलें दंडवत। उत्तमान्न निवडोनि समस्त। सद्गुरूपुढें ठेविलें ॥ ९५ ॥ मग संतुष्ट होऊनियां चित्तीं। काय बोले गोरक्षाप्रती। वडे बहुत मिष्ट लागती। होतसे तृप्ती यांचेनी ॥ ९६॥ तरी उदईक जाऊनि नगरातें। ऐसेच आणोनि देई मातें। अवश्य ह्मणोनि गमनातें। गोरक्षनाथ करीतसे॥९७॥दुसरे दिवशीं प्रातःकाळीं। हातीं तत्काळ घेतली झोळी। ग्रामांत जाऊनि तये वेळीं। विचार करी मनांत ॥ ९८॥ ह्मणे आणिके घरीं जातां त्वरित। सत्वर साधेना कार्यार्थ। परी ब्राह्मण जेवित होते जेथ। जावें निश्चित त्या ठायां ॥ ९९॥ मग गोरक्षनाथ सत्वरीं। जाऊनि बैसला ब्राह्मणद्वारीं। ह्मणे माते वडा झडकरी। माझे पदरीं घाल आतां ॥१००॥ गृहस्वामीण येऊन त्वरित। गोर-



क्षासी वचन बोलत। वडे माझिया मंदिरांत। राहिले नाहींत सर्वथा ॥ १ ॥ काल गृहीं जेविले ब्राह्मण। ह्मणूनि तुजला दिधलें अन्न। आतांही मागतोसि तेंच अन्न। तरी द्यावें कोठून सांगपां ॥२॥ तिरुका अथवा धान्य झडकरीं। मी घालितें तुझे पदरीं। परी वडे नाहींत माझे घरीं। जाण निर्धारीं जोगिया ३गोरक्ष ह्मणे तियेसी। आणिक इच्छा नाहींच मजसी। उदंड दिधल्या द्रव्यराशी। तरी मृत्तिका ऐशी मज भासे ४ ऋद्धि सिद्धि राज्य संपत्ती। इंद्रपदही आलिया हातीं। पाहीं विशेषचारी मुक्ती। त्या मज नलागती सर्वथा५एकसद्गुरुइच्छा करावयापूर्ण। वडा मागतों तुजकारण। घेतल्याविण जरी मी जाईन। तरी त्याचीच आण वाहतसें ६येरी ह्मणे करितोसि जुलूम। धर्मकरितां वोढवलें कर्म। अतीत नव्हे तूं वेषधारी परम। अन्न उत्तम इच्छितोसी७श्वानासि एकदां टाकितां भाकरी। तें तैसेंचि सोकून येतसे द्वारीं। तैसीच या याचकाची परी। मज निर्धारीं कळों आलें८गोरक्ष बोले प्रतिवचन। आह्मीं श्वानापरीस आहों हीन। परी वडे घेतल्यावांचून। जाय कदा न सर्वथा ॥ ९ ॥ येरी ह्मणे हटवादिया। नसतांचि वेऊन बैसलासि थाया। तरी तूं आपुला एक डोळा काढोनियां। दे लवलाह्या मजलागीं ॥ ११० ॥ ऐकूनियां गोरक्ष बोले वचन। मी नेत्र देतों तुजकारण। येरी ह्मणे करणीवांचून। व्यर्थ बोलणें कासया ।११। तुह्मा अतीतांची ऐसी रीती। ज्ञान सांगावें दुसऱ्यांप्रती। आपण अविवेकें वर्तती। अज्ञानभ्रांतीकरूनी ॥ १२॥ वचन ऐकोनि गोरक्ष सत्वरीं। डोळयांत घालून करांगुळी। बुबुळ काढोनि झडकरी। तिचे हातीं देतसे ॥१३॥ ऐसें देखोनि त्वरित। घरधनीन जाहली भयभीत। ह्मणे दिवाणास कळल्या मात। तरी नागवील निश्चित आह्मांसी ।१४। मग भयेंकरून आड केलें द्वार। गोरक्षासि घाली नमस्कार। ह्मणे मी बोलिल्यें बाह्यात्कार। तुझा निश्चय नकळतां ।१५। रुधिर वाहत नेत्रांतूनी। तें पल्लवें पुसी तये क्षणीं। गोरक्ष ह्मणे तिजलागूनी। भयभीत मनीं न व्हावें ॥१६॥ गोरक्ष जरी धरिता कोप। तरी ब्रह्मांड जळतें त्याचे शापें। परी तो शांतिक्षमेचा केवळ रोप। न येच संताप मानसीं ॥१७॥ चालतां पाऊल पडेल जेथ। सकळ सिद्धी वोळंगती तेथ। परि तो तयांसी नव्हे लिप्त। भिक्षा मागत घरोघरीं ॥ १८ ॥ उदंड तपस्वी असेल आथिला। आणि कामक्रोधा वरपडा जाहला। तरी तो निजसुकृतासी मुकला। यथार्थ बोला मानिजे ॥१९॥ अथवा ऋद्धिसिद्धींची लोलंगता। तयासि लागली जरी अवचिता। तरी अंतरला परमार्थस्वार्थी। जाहला गुंता महाविघ्नें ॥१२०॥ ह्मणोनि मत्स्येंद्राचा सुत। कामक्रोध जिंकोनि त्वरित। ऋद्धिसिद्धीस हाणोनि लात। उदासयुक्त वर्ततसे ॥२१ ॥ मग घरधनीन जाऊनि मंदिरांत। वडियांचें साहित्य घेवोनि त्वरित। डाळ दळोनि आपुल्या हातें। लवणजिरें आंत घातलीं ॥ २२॥ घृतांत तळोनियां झडकरी। बाहेर घेऊनि आली सत्वरीं। गोरक्षाचे चरणावरी। नमस्कार करी साष्टांग ॥ २३॥ वडे घालोनियां झोळींत। कर जोडोनियां विनवित। ह्मणे बाहेर हे मात। कळों न यावी सर्वथा ॥२४॥ अवश्य ह्मणोनि ते अवसरीं। ह्मणे निर्भय असावें अंतरीं। नेत्र झांकूनियां करकमळीं। मत्स्येंद्राजवळी पातला ॥ २५॥ सद्भावें करूनियां नमन। ह्मणे भिक्षा मागूनि आणिलें अन्न। तरी स्वामींनीं कृपा

करून । करावें भोजन यथारुची ॥ २६ ॥ नेत्र फुटला कासयानें । मत्स्येंद्रनाथें केला प्रश्न । येरू उभा कर जोडून । वृत्तांत अवघा सांगतसे ।२७। वडे मागतां भिक्षेतें । तिणें नेत्र मागितला मातें । मग बुबूळ काढोनि निजहस्तें । दिधलें असे स्वामिया ॥२८॥ मत्स्येंद्र ह्मणे तयाप्रती । धन्य तुझी धैर्यवृत्ती । तरी दुसरा नेत्र मजप्रती । काढोनि देईं सत्वरा ॥२९॥ अवश्य ह्मणूनि गोरक्षनाथ । दुसरा नेत्र काढिला त्वरित । देखोनि मत्स्येंद्र झाले विस्मित । ह्मणे सद्गुरुभक्त तूं खरा ॥१३०॥ मग हस्त उतरितां नेत्रांवरूनी । तेणें दिव्यचक्षू जाहले तये क्षणीं । तेव्हां गोरक्षासि उपदेश देऊनी । आत्मज्ञान सांगितलें ३१ मग भोजन करूनि प्रीतीसीं । प्रसाद दिधला गोरक्षासी । ह्मणे तुजऐसा शिष्य मजसी । न दिसे दृष्टीसी सर्वथा ।३२। त्या गोरक्षनाथें शांभवाला । अधिकार पाहूनि उपदेश केला । तो निजबोध त्यासी ठसावला । संशय उडाला निजकृपें ।३३। तेव्हां अद्वयानंद शांभवासी । शरण आले सद्भावेंसी । तेणें कृपा करूनि त्यांसी । हस्त मस्तकीं ठेविला ॥३४॥ मग अद्वयानंदें कृपा करूनी । प्रभवासि लाविलें आत्मज्ञानीं । गैनीनाथासी तयांनीं । योगमार्ग सांगितला ॥३५॥ गैनीपासूनी निवृत्तिराव । निवृत्तीचा ह्मणवी ज्ञानदेव । ज्ञानदेवासी अनन्यभाव । विसोबा खेचर विनटला ।३६। नामदेव जो वैष्णवभक्त । तो विसोबासी शरणागत । त्या विष्णुदासाचा वरदहस्त । जनीस लाधला निजकृपें ।३७। ऐसें ऐकूनिया निरूपण । श्रोते संतोष पावले जाण । ह्मणती आमुचा संशय निवारण । जाहला जाण वक्तया ३८ असो कोणे एके दिवसीं । ज्ञानदेव गेले राउळासी । ह्मणती आज्ञा द्यावी आह्मांसी । अलकावतीसी जावया ।३९। नमस्कार करूनि रुक्मिणीपती । तेथूनि निघाले सत्वरगतीं । येऊनियां अलकावती । सिद्धेश्वराप्रती वंदिलें ।१४०। विष्णूचा अवतार साक्षात । ज्ञानदेव हा मूर्तिमंत । हें चांगदेवासि जाहलें श्रुत । ते आले त्वरित भेटीसी ॥ ४१ ॥ ह्मणाल चांगदेव कोठील कोण । तरी तेंही ऐका निरूपण । श्रोतयांनीं स्वस्थ करूनि मन । सावधान परिसावें ॥४२॥ विरिंचिचे पहिल्या प्रहरांतूनी । चवदा इंद्र गेले होऊनी । तितुकेही पडिले बंदीखानीं । विचित्र करणी कर्माची ॥ ४३ ॥ तंव एके दिवसीं ब्रह्मकुमर । जो भक्तिज्ञानासी आगार । तो नारदमुनि वैष्णववीर । अकस्मात पातला ।४४। तयासि देखतांचि जाण । चवदाजणीं केलें नमन । देवऋषि करूनि हास्यवदन । सप्रेम गायन करीतसे ।४५। त्यांतही चांगा पुरंदर भला । बहुत दिवस निर्बुजला । तेणें हात जोडोनी ते वेळां । प्रश्न केला नारदासी ॥४६॥ ह्मणे माझी सुटका होईल जेणें । तो उपाय सांगा कृपा करून । जन्ममरणाचें होय खंडन । तें मोक्षसाधन सांगावें ॥ ४७ ॥ ऐकोनि ह्मणे ब्रह्मसुत । तें या लोकीं नव्हेच निश्चित । तरि तूं मृत्युलोकीं जाऊनि त्वरित । अवतार घेईं चांगया ॥ ४८ ॥ तेथें महाक्षेत्र पुण्यपंढरी । भूवैकुंठ महीवरी । साक्षात् परब्रह्म विटेवरी । असे निर्धारीं जाणपां ॥ ४९ ॥ संतसमागम कीर्तनगजर । जीवन्मुक्त अवघे नारीनर । त्वां कर्मभूमीसि घेऊनि अवतार । करी उद्धार आपुला ॥ १५० ॥ अमरपुरीं सत्यलोकीं जाण । वसताति जे प्राणिगण । तयासि न घडे मोक्षसाधन । मृत्युलोकावांचूनी ॥ ५१ ॥ ऐकोनि नारदाचें वचन । साष्टांग नमस्कार घातला त्यानें । ह्मणे या देहापासोनि सुटेन । ऐसा उपा-



य करावा ॥ ५२ ॥ मग द्वादशाक्षरी मंत्र । नारदें त्यासी सांगितला सत्वर । तेव्हां त्या देहापासून मुक्त लवकर । तत्काळ जाहला ते समयीं ॥ ५३ ॥ पुण्यस्तंभीं गंगातीरीं । मरुद्गण ब्राह्मणाचे उदरीं । चांगा इंद्र ते अवसरीं । अवतार धरी तेधवां ॥ ५४ ॥ विठोबा रुक्मिणी दोघेंजण । अति वृद्ध होतीं ब्राह्मण । तयांसी होतां पुत्रनिधान । परमानंद वाटला ॥५५॥ बाळक तेजस्वी देदीप्यमान । पाहतांचि आनंदलें मन । आठवे वरुषीं व्रतबंध करून । केलें लग्न तयाचें ॥ ५६ ॥ मनांत कल्पना येतांचि जाण । इच्छामात्रें करी गमन । मुखीं बोलतां आशीर्वचन । घडोन येत तत्काळ ॥ ५७ ॥ चालतां पाऊल पडे जेथें । सर्व सिद्धि बोळंगती तेथें । चतुर्दश विद्या सर्व अवमतें । चौसष्टी कला संपूर्ण ॥ ५८ ॥ यम नियम प्राणायाम । अवमत असे तयालागून । शत वर्षें होतां संपूर्ण । तंव मृत्युकाळ समीप पातला ॥ ५९ ॥ मग आत्मा ब्रह्मांडीं ठेऊनि जाणा । चांगदेवें केली कालवंचना । सत्य टाळूनियां प्राणा । माघुती देहांत आणितसे ॥१६०॥ ऐसे जाहले दिवस बहुत । वर्षें लोटलीं चौदा शत । परी तयासि काळाचा आघात । सर्वथा निश्चित लागेना ॥ ६१ ॥ वार्धकदशा नयेचि अंगीं । प्रशंसा बहुत वाढली जगीं । नित्य पंढरीस कीर्तनरंगीं । जाऊन नृत्य करितसे ॥ ६२ ॥ स्वानंदें शांत तापीतटीं । तेथें राहात आपुले मठीं । मग पुण्यस्तंभीं गोदातटीं । नित्य स्नाना येतसे ॥ ६३ ॥ शिष्यसंप्रदायी केले बहुत । संख्या करितां चवदा शत । इतुके सवें घेऊनि त्वरित । गमन करित ऊर्ध्वपंथें ॥ ६४ ॥ इतुकें सामर्थ्य असोनि देहीं । परी चांगदेवें सद्गुरु केला नाहीं । शिष्यांसि ज्ञान सांगोनि कांहीं । सेवा घेत त्यांहातीं ॥ ६५ ॥ जैसें वैद्य भलतेंचि खात । दुसऱ्यासि सांगोनि देती पथ्य । नातरी विप्र असे अस्नात । प्रयोग सांगत आणिकांसी ॥ ६६ ॥ तेविं सिद्धीचें दाखवून सामर्थ्य । चांगदेवें संप्रदायी केले बहुत । परी आपण सद्गुरूचे अंकित । जाहले नाहींत सर्वथा ।६७। ह्मणे मृत्युलोक पाहतां धुंडोनी । मज योग्य सद्गुरु न दिसे कोणी । आमुचें सामर्थ्य कोणालागूनी । न दिसे नयनीं सर्वथा ॥६८॥ मग परस्परें कर्णीं ऐकिली मात । ह्मणती विष्णु-अवतार साक्षात । ज्ञानदेव अलकापुरींत । मूर्तिमंत वसतसे ॥ ६९ ॥ चांगदेवें विचारिलें मनीं । ह्मणे शरण जावें तयालागूनी । ज्ञानदेवासि पत्र लिहूनी । आधीं उत्तर आणवावें ॥ १७० ॥ मग दऊत लेखणी घेऊन हातीं । विचार करी आपुले चित्तीं । ह्मणे चिरंजीव लिहूं तयाप्रती । तरी उपदेश घेणें लागतो ॥ ७१ ॥ तीर्थरूप ल्याहावें विचारी मनीं । तरी धाकुटा ज्ञानदेव आह्मांहूनी । मग कोराचि कागद घडी करूनी । शिष्याहातीं पाठविला ॥ ७२ ॥ सिद्धेश्वरीं अलकावती । ज्ञानदेव बैसले सहजस्थितीं । ध्यानीं आणोनि रुक्मिणीपती । सप्रेम भजन करितसे ॥ ७३ ॥ तों आकाशपंथें अकस्मात । चांगदेवाचे शिष्य येत । हें ज्ञानदेवें जाणूनि त्वरित । तयांस वृत्तांत सांगती ॥७४॥ आधीं न सांगतांचि मात । ह्मणती चांगदेवें धाडिलें दूतें । तेणें नमस्कारूनि त्वरित । पुढें पत्र ठेविलें ॥ ७५ ॥ उकलूनि पाहती जंव सत्वरीं । तों अक्षर न दिसेची त्याबरी । ह्मणे चवदा शत वर्षें लोटलीं परी । अजूनि कोराची राहिला ।७६। जेविं फळ न येतां साचार । अमृत वृक्ष वाढला थोर । कीं जळ नसतांचि सरोवर । वायांचि विस्तीर्ण बांधिलें ॥७७ ॥ संतान नसतां वाढली कांता । कीं सा-

मर्थ्यावांचूनि पुरुष वृथा। सौभाग्याविण अलंकारभूषणें तत्वता। लेऊनि वनिता व्यर्थची ।७८। वैराग्याविण संन्यास-ग्रहण। कीं कृपणाचें उंच सदन। कीं औदार्याविण संचितधन ।व्यर्थ काय जाळावें।७९।कीं करुणा नसतां आपुले पोटीं। भूतदयेच्या व्यर्थचि गोष्टी। कीं पर्जन्य न पडतां सृष्टीं। अभ्र गगनीं व्यर्थची ।८०। तेविं सद्गुरूसि न जातां शरण।व्यर्थचि आयुष्य गेलें जाण। चवदाशें वर्षें वांचून। काय केलें सार्थक॥८१॥ऐसें ज्ञानदेवे बोलोनि त्वरित। आपुले हातें प्रतिउत्तर लिहीत। ह्मणे चैतन्य तो सर्वगत। सर्वांभूतीं एकची ॥८२॥ तें वडील नव्हे ना धाकुटें। परिवारी नव्हे ना एकटें। दीर्घ नव्हे ना खुजटें। दूर ना निकट सर्वथा ॥ ८३ ॥ अभ्र दाटोनि भरलें गगन। परी आकाश तितुकेंच असे जाण। तरी स्थूळ वाढलें अथवा लहान। परी सच्चिदानंद तितुकेंची ॥ ८४ ॥ जें जें दिसतसे ब्रह्मांडीं। तितुकेही पदार्थ आपुले पिंडीं। परी माया अविद्या बहु कुडी। ते दृष्टी चोखडी होऊं नेदी ॥ ८५ ॥ अविद्येचे योगें निश्चितीं। आपुली आपणा पडली भ्रांती। विवेक करूनि आपुले चित्तीं। मागील आठव धरावा ॥ ८६ ॥ जें सकळ विश्वाचें निजबीज। तें तुमचें तुह्मापाशीं आहे सहज। पत्रीं लिहीत ज्ञानराज। चांगया उमज ह्मणोनी ।८७। ऐसें लिहूनी तयाप्रती। पाठविलें सत्वरगतीं। चांगयानें वाचितां चित्तीं। अनुभव तत्काळ जाहला ॥८८॥ ह्मणे ऐसा जो कां ज्ञानसागर। त्याचिया भेटीस जाऊं सत्वर। मग आरूढोनि व्याघ्रावर। सामर्थ्य थोर दाखविलें ॥ ८९ ॥ चौदाशें शिष्यांचा समुदाव। घेऊन चालिला चांगदेव। तों इकडे अलकावतीस ज्ञानदेव। बैसले होते भिंतीवरी ॥ १९० ॥ तयासि सांगती लोक सत्वर। एक अतीत आला असे थोर। आरूढोनियां व्याघ्रावर। चाबूक केला सर्पाचा ॥ ९१ ॥ ऐसें ऐकोनियां वचन। ज्ञानदेवासी कळली खूण। ह्मणती चांगयाचें आगमन। जाहलें असेल वाटतें ॥ ९२ ॥ मग बैसले होते भिंतीवरी। तीस आज्ञा केली ते अवसरीं। ह्मणती चांगदेव बैसोनि व्याघ्रावरी। येती लवकरी भेटावया ॥९३॥ घरासि येतील साधुसंत। तूंही सामोरें चाल त्वरित। ऐकोनि ज्ञानदेवाची मात। नवल अद्भुत वर्तलें ॥ ९४ ॥ बैसले होते जयावरी। ते भिंतचि चालिली अतिसत्वरीं। कौतुक देखोनि नरनारी। आश्चर्य करिती मनांत ॥ ९५ ॥ ग्रामाबाहेर येतांचि जाण। चांगदेवें वोळखिलें दुरून। ह्मणे निर्जीवासी चालविलें जेणें। धन्य महिमान गुरूचें ॥ ९६ ॥ सजीव व्याघ्राचे बैसोनि पाठीं। मी काय जातों तयाचे भेटी। मग खालीं उतरून उठाउठी। लोटांगणीं चालिले ।९७। अभिमान होता मनांत। तो तत्काळचि जाहला गलित। जेविं दृष्टीं देखतां अमृत। औषधी लज्जित होताती ॥ ९८ ॥ कीं भरताचा पराक्रम देखोनि। मारुती विस्मित अंतःकरणीं। कीं सीतेचें रूप धरितां रुक्मिणी। सत्यभामा मनीं लज्जित ॥ ९९ ॥ कीं जांबवतीच्या स्वयंवरांत श्रीकृष्णें। अस्वलाहातें करविलें गायन। तेव्हां नारदाचा अभिमान। गलित जाहला तत्काळीं ॥ २०० ॥ नातरी गायी गोपाळ सत्यलोकासी। विधीनें चोरून नेलीं जैसीं। श्रीकृष्णें आणिक निर्मिलीं तैसीं। विधि मानसीं लज्जित ॥२०१॥ तेविं ज्ञानदेवें चालवितां भिंती। चांगदेव आश्चर्य करी चित्तीं। ह्मणे हा साक्षात पांडुरंगमूर्ती। सद्भाव चित्तीं धरियेला ॥ २ ॥ मग वटवृक्षाचे तळवटीं। उभयतांच्या जाहल्या भेटी। ज्ञानदेवाच्या ऐकोनि गोष्टी। चांगदेव पोटीं संतोषला ॥ ३ ॥ अद्यापि त्या ठायांकारण। विश्रांतिवट ह्मणती जाण। तेथें क्षणभरी बैसती जाऊन। ते सायुज्यसदन पावती ॥ ४ ॥ मग ज्ञानदेव चांगयासी धरून हातीं। घेऊन आले आश्रमाप्रती। मुक्ताबाई सहजस्थितीं। मंगलस्नान करीतसे ॥ ५ ॥ हें चांगदेवासि कळतां जाण। माघारा गेला परतोन। तयासि मेल्या निगुऱ्या ह्मणोन। मुक्ताबाई वचन बोलिली ॥६॥ ऐसें ऐकोनि ते अवसरीं। चांगया धांवूनि चरण धरी। ह्मणे माते तुज अंतरीं। कळलें कैसें मज सांग॥७॥ ऐसें ऐकोनि आदिमाया। काय उत्तर देतसे तया। तूं मागें गेलासि परतोनियां। ह्मणोनियां कळलें मजलागीं ॥८॥ जरी गुरुकृपा असती तुजवरी। तरी विकार न येता अंतरीं। भिंतीस कोनाडे तैसियापरी। मानुनि पुढें येतासी ॥ ९ ॥ जनीं वनीं हिंडतां गाय। वस्त्रें नेसत असती काय। त्या पशू ऐसीच मी पाह्य। तुज कां नये प्रत्यया ॥ २१० ॥ ऐकोनि मुक्ताबाईचें वचन। चांगदेवें दृढ धरिले चरण। मग ज्ञानदेवासी जाऊन शरण। त्याचा अनुग्रह घेतला ॥ ११ ॥ साक्षात परब्रह्म मूर्तिमंत। त्याचा मस्तकीं पडतां हस्त। चांगदेव जाहले अतिविरक्त। देहममता टाकूनी ॥१२॥ सकळ अभिमान जाऊन। निष्कलंक जाहलें मन। चांगदेवें धरूनि चरण। स्तविलें बहु ज्ञानदेवा ॥ १३॥ धन्य अलकावतीस्थान। मृत्युलोकीं वसविलें वैकुंठभुवन। कीं दुसरीच पंढरी निर्माण। जाहली असे भूमंडळीं ॥ १४॥ जेथें ज्ञानदेवाची भक्ती। तेथें आले रुक्मिणीपती। त्याचे चरण महीपती। हृदयीं चिंती सर्वदा ॥१५॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। द्वाविंशतितमाध्याय रसाळ हा ॥२१६॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय २२॥

॥ श्री भक्तविजय अध्याय २२ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीकंसांतकाय नमः । आजि दैवदशा धांवोनि सत्वरा । पातली श्रोतयांच्या घरा । जे भक्तकथा ऐकतां चतुरा । अनुभव अंतरा आला कीं ॥ १ ॥ जेविं निजांगें शर्करा खातां देख । गोडी लागे अधिकाधिक । तेविं भक्तकथा ऐकतां सुख । अंतरीं विवेक ठसावे ॥२॥ कीं सुधारस सेवितां लवडसवडी । सकळ व्याधि पळती तांतडी । तेविं भक्तकथेची लागतां गोडी । अविद्या धडपुडी बाधेना ॥३॥ उदंड कथा आहेत सकळ । परी हें शांतिवृक्षाचें अमृतफळ । सेवूं जाणती भक्तप्रेमळ । विकल्पजाळ टाकूनी ॥४॥ भक्तकथा ऐकूं जे ह्मणती । ते कळिकाळासि वश न होती । ह्मणोनि सादर होऊनि श्रोतीं । अवधान प्रीतीं मज द्यावें ॥५॥ मागील अध्यायीं कथा सुरस । चांगदेवासि जाहला उपदेश । मग एकदां सकळ संत एकादशीस । पंढरपुरास चालिले ॥ ७॥ तंव अंत्यजयातींत आगळा । वैष्णवभक्त चोखामेळा । तयासि प्रसन्न घनसांवळा । अंतरीं कळवळा देखोनी ॥७॥ मग जन्मभूमी पंढरींत । कुटुंबासह राहिला तेथ । हृदयीं आठवोनि रुक्मिणीकांत । नामस्मरण करीतसे ॥८॥ स्नान करूनि भीमातीरीं । प्रदक्षिणा घाली सर्व पंढरी । मग येऊनियां महाद्वारीं । लोटांगण घालीतसे ॥९॥ आंत जाऊन घ्यावें दर्शन । हा अधिकार नाहीं त्याकारण । ह्मणोनि ध्यानीं आणोनि जगज्जीवन । दुरूनि नमन करीतसे ।१०॥ तंव कोणेएके अवसरीं । बैसला होता महाद्वारीं । तयासि देखोनि दुराचारी । काय बोलती तें ऐका ॥११॥ विठोबासि तुझी असती प्रीती । तरी राउळांत नेता तुजप्रती । दृष्टीस न देखतां रुक्मिणीपती । करिसी व्यर्थ भक्ती कासया ॥ १२ ॥ विप्रांघरीं निपजलें पक्वान्न । त्या अनसुटपात्रीं न बैसे श्वान । तेविं पांडुरंगभक्तीस अधिकारी जाण । अंत्यजयाती नसे कीं ॥१३॥ कीं नृपवराचे भोगमंदिरीं । भणगा प्रवेशेल कैशियापरी । तेविं चोखामेळ्यासि राउळांतरीं । जातां नयेची सर्वथा ॥१४॥ नातरी निर्दैवी फिरतां रानोरानीं । तयासि कल्पतरु न दिसे नयनीं । तेविं चोखामेळ्यासि चक्रपाणी । न दिसे नयनीं सर्वथा ॥१५॥ कीं अमृतकुंड पहावया दृष्टीं । आयुष्यहीन व्यर्थचि लाळ घोंटी । तेविं राउळीं असोनि जगजेठी । तुज नव्हेचि भेटी सर्वथा ।१६। ऐसें ऐकूनियां वचन । तयांसि केलें साष्टांग नमन । ह्मणे मायबापा मज एवढें भूषण । व्यर्थ कासया पाहिजे ।१७। उंच लक्ष गांवें वासरमणी । दुरूनि सांभाळी जैसा कमळिणी । तेविं राउळीं असोनि चक्रपाणी । माझा सांभाळ करीतसे ।१८। कीं दोन लक्ष गांवें निशापती । परी त्याची चकोरावरी अत्यंत प्रीती । तेविं अनाथनाथ कृपामूर्ती । माझें स्मरण करीतसे ॥१९॥ नातरी कांसवी आपुलिया पिलियांसी । दुरूनि सांभाळ करी जैसी । तेविं आपुले दासांसि हृषीकेशी । कृपा दृष्टीं पहातसे ।२०। अखंड असतां सन्निध पाहीं । जरी प्रीती नसली त्याचे ठायीं । तरी निकटवास करूनि कांहीं । सार्थक नाहीं सर्वथा ।२१। ऐसें बोलोनि त्या अवसरा । सत्वर गेला निजमंदिरा । हृदयीं आठवूनि रुक्मिणीवरा । भजन करी सप्रेमें ॥२२॥ तंव रात्रीं येऊनि पंढरीनाथ । चोखामेळ्यासि काय बोलत । आज मी आपुले राउळांत । नेतों त्वरित तुजलागीं ॥२३॥ ऐसें बोलोनि रुक्मिणीपती । ततयासि सत्वर धरिलें हातीं । अंतर गाभारां निजप्रीतीं । घेऊन गेला तेधवां ॥२४॥ आपुले जीवींचें निजगुज । चोख्यासि

सांगे गरुडध्वज । ह्मणे तुजवांचोनि क्षणेक मज । न कंठेची सर्वथा॥२५॥नामयासवें करितां भोजन । कीं आवडीं से-
वितां अमृतपान । ते वेळीं तुझी आठवण । माझिया मनांत होतसे ॥२६॥ ऐसें बोलतां हृषीकेशी । चोखा लागला चर-
णासी । ह्मणे तूं अनाथनाथ ह्मणविशी । ळळे पाळिसी दासांचे।२७ऐसा संवाद ते अवसरीं । पूजारी ऐके निजोनि द्वा-
रीं । मग विस्मित होऊनि अंतरीं । उठिला झडकरी तेधवां ।२८। मग आणिकासि साक्ष बोलावूनी । वृत्तांत सांगे तया-
लागोनी । ह्मणे चोख्या ऐसा दुसरा कोणी । चक्रपाणीसी बोलतो ।२९। साक्षात परब्रह्म वैकुंठवासी । अंत्यज जाऊनि
शिवला त्यासी । द्वारासि कुलुपें असोन तैसीं । गेला तो कैसा कळेना।३०।वस्त्रें भूषणें देवावर । तयासि शिवला अंत्य-
जनर । बुडाला ब्राह्मण आचार। कैसा विचार करावा ।३१। जैसा पौर्णिमेचा निशापती ।अतिसोज्वळ त्याची कांती।
मग राहु येऊन सत्वरगतीं । आलिंगन प्रीतीं देतसे ।३२। नातरी अमावास्येचा वासरमणी । सत्वर चालतां देखोनि ग-
गनीं । त्यासि अकस्मात केतु येऊनी । कलंक लावी निजतेजा।३३।तेविं षड्गुणैश्वर्य रुक्मिणीपती । श्रुतिंशास्त्रें जयासि
वर्णिती । त्यासि अंत्यज येऊनि रात्रीं । भेटतो प्रीतीं निजप्रेमें॥३४॥ ऐसियास उपाय कवण । कैशा रीतीं निवारे विघ्न।
एक ह्मणती बोलावून । तयासि पुसावें सत्वर।३५।मग कुलूप काढोनि सत्वरगतीं । चोख्यासि वृत्तांत अवघे पुसती । ह्म-
णती राउळीं आलास कैशा रीतीं । तें सांग निश्चितीं आह्मांसी ।३६। ऐकोनि बोले चोखामेळा । ह्मणे मी तुमचा लेंक-
वळा । मज हातीं धरूनि घनसांवळा । आणी राउळा बळेंचि ।३७। आतां अन्याय घालोनि पोटीं । मजवरी करा कृपा-
दृष्टी । ऐसें ह्मणून उठाउठी । निघता जाहला तेधवां।३८।मग पुजारी तयासिं वचन बोलत । तुवां न रहावें पंढरींत । येथें
असतां पंढरीनाथ ।आणितो राउळांत तुजलागीं । ३९ । ह्मणोनि चार पाउलें दूरीं । राहावें चंद्रभागेचे पैलतीरीं । नाहीं
तरी शिक्षा झडकरी । तुज निर्धारीं करूं आह्मी । ४० । तुवां थोर केला अन्याय । बाटवूनि टाकिला देवाधिदेव । या दु-
रितेंकरूनि रौरव । भोगणें लागे तुजलागीं ॥ ४१ ॥ ऐसें बोलतां द्विजवर । मग चोखा देतसे प्रत्युत्तर । म्यां बाटविला रु-
क्मिणीवर । हा मिथ्या विचार बोलतसां ॥४२॥ तरी अंत्यजें आणि ब्राह्मणें । दोघीं गंगेंत केलें स्नान । हें देखतां गंगेसि
दूषण । ठेवूं नये सर्वथा ॥४३॥ कीं चोखाळ वाटे जी क्षिती । तिजवर चालती सकळ याती । तीस विटाळ जाहला कैशा
रीतीं । कवणें शास्त्रीं लिहिलें ।४४। कीं दुर्जनासि स्पर्शतां पवन । त्यास न लागे त्याचा अवगुण । मग वायांचि विकल्प
धरूनि मनीं । वायूस दूषण ठेवणें॥४५॥कां सौंदणी आणि रांजणांत । आकाश बिंबलें देखोनि त्वरित । परी त्या दोहींत
असोनि अलिप्त । गुंतोनि निश्चित न राहे।४६। तेविं देवाधिदेव रुक्मिणीपती । त्यासि सारिख्या सकळ याती । तयासि
विटाळ कैशा रीतीं । तुमचे चित्तीं भासतो ॥ ४७ ॥ अनंत ब्रह्मांडें भरून जाणा । अलिप्त असे वैकुंठराणा । तरी वायांच
विकल्प धरूनि मना । होतसां दूषणा अधिकारी ।४८। ऐसें ऐकतां दृष्टांतवचन । क्रोधयुक्त बोलती ब्राह्मण । सकळ या-
तींत नीच मलिन । आह्मां ज्ञान सांगतसे।४९।शलभ आपुल्या शाहाणपणेंकरून । गरुडासि शिकवितो उड्डाण । कीं अ-



जापालक येऊन । बृहस्पतीसी ज्ञान सांगे ।५०। कीं सुवर्णापुढें बेगड सवेग । दाखवी आपली झगमग । कीं शेषापुढें इतर
नाग । मणिभूषण दाखविती॥५१॥कीं ऐरावतापुढें इतर वारण । करून दाखविती स्थिरगमन। कीं शंकरापुढें इतर गण।
तांडव करून दाखविती।५२।कीं वासरमणी देखोनि सहज । त्यापुढें खद्योत मिरवी तेज । कीं अगस्तीस देखोनि सहज।
पयोब्धि गर्जना करितसे॥५३॥तेविं आह्मी ब्राह्मण उंचवर्ण । सर्व शास्त्रीं असतां निपुण । तूं नीच जाती अंत्यज होऊन।
आह्मांसि ज्ञान सांगसी ।५४।आतां भीमरथीचे पैलतीरीं । जाऊन रहावें त्वां सत्वरीं । उदर्थीक दृष्टीं देखिला जरी । मग
शिक्षा बरी पावशील।५५।शब्द ऐकोनि द्विजांचा । चोखामेळा बोले वाचा।ह्मणे मायबाप सेवक मी तुमचा । झाडवान
साचा ह्मणवितों॥५६॥बहुत दिवस सांभाळ केला । आतां भवंडोनि देतां मजला । ऐसें ह्मणूनियां डोळां । अश्रुपात लो-
टले॥५७॥ह्मणे कृपावंत विठ्ठलमाये । आजपासूनि अंतरले पाय । माझें प्राक्तन बळवंत आहे । करावें काय तयासी।५८।
ऐसें ह्मणोनि ते अवसरीं । घरासि गेला अतिसत्वरीं । हरिरूप आठवूनि अंतरीं । स्मरण करी निजप्रेमें॥५९॥कांतेसि सां-
गोनि वृत्तांत।ह्मणे आह्मांसि उबगला पंढरीनाथ । आतां पैलतीरा जाऊनि त्वरित । तेथेंच राहूं उभयतां ६०मग सन्मुख
लक्षूनि देउळा । पैलतीरीं बांधिली दीपमाळा । तेथें राहूनि चोखामेळा । हृदयीं घननीळा चिंिततसे।६१।अद्यापि यात्रेस
जाती कोणी । ते दीपमाळा देखती नयनीं । ते स्थळीं भक्त शिरोमणी । उदास होऊनि राहिला।६२।ध्यानांत आणूनि रु-
क्मिणीपती । भजन करी सप्रेमयुक्तीं । ह्मणे देवें मोकलोनि मजप्रती।टाकिली प्रीती दिसताहे ६३ तंव एके दिवशीं भक्त
प्रेमळ । भोजन करी चोखामेळा । तों अकस्मात येऊनि घननीळ । बैसले तत्काळ सांगातें।६४।निंबाचिया वृक्षाखालीं ।
पडली होती दाट साउली । त्या छायेसि बैसोनि वनमाळी । चोख्यासंगें जेविती।६५।तों कांहीं कार्यास ते अवसरीं। तेथें
अकस्मात आला पुजारी । उभा ठाकोनि निमिषभरीं । दुरून कौतुक पाहतसे।६६।तों दहीं उसळोनि अकस्मात। वाढि-
तां खालीं पडलें त्वरित । कांतेसि ह्मणे अन्याय बहुत।घडला तूतें जाणपां ६७सवें जेवितोरुक्मिणीवर। तयाचा भरलासे
पीतांबर। ऐसें ऐकूनियां द्विजवर। अंतरीं विस्मित जाहला ।६८। मग कावळ्यासि ह्मणे ते वेळीं । निंबोळ्या चाखूनि टा-
किसी खालीं । येथें बैसले वनमाळी । त्यांच्या अंगासी लागती।६९।तरी येथोनि उठोनि त्वरित। आणिके शाखेवरी बैसें
निश्चित । ऐसें बोलतां वैष्णवभक्त । पुजारी मनांत संतापला ।७०। ह्मणे आह्मांसि देखोनि दृष्टीं । मिथ्या बोलतो अचाट
गोष्टी । अत्यंजासवें जगजेठी । कासयासाठीं जेवील ।७१। मग चोख्याजवळी विप्र त्वरित । धांवूनि आला अकस्मात।
एक चपराक मारूनि मुखांत । गेला त्वरित झडकरी॥७२॥स्नान करून भीमातीरीं । ब्राह्मण गेला देउळाभीतरीं । कौ-
तुक देखोनि ते अवसरीं । आश्चर्य करी मनांत ॥७३॥ विटेवरी उभा शार्ङ्गधर । त्याचा दह्यानें भरला पीतांबर । ऐसें दे-
खोनि द्विजवर । श्रीमुख सत्वर विलोकी ॥७४॥ तों देवाचा गाल सुजला जाण । दोनी निडारिले असती नयन । ब्राह्म-
ण मनीं विस्मित होऊन । अंतरीं खूण पावला॥७५॥ ह्मणे म्यां गांजिलें चोख्यासी । ते देवें साक्ष दाविली मजसी । जेविं

ब० अ. २३

दुर्जनें गांजिलें बाळकासी । तें दुःख मातेसी झोंबत ॥७६॥ तेविं भक्तांचें करितां छळण । दुःखी होतसे जगज्जीवन । मग
अभक्तांसि शिक्षा करून । वाढवी महिमान दासांचें ॥ ७७ ॥ ऐसा विवेक करून अंतरीं । पुजारी पातला भीमातीरीं ।
चोख्यासि ह्मणे ते अवसरीं । राउळांतरीं चाल आतां ॥७८॥ नेणतां भक्तीचें महिमान । म्यां व्यर्थचि केलें तुझें छळण ।
जेविं अमूल्य हिऱ्यासी मारून घण । आणिला शीण आपणासी ॥७९॥ तुज मीं शिक्षा केली येथें । तों राउळीं शिणले
पंढरीनाथ । गाल सुजला देखोनि मनांत । भयभीत मी जाइलों ॥८०॥तरी आतां निजभक्तराया । सत्वर चलावें तया
ठायां । कांहीं उपकार करूनियां । पंढरीराया तोषवावें ।८१॥मग चोख्यासि धरूनियां हातीं । पुजारी आला राउळा-
प्रती । दृष्टीं देखतां रुक्मिणीपती । संतोष चित्तीं जाहला॥८२॥ देवासि देतां आलिंगन । चित्तास वाटलें समाधान । सु-
जलें होतें हरीचें वदन । तें वोहटोनि गेलें तत्काळ ॥८३॥ निजभक्तांच्या वियोगदुःखें । शिणले होते वैकुंठनायक । भेट
होतांच तात्कालिक। अपारसुख पावले।८४। तैंपासोनि चोखामेळा ।उदास राउळीं येऊं लागला ।जेविं गंगेनें अंगिका-
रिला । तो पवित्र नाला जाहला कीं ।८५। संतसाधु वैष्णवजन । आनंदें निर्भर जाहलें मन । ह्मणती निजभक्तांचा अभि-
मान । जगज्जीवनें धरियेला ॥ ८६ ॥ आणिक एक चरित्र ऐक । रुक्मिणीस ह्मणती वैकुंठनायक । आजि बहुत आला
आह्मांसी टणक । रगडी क्षणएक मजलागीं ।८७ऐसें बोलतां चक्रपाणी । हांसून उत्तर देत रुक्मिणी । ह्मणे कवण कार्य
करूनी । आलेत सदनीं लवलाहें ॥ ८८ ॥ सांवत्याचा खुरपोनि आलेति मळा । ह्मणोनि शिणलेति भक्तवत्सला । कीं क-
बीराचे मागीं विणिला शेला । सप्रेम कळवळा देखूनी ॥८९॥ कीं नामयाचें शाकारिलें घर । नातरी लहुळासि जाऊनि
आलेति सत्वर । कीं ज्ञानदेव बैसले ज्या भिंतीवर । ते वोढितां साचार शिणलेति॥९०॥ किंवा चोख्याचीं ढोरें वोढिलीं
काय । तेणेंचि शिणले हातपाय । कीं जोग्याच्या धांवण्या लवलाह्य । तांतडी करून आलेती ॥९१॥ ऐकूनि रुक्मिणीचें
वचन । काय बोलती जगज्जीवन । आजि प्रातःकाळापासून । सारिलें दळण जनीचें ॥ ९२ ॥ नामयाचे घरीं बहुत । पा-
हुणे आले साधुसंत । ह्मणोनि आह्मीं जाऊन त्वरित । साधिला कार्यार्थ लवलाहें ॥ ९३ ॥ घरीं कामाची आडाडी । ज-
नीस झाली अतितांतडी । मग घागर घेऊनि लवडसवडीं । उदक देव्हडीं वाहिलें ॥९४॥ झाडाझाड करितां दासीजनी ।
आह्मीं टाकिला केर भरूनी । चारी हातें धुणें करूनी । साळी कांडोनी दीधल्या ॥९५॥ ऐसें बोलतां वनमाळी । विस्मि-
त जाहली भीमकबाळी । मस्तक ठेऊनियां चरणकमळीं । श्रीमुख न्याहाळी प्रीतीनें ॥ ९६ ॥ अरळसुमनाचे शेजेवरी ।
पर्यंकीं पहुडले श्रीहरी । रुक्मिणी बैसोनि शेजारीं । चरण चुरी स्वहस्तें ॥९७॥ आणिक ऐका नवल परी । कोणे एके अ-
वसरीं । नामदेव गरुडपारीं । कीर्तनीं उभा राहिला । ९८। मागें ह्मणावया उभा नाहीं कोणी । मग सत्वर पावले चक्रपा-
णी । स्वहस्तें टाळ घेऊनी । वाजवीत उभे राहिले॥९९॥ वैष्णवभक्त देखोनि नयनीं । आश्चर्य करिती अंतःकरणीं । इंद्रा-
दिक सुरवर येऊनी । पुष्पवृष्टी करिताती ॥१००॥ आणिक रूप धरूनि श्रीपती । कीर्तन रंगीं नृत्य करिती । तों पीतांबर

पा. ९४

ब० अ. २४

जप करा । एक ह्मणती द्रव्य सत्वरीं । वांटा आजि विप्रांसी ॥२७॥एक ह्मणती वांचा सप्तशती । आरोग्य करील श्रीभ-
गवती । जे जे जैसा उपाय सांगती।तैसें करिती पुत्र त्याचे ॥ २८ ॥ एक ह्मणती सूर्यनारायण । यासि करावें अर्घ्यदान ।
एक ह्मणती पुरश्चरण । गायत्रीचें करावें ॥२९॥ एक ह्मणती विश्वेश्वरा । महारुद्र अभिषेक करा । एक ह्मणती हरेश्वरा ।
प्रदक्षिणा घाला कीं ॥ ३० ॥ एक ह्मणती गजवदन । हाचि करावा प्रसन्न । संकटचतुर्थी व्रत करून । लाडू मोदक अ-
र्पावे ॥३१॥ एक ह्मणती पंचाक्षरी । आतां आणावा सत्वरीं । एक ह्मणती कैवारी । काळभैरव उपासावा ॥ ३२ ॥ एक
ह्मणती विप्र बोलावून । त्यासि द्यावें गजदान । एक ह्मणती तुळा करून । द्रव्य वांटा विप्रांसी ॥ ३३ ॥ ऐसें ऐकोनि
सकळ । उपाय केले तत्काळ । द्रव्य वेंचिलें सकळ । आरोग्य व्हावयाकारणें ॥ ३४ ॥ परी दिवसेंदिवस जर्जर । अ-
धिकचि जाहला सावकार । दुर्गंधि सुटली थोर । कोणी जवळ नयेती ॥ ३५॥ किडे पडिले सर्वांगासी । जीव होतसे
कासाविसी । मग ह्मणे भागीरथीसी । देह अर्पण करावा ॥ ३६॥ पुत्र कांता सोयरे स्वजन । सावकारें जवळ बोला-
वून । ह्मणे माझा देह नेऊन । भागीरथींत टाकावा ॥ ३७॥ तुह्मीं उपाय केले बहुत । परी माझें कर्म विपरीत । आतां
देहांत प्रायश्चित्त । भागीरथींत घेईन ॥ ३८ ॥ ऐसें ऐकूनियां वचन । शोक करिती मोहेंकरून । मग सावकारातें
उचलोन । गंगातीरासी पैं नेलें ॥ ३९ ॥ कौतुक पहावयाकारण । अमित मिळाले विश्वजन । सावकार देतो प्राण ।
व्यथा कठिण ह्मणउनी ॥ ४० ॥ भागीरथीचिये कांठीं । असंभाव्य जाहली दाटी । नरनारी पाहती दृष्टीं । नवल
करिती देखोनी ॥ ४१ ॥ एक ह्मणती आत्महत्या । याणें न करावी सर्वथा । एक ह्मणती पुत्रकांता । कैसीं या-
स उबगलीं ॥ ४२ ॥ एकासी एक उत्तर देती । शेवटीं आपुली ऐसीच गती । आतां तरी सावधान चित्तीं । श्रीहरिभजन
करावें ॥ ४३ ॥ ऐकूनि जनांचें उत्तर । तयांसि ह्मणे सावकार । आतां मजला सत्वर । भागीरथींत लोटावें ॥ ४४ ॥ न सो-
सवे दुर्धरव्यथा । वचन मानलें समस्तां । चार कुंभ आणूनि तत्वतां । हातांपायांसी बांधिले ॥४५॥तंव तेथें पद्मनाभ ब्रा-
ह्मण । आला करावया स्नान । मुखीं करीत नामस्मरण । राम कृष्ण गोविंदा ।४६। तो कबीराचा शिष्य जाण । सप्रेम क-
रित नामस्मरण । तुळसीमाळा गळां घालून । विष्णुभक्त पातला ॥ ४७ ॥ तों भागीरथीचे कांठीं । असंभाव्य जाहलीसे
दाटी । नरनारी पाहोनि दृष्टीं । होताति कष्टी निजमोहें ॥ ४८ ॥ पद्मनाभ पुसे ते वेळां । काय कौतुक पाहातां डोळां ।
त्यांणीं सर्व वृत्तांत सांगीतला । विष्णुभक्ताजवळी पैं ॥ ४९ ॥ ऐकोनि जनाचें बोलणें । तत्काळ आला जवळी त्वरेनें ।
सावकारासि बोलिला वचन । ह्मणे आपण प्राण न द्यावा ॥५०॥ चौऱ्यायशी लक्ष योनी हिंडतां ।हा नरदेह लाधला अ-
वचितां । तेंथेंही करितां आत्महत्या । नव्हे सुटका कल्पांतीं ।५१।कर्मभूमीस मनुष्यजन्न । तरी कांहीं करावें हरिभज-
न । तरीच जन्ममरणाचें खंडण । होईल जाण निश्चयेंसी ॥५२॥ पद्मनाभास ह्मणे सावकार । कर्म बलवंत अतिदुस्तर ।
ह्यां उपाय केले फार । आरोग्य व्हावयाकारणें ॥ ५३ ॥ सर्वांगासि पडले किडे । दुर्गंधि सुटली चहूंकडे । आप्तवर्गांसी

ण. ९६

पावन करावें ॥ २६ ॥ शुद्धभाव देखोनि अंतर। कृपा केली तयांवर। मस्तकीं ठेवूनियां कर। अनुग्रह सत्वर दीधला २७ मग रामेश्वरादि दक्षिणतीर्थें। सकळ पाहूनि कबीरभक्त। वाराणसीस गेला त्वरित। अनुतापयुक्त तेधवां ॥२८॥ तों इकडे जीवा तत्वा दोघेजण। बंधु उभयतां असती जाण। तयांसि निंदिती सकळ ब्राह्मण। न घेती दर्शन सर्वथा ॥२९॥ वाळीत घालोनि तयांप्रती। एकमेकांसी काय बोलती। यांसि सोयरीक जे करिती। ते अविंधपंक्तीं बैसती ॥१३०॥ साक्षात कबीर यवन ज्ञानी। त्याचा अनुग्रह होतांक्षणीं। ब्रह्मकर्मासि बोल लावुनी। सिद्धांत ज्ञानीं विनटले ॥ ३१ ॥ ऐसें बोलती सकळ पिशुन। परि ते नायकती तयांचें वचन। ह्मणती जातीसी काय कारण। सद्गुरुचरण उपासितां। ३२। तंव एकाचा पुत्र जाहला थोर। एकाची कन्या उपवर। ह्मणोनि जाहले चिंतातुर। चित्तीं विचार आठवेना ॥३३॥ कन्येसी वर न मिळे जाणूनी। वधू न मिळेच पुत्रालागूनी। मग वाराणसीस जाऊनी। कबीरापाशीं सांगीतलें॥३४॥ अंतरसाक्ष कमाळतात। न सांगतांच कळला वृत्तांत। ह्मणे आमुचा उपदेश घेतला त्वरित। घातलें वाळीत ह्मणोनी ३५ मग जीवा तत्वासि कबीरभक्त। ह्मणे माझें वचन ऐका त्वरित। तुह्मीं उभयतां आपुल्यांत। शरीरसंबंध करावा ॥३६॥ सांडोनि निजकर्माचें भय। सोयरीक करा निःसंशय। ऐसें ह्मणतां सद्गुरुराय। अवश्य ह्मणती ब्राह्मण ॥ ३७ ॥ मग कबीर ह्मणे तयांलागूनी। जरी विश्वास धराल माझे वचनीं। तरी तत्काळ अरिष्ट निरसोनी। सायुज्यसदनीं पावाल ३८ मग वंदोनि सद्गुरुचरण। सत्वर निघाले दोघे ब्राह्मण। आपुल्या देशास येऊन। धरिलें लग्न तेधवां ॥ ३९ ॥ लग्नतिथी करूनि नेमस्त। साहित्यासि लागले त्वरित। वृत्तांत ऐकोनि नगरांत। आश्चर्य वाटलें सकळांसी ॥१४०॥ आपुले मुखें मंत्र ह्मणून। केलें पुत्राचें मौंजीबंधन। उदयीक दोघांचें लावावें लग्न। निश्चय मनीं हा केला ॥४१॥ मग सकळ मिळून ब्राह्मण। तयांसि पुसती वर्तमान। तुह्मांसि सोयरा मिळाला कोण। उदयीक लग्न कैसें धरिलें ॥४२॥ ऐसें बोलतां द्विजवर। ते काय देती प्रत्युत्तर। आमचे गृहीं वधुवर। आहेती साचार उभयतां ॥ ४३ ॥ पशुपक्षी जया रीतीं। तैसीच असे आमुची याती। ऐसी ऐकोनी वचनोक्ती। आश्चर्य करिती धरामर॥४४॥ ह्मणती यांसि वाळीतां साचार। तरी अतांच होईल वर्णसंकर। निमित्त येईल आपणावर। क्षोभेल ईश्वर निर्धारें॥४५॥ सद्गुरुचरणीं विश्वास धरून। यांणीं टाकिलें कर्मठपण। आह्मासि निर्णय कळला पूर्ण। पाहिलें कसून मन यांचें ॥४६॥ मग जीवातत्वांस बोलावून। तयांसि ह्मणती सकळ ब्राह्मण। आह्मी सोयरीक तुह्मांलागून। स्वइच्छेनें देतसों ॥४७॥ तंव कन्येसि वर नेमून। पुत्रासि वधू विचारून। सकळ ब्राह्मणीं साहित्य करून। केलीं लग्नें तयांचीं ॥ ४८ ॥ मग उभयतां जाऊन वाराणसीं। वृत्तांत सांगितला कबीरासी। वचन ऐकोनी निजमानसीं। सद्गुरुनाथ संतोषले ॥ ४९ ॥ पुढिले अध्यायीं कथा गहन। पद्मनाभचरित्र अतिपावन। महीपती ह्मणे सभाग्य सज्ञान। द्यावें अवधान निजप्रीतीं॥१५०॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविक भक्त। त्रयोविंशाध्याय रसाळ हा ॥ १५१ ॥ अध्याय २३॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः॥ श्रीगोपालकृष्णाय मनः। जय भीमातीरवासी रुक्मिणीरमणा। भक्तजनपालका नारायणा। जडमूढतारका पतितपावना। जगज्जीवना आदिपुरुषा ॥१॥ दोनी कर ठेऊनि कटीं। उभा राहिलासि जगजेठी। नासाग्रीं ठेऊनी दिठी। पाहसी वाट भक्तांची ॥ २ ॥ अंबरीषाच्या कैवारें सत्वर। घेतले दहा अवतार। नानाचरित्रें अपार। केलीं साचार स्वलीलें ॥ ३ ॥ आतां कर ठेऊनि जघनीं। उभा राहिलासि चक्रपाणी। भक्तमहिमा प्रगट करूनी। लाविलें ध्यानीं जडजीवां ॥ ४ ॥ याती कुळ न पाहासी। नामयासवें जेविलासी। चोख्याचीं ढोरें वोढिसीं। शेले विणिसी कबीराचे ॥ ५॥ त्यांचीं चरित्रें अति अद्भुत। तूंचि वदविसी यथार्थ। आतां श्रोते हो सावधचित्त। करा श्रवणांत निजप्रीतीं ॥ ६॥ मागिले अध्यायीं निरूपण। जीवा तत्वा दोघे ब्राह्मण। कबीरापाशीं सत्वर येऊन। जाहलें वर्तमान सांगीतलें ॥ ७॥ कबीरभक्त अतिप्रेमळ। उदास विरक्त सर्वकाळ। सांडोनि चित्ताची तळमळ। करी निश्चळ रामभजन ॥ ८॥ चित्तीं नाहीं आशापाश। शेण सुवर्ण सारिखेंच दिसे। हिरे रत्नें खडे तैसे। भासती दृष्टीस कबीराच्या॥९॥ ब्रह्मा आणि पिपीलिका। मेरु मशक दिसे सारिखा। बृहस्पति आणि मूर्ख मुका। दृष्टीस सारिखा कबीराचे ॥१०॥ जागृति स्वप्न सुषुप्तीसी। श्रीरामभजन अहर्निशीं। खंडण नाहीं तयासी। हरिभजनासी विनटला ॥ ११॥ आणिक एक होता सावकार। परम भाविक अतिउदार। पांच पुत्र तयासी थोर। घरीं सर्व संपत्ती ॥ १२ ॥ धनधान्यही अपरिमित। लावण्यस्त्री कुलवंत। आणिकही सोयरे सुहृद आप्त। मान्य असे सर्वांसी ॥१३॥ ऐसें असतां तयासी। पंडुरोग जाहला शरीरासी। कृमि पडले सर्वांगासी। पूर्वकर्में तयाच्या ॥ १४ ॥ घरीं संपत्ती आरोग्य काया। पुत्र कलत्र उत्तम जया। सर्वाभूतीं समान दया। विरळा कोणी असेल कीं ॥१५॥ सर्व शास्त्रीं वक्ता निपुण। निरभिमानी उत्तमवर्ण। न पाहे लोकांचे दोष गुण। विरळा कोण असेल कीं ॥१६॥ कोणाचें न करी उपार्जन। राजा रंक सारिखेचि जाणें। परस्त्री मातेसमान। विरळा कोण असेल कीं ॥१७॥ अखंड करी परोपकार। राहिली चित्तासी तळतळ। श्रीहरीभजनीं सर्वकाळ। कोणीं विरळा असेल कीं ॥ १८ ॥ सर्व संपत्ति आणि धन। जयासि मृत्तिकेसमान। दुष्काळीं करी अन्नदान। विरळा कोण असेल कीं ॥ १९॥ जैसें जयाचें जन्मांतर। तैसेंच फळ तदनुसार। सावकाराचें शरीर। बहुत जर्जर जाहलें ॥२०॥ सर्वांगासि पडले किडे। दुर्गंधि सुटली चहूंकडे। कोणी न पाहती तयाकडे। सर्वत्र जन कंटाळती ॥ २१ ॥ पाळिलीं पोशिलीं जन्मवरी। अंतकाळीं मोकलितीं दूरीं। वैकुंठपति श्रीहरी। नाहीं अंतरीं आठविला ॥ २२॥ वैद्य ह्मणती दारुण रोग। नाना औषधें देती सांग। परी कृपा न करितां पांडुरंग। अधिकाधिकची होतसे ॥२३॥ ज्योतिषी सांगती ग्रह दारुण। खळबळले असती संपूर्ण। आरोग्य व्हावयाकारण। तयांचा जप करावा ॥ २४ ॥ देवऋषि ह्मणती घाला गोंधळ। अंबा क्षोभली असे प्रबळ। जोगवा मागतांचि तत्काळ। आरोग्य होईल निश्चयेंसी ॥२५॥ ऐसें ऐकतां नाना उपाय। तों अधिकाधिक होतसे अपाय। नाठवितां श्रीहरीचे पाय। विष होय अमृताचें ॥ २६॥ एक ब्राह्मण येती घरा। ह्मणती मल्लारिमाहात्म्य

जप करीं । एक ह्मणती द्रव्य सत्वरीं । वांटा आजि विप्रांसी ॥२७॥एक ह्मणती वांचा सप्तशती । आरोग्य करील श्रीभ-
गवती । जे जे जैसा उपाय सांगती।तैसें करिती पुत्र त्याचे ॥ २८ ॥ एक ह्मणती सूर्यनारायण । यासि करावें अर्घ्यदान ।
एक ह्मणती पुरश्चरण । गायत्रीचें करावें ॥२९॥ एक ह्मणती विश्वेश्वरा । महारुद्र अभिषेक करा । एक ह्मणती हरेश्वरा ।
प्रदक्षिणा घाला कीं ॥ ३० ॥ एक ह्मणती गजवदन । हाचि करावा प्रसन्न । संकटचतुर्थी व्रत करून । लाडू मोदक अ-
र्पावे ॥३१॥ एक ह्मणती पंचाक्षरी । आतां आणावा सत्वरीं । एक ह्मणती कैवारी । काळभैरव उपासावा ॥ ३२ ॥ एक
ह्मणती विप्र बोलावून । त्यासि यावें गजदान । एक ह्मणती तुळा करून । द्रव्य वांटा विप्रांसी ॥ ३३ ॥ ऐसें ऐकोनि
सकळ । उपाय केले तत्काळ । द्रव्य वेंचिलें सकळ । आरोग्य व्हावयाकारणें ॥ ३४ ॥ परी दिवसेंदिवस जर्जर । अ-
धिकचि जाहला सावकार । दुर्गंधि सुटली थोर । कोणी जवळ नयेती ॥ ३५ ॥ किडे पडिले सर्वांगासी । जीव होतसे
कासाविसी । मग ह्मणे भागीरथीसी । देह अर्पण करावा ॥ ३६ ॥ पुत्र कांता सोयरे स्वजन । सावकारें जवळ बोला-
वून । ह्मणे माझा देह नेऊन । भागीरथींत टाकावा ॥ ३७ ॥ तुह्मीं उपाय केले बहुत । परी माझें कर्म विपरीत । आतां
देहांत प्रायश्चित्त । भागीरथींत घेईन ॥ ३८ ॥ ऐसें ऐकूनियां वचन । शोक करिती मोहेंकरून । मग सावकारातें
उचलोन । गंगातीरासी पैं नेलें ॥ ३९ ॥ कौतुक पहावयाकारण । अमित मिळाले विश्वजन । सावकार देतो प्राण ।
व्यथा कठिण ह्मणउनी ॥ ४० ॥ भागीरथीच्चिये कांठीं । असंभाव्य जाहली दाटी । नरनारी पाहती दृष्टीं । नवल
करिती देखोनी ॥ ४१ ॥ एक ह्मणती आत्महत्या । याणें न करावी सर्वथा । एक ह्मणती पुत्रकांता । कैसीं या-
स उबगलीं ॥ ४२ ॥ एकासी एक उत्तर देती । शेवटीं आपुली ऐसीच गती । आतां तरी सावधान चित्तीं । श्रीहरिभजन
करावें ॥ ४३ ॥ ऐकूनि जनांचें उत्तर । तयांसि ह्मणे सावकार । आतां मजला सत्वर । भागीरथींत लोटावें ॥ ४४ ॥ न सो-
सवे दुर्धरव्यथा । वचन मानलें समस्तां । चार कुंभ आणूनि तत्वतां । हातांपायांसी बांधिले ॥४५॥तंव तेथें पद्मनाभ ब्रा-
ह्मण । आला करावया स्नान । मुखीं करीत नामस्मरण । राम कृष्ण गोविंदा ।४६। तो कबीराचा शिष्य जाण । सप्रेम क-
रित नामस्मरण । तुळसीमाळा गळां घालून । विष्णुभक्त पातला ॥ ४७ ॥ तों भागीरथीच्चे कांठीं । असंभाव्य जाहलीसे
दाटी । नरनारी पाहोनि दृष्टीं । होताति कष्टी निजमोहें ॥ ४८ ॥ पद्मनाभ पुसे ते वेळां । काय कौतुक पाहातां डोळां ।
त्यांणीं सर्व वृत्तांत सांगीतला । विष्णुभक्ताजवळी पैं ॥ ४९ ॥ ऐकोनि जनांचें बोलणें । तत्काळ आला जवळी त्वरेनें ।
सावकारासि बोलिला वचन । ह्मणे आपण प्राण न द्यावा ॥५०॥चौऱ्यायशी लक्ष योनी हिंडतां।हा नरदेह लाधला अ-
वचितां । तेंथेंही करितां आत्महत्या । नव्हे सुटका कल्पांतीं ।५१।कर्मभूमीस मनुष्यजन्म । तरी कांहीं करावें हरिभज-
न । तरीच जन्ममरणाचें खंडण । होईल जाण निश्चयेंसी ॥५२॥ पद्मनाभास ह्मणे सावकार । कर्म बलवंत अतिदुस्तर ।
म्यां उपाय केले फार । आरोग्य व्हावयाकारणें ॥ ५३ ॥ सर्वांगासि पडले किडे । दुर्गंधि सुटली चहूंकडे । आप्तवर्गांसी





कासया करिशीं । पापराशी दुर्जना ॥ ३४ ॥ चापासि शर लावून । ह्मणे येथेंच तुझा घेतों प्राण । वाणी थरथरां कांपून ।
ह्मणे अपराधी पूर्ण मी तुझा ॥ ३५ ॥ जितकें मागसी संपत्ति धन । तितकें देईन तुजलागून । परी तूं माझे वांचवी प्राण ।
ह्मणोनि चरण धरियेले ॥ ३६ ॥ लज्जित होतां रतिनाथ । धातू जिराली जेथिंच्या तेथें । पंचविषयांचा मथितार्थ । वि-
सरलें चित्त तेधवां ॥ ३७ ॥ दक्षिण वारा सुटतां सहज । वितळोन जाय मेघराज । तेविं एकांतीं येतांच रघुराज । काम
सहज नाश पावे ॥ ३८ ॥ दिव्य देतां जळाले हात । मग सहजचि वादी होय कुंठित । कीं तस्कर धरितां मोटेसहित ।
मग होय लज्जित बोलतां ॥ ३९ ॥ दृष्टीं देखतां अयोध्याधीशा । तैसेंच जाहलें तुळसीदासा । ह्मणे कोण उपाव करा-
वा कैसा । हें मज सहसा न सुचेची ॥१४०॥ कोतवाल बोले वाणियालागूनी । कबीरकांता हे माझी भगिनी । नमस्कार
करीं इजलागूनी । सक्रोध होऊनी बोलत ॥ ४१ ॥ ऐसें बोलतां अयोध्यानाथ । वाणी उठला भीतभीत । नमस्कारूनि
कबीरकांतेप्रत । ह्मणे अन्याय माते जाहला वो ॥४२॥ अपराध क्षमा करूनि मनीं । आतां जावें तूं आपुले सदनीं । वा-
णियासि सांगे धनुष्पाणी । आजपासूनी सावध ॥ ४३ ॥ धनमदें भुलोनि जाण । भलतेच करिसी अवगुण । आतां अनु-
ताप मनीं धरून । जाईं शरण कबीरासी ॥ ४४ ॥ कमालमातेसि अयोध्यापती । नेऊन घाली सदनाप्रती । आपण जा-
हले अदृश्यगती । लाघवी श्रीपती कृपाळू ॥ ४५ ॥ कबीर ह्मणे कांतेलागून । तूं कां आलीस त्वरेंकरून । वाणियास दि-
धलें वचन । सत्वासि हानी त्वां केली ॥४६॥ ऐकूनि पतिव्रता बोलत । गांवचा कोतवाल आला तेथ । तेणें शिक्षा करू-
नि वाणियातें । सदनीं मातें आणिलें ॥ ४७ ॥ ऐसी ऐकूनियां मात । सक्रोध जाहला कबीरभक्त । कोतवालाच्या घरीं
त्वरित । जाऊनि बोलत तयासी ॥ ४८ ॥ हाक मारितां वैष्णववीर । जागृत जाहला घरटीकार । सत्वर येऊनियां बा-
हेर । घाली नमस्कार साष्टांगें ॥४९॥ कबीर ह्मणे तयालागून । मी एकरात्र कांता वाणियास देऊन । त्यापाशीं सामग्री
घेऊन । संतसज्जन पूजिले ॥ १५० ॥ मी तुझे वडिलाचें लागतों काय । तेथें कां गेलास लवलाहे । वाणियासि शिक्षा
केलीस पाहें । उचित नव्हे हें तूजला ॥ ५१ ॥ भूमिदानासि अधिकारी राजा । पित्यानें वरासि द्यावी आत्मजा । भ्रतह्-
रावांचूनि स्वामी दुजा । कांतेलागोनी असेना ॥ ५२ ॥ ऐसें असतां दुर्बुद्धी । तूं कां गेलासि एकांतसंधीं । माझें सत्व
ढाळिलें तूं अपराधी । जाणवलें बुद्धी माझिया ॥ ५३ ॥ कोतवाल तत्काळ धरी चरण । ह्मणे मज विदित नसे हें
वर्तमान । म्यां वाणी देखिला असेल जाण । तरी जातील नयन तत्काळ ॥ ५४ ॥ तुह्मी संत वैष्णवभक्त । मी बोलेन जरी
असत्य मात । तरी रौरव यातना निश्चित । कल्पपर्यंत होतील ॥५५॥ कबीर विस्मित जाहला मनीं । ह्मणे हे श्रीरामाची
करणी । तो भक्तवत्सल चापपाणी । निर्विघ्न रक्षित निजदासां ॥ ५६ ॥ तुळसीदासाचे गृहासि त्वरित । सत्वर गेला क-
बीरभक्त । ह्मणे कोतवालाचे रूपें निश्चित । तुज रघुनाथ भेटले ॥ ५७ ॥ नाना साधनें करितां सायासीं । दृष्टीं न पडे अ-
योध्यावासी । तो तुज भेटला अनायासीं । पार भाग्यासी न देखों ॥ ५८ ॥ ऐकोनि कबीराचें वचन । तुळसीदासें धरिले

करविलें रामस्मरण। दोहोंच अक्षरीं सकल जन। पूर्णकाम होती तत्काळ॥८१॥ रामनामाचा महिमा थोर। तुज क-
ळला नाहीं साचार। येचविषयीं सविस्तर। पूर्वकथन तुज सांगतों॥८२॥ महापातकी वाल्हा कोळी। नारदें उपदेशि-
ला तत्काळीं। जपतां रामनामावळी। वाल्मीकऋषि तो जाहला॥८३॥ अवतरला नसतां रघुनंदन। तों आधींच कथि-
लें रामायण। शतकोटि भविष्य पुरातन। केलें लेखन निजबुद्धीं॥८४॥ कैलासपती पार्वतीरमण। वांटिता जाहला रा-
मायण। स्वर्ग मृत्यु पाताळींचे जन। आले विभाग घ्यावया॥८५॥ मग शतकोटीची वांटणी। शंकरें दिधली त्रिलोकां
करूनी। तें कबीरें स्वमुखें करूनी। पद्मनाभासि सांगितलें॥८६॥ तेहतीस कोटी मृत्युलोकीं। तितुकेंच दिधलें वैकुंठलो-
कीं। तितुकेंच पाताळलोकीं। देत धूर्जटी ते वेळे॥८७॥ एककोटी उरलें जाणा। वांटिता जाहला कैलासराणा। तेहती-
स लक्ष स्वर्गभुवना। तितुकेंच मृत्यु पाताळीं।८८। शतसहस्र उरलें होतें। तें वांटूनि दिधलें कैलासनाथें। जैसा पिता नि-
जपुत्रातें। देत स्वहस्तें निजधन॥८९॥ तेहतीस सहस्र पाताळीं। देता जाहला चंद्रमौळी। तितुकेंच या भूमंडळीं। स्वर्गीं
तितुकेंच देतसे॥९० एक सहस्र उरलें बाकी। तीन तीन शतें तिहीं लोकीं। एकशत उरलें शेखीं। तेंही वांटूनि दीधलें ९१
तेहतीस श्लोक भूमंडळी। तितुकेच स्वर्ग पाताळीं। एक श्लोक तयेवेळीं। उरला असे वांटितां॥ ९२ ॥ बत्तीस अक्षरें
त्याचीं जाण। तीस वांटिलीं त्रिभुवनाकारण। उरलीं दोन तीं उमारमणें। आपणाजवळ ठेविलीं ॥९३॥ कमठ अव-
तार धरिला हरीनें। तेव्हां केलें समुद्रमंथन। महाविष अति दारुण। निघतें जाहलें तेधवां ॥९४॥ तें जाळीत चालिलें
त्रिभुवन। देवांसि संकट पडिलें जाण। दोन अक्षरें उमारमण। ह्मणता जाहला तेवेळीं॥९५॥ राम ह्मणतांचि तत्काळ।
सदाशिव जाहला शीतळ। त्वां कासया तीन वेळ। उच्चार करविला त्यालागीं॥९६॥ ऐसें बोलतां कबीरभक्त। पद्मना-
भ घाली दंडवत। आणिक चरित्र रसाळ अद्भुत। परिसा निजभक्त भाविक हो॥९७॥ कांता पुत्र असोनि जाण। कबी-
राचें उदास विरक्त मन। जैसा वासरमणी घटीं बिंबोन। न भिजेचि जाण सर्वथा॥९८॥ नातरी जळीं पद्मपत्र असतां।
तें नभिजेचि जाण सर्वथा। कीं विलासी मुख दर्पणीं पाहतां। न गुंते तत्वतां त्यामाजी९९तैशा रीतीं भक्तकबीर। प्रपंचीं
न गुंते साचार। उदास विरक्त सत्वधीर। भजन साचार करीतसे१००तों कोणे एके दिवशीं जाण।दाहासहस्र वैष्णवज-
न। ऊर्ध्व त्रिपुंड्र तुळसीभूषण। आनंदवना पातले॥१॥ टोपीं मुद्रा लाऊनि अंगीं। भजन करिती प्रेमरंगीं। ऐसे वैष्णव
बैरागी।पातले वेगीं नगरांत २ सीताराम स्मरून हांका। पुसते जाहले गांवच्या लोकां। या नगरांत वैष्णव निका।श्रीरा-
मसखा कोण आहे।३।सिधा देऊनि वैष्णवांसी। तृप्त करील सत्वराशी। ऐसा दाता या स्थळासी। सांगा आह्मासी लव-
लाहें॥४॥ ऐकोनि बैराग्यांचें वचन। काय बोलती गांवींचे जन। या क्षेत्रामाजी जातीचा यवन। कबीर सधन नांदतो
॥५॥ तो दाहासहस्र वैष्णवांसी। तृप्त करील निश्चयेंसी। ऐसें कुटिल बैराग्यांसी। विनोदेंसीं बोलिले॥६॥ घरीं असोनि
धनधान्य। जो क्षुधितांसि न घाली भोजन। दाखवूनि दे दुजियाचें सदन। दरिद्री जाण तो एक ॥ ७॥ सोपे माड्या



बांधोनि पाहें। जो पथिकासि नेदीच ठाये। तयासि मंदिर ह्मणों नये। श्मशानभोंय तें एक।८। मुखीं असोनि कवित्व-
स्फूर्ती। भगवद्गुण जे न वर्णिती। पाखंडमतें भलतेंचि जल्पती। लांव निश्चितीं ते वाचा॥९॥ शरीरीं शक्ति असोन फार।
कधीं न घडेच परोपकार। तो सर्वथा न्व्हे नर। ग्रामसूकर जाणावा।११०। असो बैरागी मागतां अन्न। गांवचे लोक अ-
ति कृपण। आपुल्यावरील झट टाळून। दाविती सदन कबीराचें।११। मग सकळ साधु तीर्थवासी। गेले कबीराच्या घ-
रासी। सीताराम द्वारापाशीं। साद घालिती ते वेळां।१२।कानीं ऐकतां हे मात। बाहेर आला कमालतात। सद्भावें करू-
नि प्रणिपात। आलिंगन देत निजप्रीतीं।१३। साधु बोलती तयासि उत्तर। दाहासहस्र वैष्णववीर। तीर्थें करीत महीवर।
आलों सत्वर या ठायां।१४। क्षेत्रींचे लोक सांगती मात। कीं अन्नदाता कमालतात। ऐकोनि साधूंचें मनोगत। अवश्य
ह्मणत तेधवां।१५। बाजारीं तुळसीदास वाणी। कबीर गेला त्याचे दुकानीं। ह्मणे पाहुणे संत आले सदनीं। सामग्री का-
ढूनी त्यांस देईं।१६। ऐसी ऐकोनियां मात। वाणी बोले अति उन्मत्त। ह्मणे आपुली कांता एक रात। देशील भोगार्थ म-
ज जरी॥१७॥ तरी दाहासहस्र वैष्णवजन। सिधा देऊनि तृप्त करीन। कबीरें अवश्य ह्मणून। भाक वचन दीधलें।१८।
कामातुर तुळसीदास। सामग्री देत वैष्णवांस। मैदा तांदूळ दाळ सर्वांस। शर्करा समवेत दीधली॥१९॥ साधुसंत जा-
हले तृप्त। कबीर चित्तीं हर्षयुक्त। ह्मणे सुदिन आजिचा दिसत। वैष्णवभक्त भेटले॥१२०॥ निशी होतांचि कांतेप्रती।
निजगुज सांगे एकांतीं। तुजला विकून एका रातीं। आलों निश्चितीं मी आजी॥२१॥ तुळसीदासवाणी बाजारांत।
सावकार आहे उदार बहुत। त्याणें सामग्री देऊनि त्वरित। साधुसंत तृप्त केले॥२२॥ त्याची इच्छा करावी पूर्ण।
कांहीं संकोच न धरावा मनीं। ऐकोनि भ्रताराचें वचन। अवश्य ह्मणे पतिव्रता॥२३॥ कांतेसि धरूनियां करीं। गेला
वाणियाचे मंदिरीं। तुळसीदास कामातुर अंतरीं। वाट निर्धारीं पाहातसे॥२४॥ चंदन पुष्पें सुमनहार। आणूनि ठे-
विले मंचकावर। दिव्यवस्त्रें अळंकार। घेऊनि सावकार वाट पाहे॥ २५॥ तंव ते लावण्यसागरींची लहरी। भ्रतारानें
धरिली निजकरीं। दृष्टीस देखोनि ते अवसरीं। सावकार अंतरीं संतोषला॥२६॥ कबीर कांतेसि बोले उत्तर। आज-
चि रात्र चारी प्रहर। मम आज्ञेनें साचार। भोगदान यास देईं॥२७॥ ऐसें सांगूनि कमालतात। आपण घरासि गेला
त्वरित। श्रीरामभजन प्रेमयुक्त। करीत बैसला निजप्रीतीं॥२८॥ असो भ्रतार आज्ञेनें तत्वतां। वाणियासि बोले कबी-
रकांता। तुझा उपकार नये सांगतां। साधुसंतां तृप्त केलें॥२९॥ विषयवासना धरिली बहुत। तरी पुरवीं आपुले मनो-
रथ। ऐसें बोलोनियां त्वरित। भजन करीत सप्रेमें॥१३०॥ कामें व्यापिला तुळसीदास। चित्तीं वाटला अति उल्हास।
ह्मणे धन्य आजिचा दिवस। आलिंगावयास पातला॥३१॥ जैसा सतेज देखूनियां दीप। पतंग त्यावरी घालीत झेंप।
तैसाचि वाणी तो पापरूप। कामें अमूप वेष्टिला॥३२॥ तंव कोतवालाचें रूप धरून। तेथें आले श्रीरघुनंदन। करीं
असती धनुष्यबाण। क्रोधें नयन आरक्त॥३३॥ पृष्ठीसीं ढाल हातीं बरशी। काय बोले अयोध्यावासी। हें कर्म खोटें

कासया करिशीं । पापराशी दुर्जना ॥ ३४ ॥ चापासि शर लावून । ह्मणे येथेंच तुझा घेतों प्राण । वाणी थरथरां कांपून । ह्मणे अपराधी पूर्ण मी तुझा ॥ ३५ ॥ जितकें मागसी संपत्ति धन । तितकें देईन तुजलागून । परी तूं माझे वांचवी प्राण । ह्मणोनि चरण धरियेले ॥ ३६ ॥ लज्जित होतां रतिनाथ । धातू जिराली जेथिंच्या तेथें । पंचविषयांचा मथितार्थ । विसरलें चित्त तेधवां ॥ ३७ ॥ दक्षिण वारा सुटतां सहज । वितळोन जाय मेघराज । तेविं एकांतीं येतांच रघुराज । काम सहज नाश पावे ॥ ३८ ॥ दिव्य देतां जळाले हात । मग सहजचि वादी होय कुंठित । कीं तस्कर धरितां मोटेसहित । मग होय लज्जित बोलतां ॥ ३९ ॥ दृष्टीं देखतां अयोध्याधीशा । तैसेंच जाहलें तुळसीदासा । ह्मणे कोण उपाव करावा कैसा । हें मज सहसा न सुचेची ॥ १४० ॥ कोतवाल बोले वाणियालागूनी । कबीरकांता हे माझी भगिनी । नमस्कार करीं इजलागूनी । सक्रोध होऊनी बोलत ॥ ४१ ॥ ऐसें बोलतां अयोध्यानाथ । वाणी उठला भीतभीत । नमस्कारूनि कबीरकांतेप्रत । ह्मणे अन्याय माते जाहला वो ॥ ४२ ॥ अपराध क्षमा करूनि मनीं । आतां जावें तूं आपुले सदनीं । वाणियासि सांगे धनुष्पाणी । आजपासूनी सावध ॥ ४३ ॥ धनमदें भुलोनि जाण । भलतेच करिसी अवगुण । आतां अनुताप मनीं धरून । जाईं शरण कबीरासी ॥ ४४ ॥ कमालमातेसि अयोध्यापती । नेऊन घाली सदनाप्रती । आपण जाहले अदृश्यगती । लाघवी श्रीपती कृपाळू ॥ ४५ ॥ कबीर ह्मणे कांतेलागून । तूं कां आलीस त्वरेंकरून । वाणियास दिधलें वचन । सत्वासि हानी त्वां केली ॥ ४६ ॥ ऐकूनि पतिव्रता बोलत । गांवचा कोतवाल आला तेथ । तेणें शिक्षा करूनि वाणियातें । सदनीं मातें आणिलें ॥ ४७ ॥ ऐसी ऐकूनियां मात । सक्रोध जाहला कबीरभक्त । कोतवालाच्या घरीं त्वरित । जाऊनि बोलत तयासी ॥ ४८ ॥ हाक मारितां वैष्णववीर । जागृत जाहला घरटीकार । सत्वर येऊनियां बाहेर । घाली नमस्कार साष्टांगें ॥ ४९ ॥ कबीर ह्मणे तयालागून । मी एकरात्र कांता वाणियास देऊन । त्यापाशीं सामग्री घेऊन । संतसज्जन पूजिले ॥ १५० ॥ मी तुझे वडिलाचें लागतों काय । तेथें कां गेलास लवलाहे । वाणियासि शिक्षा केलीस पाहें । उचित नव्हे हें तूजला ॥ ५१ ॥ भूमिदानासि अधिकारी राजा । पित्यानें वरासि द्यावी आत्मजा । भ्रतारावांचूनि स्वामी दुजा । कांतेलागोनी असेना ॥ ५२ ॥ ऐसें असतां दुर्बुद्धी । तूं कां गेलासि एकांतसंधीं । माझें सत्व ढाळिलें तूं अपराधी । जाणवलें बुद्धी माझिया ॥ ५३ ॥ कोतवाल तत्काळ धरी चरण । ह्मणे मज विदित नसे हें वर्तमान । म्यां वाणी देखिला असेल जाण । तरी जातील नयन तत्काळ ॥ ५४ ॥ तुह्मी संत वैष्णवभक्त । मी बोलेन जरी असत्य मात । तरी रौरव यातना निश्चित । कल्पपर्यंत होतील ॥ ५५ ॥ कबीर विस्मित जाहला मनीं । ह्मणे हे श्रीरामाची करणी । तो भक्तवत्सल चापपाणी । निर्विघ्न रक्षित निजदासां ॥ ५६ ॥ तुळसीदासाचे गृहासि त्वरित । सत्वर गेला कबीरभक्त । ह्मणे कोतवालाचे रूपें निश्चित । तुज रघुनाथ भेटले ॥ ५७ ॥ नाना साधनें करितां सायासीं । दृष्टीं न पडे अयोध्यावासी । तो तुज भेटला अनायासीं । पार भाग्यासी न देखों ॥ ५८ ॥ ऐकोनि कबीराचें वचन । तुळसीदासें धरिले





सागरीं शेषशाई । शास्त्रें धुंडितां न पडे ठायीं । चर्माची संबळी करून पाहीं । त्यांत कैसा ठेविला ।२९। व्रतें तीर्थें तपें याग । करितां नातुडे श्रीरंग । तो वैकुंठवासी भक्तभवभंग । चर्मांत कैसा वेष्टिला ।३०। ऐकूनि द्विजवराचें वचन । रोहिदास बोले त्याकारण । चर्मावांचोनि पदार्थ कोण । तुह्मीं दृष्टीस देखिला ३१ काहाल ढोल मृदंग जाण । त्यावरी होतसे हरिकीर्तन । चर्मावांचोनि पदार्थ आन । दृष्टीस न देखों सर्वथा ।३२। चर्माची धेनु कपिलवर्ण । तिचें दुग्ध पवित्र जाण । तेणें पंचामृतस्नान । देवाकारण घालितां ३३ जारज अंडज उद्भिज्ज नाम । तिनी खाणी वेष्टिल्या चामें । त्यांत नांदे आत्माराम । सर्वांभूतीं सारिखा ।३४। शूद्र वैश्य क्षत्रिय ब्राह्मण । चामें वेष्टिले संपूर्ण । चामाचा नगारा करून । चामाचे हात वाजविती ३५ त्यांतून मधुर निघे ध्वनी । ते चर्माचे ऐकती कान । चर्माचे जिव्हेकरून । वेद कैसे बोलती ३६ चर्माचे हस्तेंकरून । तुह्मीं करितां अन्नपान । चर्ममंदिरीं आत्माराम । मधुर ध्वनी बोलत ।३७। ब्राह्मण ह्मणे रोहिदासासी । ब्रह्मज्ञान तूं बोलतोसी । परी जीव असतां शरीरासी । विटाळ नाहीं सर्वथा ।३८। यावरी रोहिदास बोले वचन । विश्वव्यापक जगज्जीवन । तो गर्भाळयांत असोन । विटाळ कैसा मानितां ।३९। रजस्वलेच्या रुधिरांत । त्यांत पुरुषाचें पडे रेत । त्याचें शरीर हें निश्चित । अमंगळ हें जाणतां ४० जन्मतां आणि मरतां । याचा विटाळ तुह्मी धरितां । तेथें उत्तम पदार्थ कोणता । तुमचे दृष्टीस कोण दिसे ।४१। अमंगळ या परीचें चाम । तेथें उत्तम आत्माराम । निष्कलंक घनःश्याम । सर्वां घटीं सारिखा ४२ ब्राह्मण वदे ते वेळां । शालग्राम शुद्ध शिला । हा चर्मकांनीं जरी पूजिला । दोष घडतो त्यांलागीं ४३ ऐकूनि ब्राह्मणाचें वचन । रोहिदास वदे त्यालागून । शालग्रामशिला पूजावी कोणें । ऐसें स्वामी मज सांगा ४४ ब्राह्मण ह्मणे रे शतमूर्खा । आह्मीं पूजावें वैकुंठनायका । चहूं वर्णांमाजी देखा । श्रेष्ठवर्ण ब्राह्मण ४५ देवांत श्रेष्ठ श्रीहरी । चहूं वर्णांत ब्राह्मण थोरी । यज्ञोपवीताचा अधिकारी । त्याणेंच विष्णु पूजावा ४६ ऐसें ऐकूनियां वचन । रोहिदास बोले त्याकारण । यज्ञोपवीत दाखवीन । तुजलागून स्वामिया ४७ मग रांपी घेऊनियां करीं । उदर चिरिलें ते अवसरीं । यज्ञोपवीत सत्वरीं । तयामाजी दाखविलें ४८ विप्र बोले ते अवसरां । तूं विष्णुभक्त होसी खरा । म्यां न करितां विचारा । तुजकारणें छळिलें कीं ४९ अग्नींत टाकितां जाण । मोलाचे जैसें सुवर्ण । तैसें करितां तुझें छळण । महिमा आपला वाढविला ५० नातरी नाणें सुलाखीं टोंचून । त्याचें पाहती खरेपण । त्यापरी करितां तुझें छळण । महिमा तुझा वाढला ५१ कीं साहाणेवरी घांशितां चंदन । तयाचा सुगंध कळे पूर्ण । तेविं मी तुझें करितां छळण । तुझा महिमा वाढला ५२ कीं लोहपरिसासी झगटतां जाण । तत्काळ त्याचें होय सुवर्ण । तैसें करितां तुझें छळण । महिमा पूर्ण वाढला ५३ नातरी टांकीनें फोडूनि पाषाण । देव बैसविला दृढ करून । तेविं म्यां तुझें छळण । केलें जाण न कळतां ५४ तूं विष्णुभक्त आहेसि परम । सुखें पूजीं शालीग्राम । ऐसें बोलोनि द्विजसत्तम । गृहासि गेला आपुल्या ।५५। पुढिले अध्यायीं निरूपण । पिपाजी चरित्र अति पावन । महीपती ह्मणे एकाग्रमनें । सज्जन परिसा निजप्रीतीं ।५६। स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । पंचविंशाध्याय रसाळ हा ।५७। अ० २५ ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय २४ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीराधाकृष्णाय नमः । ऐका श्रोतेहो सावकाश । परमवैष्णव रोहिदास । हरिभजन रात्र दिवस । प्रेमभावें करितसे ।१।मनें दुराशा सांडोन । भावें करितसे हरिकीर्तन । नित्यनेमें स्नान करून । विष्णुपूजन करीतसे ।२। संसारीं असोनि जाण । परोपकार योजिला त्याणें । आल्या वैष्णवाकारण । एक जोडा देतसे ॥३॥ चर्मकवृत्ती नीच दिसे । तेथें अणुमात्र न घडे दोष । उपकार करितां जगन्निवास । प्राप्त होईल निर्धारें ॥४॥ सुतार आणि कुंभारास । कर्म करितां नाहीं दोष । उपकार करितां जगन्निवास । प्राप्त होईल तयांसी॥५॥गंवडी आणि पाथरवटांस । कर्म करितां नाहीं दोष । उपकार करितां जगन्निवास । प्राप्त होईलतयांसी॥६॥साळी कोळी बेलदारांस । निजकर्मांत नघडे दोष । परोपकारें जगन्निवास । प्राप्त होईल निजनिष्ठें।७।रजक आणि रंगाऱ्यास पाहीं । निजकर्म करितां दोष नाहीं ।परोपकारें भजतां कांहीं । सार्थक देहीं घडेल।८।आणि ब्राह्मणाचे कर्मांत। कपट घात नाहीं त्यांत । परोपकारें रुक्मिणीकांत।कृपा करील निर्धारें।९।असो आतां बहुभाषण । अठरा वर्णांची सांगतां खूण । पुढें कथा वाढेल जाण । श्रोतीं चित्त देईजे।१०।मग परोपकारें रोहिदास । भजों लागला वैष्णवांस । फाटके मोजे यात्रेकऱ्यांस । सांधोनियां देतसे ।११। परोपकारी भक्त जाण । हरीस आवडती जीवाहून । त्यांचे घरीं जगज्जीवन । रात्रदिवस तिष्ठत।१२।उपदेश देऊनि जनांसी । सेवा घेती तयांपाशीं । आपण थोडें उदकही कोणासी । न देती जाण सर्वथा।१३।ते पढतमूर्ख अज्ञान।ऐसें रोहिदासें जाणून।भावें करी वैष्णवपूजन । मिथ्या संसार जाणूनी।१४।प्रातःकाळीं उठोन । आधीं करीतसे भोजन । यावरी करूनियां स्नान । विष्णुपूजन करीतसे।१५।ऐसें ऐकूनि मानसीं । विपरीत वाटलें श्रोतयांसी । तरी उपवासी बैसतां ध्यानासी । स्वस्थ मनासी वाटेना।१६।कलियुगीं अन्नमय प्राण । ऐसें बोलती सर्वज्ञजन । दोनप्रहर येतां दिन। व्याकुळ होती तत्काळ।१७।क्षुधा लागेल करितां ध्यान । तेव्हां तत्काळ फांकेल मन।रोहिदास हें जाणून।आधीं भोजन करीतसे१८जैसे चोर झोंबतांचि जाण । आधीं टाकून देइजे धन । कीं पिशाचबाधा नहोतां पूर्ण । देती सांदण पंचाक्षरी।१९।कीं निधान उकारितां विवसी छळी । त्या-आधीं साधक देती बळी । कीं हवालदार न देतां शिव्यागाळी । जवा तत्काळ देइजे२०रोहिदास तैशा रीतीं। आधीं देत प्राणाहुती । मग स्नान करून सत्वरगतीं । करी एकांतीं देवपूजा।२१।तंव कोणे एके दिवशीं । विष्णुभक्त बैसला देवपूजेसी । साहित्य घेऊन एकांतासी । चंचल मनासी आवरिलें२२चर्माचा बादला आणून ।उदक ठेविलें भरून ।आसन गवाळें संपुष्ट जाण । चर्माचींच असती२३सर्व चर्माचीं उपकरणीं । रोहिदास बैसला घेऊनी ।तों पंचांग सांगावयालागूनी । ब्राह्मण गृहासी पातला । २४ । वृंदावन शुचिर्भूत सुंदर । ते स्थळीं बैसला द्विजवर । रोहिदास उठोनि सत्वर । केला नमस्कार निजभावें।२५।ब्राह्मण ह्मणे रोहिदासासी । देवपूजा तूं करितोसी । चर्माचे आसनीं बैसलासी।याचें फळ कोणतें।२६।विष्णुमूर्ति शालग्राम जाण । आह्मी ब्राह्मण करितों पूजन।त्वां चर्माची संबळी करून । त्यांत कैसा घातला२७ वैकुंठवासी जगज्जीवन । ज्याचें योगी करिती ध्यान । त्या चर्माची संबळी करून । त्यांत कैसा घातला ॥२८॥जो क्षीर-

सागरीं शेषशाई । शास्त्रें धुंडितां न पडे ठायीं । चर्माची संबळी करून पाहीं । त्यांत कैसा ठेविला।२९।व्रतें तीर्थें तपें याग। करितां नातुडे श्रीरंग । तो वैकुंठवासी भक्तभवभंग। चर्मांत कैसा वेष्टिला।३०।ऐकूनि द्विजवराचें वचन।रोहिदास बोले त्याकारण । चर्मावांचोनि पदार्थ कोण । तुह्मीं दृष्टीस देखिला ३१ काहाल ढोल मृदंग जाण।त्यावरी होतसे हरिकीर्तन । चर्मावांचोनि पदार्थ आन । दृष्टीस न देखों सर्वथा।३२।चर्माची धेनु कपिलवर्ण।तिचें दुग्ध पवित्र जाण । तेणें पंचामृत-स्नान । देवाकारण घालितां ३३जारज अंडज उद्भिज्ज नाम । तिनी खाणी वेष्टिल्या चामें । त्यांत नांदे आत्माराम ।सर्वां-भूतीं सारिखा।३४।शूद्र वैश्य क्षत्रिय ब्राह्मण । चामें वेष्टिले संपूर्ण । चामाचा नगारा करून।चामाचे हात वाजविती ३५ त्यांतून मधुर निघे ध्वनी । ते चर्माचे ऐकती कान । चर्माचे जिव्हेकरून । वेद कैसे बोलती ३६चर्माचे हस्तेंकरून । तुह्मीं करितां अन्नपान । चर्ममंदिरीं आत्माराम । मधुर ध्वनी बोलत।३७।ब्राह्मण ह्मणे रोहिदासासी । ब्रह्मज्ञान तूं बोलतोसी । परी जीव असतां शरीरासी । विटाळ नाहीं सर्वथा।३८।यावरी रोहिदास बोले वचन । विश्वव्यापक जगज्जीवन ।तो ग-र्भवाळ्यांत असोन । विटाळ कैसा मानितां।३९।रजस्वलेच्या रुधिरांत । त्यांत पुरुषाचें पडे रेत । त्याचें शरीर हें निश्चित । असंगळ हें जाणतां४०जन्मतां आणि मरतां । याचा विटाळ तुह्मी धरितां।तेथें उत्तम पदार्थ कोणता।तुमचे दृष्टीस कोण दिसे।४१।असंगळ या परीचें चाम । तेथें उत्तम आत्माराम । निष्कलंक घनःश्याम।सर्वां घटीं सारिखा४२ब्राह्मण वदे ते वेळां । शालग्राम शुद्ध शिला । हा चर्मकांनीं जरी पूजिला।दोष घडतो त्यांलागीं४३ऐकूनि ब्राह्मणाचें वचन।रोहिदास वदे त्यालागून । शालग्रामशिळा पूजावी कोणें । ऐसें स्वामी मज सांगा४४ब्राह्मण ह्मणे रे शतमूर्खा।आह्मीं पूजावें वैकुं-ठनायका । चहूं वर्णांमाजी देखा । श्रेष्ठवर्ण ब्राह्मण४५देवांत श्रेष्ठ श्रीहरी । चहूं वर्णांत ब्राह्मण थोरी।यज्ञोपवीताचा अ-धिकारी । त्याणेंच विष्णु पूजावा४६ऐसें ऐकूनियां वचन । रोहिदास बोले त्याकारण । यज्ञोपवीत दाखवीन।तुजलागून स्वामिया४७मग रांपी घेऊनियां करीं । उदर चिरिलें ते अवसरीं।यज्ञोपवीत सत्वरीं।तयामाजी दाखविलें४८विप्र बोले ते अवसरां । तूं विष्णुभक्त होसी खरा । म्यां न करितां विचारा।तुजकारणें छळिलें कीं४९अग्नींत टाकितां जाण।सोळास चढे जैसें सुवर्ण । तैसें करितां तुझें छळण। महिमा आपला वाढविला५०नातरी नाणें सुलाखीं टोंचून।त्याचें पाहती खरे-पण । त्यापरी करितां तुझें छळण । महिमा तुझा वाढला५१कीं साहाणेवरी घांशितां चंदन।तयाचा सुगंध कळे पूर्ण।तेविं मी तुझें करितां छळण।तुझा महिमा वाढला५२कीं लोहपरिसासी झगटतां जाण।तत्काळ त्याचें होय सुवर्ण।तैसें करितां तुझें छळण । महिमा पूर्ण वाढला५३नातरी टांकीनें फोडूनि पाषाण।देव बैसविला दृढ करून ।तेविं म्यां तुझें छळण।केलें जाण न कळतां५४तूं विष्णुभक्त आहेसि परम । सुखें पूजीं शालीग्राम । ऐसें बोलोनि द्विजसत्तम।गृहासि गेला आपुल्या ।५५।पुढिले अध्यायीं निरूपण । पिपाजी चरित्र अति पावन । महीपती ह्मणे एकाग्रमनें । सज्जन परिसा निजप्रीतीं।५६। स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त।पंचविंशाध्याय रसाळ हा।५७।अ० २५॥



श्रीगणेशाय नमः । श्रीरुक्मिणीरमणाय नमः । ऐका श्रोतेहो सावकाश । संतचरित्रें अतिविशेष । श्रवणीं पडतां सक-ळ दोष । उठाउठी पळती हो ॥ १ ॥ गडेमंडळ अति उत्तम । तेथें पिपाजीराजा पवित्र परम । जयाचे घरीं नित्य धर्म । वस्ति करूनि राहिला।२। साधुसंत येती घरा । तयांसि जातसे सामोरा । ठाव देऊनि निजमंदिरा । इच्छाभोजन देतसे ।३। शौर्यतेजें अतिप्रबळ । उदार ज्ञानी धर्मशीळ । धृतिदक्ष सर्वकाळ । उपासक शक्तीचा ।४। तयासि प्रसन्न भगवती । पुत्र कांता सर्व संपत्ती । भावें करूनियां नृपति । अर्चन करी शक्तीचें ॥ ५ ॥ प्रातःकाळीं करूनि स्नान । शोडषोपचारें करी पूजन । वस्त्रें अलंकार संपूर्ण । पुष्पें परिमळ अर्पीतसे ॥ ६ ॥ धूप दीप आणोनि सत्वर । नैवेद्य दाखवी नृपवर । भा-व देखोनियां सादर । नैवेद्य सेवी जगदंबा ॥ ७ ॥ फल तांबूल दक्षिणा । भावें अर्पोनि करी प्रदक्षिणा । नमस्कार घालोनि निजसदना । जाय भोजना नृपवर ॥ ८ ॥ तंव कोणे एके वेळीं । अवघी मिळोनि संतमंडळी । तीर्थें करीत गडेमंडळीं । वै-ष्णव आले नगरासी ॥ ९ ॥ निराश निष्काम वीतरागी । अलिप्त होऊन वर्तती जगीं । ऐसे वैष्णव वैरागी । अवचित आ-ले त्या ठायां ॥ १० ॥ अनंतजन्मीं तीर्थाटन । केले असती यागयज्ञ । तरीच गृहासि संतजन । अकस्मात येतील ॥ ११ ॥ एकादशीव्रत नेमानें । केलें असेल पितृसेवन । तरीच गृहाप्रती वैष्णवजन । अकस्मात येतील ॥ १२ ॥ वापी कूप आरा-म जाण । केले असतील निर्माण । तरीच तेणें पुण्येंकरून । गृहास वैष्णव येतील ॥ १३ ॥ गोप्रदान अन्नदान । केलें असेल कृष्णार्पण । तरीच गृहाप्रती वैष्णव जन । अकस्मात येतील ॥ १४ ॥ अनंतजन्में तपें आगळीं । केलीं असतील भूमंडळीं । तरीच गृहासि संतमंडळी । येईल जाण निजभाग्यें ॥ १५ ॥ अनंतजन्मींचें ते वेळीं । सुकृत फळलें तत्काळीं । ह्मणोनि वै-ष्णवभक्तमंडळी । त्याचे घरा पातली ॥१६॥ सेवक सांगती राजयाकारण । नगरासि आले वैष्णवजन । रायें करूनियां सन्मान । शिधा त्यांस दीधला ॥१७॥ स्नान करूनि ते वेळीं । गेला अंबिकेचे देऊळीं । पूजा अर्चन करून सकळीं । नैवेद्य दाखवी नृपवर ॥१८॥ नित्य करितां शक्तिपूजा । नैवेद्य भक्षी कमळजा । नमस्कार घालूनि राजा । आपण भोजन करि-तसे ॥ १९॥ तंव रायासि ह्मणे भद्रकाळी । नगरासि आली संतमंडळी । ते जेविल्याविण कदाकाळीं । नैवेद्य भक्षितां मज नये।२०।ब्रह्मांडनायक वैकुंठवासि । अनंतशक्ती जयाच्या दासी । त्याचे प्रिय आले घरासी । तुझ्या भाग्यासी पार ना-हीं ॥ २१ ॥ राजा विनवी कर जोडून । वरिष्ठ देव तुजहूनि कोण । ऐसें ऐकोनियां वचन । काय बोले भवानी ॥ २२ ॥ ब्र-ह्मा इंद्र आणि हर । हे नेणती जयाचा पार । तो क्षीराब्धिवासी कमलावर । श्रेष्ठ असे सर्वांसी ॥ २३ ॥ रविचंद्रांसि दिध-ली दीप्ती । त्याच्या तेजें ते राहाटती । तो पुराणपुरुष रुक्मिणीपती । श्रेष्ठ सर्वांसी असे कीं॥२४॥जेणें मत्स्यावतार धरू-न । शंखासुर मारिला आपटून । तो ब्रह्मांडनायक जगज्जीवन । श्रेष्ठ सर्वांसी असे कीं । ॥ २५॥ कूर्म वराह नरसिंह वा-मन । परशुराम अवतार धरून । सुखी केले गोब्राह्मण । तो मधुसूदन श्रेष्ठ पैं ॥ २६ ॥ इंद्रादिक सकळ देव । बंदीं घाली द-शग्रीव । रामें अवतार धरूनि सर्व । ते सोडविले प्रतापें । २७। राजा ह्मणे विश्वजननी । देवांत श्रेष्ठ शिरोमणी । तो भेटवी

भजलागूनी । ह्मणोनि चरणीं लागला ॥ २८ ॥ ऐसें ऐकोनि आदिमाधा । ह्मणे संतांसी शरण जाऊनियां । तयांसि अनन्य भजतां राया । ते तुज रघुराया भेटविती ॥२९॥ ऋद्धि सिद्धी राज्य धन । हें मागसी तरी मी देईन । परी श्रीरामाचें दर्शन । मज स्वाधीन तें नाहीं ॥ ३० ॥ यशश्री आणि औदार्य जाण । ज्ञान वैराग्य संपूर्ण । षड्गुणैश्वर्य लक्षण । तयाचे ठायीं असती पैं ॥ ३१ तो देवाधिदेव सनातन । जाहलासे भक्ताधीन । ऐसे जे संत वैष्णव जन । तुझ्या नगरासि पातले ॥३२॥ ऐसें बोलतां भद्रकाळी । राजा उठिला ते वेळीं । जेथें होती संतमंडळी । तयांसमीप पातला॥३३॥तेथें येऊनि नृपवर । तयांसि घाली नमस्कार । साहित्य देऊनि सत्वर । भोजन घातलें तयांसी ॥ ३४ ॥ तांबूल देऊनि अतिआदरें । गळां घातले सुमनहार । करून साष्टांग नमस्कार । संतांसि विनंति करीतसे ॥३५॥सन्मुख उभा राहूनी । राजा विनवी कर जोडूनी । ह्मणे श्रीरामाचें मजलागूनी । दर्शन स्वामींनीं करवावें ।३६। संत ह्मणती तये समयीं । रामानंदासि शरण जायीं । तयाचा अनुग्रह घेतां पाहीं । सार्थक होईल जन्माचें ॥ ३७ ॥ क्षुद्रदैवतांची सेवा करितां । आत्मज्ञान नव्हे सर्वथा । आतां तरी नृपनाथा । सावधानता भजनासी।३८।क्षुद्रदैवतांचें उपासन । निर्बळ रायाचें करितां सेवन।अज्ञान श्रोतयाचें भाषण । सौख्य नेदीच सर्वथा ॥३९॥ प्रेमेंविण हरिकीर्तन । अज्ञान गुरु शिष्य कृपण । षंढ भ्रताराचे संगतीनें । सौख्य नव्हेची सर्वथा ॥ ४० ॥ आशाबद्ध वक्ता जाण । अभक्तश्रोता वादक पूर्ण । अनुभवाविण ब्रह्मज्ञान । सौख्य नेदी सर्वथा ॥ ४१ ॥ ज्ञानाविण संन्यासग्रहण । मूर्ख पुत्र गृहस्थ निर्धन । दुर्मुखी स्त्रियांचे संगतीनें । सौख्य नव्हेची सर्वथा । ४२ । संत ह्मणती रायालागून । आतां होईं सावधान । रामानंदस्वामीसी शरण । जाईं वेगें नृपवरा ॥ ४३ ॥ ऐसें ऐकोनि संतवचन । अनुताप जाहला रायालागून । प्रधानासि बोलावून । राज्यभार तया वोपिला ॥४४॥ वस्त्रें भूषणें अळंकार । काढोनि द्रव्याचें भांडार । विप्रांसि बोलावून सत्वर । लुटवी नृपवर त्यांहातीं ॥४५॥ अश्वगजरथगोदान । तेंही केलें कृष्णार्पण । रामानंदस्वामीसी शरण । आनंदवना पातला ॥४६॥ रायाची पतिव्रता । तिणेंही त्यजोनि मायाममता । विप्रस्त्रियांसि तत्वतां वस्त्रें भूषणें वांटिलीं ॥४७॥ रामानंदस्वामीजवळी । दोघें जाऊनि ते वेळीं । मस्तक ठेविला चरणकमळीं । भावें करून तेधवां ॥ ४८ ॥ तन मन आणि धन । केलें गुरूसी अर्पण । रामानंदस्वामीसी विनीत होऊन । त्याचा अनुग्रह घेतला ॥४९॥ रामकृष्णनारायण । मंत्र दिधला त्याकारण । सद्गुरूमुखें श्रवणमनन । अनुभवें निदिध्यासन लागलें ॥ ५० ॥ गुरु ज्ञानी अनुतापी शिष्य । तेथेंच आत्मज्ञानप्रकाश । त्याविरहित जो कां अभ्यास । तो मिथ्या दांभिक जाणावा ॥५१॥ उत्तम परीस चांगला । खापरासि नेऊनि लाविला । तेविं अभक्तमलीन शिष्याला । सद्गुरू काय करील । ५२। संत दयाळु सर्वांसी । राव रंक समान त्यांसी । परी जो भावना धरी जैसी । तें फळ तयासी येतसे॥ ५३ ॥वासरमणी उगवतां पूर्ण। प्रकाश सर्वांसी समान । अकर्म्यासि शिक्षा होतसे जाण । पावती मान सज्ञानी॥ ५४ ॥चकोर आणि तस्करास । चांदणें सारखेंचि प्रकाशे । तस्करा देखोनि वाटती दोष । पीयूष भासे चकोरां ॥५५॥ तयाच परी साधुसंत । समदृष्टीं अखंड वर्तत । परी जो जैसी भावना धरित । तैसेंच फळ देत तयासी॥५६॥असो आतां बहुभाषण। रामानंदस्वामीचे दर्शनेंकरून । रायासि जाहलें पूर्ण ज्ञान । कृपादृष्टीं तयाच्या ॥ ५७ ॥ श्रवण आणि हरिकीर्तन । राजा करी प्रेमेंकरून । रात्रदिवस हरिभजन । रामकृष्ण गोविंदा॥ ५८ ॥ तंव कोणे एके दिवसीं । राजा पुसे स्वामीसी । आतां आज्ञा द्यावी मजसी । द्वारावतीसी जावया ॥५९॥ वंदोनि श्रीगुरूचे चरण । द्वारकेसि गेलीं दोघें जण ।करूनि गोमतीचें स्नान । कृष्णदर्शनासि चालिले ॥ ६० ॥ महाद्वारासि जाऊन । भावें घालिती लोटांगण । मग दोघेंही कर जोडून । करिती स्तवन श्रीहरीचें ॥६१॥ जयजय मुकुंदा मुरारी । पुराणपुरुषा श्रीहरी । मज दीनावरी कृपा करीं । शरण चरणासी पातलों।६२। तूं देवाधिदेव सनातन । हें नेणेंच मी अज्ञान । तुज नेणतां उपासन । शक्तिपूजन म्यां केलें॥६३॥अमृत टाकोनि घेतलें धून। परीस टाकोनि घेतला पाषाण । तेविं तुज नेणतां उपासन । शक्तीपूजन म्यां केलें ॥ ६४ ॥ अश्वत्थ त्यागोनियां जाण । शिंदीस घातलें जीवन । तेविं तुज नेणतां उपासन । शक्तिपूजन म्यां केलें ॥ ६५ ॥ उगवला नसतां वासरमणी । तोंवरी खद्योत तेज आगळें मानी । तेविं तुज नेणतां चक्रपाणी । म्यां भवानी उपासिली ॥६६॥ वेदांत पडला नव्हता श्रवणीं । तों कोकशास्त्र आगळें मानी । तेविं तुज नेणतां चक्रपाणी । म्यां भवानी उपासिली ॥ ६७ ॥ कल्पतरु त्यजोनि जवळीं । मान्य केली जैसी बाभुळी । तेविं तुज नेणतां वनमाळी । म्यां पूजिली भवानी ॥ ६८ ॥ अनंतजन्मींचें सुकृत । फळा आलें सुनिश्चित । ह्मणोनि गृहासि साधुसंत । अकस्मात पातले ॥६९॥ तुझा महिमा निरुपम । यांनीं कथिला मजलागून । ऐसें ह्मणोनियां लोटांगण । पुन्हां मागुतीं घातलें ॥ ७० ॥ ऐकोनियां करुणावचन । देवें दिधलें आलिंगन । पिपाजीराजासि दर्शन । साक्षात जाहलें तेधवां ॥ ७१ ॥ चतुर्भुजरूप सगुण । पीतांबरधारी जगज्जीवन । मुकुट विराजे देदीप्यमान । देव सनातन देखिला ॥ ७२ ॥ कीर्तन करूनि महाद्वारीं । नाचे नामाचिये गजरीं । चातुर्मास द्वारकापुरीं । गजर करी नामाचा ॥ ७३ ॥ आज्ञा मागोनि वैकुंठनाथा । परतोनि चालिलीं उभयतां । तों पुढें अरण्यांत चालतां । महाव्याघ्र देखिला ॥ ७४ ॥ महाभयानक पंचानन । पुढें आला करीत गर्जन । राजकांता तयासि देखोन । भय मानसीं पावली ॥ ७५ ॥ परमसुकुमार लावण्यखाणी । मागें पाहे परतोनी । भ्रतारासि ह्मणे ते क्षणीं । व्याघ्र नयनीं देखिला ॥ ७६ ॥ थरथरां कांपे राजबाळा । तंव पंचानन जवळी आला । पिपाजीराजा ह्मणे तिजला । भिऊं नको सर्वथा ॥ ७७ ॥ तुजला दिसतो पंचानन । परि त्यांत आहे श्रीरघुनंदन । रितें स्थळ त्यावांचून । अणुमात्र दिसेना ॥ ७८ ॥ सर्वां घटीं समान अर्क । कां सकळ रसांमाजि जैसें उदक । तैसाचि हा यदुनायक । सर्वां घटीं सारिखा ॥ ७९ ॥ घटींमठीं सम जैसें । बिंबलें दिसे आकाश । तैसाचि व्यापक जगदीश । सर्वांघटीं सारिखा ॥ ८० ॥ शलभ आणि खगपतीसी । आकाश सारिखेंच दोघांसी । तैसाचि तो हृषीकेशी । भूतमात्रांशीं सारिखा ॥ ८१ ॥ पट तंतूहोनि नव्हती । कीं सुवर्णातीच अलंकार ह्मणती । तेविं विश्वंभर नेणोनि भूतीं । विश्व ह्मणती अज्ञान ॥ ८२ ॥ अनंत ब्रह्मांडें भरून । उरला अ-

से जगज्जीवन । व्याघ्र नव्हे तो रुक्मिणीरमण । निश्चयेंसीं जाणावा ॥८३॥ जळीं स्थळीं पाषाणीं । भरूनि उरला चक्र-
पाणी । रिता ठाव त्यावांचोनी । अणुमात्रही असेना ॥८४॥ ऐसें पिपाजी राजा बोलिला । तटस्थ जाहली राजबाळा ।
तों व्याघ्र येऊन ते वेळां । उभा ठाकला सन्निध ॥८५॥ पिपाजी ह्मणे व्याघ्रासी । राम भज तूं अहर्निशीं । व्याघ्र लागला
चरणासी । निजभावेंसीं ते वेळां ॥ ८६ ॥ संतदर्शन होतांचि जाण । तयासि जाहलें दिव्यज्ञान । पिपाजी बोले तयाला-
गून । हिंसाकर्म न करावें ॥८७॥ तुळसीमाळा काढोनि त्वरित । घातली व्याघ्राच्या गळ्यांत । रामकृष्ण हा मंत्र । त्या-
कारणें दीधला ॥८८॥ रामकृष्ण नारायण । याहूनि विशेष मंत्र कोण । गजेंद्रपशु तो अज्ञान । रामभजनें तरला असे ८९
वाटपाड्या वाल्हा कोळी । नारदें उपदेशिला तत्काळीं । जपतां रामनामावळी । वाल्मीकि ऋषी तो जाहला ॥९०॥ अ-
जामिळ पातकी ब्राह्मण । दुरितें वेष्टिला संपूर्ण । मुखें ह्मणतां नारायण । वैकुंठभुवन पावला ॥ ९१ ॥ काम क्रोध मद
मत्सर । दंभ मोह अहंकार । रामराम जपतां निरंतर । उठाउठी पळती हो ॥ ९२ मग व्याघ्रें हात जोडोन । पिपाजीस के-
लें साष्टांग नमन । ह्मणे आपुले कृपेंकरून । श्रीरामभजनीं लागलों ॥ ९३ ॥ पूर्वीं माझे अपराध जाहले बहुत । श्रीराम-
नामीं जाहलों पुनीत । पुनः साष्टांगेंसीं नमित । पिपाजीतें तेधवां ॥ ९४ ॥ ऐसा मंत्र शिरोमणी । व्याघ्रासि सांगोनि
तेच क्षणीं । पिपाजी गेला तेथूनी । आनंदवनीं सत्वर ॥ ९५॥ व्याघ्रासि अनुताप जाहला पूर्ण । हिंसाकर्म टाकिलें ते-
णें । वर्जिलें मांसादि भक्षण । गलितपर्ण खातसे ॥ ९६ ॥ सप्त दिवसपर्यंत । हिंडत असतां अरण्यांत । हरिभजनीं धरूनि
हेत । देह ठेविला तयानें ॥ ९७ ॥ व्याघ्रवृश्चिक सिंह श्वान । सर्प ससाणा गजदारुण । सर्व योनींत तामस गुण । सात्विक
लक्षण यां नाहीं ॥ ९८ ॥ संतसंगाचें महिमान । पंचाननासि जाहलें दिव्यज्ञान । हरिभजनीं ठेऊनि मन । कृष्णार्पण देह
केला ॥ ९९ ॥ संसारीं असोनि मायाजाळीं । जो आठवी हरीस अंतकाळीं । तो मुक्तचि होय तत्काळीं । संशय मनांत
न धरावा ॥ १०० ॥ हरिभजनीं हेत धरून । व्याघ्रें देह टाकिला जाण । जुन्यागडीं नागर ब्राह्मण । तेथें जन्म घेईल तो
॥ १ ॥ नरसी मेहेता वैष्णव वीर । तो व्याघ्रें घेतला अवतार । त्याचें चरित्र अति प्रियकर । श्रोतीं सादर परिसावें
॥ २ ॥ संतचरित्र हेचि गंगा । कीं हे भागीरथी चंद्रभागा । येथें न्हावोनि पांडुरंगा । शरण जावें सद्भावें ॥ ३ ॥ सुमन
आणि शुद्धमती । तुळसी सुमनें घेऊन हातीं । चरणावरी महीपती । भावें मस्तक ठेवीतसे ॥ ४ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजय
ग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । षड्विंशतितमाध्याय रसाळ हा ॥ अध्याय २६ ॥ ओंव्या १०५
श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु



श्रीगणेशाय नमः । । श्रीकृष्णाय नमः । जय दीनदयाळा रुक्मिणीपती । व्यापूनि उरलासि त्रिजगतीं । श्रुति शास्त्रें तुज
वर्णिती । अद्भुत कीर्ती न वर्णवे ॥ १ ॥ वर्णितां तुझें महिमान । शिणलीं अठराही पुराणें जाण । वाद घालितां साहीदर्श-
नें । तयांसि खूण कळेना ॥ २ ॥ तुझें गुणचरित्र अपार । वर्णितां शिणला धरणीधर । तुझिया गुणासि नाहीं पार । जि-
व्हा साचार चिरल्या कीं ॥ ३ ॥ मग तो लज्जायमान होऊनियां । निजांगाची केली शय्या । सहस्रफणांची देवराया ।
केली छाया तुजलागीं ॥ ४ ॥ तुझें वर्णावया महिमान । सरस्वतीनें केला पण । पयोधीची शाई करून । वर्णीत गुण शा-
रदा ॥ ५ ॥ अठराभार वनस्पती । यांची लेखणी घेऊन हातीं । पृथ्वीचा कागद घेऊनी प्रीतीं । गुण वर्णिती जाहली ॥ ६ ॥
समुद्राची सरली शाई । गुण वर्णितां न पुरे मही । ब्रह्मकुमारी लागली पायीं । तुझी नवलाई देखोनी ॥ ७ ॥ तुझे गुण अ-
लौलिक । वर्णितां थोरांसि पडलें टक । अनंत ब्रह्मांडें सकळिक । त्यांचा नायक तूं अससी ॥ ८ ॥ ऐसा तूं व्यापक अनं-
ता । सर्वांठायीं तुझीच सत्ता । विश्वीं भरूनि जगन्नाथा । विश्वनाथा उरलासी ॥ ९ ॥ तुझे भक्त रुक्मिणीपती । त्यांचीं
चरित्रें मज आवडती । तुवां उजळोनि माझी मती । ग्रंथउक्ती बोलवीं ॥ १० ॥ आतां श्रोते संतजन । तिहीं मज द्यावें
अवधान । मागील अध्यायीं निरूपण । केलें श्रवण सकळिकीं ॥ ११ ॥ द्वारकेहूनि येतां जाण । व्याघ्र बोधिला पिपा-
जीनें । हिंसाकर्म टाकिलें त्यानें । गलित पर्णें खातसे ॥ १२ ॥ तो व्याघ्र नव्हेचि साचार । साक्षात होता पार्वतीवर । व्या-
घ्रयासि जातां अवतार । तों दृष्टीस व्याघ्रांबर देखिलें ॥ १३ ॥ ध्यानांत येतां तामसगुण । ह्मणोनि जाहला पंचानन ।
जेविं जागृतींत असतां ध्यान । तैसेंचि स्वप्न दिसतसे ॥ १४ ॥ तेविं अवतार घेतां धूर्जटी । व्याघ्रचर्म देखिलें दृष्टीं । ह्मणो-
नि व्याघ्राचिये पोटीं । उठाउठीं अवतरला ॥ १५ ॥ सप्त दिवस होतांचि जाण । देह ठेविला तयानें । पुन्हां जुन्यागडीं
नागरब्राह्मण । त्याचे उदरीं जन्मला ॥ १६ ॥ दिवसेंदिवस थोर जाहला । मायबापें व्रतबंध केला । सप्त वर्षें होतां तया-
ला । जननीजनिता अंतरलीं ॥ १७ ॥ चुलतबंधू होते सकळ । त्यांनीं केला प्रतिपाळ । गांवचीं मुलें खेळती सकळ । त्यां-
त खेळ खेळत ॥ १८ ॥ इटीदांडू लगोरिया । चुंबाचुंबी लपंडाया । हमामा हुंबरी घालोनियां । पाणबुडिया खेळती ॥ १९ ॥
वाघोडी आणि आट्यापाट्या । झिज्या बोकट अगलगोट्या । भोवरे चक्रें फेरबाट्या । देती काठ्या सत्वर ॥ २० ॥ अनेक
प्रकारचे अनेक खेळ । बाळलीलें खेळती सकळ । ऐसा लोटला कांहीं काळ । तंव अपूर्व वर्तलें ॥ २१ ॥ ऐसे बाळपणींचे
खेळ । खेळतां वृथा गेला काळ । आयुष्य वेंचिलें सकळ । नाहीं घननीळ आठविला २२ असो आतां ते अवसरीं । खेळ
खेळोनि नानापरी । नरसीमेहेता अतिसत्वरीं । निजमंदिरीं पातला ॥ २३ ॥ ह्मणे वहिनी मजकारण । तृषा लागली द्या
जीवन । येरी ह्मणे काय कष्ट करून । श्रम पावोनि आलासी ॥ २४ ॥ फार पोरटें द्वाडवाणें । मायबापें बोळविलीं येणें ।
रात्रदिवस खेळ खेळोन । करी भोजन यथेच्छ ॥ २५ ॥ विद्याभ्यास न करितां । जिणें वागविशी तूं वृथा । पुढें रडेल तु-
झी कांता । वृथा पुष्टा चटोरा ॥ २६ ॥ वडील बंधूची कांता । ऐसीं दुर्वचनें बोलतां । पश्चात्ताप जाहला चित्ता । नरसी

मेहेता ऊठिला ॥ २७ ॥ तेथोनि उठोनि त्वरित । दूर गेला अरण्यांत । ह्मणे प्राक्तन माझें विपरीत । कर्म बळवंत दुस्तर ॥ २८ ॥ बाळपणीं मरतां माता । तारुण्यपणीं निजकांता । वृद्धपणीं पुत्रशोक होतां । ईश्वरी क्षोभ या नांव ॥ २९ ॥ पूर्वजन्मीं कर्म केलें । तयाचें फळ वोढवलें । ऐसें बोलतां ते वेळे । तों पुढें देखिलें अरण्य ॥ ३० ॥ गांवापासोनि कोश दोन । येतां देखिलें महारण्य । नरसीमेहेता विलोकून । पाहता जाहला सभोंवता ॥ ३१ ॥ पुढें अकस्मात पाहात । तों शिवालय देखिलें अवचित । नरसीमेहता प्रवेशे आंत । तंव कैलासनाथ देखिला ॥ ३२ ॥ वोसाड अरण्य म्हणून । नाहीं मनुष्यांचें आगमन । धीर धरूनि निजमनीं जाण । वंदिले चरण शिवाचे ॥ ३३ ॥ उपमन्यु ब्राह्मण कुमर । दुग्ध मागे वाटीभर । माता न देतां सत्वर । रुसोनियां बैसला । ३४ । कीं उत्तानपादक्षितिपाळ । तयाचा पुत्र ध्रुवबाळ । रुसोनि गेला तत्काळ । वैकुंठपाळ आराधिला ३५ तयाचे परी नरसीमेहेता । अनुताप धरूनि निजचित्ता । ह्मणे विश्वंभरा विश्वनाथा । मज अनाथा अपंगीं ३६ पिनाकपाणी पार्वतीरमण । त्याचे अंगावरी केलें शयन । वर्जिलें अन्नादि फळभक्षण । उदकपान न करी तो ॥ ३७ ॥ सप्तदिवस लोटतां जाण । कैलासपती विस्मित मनें । ह्मणे सर्व शरीर मजलागून । वाहिलें येणें निजनिष्ठें ॥ ३८ ॥ गंध अक्षता सुमन चंदनें । नानापरींचीं दिव्यरत्नें । मुक्ताहार सुवर्णभूषणें । मजकारणें अर्पिती ॥ ३९ ॥ द्रव्य वेंचूनि अगणित । कोणी शिवालयें बांधित । भागीरथीचें उदक त्वरित । कोणी अर्पिती आवडीं ॥ ४० ॥ बिल्वपत्रांची लाखोली । आणोनि वाहाती तत्काळीं । परी सर्व शरीर कोणे काळीं । नाहीं मजलागीं अर्पिलें ॥ ४१ ॥ शरीराचा लोभ धरून । नानापरींचीं करिती साधनें । वृथा गेलें त्यांचें ज्ञान । त्यांसी जगज्जीवन भेटेना ॥ ४२ ॥ नरसीमेहेत्याचा दृढभाव । देखोनि तुष्टला सदाशिव । सगुणस्वरूप महादेव । प्रकट करी ते वेळे । ४३ । जो दशभुज पंचानन । गळां पन्नगांचें भूषण । मस्तकीं जटा पिंगटवर्ण । विभूतिचर्चन सर्वांगीं ॥ ४४ ॥ ऐसें स्वरूप प्रकट करूनी । काय करी पिनाकपाणी । नरसीमेहेत्यासि उठवूनी । अभयवचनीं बोलत । ४५ । ह्मणे रे बाळका निजभक्ता । प्रसन्न जाहलों तुज आतां । काय कामना वाटते चित्ता । ते सर्वथा मज सांग ॥ ४६ ॥ नरसीमेहेत्यानें ऐकोनि वचन । कैलासपतीचे धरिले चरण । ह्मणे प्रसन्न झालेत मजलागून । अभयवचन देऊनी ॥ ४७ ॥ तरी मी तो बाळक अज्ञान । मज नकळेचि उत्तम मागणें । तुह्मांस आवडे जीवाहून । तें मज देईं नीलकंठा ॥ ४८ ॥ जैसें मातेचें अज्ञान बाळ । त्यास न कळेचि उचितकाळ । परी जननीस आवडे सर्वकाळ । अलंकार लेववी निजप्रीतीं ॥ ४९ तेविं तुह्मी आजि विश्वनाथा । प्रसन्नमुखें वर वोपिता । तरी जें आवडेल तुमचे चित्ता । तेंचि नाथा मज द्यावें ॥ ५० ॥ हास्यवदन पिनाकपाणी । विस्मित जाहले निजमनीं । ह्मणे ऐसा चतुरभक्त कोणी । नाहीं नयनीं देखिला ॥ ५१ ॥ नरसीमेहेत्याकारण । मागुती शिव बोले वचन । सकळ देवांचें देवतार्चन । तो श्रीकृष्ण मज आवडे ॥ ५२ ॥ गंगापार्वतीस न सांगतां । मी जपतसें श्रीकृष्णनाथा । त्याहून विशेष भक्तकथा । मज तत्वता आवडे ॥ ५३ ॥ माझिया जीवींचें निजगुज । तें तूं दाखवीं ह्मणसी मज । याचकें नृपासि मागतां राज्य । नव्हेचि काज सर्वथा ॥ ५४ ॥ कृपणासि मागतां निजधन । सुखी नव्हती याचकजन । कामिकासि मागतां स्त्रीदान । न पावे सन्मान याचक ॥ ५५ ॥ येरू ह्मणे पिनाकपाणी । नानापरीचे दृष्टांत देऊनि । समजावितां मजलागूनी । परी संशय मनीं वाटतसे ॥ ५६ ॥ बळिराजा उदार देखोन । याचकरूपें श्रीवामन । जातांचि देऊनि राज्यदान । आत्मनिवेदन केलें कीं ॥ ५७ ॥ हरिश्चंद्र राजा सात्विकपूर्ण । विश्वामित्र याचक मागतां दान । राज्य कांता पुत्र देऊन । निजसत्व तेणें रक्षिलें ॥ ५८ ॥ तेविं उदार कैलासपती । प्रसन्न जाहलेती मजप्रती । तरी तुह्मां लागली जयाची प्रीती । तोच निश्चितीं मज दावा ॥ ५९ ॥ वचन ऐकोनियां देख । काय बोलती त्रिपुरांतक । श्रीकृष्णलीला अलोलिक । त्या मज देख आवडती ॥ ६० ॥ श्रीकृष्णलीला अद्भुत जनीं । गोकुळीं क्रीडला चक्रपाणी । तें रासमंडळ मजलागुनी । जीवाहूनी आवडे ॥ ६१ ॥ मित्रकन्येचिया कांठीं । गोपीसी क्रीडे जगजेठी । मजला त्याची प्रीती मोठी । जातसें दिठीं पाहावया ॥ ६२ ॥ रासमंडळ रचोनि सांग । नृत्य करीतो श्रीरंग । मीही वाजवीं मृदंग । ताल सांग बैसोनी ॥ ६३ ॥ तेंचि दाखवीन तुजप्रती । ह्मणोनि अभय दिधलें हातीं । गोपीचा वेष तयाप्रती । दिधला निश्चितीं नीलकंठें ॥ ६४ ॥ सवें घेऊनि त्यालागोनी । त्वरें चालिले पिनाकपाणी । रासमंडळीं येऊनी । चक्रपाणी वंदिला ॥ ६५ ॥ ऐसें ऐकतां वचन । आशंका धरितील विचक्षण । ह्मणाल रासमंडळीं क्रीडोन । गेला श्रीकृष्ण द्वापरीं ॥ ६६ ॥ कलियुगीं भक्त नरसीमेहेता । येथें कां लिहिली कृष्णकथा । ऐसी आशंका धराल चित्ता । तरी हे वृथा कविता न ह्मणावी ॥ ६७ ॥ मथुरा गोकुळ वृंदावनीं । अद्यापि क्रीडतो चक्रपाणी । भाविकभक्त जे त्यांलागोनी । दिसे नयनीं हरिलीला ॥ ६८ ॥ हे कथा भविष्योत्तरपुराणीं । स्वयें बोलिले श्रीव्यासमुनी । कलियुगीं भक्तशिरोमणी । त्यांचीं कथनें वर्णिलीं ६९ जैसी मर्यादा वेल उल्लंघून । प्रवेश न करी समुद्रजीवन । तैसें कवीश्वरांचें वदन । झाल्यावांचोनि वदेना ॥ ७० ॥ कीं आयुष्य सरल्यावांचोनी । काळ न दंडी जीव कोणी । तेविं कवीश्वरांची निजवाणी । झाल्यावांचोनी वदेना ७१ ॥ कीं दिनमानघटिका न होतां पूर्ण । न मावळे सूर्यनारायण । तेविं चरित्र वर्तल्यावांचोन । कवि तें लेखन न करिती । ७२ । न मिळतां पतीचिया मता । न वर्ते जेविं पतिव्रता । तेविं कवीश्वरांची वाणी वृथा । असत्यकथा न वदे कीं ७३ कीं स्वयंपाक करावयालागून । प्रार्थूनि आणिली शेजारीण । ते आपुले पदरची सामग्री घेऊन । नयेचि जाण सर्वथा ७४ पाक कर्ती असली चतुर । तरी अन्न करील रुचिकर । तेविं कवीदृष्टांत चार । देईल साचार निरूपणीं । ७५ । परी मुळींचें पद सांडोनि सर्वथा । असत्य ग्रंथ न वदे कवयिता । ह्मणोनि प्रार्थना करितों पंडितां । विकल्पचित्ता न धरावा । ७६ । श्रीभीमातीरवासी रुक्मिणीरमण । तोचि बुद्धीचा दाता चैतन्यघन । तोचि बोलवी ग्रंथनिरूपण । येरवीं अज्ञान महीपती । ७७ । आतां ऐका भाविकजन । मागील कथेसी द्यावें अवधान । नरसीमेहेत्यासी पार्वतीरमण । आले घेऊनि हरिलीले । ७८ । कालिंदीतटीं अति अद्भुत । वृक्ष लागले गगनचुंबित । दवणा केतकी पारिजात । पारवे घुमती हरिलीलें । ७९ । चूतवृक्ष आणि जांबुळी । आंबळी निंबोणी रायकेळी । बकुळी आणि रामसीताफळी । डोले पाडळी सुवासें । ८० ।

बिल्व वट आणि गोंधणी । अश्वत्थ रुद्राक्ष सारमणी । चंपक दाळिंबी बहुलसुमनीं । कृष्णरंगणीं डोलती ॥८१॥ पिंपरी शेवगे महारूख । पासवणी आणि सेलाटक । फणस मोहगगनीं डोलत । यदुनायक देखोनी ॥ ८२ ॥ भोंवता वृक्षांचा परिघ देखा । आंत लागली पुष्पवाटिका । मोगरे जाई सेवंतिका । कृष्णनायका देखती ॥ ८३ ॥ सहस्रफडी पिंवळी सेवंती । भोंयचांफे जासुद सेवंती । कापुरवेली गुलाब शोभती । चरित्र पाहती कृष्णाचें ॥ ८४ ॥ सराटे श्यामहंसराशि । बटमोगरे गुलाब सुहासी । गुलचनी आरक्त आणि तुळसी । कुंजवनासी लागल्या ॥ ८५ ॥ वसंत येऊनि आपण । श्रृंगारिलें कुंजवन । तेथें यशोदेचा नंदन । क्रीडे आपण स्वलीलें ॥८६॥ कृष्णदृष्टीचा महिमा थोरू । सराटे होती कल्पतरू । वोहळ उदकाची सरू । अमृत तुसारू करीना ॥८७॥ तेथें क्रीडतसे श्रीरंग । खडे जाहले पद्मराग । बरड गोटे अमोघ । परिस अभंग ते जाहले ॥ ८८ ॥ पारवे रांवे हंस जाणा । चाष चातक पक्षी मनमोहना । कपोत चिमण्या साळोंक्या वामना । कृष्णकीर्तना डोलती ॥ ८९ ॥ असो आतां बहुभाषण । कालिंदीतटीं हें उपवन । लागलें अति शोभायमान । तेथें श्रीकृष्ण क्रीडत ॥९०॥ नरसीमेहेता आणि उमापती । तेथें येऊनि सत्वरगतीं । भावें नमिला तो श्रीपती । क्षेम प्रीतीं दीधलें ॥ ९१ ॥ साक्षात परब्रह्म श्रीकृष्णमूर्ती । गोपी त्या अवतरल्या निजश्रुती । वेणु वाजवितां श्रीपती । गोळा होती निजच्छंदें ॥९२॥ सभोंवत्या मिळोनि व्रजांगना । मध्यें घननीळ वैकुंठराणा । गोपिका देखोनि मनमोहना । धांवूनि चरणा लागल्या ॥ ९३ ॥ श्रीकृष्णचरण अति सुकुमार । ध्वजवज्रांकुश तोडर । ब्रह्मा पोटींचा निजकुमर । चरण साचार न पावेची ॥९४॥ पवित्रपणें पाहतां जाण । तरी गंगा चरणींचें जीवन । ह्मणोनि मस्तकीं उमारमणें । धरिली जाण आवडीं ॥ ९५ ॥ वांकी नूपुरें चरणीं गर्जती । ह्मणती धन्य आह्मीं त्रिजगती । आह्मांवरी तुष्टोनि कमलापती । चरणीं निश्चितीं स्थापिलें ॥९६॥ नख देखूनि निशापती । परमलज्जित जाहला चित्तीं । तोडर गर्जे कोणे रीतीं । दुरितें नासती हरिचरणीं ॥९७॥ पोटऱ्या जानुजंघा सुरेख । कटी पीतांबर वेष्टिला देख । कोटि विद्युल्लता लखलख । जडल्या देख निजांगें ॥९८॥ आजानुबाहु श्रीपती । दोनी भुजा दंड मिरवती । विधाता जन्मला नाभीप्रती । अंत निश्चिती न कळे त्या ॥ ९९ ॥ विशाळ उदर तनू सांवळी । हृदयीं शोभे सुंदर त्रिवळी । निरुपम दिसे रोमावळी । श्रीवत्स नवाळी काय वर्णू ॥ १०० ॥ सर्व आनंद होऊनि गोळा । तो एकवटला मुखकमळा । अधरामृताचा सोहळा । जाणे कमळा निजमुखें ॥१॥ कमलदला ऐसे जाण । विशाळ श्रीकृष्णाचे नयन । सरळ नासिक विराजमान । वसंत येऊन राहिला ॥ २ ॥ कर्णीं कुंडलें अतिसोज्वळ । भोंवया सुरेख विशाळ भाळ । मस्तकीं शोभती केश कुरळ । मयूरपिच्छें वेष्टिलीं ॥३॥ श्रीकृष्णाचा मुकुट पाहोनी । लज्जित जाहला वासरमणी । कंठींचा कौस्तुभ होऊनी । भास्कर मनीं निवाला ॥४॥ आकाश जैसें निर्मळ जाण । त्यावरी शोभे तारागण । तैसीं पदकावरी मझारवें । कृष्णभूषण लखलखित ॥ ५ ॥ कंठीं एकावळी शोभत । आपाद वैजयंती डोलत । नाना पुष्पांचे हार निश्चित । गळां घातले निजभक्तीं ।६। सर्वांगीं चंदन चर्चिलें देख । भाळीं



कस्तूरी मळवट सुरेख । तुळसीमाळा यदुनायक । लेतसे देख निजप्रीतीं ॥ ७ ॥ ऐसें परब्रह्मरूप सगुण । मुखें करीत वेणुवादन । तटस्थ राहिले गोपींचे नयन । श्रीकृष्णध्यान देखोनी ॥८॥ सुस्वर मुरली वाजवी कान्हा । भोंवत्या नाचती व्रजांगना । आलापिती गीत नाना । मनमोहना गोविंदा ॥ ९ ॥ तत वितत घनसुस्वर । पांवा मोहरी आणि झल्लर । वाद्यें वाजती मनोहर । आलाप घेती निजमुखें ॥११०॥ मृदंग वाजवी पार्वतीरमण । त्यावरी नाचती व्रजांगना । ताल संकेत वैकुंठराणा । दाविती खुणा अंतरींच्या ॥११॥ कृष्णासि ह्मणती व्रजसुंदरी । तूं व्यापक असती सर्वांतरीं । तुझा काम धरूनि अंतरीं । आलों लवकरी श्रीकृष्णा ॥१२॥ आह्मीं व्रजांगना अनेक । तूं शार्ङ्गधर दिससी एक । तुझें रूप पाहतांचि देख । रतिनायक खवळला ॥ १३ ॥ कृष्णा तुझें पाहतां वदन । मुखासि वाटे द्यावें चुंबन । हृदयीं हृदय एक करून । द्यावें आलिंगन तुजलागीं ॥१४॥ ऐसें बोलतां गोपनारी । अनेक रूपें नटला हरी । जैसा भाव जयाचे अंतरीं । तैसाचि मुरारी होतसे ॥ १५ ॥ जितुक्या होत्या व्रजांगना । तितुकीं रूपें घेतसे कान्हा । हातीं धरूनि जगज्जीवना । व्रजांगना नाचती ॥१६॥ हातीं धरूनि घनसांवळा । व्रजांगना धरिती गळा । सगुणरूप पाहती डोळां । चुंबन अबला देताती ॥ १७ ॥ दोघे कृष्ण दोघी गवळणी । एकमेकांचा हात धरूनी । ऐसें रासमंडळ रचोनी । चक्रपाणी भोगिती ॥१८॥ कृष्णतनू अति सकुमार । हृदय विशाळ माज चिवळ । वक्षस्थळीं रोमावळ । देखतां विव्हळ व्रजनारी ॥ १९ ॥ धरूनियां श्रीकृष्णकर । गोपी ठेविती हृदयावर । मुख चुंबोनि वारंवार । घालिती तांबूल निजमुखीं ॥ १२० ॥ जयाचे चित्तीं जैसा काम । तैसा पुरवी मेघश्याम । श्रीकृष्ण सर्वांचा विश्राम । जपतो नाम नीलग्रीव । २१ । रासमंडळ रचोनि युक्तीं । अनेक गोपी गाती नाचती । नरसीमेहेत्यासी श्रीपती । वोळखी निश्चितीं तत्काळ ।२२। अठराभार वनस्पतीसी । पाहतां वेगळी निवडे तुळसी । तेविं नरसीमेहेत्यासी । निजदृष्टीसी वोळखिलें ॥२३॥ कीं आकाश भरलें तारागणीं । त्यांत निवडे ध्रुवचांदणी । तेविं नरसीमेहेत्यासि नयनीं । चक्रपाणी वोळखिती ।२४। कीं नवग्रह पाहतां नयनीं । त्यांत निवडे वासरमणी । तेविं नरसीमेहेत्यासी देखोनि नयनीं । श्रीकृष्ण मनीं विस्मित ॥ २५ ॥ कीं सिद्धिसाधक बैसले थोर । त्यांत वेगळा अनसूयाकुमर । तेविं नरसीमेहेत्यासी शार्ङ्गधर । वोळखी साचार निजदृष्टीं ॥ २६ ॥ शिवासि ह्मणे व्रजभूषण । नूतन गोपी आणिली कोण । आजि मित्रपणाभि हें वचन । केलें जाण नीलकंठा ॥२७॥ माझी तुझी प्रीती जवळी । ह्मणोनि आणितों रासमंडळीं । ऐसें बोलतां वनमाळी । चंद्रमोळी हांसले ॥२८॥ नरसीमेहेत्यासी पार्वतीरमण । नेत्रसंकेतें दावी खुण । त्याणें तत्काळ येऊन । श्रीकृष्णचरण वंदिले ।२९। सदाशिव ह्मणे कृष्णनाथा । तुझा दास नरसीमेहेता । तयाची पुरातनकथा । तुज सविस्तर सांगेन ।१३०। पूर्वजन्मीं तामसगुण । महाव्याघ्र हा पंचानन । अरण्यांत असतां पिपाजीनें । नामस्मरण सांगीतलें ।३१। तुझें करितां नामस्मरण । दुरितें नासलीं संपूर्ण । जुन्यागडीं नागरब्राह्मण । तेथें जन्म पावला ३२ बाळपणीं मातापिता । याचीं निवर्तलीं असतां । यानें शरीर श्रीकृष्णनाथा । मज सर्वथा अर्पिलें ।३३। सप्तदिवसपर्यंत ये-

णें। वर्जिलें अन्न उदकपान। मी संतुष्ट होऊन निजमनें। जाहलों प्रसन्न यालागीं ॥३४॥ मज उत्तर दिधलें येणें। मज उचित न कळेच मागणें। जें आवडे तुजकारणें। तें मज देणें नीलकंठा।३५। मज आवडसी तूं जगज्जीवन। ह्मणोनि आलों येथें घेऊन। तरी याचे मस्तकीं हस्त ठेवून। देईं वरदान श्रीकृष्णा॥३६॥ ऐसें ऐकून कमळापती। नरसीमेहेत्यासि धरिलें हातीं। अभय देऊन कृपामूर्ती। आलिंगन प्रीतीं दीधलें॥ ३७॥ पुढती बोले चक्रपाणी। त्वां रासमंडळ देखिलें नयनीं। याचे प्रबंध रचोनी। सांगें श्रवणीं सकळांच्या॥३८॥माझी गुणचरित्रलीला। नित्य दिसेल तुझिया डोळा। ऐसा वर घनसांवळा। देता जाहला तयासी॥३९॥ शिवासि ह्मणे श्रीकृष्ण। आतां जावें यासि घेऊन। ऐसें ऐकूनि उमारमण। केलें नमन सत्वर।१४०। इच्छामात्रेंकरून त्यासी। आणोनि बैसविलें राउळासी। अभय देऊनि निजभक्तासी। कैलासवासी पैं गेला॥४१॥ शिवालयीं बैसवूनि जाण। नरसीमेहेता करी कीर्तन। रात्रदिवस नामस्मरण। करी सप्रेम आवडीं४२ श्रीकृष्णलीला कथामृत। गाऊनि प्रेमें नृत्य करीत। निर्लज्ज होवोनि निश्चित। गुण वर्णित श्रीहरीचे॥ ४३॥ रासमंडळ खेळला श्रीपती। तें नरसीमेहेत्यानें लिहिलें ग्रंथीं। त्या देशीं अद्यापि लोक गाती। भाषा गुजराथी असे कीं॥४४॥ असो मागील निरूपण। नरसीमेहेता मंदिराहून। वनांत गेला कीं रुसोन। बंधुजन पाहती॥ ४५॥ तंव अरण्यांत चरती गोधन। त्यासवें येती गोपजन। ते नरसीमेहेत्याचें कीर्तन। करिती श्रवण आवडीं॥४६॥ गृहासि येऊनि त्वरित। बंधूसि सांगती वृत्तांत। ह्मणती नरसीमेहेता शिवालयांत। गुण वर्णित हरीचे॥४७॥ऐसी मात ऐकोनि कानीं। संतोष जाहला त्याच्या मनीं। नरसीमेहेत्यासि समजावूनी। निजसदनीं आणिला॥४८॥ कोणी गांवींचे भाविकजन। अध्यात्मशास्त्रीं होते निपुण। ह्मणती यावरी तुष्टला नारायण। दिसतें चिन्ह पालटलें॥ ४९॥ गंगेसि वोहळ मिळतां जाण। तयासि आलें पवित्रपण। तेविं कृपा करितां जगज्जीवनें। सात्विकलक्षण या आलें॥१५०॥ गांवींचा एक होता ब्राह्मण। परम भाविक वैष्णवजन। त्याणें करूनि कन्यादान। केलें लग्न तयाचें॥५१॥ लोहासि परीस लागतां जाण। त्याचें तत्काळचि होय सुवर्ण। तेविं कृपा करितां नारायण। मग काय उणें तयासी॥५२॥ न करी कोणाचें उपार्जन। राव रंक सारखेचि जाण। दीन आणि श्रीमंतजन। लेखी समान दृष्टीसी॥५३॥ गृहस्थाश्रम केल्यावर। दिवसेंदिवस जाहला थोर। एक कन्या एक पुत्र। संतान तया जाहलें असे॥५४॥ पुढें रसाळ निरूपण। श्रोतीं व्हावें सावधान। नरसीमेहेत्याच्या पुत्राचें लग्न। अंगें श्रीकृष्ण करील॥५५॥अहो भक्तचरित्रकथा अमोलिका। कीं हे सुगंध पुष्पांची वाटिका। द्वारकावासी श्रीकृष्णसखा। तो वसंत देखा माधव॥ ५६॥ महाराष्ट्र ओंव्या फुलें मोकळीं। हार गुंफोनि नानापरी। महीपती होऊन फुलारी। वैष्णवमेळीं पातला॥ ५७॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। सप्तविंशाध्याय रसाळ हा॥१५८॥ अध्याय २७॥ ओंव्या १५८॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥



श्रीगणेशाय नमः। श्रीरुक्मिणीरमणाय नमः। पुंडलीकवरदा पांडुरंगा। मदनताता रुक्मिणीरंगा। व्रजनारीच्या रासरंगा। तूं श्रीरंगा क्रीडसी॥१॥ तुझा चित्तीं धरितां काम। भक्त होती सदा निष्काम। सकळ जीवांचा तूं विश्राम। आत्माराम रघुवीर।२। तूं चित्तचालक चैतन्यघन। गुणातीत आणि निर्गुण। वैरियां देसी सायुज्यसदन। आनंदघन तूं एक॥३॥ तूं देवाधिदेव सनातन। अंबरीष आला तुज शरण। एकादशीव्रतादि नेम जाण। करी सप्रेम आवडीं॥ ४॥ दुर्वास ऋषि तपोनिधी।पातला छळावया तया संधीं।शाप देतां निष्ठुरबुद्धी।कृपानिधी तुज स्तवियेलें।५।अंबरीषाची ऐकोनि करुणा। मोहें दाटला तुज पान्हा। सत्वर पावलासि जगज्जीवना। मनमोहना श्रीकृष्णा।६।चक्र लावूनि ऋषीचे पाठीं। दुर्वास केला हिंपुटी। अंबरीषास कृपादृष्टीं। त्वां जगजेठी विलोकिलें॥७॥ अभय देऊनि निजभक्तांसी। दहा गर्भवास स्वयें सोशिसी। मत्स्य कूर्म वराह होसी। वसुधा दाढेसी धरूनियां॥ ८॥ हिरण्यकशिपें प्रल्हादभक्त। गांजितां पावलासि त्वरित। गुरगुर करोनि स्तंभा-आंत। प्रगट त्वरित जाहलासी।९।क्रोधें मारूनियां असुर। प्रल्हाद रक्षिला निजकिंकर। क्षत्रिय माजतां पृथ्वीवर। परशुधर तूं होसी॥ १०॥ जमदग्नि रेणुकेचे उदरीं। अवतार घेऊनि ते अवसरीं। एकला एक तूं श्रीहरी। केली वोहरी क्षत्रियांची॥ ११॥ क्षत्रिय निवटूनि त्या अवसरा। राज्य दिधलें धरामरां। ऐसा तूं कृपासागरा। विश्वोद्धारा रामकृष्णा॥ १२॥ अति उन्मत्त राक्षस रावण। शिवें त्यास दिधलें वरदान। सकल देव जिंकूनि त्यानें। बंदीं संपूर्ण घातले॥ १३॥ नवग्रहांच्या पायऱ्या करून। राज्य करीतसे तो दशानन। वायु येऊनि झाडी आंगण। सडा पर्जन्य घालीतसे॥१४॥मार्तंड नापिक होऊन। श्मश्रु करी स्वकरेंकरून। गंधर्व राखी गजवदन। मनांत लाज न धरितां॥१५॥ आदिमाया जे भगवती। नित्य रगडी रावणाप्रती। सटवी धूतसे बाळंती। लज्जा चित्तीं न धरीच॥१६॥ कामें करिती सकळ देव। बंदीं घातले इंद्रराव। ऐसिया संकटीं तुझा स्तव। करिती देव सकळिक॥ १७॥ ऐकोनि त्यांचीं करुणावचनें। कृपा आली तुजकारणें। अवतार धरूनि रघुनंदनें। रावण मर्दोन टाकिला॥१८॥ सकळ देवांसि सोडवून। केलें धर्माचें स्थापन। कंस चाणूर माजतां जाण। स्वयें श्रीकृष्ण जाहलासी॥ १९॥ सकळ निवटोनि दुराचारी। भक्त रक्षिले नानापरी। द्रौपदीस वस्त्रें मुरारी। अंगें श्रीहरी नेसवी॥ २०॥ कलियुगींचे भक्तराज। सद्भावें अनुसरले तुज। निजांगेंकरून त्यांचें काज। मुक्तिसायुज्य त्यां देसी॥ २१॥ रामदासाचे भक्तीसाठीं। डाकुरा आलासि जगजेठी। वालभर सोन्यासाठीं। विकिलें हाटीं तुजलागीं॥२२॥जयदेव तुझा प्रेमळभक्त। त्याचे घरिंचें उठविलें प्रेत। वर देऊनि अभयहस्त। जगीं कीर्ति वाढविली॥ २३॥ नरसीमेहेता भक्तप्रेमळ। त्यास दाखविलें रासमंडळ। आतां ऐका श्रोते सकळ। कथा रसाळ निरुपम॥ २४॥ नरसीमेहेत्यासि धूर्जटी। रासमंडळ दावी दिठीं। ते श्रीकृष्णलीला अति गोमटी। त्याचे दृष्टीं पडतसे॥२५॥ जैसें दृष्टीस देखिलें सांगे। त्याचीं पदें रचिलीं अंगें। वर दिधला श्रीरंगें। भक्तभवभंगें तयासी॥२६॥ नानापरीचे प्रबंध गात। नित्य हरीचे गुण वर्णित। टाळ वीणा घेऊनि हातांत। नृत्य करीत कीर्त-

र्नी ॥२७॥ न करी कोणाचें उपार्जन । अहोरात्र नामस्मरण । राजा आणि रंकदीन । लेखी समान समदृष्टीं ॥२८॥ कल्पतरु आणि बाभुळ । पंडित आणि अजापाळ । साधु आणि निंदक खळ । देखे सकळ समदृष्टीं ॥२९॥ अयाचितवृत्ती धरून । कोणी देईल वस्त्र अन्न । त्यांतच अतीतां तोषवून । कुटुंबरक्षण करीतसे ॥३०॥ जुन्यागडासमीप आणिक । शामपुर ग्राम एक । तेथील सावकार त्रिपुरांतक । असे स्वशाखा तयाची ॥३१॥ त्याची कन्या जाहली उपवर । लग्नविचार करी सावकार । पुरोहित पाठविले सत्वर । वरविचार करावया ॥३२॥ कृष्णभट नामाभिधान । परमभाविक होता ब्राह्मण । नरसीमेहेत्याच्या घरा येऊन । काय वचन बोलिला ॥३३॥ कृष्णभट बोलिला वचनें । आह्मांसि पाठविलें यजमानें । कीं तुमच्या पुत्राकारणें । कन्यादान करावें ॥ ३४ ॥ राशिनक्षत्र पाहतां जाण । घटित आले छत्तीसगुण । लग्ननिश्चय करून । आला परतोन मागुतीं ॥ ३५॥ पुरोहितें केली सोयरीक । तेंचि मानलें सर्वांसी देख । त्या देशींचा ऐसा दंडक । मान्य सकळिक करिती कीं ॥३६॥ पुरोहितें केलिया वचन । नायकेल जरी यजमान । तरी उपाध्याय अंगुली कापून । वराकारणें देतसे ॥ ३७ ॥ देशदंडक ऐसा जाण । ह्मणोनि निश्चय केला ब्राह्मणें । यजमानासि बोले वचन । धरिलें लग्न कन्येचें ॥ ३८ ॥ जुन्यागडीं नागरब्राह्मण । परमभाविक वैष्णव जाण । त्याच्या पुत्रासि कन्या अर्पून । निश्चय करून आलों मीं ॥३९ ॥ ऐकोनि पुरोहिताचें वचन । हांसों लागले सकळ जन । ह्मणती मुलीचें प्राक्तन । आलें दिसोन विपरीत॥४०॥ ह्मणती तो वैष्णव उदासी । कीर्तनीं नाचे अहर्निशीं । कन्या त्यासि अर्पिली कैसी । सोयरा आह्मासी साजेना ॥४१॥ ज्याचे घरीं श्री भागवत । श्रवण करिती साधुसंत । अवघे उदास आणि विरक्त । तो सोयरा आह्मासि साजेना ॥ ४२ ॥ जयासि आपुलें आणि परावें । सम विषम नाहीं ठावें । सर्वांभूतीं सारिख्या भावें । सोयरा नव्हे तो आह्मा ॥ ४३ ॥ अक्रोध आणि सदाचारी । सर्वांभूतीं मैत्री बरी । अन्नवस्त्र संकीर्ण घरीं । कैसी नोवरी तया दीधली ॥ ४४ ॥ पुरोहित ह्मणे ऐका वचन । मी तरी आलों निश्चय करून । तुह्मी करितसां अनमान । देईन कापून अंगुली ॥४५॥ ऐसें ऐकूनि ह्मणे त्रिपुरांतक । लग्नतीथ आहे उदयीक । सर्व साहित्य घेऊनि देख । यावें सम्यक लग्नासी ॥ ४६॥ आह्मी गृहस्थ नामांकित । सोयरा दुर्बल विष्णुभक्त । हांसें होईल पिशुनांत । ऐसी मात न करावी ॥४७॥ लग्ना आणावे पांच शत । हत्ती घोडे शिबिकारथ । वाद्यें लावूनि अपरिमित । यावें त्वरित संभ्रमें ॥४८॥ वस्त्रें अलंकार भूषणें । घेऊनि यावें वधूकारणें । आमुचे ग्रामवासी जनांलागून । मिष्टान्न भोजन त्यांसि यावें॥४९॥ ऐसें साहित्य घेऊन । उदयीक न होतां त्यांचें आगमन । तरी निश्चयेंसी मोडेल लग्न । सत्य जाण गुरुवर्या ॥ ५० ॥ ऐसी अटक घालितां जाण । पुरोहितासि कळली खूण । त्रिपुरांतकास उपलक्षण । दृष्टांत देऊन बोलत ॥ ५१ ॥ ह्मणे भीमकरायाची कन्या नोवरी । कृष्णासि अर्पिली जे अवसरीं । रुक्मी तयाची हेळणा करी । तैसी परी त्वां केली ॥ ५२ ॥ कीं पार्वती हिमालयाची कुमरी । तीस वर नेमिला त्रिपुरारी । हेळणा करिती त्याच्या नारी । तैसी परी त्वां केली ॥ ५३ ॥ तुमचें इच्छित असेल जें मन । तें सर्वही येईल घ-



डोन । ऐसें ह्मणोनि ब्राह्मण । गेला परतोन सांगावया ॥ ५४ ॥ नरसीमेहेत्यासि बोले वचन । उदयीक उत्तम आहे लग्न । तुह्मी सर्व साहित्य घेऊन । साह्य श्रीकृष्ण करावा॥५५॥ परम चतुर कृष्णभट जाण । अतिभाविक वैष्णवजन । जेणें सिद्धीस जाईल लग्न । तैसीं वचनें बोलिला॥५६॥ ह्मणे तिकडील गोष्टी सांगतां यास । तरी आतांचि होईल नाश । नरसीमेहेता परम उदास । न धरी आस कवणाची ॥ ५७॥ लग्नसिद्धी होईल जेणें । तैसींच बोलोनि नम्रवचनें । पुरोहित निश्चय करून । आला परतोन घरासी ॥ ५८ ॥ सुई सुहागी सुमनुष्य पाही । मध्यस्थ पडिलीं जिये ठायीं । तेथें द्वैत न दिसे कांहीं । एके ठायीं करिती कीं ॥५९॥ कुऱ्हाड कातर कुमनुष्य । मध्यस्थ पडिले ज्या ठायास । तेथें तत्काल होईल नाश । अनर्थास हेंचि मूळ ॥६०॥ लग्नांत नसावा चहाड । युद्धांत नसावा अत्यंत भ्याड । कीर्तनीं नसावी गडबड । तुळसींत बोकड नसावा ॥ ६१ ॥ पुराणांत नसावा अति वाचाळ । भाविकांत नसावा निंदक खळ । प्रवासीं नसावा भुकाळ । भजनीं तळमळ नसावी ॥ ६२ ॥ शेजारीं नसावा सोयरा । पर्जन्यीं नसावा दक्षिण वारा । श्रीगुरुमंत्र घेतां खरा । विकल्प दुसरा नसावा ॥६३॥ विरक्तास नसावा द्रव्यसांठा । दुर्बळांत नसावा उन्मत्तगांठा । सूक्ष्ममार्गीं नसावा कांटा । ज्ञानियांसि ताठा नसावा ॥ ६४ ॥ आशाबद्ध नसावा सत्पात्र । कुग्रामीं न घ्यावें अग्निहोत्र । अपथ्यासि औषध मात्र । स्वतंत्र वैद्यें न यावें ॥६५॥ मित्र नसावा कंटक कृपण । सोयऱ्यासि न यावें व्याजीं धन । साधकीं सेवितां राजान्न । सुकृतखंडन होतसे ॥ ६६ ॥ असो आतां बहुभाषण । राहील ग्रंथनिरूपण । पुरोहित निश्चय सांगून । आला परतोन निजग्रामा ॥६७॥ यजमानासि सांगे वचन । उदयीक सत्वर येईल लग्न । तुह्मी सर्व साहित्य करून । सावधपणें असावें ॥६८॥ हांसोनि बोले त्रिपुरांतक । नरसीमेहेता एकला एक । कांहीं साहित्य नसतां देख । कैसा उदयीक येईल ।६९। सोयरीक मोडावयाकारण । ह्मणोनी उदयीक धरिलें लग्न । येचविषयीं उपक्रम करून । दृष्टांतवचन बोलत ।७०। दुतोंडे दवणे श्रावणमासीं । मागों गेले शेषकन्येसी । तेणें उत्तर दिधलें त्यासी । वैशाखमासीं लग्न करूं ॥ ७१ ॥ उष्णकाळ येतां जवळ । तों दवणे पावले अंतकाळ । तेविं मी बोलिलों उतावीळ । लग्न सकाळ ह्मणोनी ॥ ७२ ॥ पुरोहित ह्मणे तूं अविश्वासी । विवेक नाहीं निजमानसीं । अहंभाव धरिला चित्तासी । तरी शीघ्रचि पावसीं अपमान ॥ ७३ ॥ द्रौपदीसतीचें करितां हेळण । अपमान पावला सुयोधन । तैसेंच आजि तुजकारण । होईल मज वाटतसे ॥ ७४ ॥ तों दुसरे दिवशीं नरसीमेहेता । वासरमणी उदयासि येतां । स्नान करूनियां तत्वतां । श्रीकृष्णनाथा पूजितसे ॥ ७५॥ द्वादश टिळे रेखिले जाण । गळां घातलें तुळसीभूषण । सवें घेऊन वैष्णवजन । नामस्मरण करीतसे ॥ ७६॥ पुत्र कांता घेऊन त्वरित । लग्नासि चालिला विष्णुभक्त । टाळ मृदंग वीणे वाजत । गुण वर्णित हरीचे ॥७७॥ जय जय मुकुंदा मुरारी । अनाथनाथा भक्तकैवारी । पुराणपुरुषा मधुकैटभारी । वससी अंतरीं भक्तांचिया ॥७८॥ जयद्वारकावासी जगन्नायका । रुक्मिणीकांता विधिजनका । मथुरावासी कंसांतका । भक्तांसि सखा तूं एक ॥७९॥ जय देवाधिदेवा सनातना । भक्तरक्षका म-

धुसूदना । विश्वव्यापका जगज्जीवना । मनमोहना गोविंदा ॥ ८० ॥ जयपुराणपुरुषा अनंतनामा । सगुणस्वरूपा मेघ-
श्यामा । भक्तकामकल्पद्रुमा । मनोभिरामा श्रीहरी ॥८१॥ ऐसे श्रीहरीचे गुण वर्णित । प्रेमेंकरूनि गात नाचत । नरसी-
मेहेता चालिला त्वरित । स्वानंदभरित ते काळीं ॥८२॥ तंव द्वारकेमाजी चक्रपाणी । बैसले असतां सिंहासनीं । जाऊ-
नियां एकांतसदनीं । जवळ रुक्मिणी बोलाविली ॥ ८३ ॥ ह्मणे नरसीमेहेता भक्तराज । सद्भावें अनुसरला मज । त्याचे
पुत्राचें लग्न आज । गातो निर्लज्ज गुणनाम ॥८४॥ तरी आपण जाऊन तया आधीं । स्व-अंगीं करावी कार्यसिद्धी । ऐसें
ह्मणूनि कृपानिधी । मेळवी मांदी भक्तांची ॥८५॥ उद्धव अक्रूर नारद तुंबर । शुक वाल्मीकि प्रल्हाद थोर । भीष्म बि-
भीषण आणि विदुर । मारुति सत्वर पाचारिला ॥ ८६ ॥ सुदामा पेंदा आणि वांकडा । वडजा काणा मुका बोबडा । ए-
कडोळा खुजट लंगडा । चिपडा शेंबडा गोपाळ ॥ ८७ ॥ ऐसे लहान थोर सकळ । भक्त बोलवूनि ते वेळ । तयांसि सांगे
घननीळ । लग्नासि तत्काळ चला कीं ॥८८॥ऐसें सांगोनि तयांप्रती । बोलाविली जांबवती । सत्यभामा कालिंदी सती ।
स्वयें श्रीपती बोलावी ॥ ८९ ॥ मित्रविंदा आणि याज्ञजिती । लक्ष्मणा आणि मद्रावती । यांसि घेऊनि सत्वरगतीं । ल-
ग्नासि श्रीपती चालिले ॥९०॥गोपिका घेऊन वऱ्हाडिणी । शिबिकेंत बैसे माता रुक्मिणी । लागल्या वाजंत्र्यांच्या ध्व-
नी । घाव निःसाणीं घातला ॥९१॥ अष्टसिद्धि सकल दासी । सवें घेऊनि हृषीकेशी । नरसीमेहेत्याचिया लग्नासी । अ-
तिवेगेंसी चालिले ॥ ९२ ॥ नरसीमेहेता मार्गीं चालत । प्रेमभरें गात नाचत । तयापुढें जगन्नाथ । जाती त्वरित लगबगें
॥९३॥ सन्निध नगर देखतां कृष्णें । सांगूनि पाठविलें त्यांकारणें । त्रिपुरांतक ऐकोनि वचनें । विस्मित मनीं जाहला ९४
गांवींचे लोक सांगती मात । लग्न आलें असंख्यात । ठाव न पुरे गांवांत । कैसी मात करावी ॥ ९५ ॥ उपरिया मा-
ड्यांवर चढोनी । लोक पाहाती विलोकूनी । मंगळवाद्यें वाजतां ऐकतां कर्णीं । गगन भरूनी कोंदलें ॥ ९६ ॥ ग्रामवासी
घेऊनि लोक । सामोरा चालिला त्रिपुरांतक । वाजंत्र्यांचा जोड एक । घेऊनियां देख निघाला ।९७जैसा उगवतां वा-
सरमणी । चांदण्या जाती हारपोनी । कीं समुद्रजळ देखोनि नयनीं । थिल्लर मनीं लज्जित ॥ ९८ ॥ गरुडाचे उड्डाणापुढें ।
शलभ काय तें बापुडें । अमूल्यरत्नांचिया पुढें । काचखडे झांकोळती ॥९९॥कीं सिद्धांतज्ञानियापुढें । धादांत हारपे बा-
पुडें । किंवा सज्ञानपंडितापुढें । मूर्ख बापुडें लज्जित ॥ १०० ॥ तेविं वराकडील देखोनि लग्न । सकळ जाहले लज्जायमान ।
पुरोहित ह्मणे जगज्जीवन । मजकारणें पावला ॥१॥विश्वकर्मा येऊनि आपण । सर्व साहित्य केलें त्याणें । दिव्यमंडप वि-
स्तीर्ण । बैठका संपूर्ण साधिल्या ॥२॥ लोडें तिवाशा गालिचे । चौक घातले नानापरीचे । रंभा तिलोत्तमा येऊनि नाचे ।
देव स्वर्गींचे पाहाती ॥३॥ नानापरींचीं उपायनें । केशर कस्तूरी सुगंधचंदन । वरासमवेत नारायण । तेथें येऊन बैसले ४
भोंवत्या शोभती वऱ्हाडिणी । मध्यें बैसली माता रुक्मिणी । नरसीमेहेत्याची राणी । बैसली येऊनी सन्निध ॥ ५ ॥ ना-
नापरीचे सुमनहार । गळां घातले परिकर । वैष्णवमेळीं स्वानंदनिर्भर । शार्ङ्गधर बैसले ॥ ६ ॥ सवें घेऊनि ग्रामवासी

लोक । सामोरा आला त्रिपुरांतक । जवळीं येतां सम्यक । वैकुंठनायक ऊठिले ॥ ७ ॥ सकळभक्तांसमवेत हरी । सोय-
ऱ्यांसि भेटले ते अवसरीं । त्रिपुरांतकासि मुरारी । मधुरोत्तरीं बोलत॥८॥ ह्मणे नदीस पूर आलिया बरा । भोंपळा पा-
ववी पैलतीरा । तेविं नरसीमेहेता तुह्मांसि खरा । सखा सोयरा जोडला ॥९॥ कां आयुष्य सरतिये वेळे । सुधारस चुक-
वी मृत्युकाळ । तेविं नरसीमेहेता भक्तप्रेमळ । सोयरा केवळ तुह्मासी ॥ ११० ॥ कामक्रोधादि अहंभाव । भवरोगें पीड-
ला होता जीव । तेचि निवारावया सर्व । सोयरा वैष्णव केला कीं ॥ ११ ॥ कीं लोह परिसासि लागतां जाण । अलंकार
करिती श्रीमंत जन । तेविं याच्यायोगें तुमचें दर्शन । आह्मांकारण घडलें कीं ॥१२॥ ऐकोनि त्रिपुरांतक बोले वचना ।
आपुलें सांगाजी नामाभिधान । जाहलें नव्हतें कधीं दर्शन । केलें आगमन कोठोनी ॥ १३॥ ऐकोनि बोले देवाधिदेव ।
सांवळसा आमुचें नांव । नरसीमेहेत्याची देवघेव । करितों सर्व निजांगें ॥ १४ ॥ गुमास्तेगिरी करितों याची । द्वार-
केमाजी वस्ती आमुची । निजखूण याचे जीवींची । एक मीच जाणता ॥ १५ ॥ ऐसें बोले जगज्जीवन । परी कोणा-
सि न कळे निजखूण । तो मायालाघवी मनमोहन । न कळे महिमान तयाचें ॥ १६ ॥ सीमांतपूजन करावयासी । वस्त्रें
आणिलीं जीं वरासी । तीं नीच ह्मणोनि अर्पावयासी । लज्जित मानसीं जाहले ॥ १७ ॥ ऐसें जाणोनि वैकुंठनाथ । त्रि-
पुरांतकासि काय बोलत । लग्न तों आलें अगणित । संकोचित चित्त तुमचें॥१८॥तरी स्वयंपाक करितां रुचकर । त्यांत
लवण न घालावें फार । आणि आपुले परीस थोर । सोयरा साचार न करावा॥१९॥आणि आपुले गांवींचा राजा जा-
ण । त्यासि न द्यावें व्याजीं धन । तेविं सोयरा थोर पाहून । कन्या दान न करावें ॥१२०॥ कीं कवीश्वराची वाणी । वाद
घालितां न पुरे कोणी । तेविं सोयरा थोर आपणाहूनी । सर्व जनीं न करावा॥२१॥जैसा उदयास येतां गभस्ती । तेजहीं-
न दिसे निशापती । तेविं नरसीमेहेत्याची देखोनि संपत्ती । संकोच चित्तीं जाहला ॥ २२ ॥ सामग्री केली असेल किं-
चित । लग्न तों आलें अपरिमित । ऐसें बोलूनि वैकुंठनाथ । विचार सांगत तयासी ॥ २३ ॥ त्रिपुरांतकासि ह्मणे घननी-
ळ । जें साहित्य असेल अनुकूळ । तें येथें आणोनि तत्काळ । न्यावें मंगळसिद्धीसी ॥ २४ ॥ सर्वसिद्धि अनुकूळ येथ ।
किंचित आणोनि टाकी यांत । मनीं होऊनि संकोचित । चित्तीं द्वैत न धरावें ॥ २५ ॥ शरीरसंबंधाच्या ठायीं । पडिल्या
रेशमाच्या गांठी । विचार करून ज्ञानदृष्टी । द्वैत पोटीं न धरावें ॥ २६ ॥ अवश्य ह्मणोनि तयेक्षणीं । नगरासि गेला पर-
तोनी । वधूसह साहित्य घेऊनि । आला परतोनि त्या ठायां ॥ २७ ॥ भीमकराजा अनन्य भक्ती । कन्या अर्पोनि श्रीप-
ती । मूळमाधवीं सत्वरगतीं । लग्नासि प्रीतीं पावला ॥ २८ ॥ तयापरी त्रिपुरांतक । विरोधभाव त्यागोनि देख । वधूसा-
हित्य सकळिक । घेऊनियां पातला ॥२९ ॥ गंगेसि वोहळ मिळतां जाण । तयासि अपवित्र ह्मणे कोण । तेविं अंगीका-
र करितां जगज्जीवन । भाविकासि उणें नये कीं ॥ १३० ॥ लग्न मांडिलें अतिगजरें । वाद्यें वाजती मंगलतुरें । हळदी
लाविल्या परिकरें । सोहळा थोर मांडिला ॥ ३१ ॥ देवकप्रतिष्ठा ब्राह्मणभोजन । नानापरीचीं दिव्यान्नें । द्विजांसि

अर्पूनि नारायणें । दक्षिणादानें दीधलीं ॥ ३२ ॥ नरसीमेहेत्यासि श्रीपती । अहेर अर्पी निजप्रीतीं । तों अस्तमाना पात-
ला गभस्ती । विप्र बोलती मंगलाष्टकें ॥ ३३ ॥ दुर्वासें छळितां अंबरीषासी । दहा गर्भवास अंगें सोशी । तो देवाधिदेव
वैकुंठवासी । वधुवरांसि रक्षिता ॥३४॥ जयाचें करितां नामस्मरण । सकळ दुरितें जाती जळोन । तो द्वारकावासी म-
नमोहन । याकारण रक्षिता ॥ ३५ ॥ ब्रह्मादि शंकर जयासी । अखंड ध्याती निजमानसीं । तो भक्तवत्सल हृषीकेशी ।
वधुवरांसि रक्षिता ॥ ३६ ॥ तूं देवाधिदेव सनातन । क्षीरसागरीं शेषशयन । लक्ष्मीकांत जगज्जीवन । वधुवरांसी रक्षीं
कीं ॥ ३७ ॥ ऐसीं अष्टकें ह्मणूनी । लग्न लाविलें तेव्हां ब्राह्मणीं । वाद्यें वाजती मंगळध्वनी । घाव निःसाणीं घातला
॥ ३८ ॥ जेथें आला वैकुंठनाथ । उणा पदार्थ न दिसे तेथ । कन्यादानीं अपरिमित । विप्रांसि देत दक्षिणा ॥ ३९ ॥ ग्राम-
वासी सकळ जन । त्यांसि दिधलें इच्छाभोजन । दिव्यालंकार वस्त्रभूषण । वधुवरांकारण दीधलीं ॥ १४० ॥ धन्यधन्य
तेथिंचे जन । जयांसि भेटले नारायण । दोहीं पक्षीं जगज्जीवन । सोहळा संपूर्ण करीतसे ॥ ४१ ॥ संभ्रमें मिरवती वऱ्हा-
डिणी । लागल्या वाजंत्र्यांच्या ध्वनी । चारी मुक्ती अंगें येऊनी । पायीं लोळणी घालिती ॥ ४२ ॥ नळे हवया चंद्रज्यो-
ती । नानापरीचीं यंत्रें सुटती । अष्टनायिका गात नाचती । वैष्णव गर्जती हरिनामें ॥ ४३ ॥ नानापरीचे सोहळे करूनी ।
सन्मुख पाहे माता रुक्मिणी । नरसीमेहेत्याची राणी । विस्मित मनीं जाहली ॥ ४४ ॥ पांच दिवस करूनि लग्न । साडे
करीत जगज्जीवन । वऱ्हाडियांसि श्रीकृष्णें । वस्त्रेंभूषण अर्पिलीं ॥ ४५ ॥ त्रिपुरांतकासि पुसोनि त्वरित । काय बोले वै-
कुंठनाथ । सोयरा केला विष्णुभक्त । देखिला परमार्थ प्रपंचीं ॥ ४६ ॥ लग्नासमवेत वऱ्हाडी । परतोनि आले जुन्यागडीं
नरसीमेहेता श्रीकृष्णप्रौढी । गातो गोडी हरीनाम ॥ ४७ ॥ नरसीमेहेत्याकारण । कानीं सांगे जगज्जीवन । कांहीं संक-
ट पडतां जाण । माझें चिंतन करावें ॥४८॥ ऐसें बोलोनि तयाप्रति । द्वारकेसि गेला रुक्मिणीपती । पुढें सादर होऊन श्रो-
तीं । अवधान प्रीतीं मज द्यावें ॥४९॥ अहो भक्तविजयग्रंथ जाण । कांहीं कोमळ तुळसीचें वन । भीमातीरवासी रुक्मि-
णीरमण । ये स्थळीं जाण वसतसे ॥ १५० ॥ आवडी सप्रेम जीवन । त्यावरी वर्षला आनंदघन । भाविक सभाग्य वैष्णव
जन । जाहले ऐकून निजसुखी ॥ ५१ ॥ पुढील अध्यायीं रसाळकथा । हुंडी लिहील नरसीमेहेता । महीपति ह्मणे सभा-
ग्यश्रोता । सादर श्रवणार्थी असावा ॥ ५२ ॥ स्वस्तिश्री भक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक
भक्त । अष्टाविंशाध्याय रसाळ हा ॥ १५३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय २८ ॥ ॥ ओंव्या १५३ ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीपंढरीनाथाय नमः ॥ जयमंगळवदना मंगळाधीशा । त्रिगुणातीता हृषीकेशा । विश्वव्यापका स-
र्वेशा । पंढरीशा श्रीविठ्ठला ॥१॥ जय पुराणपुरुषा अनंतनामा । भक्तकामकल्पद्रुमा । सगुणस्वरूपा मेघश्यामा । नि-
जभक्तप्रेमा तूं एक ॥२॥ जय द्रौपदीलज्जानिवारणा । गजेंद्रमोचका शेषशयना । पयोब्धिवासा कमलनयना । भक्तभू-
षणा पांडुरंगा ॥३॥ तूं सकळ देवांवरिष्ठ देव । नाम जपतां निवाला शिव । इंद्रादिक सकळ देव । तुझा स्तव करिताती ॥४
तूं अंतरसाक्ष चैतन्यघन । तूं योगियांचें निजध्यान । वैरियां देसी सायुज्यसदन । आनंदघन तूं दयाळा ॥ ५ ॥ तूं विधा-
त्याचा निजजनिता । सर्व करून होसी अकर्ता । भक्तवत्सला रुक्मिणीकांता । पार निगमार्थां नकळे तुझा ॥६॥ चौदा
विद्या चौसष्टीकला । तुज वर्णिती भक्तवत्सला । तेथूनि जासी गोपाळा । भक्तप्रेमळाजवळी तूं ॥७॥ सांडोनियां वैकुंठ-
भुवन । सांडोनि क्षीरसागरशेषशयन । सांडोनिया अमृतपान । निजभक्तप्रेम धुंडिसी ॥ ८ ॥ सांडूनियां द्वारकापुरी ।
आलासी पुंडलीकाचे द्वारीं । कर ठेऊनियां कटीवरी । उभा श्रीहरी तिष्ठसी ॥९॥ ऐसा निजभक्तांचा प्रेमा । तुज आवडे
पुरुषोत्तमा । प्रेमळभक्तहृदयधामा । आत्मारामा वससी तूं ॥ १० ॥ ह्मणोनियां पुढत पुढती । नमन करीं मी तुजप्रती ।
ग्रंथ वदावया देऊनि स्फूर्ती । साह्य श्रीपती असावें ॥११॥ आतां ऐका श्रोतेजन । मागें कथिलें निरूपण । लग्नसिद्ध करू-
नि जाण । जगज्जीवन पैं गेले ॥१२॥ नरसीमेहेता नित्यकाळ । हृदयीं आठवूनि घननीळ । कीर्तनीं नाचे सर्वकाळ । भक्त-
प्रेमळ विदेही ॥१३॥ सांडोनियां ज्ञानाभिमान । सांडोनि आशापाशबंधन । सांडोनियां लौकिकमान । श्रीकृष्णाचिंतन
करीतसे ॥१४॥ सांडूनियां विषयगोडी । तोडोनि ममतेची बेडी । सांडोनि विकल्पबुद्धि कुडी । शांती चोखडी तो ल्या-
ला ॥१५॥ सांडोनियां समविषमभाव । सारिखे मानी रंक राव । अनंत ब्रह्मांडींचे जीव । इंद्रादिदेव सारिखे ॥१६॥ व्याघ्र
वृश्चिक सिंह श्वान । यांचे न लेखी अवगुण । अजापालक आणि ब्राह्मण । देखे समान निजदृष्टीं ॥१७॥ कल्पतरु आणि
बाभुळ । हिंगण आणि मलयागर । अपशब्द आणि रसाळबोल । लेखी सकळ समदृष्टीं ॥१८॥ पुढें पडलिया द्रव्यराशी ।
दृष्टीस मानी मृत्तिका जैसी । अमूल्य रत्नें पाषाणाऐसीं । निजदृष्टीसी लेखित ॥१९॥ तंव कोणे एके दिवशीं । यात्रा चा-
लली द्वारकेसी । जुन्यागडीं एके दिवशीं । येऊनियां राहिली ॥२०॥ केशवभट्ट नामाभिधान । परम भाविक होता ब्रा-
ह्मण । ग्रामांत येऊन वर्तमान । लोकांप्रती पुसतसे ॥ २१ ॥ चोहटां बैसले निंदक खळ । त्यांजवळीं आला तत्काळ । उ-
भा राहूनि ते वेळ । काय बोलिला तें ऐका ॥ २२ ॥ लोकांशीं बोले मधुरोत्तरीं । आह्मी ब्राह्मण यात्रेकरी । आतां जातों
द्वारकापुरीं । श्रीहरिचरण पाहावया ॥२३॥ तुमचे नगरीं सावकार । कोण आहे हुंडी करणार । सांगोनि द्यावा सत्वर ।
सत्य विचार करूनी ॥ २४ ॥ वचन ऐकोनि ते वेळ । हांसों लागले निंदक खळ । ह्मणती नरसीमेहेता भक्तप्रेमळ । नांदे
सकळ वैभवेंसीं ॥ २५ ॥ तो सभाग्य एक धनवंत । विरक्तपणें असे नांदत । तुह्मीं सत्वर जावें तेथ । कार्य निश्चित होईल
॥ २६ ॥ पताका आणि वृंदावन । गरुडटके हरिकीर्तन । नरसीमेहेत्याचें भुवन । तेंच जाण द्विजवरा ॥ २७ ॥ वचनें ऐ-

कूनियां ऐसीं । विश्वास वाटला ब्राह्मणासी । नरसीमेहेत्याचे गृहासी । अति वेगेंसीं चालिला ॥२८॥ तंव श्रोते ह्मणती नवलपरी । सर्वांतरीं असतां श्रीहरी । निजभक्तांची छळणा करी । हें निर्धारीं मज सांगा ॥२९॥ तरी भक्त अभक्त दोघे-जण । स्वयें निर्मिले नारायणें । अभक्तांच्या योगें जाण । पावती सन्मान निजदास ॥ ३० ॥ नक्र न धरितां गजेंद्रासी । तरी कां धांवता वैकुंठवासी । दुःशासन न छळितां द्रौपदीसी । तरी वस्त्रें कैसीं हरि देता ॥ ३१ ॥ हिरण्यकशिपु पहा दैत्य । गांजिला नसता प्रल्हादभक्त । तरी खांबांतूनि जगन्नाथ । कैशा रीतीं प्रकटता॥३२॥लोह नसतें जरी निर्माण । तरी परिसालागीं पुसतें कोण । तेविं अभक्तांच्यायोगें जाण । पावती सन्मान निजदास ॥३३ ॥ कल्पना नसती याचकासी। तरी कोण पुसतें कल्पतरूसी।अंधकार न पडतां जरी निशीं। तरी कोण दीपकासी पुसता पैं।३४।जरी नसतें असत्य भाषण। तरी सत्यसुकृता जाणतें कोण । प्रजा नसती जरी निर्माण । तरी भूपतीस कोण सन्मानी ३५सूक्ष्म नसती तारागण। तरी चंद्रासी वरिष्ठ ह्मणे कोण।हिरियास नसता लोहघन।तरी परीक्षक कोण तयाचा ३६जरी निर्मिली नसती यमपुरी। तरी स्वर्गींची आशा कोण धरी।हिंडणें नसतां चौऱ्यायशी फेरी।तरी मोक्षसरी कोण वाहे ३७तेविं अभक्त निर्मुनि सृष्टीं। भक्तांसि पाहे कृपादृष्टीं।संकट पडतांचि उठाउठी।धांवे जगजेठी लवलाहें ३८असो मागील निरूपण।कृष्णभट भाविक ब्राह्मण । नरसीमेहेत्याचे गृहा जाण।त्वरेंकरून पातला ३९तुलसीवृंदावन शुचिर्भूत । तेथें बैसलासे विष्णुभक्त।ध्यानांत आणोनि वैकुंठनाथ । स्मरण करित सप्रेमें॥ ४०॥सांडोनियां देहबुद्धी । उघडी लागलीसे समाधी । निरसोनि सकळ भवव्याधी । अद्वैतबोधीं निवाला ॥ ४१॥ तों ब्राह्मण पुढें अकस्मात । येतां देखिला मंदिरांत । नरसीमेहेता देखोनि त्वरित। नमन करित निजप्रीतीं ॥५२ ॥ पुढें टाकूनि आसन । विप्रासि बैसवी सन्मानेंकरून । ह्मणे येणें कोणीकडून । कोठें गमन मज सांगा ॥४३॥ ब्राह्मण बोलिला ते अवसरीं । आह्मी जातसों द्वारकापुरीं । पुढें मार्ग अवघड भारी । होतसे चोरी निजवाटे ॥४४ ॥ वाटखर्ची सातशतें । द्रव्य आणिलें आहे येथ । हुंडी लिहूनियां निश्चित । द्यावी त्वरित मजलागीं॥४५॥ रात्रीं येऊनि नगरांत । ग्रामींचे लोकांसि पुसिली मात । कोण सावकार आहे येथें । हुंडी करून देईल॥४६॥नाम सांगीतलें तुमचें त्यांणीं । ऐसी ऐकतां विप्रवाणी । नरसीमेहेता विस्मित मनीं । ह्मणे असत्य जनीं हेळिलें ॥ ४७॥ परी अनाथनाथ भक्तकैवारी । तो आहे आमुचे शिरावरी । भक्तकार्यासि नानापरी । अवतार धरी निजलीलें ॥ ४८ ॥ ऐसा निश्चय धरूनि मनीं । ब्राह्मणासि ह्मणे ते क्षणीं । द्रव्य आणिलें मंदिराहूनी । ठेवा आणोनि या ठायां॥४९॥ ऐकोनि ब्राह्मण बोले वचन । द्वारकेंत तुमचा गुमास्ता कोण । त्याचें सांगा नामाभिधान । ऐसें वचन बोलिला ॥ ५० ॥ ऐकोनि बोले भक्तवैष्णव । सांवळासा त्याचें नांव । इंद्रादिक सकळ देव । वंदिती सर्व तयासी॥५१॥चारी वेद होऊनि भाट । अखंड ज्याची कीर्ति गात । कैलासपति उमाकांत । नाम जपत जयाचें॥५२॥मुख्य दुकान क्षीरसागरीं । दुजें घातलें वैकुंठपुरीं।गोकुळ वृंदावन मथुरानगरीं । वैष्णव मंदिरीं राहिला॥५३॥मानदेशीं भीमातट । वसविली पंढरी महापेठ । शेव्या पुंडलीक भक्त निकट । उभा तिष्ठत त्यापाशीं ॥ ५४ ॥ तोचि द्वारके माझारीं । बैसोनि करितसे सावकारी । व्यास वाल्मीकि व्यापारी । कीर्तन केणें उमानिती ॥ ५५॥ नामा कबीर भक्त भाविक । तयासि पातलें गिऱ्हाइक । केण घेऊन जडजीवलोक । तारिले देख निजनिष्ठें ॥५६॥ ऐसें ऐकोनियां वचन । ब्राह्मण पावला समाधान । सातशतें द्रव्य जाण । वृंदावनीं ठेविलें ॥ ५७ ॥ नरसीमेहेत्यानें तेच क्षणीं । पत्र लिहिलें करुणावचनीं । ह्मणे द्वारकावासी चक्रपाणी । ऐका विनवणी दासाची ॥५८॥ तूं उदारधीर करुणासागर । उपमन्यु बाळ मागतां क्षीर । ऐकोनि त्याचें करुणाउत्तर । क्षीरसागर दीधला ॥ ५९ ॥ तुझे गुण रुक्मिणीकांता । वर्णितां शिणला विधाता । ब्राह्मण सुदामा भेटीस येतां । हेमपुरी तया दीधली ॥ ६० ॥ अढळपदीं ध्रुव बाळक । त्वां स्थापिलें करूनी कौतुक । ऐसा तूं रमानायक । भक्तरक्षक सर्वदा ॥ ६१ ॥ तूं उदारधीर शिरोमणी । माझें पत्र परिसोनि कानीं । ब्राह्मणासि द्रव्य देऊनि । चक्रपाणी तोषवावा ॥ ६२ ॥ तुमचा भरंवसा जाणूनी । द्रव्य घेतलें यापासूनी । करुणावचन ऐकोनि कानीं । आनंदघनीं वर्षावें ॥ ६३ ॥ ह्मणसी मी अव्यक्त अजित । मजवरी पाठविली वरात । हांसें होईल जनांत । ऐसी मात न करावी॥६४॥सांवळसा द्वारकावासी । सातशतें द्रव्य देणें यासी । हुंडी लिहूनियां ऐसी । विप्रापाशीं दीधली ॥६५॥ संत साधु वैष्णवजन । बोलावूनी गांवींचे ब्राह्मण । तत्काळ द्रव्य त्यांलागून । वांटोनियां दीधलें ।६६। निरुपाधिक होऊन । करीत बैसला नामस्मरण । नरसीमेहेत्यासि करूनि नमन । विप्र तेथून चालिला।६७।मार्गीं चालतां निजमनीं । विस्मय करी अंतःकरणीं।ऐसा सावकार उदार कोणी ।नाहीं नयनीं देखिला ॥ ६८ ॥ उदार विरक्त सर्वांपरी । अन्नवस्त्र संकीर्ण घरीं । क्षमा शांति धरून अंतरीं । कीर्तन करी सप्रेमें ॥ ६९ ॥ ऐसियासी म्यां व्यवहार केला । कैसी भ्रांति पडली मला । ह्मणूनि चिंताक्रांत जाहला । काय बोलिला ऐका तें ।७०। सागरीं घातलें लवण । तें नये जैसें परतोन । तेविं माझें द्रव्य जाण । कृष्णार्पण जाहलें कीं ॥ ७१ ॥ कीं साद घालितां आकाशा । प्रतिशब्द फिरोनि नयेचि जैसा । नरसीमेहेत्यासी व्यवहार तैसा । यथारीतीं म्यां केला।७२।कीं अग्नींत घृत टाकिलें।मागुतीं नये कांहीं केलें। तेविं वैष्णवासी जें दीधलें।तें ब्रह्मार्पण जाहलें कीं७३कीं तुळसीस घालितां पाणी ।फळ इच्छा न धरावी मनीं । तेविं हुंडी येईल परतोनी । हें मजलागोनी दिसेना।७४।कीं जीवन मिळालें सागरीं । तें फिरून नयेच माघारीं । तेविं हें द्रव्य निर्धारीं । कुबेरभांडारीं पैं गेलें ॥ ७५ ॥ कीं आकाशांत ठेविलीं सुमनें । समीरासि मकरंद दिधला तयानें । तेविं द्रव्य निजभक्तानें । विप्रांकारणें वांटिलें ॥६६॥ सवेंचि ह्मणे असो आतां।याचा शोक कासया वृथा । विश्वंभरा त्या श्रीकृष्णनाथा । असे चिंता सर्वांची ॥ ७७ ॥ यापरी करूनि समाधान । विप्र आला द्वारकेलागून । करूनि गोमतीचें स्नान । श्रीकृष्णदर्शन घेतलें ॥७८॥ वंदोनियां श्रीकृष्णचरण । उभा ठाकला कर जोडून । अनन्यभावें प्रेमेंकरून । करी स्तवन हरीचें ॥७९॥ ह्मणे जयजयाजी रुक्मिणीकांता । दीनबंधु रणछोडनाथा । अनाथनाथा कृपावंता । माझी चिंता निरसावी ॥ ८० ॥ ऐसें बोलोनी करुणावचन । मागुतीं घातलें लोटांगण । पुजाऱ्यासि वर्तमान ।

कूनि ब्राह्मण ते वेळीं ॥ ८१ ॥ ह्मणे सांवळसा सावकार। मज दाखवा तयाचें मंदिर। आमची हुंडी तयावर। असे सा-
न्वार जाणपां॥ ८२॥ ऐसें ऐकूनी सकळ जन। ह्मणती सांवळसा सावकार कोण। देखिला ऐकिला नाहींच जाण। द्वा-
रकापट्टण धुंडितां ॥ ८३ ॥ नरसीमेहेत्यानें तुह्माकारण। वाऱ्यावर वरात दिधली जाण। द्रव्य देतां त्यालागून। विचार
कांहीं न केला॥८४॥ ऐवज देखोनि व्यवहार करणें। पात्र पाहूनी दान देणें। श्रीगुरूस रिघोन शरण। जीवींची खूण पु-
साबी॥८५॥ वैष्णव देखोनि दंडवत। सद्भावें घालावें त्वरित। परी प्रपंचव्यवहार विपरीत। तयांसि निश्चित न करावा
॥ ८६ ॥ अन्नवस्त्र निजभक्तांसी। अखंड द्यावें सद्भावेंसी। परी देणें घेणें व्यवहारासी। सर्वथा त्यांसी न करावें ॥ ८७॥
त्यांचे संगतीं जे लागले। ते आपुल्या ऐसे त्यांहीं केले। सरिता वोघ समुद्रीं मीनले। ते सागर जाहले अनायासें॥ ८८॥
परिसाचा होतां समागम। लोहाचा उडोन जाय कालिमा। तेविं धरितां संतसमागम। प्रपंच विरम तत्काळ ॥ ८९ ॥
कीं गंगेसि वोहळ मिळतां जाण। नामरूप पालटे न लागतां क्षण। तेविं साधूंचे संगतीकरून। प्रपंचभान उरेना ।९०।
ऐसा असतां वृद्धाचार। वैष्णवासी केला व्यवहार। आतां सांवळसा सावकार। पाहासी कोठें द्विजवरा ॥ ९१ ॥ ऐ-
कतां पुजाऱ्याचें वचन। चिंताक्रांत जाहला ब्राह्मण। मागुतीं देवासि करूनि नमन। विप्र तेथोन निघाला ॥ ९२ ॥
बिऱ्हाडासी जातां जाण। विप्राचें विस्मित जाहलें मन। ह्मणे द्रव्य तो नरसीमेहेत्यानें। तेच क्षणीं वांटिलें ॥९३॥ आ-
तां सोडोनि द्रव्यमाया। शरण जावें वैकुंठराया। ऐसें ह्मणोनि तया ठायां। विप्र बैसला चोहटा ॥९४ ॥ तों देवाधिदेव
रुक्मिणीवर। आपण जाहला सावकार। सवें घेऊनि उद्धव अक्रूर। आणिला रहंवर बैसावया ॥९५॥ रथीं बैसोन ज-
गज्जीवन। दारुकासि बोले निजवचन। आज्ञावरी नरसीमेहेत्यानें। हुंडी लिहून पाठविली ॥ ९६ ॥ त्याचें करावया
निजकाज। सांवळसा सावकार जाहलों आज। रूप पालटोनि चतुर्भुज। जातसे सहज नररूपें।९७तंव उद्धव ह्मणे ज-
गज्जीवना। तुझा पार निगमांसि कळेना। भक्तकाजासि नारायणा। अनंतरूपें धरिसी तूं॥ ९८ ॥ नारद ह्मणे तूं नाटकी
पूर्ण। आधीं भक्तांसि करूनि विघ्न। मग रूप धरूनियां सगुण। करिसी धांवणें श्रीहरी ॥९९॥ जैसी बाळकासि माता।
नसतां बागूल दाखवी वृथा। भयें बाळक आक्रंदतां। संबोखी तत्वतां निजमोहें। १०० । यापरी भक्तासि संवाद। करी-
त चालले गोविंद। तो भक्तकैवारी जगद्वंद्य। न कळे अगाध लीला त्याची ॥ १ ॥ दिव्य अलंकार वस्त्रें भूषण। रूप सांवळें
दिसे सगुण। राजबिदींतून जगज्जीवन। जात संभ्रमें निजसुखें ॥ २ ॥ संभ्रमें स्थिर चाले रथ। दारुकासि ह्मणे वैकुंठनाथ
ब्राह्मण बैसला चिंताक्रांत।न्यावें त्वरित त्याठायां।३।ऐसें सांगोनि रुक्मिणीपती।रथ चालवी सत्वरगती।सगुणस्वरूप
देखोनि प्रीतीं। आश्चर्य करिती जनलोक।४।पुढें पाहतां जगन्नाथ। तों ब्राह्मण देखिला अकस्मात। तयासि पुसे रुक्मि-
णीकांत। चिंताक्रांत कां जाहलां।५। ऐसें बोलतां वैकुंठवासी। आश्चर्य वाटलें ब्राह्मणासी। नमस्कार करूनि सद्भावें-
सी। वर्तमान तयासी सांगतसे ॥ ६ ॥ जुन्यागडीं भक्त वैष्णव। त्याचें नरसीमेहेता नांव। त्याचा गुमास्ता सांवळसाव।

द्वारकेमाजी वसतसे ॥ ७ ॥ त्याचें दर्शन नाहीं होत। ह्मणोनि जाहलों चिंताक्रांत। ऐसें ऐकोनियां जगन्नाथ। काय बो-
लत विप्रासी ॥ ८ ॥ हांसोनि बोले रुक्मिणीपती। सांवळसा आह्मासि ह्मणती। नरसीमेहेत्यानें मजप्रती। काय आज्ञा
पैं केली ॥ ९ ॥ ऐसें बोलतां जगज्जीवन। द्विजासि वाटलें समाधान। जेविं अवर्षणीं वर्षतां घन। पर्वतीं तृण संतोषे
॥ ११० ॥ कीं प्रेमळभक्त हरिकीर्तन। ऐकोनि पावती समाधान। कीं अनुतापी तीर्थ देखोन। संतोष निजमनीं पावती
।११।कीं श्रवण करितां भागवत। स्वानंदभरित वैष्णवभक्त। कीं जीवन देखोनि तृषाक्रांत। संतोषे चित्त तयाचें॥१२॥
कीं साधकासि सत्समागम। जोडतां पावती समाधान। उदारदाता देखोन। याचक मनीं संतोषती।१३। त्याचपरी तो
ब्राह्मण। संतोष पावला ऐकून। तत्काळचि पत्र काढून। तयाहातीं दीधलें॥१४॥देखोनिया रुक्मिणीपतीं। मस्तकीं वं-
दिलें निजप्रीतीं। श्रुति शास्त्रें जयासि वर्णिती। अद्भुत गती न वर्णवे ॥ १५ ॥ तो देवाधिदेव रुक्मिणीरमण। जाहला
असे भक्ताधीन। पत्र वाचितां जगज्जीवन। हास्यवदन बोलत ॥ १६ ॥ उद्धवासि ह्मणे वैकुंठनाथ। नरसीमेहेता प्रेमळ
भक्त। संसारीं असोनि विरक्त। परी किंचित वरात पाठविली ॥ १७॥ ऐसें बोलूनियां त्वरित। द्रव्य काढिलें शतें सात।
विप्रापाशीं रुक्मिणीकांतें। दिधलें निश्चित तेवेळीं१८।द्रव्य देखतांचि जाण। विप्र पावला समाधान। बिस्मित होऊनि
निजमनीं। मधुरोत्तरें बोलत॥१९॥तुह्मी तंव सावकार श्रीमंत। नरसीमेहेता दुर्बळ दिसत। सेवक थोर स्वामी अनाथ।
वाटे विपरीत देखोनी।१२०।सूर्यापरीस तेजागळा। अरुण नाहीं कधीं देखिला। गंगेपरीस गांवनाला। पुराणीं [illegible]
नाहीं कीं ॥ २१ ॥ रायापरीस प्रधान थोर। देखिला नाहीं पृथ्वीवर। श्रीरामापरीस वानर। प्रतापी थोर [illegible]।२२
कीं कैलासपती पार्वतीरमण। त्याहून प्रतापी कोण गण। कीं सरिता थोर समुद्राहून। देखिली ऐकिली नाहीं कीं।२३।
लक्ष्मीहून अधिक सिद्धी। ऐकिली नाहीं त्रिशुद्धी। चंद्राहूनि नक्षत्र कधीं। तेजासि अधिक न देखों ॥ २४ ॥ तेजासि
आगळी हिऱ्याहूनी। नाहीं देखिली हिरकणी। सिद्धांतज्ञाना वरिष्ठ कोणीं। वेदांतज्ञानी नाहीं ऐकिले ॥ २५ ॥ हें वि-
परीत देखिलें आजि नयनीं। ह्मणोनि पुसतों तुह्मालागुनी। ऐसी ऐकोनि विप्रवाणी। चक्रपाणी बोलत ॥ २६॥ ब्राह्म-
णासि ह्मणे रुक्मिणीकांत। अखंड उदास वैष्णवभक्त। संसारीं असोनि मायातीत। आशारहित वर्तती ॥ २७ ॥ मेघव-
र्षावा अहर्निशीं। हे इच्छा नसे समुद्रासी। तेविं वैष्णव निजमानसीं। आशापाशीं न गुंतती ॥२८॥ कीं दीपक उजळा-
वे मंदिरासी। हे भानूसी इच्छा नव्हे जैसी। तेविं वैष्णव निजमानसीं। आशापाशीं न गुंतती ॥ २९ ॥ जे सुधारसपान
सेविती। ते औषधीचा प्रयत्न न करिती। तेविं विष्णुभक्त धनसंपत्ती। तुच्छ मानिती निजमनें।१३०।कीं तुळसीपत्रा-
हूनि बकुल शेवती। प्रीतीनें न घेच लक्ष्मीपती। तेविं भजनावरिष्ठ धनसंपत्ति। वैष्णव न गणिती निजमनीं
॥ ३१ ॥जयासि जाहलें सिद्धांतज्ञान। तो कोकशास्त्रीं नदे कान। तेविं हरिभजनीं भक्तजन। निमग्न होऊन राहिले
॥ ३२ ॥ नरसीमेहता परमउदासी। धनसंपत्ति नावडे त्यासी। आह्मी त्याचिया स्वभावासी। गति कैसी करावी ॥३३॥

मातेचा स्वभाव साचार। बाळकासि लेववावे अलंकार। तेविं नरसीमेहेता अपार। कृपा आह्मावर करीतसे ॥ ३४ ॥ कीं निजपुत्रासि संपत्तिधन। पिता न वंची निजमनेंकरून। तेविं आह्मावर नरसीमेहेत्यानें। भार पूर्ण टाकिला ॥ ४५॥ ऐसें बोलतां दीनदयाळ। आश्चर्य करिती वैष्णव सकळ। ह्मणती नरसीमेहेता भक्तप्रेमळ। वश घननीळ केला कीं ॥ ४६ ॥ इतुकें लाघव करूनि हरी। अदृश्य जाहले तें अवसरीं। विप्रासि वाटली नवलपरी। आश्चर्य करी निजमनीं ॥ ४७॥ द्रव्य मोजोनियां पाहत। तंव तें भरलें अगणित। मनीं ह्मणे द्वारकानाथ। भेटले त्वरित मजलागीं ॥४८ ॥ यापरी करूनि समाधान। केलें ब्राह्मणसंतर्पण। भक्तभाविक वैष्णवजन। घातलें भोजन तयांसी ॥ ४९ ॥ राहोनि द्वारकासुक्षेत्रीं। द्रव्य वेंचिलें सत्पात्रीं। शास्त्रज्ञ ब्राह्मण अग्नहोत्री। शुद्धपवित्रीं अर्पिलें ॥१४०॥ महाद्वारीं जाऊन तेथ। भावें नमिले द्वारकानाथ। देवासि पुसोनियां त्वरित। विप्र तेथूनि चालिला ॥ ४१ ॥ जुन्यागडीं परतोनि त्वरित। नरसीमेहेत्यासि येऊन भेटत। सांगितला सकळ वृत्तांत। वर्तलें चरित्र ज्यारीतीं ॥ ४२ ॥ ह्मणे तूं वैष्णव प्रेमळभक्त। ऋणी केला द्वारकानाथ। सावळसा येऊनि त्वरित। भेटले निश्चित मजलागीं ॥ ४३ ॥ तुमचें पत्र दिधलें हातीं। तें मस्तकीं वंदिलें निजप्रीतीं। वाचोनि पाहतां सत्वरगतीं। सप्रेम चित्तीं जाहले ॥ ४४ द्रव्य काढोनि सातशत। माझे हातीं दिधलें त्वरित। मोजूनि पाहतां अगणित। संख्येरहित भरलें तें ॥४५॥ मागें पाहतां परतोनि। तंव अदृश्य जाहले तेचक्षणीं। ऐसी ऐकोनि विप्रवाणी। अश्रु नयनीं लोटले ॥४५॥ ह्मणे द्वारकावासी रुक्मिणीरमणा। अनाथबंधु मनमोहना। विश्वंभर करुणाघना। मजकारणें शिणलासी ॥ ४७ ॥ तूं दीनबंधू कृपासागर। श्रुतिशास्त्रां नकळे तुझा पार। चहूं वाचांसि अगोचर। जगदुद्धार तूं एक ॥ ४८ ॥ अनाथनाथा भक्तवत्सला। पाळिसी दासांचा लळा। ऐसें ह्मणोनि ते वेळा। अश्रु डोळां लोटले ॥ ४९ ॥ सवेंचि स्थिर करूनि मन। करिता जाहला नामस्मरण। पुढले अध्यायीं फळशोभन। अवधान यावें मज संतीं ॥ १५० ॥ अहो संतचरित्र ग्रंथ साचार। हाचि जाणा क्षीरसागर। शेषशायी लक्ष्मीवर। वसे निरंतर तये ठायीं ॥५१ ॥ तेथें मी दीन अनाथ। सेवूं पावलें परमामृत। सप्रेम जीवन वैकुंठनाथ। देत निश्चित निजप्रीतीं ।५२। भक्त वैष्णवांचिये पंक्तीं। भाविकभक्त बैसले सत्वरगती। त्यांचें उच्छिष्ट महीपती। सेवित प्रीतीं निजच्छंदें ॥ ५४ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। एकोनत्रिंशाध्याय रसाळ हा ॥ १५४ ॥ ॥ अध्याय २९ ॥ ओंव्या १५४ ॥ श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः ॥ श्रीपूतनाप्राणहरणाय नमः। ऐका श्रोते सादरचित्त। नरसीमेहेता वैष्णवभक्त। जुन्यागडीं प्रेमयुक्त। श्रीहरिभजन करीतसे ॥ १ ॥ क्षमा शांति मूर्तिमंत। जयापासीं अखंड वसत। वृत्ति तयाची अयाचित। अल्प संतुष्ट सर्वदा ॥ २ ॥ भक्ति ज्ञान वैराग्य पूर्ण। प्रेमें करीत हरिभजन। कुटुंब कलत्र असोन। अलिप्त असे सर्वांसी ॥ ३ ॥ जेविं सरोवरीं असोनि कमळिणी। जीवन नातळे तिजलागूनी। कीं घटीं बिंबतां वासरमणी। न भिजतां दिसोनी येतसे ॥ ४ ॥ कीं सर्वांठायीं असोनि जाण। न कोंडे जैसा प्रभंजन। तेविं प्रपंचीं असोनि सज्जन। न लागती अवगुण तयासी ॥ ५ ॥ हरिभक्तांसि संसार। आहे ह्मणती अज्ञान नर। त्यांचा होतसे भूमीसि भार। निंदक थोर ह्मणूनी ॥ ६ ॥ आकाशासि काळिमा लावितां। परी लावी तयाचे लागे हाता। तेविं निंदील जो वैष्णव भक्तां। दोष तयासि लागती ॥ ७ ॥ नरसीमेहेता उदास जाण। त्याचे कन्येसि जाहलें ऋतुदर्शन। फळशोभनाकारण। तयासि आमंत्रण पाठविलें ॥८॥ घरीं नसे वस्त्र अन्न। कांता तयासि बोले वचन। अहेर न्यावयाकारण। काय आपण योजिलें ॥ ९ ॥ मग तो ह्मणे अहेरासी। हरीचें नाम असे आह्मांपासीं। ऐसें बोलोनि स्त्रियेसी। गेला तेथें सत्वर ॥ १० ॥ नरसीमेहेत्यासि देखोन। हांसों लागले अवघे जन। ह्मणती काय कारण। याचें येथें यावया ॥ ११ ॥ लौकिकार्थ पाठविलें मूळ। हा तंव आला तत्काळ। गळां घालोनि तुळसीची माळ। करीं टाळ घेऊनी ॥ १२ ॥ वाद्यें वाजती अति गजरें। सोयरे मिळाले थोर थोर। जवळी नसतां अहेर। येथें कासया हा आला ॥ १३ ॥ कन्या साशंकित होऊन चित्तीं। नरसीमेहेत्यासि सांगे एकांतीं। नष्ट तुह्मास हिणाविती। लज्जा मजप्रती वाटतसे ॥ १४ ॥ ऐकोनि सकळांचें वचन। नरसीमेहेता त्यांसि ह्मणे। काय काय तुह्माकारणें। अहेर लागतो मज सांगा ॥ १५ ॥ जें जें पाहिजे जयासी। तें तें लिहून द्यावें मजपासीं। गोष्टी ऐकूनियां ऐसी। लोक हांसती गदगदां ॥ १६ ॥ तंव एक आला कुटिळ। कागद घेऊनियां तत्काळ। ह्मणे लिहून देऊं जी सकळ। ऐसा तो खळ बोलिला ॥ १७ ॥ मग व्याही जांवई सोयरे खळ। अहेर सांगती सकळ। कन्या ह्मणे अलंकार। पाहिजेत मजलागीं ॥ १८ ॥ जें जें जयासि अपेक्षित। तें तें लिहून दिधलें समस्त। मग नरसीमेहेता पुसत। लिहिणारासी तेधवां ॥ १९ ॥ तुजही अपेक्षित असेल कांहीं। तेंही तत्काळ पत्रीं लिहीं। मग अविश्वासी बोलिला कांहीं। विश्वास नाहीं ह्मणोनियां ॥ २० ॥ तो ह्मणे एक पाषाण। पाहिजे कीं मजकारण। तत्काळ ठेविला लिहून। लोक हांसती तयासी ॥ २१ ॥ मग तो ह्मणे सकळ जनां। अहेर लिहूनि दिधले जाणा। येतील ऐसा माझिया मना। विश्वास न वाटे सर्वथा ॥२२॥ संतवचनीं विश्वास नाहीं। महाखळ तो पितृद्रोही। भवचक्रांत पडिला पाहीं। कल्पांतींही सुटेना ॥ २३ ॥ पढतमूर्ख जो ब्रह्मद्रोही। तीर्थ क्षेत्रें निंदी पाहीं। त्यासि हरीची प्राप्ति नाहीं। कदाकाळीं जाणिजे ॥ २४ ॥ स्त्रीलंपट मातृद्रोही। कालचक्रांत पडिला पाहीं। त्यासि हरीची प्राप्ति नाहीं। कदाकाळीं जाणिजे ॥ २५ ॥ विधिनिषेध नेणे कांहीं। परदारालुब्धक पाहीं। त्यासि हरीची प्राप्ति नाहीं। कदाका-

ळीं जाणिजे ॥ २६ ॥ असो ऐसा तो खळ जाण। ह्मणे मज पाहिजे पाषाण । नरसीमेहेता तें ऐकून । स्तवन करी हरीचें ॥ २७ ॥ ह्मणे दीनदयाळा भक्तवत्सला । कमलनेत्रा वैकुंठविहारा । रुक्मिणीमानसचकोरचंद्रा । पाव सत्वरा येवेळे ॥ २८ ॥ अनाथनाथ ह्मणविसी । लळे भक्तांचे पुरविती । आतां नरसीमेहेत्यासी । टाकूं नको दयाळा ॥ २९ ॥ ऐसी करुणा ऐकोनि कानीं । संतुष्ट जाहले चक्रपाणी । अहेरांचें दिंड भरूनी । आले घेऊनी तेधवां ॥ ३० ॥ ब्राह्मण वेष धरूनि हरी । उभे ठाकले त्याचे द्वारीं । कापड आणिलें दिंडभरी । नरसीमेहेत्यासि सांगत ॥ ३१ ॥ सोयरे पुसती तयालागून । तुह्मी कोठील असा कवण । वचन ऐकून जगज्जीवन । काय बोलती तें ऐका ॥ ३२ ॥ नरसीमेहेत्याच्या दुकानावरी । गुमास्ता असतों द्वारकापुरीं । आजि अहेर घेऊनि सत्वरीं । आलों लवकरी या ठायां ॥ ३३ ॥ ऐसें बोले भक्तभूषण । परी कोणासि नकळे निजखूण । मोहममतेनें भुलले जन । झांकिले भ्रांतीनें ज्ञानचक्षु ॥ ३४ ॥ अलंकारांची पेटारी । घेऊनि उभा ठाकला हरी । मग सोयऱ्यांसि ते अवसरीं । नरसीमेहेता बोलत ॥ ३५ ॥ जें जें जयासि अपेक्षित । तें तें मागारे समस्त । मानसीं न व्हावें संकोचित । कल्पनाद्वैत टाकूनी ॥ ३६ ॥ यादीचा कागद रुक्मिणीपती । मागोनि घेत आपुले हातीं । दिंड सोडोनि सत्वरगती । वस्त्रें वांटिती निजहस्तें ॥ ३७ ॥ चिराशेला जामातासी । काढूनि देतसे हृषीकेशी । चोळी पाटांव वरमायेसी । काढूनियां दीधलें ॥ ३८ ॥ कोणा साडी कोणा लुगडीं । कोणा चोळी कोणा दुलडी । कोणासि नेसवी चुनडी । मुगी पैठणी रुमाल ॥ ३९ ॥ कोणास कुसुंबी पातळ जाण । कोणा केशरी पीतवर्ण । कोणा देतसे जगज्जीवन । हिरवीं पातळें जरतारी ॥ ४० ॥ कोणासि पागोटें परकाळा । कोणी मागती अष्टगोली शेला । कोणासि हरीनें दीधला । धोतरजोडा रेशमी ॥ ४१ ॥ कोणा काळी चौकडी कांठीं कटार । कोणी मागे पीतांबर । लवलाहें शार्ङ्गधर । काढोनि देत तयांसी ॥ ४२ ॥ मदनगलोलाधटी जाण । एकासि देत नारायण । दिंड आणिलें मधुसूदनें । परी भरलें असे तैसेंची ॥ ४३ ॥ कौतुक पाहावया आले नर । तयांसि देतां दिव्यांबर । शेले परकाळे अपार । शार्ङ्गधर वांटीतसे ॥ ४४ ॥ हळदीकुंकुम घ्यावयासी । गांवच्या स्त्रिया आल्या तयांसी । वस्त्रें निजांगें हृषीकेशी । अतिवेगेंसी देतसे ॥ ४५ ॥ मुगवीं तपासिलीं चिटबंदरी । हिरवी साडी धटी पोफळी । राजमहाल पातळें ढवळीं । अंगें वनमाळी वांटीतसे ॥ ४६ ॥ धन्य धन्य तेचि जन । जयांसि वस्त्रें देत नारायण । येथें दृष्टांत द्यावयाकारण । काय आतां योजावा ॥ ४७ ॥ द्रौपदीसतीस हस्तनापुरीं । नग्न करितां दुराचारी । वस्त्रें घेऊनि धांवला हरी । तैसीच परी हे जाहली ॥ ४८ ॥ वोपिले वस्त्रांचे भार । मग दिधले अलंकार । कोणासि शीसफुलें चंद्रकोर । कोणासि गेंडे मुद्राखडी ॥ ४९ ॥ कोणासि बिंद्या झुबकबाळ्या । कोणासि घडाच्या मासे बाळ्या । कोणासि गेंडे खुंटबाळ्या । रुक्मिणीवर देतसे ॥ ५० ॥ चिंचपेट्या मुक्ताहार । कोणासि देत मोहनमाळ । दुलडी पुतळ्या घननीळ । आपुले हातें देतसे ॥ ५१ ॥ कोणासि वेळा बाजूबंद । मागे तयाचा पुरवी छंद । पाल्या दोरे गोविंद । आपु-



ल्या हातें वांटीतसे ॥ ५२ ॥ कोणासि कटिदोरा जरतारी । बांकी सांखळ्या गुजऱ्या भारी । कोणासि देतसे मुरारी । जोडवीं विरोद्या अनवट ॥ ५३ ॥ कोणासि कुडक्यानागोत्रें कानीं । निजांगें लेववी चक्रपाणी । कंठ्या मुद्रिका कटिसूत्र जोडूनी । रत्नकोंदणीं वांटीतसे ॥ ५४ ॥ कौतुक दाखवी शार्ङ्गधर । संतुष्ट केले नारीनर । भक्तकार्यासि सादर । अतिउदार जाहलासे ॥ ५५ ॥ जैसा ज्याचा भाव पूर्ण । तैसें त्यासि देत नारायण । लेखकासि एक पाघाग । जगदुद्धारें आणिला ॥ ५६ ॥ निजांगें उचलोनि जगज्जीवनें । त्याचे मस्तकीं ठेविला जाण । सकळ हांसती सभाजन । लीला अद्भुत देखोनी ॥ ५७ ॥ मग काय बोलती समस्त जन । तुझें प्रारब्ध कुडकें जाण । कल्पतरुतळीं वैसोन । भिक्षाटन इच्छिलें कीं ॥ ५८ ॥ कीं भस्मासुरासि गिरिजावर । प्रसन्न जाहलिया साचार । तयानें मागीतला विपरीत वर । तैसेंच तुज जाहलें कीं ॥ ५९ ॥ ऐसें बोलती सकळजन । दुराचारी लज्जितमन । जीवनांत ढेंकुळ पडतां जाण । जाय विरून तैशा रीतीं ॥ ६० ॥ नरसीमेहेत्यासि नमस्कार । सकळ घालिती वारंवार । ह्मणती पावला तुह्मास शार्ङ्गधर । कळलें साचार आह्मासी ॥ ६१ ॥ यापरी करूनि फळशोभन । विष्णुभक्त निघाला तेथून । जुन्यागडीं येऊनि दर्शन । कृष्णमूर्तीचें घेतलें ॥ ६२ ॥ ह्मणे रुक्मिणीकांता श्रीहरी । आजि कष्टी जाहलासि थोरी । अहेर घेऊन मुरारी । मजमागें आलासी ॥ ६३ ॥ मनांत ह्मणे वैकुंठपती । मीं वस्त्रें वांटिलीं लोकांप्रती । परी नरसीमेहेत्यासि निश्चितीं । नाहीं सर्वथा गौरविलें ॥ ६४ ॥ मग प्रसन्न होऊन तमालनील । तुलसीमिश्रित सुमनहार । निजांगें काढोनि सत्वर । कंठीं घातला भक्ताचे ॥ ६५ ॥ अहेर घेऊन आला ब्राह्मण । तो तेथेंच अदृश्य जाहला जाण । नरसीमेहेत्याचे चरण । सकळ जन वंदिती ॥ ६६ ॥ नित्य करितां हरिकीर्तन । गळ्यांत हार येतसे जाण । तों मंडुकराजयाकारण । वर्तमान कोणी सांगितलें ॥ ६७ ॥ राजा आला पाहावयासी । मूर्ति पुजोनि उपचारेंसीं । कृत्रिम ह्मणोनि तयासी । संशय चित्तीं वाटला ॥ ६८ ॥ मग सुईदोरा घेऊनि वेगीं । आंगड्यासि हार खिळिला अंगीं । सक्रोध रूप होऊनि वेगीं । नरसीमेहेत्यासी बोलत ॥ ६९ ॥ ह्मणे कृत्रिमविद्येंकरूनि त्वरित । भाविकजन भोंदिले बहुत । आजि गळ्यांत हार न येतां येथ । शिक्षा करीन तुजलागीं ॥ ७० ॥ मग नरसीमेहेता ते अवसरीं । टाळवीणा घेऊनि करीं । श्रीहरिनामाचे गजरीं । सप्रेमभरीं नाचत ॥ ७१ ॥ बहुत वर्णिले हरीचे गुण । परी हार गळां नयेचि जाण । मग दोनी कर जोडून । देवास विनंती करीतसे ॥ ७२ ॥ हरी त्वां मीनरूप धरून । शंखासुर मारिला न लागतां क्षण । आणि हार द्यावयाकारण । उशीर आजि कां लाविला ॥ ७३ ॥ कूर्मरूप धरूनि वैकुंठपती । चवदा रत्नें काढिलीं युक्तीं । आणि हार द्यावया सत्वरगतीं । उशीर निश्चितीं कां केला ॥ ७४ ॥ वराहरूप धरून शार्ङ्गधर । हिरण्याक्ष मारिला सत्वर । आणि हार द्यावया उशीर । आजि कां लाविला गोविंदा ॥ ७५ ॥ प्रल्हाद गांजितांच जाण । निघालासि स्तंभ फोडून । आणि हार द्यावयाकारण । करुणा अजून कां नये ॥ ७६ ॥ वामनरूप धरूनि आपण । पा-

दांत आटिलें त्रिभुवन । आणि माझीं करुणावचनें ऐकोन । दया तुज अजूनि कां नये ॥ ७७ ॥ कामधेनु गांजिली ह्मणून । क्षत्रिय निवटिले परशु घेऊन । आणि माझी करुणा ऐकून । दया अजूनि कां नये ॥ ७८ ॥ देव बंदीं पडिले ह्मणून । मारिले रावण कुंभकर्ण । आणि माझें संकट तुजकारण । श्रुत नसे काय कळेना ॥७९॥ द्रौपदीस गांजितां रुक्मिणीपती । तैं तीस पावलासि सत्वरगतीं । आजि माझें संकट ऐकोनि तुजप्रती । करुणा चित्तीं कां नये ॥८०॥ हे करुणाशब्द ऐकूनि कानीं । संतुष्ट न होसी चक्रपाणी । ह्मणे अपशब्द बोलतां मजलागूनि । हार काढूनि तें देतों ॥ ८१ ॥ राजा ह्मणे ते वेळां । तुझा कृत्रिमभाव मज कळला । ह्मणोनि शिक्षा करावयाला । सरसावला नृपनाथ ॥८२॥ ऐसें संकट देखोन । नरसीमेहेता बोलिला वचन । तेणें सुखावला जगज्जीवन । तें परिसा सज्जन भाविक हो ॥ ८३ ॥ ह्मणे पुष्पहार देतां मातें । तुझ्या बापाचें काय जातें । वचन ऐकून द्वारकानाथ । संतोषयुक्त जाहले पैं ८४ अपार करुणा भाकिली पाहे । परी ती देवाच्या मनासि नये । गाळी देतांच लवलाहें । हार गळयांत पातला ॥ ८५ ॥ राजा पाहे विलोकून । टांचे तैसेच असती जाण । ह्मणे हा धन्य वैष्णवजन । अवतार पूर्ण शिवाचा ॥८६ ॥ नरसीमेहेत्याचे चरण प्रीतीं । सद्भावें धरितसे नृपती । ह्मणे माझे अपराधांची स्थिती । ते न गणीं चित्तीं सर्वथा ॥ ८७ ॥ तूं निजभक्त वैष्णववीर । हें नेणतां मी पामर । ऐकूनि जनांचें उत्तर । आलों साचार छळावया ॥८८॥ दुर्योधनें छळितां पांडवांप्रती । अपयश पावला जैसा दुर्मती । तेविं छळितां तुज निश्चितीं । गती मज जाहली ॥ ८९ ॥ नमस्कार घालूनियां त्वरित । नगरासि गेला नृपनाथ । नरसीमेहेता प्रेमयुक्त । भजन करित श्रीहरीचें ॥ ९० ॥ पुढें द्वारकेहूनि निश्चितीं । डाकुरासि येतील रुक्मिणीपती । श्रोत्यांसि विनवी महीपती । परिसा प्रीतीं स्वानंदें ॥ ९१ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । त्रिंशत्तमाध्याय रसाळ हा ॥ ९२ ॥ ॥ अध्याय ३० ॥ ओंव्या ९२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

अ० ३० समाप्त.



श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । जय द्वारकावासी रुक्मिणीरमणा । चित्तचालका चैतन्यघना । विधिजनका भक्तभूषणा । दानवमर्दना श्रीकृष्णा ॥ १ ॥ जय विश्वव्यापका सर्वेश्वरा । सायुज्यपददानीं अति उदारा । पतितपावना जगदुद्धारा । राधिकावरा गोविंदा ॥ २ ॥ जय सगुणस्वरूपा मेघश्यामा । गुणातीता पुरुषोत्तमा । ब्रह्मांडवासी आत्मारामा । भजनीं प्रेमा मज असोंदे ॥ ३ ॥ जय गोमतीतीरनिवासिया । श्रीजगद्गुरु रणछोडराया । चित्त स्थिरावे तुझिया पायां । ते कृपेची छाया करावी ॥ ४ ॥ जय निजभक्तहृदयकमलमिलिंदा । सच्चिदानंदा स्वानंदकंदा । चित्त स्थिरावे चरणारविंदा । ऐसें गोविंदा करावें ॥ ५ ॥ तुझीं निजभक्तचरित्रें अद्भुत । साह्य होऊनि वदवी यथार्थ । जेणें श्रोतयांचे श्रवण तृप्त । होती त्वरित निजप्रेमें ॥ ६ ॥ आतां ऐका भाविकजन । कथा रसिक अति पावन । श्रवणीं पडतां दुरितें संपूर्ण । जाती जळून क्षणमात्रें ॥७॥ द्वारकेची पुरातन मूर्ती । डाकुरा आली देखोनि भक्ती । दीडशें कोस द्वारावती । तेथोनि पुढें असे पैं ॥ ८ ॥ रामदास नामें ब्राह्मण । होता परम भाविक सज्ञान । कोरान्न मागोनि संरक्षण । कुटुंबाचें करीतसे ॥ ९ ॥ निराश संतुष्ट सर्वकाळ । राहिली चित्ताची तळमळ । नामस्मरण सर्वकाळ । अहोरात्र करीतसे ॥१०॥ पंधरा दिवशीं एकादशी । जात असे द्वारकेसी । नेमें वारी धरिली ऐसी । रामदासें निजनिष्ठें॥११॥ सायाचें लांकुड कोरून । त्यामाजी तुळसी लावून । हातावरी तें धरून । करी गमन सत्वर ॥ १२ ॥ मार्गीं चालतां प्रेमयुक्त । स्वानंदें हरीचे गुण वर्णित । शरीरलोभ सांडूनि त्वरित । वैराग्यभरित सर्वदां ॥ १३ ॥ दृष्टीं देखतां द्वारावती । परम उल्हास वाटे चित्तीं । जेविं कृपणासि धन अवचितीं । मार्गीं चालतां सांपडे ॥ १४ ॥ कीं सासुरवासें गांजिली बाळा । माहेर देखतां उल्हास तिजला । कीं अवर्षणीं मेघ जैसा वोळला । देखोनि प्रजांसी जाहला आनंद ॥ १५ ॥ अनुताप धरूनि अंतरीं । स्नान करी गोमतीतीरीं । मग मानसपूजा करून सत्वरीं । महाद्वारीं जातसे ॥ १६ ॥ सद्भावें घालूनि लोटांगण । सांडोनि सकळ देहाभिमान । ह्मणे देवा तुज अनन्यशरण । जन्ममरण खंडावें ॥१७॥ तुळसीझाड वागवी सवें । त्याची मंजरी तोडूनि भावें । पूजोनियां वैकुंठराव । भाकीत कींव निजनिष्ठें ॥१८॥ ह्मणे पतितपावना गरुडध्वजा । हे माझी अनाथाची पूजा । नमस्कारूनि अधोक्षजा । माघुती डाकुरा येतसे ॥१९॥ एक दिवस गृहीं राहून । माघुती करीतसे प्रयाग । पंचवीस वर्षेंपर्यंत जाण । ऐसी वारी करीतसे ॥ २० ॥ शरीर बहुत जर्जर जाहलें । वृद्धपण अंगीं आलें । मग द्वारकेसि येऊनि एक वेळे । देवास विनंती करीतसे ॥ २१ ॥ अशक्त जाहली माझी काया । आतां शक्ति नसे यावया । लोभ असोंदे देवराया । चरणीं मस्तक ठेविला ॥ २२ ॥ अश्रु वाहती नेत्रांतून । पुढें न करवे कांहीं स्तवन । ह्मणे हें शेवटींचें दर्शन । पुढती येणें नव्हे कीं ॥ २३ ॥ ऐसें बोलतां रामदास । सद्गदित जाहला जगन्निवास । चहुं भुजीं निजभक्तास । आलिंगूनी धरियेलें ॥२४॥ रामदासासि देव बोले । तुवां श्रम बहुदित केले । सेवाऋण फार जाहलें । तें फिटलें नव जाय॥२५॥ तुझी फार जाहली सेवा । आतां मज न्यावें

आपुल्या गांवा । रामदास ह्मणे केशवा । कैसें न्यावें तुजलागीं ॥ २६ ॥ देव ह्मणे माझा रथ घेईं । जुंपोनि घोडे त्यांत
बैसवीं ॥ रातोरात लवलाहीं । चाल येतों सत्वर ॥ २७ ॥ मग रथ आणोनि ते वेळ । त्यांत बैसविले घननीळ । मनो-
वेगें भक्तवत्सल । आले डाकुरासी तेधवां ॥ २८ ॥ रामदास ह्मणे भगवंता । तुज कोठें लपवूं आतां । मागून धांवणें
आलिया तत्वतां । शिक्षा मज करितील॥२९॥इकडे प्रातःकाळीं द्वारकेंत । पुजारी कांकडआरतीस येत । तों मूर्ति नाहीं
राउळांत । नवल वाटलें सकळांसी ॥ ३० ॥ विचार करिती तये वेळां । एक ह्मणती रामदास आला । तोचि देवासि
घेऊनि गेला । मार्ग दिसतसे रथाचा ॥ ३१ ॥ पुजारीं मागें पाहून । डाकुरासि आले सकळजन । रामदासें मूर्ति उच-
लोन । तळयामध्यें टाकिली ॥ ३२ ॥ पुजारीं ह्मणती त्यालागुन । मूर्ति आणिलीस द्वारकेहून । ते दाखवीं आह्माका-
रण । ऐसें वचन बोलिले ॥ ३३ ॥ येरू बोले असत्य वचन । म्यां नाहीं आणिला जगज्जीवन । पाहा गृहांत धुंडाळून ।
भक्तभूषण परमात्मा ॥ ३४ ॥ मग नगरांत जाऊनि सत्वर । झाडा घेतां घरोघर । आड विहिरी सविस्तर । शोधोनि-
यां पाहती ॥ ३५ ॥ ग्रामाबाहेर सरोवरीं । पाहों लागले ते अवसरीं । वक्षःस्थळीं बरची लागली । उकळी आली
अशुद्धाची ॥ ३६ ॥ तर्क करिती आपुले मनांत । ह्मणती सांपडला रणछोडनाथ । मग बुडी दऊनियां त्वरित ।
रुक्मिणीकांत काढिला ॥ ३७ ॥ मग सन्निध आणूनि रहंवर । मूर्तीस बैसविलें सत्वर । रामदास जाहला चिंता-
तुर । देवासि उत्तर बोलतसे ॥ ३८ ॥ ह्मणे भक्तवत्सळा दीनानाथा । मज टाकूनि जातोसि आतां । तुजका-
रणें रुक्मिणीकांता । असत्य वचन बोलिलों मी ॥ ३९ ॥ ध्यानीं येऊनि जगज्जीवन । निजभक्तासि बोले वचन ।
तूं आपुलें स्वस्थ करूनि मन । माझें भजन करावें ॥४०॥ मी कर ठेऊनि कटावरी । राहिलों पुंडलीकाचे द्वारीं । ते-
साचि तुजपासीं डाकुरीं । निरंतरीं राहीन ॥ ४१ ॥ यावरी रामदास बोले वचन । पुजारी नेतील तुजलागून । यासि
उपाय करावा कवण । मजकारण कळेना ॥४२॥ मग कृपावंत ह्मणे त्यासी । तूं जाईं पुजाऱ्यांपासीं । माझ्या भार सु-
वर्ण त्यांसी । यावया करी सत्वर ॥४३॥ तुझे स्त्रियेचे नाकींची नथ । वालभरी आहे निश्चित । त्याच्या भार मी हो-
ऊनि त्वरित । येथें राहतों तुजपाशीं ॥ ४४ ॥ रामदास हर्षला मनीं । पुजाऱ्यांसि सांगे जाऊनी । मूर्ति आणिली द्वा-
रकेहूनी । तैसीच येथें असों द्या ॥ ४५ ॥ मूर्तिभार देतों सुवर्ण । तें समस्तांस मानवलें वचन । बुद्धिदाता नारायण ।
अवश्य आण ह्मणती ते ॥ ४६ ॥ ग्रामवासी बैसले लोक । तेथें जाऊनि तात्काळिक । ह्मणे मूर्तिभार सुवर्ण देख । पु-
जारियांसी मी देतों ॥४७॥ ह्मणजे माझी हे मूर्ति जाहली । तुह्मी साक्ष असावें सकळीं । कुटिळ हांसती तये वेळीं ।
वचन एकोनी तयाचें ॥ ४८ ॥ ह्मणती तूं दुर्बळ दीन हीन । भक्षावयासि नाहीं अन्न । कोठूनि देशील सुवर्ण । नवल
आह्मांसी वाटतें ॥४९॥ येरू ह्मणे समर्थ हरी । तो आला माझिये घरीं । दुर्बळ मजला ह्मणतां अंतरीं । लाज तुह्मा-
सी वाटेना ॥ ५० ॥ दरिद्रियाचे घरीं समुद्रतनया । अवचित आली वाण यावया । तयासि दरिद्री ह्मणतां वांया ।

मूर्खत्व अंगीं ठसावे ॥ ५१ ॥ नातरी लोहाचे संदुकेंत । परीस सांपडला अकस्मात । त्याचें माशील मोल बोलोनि
व्यर्थ । वाचेसि शीण करावा ॥ ५२ ॥ गांवांतील अमंगळ वोहळ । त्यावरी लोटलें गंगाजळ । मग अपवित्र ह्मणतां
तत्काल । दोष लागती आपणासी ॥ ५३ ॥ कीं मुक्यासि सरस्वती प्रसन्न । होऊनि शिकवी अध्ययन । तयासि मूर्ख
ह्मणतां उणेपण । आपणाकारण येतसे ॥५४॥ तेविं लक्ष्मीपती वैकुंठनाथ । तो संतुष्ट जाहला मजप्रत । दुर्बळ ह्मणतां
मनांत । शंका कांहीं न वाटे ॥५५॥ लोक ह्मणती पाहूं कौतुक । साक्ष आहों आह्मीं सकळिक । धट रोंवुनि रमानाय-
क । पारड्यामध्यें घातला ॥५६॥ पुजारी ह्मणती सुवर्ण आणीं । मग गृहासि गेला तये क्षणीं । नथ मुष्टींत धरूनी । आ-
ला घेऊनी सत्वर ॥५७॥ लोक ह्मणती तये क्षणीं । कोठें कनक दाखवीं नयन । लवलाहीं गृहास जाऊनी । रिक्तपाणी
आलासी ॥५८॥ दाखवी मुष्टि उकलोन । देखोनि हांसती सकळजन । ह्मणती फार होईल सुवर्ण । ऐसें आह्मासी वा-
टतें ॥ ५९ ॥ मग हस्त जोडोनि त्या अवसरा । प्रार्थिता जाहला रुक्मिणीवरा । ह्मणे अनाथनाथा शार्ङ्गधरा । दी-
नोद्धारा श्रीकृष्णा ॥ ६० ॥ सत्यभामेनें नारदासी । दान दिधला हृषीकेशी । तुळशीपत्र रुक्मिणीसी । घेऊनि यश
दीधलें ॥ ६१ ॥ तियेहूनि मी आहें दीन । माझा असोंदे अभिमान । ऐसें बोलूनि वालभार सुवर्ण । पारड्यामध्यें घा-
तलें ॥ ६२ ॥ अनंत ब्रह्मांडें ज्याचे उदरीं । तो वाल घालितांचि गेला वरी । भक्त गर्जती जयजयकारीं । सुरवर पुष्पें
टाकिती ॥६३॥ ह्मणती धन्य रामदासा । देव विकत घेतला कैसा । वाल देऊनि द्वारकाधीशा । आपुले आधीन त्वां
केलें ॥ ६४ ॥ धन्य धन्य तुझी भक्ती । धन्य धन्य तुझी कीर्ती । ऐसें ह्मणोनि द्वारावतीं । पुजारी गेले परतोनी ॥ ६५ ॥
नूतन मूर्ति करूनी । स्थापिली द्वारकापट्टणीं । डाकुरीं राहिले चक्रपाणी । रामदासाकारणें ॥ ६६ ॥ अद्यापि द्वार-
केसि जाती जन । ते आधीं डाकुरासि येऊन । घेऊनि श्रीकृष्णदर्शन । मग पुढें गमन करिताती ॥६७॥ पुढिले अध्या-
यीं रसउत्पत्ती । मथुरेची पुरातनमूर्ति । ब्रह्मचाऱ्याची देखोनि भक्ती । हरिद्वारासी येईल ॥६८॥ नानाचरित्रें करून ।
वाढवितो भक्तमहिमान । महीपती तयाचे गुण । प्रेमभावें वर्णितसे ॥६९॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल
जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । एकत्रिंशाध्याय रसाळ हा ॥ ७० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ३१ ॥

॥ श्री भक्तविजय अध्याय ३१ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः। श्रीद्वारकानाथाय नमः। मथुरेची मूर्ति पुरातन। हरिद्वारासि गेली जाण। तें चरित्र अतिपावन। श्रोतीं सादर ऐकावें ॥१॥ शिवरात्रि पर्वकाळीं। रामेश्वरीं यात्रा भरली। दोघे ब्राह्मण तये वेळीं। उत्तरदेशाहूनि पातले ॥ २ ॥ तीर्थवासी दोघेजण। उदास विरक्त पवित्र ब्राह्मण। हरिभजन प्रेमेंकरून। रात्रंदिन करिताती ॥ ३ ॥ एकासी एक वर्तमान। पुसतां एक ह्मणे ब्राह्मण। हरिद्वारीं कुटुंब जाण। माझें असे सर्वही ॥ ४ ॥ एक ह्मणे गौडदेश देखा। तेथें माझी असे जन्मभूमिका। मायबाप बंधु सखा। हरीविण देखा मज नाहीं ॥ ५ ॥ तीर्थें करून सप्तपुरी। आतां आलों रामेश्वरीं। निराधार ब्रह्मचारी। नाम माझें जाणिजे ॥ ६ ॥ ऐसें ऐकोनियां वचन। संतोषला कल्याण ब्राह्मण। दोघे एका संगतींकरून। तीर्थक्षेत्रें पाहती ॥ ७ ॥ श्रीहरीचे गुणानुवाद। रात्रदिवस गाती करूनि विशद। आत्मानात्मचर्चा प्रसिद्ध। परस्परें बोलती ॥ ८ ॥ ऐसें करितां तीर्थाटन। मथुरेसि आले दोघेजण। यमुनातीरीं करूनि स्नान। माधवराव पूजिला ॥ ९ ॥ त्रिरात्र तेथें राहिले। तों कल्याणासि हिंव लागलें। न जाय उपाय करितां भले। कृश जाहलें शरीर ॥ १० ॥ कोणासि न सोडी शरीरभोग। चंद्रासि लागला क्षयरोग। इंद्राअंगीं सहस्रभगें। पूर्वकर्मैं तयाच्या ॥ ११ ॥ ब्रह्मकपाट लागलें पाठी। तेणें सदाशिव केला हिंपुटी। हालाहल घेतलें पोटीं। नील कंठीं जाहला ॥ १२ ॥ असो आतां ते कथनपरी। दोघे राहिले मथुरापुरीं। परोपकारें ब्रह्मचारी। सेवा करीत कल्याणाची ॥ १३ ॥ भूतदया नसतां चित्तीं। जगीं संत जे ह्मणविती। त्यांसि श्रीहरीची प्राप्ती। कल्पांतींही न होय ॥ १४ ॥ तैसा नव्हे ब्रह्मचारी। सत्यवादी परोपकारी। भूतदया जयाचे अंतरीं। मूर्तिमंत वसतसे ॥ १५ ॥ औषध पथ्य करूनि त्यासी। जवळी बसे अहर्निशीं। षण्मासपर्यंत कल्याणासी। शरीरभोगें पीडियेलें ॥ १६ ॥ तोंपर्यंत राहिला जवळी। रात्रदिवस तयातें सांभाळी। ह्मणे कृपावंता वनमाळी। आरोग्य करी याजला ॥ १७ ॥ पुरला शरीराचा भोग। कल्याण जाहला अरोग। ह्मणे आप्तसखा सोयरा जिवलग। निराधार तूं माझा ॥ १८ ॥ निराधारियासि आधार। हें नाम तुझें साचार। मजला तुझा उपकार। न फिटेची जन्मोजन्मीं ॥ १९ ॥ कांता पुत्र कन्या ऐसीं। अवघीं राहिलीं घरासी। कामा आलासि परदेशीं। विष्णुभक्त मजलागीं ॥ २० ॥ माझी कन्या कुंवार घरीं। आठा वरुषांची नोवरी। घरासि जाऊनि निर्धारीं। तुजकारणें देईन ॥ २१ ॥ ऐकोनि ह्मणे ब्रह्मचारी। मी गृहस्थाश्रम कदा न करीं। दुःखरूप या संसारीं। मज कासया घालितां ॥ २२ ॥ कल्याण ह्मणे तयासी। संसारबाधा तुज कायसी। त्याचा भार हृषीकेशी। अंगें आपण चालवी ॥ २३ ॥ मथुराक्षेत्र पुण्यपावन। संकल्प घालितों तुजकारण। अंगीकारीं कन्यादान। हरिभक्ता उदासा ॥ २४ ॥ ब्रह्मचारी ह्मणे त्यासी। तुह्मी वृद्ध तीर्थवासी। घरीं जातां स्त्रियेसी। तुमची गोष्ट मानेना ॥ २५ ॥ संकल्प जरी म्यां घेतला। आणि पुढें विवाह जरी न जाहला। तरी जन्म वृथा गेला। ऐसें मजला वाटतसे ॥ २६ ॥ ब्रह्मचर्य ना गृहस्थाश्रम। ऐसें होईल मजला

जाण । कल्याण ह्मणे श्रीकृष्ण । साक्ष आतां ठेवितों ॥ २७ ॥ महाद्वारीं जाऊनि दोघेजण । वंदिले श्रीकृष्णचरण । ब्रह्मचारियासि बैसवून । उदक हातीं घातलें ॥ २८ ॥ कीं कन्या दिल्ही तुजकारण । घरासि जाऊन करीं लग्न । यास साक्ष जगज्जीवन । माधवराव मथुरेचा ॥ २९ ॥ वंदोनियां श्रीकृष्णचरण । दोघे निघाले सत्वर तेथून । तीन वार वाट चालून । हरिद्वारासि पातले ॥३०॥ कल्याण गेला घरासी । कोणी न बोलती तयासी । वृद्धकाय तीर्थवासी । कोणी तया पुसेना ॥३१॥ सर्व सुखाचे सांगाती । अंतीं अव्हेरूनियां देती । यालागीं सावधान चित्तीं । सर्वकाळ असावें ॥ ३२ ॥ पुत्र ह्मणती बहु हिंडला । परी शेवट नाहिं जाहला । ब्रह्मचारी कोण आणिला । हें आह्मासि कळेना ॥ ३३ ॥ कल्याण निजला घरांत । कांतेप्रती काय बोलत । तीर्थें हिंडतां मथुरेंत । दुखणें मज जाहलें ॥३४॥ ते ह्मणे तीर्थीं मरावयासी । सुकृत नाहीं तुह्मांपासीं । माघुतीं आलेती गृहासी । तोंड येथें घेऊनी ॥ ३५॥ कल्याण ह्मणे ऐक वचन । आयुष्य असतां नयेचि मरण । ब्रह्मचाऱ्याचे संगतीनें । बहुत सुख पावलों ॥ ३६ ॥ पथ्य औषध परदेशीं । येणें केलें वो मजसीं । ते ह्मणे भ्रतारासी । नवल काय जाहलें ॥३७॥ संगतीसि असतां देख । सांभाळिती एकासि एक । आतां आला असें टणक । निद्रा करी उगाची ॥३८॥ ऐसा संवाद ब्रह्मचारी । ऐकतसे निजोनि द्वारीं । कल्याण तये अवसरीं । काय स्त्रियेसी बोलिला ॥ ३९ ॥ मथुराक्षेत्र पुण्यवंत । महाद्वारीं जाऊनि तेथ । आपुली कन्या निश्चित । ब्रह्मचाऱ्यासि अर्पिली म्यां ॥ ४० ॥ कांता बोले ते अवसरीं । दुसरें लग्न आपुलें करीं । कन्या होईल तिचे उदरीं । तेचि देईं त्याजला ॥ ४१ ॥ कल्याण ह्मणे हरिभक्तासी । कन्या जरी तूं अर्पिसी । तरी पार नाहीं पुण्यासी । वचन न मोडीं आमुचें ॥ ४२ ॥ ते ह्मणे विहिरींत लोटून । कन्या आतांचि मी देईन । अथवा रांडकीच ठेवीन । आपुले घरीं तैसीच ॥४३॥ परी हरिभक्ताचे घरीं । कदा न देईं मी कुमरी । कल्याण पुत्रासि विचारी । नये चित्तासी तयाचे ॥ ४४ ॥ दुसरे दिवसीं दोघेजण । राजद्वारीं गेले जाण । मथुरेचें वर्तमान । जाहलें तैसेंचि सांगीतलें ॥४५॥ ब्राह्मण ह्मणे नृपनाथा । माझा संकल्प गेला वृथा । यमपुरीचिया पंथा । जावें लागेल मज वाटे ॥४६॥ म्यां संकल्प घातला प्रीतीं । घरीं कांता पुत्र नायकती । तुवां सांगूनि तयांप्रती । कन्या देववी नृपनाथा ॥ ४७ ॥ राजा ह्मणे ब्राह्मणासी । सत्य न वाटे वचनासी । संकल्प सोडितां मथुरेसी । साक्ष कोणासी ठेविलें ॥ ४८ ॥ निराश्रय ब्रह्मचारी । राजयासि ह्मणे ते अवसरीं । वैकुंठपति मुरारी । मथुरावासी श्रीकृष्ण ॥ ४९ ॥ अनंत ब्रह्मांडांच्या गती । ज्याचे इच्छामात्रें होती जाती । तो पुराणपुरुष रुक्मिणीपती । साक्ष तयासी ठेविलें ॥५०॥ ऐकूनि ह्मणे नृपवर । साक्ष ठेविला रुक्मिणीवर । तो येथें येऊनि सत्वर । आह्मासि जरी सांगेल ॥ ५१ ॥ तरी कन्या देववीन जाण । ऐसें ऐकोनियां वचन । ब्रह्मचारी ह्मणे जगज्जीवन । साक्ष यावयासि आणितों ॥५२ ॥ तेथोनि निघाला सत्वर । पंथ क्रमिला तीन वार । मथुरेचा श्यामसुंदर । दर्शन त्याचें घेतलें॥५३॥ ह्मणे देवाधिदेवा अनंता । साक्ष यावयासि चलावें आतां ।





नाहीं तरी जातें वृथा । ब्रह्मचर्यव्रत माझें॥५४॥ देव ह्मणे तयाप्रती । कैसी चालेल पाषाणमूर्ति । येरू ह्मणे जैसी बोलती । तैसीच आतां चालेल ॥ ५५ ॥ मी तरी असें निराधारी । तुझाचि आश्रय आहे हरी । आतां चलावें तेथवरी । कृपावंता जगदीशा ॥ ५६ ॥ ऐसें ऐकूनि श्रीरंग । भक्तकार्यासि निघाला सवेग । ब्रह्मचाऱ्यासी ह्मणे मागें । परतोनि नको पाहूं तूं ॥ ५७ ॥ मागें पाहासील परतोन । तरी तेथेंच मी राहीन । ऐसें बोलोनि जगज्जीवन । तयामागें चालिले ॥ ५८ ॥ देदीप्यमान सतेज मूर्ती । दिव्यालंकार प्रभा फांकती । पायीं नूपुरें वाळे वाजती । रातोरातीं पातला ॥५९ ॥ समीप आले जगन्निवास । तेथून नगर राहिलें अर्धकोस । मागिले मागें हृषीकेश । उभा तेथेंच राहिला ॥६० ॥ ब्राह्मण पाहे परतोनी । तों उभा राहिला चक्रपाणी । तेज न समाये गगनीं । काय बोले विप्रासी॥६१॥ तुज म्यां पूर्वींच सांगीतलें । मागें परतोनी त्वां पाहिलें । आतां राजयासि बहिलें । घेऊनि येईं मजपासीं ॥६२॥ निराश्रय ब्रह्मचारी । तेथोनि निघाला झडकरी । राजसभेमाझारी । जाऊनि काय बोलिला ॥ ६३॥ अंबरीषाच्या कैवारेंकरूनी । जेणें अपमानिला दुर्वास मुनी । तो क्षीराब्धिवासी मोक्षदानी । साक्ष यावयासि आणिला ॥ ६४ ॥ रावण कुंभकर्ण इंद्रजित सर्व । मारूनि सोडविले बंदींचे देव । तो अयोध्यावासी राघव । साक्ष यावया आणिला ॥६५॥ गोकुळीं घरोघरीं करी चोरी । मातेनें उखळीं बांधिला हरी । तो वैकुंठपति मुरारी । साक्ष यावया आणिला ॥ ६६ ॥ कंस चाणूर मर्दून । राज्यीं स्थापिला उग्रसेन । तो मथुरावासी जगज्जीवन । साक्ष यावया आणिला ॥ ६७ ॥ दुःशासनें छळितां द्रौपदीसती । वस्त्रें नेसविलीं अनंतहस्तीं । तो भक्तकैवारी रुक्मिणीपती । साक्ष यावया आणिला ॥६८॥ ऐसें ऐकूनियां वचन । आश्चर्य करिती सकळजन । राजा धांवोनि वंदी चरण । ब्राह्मणाचे तेधवां॥६९॥गरुडटके निशाण भेरी । वाद्यें वाजती अतिगजरीं । राजा चालिला सामोरी । वैष्णव नामें गर्जती ॥७०॥ जाहला एकचि जयजयकार । देव वर्षती पुष्पसंभार । मथुरेहूनि यदुवीर । साक्ष यावयासी पैं आले ॥ ७१ ॥ कीर्तन करिती संतजन । राजा घाली लोटांगण । मूर्ति देखिली देदीप्यमान । चतुर्भुज साजिरी ॥ ७२ ॥ मुकुट विराजित अलंकार । कांसे कसिला पीतांबर । ऐसा देखोनि यदुवीर । सकळां संतोष जाहला ॥ ७३ ॥ बैरागी संत भक्तजनांसी । राजा आपण पुसे तयांसी । तुह्मी जातसां मथुरेसी । मूर्ति तेथील हेचि कीं ॥७४॥ राजासि सांगती संतजन । मथुरावासी श्रीकृष्ण । तोचि हा पैं जगज्जीवन । भक्तकार्यासि धांवला ॥ ७५ ॥ नगरवासी लोक सावकार । तयांसि सांगे नृपवर । वधूचें साहित्य अतिसत्वर । तुह्मी सिद्ध करावें।७६।वराकडील आह्मी जाण । ऐसें ऐकोनि धरिलें लग्न । पांचकोस मंडप जाण । चौफेर तेव्हां घातला ॥७७॥ लग्नासी आले नारायण । ऐसें ऐकोनि वर्तमान । अमित मिळाले विद्वज्जन । भक्तमहिमान पाहावया ॥७८॥ लक्ष्मीकांत आला जेथ । उणा पदार्थ न दिसे तेथ । वाद्यें वाजती अपरिमित । सुरवर आले पाहावया ॥७९॥ अंतःपट धरून जाण । काय बोलती ब्राह्मण । वैकुंठवासी श्रीभगवान । या वधुवरांसी रक्षिता ॥८० ॥ जेणें मीनरूप

धरूनी। शंखासुर मारिला आपटोनी। तो क्षीराब्धिवासी चक्रपाणी। वधुवरांसी रक्षिता ॥ ८१ ॥ प्रऱ्हाद गांजितां जाण। निघाला स्तंभ फोडून। तो नरहरिरूप भगवान। वधुवरांसी रक्षिता ॥ ८२ ॥ माती खातां नंदाघरीं। ब्रह्मांडें दाखविलीं उदरीं। तो यशोदानंदन मुरारी। वधुवरांसी रक्षिता ॥८३॥ उच्छिष्ट काढितां धर्मांघरीं। पांडवांसि रक्षी नानापरी। तो भक्तवत्सल श्रीहरी। वधुवरांसी रक्षिता ॥ ८४ ॥ कलियुगीं मथुरेहून। चालत आला जगज्जीवन। तो मथुरावासी श्रीकृष्ण। वधुवरांसी रक्षिता ॥ ८५ ॥ ऐसीं अष्टकें ह्मणोनी। लग्न लाविलें ब्राह्मणीं। चार दिवस सोहळा करूनी। जनवऱ्हाडी बोळविलें ॥ ८६ ॥ मूर्ति राहिली हरिद्वारीं। नूतनमूर्ति मथुरापुरीं। भक्ताभिमानी श्रीहरी। नानाचरित्रें दाखवी ॥८७॥ नानाक्षेत्रीं बैसोन। उद्धरी तो निजभक्तजन। जैसा जयाचा भाव पूर्ण। त्याकारणें होय तैसा ॥ ८८ ॥ दक्षिणदेशीं श्रीपंढरीं। पश्चिमदेशीं द्वारकानगरीं। उत्तरदेशीं हरिद्वारीं। पाहतो वाट भक्तांची ॥ ८९ ॥ पूर्वदिशेसि जगन्नाथ। चतुर्भुज मूर्ति विराजित। श्रोतीं स्वस्थ करूनि चित्त। भक्तचरित्रें परिसावीं ॥ ९० ॥ पुढिले अध्यायीं कथासार। सुरदास अक्रूर-अवतार। त्याचें चरित्र अति प्रियकर। श्रोतीं सादर परिसावें ॥९१ ॥ श्रीपांडुरंग आनंदसरोवर। भक्तकथा ह्या कमळिणी थोर। महीपती तेथें होऊनि भ्रमर। त्यांतील आमोद सेवितसे ॥ ९२ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। द्वात्रिंशाध्याय रसाळ हा ॥९३॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ३२ ॥ ओंव्या ९३ ॥



श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ कलियुगीं भक्त सुरदास। त्याचें चरित्र अतिविशेष। संतसज्जनीं सावकाश। चित्त देऊनि ऐकावें ॥१॥ द्वारकेस कृष्णावतारीं। सत्यभामा आवडती नारी। अकस्मात तिचे घरीं। अक्रूर भक्त पातला ॥ २ ॥ सत्यभामेनें देऊनि आसन। अक्रूर बैसविला सन्मानेंकरून। मग सांगतसे वर्तमान। निर्लज्जमन होऊनी ॥३॥ पहिल्यासारिखा श्रीकृष्ण। माझिया मंदिरा नये जाण। अक्रूरा तूं समजावून। मजकारणें भेटवीं ॥ ४ ॥ तुह्मा आधीन आहे श्रीहरी। ऐसें कळलें मज अंतरीं। अक्रूरा प्रार्थोनि मुरारी। मजकारणें भेटवीं ॥५॥ वियोगानळ जाळी फार। विनंती करीतसे वारंवार। अक्रूरा तो वसुदेवकुमर। मजला सत्वर भेटवीं ॥ ६ ॥ कोणासि सांगूं गुजगोष्टी। मजवरी करील कृपादृष्टी। आतां जाऊन उठाउठी। मज जगजेठी भेटवीं ॥७॥ सोळा सहस्र अंतःपुरीं। असोन बैसला रुक्मिणीचे घरीं। ऐसा व्यापक मुरारी। मज भेटवीं ये वेळे ॥ ८ ॥ अक्रूर विचारी निज अंतरीं। सत्वर न येतां श्रीहरी। तरी आतांचि हे सुंदरी। प्राण देईल आपुला ॥९॥ मग मजवरी कोपेल श्रीकृष्ण। ऐसा अंतरभाव जाणोन। कृष्णरूप धरी आपण। अक्रूरभक्त तेधवां ॥१०॥ ह्मणे माते सावध होईं। हरीस आणितों लवलाहीं। तों साक्षात कृष्ण ते समयीं। येऊनि उभा राहिला ॥११॥ मग अक्रूरासि ह्मणे श्रीहरी। काय विचारिलें अंतरीं। मी नसतां माझे घरीं। कपटरूपें राहिलासी ॥१२॥ तरी कलियुगीं मृत्युलोकासी। अक्रूरा तूं अंध होसी। मग ह्मणे सत्यभामेसी। होसील दासी कलियुगीं ॥ १३ ॥ वचन ऐकूनि अक्रूरभक्त। कर जोडूनि विनवित। आत्माराम तूं साक्षात। माझिया मनींचें जाणसी॥१४॥ तुह्मी सत्वर न येतां जाणा। सत्यभामा देईल प्राणा। तीस धीर द्यावया जगज्जीवना। तुझें रूप धरिलें म्यां ॥ १५ ॥ हरी ह्मणे ठाउकें मजसी। किती अक्रूरा पाल्हाळ करिसी। तूं उद्धरावया जनांसी। अवतार घेसी कलियुगीं ॥ १६ ॥ बाह्यात्कारें दिधला शाप। अंतरीं माझ्या नाहीं कोप। अक्रूर ह्मणे मायबाप। दर्शन द्यावें कलियुगीं ॥ १७ ॥ हरी ह्मणे सत्यभामा दासी। अंध होऊनि तूं भेटसी। मी प्रकटोनि तये संधीसी। आपुले स्वरूपीं मेळवीन॥१८॥ तों मथुरादेशीं सुरदास। अवतरला भक्त परेश। गर्भांध असोनि जगद्विश्वास। रात्रदिवस आठवी ॥१८॥ आसनीं शयनीं भोजनीं जाण। करीतसे हरिचिंतन। योगभ्रष्ट मागील स्मरण। आठवीत मनें एकांतीं ॥२०॥ कीर्तन करी सप्रेम। गीतप्रबंधें आळवी नाम। कवित्व करूनि नित्यनेम। पुरुषोत्तम आळवीतसे ॥२१॥ तंव कोणे एके दिवसीं। यात्रेसि आले मथुरेसी। श्रीकृष्णमूर्ति पाहावयासी। सुरदास चालिले ॥२२॥ सप्रेम दंडवत ते अवसरीं। घातलें तेव्हां महाद्वारीं। कर जोडोनि विनंती करी। ध्यान अंतरीं आठवूनी ॥२३॥ ह्मणे श्रीकृष्णा पतितपावना। करुणासिंधु मनमोहना। अपराध नसतां जगज्जीवना। कां शापिलें मजलागीं ॥ २४ ॥ कृष्णावतारीं अक्रूर होऊन। एक अपराध केला जाण। साक्ष देतसे माझें मन। मजकारणें गोविंदा ॥ २५ ॥ कंसें पाठविलें गोकुळासी। आणावयाकारणें तुजसी। तेथें जातां यशोदेसी। बहुत कष्ट वाटले ॥ २६ ॥ मी घेऊन चाललों

तुजला । यशोदा रडे ते वेळां । तिचा कोप गोपाळा । मजकारणें लागला ॥ २७ ॥ गोकुळींचे जन समस्त । तुज म्यां नेतां चिंताक्रांत । त्यांचा तळतळाट मजप्रत । लागला ऐसें वाटतें ॥२८॥ गोपी रडती आक्रोशेंकरून । ह्मणती आह्मासि दे श्रीकृष्णदान । म्यां नायकिलें त्यांचें वचन । ह्मणोनि ऐसें जाहलें ॥ २९ ॥ केश सोडोनि आक्रंदती । रथापुढें एक पडती । त्यांच्या कोपें जगत्पती । त्वां मजलागीं शापिलें ॥३०॥ कृष्णरूप धरिलें सत्यभामेघरीं । तरी अपराध नव्हेचि श्रीहरी । साक्ष आहेस तूं मुरारी । निजखूण अंतरीं जाणसी ॥ ३१ ॥ गोकुळीं अपराध सत्य घडला । हें माझें चित्त साक्ष मला । मग सुरदासाचे डोळां । अश्रुपात लोटले ॥ ३२ ॥ ऐसें ऐकोनियां करुणावचन । प्रसन्न जाहला नारायण । सुरदासाचे नयन । तत्काळ आले ते समयीं ॥३३॥ पुढें मूर्ति गोजिरवाणी । निजभक्त देखता जाहला नयनीं । शंखचक्रगदापाणी । चतुर्भुज रूप सांवळें।३४।मुकुट वैजयंती कौस्तुभमणी । दिव्यपीतांबर कासिला जघनीं।नूपुर वाळे गर्जती चरणीं।कोटि दिनमणी लोपले३५ऐसें रूप दृष्टीं देखोन।सुरदास घाली लोटांगण।देव ह्मणे जाहलों प्रसन्न।कांहीं वरदान माग मज३६प्रेमें देऊन आलिंगन।सुरदास ह्मणे हेंचि मागणें।मागुतीं माझे नयन।पहिल्यासारिखे करावे३७म्यां आजन्मपर्यंत कांहीं।विषय पदार्थ देखिला नाहीं।आतां तुझें रूप हृदयीं।सांठविलें गोविंदा ॥३८॥ आतां जरी हे नेत्र नेसी।तरी हेंचि रूप पाहेन मानसीं ।सुरदासाचे वचनासी।हृषीकेशी हांसले।३९।हरिरूप धरूनि मानसीं।निजभक्त राहिला मथुरेसी।पुढें कथा वर्तली कैसी।सज्जनीं श्रवण करावी४०अवंती नगरीं एक।पुण्यपावन राजा भाविक।पांचशत गवई देख ।त्याचे संग्रहीं असती॥४१॥तयांमाजी श्रेष्ठ तानसेन।रागज्ञानीं अतिप्रवीण । दीप विझतां त्याचे गायनें । प्रदीप्त होती तत्काळ ॥ ४२ ॥ राजा ह्मणे तया अवसरा । तुह्मा ऐसा गवई बरा । धुंडोनि पाहतां वसुंधरा। कोणी दुसरा दिसेना ॥ ४३ ॥ ऐकोनि वदे तानसेन । बोलूं नये ऐसें वचन । एकाहून आगळा एक जाण । ईश्वरें निर्माण केला कीं ॥ ४४ ॥ सृष्टिकर्ता मीच जाण । ऐसें बोलिला कमलासन । मग देवें विश्वामित्र निर्मून । पदार्थ संपूर्ण करविले ॥ ४५ ॥ माझेंचि पात्र बहु थोर । ऐसें बोलिला रत्नाकर । देवें अगस्तिहस्तें साचार । आचमन सत्वर करविलें ॥४६॥ माझें गायन सुंदर ह्मणून । नारदासि जाहला अभिमान । श्रीकृष्णें आस्वल पाचारून । करविलें कीर्तन त्याहातीं ॥ ४७ ॥ मजपरीस बलिष्ठ थोर । नसे सृष्टींत वानर । मारुतीस वाटतां साचार । भरतें गर्व हरिला कीं ॥ ४८ ॥ याकरितां कोणाहीकारण । ह्मणों नये थोर सान। तानसेनाचें ऐकोनि वचन । नृपनंदन संतोषला ॥ ४९ ॥ मागुती बोले नृपनाथ । तुह्मांवरिष्ठ गवई प्रस्तुत । कोण आहे सृष्टींत । सांगा त्वरित मजलागीं ॥५०॥ राजासि ह्मणे तानसेन । गवयांमाजी अति प्रवीण । अक्रूराचा अवतार जाण । सुरदास आहे मथुरेसी ॥ ५१ ॥ राजा तयासि पुसे पुढती । सुरदास राणिण्या गातसे किती । त्यानें ओंजळ भरून रेती । भागीरथीची आणिली ॥ ५२ ॥ ह्मणे इतुक्या पाठ त्याला । ऐकोनि राजा चमत्कारला । शिबिका पाठवूनि मथुरेला । सुरदासाला आणिलें ॥ ५३ ॥ बहुत सन्मानेंकरून । राजा



घाली लोटांगण । सुरदास वैष्णव ह्मणोन । कनकासनीं पूजिला॥५४॥सकळ गायक ते वेळीं । येऊनि बैसले सभास्थळीं । तानसेन सुरदासाजवळीं । विनंती करी तेधवां॥५५॥ह्मणे तुमचे मुखींचें कीर्तन । सकळिकी करावें श्रवण । ऐसा हेतु मनीं धरून । स्वामीस रायें पाचारिलें॥५६॥सुरदास ह्मणे तानसेनासी ।आह्मी तरी वैकुंठवासी । येथें आलों मृत्युलोकासी । श्रीहरीचे गुण वर्णावया ॥५७॥ तेंचि आवड तुह्माकारण । तरी किंचित वर्णितों हरीचे गुण । मग वीणा हातीं घेऊन । सप्तस्वरीं बैसाविला।५८।सुरदास करितां गायन । गणेश टाळ वाजवी जाण । सरस्वती वीणा घेऊन ।मंजुळ स्वर देतसे ॥५९॥ तटस्थ जाहले गंधर्व । रंभा उर्वशी मेनका सर्व । त्याच्या कीर्तनीं रमाधव । नृत्य करी स्वानंदें ॥६०॥ योगी बैसले वज्रासनीं । त्यांच्या लवकर नये ध्यानीं । तो सुरदासाचे कीर्तनीं। नाचतो हें नवल कीं।६१।तपश्चर्या करिती मुनी। प्राप्त नव्हे अनुष्ठानीं । तो सुरदासाचे कीर्तनीं । नाचतो हें नवल कीं।६२।इंद्र चंद्र ब्रह्मा हर । हेही नेणती जयाचा पार । तो सुरदासाच्या समोर । नृत्य करी स्वानंदें।६३।ऐसें संगीत करून गायन । मग सावडेनामें करी कीर्तन । कृष्णावतारीं केले सद्गुण । तेंचि निरूपण लाविलें॥६४॥ऐसें एकमासवरी । सुरदास राहिले अवंतीनगरीं । भजनीं लावूनि नरनारी । प्रेमभरें डुल्लती।६५।तंव कोणे एके दिवसीं । राजा गेला निजमंदिरासी । स्त्रिया विनंती करिती त्यासी ।कर जोडोनी तेधवां।६६। ह्मणती सुरदास वैष्णवभक्त । नित्य हरीचे गुण वर्णित । आमुचा ऐसा आहे हेत । त्याचें कीर्तन ऐकावें।६७।ऐकोनि राजा बोले वचन । सुरदास आहे नेत्रहीन । येथें आणावयाकारण । संशय मनीं न धरावा ॥६८॥रायाच्या स्त्रिया पांचशत । नाटकशाळाही बैसल्या समस्त । अनन्यभावें होऊनि विनीत । सुरदासातें पाचारिलें।६९।बैसवूनी कनकासनीं । पूजा केली प्रीतीकरूनी । सुरदासें वीणा घेऊनी । गायन तेव्हां आरंभिलें ॥७०॥ ऐकोनि तटस्थ जाहल्या सुंदरी । तों काय वर्तलें ते अवसरीं । सत्यभामेस कृष्णावतारीं । श्रीकृष्णनाथें शापिलें ॥७१॥ ते सत्राजिताची कन्या सुंदरी । दासी जाहली रायाघरीं । सुरदास जेथें कीर्तन करी । धांवत येतसे त्या ठाया॥७२॥कर्णीं सुंदर ऐकूनि गायन । विसरली ते सकळ देहभान । जेविं नादलुब्ध होऊनि हरिण । होय तल्लीन निजप्रीतीं ॥ ७३ ॥ पाऊल टाकितां ते वेळ । तिजला नाठवे जलस्थल । सुरदासाचे तत्काळ । नेत्र आले ते समयीं ॥ ७४ ॥ तिजला सुरदास ह्मणे पाहें । पुढें हौद भरला आहे । मग लज्जित होऊनि लवलाहें । पडदे टाकिले स्त्रियांनीं ॥ ७५ ॥ ह्मणती नेत्र आहेत यासी । ऐसें बोलती एकमेकींसी । मग संकोचित होऊन मानसीं । लपोनियां बैसल्या ॥७६॥ऐसा एकांत देखोन । तेथें प्रकटले श्रीकृष्ण । सुरदास दासी दोघेजण । आपुले स्वरूपीं मेळविलीं ॥७७॥ पुढिले अध्यायीं कथा अद्भुत । सेनान्हावी वैष्णवभक्त । त्याचें चरित्र प्रेमयुक्त । चतुर परिसोत निजप्रीतीं ॥७८॥ भक्तकथा आवडीं करितां श्रवण । तया तुष्टेल जगज्जीवन । महीपती विनवी कर जोडून । भाविकभक्तांकारणें ॥७९॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । त्रयस्त्रिंशाध्याय रसाळ हा ॥ ८० ॥ अध्याय ३३ ॥ ओंव्या ८० ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय ३३ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीराधाकृष्णाय नमः । सेनान्हावी भक्त थोर । हरिभजनीं अतितत्पर । त्याचें चरित्र अतिप्रियकर । ऐका सादर भाविकहो ॥ १ ॥ संसार जाणूनि नाशवंत । उदासपणें असे विरक्त । श्रीहरिभजनीं अहोरात्र । प्रीति जडली तयाची ॥ २ ॥ श्यामसुंदर विराजमान । चतुर्भुज पीतवसन । मूर्ति गृहीं असे जाण । देदीप्यमान साजिरा ॥ ३ ॥ प्रातःकाळीं करूनि स्नान । आधीं करीत विष्णुपूजन । ऐसा नित्यनेम सारून । संसारधंदा करीतसे ॥ ४ ॥ नापितवृत्ति नीच जाण । त्याहूनि विशेष मुलानपण । जन्म दिधला नारायणें । दोष पदरीं यास्तव ॥ ५ ॥ ग्रामजोशी मुळेपण । त्याहूनि विशेष सोनार जाण । जन्म देत नारायण । पदरीं दोष यास्तव ॥ ६ ॥ चौकीदार कुळकर्ण । त्याहूनि विशेष अंत्यजपण । जन्म दिधला त्यांकारण । दोष पदरीं यास्तव ॥ ७ ॥ मातंग आणि धीवर जाण । ग्रामकंटक करी दंडण । जन्म देत नारायण । दोष पदरीं यास्तव ॥ ८ ॥ खाटिक कसाब चाटेपण । अखंड निर्दय असती पूर्ण । जन्म देत नारायण । पदरीं दोष यास्तव ॥ ९ ॥ धर्मरीती ऐकोनि ऐसी । श्रोतीं राग न धरावा मानसीं । शास्त्रीं दूषिलें कुकर्मासी । शब्द तुह्मासी नसे कीं ॥ १० ॥ अंगीकारितां हे वृत्ती । नकळतां दोष नरासि घडती । ह्मणोनि सज्जनीं ऐकोनि नीती । अनुताप चित्तीं न धरावा ॥ ११ ॥ ऐसे यातींत जन्मला । आणि श्रीहरिभजन न घडे ज्याला । तो भवचक्रांत पडियेला । सुटका त्याजला नसेची ॥ १२ ॥ ऐसें सेनान्हावी जाणोनि । श्रीहरीस गेला शरण । तेव्हांचि त्याचें दोषव्रण । दग्ध जाहलें तत्काळ ॥ १३ ॥ ग्रामींचा वोहोळ होता जाण । गंगेसि मिळतां गंगापण । तैसें श्रीहरीस जातां शरण । दोष संपूर्ण नासती ॥ १४ ॥ जैसें परिसाचे संगतीनें । लोह तत्काळ होय सुवर्ण । तैसें श्रीहरीस जातां शरण । दोष संपूर्ण नासती ॥ १५ ॥ नानाकाष्ठें अग्नींत जाण । टाकितां होती एकवर्ण । तेविं श्रीहरीस जातां शरण । दोष संपूर्ण नासती ॥ १६ ॥ तैसा भलते यातींत जन्मला । आणि अनुतापें हरीस शरण गेला । तो आपुले ऐसाचि केला । जगदुद्धारें तेधवां ॥ १७ ॥ एके दिवसीं न्हावीसेना । भावेंकरूनि बैसला पूजना । तों राजदूत येऊनि जाणा । तत्काळ तया बोलावी ॥ १८ ॥ देवपूजेसि बैसला जाण । कांता सांगे तयालागून । राजयाचा सेवक येऊन । तुह्माकारण पाचारी ॥ १९ ॥ निरोप सांगतसे ते अवसरीं । सांग जाऊन नाहींत घरीं । चारी वेळ तयाचपरी । बोलावणें पातलें ॥ २० ॥ तितुकियांसि सांगे जाणा । ह्मणे घरांत नाहीं सेना । शेजारीं संधि फावली दुर्जना । तेणें जाऊन सांगीतलें ॥ २१ ॥ राजयास सांगे ते वेळां । सेना देवपूजेसि बैसला । ऐकूनि दुर्जनाच्या बोला । क्रोधावला नृपनाथ ॥ २२ ॥ आधींच राजा अविंध दुर्जन । तयासि सांगीतले अवगुण । मर्कटासि मदिरापान । वृश्चिकदंश त्यामाजीं ॥ २३ ॥ मुळींच कांदा दुर्गंध पूर्ण । तयामाजीं मिळाला लसुण । तयापरी ते दुर्जन । एकचित्त जाणिजे ॥ २४ ॥ राजा सांगे भृत्यांसी । बांधोनि आणा तयासी । मोट बांधोनि त्वरेसी । नदीमाजीं टाकारे ॥ २५ ॥ ऐसा विचार होतां जाण । भक्तकैवारी नारायण । सेनियाचें रूप धरून । राजद्वारासी पातला ॥ २६ ॥ जो आदिपुरुष नारायण । क्षीरसागरवासी शेषशयन । तो श्रीहरी धोंक-

टी घेऊन । राजद्वारासी पातला ॥ २७ ॥ ब्रह्मादिदेव ऋषिजन । जयासि ध्याती रात्रदिन । तो सेनान्हावी होऊन । रायापासीं चालिला ॥२८॥ वज्रासनीं बैसोन । योगी करिती अखंड ध्यान । तो सेन्याचें संकट देखोन । नापित होऊन जातसे ॥ २९ ॥ दश इंद्रियें बुद्धि मन । वर्तती जयाचे सत्तेकरून । तो विश्वव्यापक चैतन्यघन । न धरी थोरपण सर्वथा ॥ ३० ॥ किरिट कुंडलें कौस्तुभमणी । काढूनि ठेवी चक्रपाणी । खांद्या धोंकटी लावूनी । त्वरेंकरूनि निघाला ॥ ३१ ॥ वेदशास्त्रें धुंडाळिती । जयाकारणें बहुत कष्टती । तो उभा राहूनि श्रीपती । मुजरा करी रायासी ॥ ३२ ॥ नापितरूप धरिलें हरीनें । त्याचें होतांचि दर्शन । तत्काळ क्रोध गेला जाण । राजयाचा तेधवां ॥३३॥ समोर राजयासि बैसवून । त्याचें श्मश्रुकर्म करून । परमचतुर जगज्जीवन । मस्तक त्याचें चोळीतसे ॥ ३४ ॥ नृपवर ह्मणे तयासी । तुह्मी रहावें आह्मापासीं । सर्व नापितांत तूं चतुर होसी । ऐसें मजला वाटतसे ॥ ३५ ॥ यावरी बोले जगज्जीवन । ब्रह्मांड म्यां व्यापिलें जाण । रिता ठाव मजवांचून । अणुमात्र नसेची ॥ ३६ ॥ येणें जाणें करणें राहणें । माझे अंगीं नसे जाण । करूनि अकर्ता व्यापकपण । सर्वांत असोन निराळा ॥ ३७ ॥ निजभक्तकार्याकारण । क्षणैक रूप धरूनि सगुण । परंतु माझें अव्यक्तपण । न मोडेची सर्वथा ॥३८॥ ऐसें बोलतां शार्ङ्गधर । राजा सुखावला थोर । अभ्यंगाकारणें सत्वर । सुगंध तेल आणविलें ॥ ३९ ॥ मैलागिरीचंदन । त्याचा चौरंग मांडून । त्यावरी राजा बैसला जाण । सेना मर्दन करीतसे ॥ ४० ॥ रत्नजडित प्याला सुंदर । त्यामाजी घातलें मोगरेल । आंत बिंबलें साकार । चतुर्भुज रूपडें ॥ ४१ ॥ मुकुट विराजे देदीप्यमान । पीतांबरधारी घनश्यामवर्ण । राजा ऐसें रूप देखोन । आश्चर्य मनीं करीतसे ॥ ४२ ॥ वरती दृष्टी करून पाहे । तों सेना मर्दन करीत आहे । माघुती प्यालयामध्यें जंव पाहे । तों श्रीकृष्णरूप दिसतसे ॥ ४३ ॥ रूपीं गुंतले लोचन । रायासि नाहीं देहभान । पुरे करावें मर्दन । त्याजकारण कळेना ॥ ४४ ॥ दश इंद्रियें बुद्धि मन । पांगुळस्वरूपीं जाहलीं लीन । देखोनि हांसती सभाजन । रायासि संचार जाहला ॥ ४५ ॥ सेवक ह्मणती तयाकारण । आतां उठावें स्नानालागून । दोनप्रहर आला दिन । सावध होईं नृपनाथा ॥४६॥ राजा ह्मणे सेनियासी । बैस क्षणभरी मजपासीं । जरी तूं जाशील गृहासी । तरि मी प्राण देईन ॥४७॥ तयासि उत्तर देत श्रीहरी । आतां फिरून येतों सत्वरीं । मज तूं हृदयमंदिरीं । कोंडूं नको नृपनाथा ॥ ४८ ॥ राजयानें ते अवसरीं । होन आणिले ओंजळभरी । सेना न्हावियाचे पदरीं । घाली सत्वरी तेधवां ॥ ४९ ॥ त्याचे गृहासी जाऊन हरी । धोंकटी ठेविली खुंटीवरी । होन टाकूनि तयाभीतरीं । अदृश्य जाहला तत्काळ ॥ ५० ॥ असो इकडे राजयानें । लवलाहें करून स्नान । सेवकासि आज्ञा करी आपण । कीं सेनियासि सत्वर पाचारा ॥ ५१ ॥ मज नलगतीरे उपचार । वस्त्रें भूषणें अलंकार । सेनान्हावियासि सत्वर । मजकारणें भेटवा ॥ ५२ ॥ मज नलगोचिरे मिष्टान्न । अबीर वस्त्रें परिमळ सुमनें । सेनिया सत्वर पाचारून । मजकारणें भेटवा ॥ ५३ ॥ जरी तो सत्वर नये जाण । तरी हे जातील माझे प्राण । तो भक्तराज मजकारण । सत्वर आणून भेटवा ॥ ५४ ॥ त्याचें होतांचि दर्शन । माझे चुकेल जन्ममरण । सेनान्हावी वैष्णवजन । मज आणून भेटवा ॥ ५५ ॥ राजा विव्हळ जाहला पूर्ण । घाबरले सेवकजन । मग सेनियाचे गृहासि जाऊन । केलें पाचारण तयासी ॥ ५६ ॥ सेना ह्मणे ते अवसरीं । राजा कोपला मजवरी । धोंकटी घेऊनि खांद्यावरी । राजद्वारीं पातला ॥५७॥ सेनियासि देखतांचि त्वरित । उभा ठाकला नृपनाथ । सभालोक हांसती समस्त । नवल अद्भुत देखोनी ॥ ५८ ॥ राजा ह्मणे तयासी । प्रातःकाळीं तूं आलासी । रूप दाखविलें मजसी । चतुर्भुज होऊनी ॥ ५९ ॥ तैसेंच दाखवीं मजकारण । ह्मणूनि धरिले दोनी चरण । सेनान्हावी ऐकून । विस्मित मनीं जाहला ॥ ६० ॥ तैल आणवोनि प्याल्यांत । सेनियासि पाहावी नृपनाथ । तों चतुर्भुज न दिसे त्यांत । चमत्कार अद्भुत वाटला ॥ ६१ ॥ ह्मणे दीनबंधु पतितपावना । वैकुंठवासिया नारायणा । नीच काम मनमोहना । मजकारणें त्वां केलें ॥ ६२ ॥ अनाथनाथा रुक्मिणीवरा । मदनताता श्यामसुंदरा । नीच काम जगदुद्धारा । सायुज्यउदारा त्वां केलें ॥ ६३ ॥ श्रुतिशास्त्रें वर्णिती गुण । तयासि न कळे तुझें महिमान । नीच कर्म त्वां मजकारण । अंगीकारिलें दयाळा ॥ ६४ ॥ ब्रह्मा इंद्र आणि हर । हे नेणती तुझा पार । आज कां धोंकटी खांद्यावर । मजकारणें घेतली ॥ ६५ ॥ रडतसे आक्रोशेंकरून । गहिंवरें दाटलासे पूर्ण । राजा धांवून धरी चरण । सेनियाचे तेधवां ॥६६॥ ह्मणे तुझ्या संगतीकरून । मज जाहलें कृष्णदर्शन । संतसंगाचें महिमान । काय आतां वर्णावें ॥ ६७ ॥ होतां नारदाचें दर्शन । कोळियानें कथिलें रामायण । ऐसा कृपाळु वैष्णवजन । तारक पूर्ण जडजीवां ॥ ६८ ॥ व्यासकृपा संजयासि जाण । तयासि गीता जाहली श्रवण । तेविं तुझ्यायोगें मजकारण । श्रीकृष्णदर्शन जाहलें कीं ॥ ६९ ॥ धोंकटींत होन टाकिले । सेनियानें ते विलोकिले । तत्काळ ब्राह्मणांसि वांटिले । सकळ लोकां देखतां ॥ ७० ॥ राजयासि अनुताप जाहला । हरिभजनीं तो लागला । सेनान्हावी संतोषला । हरि तुष्टला ह्मणोनियां ॥ ७१ ॥ पुढें रसाळ कथा अलौकिक । जगन्नाथीं राजा सात्विक । त्याचें चरित्र ऐकतां देख । सज्ञान सुख पावती ॥ ७२ ॥ तेंचि निरूपण यथामती । वदवील आतां रुक्मिणीपती । श्रोत्यांसि विनवी महीपती । श्रवणीं प्रीती असों द्या ॥ ७३ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविक भक्त । चतुस्त्रिंशाध्याय रसाळ हा ॥ ७४ ॥ ॥ अध्याय ॥ ३४ ओंव्या ७४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय ३४ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीगोवर्द्धनोद्धारणाय नमः। ऐका श्रोते हो नवल अद्भुत । भक्तकथा सेवितां परमामृत । जिवासि तत्काळ आली प्रचित । भवरोग त्वरित निरसले ॥ १ ॥ जगन्नाथीं राजा एक । नांव तयाचें सात्विक । देवाविण पदार्थ आणिक । त्याचे चित्तासी नावडे ॥२॥ वडयाजगन्नाथ क्षेत्र जाण । मृत्युलोकीं साक्षात वैकुंठभुवन । जेथें बौद्धावतार जगज्जीवन । लीला संपूर्ण पाहातसे ॥ ३ ॥ तो पूर्वसमुद्रीं नृपराज । तयासि सात्विकनाम साजे । जयासि अखंड गरुडध्वज । सुप्रसन्न सर्वदा ॥४॥ त्रिकाळ पूजासमय साधून । राजा तेथें बैसे येऊन । तुळसी प्रसाद घेऊन । त्यावरी भोजन करितसे ॥ ५ ॥ वस्त्रें अलंकार भूषणें । देवासि नैवेद्य पक्वान्नें । आलिया अतीतासि अन्न । राजा आपण देतसे ॥६॥ नंदादीप अन्नछत्र । दान देणें पाहूनि पात्र । अन्न उदक तो सर्वत्र । प्राणिमात्रीं देतसे ॥ ७ ॥ तंव कोणे एके अवसरीं । राजा बैसला महाद्वारीं । काळ क्रमावया सत्वरी । द्यूतकर्म खेळतसे ॥ ८ ॥ फांसे टाकितां हास्य करी । देहभान नाहीं अंतरीं । तंव प्रसाद वांटीत महाद्वारीं । सत्वर पुजारी पातले ॥ ९ ॥ प्रसाद घ्यावयासि नृपनाथ । पुढें करी डावा हात । पुजारियासि विपरीत । वाटलें निश्चित तेधवां ॥१०॥ वामहस्तें घेतो ह्मणोन । पुजारी गेला परतोन । द्यूत सरतां राजा आपण । प्रसाद लोकांसी पुसतसे॥११॥ते ह्मणती सर्वांचि वांटिला । तुह्मीं वामहस्त पुढें केला । पुजारी न देतां परतोनि गेला । ऐकोनि दचकला नृपनाथ ॥ १२ ॥ माझें पूर्वकर्म विपरीत जाण । पुढें द्यूतरूपें ठाकलें येऊन । अमृत टाकूनि मद्यपान । केलें मजला वाटतसे ॥१३॥ कीं सिंदीसि घालूनियां पाणी । कल्पतरूस दवडिला सुकवूनी । द्यूत खेळतां तैसी करणी । जाहली मजला वाटतें ॥ १४ ॥ नातरीं कोळसे वेंचितां जाण । निधान गेलें हरपोन । द्यूत खेळतां मजकारण । तैसेंच जाहलें वाटतसे ॥१५॥ कीं राख घेतीं वोंजळभरी । तों उडोनि गेली कस्तूरी । द्यूत खेळतां तैसी परी । जाहली मजला वाटतें ॥ १६ ॥ राजहंस दवडोनि काग पाळिला । चंदन तोडोनि हिंगण लाविला । द्यूत खेळतां मजला । तैसें जाहलें वाटतें ॥१७॥ नातरी मातंग पाहतां जाण । तों विप्र गेला उठोन । द्यूत खेळतां तैसें कारण । जाहलें मज वाटतें ॥ १८ ॥ राजा अनुतापला भारी । न जाय राउळाभीतरीं । सेवाचोर ह्मणोनि द्वारीं । उगा तिष्ठत बैसला ॥ १९ ॥ ह्मणे स्वकरें म्यां केला अन्याय बहुत । यासि शिक्षा करावी त्वरित । ऐसें ह्मणोनि नृपनाथें। अंतरीं युक्ति योजिली २० मग बोलावूनि प्रधानासी । विचार सांगे तयासी । मी रात्रीं निजतों मंदिरासी । पिशाच तेथें येतसे ॥२१॥ हात घाली गवाक्षद्वारीं । मजला भय वाटतें भारी । तरी तूं राहूनि मंचकाशेजारीं । हस्त छेदीं तयाचा ॥ २२॥ प्रधान ह्मणे आज्ञा प्रमाण । पिशाच येतां हस्त छेदीन । मग तीक्ष्ण शस्त्र करीं घेऊन । रात्रीं लपोन बैसला ॥२३॥ दीपक जळती मंदिरांत । प्रधान जागृत वाट पाहात । कीं पिशाच आलिया त्वरित । हस्त निश्चित छेदीन ॥ २४ ॥ तंव आपुला हस्त ते अवसरीं । राजा घाली गवाक्षद्वारीं । प्रधानें शस्त्र घेऊनि करीं । तोडून झडकरी टाकिला ॥ २५ ॥ हस्त खालीं पडतांच जाण । प्रधान ओळखी आपण । गहिंवरें दाटला पूर्ण । अंग धरणीं टाकिलें ।२६। अट्टहास्यें शोक करी । तों राजा पातला भीत-

रीं । ह्मणे माझा होता वैरी । ह्मणोनि म्यां हा तोडविला ॥२७॥ तुझें स्वस्थ असों दे चित्त । मग शिबिकेंत घालोनि ह-
स्त । दूतांहातीं पाठवित । महाद्वारीं तेधवां ॥२८॥ ह्मणे महाद्वारीं जाऊनि आतां । निरोप सांगा जगन्नाथा । माझिया
अपराधांची गणिता । रुक्मिणीकांता ऐक तूं ॥ २९ ॥ फांसे खेळतां दुर्बुद्धी । तुझा प्रसाद नवे कधीं । ऐसा तुमचा जो
अपराधी । तुह्माजवळी पाठविला ॥३०॥ कर्मेंद्रियांत केवळ । मज अपराधी भासला कर । शिक्षा करूनि सत्वर । तु-
ह्माजवळी पाठविला ॥ ३१ ॥ अपराधी नसतां भलत्यास मारी । केली असेल कधीं तुमची चोरी । मग दंड करोनि ह्म-
डकरी । तुह्माजवळी पाठविला ॥ ३२ ॥ मदोन्मत्त हा वनामधीं । खेळला असेल कधीं पारधी । ऐसा तुमचा अपराधी।
तुह्माजवळी पाठविला ॥ ३३ ॥ नाहीं केलें तुझें अर्चन । बहुहिंसक खळ दुर्जन । पैसा हा दुराचारी परिपूर्ण । तूं पुरुषो-
त्तमा जाणसी ॥ ३४ ॥ नाहीं केली संतसेवा । अर्चिलें नाहीं तुज केशवा । ऐसा जो पापी हस्त बरवा । तुह्माजवळी पा-
ठविला ॥ ३५ ॥ कळेल तैसी यास आतां । शिक्षा करावी जगन्नाथा । ऐसा निरोप सांगोनि दूतां । देवद्वारीं पाठविलें
॥ ३६ ॥ मग महाद्वारीं हस्त नेऊन । देवास सांगती वर्तमान । जयजयकारें बुका सुमनें । वैष्णव त्यावरी उधळिती ३७
ह्मणती धन्य हा नृपनाथ । प्रपंचीं असूनियां विरक्त । देवावरी घालोनियां निमित्त । टाकिला हस्त तोडोनी ॥ ३८ ॥
येरवीं नाशवंत शरीर । असंख्य मिळती नारीनर । परी चित्तीं धरूनि जानकीवर । सार्थक साचार न करिती ॥ ३९ ॥
करावया शिश्नोदर पोषण । देश फिरती बहुत जन । भलते निमित्तें वेंचिती प्राण । परी ईश्वरभजनीं नमरती॥४०॥ न-
वज्वर होतांचि अंगीं । चवदा लंघनें करिती रोगी । परी एकादशीव्रत अभागी । सुकृत जगीं न करिती ॥ ४१ ॥ व्यव-
हारांत कवडी हारपतां जाण । सुहृद सखे करिती भांडण । परी निर्लज्ज होऊनि हरीचे गुण । प्राक्तनहीन न गाती ।४२।
तस्करें हिरूनि नेतां संपत्ती । हात चोळोनि उगेच राहाती । परी सत्पात्रीं वेंचोनि कुमती । सार्थक न करिती सर्वथा
॥ ४३ ॥ हा कलीचा धर्म साचार । मायालोभी असती फार । निष्ठावंत सात्विक नृपवर । कळलें साचार आह्मासी ४४
ऐसें संत वैष्णवजन । एकमेकांस बोलती वचन । तों अद्भुत वर्तलें जाण । तें परिसा सज्जन निजप्रीतीं ४५ राजयानें हस्त
तोडिला । त्याचा अकस्मात दवणा जाहला । पुष्पवाटिकेंत लाविला । नेऊनियां तत्काळ ४६ मग हरिप्रसाद घेऊन ।
पुजारी देत प्रीतींकरून । राजयास नाहीं देहभान । थोंटाच हात वोढविला ॥ ४७ ॥ पुढें करितांचि सत्वर । पहिले सा-
रिखा जाहला कर । भक्त गर्जती जयजयकारें । आश्चर्य थोर करोनी ॥ ४८ ॥ आणिक ऐका भाविकजन । कथा रसा-
ळ निरूपण । श्रवणीं पडतां त्रितापहरण । संशयखंडन होतसे ॥ ४९ ॥ जे जगन्नाथीं भगवान । बौद्धरूपें नांदती जाण ।
अखंड वसती भक्तजन । महाक्षेत्र ह्मणोनी ॥ ५० ॥ ब्राह्मणस्त्री कर्माबाई । तिचें चित्त हरीचे पायीं । ती गरोदर असतां
पाहीं । भ्रतार शांत जाहला ॥५१॥ शोक करीत अपार । कष्टी होतसे थोरथोर । तंव पुत्र जाहला सत्वर । नवमास भ-
रतांची ॥ ५२ ॥ ह्मणे देवाधिदेवा जगन्नाथा । तुझा भक्त तूं वांचवीं आतां । पुत्र दिवसेंदिवस वाढतां । केलें लग्न तयाचें

॥ ५३ ॥ तयाची स्त्री गरोदर जाहली । कर्माबाई संतोषली । नातू होतांचि ते वेळीं । पुत्र गेला मरूनी ॥ ५४ ॥ रात्रदिव-
स शोक करी । सवेंचि मनासि आवरी । ह्मणे एवढा झील वांचेल जरी । तरी कामा येईल मजलागीं ॥ ५५ ॥ त्याचा
सांभाळ रात्रदिवस । कर्माबाई करी विशेष । आसनीं शयनीं भोजनीं त्यास । पुत्रबाळकास विसंबेना ॥५६॥ ऐसे लो-
टतां बहुत दिवस । काळें नेलें त्या मुलास । कर्माबाईचे चित्तास । स्वस्थ कोठें वाटेना ॥ ५७ ॥ रात्रदिवस शोक करी ।
ह्मणे कृपावंता श्रीहरी । दुःखरूप या संसारीं । मज कासया घातलें ॥ ५८ ॥ तंव अकस्मात साधुसंत । जगन्नाथीं या-
त्रेसि येत । कर्माबाईच्या मंदिरांत । बिऱ्हाड तयांनीं घेतलें ॥ ५९ ॥ चिंताक्रांत ते देखोन । संतीं पुसिलें वर्तमान । जा-
हलें तैसेंच निवेदन । कर्माबाई करीतसे ॥ ६० ॥ वैष्णव ह्मणती ते समयीं । दुःखरूप संसार पाहीं । येथें अणुमात्र सौख्य
नाहीं । निश्चयेंसी जाणिजे ॥ ६१ ॥ ढेंकुणाचे बाजेवरी । निद्रा निवांत लागेल जरी । तरीच सौख्य या संसारीं । स्वप्न
दृष्टीं देखिजे ॥६२॥ कीं मृगजळाचिये पुरीं । तृषाक्रांत निवेल जरी । तरीच सौख्य या संसारीं । स्वप्न दृष्टीं देखिजे ६३
नातरी विष प्राशितां उदरीं । आयुष्यहीन वांचेल जरी । तरीच सौख्य या संसारीं । स्वप्न दृष्टीं देखिजे ॥ ६४ ॥ कीं ब-
धिरासि सांगतां कथानक । सौख्य पावेल पुराणिक । तरीच संसारीं अक्षय सुख । स्वप्न दृष्टीं देखिजे ॥६५॥ आतां सा-
वध होईं त्वरित । संसार अवघा नाशवंत । ऐसें बोलतां वैष्णवभक्त । द्रवलें चित्त तियेचें ॥ ६६ ॥ कर्माबाई ह्मणे साधु-
संतां । सांगाल तैसें ऐकेन आतां । मग ते ह्मणती जगन्नाथा । रात्रदिवस भजावें ॥ ६७ ॥ अधिकार तैसा उपदेश । साधु
सांगती जनास । उद्धरावया पतितांस । मृत्युलोकीं अवतरले ॥ ६८ ॥ श्रीहरीचें गुणकीर्तन । जनासि करावया श्र-
वण । प्रेमसुख द्यावयाकारण । मृत्युलोकीं अवतरले ॥६९॥ जड मूढ जे अज्ञान । त्यांसि सांगावें दिव्यज्ञान । झाडाव-
या दुर्जनांचा मान । आले सज्जन मृत्युलोकीं ॥ ७० ॥ भक्तिमार्ग होईल मलिन । प्रपंचीं बुडेल अवघा जन । यास्तव
कलियुगीं वैष्णवजन । मृत्युलोकीं अवतरले ॥ ७१ ॥ असो आतां कर्माबाई । लागली संतांचिया पायीं । गोपाळमूर्ति
काढूनि तींहीं । तिजकारणें दीधली ॥ ७२ ॥ वैष्णव ह्मणती ते समयीं । याची सेवा करीत जायी । जेविं आवडी पुत्रा
ठायीं । तैसीच येथें असोंदे ॥ ७३ ॥ ऐसें सांगूनि तियेसी । साधु गेले तीर्थवासी । कर्माबाईच्या चित्तासी । सुख बहुत
वाटलें ॥ ७४ ॥ खेळवीत होती नातवंड । तैसेंचि देवाचें लागलें वेड । देखतां घेऊनि इडपीड । करितसे कोड निजप्री-
तीं ॥ ७५ ॥ उष्णोदक घेऊनि त्वरेंसीं । पायांवरी न्हाणी बाळका ऐसी । पालखांत निजवूनि देवासी । मोहें तयासी हा-
लवी ॥ ७६ ॥ वस्त्रें भूषणें तयाप्रती । लेववीत असे निजप्रीतीं । अन्य पदार्थ कांहीं चित्तीं । कृष्णमूर्तीविण नावडे ॥७७॥
दहींभात घालोनि ताटीं । गोपाळमूर्तीसी सांगे गोष्टी । जेवीं जेवीं बा जगजेठी । क्षुधित पोटीं जाहलासी ॥७८॥ भ-
क्तिभाव देखोनि हरी । जेवूं लागला तिचे घरीं । तों अग्निहोत्री ब्राह्मण द्वारीं । येऊनि सत्वरीं उतरले ॥७९॥ प्रातःका-
ळीं उठोन । देवासि घालितां भोजन । द्विजवर करिती तिजला प्रश्न । वर्तमान सांगतसे ॥ ८० ॥ ब्राह्मण ह्मणती ऐक

वचन । कर्माबाई चित्त देऊन । स्नान करूनियां जाण । श्रीकृष्णपूजन करावें ॥ ८१ ॥ ओंवाळियानें नैवेद्य दाविसी । तो कदा न माने देवासी । ऐकूनि उत्तर बोले तयांसी । आतां ऐसें करीन ॥ ८२ ॥ दुसरे दिवशीं उठोनि जाण । सडासंमार्जन करून । उदक अनसुट आणोन । स्वयंपाकासी निघाली ॥ ८३ ॥ उशीर जाहला कर्म सारितां । क्षुधा लागली जगन्नाथा । स्वप्नीं जाऊनि एकांतां । पुजाऱ्यासी सांगीतलें ॥८४॥कर्माबाईचिये घरीं । कर्मठ ब्राह्मण उतरले द्वारीं । विकल्प घालोनि अंतरीं । आपण गेले सत्वर ॥८५॥ सोंवळें सांगीतलें फार । नैवेद्यासि होतो उशीर । तुह्मी जाऊनि सत्वर । तिजकारणें सांगिजे ॥ ८६ ॥ परमात्मा शुद्धचैतन्य । मायातीत आत्माराम । त्यासि कर्माचें बंधन । कदाकाळीं बाधेना॥८७॥करूनि अकर्ता साक्षिभूत जाण । अवतार धरी भक्तांकारण । त्यासि कर्माचें बंधन । कदाकाळीं बाधेना८८ विश्वव्यापक जगज्जीवन । उपदेशितां सिद्धांतज्ञान । त्यासि कर्माचें बंधन । कदाकाळीं बाधेना ॥ ८९ ॥ पुजारी जाऊन सांगती तिजला । कर्माबाईनें नैवेद्य आणिला । सर्वां देखतां हरि जेविला । तिच्या हस्तेंकरूनी ॥ ९० ॥ जयजयकारें पिटिली टाळी । आनंदली भक्तमंडळी । सोंवळे ब्राह्मण ते वेळीं । नवल करिती देखोनी॥९१॥ह्मणती अग्निहोत्रादि यज्ञ याग । तेथें नये हा श्रीरंग । तो कर्माबाईचिया संगें । जेवितो हें नवल कीं ॥९२॥ ब्रह्मादिशंकर जयातें । अखंड ध्याती हृदयांत । तो कर्माबाईचिया हातें । जेवितो हें नवल कीं ॥९३॥ नानायोग नानामतें । अखंड धुंडिती जयातें । तो कर्माबाईचिया हस्तें । जेविला हें नवल कीं ॥९४॥एक ह्मणती भक्तमहिमान । वर्णूं न शके चतुरानन । कर्माबाईचे वंदिती चरण । सकळ जन तेधवां।९५।अद्यापि जगन्नाथ क्षेत्रांत । साक्ष चालवी जगन्नाथ । कर्माबाईची खिचडी येत । मग नैवेद्य त्वरित दाखविती ॥९६॥ पुढें सुरस निरूपण । जनजसवंत भक्त जाण । महीपती ह्मणे अवधान । द्यावें सज्जनीं निजप्रीतीं ॥९७॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । पंचत्रिंशाध्याय रसाळ हा ॥ ९८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ३५ ॥ ओंव्या ९८ ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीगोपालकृष्णाय नमः । आजिचा दिवस सुमंगल।जे सज्ञान श्रोते पातले प्रेमळ । तेणें सर्व कामना होऊन सफळ । कथा रसाळ चालली।१।जनजसवंत सावकार । राम-उपासक भक्त थोर । त्याचें चरित्र अतिप्रियकर । ऐका चतुर भाविक हो ॥२॥ पांच पुत्र लक्षपती । घरीं भरल्या सर्व संपत्ती । परि तो श्रीरामभजन प्रीतीं । अहोरातीं करीतसे।३। आल्या अतीता देतसे अन्न । साधुजनाचा करी सन्मान । सुखी करी याचकजन । विमुख न होय कोणासी ४ धर्मवासना असे फार । तंव तयाचे पुत्र झाले थोर । परमदुष्ट दुराचार । हरिभजनीं विमुख जे ॥ ५ ॥ जेविं पुलस्त्याच्या वंशीं जाण । विष्णुद्रोही जन्मला रावण । कीं सोमवंशीं दुर्योधन । अति अवगुण त्यामाजी ॥ ६ ॥ तेविं जनजसवंताचे पोटीं भले । अभक्त दुराचारी जन्मले । उचितानुचित त्यांस न कळे । पापिष्ट खल अतिनिंदक ॥ ७ ॥ धर्म करितां नावडे त्यांसी । ह्मणती वेड लागलें वृद्धासी । आतां काय करावें यासी । विचार तयांसी पडियेला॥८॥सुखाचे सांगाती अवघे जन । अंतीं देताति अव्हेरून । यालागीं चित्तीं सावधान । सर्वकाळ असावें । ९ । जिह्वा आहे सावधान । तों वर्णावे श्रीहरीचे गुण । हस्त असतां विष्णुपूजन । निजनिष्ठेनें करावें ॥१०॥पाय असतां हरिरंगणीं । नृत्य करावें निर्लज्ज होऊनी । कर्ण असतां आवडीकरूनी । भक्तचरित्रें ऐकावीं ।११। शरीरीं शक्ति आहे फार । तंव यात्रेसि जावें वारंवार । नेत्र असतां रुक्मिणीवर । आवडीकरून पाहावा ॥ १२ ॥ असो जनजसवंत जनीं । यापरी सावध होऊनी । धर्म करितां पुत्र कामिनी । त्यांचिया मनीं नावडे ॥१३॥ ह्मणती हा आमुचा वैरी । येणें बुडविली सावकारी । मग कांहीं धन ते अवसरीं । चोरूनियां ठेविलें ॥१४॥ दुर्जनासि नावडे सज्जन । चोरासि नावडे चांदणें । पतिव्रतेची कीर्ति ऐकून । व्यभिचारिणी जाजावे ॥ १५ ॥ कीं सूर्योदय होतांचि जाण । उलूकासि वाटे आलें मरण । कीं सज्ञान पंडित देखोन । मूर्खासि कष्ट वाटती ॥१६॥ नातरी साधुजन देखोनि दृष्टीं । निंदक होती परम कष्टी । कीं नपुंसकाचे दृष्टीं । प्रतापी शूर नावडे ॥१७॥ ब्राह्मण देखोनि कर्मनिष्ठ । भ्रष्टांसि होती फार कष्ट । जनजसवंताचे पुत्र नष्ट । नानापरी जल्पती ॥१८॥ ह्मणती जाऊनि राजद्वारासी । वर्तमान सांगावें तयासी । मारूनि टाकावें पितयासी । विचार मानसीं दृढ केला ।१९। मग राजद्वारासी चौघेजण । जाऊन सांगती गाऱ्हाणें । ह्मणती आमुचा पिता मूर्ख पूर्ण । वांटितो धन स्वइच्छें ॥२०॥ आमुचे पदरीं द्रव्य असतां । तें तुझेंच आहे नृपनाथा । कार्यास येईल संकट पडतां । यांत अन्यथा असेना । २१ । तरी बोलावूनि तयाप्रती । शिक्षा करावी भूपती । ऐकोनि दुर्जनांची कुमती । अधम चित्तीं संतापला।२२।अविवेकी राजा पूर्ण । ऐकोनियां तयांचें वचन । विचार न करितांचि त्यानें । जनजसवंतासी पाचारिलें॥२३॥अविवेकी राजा प्रधान खळ । जेथें न दिसे नदीचें जळ । भाविक लोक नसतां प्रेमळ । तेथून तत्काळ निघावें।२४। भले आणि साधुजन । जेथें नसे हरिकीर्तन । आत्मचर्चा पुराणश्रवण । नसतां तेथून निघावें२५जेथें सत्कर्मीं नाहीं प्रीती । नृपवर न पाहे न्यायनीती।अधर्मीं रूढ जाहली प्रवृत्ती। त्याचे संगतीं न बैसावें ।२६। बागाईत सावकार। जेथें नसे विवेकी नर । तेथें भल्यानें क्षणभर । राहूं नये सर्वथा ॥२७॥रा-

जा ह्मणे जनजसवंतासी । ऐसा उन्मत्त कां जाहलासी । द्रव्यें याचकां वांटितोसी । आपुले पुत्रांसी नकळतां ।२८।जन-
जसवंत तयासि उत्तर देत । मी तरी ऐसाचि आहें उन्मत्त । श्रीरामभजनीं धरूनि प्रीत । साधुसंत पूजितसें ॥२९॥ ऐसें ऐ-
कोनियां वचन। राजा जाहला क्रोधायमान । जैसा रांवा बोलतां पिंजऱ्यांतून । ससाणा मनीं संतापे॥३०॥ मग जनज-
सवंताचे पुत्रांकारण । दुराचारी बोलिला वचन । मी जीवें मारितों याजकारण । तुमचे मतेंकरूनी ॥३१॥ पुत्र ह्मणती ते
अवसरीं । पिता नव्हे हा आमचा वैरी । याची मोट बांधूनि सत्वरीं । टाका लवकरी उदकांत ।३२। जनजसवंताची मोट
बांधून । त्यामाजी घातले पाषाण । पुढें हौद भरला जीवनें । तयामाजी टाकिला । ३३ । संकट पडतां जानकीवर । भक्त-
कार्या पातला सत्वर । कांसवरूप धरूनि रमावरें । पाठीवर धरियेलें।३४।जनजसवंत ह्मणे रायासी । मजला रक्षिता हृ-
षीकेशी । स्तंभाविण आकाशासी । जेणें उचलोनि धरियेलें ।३५। रविचंद्रासि दिधली दीप्ती । जयाचे तेजें ते शाहाटती।
तो विश्वव्यापक जगत्पती । संरक्षिता भक्तांसी । ३६ । रामावतारीं जेणें । उदकीं तारिले पाषाण । तो जानकीजीवन र-
घुनंदन । संरक्षिता आह्मासी । ३७ । कूर्मरूप धरून तेणें । जनजसवंतासी उचलून । अंतराळीं धरिलें जाण । प्रत्यक्ष
पाहें आतां तूं ॥ ३८ ॥ ऐसें वचन ऐकोनी । राजा अनुतापलासे मनीं । उदकांत उडी टाकूनी । जनजसवंतासी का-
ढिलें।३९।आपले हातें मोट सोडून । जनजसवंताचे धरिले चरण । ह्मणे माझा अपराध जाहला जाण । क्षमा करीं भक्त-
राया ।४०। शिक्षा करूनियां पुत्रांसी । ह्मणे शरण जावें पितयासी । त्यांहीं उत्तर धरूनि मानसीं । लोटांगण घातलें।४१।
दुर्बुद्धि टाकोनियां जीवें । पित्यासि पूजिती निजभावें ।श्रीरामभजनीं लागले सर्वे । निजभक्तलाघव देखोनी।४२।आ-
णिक ऐका श्रोतेजन । दुसरा सुरदासमदनमोहन । त्याचें चरित्र अतिपावन । रसाळ गहन अवधारा ।४३। अकुबर राजा
हस्तनापुरीं । त्याजपाशीं करीत होता चाकरी । तो मथुरादेशींचा अधिकारी । केला सत्वर नृपनाथें ।४४। मथुरा गोकु-
ळ वृंदावन । पुण्यक्षेत्रें हीं पुरातन । जेथें श्रीकृष्णें अवतार धरून । लीला संपूर्ण दाखविली ।४५। ह्मणोनि भक्त वैष्णव पु-
ण्यवंत । बैरागी बहुत नांदती तेथ । संसारीं होऊनि विरक्त । भजनीं त्वरित लागले । ४६ । वैष्णवांसि देतां वस्त्र अन्न । तृप्त
होतसे जगज्जीवन । जेविं मातेचे डोहळे पुरतां जाण । गर्भ संपूर्ण तृप्त होय ।४७। कीं पुत्राचा विजय ऐकोनि कानीं । पि-
ता सुखावे आपुले मनीं । तेविं निजभक्तांसि पूजितां कोणी । चक्रपाणी संतोषे ।४८।कीं मूळासि जीवन घालितां प्रीतीं ।
शाखा अवघ्याच टवटविती। तेविं निजभक्तांसि पुजितां प्रीतीं। वैकुंठपती उल्हासे।४९कीं बाळका लेववितां अलंका-
र । जननीस कौतुक वाटे थोर । तेविं वैष्णव पूजितां निरंतर । शार्ङ्गधर उल्हासे ।५०। ऐसें जाणोनि सुरदास । भजों ला-
गला वैष्णवांस । पक्वान्नें करूनि सुरस। जेववी संतांस निजप्रीतीं।५१।मेवामिठाई दूध पेढे । खाज्या करंज्या साखरमांडे।
यांचे सत्वर भरूनि गाडे । संतांकडे पाठवीतसे ।५२। ऐसें सत्पात्रीं द्रव्य वेंचितां । संतोष वाटला रुक्मिणीकांता । ह्मणे
सुरदास प्रपंचीं असतां । भजतो ममभक्तां निजप्रीतीं ।५३। ऐसा वैष्णवीं धरितां भाव । पदरींचें द्रव्य वेंचलें सर्व । सुर-



दासमानस चिंतार्णवीं । निमग्न जाहलें तेधवां ॥ ५४ ॥ ह्मणे पदरींचें वेंचून गेलें धन । आतां संतसेवेसी पडों पाहे उणें ।
वैष्णवांसि न घालितां मिष्टान्न । मग संसारीं वांचणें कासया ।५५। मग विचार करी मानसीं । ह्मणे राजद्रव्य आहे मज-
पासीं । तें वेंचोनियां सद्भावेंसी।भोजन संतांसी घालावें।५६।राजा कोपूनियां मजवरी । जीवेंच मारूनि टाकील जरी ।
तरी सार्थक होईल या संसारीं ।विचार अंतरीं दृढ केला ।५७। वैष्णवसेवेसि लागतां जाण । जरी वेंचले माझे प्राण । तरी
भवरोग अतिदारुण । दूर होईल तत्काळ५८ऐसा करूनियां विचार । फोडिलें राजद्रव्य भांडार।वैष्णव सेवेसि अति तत्प-
र । निश्चय थोर धरियेला।५९।नानापरीचीं पक्वान्नें । करून घाली संतांसि भोजन । मथुरा गोकुळवृंदावन । ते स्थळीं सं-
तजन तृप्त केले।६०।वस्त्रें भूषणें देवतार्चन । करूनि देत संतांकारण । धर्मशाळा बहुत बांधून । सकळांकारण दीधल्या ६१
ऐंशीं लक्ष दहासहस्र वरी । द्रव्य वेंचिलें ते अवसरीं । त्याचा दिवाण होता दुराचारी । तो देखोनि अंतरीं क्रोधावला।६२।
मग हस्तनापुरासि जाऊन । रायासि सांगीतलें वर्तमान । ह्मणे सुरदास मदनमोहन। मथुराप्रांतीं ठेविला।६३।तेणें तुमचें
द्रव्य समस्त । व्यर्थ वेंचिलें अनुचित । अकबरें ऐकोनि ऐसी मात । क्रोधयुक्त जाहला ६४जैसें यज्ञांत घृत पडिलें । अज्ञान
ह्मणती वायां गेलें । नातरी तुळसीस जीवन घातलें । मूर्खांसि भासलें व्यर्थची।६५।कीं याचकांसि करितां अन्नदान ।कृ-
पणासि वाटे नागवण । कीं तापसी हिंडतां तीर्थाटन । विलासि भ्रमण मानिती॥६६॥नातरी विप्र पवमान पढतां अखंड ।
अविंधासि वाटे बडबड । कीं निजभक्त भजनीं धरितां चाड । निंदकां वेड भासतसे।६७तैसें वै भ[illegible]ांसाठीं द्रव्य वेंचिलें ।
दुर्बुद्धी ह्मणे व्यर्थ गेलें । राजयासि सांगतां ते वेळे । क्रोधें मन खवळलें त्याचें ६८ मग दूत पाठ[illegible] नृपनाथ । सुरदासासी
बोलावी निश्चित । ह्मणे मथुराप्रांतींचें द्रव्य समस्त । यावें त्वरित घेऊनी ६९पत्र लिहून ऐशा रीतीं।तत्काळ पाठवी दूतां-
हातीं । ह्मणे ऐंशीं लक्ष दहासहस्र गणती । द्रव्य त्याप्रती मागावें७०मग सुरदासाचे वाड्यांत । राजदूत आले अकस्मात ।
मंदिर वेढोनि सभोंवतें । क्रोधयुक्त बोलती ७१ ह्मणती लोटले दोन संवत्सर । परी त्वां आणिला नाहीं करभार । ह्मणोनि
क्रोधावला अकबर । तुह्मास हुजूर बोलाविलें । ७२ । जितुका देश तुमचे स्वाधीन । तें द्रव्य सत्वर चला घेऊन । नाहीं
तरी राजाज्ञेंकरून । नेऊं बांधोन तुजप्रती ॥ ७३॥ मग सुरदास बोले प्रत्युत्तर । ह्मणे व्यर्थचि कोपला नृपवर । म्यां द्रव्य
उकलूनि सत्वर । घेतलें जोहार अमोलिक।७४।तें दाखवितां रायाकारणें । संतुष्ट होईल निजमनें । परीक्षक मोल करि-
तां जाणें । तरी दुप्पट गुणें होईल।७५।ऐसें सांग[illegible]नि तयांप्रती ।सदनांत गेला एकांतीं।दोन संदुका कांतेहातीं । सत्वरगतीं
आणविल्या ।७६। गारा भरूनि तयाआंत।राजयासि पत्र लिहिलें त्वरित । ह्मणे साधुसंतीं द्रव्य समस्त । वेंचिलें सत्य नृ-
पनाथा ।७७। ऐंशीं लक्ष दहासहस्र वरी । द्रव्य वेंचूनि सत्पात्रीं । सुरदास पळाले अर्धरात्रीं । ऐसें पत्रीं लिहिलें पैं।७८। सं-
दुकांत पत्र घालूनि सत्वरीं । कुलुपें ठोकिलीं ते अवसरीं। आपुले नांवाची मोहोर वरी । केली झडकरी ते समयीं।७९।रा-
जदूत द्वारीं बैसले देखा । त्यांजवळी नेऊन दिधल्या संदुका । ह्मणे अमूल्य वस्तु घेऊनि अनेका । ठेविल्या होत्या मंदिरीं

।८०। राजदर्शनासि यावें त्वरित । हें आमच्या होतें मनांत । ऐसी ऐकूनि सुरदासाची मात । संतोष चित्तीं तयांचे । ८१ । ह्मणती तुह्मी सज्ञान नर । स्वामिकार्यासि अति तत्पर । ऐसें असतां साचार । व्यर्थचि नृपवर कोपला ।८२। नानापरीचीं पक्वान्नें करून । सुरदासें दूतांस घातलें भोजन । सकळांसि वस्त्रें भूषणें देऊन । संतुष्टमन ते केले ।८३। निद्रा करवूनि तयांप्रती । सुरदास पळाले अर्धरात्रीं । अरण्यांत जाऊन सत्वरगतीं । भजन प्रीतीं करीतसे ।८४। सरूनि गेली सकळ यामिनी । तों उदयासि आला वासरमणी । राजदूत सत्वर उठोनी । सुरदास नयनीं विलोकिती ।८५। तंव तो न दिसे मंदिरांत । धुंडोनि पाहती नगरांत । ग्रामप्रदेशीं अरण्यांत । पाहाती समस्त लगबगें ।८६। ह्मणती राजयाच्या भयेंकरूनी । सुरदास पळून गेला तीर्थाटनीं । आतां नृपवर वृत्तांत ऐकोनी । आपणालागोनी दंडील ।८७। यापरी भय पावूनि मनीं । सर्वेची करिती समाधानी । ह्मणती जोहराची संदूक भरूनी । आपणापाशीं ठेविली ।८८। ते राजयासि दाखवितां सत्वरीं । कदापि न कोपे आपणावरी । ऐसें ह्मणोनी ते अवसरीं । हस्तानापुरीं चालिले ।८९। जाऊनि अकबर राजाजवळी । वृत्तांत निवेदन केला सकळीं । संदूक काढूनि तत्काळीं । दिधली ते वेळीं नृपनाथा ।९०। ह्मणती धराधीशा ऐक वचन । सुरदास परम विचक्षण । तेणें अमूल्य जोहार घेऊन । ठेविलें होतें निजमंदिरीं ।९१। परी दुर्बुद्धीची ऐकूनि मात । तलफ केली त्यासि त्वरित । तो निर्भय असोनि मनांत । होता येत दर्शना ।९२। परंतु आह्मी जाऊनि बैसलों निकटीं । भय उपजलें त्याचे पोटीं । मग जोहार दाखवूनि उठाउठीं । आपण शेवटीं पळाला । ९३ । ऐसीं दूतवचनें ऐकोनी । अकबर विस्मित जाहला मनीं । मग बिरबलासि बोलावूनी । वृत्तांत त्यासी सांगीतला ।९४। संदूक घेऊनि ते अवसरां । कुलूप काढोनि पाहती सत्वरा । जोहार पाहतां निघाल्या गारा । दूत थरथरां कांपती ।९५। तों पत्र देखिलें तयाआंत । वाचितां लोक ऐकती समस्त । राजा सादर देऊनि चित्त । ऐके प्रीतींकरूनी ।९६। ऐशीं लक्ष दाहासहस्र गणती । द्रव्य वेंचिलें साधुसंतीं । मग सुरदास भय पावूनि चित्तीं । अर्धरातीं पळाला ।९७। पत्र वाचितां त्या अवसरा । आश्चर्य वाटलें नृपवरा । चाहाडासि बोलावूनि सत्वरा । ह्मणे असत्य बरा बोलिलासी ।९८। सुरदासें सत्पात्रीं द्रव्य वेंचिलें । तूं आह्मासि सांगसी वायां दवडिलें । वैष्णवद्वेषी आहेसि कळलें । आतां तुज दंडिलें पाहिजे ।९९। शिक्षा करून त्यासि सत्वर । पत्र वाचिता जाहला अकबर । तों सुरदासाचें हस्ताक्षर । वोळखिलें साचार तेधवां ।१००। अश्रु पातले नयनीं । प्रधानासि बोले मधुरवचनीं । ह्मणे सुरदासाऐसा सेवक जनीं । धुडितां त्रिभुवनीं मिळेना । १ । मी राजमदें उन्मत्त जाण । त्याणें करविलें परमार्थसाधन । आतां त्यासि देऊनि अभयवचन । आणा धुंडोन भेटावया । २ । पत्रें धाडोनि देशोदेशीं । वेगें आणावें सुरदासासी । राजाज्ञा होतांचि ऐसी । संतोष सकळांसी वाटला ।३। पश्चिमदेशींचे अधिकारी । तयांसि पत्रें पाठविलीं सत्वरीं । कीं सुरदास दृष्टीं देखिला जरी । पाठवा लवकरी भेटावया ।४। माझें भय पावूनि मनीं । अनुतापें गेला तीर्थाटनीं । कोणी अवचित देखिला नयनीं । तरी अभय देऊनी पाठवावा ।५। ऐसीं पत्रें लिहितां त्वरित । देशोदेशीं प्रकटली मात । सुरदास होता मथुरेंत । तेणें वृत्तांत ऐकिला



।६। विस्मित जाहला अंतःकरणीं । ह्मणे रायासि कृपा उपजली मनीं । नकळे ईश्वराची करणी । चक्रपाणी कृपाळू ।७। जो विश्वव्यापक श्रीहरी । नांदतसे सर्वांतरीं । त्याचे कृपेनें मजवरी । राजा अंतरीं संतोषला ।८। मग समाधान मानूनि स्वस्थ । हस्तनापुरासि गेला त्वरित । राजदर्शन होतांचि तेथ । थोर सन्मान पावला ।९। अकबरें सत्वर उठोन । सुरदासासि दिधलें आलिंगन । ह्मणे तुजऐसा सेवक आन । धुंडितां त्रिभुवन नाढळे १० सत्पात्रीं द्रव्य वेंचिलें जाण । हें ठाउकें नाहीं मजलागून । दुर्बुद्धीचे वचनेंकरून । तुझें छळण केलें कीं ११ आतां निर्भय होऊनि सत्वर । चालवीं मागील अधिकार । ऐसें बोलतां नृपवर । सुरदास उत्तर देतसे ।१२। ह्मणे ऐक आतां धराधीशा । म्यां टाकिली प्रपंच आशा । आतां पुन्हां मागुती भवपाशा । वृथा कासया घालिशी ।१३। अकबर बोले वचनोक्ती । तुज तंव पातलीसे विरक्ती । निःशेष टाकिली मायाभ्रांती । हें मजप्रती कळतसे ।१४। परी पहिला अधिकार चालवूनी । द्रव्य लाविजे संतांकारणीं । वैष्णवसेवेसि तुजविण कोणी । सज्ञान नयनीं दिसेना । १५। ऐंशींलक्ष दहासहस्र जाण । स्वाधिकारें उकलोनि धन । वैष्णवभक्तांसि भोजन । मथुराक्षेत्रीं घालावें १६ तुवां अनुताप धरूनि अंतरीं । राजसेवा टाकिली निर्धारीं । परी संतसेवेचा अधिकारी । होईं सत्वरीं ममाज्ञा।१७। ऐकोनि रायाचें नम्रवचन । सुरदास करी मनीं विचारण । ह्मणे प्रपंचीं परमार्थ येतां घडोन । तरी सर्वथा टाकून न यावा ।१८। मग रायासि ह्मणे आज्ञा प्रमाण । संतसेवा द्यावी मजलागून । अकबरें तत्काळ गौरवून । सनदा लिहून दीधल्या ।१९। मग सुरदासमदनमोहन । मथुराक्षेत्रीं आला परतोन । नानापरीचीं दिव्यान्नें । संतांसि भोजन घालीतसे ।२०। मागें भय होतें अंतरीं । कीं राजा कोपेल मजवरी । तें श्रीहरिकृपेनें जाहलें दूरी । हर्ष अंतरीं नसमाये । २१ । संतसेवेची धरूनि प्रीती । ध्यानांत आणी श्रीकृष्णमूर्ती । नामस्मरण अहोरातीं । गात कीर्ती निजप्रेमें।२२। नानापरीचे प्रबंध गीत । स्वमुखें रचूनियां कवित । सुरदास आळवी रुक्मिणीकांत । चित्तीं भावार्थ धरूनी ।२३। एके दिवशीं मांडितां कीर्तन । करिता जाहला संतस्तवन । प्रेमउल्हासें प्रबंध रचोन । काय बोलिला तें ऐका । २४ । सुरदास संतांचा वाहाणधर । अभंगीं लिहिलें साचार । ऐकतां विस्मित वैष्णववीर । आश्चर्य थोर वाटलें।२५। एक ह्मणती असत्य वाणी । सुरदासें लिहिलें ग्रंथसदनीं । अंगीं करणी नसतां जनीं । व्यर्थ कथनीं कासया । २६ । मेघ न पडतां पृथ्वीवरी । उगाच आकाशीं गर्जना करी । नातरी जीव नसतां शरीरीं । प्रेत शृंगारी लिंगाईत ।२७। सुवास नसतां कस्तुरी । विकावया मांडिली बाजारीं । तेविं अंगीं करणी नसतां बरी । कवित्वकुसरी कासया ।२८। अवतारवेष धरून अंगें । राय विनोदी आणिती सोंग । परी करणी नसतां अभंग । न राहे रंग तयाचा।२९॥ चित्रीं लिहिला वासरमणी । परी प्रकाश लिहिता नसे कोणी । तेविं सुरदासाची कवित्वकरणी । आह्मालागूनि दिसताहे ॥ ३० ॥ ऐशीं नानापरीचीं दूषणें । शब्द ठेविती त्रिविधजन । कोणी भाविक होते सज्ञान । ते समाधान मानिती ॥ ३१ ॥ अतिवाचाळ जे विचक्षण । ते ह्मणती कवित्व नूतन । अंगीं करणी नसतां जाण । वायांच लेखन करीतसे ॥ ३२ ॥ नूतन शुद्ध असेल नाणें । तरी भलताचि वाळी त्याज-

कारण । तेविं नूतन कवित्वासि जाण । भलतेंच दूषण ठेविती ॥ ३३ ॥ त्यासीच लोटतां बहुतकाळ । ऐकोनि मान्य करिती सकळ । ऐसें जनासि विकल्पजाळ । घातलें केवळ मायेनें ॥३४॥ लोटलें साल पिकाचें । चालतें दुर्भिक्ष असे साचें । मेलें माणुस भाग्याचें । आहाणा वाचें बोलती ॥ ३५ ॥ ज्ञानी साक्षात असतां पुढें । त्यासि ह्मणती अज्ञान वेडें । निमोन गेलिया वाडेंकोडें । स्तवन रोकडें करिताती ॥ ३६ ॥ आधीं चुकी मग आठवण । ऐसे परीचे सकळ जन । जाणती सज्ञान विचक्षण । अनुभवखूण आपुली ॥ ३७॥ असो बहुत बोलोनि वायां । ईश्वराची अनिवार माया । तिणें विकल्पजाळ घालोनियां । संशयकर्दमीं बुडविलें ॥ ३८ ॥ सुरदासभक्त वैष्णववीर । संतसेवेसि अति तत्पर । त्याच्या कवित्वासि साचार । निंदिती विचार न करितां ॥ ३९ ॥ ह्मणती करणी नसतां अंगीं । दांभिकपणें बोलतो जगीं । सुरदास जातां दर्शनालागीं । तों सन्निध बैरागी एक आला ।४०। तो ह्मणे सुरदासें केलें कथन । परी कसोनि पाहावें याचें मन । ऐसें चित्तीं विचारून । बोलिला वचन तें ऐका ।४१। सुरदासासि ह्मणे ते अवसरीं । मी देवदर्शना जातों सत्वरीं । तरी माझ्या वाहणा घेऊनि करीं । जतन क्षणभरीं असोंदे ॥४२॥ ऐसें बैरागी बोलिला वचन । ऐकोनि वाटलें समाधान । ह्मणे हाच हेत होता बहुदिन । निजमनीं धरून राहिलों ॥४३॥ तो मनोरथ जाहला सुफळ । जीवाची फिटली तळमळ । मग शिबिकेंतून तत्काळ । उतरलासे तेधवां ॥४४॥ वाहणा मागोनि घेतल्या करीं । उभा ठाकला महाद्वारीं । वस्त्रांत गुंडाळोन ते अवसरीं । हृदयीं धरी निजप्रीतीं ॥४५॥ आज्ञा देऊनि सेवकांसी । शिबिका पाठविली घरासी । बैरागी विस्मित मानसीं । निजनिष्ठेसी देखोनी ।४६। मग सत्वर जाऊन महाद्वारा । ह्मणे उशीर लावूनी पाहावा बरा । कीं सुरदासाच्या अंतरा । उबग सत्वरा येईल ।४७। मग सभामंडपीं जाऊन । करित बैसला हरिकीर्तन । प्रातःकाळापासोनि जाण । अस्तमानपर्यंत ।४८। दोनघटिका लोटतां यामिनी । बैरागी येऊन पाहे नयनीं । तों हातीं पादुका घेऊनी । सुरदास अंगणीं तिष्ठत ।४९। बैरागी पाहतां दृष्टीं । परम संतोष वाटला पोटीं । मग पुढें होऊनि उठाउठी । पादुका निकटीं ठेविल्या ।५०। त्याणें मस्तकीं ठेविला कर । ह्मणे निष्ठावंत तूं वैष्णववीर । म्यां कसोनि पाहावया अंतर । लाविला उशीर बहुतची ॥५१। तूं संतसेवक ह्मणविसी जनीं । बोलसी तैसीच असे करणी । ह्मणोनि अहंता मनीं धरूनी । तुज म्यां कसूनी पाहिलें ॥ ५२॥ परी निजसंतांचा वाहाणधर । बोलिलासि तें तव साचार । ऐसें ऐकूनियां उत्तर । द्रवलें अंतर सुरदासाचें ।५३। मग तेणें अनुताप धरूनिं चित्तीं । लुटविली तेव्हां सर्व संपत्ती । उपाधीरहित होऊनि निश्चितीं । भजन प्रीतीं आरंभिलें ।५४। संतसेवा केली बहुत । तेणें तुष्टला रुक्मिणीकांत । सुरदासासि साक्षात । दर्शन जाहलें तेधवां । ५५। ऐसे एकाहूनि एक अधिक । वैष्णवभक्त परम भाविक । पुढें रसाळ कथा अलोलिक । ऐकतां निजसुख श्रोतयां ।५६। श्रीभीमातीरवासीरुक्मिणीपती । निरूपण वदवी ग्रंथयुक्ती । तयाचे कृपेनें महीपती । श्रोतयांप्रती सांगत ।५७। स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । षड्त्रिंशाध्याय रसाळ हा ।५८। श्री० अध्याय ३६



श्रीगणेशायनमः । श्रीरुक्मिणीवल्लभायनमः । श्रीभीमातीरवासींरुक्मिणीकांता । तूंनिजबुद्धीचाप्रकाशिता । तुजविण आणिकअनंता । वक्तावदवितानसेची ॥ १ ॥ जैसेंवृक्षासिकारणमूळ । कींधान्यपिकवितएकजल । तेविंभक्तकथाअतिरसाळ । तूंघननीळवदविसी ॥ २ ॥ नातरीजलचरांसिकारणउदधी । कीं उडुगणासिअसेआकाशसंधी । तेविंमाझीअत्यंतमंदबुद्धी । तूंकृपानिधीप्रकाशिता ॥ ३ ॥ कींसूत्रधारीधरूनदोरी । बाहुल्यानाचवीसभेभीतरीं । तेविंतूंरिघोनिहृदयमंदिरीं । निजभक्तथोरीवर्णविसी ॥ ४ ॥ तुझेनवर्णितांगुण । उदंडकवित्वकेलेंलेखन । तरीव्यर्थवाचेसिआणिलाशीण । ऐसें दिसोनयेतसे ॥ ५ ॥ ह्मणोनियांपुढतपुढती । तुजप्रार्थितसेंश्रीपती । सप्रेमचित्तेंमहीपती । मागेंग्रंथवदावया ॥ ६ ॥ मागिले अध्यायींनिरूपण । सुरदासभक्तमदनमोहन । त्याचेंचरित्रअतिगहन । केलेंश्रवणसकळिकीं ॥ ७ ॥ आतांरासिकसुरारभक्त थोर । तोसंतसेवेसिअतितत्पर । मथुराप्रांतींसायनगर । तेथेंनिरंतरवसतसे ॥ ८ ॥ यमुनातीरींकरूनिस्नान । त्यावरीकरीश्रीकृष्णपूजन । षोडशोपचारसाहित्यकरून । पुष्पेंतुळसीअर्पितसे ॥ ९ ॥ मगबोलावूनवैष्णवजन । स्वहस्तेंकरीचरणक्षलनें । तेंतीर्थनिजमुखींघेऊन । मगसंतपूजनकरीतसे ॥ १० ॥ नानापरीचींपक्वान्नेंकरून । नित्यसंतासिघालीभोजन । संतमूर्तिविष्णूसमान । मानितमनींनिजप्रीतीं ॥ ११ ॥ शिष्यसंप्रदायीकेलेबहुत । तेसाहित्यकरितीनित्यानित्य । आपणएकांतींबैसोनिनिवांत । भजनकरीतसप्रेमें ॥ १२ ॥ तंवकोणेएकेदिवशीं । वैष्णवआलेमंदिरासी । मगतृणासनेंसकळांसी । बैसावयासीदीधलीं ॥ १३ ॥ शिष्यांसिसांगेतेअवसरीं । संतपूजनकरावेंसत्वरीं । तीर्थआणूनआपुलेकरीं । यावेंझडकरीं मजलागीं ॥ १४ ॥ आज्ञाहोतांचितेसमयीं । संतपूजेसिचालिलापाही । आळसविकल्पधरूनिदेहीं । चरणलवलाहीधूतसे ॥ १५ ॥ तंवएककोडीकुश्चळब्राह्मण । पायफुटलेअतिमालिन । वस्त्रफाटकेंबहुतजीर्ण । असंगळवाणेंनेसला ॥ १६ ॥ तोदृष्टीं देखतांचिजाण । चिळसलेंत्याचेंतत्काळमन । ह्मणेयाचेधुवोनघेतांचरण । होईलवमनतत्काळ ॥ १७ ॥ जेसज्ञानचतुर्भुज दिसती । त्यांचेचरणधूतसेप्रीतीं । पूजाकरूनियथापद्धति । केलीआरतीसंतांची ॥ १८ ॥ चरणतीर्थघेऊनिसत्वरीं । सद्गुरूसीदिधलेंत्याअवसरीं । मगसुरारदासझडकरी । प्राशनकरीतेधवां ॥ १९ ॥ तेव्हांसकळसंप्रदाईबोलावून । त्यांससांगेजीवींचीखूण । आजिचेंतीर्थकेलेंप्राशन । परीत्याजकारणचवीनाहीं ॥ २० ॥ कोणीसंशयाचित्तींधरून । घेतलेंअसेलतीर्थ जाण । मजलाकळलीअंतरखूण । ऐसेंवचनबोलिला ॥ २१ ॥ आजिफिकेंलागलेंचरणामृत । ऐसेंव्हावयाकायनिमित्त । विचारकरूनितुह्मीसमस्त । सांगात्वरितमजपाशीं ॥ २२ ॥ ऐकोनिसद्गुरूचीवाणी । सकळांसिविचारपडिलामनीं । त्यांत जोलागलाहोतासंतपूजनीं । तोआपुलेमनींचमत्कारिला ॥ २३ ॥ मगपुढेंहोऊनिसत्वर । उभाठाकलात्यासमोर । जोडोनियांदोनीकर । वृत्तांतसाचारसांगतसे ॥ २४ ॥ ह्मणेऐकास्वामीयथार्थवचन । मीकरीतहोतोंसंतपूजन । त्यांतएककोडी कुश्चळब्राह्मण । देखोनिमनकंटाळलें ॥ २५ ॥ मानसींचिळसवाटलीफार । मगत्याचाकरूनअव्हेर । सकळपूजोनिवैष्णव वीर । आलोंसत्वरस्वामिया ॥ २६ ॥ मगसुरारस्वामीतयेवेळीं । तत्काळगेलात्याजवळीं । नमस्कारघालोनिभूमंडळीं । च-

रणप्रक्षाळीनिजकरें ।२७। स्वहस्तेंपुसोनियांचरण । हृदयींधरिलाप्रेमेंकरून । चरणांगुष्टनाकासि लावून । तीर्थप्राशिलें
आवडीं।२८।ह्मणेआतांतीर्थासलागलीचव । ऐकोनिआश्चर्यकरितीवैष्णव । ह्मणतीमुरारस्वामीचाभाव । नकळे स्वय-
मेवकोणासी ।२९।ऐसेंगुरुकृपेचेंमहिमान । एकसच्छिष्यजाणेखूण । कींचंद्रामृताचाअनुभवपूर्ण । चातकांघडूनयेतसे
॥३०॥ कांनिजपतीच्यामनोगता । जाणेएकतेपतिव्रता । नातरीप्रेमळभक्तांचीऐकतांकथा । अनुभवविरक्तांजाणवे ३१
कांकमलपुष्पांचास्वाद । अनुभवेंजाणताएकमिलिंद । कींगायत्रीचामहिमाअगाध । गाधिसुतजाणतसे ॥ ३२॥ कीं
श्रीरामनामाचीप्रचीत । जाणतसेएककैलासनाथ । कींभागवतधर्ममहिमाअद्भुत । विष्णुभक्तजाणती ३३।तेविंसंतती-
र्थींची निजगोडी । मुरारस्वामीसकळलीफुडी ।याजऐसीआणिकाआवडी । नलागेचोखडीसर्वथा ॥३४॥ ऐसेंह्मणूनि
वैष्णवभक्त । मस्तकींठेवीवरदहस्त । ह्मणतीतुजसाह्यश्रीकृष्णनाथ। होईलत्वारितनिजनिष्ठें।३५।भावधरूनिसंतचरणीं।
तीर्थस्वादकळलामनीं । रसिकमुरारतैंपासोनी । नामसकळांनींठेविलें ॥ ३६ ॥ त्याचागुरुदयार्णवजाण । तोब्रह्मज्ञानी
अतिनिपुण । अर्चनपूजनयथाविधीनें । करीतसे जाण निजप्रीतीं॥३७॥गंडकीशिळेचीमूर्तिसुंदर । तिजलापूजोनिषो-
डशोपचारें । वस्त्रेंभूषणेंअलंकार । लेववीसाचारनिजभावें॥३८॥ तेथेंएकराजादर्शनासयेऊन । पूजादेखोनिसंतुष्टमनें ।
चारग्रामतयालागून । दिधलेलिहूनतेधवां ॥३९॥ दयार्णवासिह्मणेनृपनाथ । हेग्रामपूजार्थदिधलेतुह्मातें । यांचेंद्रव्यउ-
कळोनिसमस्त । साधुसंतपूजावे ॥४०॥ ऐसेंबोलोनिसत्वरीं । राजागेलाआपुलेनगरीं । दयार्णवनिजअंतरीं । आश्चर्य
करीतेधवां॥४१॥ह्मणेआपुलेपूजेसित्वरित । उपायकेलाश्रीकृष्णनाथें । यापरीसंतोषमानूनिमनांत । अर्चनकरीतहरी-
चें॥४२॥बहुतदिवसचालिलेंव्रत । तोंविघ्नओढवलेंअकस्मात । एकदुष्टहोताउन्मत्त । आलाअवचितत्याग्रामा ॥४३॥
द्रव्यदेऊनिराजद्वारा । केलादेशींचाइजारा । सनदाघेऊनिसत्वरा । वैष्णवनगरापैंआला ॥ ४४ ॥ दयार्णवाचीजहागीर
ऐकून । जप्तकरीतोदुर्जन । जेविंधर्माचेंराज्यदुर्योधन । घेतहिरूनपापिष्ठ ॥ ४५॥ उदंडसांगतीधर्मनीती । परीकोणाचेंन
ऐकेतोकुमती । मायालोभानेंपडलीभ्रांती । अधोगतीसजावया॥४६॥कृपणासिनावडेधर्मवार्ता।अभक्तासिनावडेहरि-
कथा । व्यभिचारिणीसिनिजभर्त्ता । दृष्टींदिखतांकष्टहोती॥४७॥तयारीतींतोदुर्जन । नायकेकोणाचेंहीवचन।ह्मणेवैरा-
गियासिग्रामकोणें । व्यर्थलिहूनदीधला॥४८॥ऐकोनिअभक्ताचीवाणी । दयार्णवविचारकरीमनीं । रसिकमुरारासतें-
क्षणीं । पत्रलिहूनीपाठविलें ॥ ४९ ॥ ह्मणेजेवितअस[illegible]सिजरीतिथ । तरीतैसेंचटाकूनियावेंयेथ । ऐसेंलिहूनसद्गुरुनाथ ।
वाटपहातराहिले ॥५०॥ तोंरसिकमुरारतेअवसरीं । जेवीतबैसलाआपुलेघरीं । तोंमनुष्यपत्रघेऊनिसत्वरीं । आलाझड-
करीलवलाहें ॥ ५१ ॥ सद्गुरूचामनुष्यपाहतांदृष्टीं । परमसंतोषपावलापोटीं । जेविंसुकत्याझाडाअतिनेहटीं । मेघवृष्टी
जाहली॥५२॥कींसासुरवासिणीसमाहेराहून । मायेनेंमूळपाठविलेंजाण । तैशारीतींउल्हासोन । वर्तमानपुसतसे॥५३॥
ह्मणेकायआज्ञासद्गुरुनाथें । देऊनपाठविलेंतुह्मांतें । तेणेंपत्रकाढूनिहातें । टाकिलेंत्वरितत्यापाशीं॥५४॥वामहस्तेंघेऊन



सत्वरीं । वाचूनिपाहेतेअवसरीं । तैसीचआज्ञावंदोनिशिरीं । उठिलाझडकरीजेवितां ॥५५॥ कोणासिनबोलतांवचन ।
तेथूनिसत्वरकेलेंगमन । ह्मणे सांगतीतेंतत्काळकरीन । उल्हासनिजमनींधरियेला ॥५६॥ जाऊनितयानगरांतरीं । प्रवे-
शलेसद्गुरूचेमंदिरीं । दृष्टीसदेखतांझडकरी । नमनकरी साष्टांग ॥५७॥उच्छिष्टेंतैसाचिभरलाहस्त । देखोनिपुसतीसद्गु-
रुनाथ । मुखासिअन्नलावलेंकिमर्थ । सांगेंत्वरितमजपाशीं॥५८॥येरूह्मणेसद्गुरुनाथा।तुमचीआज्ञाप्रमाणतत्वतां ।पत्र
वाचूनियांपाहतां । उठिलोंजेवितांलवकरी ॥५९॥ ऐसेंऐकूनियांवचन । आश्चर्यकरितीसकळजन । ह्मणेसद्गुरुभक्तीची
निजखूण । नकळेतुजविणकोणासी॥६०॥मगमुरारासिसद्गुरुनाथ । सांगतीसकळवृत्तांत।ह्मणतीदेवपूजेचेग्रामसमस्त ।
दुर्जनेंनिश्चितवर्जिले ॥ ६१ ॥ उदंडसांगितलीधर्मनीती । परीतोनायकेचकुमती । तुवांजाऊनियांसत्वरगतीं । उपदेश-
त्याप्रतीकरावा॥६२॥सोडवूनियांआपुलेगांव । कार्यसाधूनिशीघ्रयावें । घेऊनिश्रीकृष्णाचेंनांव। गमनकरावेंआतांची
॥६३॥ सद्गुरुआज्ञावंदोनिशिरीं । तेथोनिनिघालाझडकरीं । जाऊनियांनगरांतरीं । ठाव बिराडीं घेतला॥६४॥तेथेंभा-
विकहोतेसज्जन । तयांसिसांगेवर्तमान । ह्मणेतुमच्यागांवचेअधिकाऱ्यानें । इनामहिरूनघेतलें ॥६५॥मजआज्ञाकरू-
नत्वरित । यास्तव पाठविलेंसद्गुरुनाथें । तरीआतांचिजाऊनत्वरित । साधूंकार्यार्थआपुला ॥ ६६ ॥ लोकह्मणतीतोपर-
मखळ । वैष्णवद्रोही अतिचांडाळ । तरी आपणहोऊनउतावेळ । तेथेंतत्काळनवजावें॥६७॥तुह्मीकेवळसात्विकभक्त ।
तुमचाउपदेशनचालेतेथ । कनकाचीभालकूपांत । कासयाव्यर्थटाकावी ॥ ६८ ॥ सन्निधलोहनसतांपाहें । खापरासि
परीसघांसोंनये । कामधेनूचीसरीपाहे । बरडगायकरीना॥६९॥ तृषालागतांअगस्तीसी । जाऊंनयेथिल्लरापाशीं । क-
ल्पतरुह्मणोनिबाभुळेसी । कामनामानसींनधरावी ॥ ७० ॥ परावेंबाळक्षुधितहोय । तरीवांझस्त्रियेसिपान्हानये । तेविं
सद्भक्तांचेंवचनपाहे । दुर्जनकायमानिती ॥ ७१ ॥ तरीआतांनिजांगेंत्वरित । आपणकदापिनजावेंतेथ । आह्मीहळूच
युक्तिपंथें । साधूंकार्यार्थआपुला ॥७२॥ ऐसेंबोलतांगृहस्थथोर । मगरसिकमुरारदेतउत्तर । मजलागुरुआज्ञासाचार ।
कींकार्यसत्वरसाधावें ॥ ७३ ॥ त्यांचीआज्ञाप्रमाणपाहीं । ह्मणोनिजातोंतयाठायीं । नेदीचतरीआमुचाकांहीं । उपाव
नाहींसर्वथा॥७४॥तोंइकडेत्यादुर्जनाकारण । कोणींसांगीतलेंवर्तमान । कींग्रामसोडवावयाकारण । रसिकमुरारयेतसे
॥७५॥त्याचीदृष्टीपडतांजाण । खळासितत्काळपडतेंमोहन । ऐसेंऐकूनियांवचन । विस्तिमनजाहलातो ॥७६॥ मगवि-
चारूनियांयुक्ती । कायकरिताजाहलाकुमती।मदोन्मत्तआणवूनिहस्ती । पैलवानासिएकांतींसांगतसे॥७७॥ह्मणेरसि-
कमुरारउठाउठी । आजियेतसेआमुचेभेटी । तरीत्वांवारणउभाकरूननेहटीं । जाऊनचोहटींमारावा।७८। हेंकार्यसा-
धितांचिजाण । कांहींतुजदेईनधन । ऐसेंऐकूनिपैलवान । अवश्यह्मणेतेधवां ॥ ७९ ॥ वारणासिमद्यपाजूनिबहुत । उभा
केलाराजबिदींत । तंवरसिकमुरारकीर्तनकरित । येतत्वरितसंभ्रमें ॥८०॥ शिष्यसंप्रदायीबहुतजन । घेतलेअसतीसमा-
गमेंकरून । टाळमृदंगप्रेमेंघेऊन ।गातनामगुणआवडीं ॥८१॥ जयजयरुक्मिणीकांताविश्वव्यापका । विधिजनकाकं-

सांतकचा। निजभक्तांसितुजविणसखा। वैकुंठनायकानसेची॥८२॥तूंनससीकोणेठायीं। ऐसाठावअणुमात्रनाहीं।जेविं
आकाशव्यापकपाहीं। परीमलिननाहींसर्वथा॥ ८३ ॥ कींचंदनआणिहिंगण। याकाष्ठींपेटलियाकृशान। सुगंधदुर्गंध
दोहींतजाण। असेसमानसारिखा॥ ८४ ॥ तेविंदुर्जनसज्जनदोघेजण। यांतसारिखा तूं जगज्जीवन। तुजविश्वरूपामाझें
नमन। निजप्रीतीनेंयेतसे॥८५॥ऐशियापरीस्वानंदभरित। श्रीहरीचेगुणवर्णित। नगरवासीलोकसमस्त। कौतुकपाहा-
तीनिजदृष्टीं॥८६॥तोंउन्मत्तवारणाबिदींतूनी। पुढेंयेतसेत्वरेंकरूनी। ग्रामींचेलोकदेखतीनयनीं। उमजलेमनींआपुल्या
॥८७॥ रसिकमुरारासिप्रीतीं। कानींयेऊनहळूचसांगती। कींदुर्जनेंतुह्मावरीधरूनिकुमती। पाठविलाहस्तीमारावया
॥८८॥ऐसेंसांगतांतयासी। कांहींचभयनवाटेमानसीं। ह्मणेहेंनश्वररक्षितांयासी। काळग्रासीअंतसमयीं॥८९॥तेंसद्गुरु-
कारणींलावितांजाण। तत्काळपळतीसकळविघ्नें। ऐसेंबोलोनियांवचन। पुढेंगमनकरीतसे॥९०॥ तोंपुढेंउन्मत्तवारण।
संमुखयेतांदेखिलादुरून। शिष्यसंप्रदायीतयाकारण। बोलिलेवचनतेंऐका॥ ९१ ॥ पुढेंसंमुखयेतोकाळ। आतांयेथूनि
काढावापळ। नाहींतरीआह्मीसकळ। जीवेंतत्काळजाऊंकीं॥९२॥रसिकमुरारतयांप्रती। कायबोलिलेवचनोक्ती। स-
द्गुरुउपदेशतुह्मींनिश्चितीं। घेतलाप्रीतींनिजनिष्ठें॥ ९३ ॥आतांनिजदेहाचालोभधरूनी। जाऊंह्मणतसांयेथोनी। तरी
आधींचकांतुळसीगळांबांधोनी। व्यर्थगोंवूनीपडावें॥९४॥ऐसेंवचनऐकूनिकानीं। माळाकाढिल्यासकळांनीं। सद्गुरु
ह्मणतीतयेक्षणीं। तुह्मापासोनीसूटलों॥९५॥ऐसेंवचनबोलोनिदेख। तत्काळपळालेसकळिक। रसिकमुरारएकटाएक।
राहिलानिष्टंकत्याठायीं॥९६॥जेविंउष्णकाळयेतांजाण। मेघटाकोनिदेतीगगन। कींशीतकाळाचेंहोतांआगमन। स-
रितासंपूर्णओहटती॥९७॥कींपरचक्रींवेढितांनृपवर। देहलोभीपळोनजातीसत्वर। कींविषमकाळपडतांसाचार। दां-
भिकअनाचारसांडिती॥९८॥ नातरीवार्धकदशायेतांजाण। इंद्रियेंसांडितीविषयध्यान। कींगृहस्थपीडितांदरिद्रेंक-
रून। त्यागितीपिशुनतयासी॥९९॥भिक्षामागतांशंकराचार्य। तोंकांचरसआलाहातावरी। शिष्यपळूनगेलेझडकरी।
तैसीपरीजाहलीकीं॥ १००॥ नगरवासीलोकसमस्त। अवघेदुरूनकौतुकपाहात। ह्मणतीग्रामींचाआधिकारीउन्मत्त।
मारितोव्यर्थह्यालागीं॥१॥रसिकमुरारप्रेमेंकरून। करीतसेश्रीहरीचेंभजन। शिष्यसंप्रदायीटाकून। पाहतीदुरूनतेध-
वां॥२॥पैलवानउन्मत्तकुमती। तेणेंलोट्ठनिपेलिलाहत्ती। परीयाचाभावसर्वांभूतीं। असेश्रीपतीव्यापक॥३॥ऐशीज्या-
चीस्थितीपाहे। त्यासिकदापिनव्हचेअपाय। वारणयेऊनियांलवलाहें। धरीपायतयाचे॥४॥तामसगुणीउन्मत्तवारण।
त्याणेंकेलेंसाष्टांगनमन। ऐसेंकौतुकदेखोन। आश्चर्यमनींकरिताती॥५॥ह्मणतीगजहाअतिउन्मत्त। जीवमारितोअसं-
ख्यात। आणिमुरारस्वामीसदंडवत। घालितोअद्भुतनवलकीं॥६॥ सकळशिष्यांनींटाकिल्यामाळा। तितुक्याहीनि-
जकरेंकेल्यागोळा। एकेठायींकरूनिसकळा। घातल्यागळांवारणाच्या॥७॥रामकृष्णनारायण। उपदेशदिधलात्याज
कारण। ह्मणेटाकूनउन्मत्तपण। संतसेवनकरावें॥८॥ कायावाचामनें। भक्तांसरिघालियाशरण। मगगेलियाहिप्राण।



गुरुआज्ञानुलंघावी॥ ९ ॥ ऐसेंसांगतांतयाप्रती। वारणेंसात्विकधरिलीवृत्ति। इजारदारासिसत्वरगती। सेवकसांगती
कौतुक॥१०॥ ह्मणतीगजपाठविलामारावयासी। त्याणेंदंडवतघातलेंतयासी। वृत्तांतऐकूनिमानसीं। आश्चर्यतयासी
वाटलें॥ ११ ॥ चित्तींअनुतापधरूनियां। चालतआलेतयाठायां। ह्मणेअद्भुतमहिमानेणोनियां। छळणवायांम्यांकेलें
॥१२॥तुह्मींवैष्णवभक्तनिश्चित। ह्मणोनिघातलेंदंडवत। कायअपेक्षिततुमचेंचित्त।तेआज्ञात्वरितमजकरा॥१३॥रसि-
कमुरारह्मणेयावरी। आणिकइच्छानाहींअंतरीं। श्रीगुरुवचनवंदोनिशिरीं। पूजेचेग्रामसोडवावे॥१४॥आणिउपदेश
केलावारणातें। तोहीसोडूनयावामातें। ग्रामाधिकारीअवश्यह्मणत। मागुतीदंडवतघातलें॥१५॥घेतलींलिहूनिसनदा
पत्रें। सवेंवारणघेतलात्वरित। श्रीगुरुपाशीकीर्तनकरित। साधोनिकार्यार्थपातला॥१६॥पशुयातींतहस्तीउन्मत्त। तो-
हीजाहलाज्ञानवंत। हेंदेखोनिआश्चर्यमनांत। लोकसमस्तकरिताती॥१७॥ वारणासिझालेंपूर्णज्ञान। तोरात्रेंऐकेहरि-
कीर्तन। दिवसासअरण्यांतजाऊन। इंधनघेऊनयेतसे॥ १८॥ वैष्णवजेवावयासकळी। नित्यपाहिजेतपत्रावळी। अर-
ण्यांतजाऊनितेवेळीं। पानेंतत्काळींआणितसे॥१९॥उच्छिष्टपात्रेंदेती टाकून। तींप्रीतीनेंभक्षीवारण। त्याजवांचूनिप-
दार्थआन। नभक्षीचसर्वथा॥२०॥ठाकुरद्वारींश्रीभागवत। नित्यवाचितीवैष्णवभक्त। श्रवणकरितांनित्यनित्य। वैरा-
ग्यअद्भुतमानसीं॥२१॥ ह्मणेपशुयातींतअतिउन्मत्त। वारणदेहलाधलायेथ। कृपाकरितांसद्गुरुनाथें। संतसमागमला-
धला॥२२॥पूर्वजन्मींचेंहोतेंसुकृत। तेफळासिआलेंत्वरित। ऐसेंवारणस्वमनांत। नित्यकल्पितनिजआवडीं॥२३॥ ऐसे
बहुतदिवसलोटतां। तोंरसिकमुरारचालिलेतीर्था। आनंदझालावैष्णवभक्तां। उल्हासलेनिजमानसीं॥२४॥ समागमें
घेऊनिगज। तीर्थासिचालिलेवैष्णवराज। वस्त्रपात्रसकळबोझें। घालितीसहजत्यावरी॥२५॥ वाटेसकोणीतस्कर भि-
ल्लन। विष्णुभक्तांचेंकरितीछळण। तेव्हांसक्रोधहोऊनिवारण। टाकीमारूनत्यांलागीं॥२६॥मुखींजपेजेरामनामजा-
ण। कंठींअसेतुळसीभूषण। याविरहितजवळीकोणा। येऊंनेदीचसर्वथा॥२७॥ऐसाअनुतापधरूनचित्तांत। दृष्टीसतीर्थें
देखिलींबहुत। मगकुरुक्षेत्रींयावयात्वरित। धरिलाहेतबहुतांनीं॥२८॥पंथक्रमितांसत्वरगतीं। वाटेसिलागलीअरुणा-
वती। तेथेंउभाकरूनिहस्ती। केलेंसंतींवास्तव्य॥२९॥त्रिरात्रराहावेंतेथ। ऐसासमस्तींधरिलाहेत। तोंअविंधराजाआति
उन्मत्त। कळलावृत्तांततयासी॥ ३०॥ दूतसांगतीजाऊनित्वरित। बैरागीउतरलेनगरांत। त्यांणींवारणउन्मत्त बहुत।
आहेसांगातेंघेतला॥३१॥त्याचेंउत्तमठाणमान। आपुलेराज्यासिहोईलभूषण। तरीआपणबलात्कारेंजाऊन। घ्यावा
मागूनत्यांपाशीं॥३२॥ऐसेंदूतांनींसांगतां। अभिलाषपडिलानृपनाथा। ह्मणेराजभूषणकासयावृथा। त्याअतीतांपा-
हिजे॥ ३३॥ दूतांसिआज्ञाकेलीत्वरित। गजहिरूनआणावायेथें। बैरागीजरीनदेतीतुह्मातें। तरीशिक्षात्यांतेंकरावी
।३४।ऐकोनिदुर्बुद्धीचेंवचन। पायिकधांवलेत्वरेंकरून। तंववैष्णवमेळींतोवारण। स्वस्थमनेंबैसलासे३५संतांसिसेवक
बोलती। नृपवरेंपाठविलेंआह्मांप्रती। कींतुह्माजवळआहेहत्ती। त्यावरीप्रीतीबैसली॥३६॥हाआह्मासिदिधलापाहिजे

सत्वर। नातरी नेऊं बलात्कारें। ऐकोनि दुर्बुद्धीचें उत्तर। वैष्णव थोर चिंतावले।३७एकमेकांतें उत्तर बोलती। उन्मत्त- राजा अविंध कुमती। यासी सांगतां धर्मनीती।तरी तो कल्पांतीं नायके।३८।पिंजन्यांत घालोनि काग पढवित।। तो कृ- ष्णनाम न ह्मणेचि सर्वथा। कीं कृपणासि द्रव्य मागतां। तरी शब्द वृथा जाईल।३९।शेरासि पाणी घालितां पाहें।अमृत- फळ कदापि नये। कमाबासि मोहें चाटितां गाय। रक्षील काय तिजलागीं।४०।तुलसीमाहात्म्य ऐकूनि कानीं।बोकडा- सि दया नुपजे मनीं। मद्यपियासि ब्रह्मज्ञानी। देखतां नयनीं कंटाळे।४१।बोलका रावा देखोनि पाहे। त्यासि ससाणा र- क्षील काय। जळाविण मत्स्य तळमळताहे। तरी करुणा नये बकासी।४२।तेविं अभक्तांसि सांगतां धर्मनीती। परी त्या- सि कदापि न रुचे ती। ऐसा विचार करूनि संतीं।उत्तर देती दूतांसी।४३।ह्मणती विष्णुभक्तांविण वारण। कोणासि धरूं नेदीच जाण। तुह्मीं स्पर्शतां यालागून। टाकील मारून क्षणमात्रें।४४। ऐसें बोलतां वैष्णवभक्त। धरूं पाहती राजदूत। गज नाटोपेच निश्चित। स्वारू पाहात निजक्रोधें ४५ राजयापाशीं जाऊन।सकळ सांगती वर्तमान।ह्मणती विष्णुभक्तां- वांचून। नाकळे वारण कोणासी।४६।वचन ऐकूनि नृपनाथ।माहतासि सांगतसे युक्त। तूं वैष्णववेष धरून निश्चित।जाईं त्वरित त्यापासीं।४७।अवश्य ह्मणोनि तये वेळां। कंठीं घातल्या तुळसीमाळा।लावूनि गोपीचंदनटिळा।कृष्णा गोपाळा जपतसे।४८। यात्रेकऱ्यांस लुटावयासी। मार्गीं मैंद होती तापसी। कां मृगासि पाश घालावयासी। गोरी कीर्तनासी बैसती।४९। नातरी करावया उदरपोषण। बहुरूपी घेती संन्यासग्रहण। कीं मत्स्य धरावयाकारण। मांडिती ध्यान ब- क जैसे।५०। तैशापरी तो उन्मत्त। कपटें झाला विष्णुभक्त। वारणापासीं जाऊनि त्वरित। मुखीं जपत कृष्णनाम।५१। वारणापासीं येऊनियां। धरूं पाहातसे लवलाह्या।अंतर्यामीं कळलें तया।कीं कपटें काया पालटली।५२।परी मुखीं ना- म जपतो पाही। ह्मणूनि उपाय नचले कांहीं। वारणें शांति धरितां ते समयीं। कपटें लवलाहीं आकळित।५३। राजद्वा- रीं नेतां जाण। अति उद्विग्न झालें मन। ह्मणे संतसेवा आजपासून। मजकारणें अंतरली।५४। ठाणीं बांधितां नेऊन। न खाय कण अथवा तृण। सप्त दिवस लोटतां जाण। वैकुंठभुवन पावला।५५।जीवनास जातां अकस्मात। देह ठेविला गंगेंत। हरिस्वरूपीं धरूनि हेत। सायुज्यमुक्ति पावला।५६। धरितां साधूचा समागम। पशु उद्धरला न लागतां क्षण। मग मनुष्यासि लागावया सद्गुण। नवल कोण तयाचें५७ मैलागिरीभोंवत्या सकळां। उगवल्या होत्या बोरी बाभुळा। त्या भिन्न दिसती परिमळा। न्यून सर्वथा नसती कीं।५८।। तैसा खळ हीनयातीचा। दुर्बुद्धि असेल जरी साचा। परी शेजार घडतांचि संतांचा। तरी उद्धार त्याचा होईल५९ह्मणूनि भक्तकथा सुरसवाणी। सभाग्य श्रोते ऐका कर्णीं। पुढें मिराबाईस चक्रपाणी। संकट देखोनी पावतील।६०। तेचि रसाळ कथेची उत्पत्ती। वाढीन सभाग्य श्रोतयांचे पंक्तीं। श्रोतयां विनवी महीपती। होय सुखप्राप्ती स्वानंदें।६१। स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। सप्तत्रिंशाध्याय रसाळ हा॥ १६२॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥अध्याय ३७॥



श्रीगणेशाय नमः। श्रीकृष्णाय नमः। ऐका श्रोते हो सावधचित्तीं। श्रद्धा हेचि पौर्णिमा तिथी। तेथें भक्तविजय नि- शापती। देखिला अवचितीं निजदृष्टीं।१। हृदयाकाशीं प्रकटतां सत्वरीं। अविद्यातिमिर गेलें दूरी। सज्ञान चातकां- सि अंतरीं। सौख्य निर्धारीं वाटलें॥ २॥ आवडी चिंधा[?]सें लक्षितां दृष्टीं। प्रेमाची लाधली अमृतवृष्टी। तेणें अपार सौख्यकोटी। लाधल्या पोटीं तयांच्या॥ ३॥ इतर जन जे कां रसिक। तयां प्रसाद लाधला कथानक। तेणें संतोष पा- वूनि देख। सायुज्यसुख पावती॥४॥ अहो हा रोहिणीवर देखतां दृष्टीं। विकल्प तस्कर जल्पती पोटीं। तयांची न चाले दुरित राहाटी। मग उठाउठी पळाले॥ ५॥ केवळ अज्ञान ते तरुवर जाण। त्यांसि निशापतीचे लागतां किरण। प्राक्त- न मधुमास येतां त्वरेनें। जाहले सघन फळपुष्पीं॥ ६॥ यालागीं आतां स्वस्थ चित्तीं। सादर असावें श्रवणार्थीं। मागें रसिकमुरार आख्यान प्रीतीं। परिसिलें श्रोतीं निजप्रेमें॥ ७॥ हिंदुस्थान देशांत थोर। उदेपूर नांव पुण्यनगर। तेथील राणा नृपवर।असे सादर विष्णुभक्तीं।८।आले अतीताकारण। राजा पुरवी वस्त्र अन्न। अकस्मात येतां वैष्णवजन। त्यां- चें पूजन करीतसे॥९॥त्याचे घरीं गोपाळमूर्ती।षोडशोपचारें पूजी नृपती।वस्त्रें भूषणें लेववूनि प्रीतीं। मंगळ आरती क- रीतसे॥१०॥ हरिप्रसाद घेऊन जाण। यावरी राजा करी भोजन। तंव त्याचे पोटीं कन्यारत्न। निजभक्ति निधान अव- तरली॥११॥ द्वादश दिवस लोटतां पाही। नांव ठेविलें मिराबाई। मायेनें उचलोनि लवलाहीं। श्रीकृष्णपायीं घातली॥१२॥ रूप लावण्य अतिसुंदर। देखोनि संतोषे नृपवर। दिवसेंदिवस होतां थोर। मायबाप चित्तीं संतोषती।१३। सवें घेऊनि निजात्मजा। ठाकुरद्वारासि जाय राजा। षोडशोपचारें गरुडध्वजा। पूजितसे सद्भक्तीं॥ १४॥ श्रीकृष्णमूर्ति अतिसुंदर। त्यावरी भूषणें अलंकार। अमूल्यरत्नें मुक्ताहार। लेववी नृपवर निजप्रीतीं।१५। दिव्यमुकुट सुंदर मेखला। कांसे पीतांबर शोभे पिंवळा। गळां वैजयंती माळा। घनसांवळा शोभत।१६।जडित कुंडलें मकराकार। कंठीं कौस्तुभ अतिसुंदर। श्रीमुख साजिरें सकुमार। दिसे उदार हास्यवदन।१७। ऐसें रूप नित्य देखोन। मिराबाईचें वेधलें मन। ह्मणे भ्रतार देवावांचून। नाहीं करणें मजलागीं।१८। ऐसा निश्चय करूनि चित्तीं। राजकन्येनें धरिली प्रीती। तंव कोणे ए- के दिवशीं येऊन नृपती। कांतेप्रती बोलत।१९। राणीसि ह्मणे नृपवर। मिराबाई दिसती थोर। आतां पाहूनि उत्तम वर। लग्न सत्वर करावें॥ २०॥ पित्याचें वचन ऐकोनि कानीं। उत्तर देत मंजुळवचनीं। ह्मणे म्यां भ्रतार आपणालागूनी। ठेविला पाहोनी निजताता॥ २१॥ तो ह्मणसील जरी कोण। तरी तेंही तुजला सांगतें खूण। तुह्मी नित्य करितां ज्याचें पूजन। तो श्रीकृष्ण मज आवडे॥ २२॥ तुह्मी वडील मातापिता। विचार करूनि उभयतां। मज अर्पावें श्रीकृष्णना- था। अनुमान चित्तीं न करितां॥२३॥ राजा ह्मणे कन्येप्रती। जे निर्जीव आहे पाषाणमूर्ती। तुज लेंकुरपणें नेणवे चि- त्तीं। ह्मणोनि प्रीती जडलीसे॥ २४॥ कलियुगीं बौद्धरूप धरूनी। निवांत राहिला चक्रपाणी। आतां साक्षात रूप न- यनीं। मनुष्यांलागोनी दिसेना॥२५॥ हें तुज नेणवे बाळमती। आणि वरूं पाहतेस गोपाळमूर्ती। हा छंद टाकूनि नि-

श्रितीं । वरीं भूपती नामांकित ॥ २६ ॥ मिराबाई देत उत्तर । हा देवाधिदेव रुक्मिणीवर । यावरिष्ठ आणिक सुरवर ।
धुंडितां साचार असेना ॥ २७ ॥ हा विधीचा निजजनिता । सर्व करूनियां अकर्ता । शिव निवाला नाम जपतां । तु-
जलागीं ताता नेणवे ॥ २८ ॥ सुर नर अथवा भूपती । यावरिष्ठ नसे त्रिजगतीं । ह्मणोन माझी अत्यंत प्रीती । जडली
निश्चितीं त्यापाशीं ॥ २९ ॥ ह्मणतोसि निर्जिव पाषाण आहे । तरी ऐसें कदा बोलूं नये । प्रन्हादें विश्वास धरितां पाहे ।
काष्टींच देव प्रकटला ॥ ३० ॥ ह्मणसील या पुरातन गोष्टी । ह्मणोनि विकल्प येईल पोटीं । तरी कलियुगीं द्वारकेहूनि
जगजेठी । डाकुरीं चालत आले कीं॥३१॥मथुरेची पुरातन मूर्ती । हरिद्वारासि गेली एके रात्रीं । नामयाची विशेष दे-
खोनि भक्ती । जेविला श्रीपती त्यासवें ॥ ३२ ॥ निजभक्तांचा शुद्धभाव । तोच साक्षात जाणिजे देव । कीर्तनीं सप्रेम
गातां नांव । वसे माधव त्या ठायां।३३।जैसी कमलिनीची लागतां प्रीती । मिलिंद भोंवते गुंजार देती । तेविं कीर्तना-
पासीं रुक्मिणीपती । सत्वरगतीं येतसे ॥ ३४ ॥ कलीयुगामाजी जगज्जीवन । अभक्तांसीच धरी मौन । निजभक्त प्रेम-
ळ भाविकजन । तयांप्रती वचन बोलतसे ।३५। ह्मणोनि विकल्प न धरोनि चित्तीं । वचन ऐकावें भूपती । मजला अपूं-
नि गोपाळमूर्ती । भजनीं प्रीती लागों दे।३६।ऐकोनि कन्येचें उत्तर । आश्चर्य करी नृपवर । ह्मणे हिचें उत्तम जन्मांतर ।
कळलें साचार मजलागीं ॥ ३७ ॥ बाळक लेंकरूं अज्ञानपण । केलें नसतां पुराणश्रवण । कोठून अद्भुत जाहलें ज्ञान ।
आह्मांलागून कळेना ॥३८॥ मग कन्येसि ह्मणे नृपनाथ । गोपाळमूर्ती दिधली तूतें । आपुले मंदिरीं नेऊनि त्वरित । पू-
जीं कृष्णनाथ निजप्रीतीं ॥३९॥ पितयाचें वचन ऐकोनि पाही । चित्तीं हर्षली मिराबाई । गोपाळमूर्ति लवलाहीं । घे-
ऊनि गेली निजमंदिरा ॥४०॥ तेथें स्थापूनि गरुडध्वजा । षोडशोपचारें करी पूजा । सकळ साहित्य पुरवी राजा । स-
ज्ञान आत्मजा ह्मणोनी ॥४१॥ प्रातःकाळीं करूनि स्नान । नित्यनेम नामस्मरण । मग हातीं वीणा घेऊन । करी गायन
निजप्रीतीं ॥४२॥ काकड आरती वोवाळून । मग करीत श्रीकृष्णपूजन । सुगंध तेलाचें करूनि मर्दन । घाली स्नान उ-
ष्णोदकें ।४३। त्यावरी पय दधि आणि घृत । मधु शर्करा गुडसंयुक्त । ऐसें घालोनि पंचामृत । क्षालन करित शुद्ध उद-
कें ॥४४॥ अंगवस्त्रें पुसोनि सत्वर । प्रावरण नेसवी पीतांबर । मुकुट घालोनि मस्तकावर । दिव्य अलंकार लेववी॥४५॥
ऊर्ध्व त्रिपुंड्र द्वादश टिळे । तेणें शोभायमान दिसे घननीळ । दिव्यकुंडलें अतिसोज्वळ । शोभे माळ वैजयंती।४६।कौ-
स्तुभ लेववी वेल्हाळी । त्यावरी शोभे एकावळी । कटिसूत्र आणि राधावळी । तेणें वनमाळी शोभत ॥४७॥ हातीं पो-
होंच्या वीरकंकण । जडितमुद्रिका शोभायमान । पायीं नूपुरें वाळे भूषण । अतिप्रीतीनें लेववीतसे॥४८॥गळां कोमळ
तुळसीमाळा । त्यावरी सुगंध बुका उधळिला । तेणें शोभे घनसांवळा । सगुण साकार दिसतसे॥४९॥दशांगधूप एका-
रती । पक्वान्न नैवेद्य दाखवूनि प्रीतीं । मग उजळूनि मंगळारती । दंडवत प्रीतीं घालीतसे ।५०।ह्मणे पतितपावना गरुड-
ध्वजा । भक्तभूषणा अधोक्षजा । आर्षभावार्थ असे माझा । राजाधिराजा श्रीकृष्णा ॥५१॥ ऐशा रीतीं करूनि नमन ।



मग वैष्णवभक्त बोलावून । त्यांचें सद्भावें करूनि पूजन । करीत नमन निजप्रीतीं ॥५२॥ हरिप्रसाद उरलें अन्न । तें आ-
पण करीतसे भोजन । त्यावरी भागवतपुराणश्रवण । तृतीयप्रहरीं करीतसे ॥ ५३ ॥ ऐकावया श्रीहरिचरित्रासी । वि-
ष्णुभक्त येती मंदिरासी । जे अध्यात्मज्ञानी सद्गुणराशी । वैराग्य मानसीं सर्वदा॥५४॥ जे निराश संतुष्ट सर्वकाळ । स-
गुण भक्ति अतिप्रेमळ । ज्यांचें स्पर्शें तीर्थ निर्मळ । ते दीनदयाळ कृपाळू॥५५॥ जे रायासमान मानिती रंक । शेण सोनें
ज्यांसि सारिखें । उर्वशी आणि अस्वली देख । भाव सारिखा तयांवरी ॥ ५६ ॥ ऐसे जे कां वैराग्यभरित । ते श्रवणासि
येती साधुसंत । रात्रीं कीर्तन प्रेमयुक्त । गुण वर्णित हरीचे ॥ ५७ ॥ नानापरीचे प्रबंध कवित । मिराबाई रचूनि त्वरित ।
श्रीकृष्णभजनीं लावूनि प्रीत । गुण वर्णित सप्रेमें ॥५८॥ नगरांत कुटिळ होते दुर्जन । ते निंदा करिती रात्रदिन । ह्मणती
राजयाचें नामाभिधान । निजकन्येनें बुडविलें॥५९॥बैरागी भोंवते मिळवूनी । कीर्तनीं नाचे निर्लज्ज होऊनी । स्वरूप
सुंदर लावण्यखाणी । कलंक सद्गुणीं लाविला॥६०॥ आडमार्गें चालतां आणिकासी । राजा दंड करी निश्चयेंसी । परि
घरचें अकर्म नेणवे त्यासी । मदांध मानसीं सर्वदा ॥६१॥ जैसा सतेज दिसे वासरमणी । परी संतान व्यतीपात कल्या-
णी । तेविं नृपवरप्रतापि शिरोमणी । कन्या अवगुणी तयाची॥६२॥ हांसोनि निंदक टाळ्या पिटी । केरसुणी उपजली
मोळापोटीं । अंतरीं धरूनि पापदृष्टी । बोलती गोष्टी परस्परें॥६३॥तरूवरी बैसोनि काग पक्षी । ढोरे चरतां क्षतचि ल-
क्षी । तेविं निंदकासि न येतां साक्षी । अवगुण भक्षी स्वभावें॥६४॥ऐसें परस्परें बोलतां जन । रायासि कळलें वर्तमान ।
मग निजकांतेसि क्रोधायमान । एकांतीं नेऊन बोलत॥६५॥ह्मणे अजुन तुज वृत्तांत नकळे । आपुल्या कुळासि लागला
बोल । मिराबाई भक्तप्रेमळ । निंदिती खळ तिजलागीं॥६६॥ह्मणती मिळवूनि वैष्णवजन । निर्लज्ज होऊनि करी गायन।
ऐसें परस्परें बोलती जन । हें कुलक्षण कुलवंते॥६७॥आतां तूं जाऊनि सत्वरीं । कन्येसि सांगावें झडकरीं । कीं बाळपण
होतें आजवरी । तुज निर्धारीं कळेना ॥६८॥ आतां तुजला पाहूनि वर । लग्न करिताहे नृपवर । ऐसें पुसोनि सत्वर । येईं
झडकर सांगावया॥६९॥ऐकोनि पतीचे वचनासी । जाऊनि बोधी निजकन्येसी । जन अनिवार निंदिती तुजसी । लग्न
न करिसी ह्मणूनी॥७०॥बाळपण होतें आजवर । आतां विवाह करितो नृपवर । तुजला पुसावया साचार । मजला स-
त्वर पाठविलें॥७१॥ऐकोनि ह्मणे निजात्मजा । पित्यासि निरोप सांगावा माझा । श्रीकृष्णाविण पुरुष दुजा । तो नृप-
राजा तुजसमान॥७२॥ऐसा माझा निश्चय असतां । वारंवार कां पुसतां वृथा । जननिंदेचा अभिशाप माथां । परी मा-
झिया चित्ता भय नाहीं॥७३॥किराणा तोलूनि न पाहतां पाहे । महाग सर्वथा ह्मणूं नये । तेविं माझें अंतर नेणतां माये ।
शब्द कासया ठेवितां ॥ ७४ ॥ टाळ मृदंग लावूनि जाण । वैष्णवमेळीं करितें कीर्तन । ग्रामवासी ऐकूनि जन । निंदिती
जाण यासाठीं ॥ ७५ ॥ कोणी सज्ञान जे भाविक । ते ह्मणती कुळीं लाविला दीपक । कोणी अभक्त जे निंदक । ते जो-
डिला नरक ह्मणताती ।७६। एक ह्मणती भजनीं लागली गोडी । एक ह्मणती मिराबाई जाहली वेडी । परी माझी आ-

भ.

त्मबुद्धि चोखडी । नेणती बापुडीं अज्ञान ॥ ७७ ॥ ज्ञानशस्त्र घेऊनि हातीं । बळेंच निघालें भक्तिपंथीं । यासि शब्द ठे-
वून कुमती । धुवट करिती मोलेंविण ॥ ७८ ॥ मी रामनामीं जाहलें रत । पितयासि निरोप सांग त्वरित । ऐशी कन्ये-
ची ऐकूनि मात । माता त्वरित चालिली ॥७९॥एकांतीं येतां नृपवरासी । सकळ वृत्तांत सांगितला त्यासी । ह्मणे उदंड
नीति बोलिलें तियेसी । परी आत्मजेसी न माने ॥ ८० ॥ मग सक्रोध होऊन नृपवर । कांतेप्रती बोले उत्तर । आतां
विष दारुण देतों सत्वर । तें कन्येसि निजकरें पाजीं कां ॥ ८१ ॥ मेली अथवा नांदती सदनीं । कन्या ऐसीच ऐकिजे
कानीं । ऐसा आहणा प्रसिद्ध जनीं । विचार मनीं करावा ॥ ८२ ॥ ऐसें बोलूनि कांतेप्रती । तत्काळ विष आणवी नृप-
ती । प्याल्यांत घालोनि सत्वरगतीं । कांतेहातीं पाठविलें ॥८३॥ भ्रतारवचन नये मोडितां । परी परमदुःख वाटलें चि-
त्ता । रुदन करीत चालली माता । पोटीं ममता अनिवार ॥ ८४ ॥ ठाकुरद्वारासि मग येऊन । मिराबाईस बोलिली
वचन । रायें विष तुजकारण । अतिदारुण पाठविलें ॥८५॥ ऐसें बोलतां ते वेळे । अश्रुजलें भरले डोळे । ह्मणे सुंदर स-
कुमार माझे बाळे । संनिध काळ तुज आला ॥ ८६ ॥ मातेचा मोह देखोनि फार । मिराबाई देत उत्तर । मानवदेह अ-
तिनश्वर । अंतीं जाणार निश्चयें ॥ ८७ ॥ हें कृष्णभजनानिमित्त जातां । माते कां शोक करिसी वृथा । मृगजळाचा पूर
आटतां । कासया चिंता करावी ॥ ८८ ॥ वंध्यासुताचें मोडितां लग्न । तेथें शोकासि काय कारण । अमावास्येचे रा-
त्रीं लोपलें चांदणें । हा शब्द जाण लटिकाची ॥८९॥ आकाशसुमनें गेलीं गळोनी । ह्मणोनि भ्रमर उद्विग्न मनीं । तेविं
आज तूं वृथा जननी । शोक निजमनीं करितेसी ॥ ९० ॥ देंठापासोनि फळ निपजलें पाहीं । तें सुटोनि पडिलें आणि-
के ठायीं । तेविं मी जडलें श्रीकृष्णपायीं । आतां संबंध कांहीं असेना ॥९१॥ कीं मुक्ताफळ निपजलें जळांत । त्याचें भू-
षण करिती श्रीमंत । तेविं मी तुमचे पोटीं उपजोनि त्वरित । श्रीकृष्णीं रत झालें कीं ॥ ९२ ॥ नातरी अलंकार कराव-
या चोख । रत्नकोंदणीं बैसविती लोक । तेविं माझा अंगीकार देख । यदुनायकें केला कीं ॥ ९३ ॥ आतां लटिकी प्रपं-
चमाया । टाकोनि शोक न करी वायां । ऐसें मातेसि सांगोनियां । श्रीकृष्णपायां लागली ॥ ९४ ॥ मस्तक ठेवूनि चर-
णकमळीं । देवासि बोले तये वेळीं । पित्यानें विष ये काळीं । मज वनमाळी पाठविलें ॥ ९५ ॥ आतां तुझे कृपेकरूनि
जाण । मी पावेन वैकुंठभुवन । पुढें तुझें कोण करील अर्चन । चिंता दारुण मज वाटे ॥९६॥ निंदक लोक ऐसें बोलती ।
मिराबाईनें केली भक्ती । तिजला विषप्रलय अंतीं । केला निश्चितीं नृपनाथें ॥ ९७ ॥ आतां ऐसें बोलती अभक्तजन ।
मग ते न करतील तुझें पूजन । हे देवाधिदेवा मजकारण । चिंता दारुण वाटतसे ॥ ९८ ॥ वस्त्रें भूषणें अलंकार । नाना
पुष्पांचे गुंफोनि हार । तुज कोण लेववील सत्वर । चिंता अपार मज वाटे ॥ ९९ ॥ राजा करीत होता अर्चन । तोही
झाला क्रोधायमान । मजवरी तेणें निमित्त ठेवून । तुझें सेवन वर्जिलें ॥१००॥ तूं सकुमार सांवळा राजीवनयन । भल-
ताच दुर्जन ठेवील दूषण । ह्मणतील मिराबाईचा प्राण । याजनिमित्त पैं गेला ॥ १ ॥ बरें आतां रुक्मिणीकांता । मी

३८

पा.

१३१

कासया वृथा करावी चिंता । भूतभविष्याचा कर्ता । तुजविण सर्वथा असेना ॥ २ ॥ लाक्षागृहीं पंडुसुत । जळतां
राखिले त्वां त्वरित । तूं कृपासागर अनाथनाथ । नकळे अंत श्रुतिशास्त्रां ॥ ३ ॥ विष पाजितां प्रल्हादासी । तयासि
रक्षिलें त्वां हृषीकेशी । तुझें नाम असतां वाचेसी । कळिकाळ तयासी बाधेना ॥ ४ ॥ शिवें घेतलें जें हालाहल ।
तें तुझिया नामें झालें शीतळ । आजि मी वृथा कासया करूं तळमळ । तूं दीनदयाळ असतां पैं ॥ ५ ॥ मग विष-
प्याला सत्वर घेऊन । नैवेद्य दाखवी देवाकारण । भोक्ता श्रीहरि ह्मणून । केलें प्राशन तेधवां ॥ ६ ॥ तों अद्भुत नवल
वर्तलें जाण । तें परिसा श्रोते भाविकजन । मिराबाईस विषप्राशन । अमृतासमान तें जाहलें ॥७॥ परी गंडकीशिळेची
मूर्ति अभंग । तिचा तत्काळ पालटला रंग । हिरवें झालें सर्वांग । पाहती सकळ दृष्टीसी ॥८॥ कांतेचा विश्वास नव्हता
पोटीं । ह्मणोनि राजा पातला उठाउठी। त्यानें देखतां प्रत्यक्ष दृष्टीं । झाला कंठीं सद्गदित॥९॥ह्मणे मी पतित अतिदुर्जन ।
देवासि करविलें विषप्राशन । ऐसा अनुताप चित्तीं आणून । धरिले चरण कन्येचे ॥११०॥ येरी मस्तक उचलोन । पि-
त्यासि करी साष्टांगनमन । ह्मणे बा तुझ्यायोगेंकरून । मजला श्रीकृष्ण जोडला ॥ ११ ॥ मिराबाईस ह्मणे पिता । तु-
जला विषप्राशन करवितां । मूर्तीचा रंग पालटला आतां । ह्मणूनि चिंता मज वाटे ॥१२॥ तरी आतां प्रार्थूनि रुक्मि-
णीपती । पहिल्या ऐसी करावी मूर्ती । तेणें संतोष होईल चित्तीं । जनीं कीर्ती होईल ॥ १३ ॥ मिराबाई जोडोनि हात ।
श्रीकृष्णमूर्तीस काय बोलत । विषप्राशन करितां किंचित । तुझें रूप त्वरित पालटलें ॥ १४ ॥ कृष्णावतारीं यमुनाजी-
वनीं । निजांगें टाकिला कालिया मर्दूनी । आणि किंचित विष आजिचे दिनीं । चढलें कैसें तुजलागीं ॥ १५ ॥ तुझें
नाम निजभक्त जपती । त्यांस विषाचें होय अमृत । ऐसी पुराणीं बोलिली मात । आली प्रचीत मज आतां ॥१६॥ तुझें
नाम जपतां धूर्जटी । तो तत्काळ जाहला शीतळ पोटीं । आणि निजांगें घेतांचि जगजेठी। जाहलासि कष्टी दिसता-
हे ॥ १७ ॥ समुद्राच्या भयेंकरून ॥ अगस्त्य टाकील अनुष्ठान । तरीच देवा तुजकारण । विषबंधन होईल ॥ १८॥ धडा-
डीत पेटला वैश्वानर । जरी तृणासि कांपेल थरथर । तरीच विष रुक्मिणीवरा । तुजकारणें बाधील ॥ १९ ॥ कीं राम-
नाम जपतां अहर्निशीं । दुरितें बाधिती निजभक्तांसी । तरीच विषाची बाधा तुजसी । निश्चयेंसी होईल ॥ १२० ॥ ना-
तरी सुधारस प्राशितां गोविंदा । प्राणियासि होईल रोगबाधा । तरीच तुजला स्वानंदकंदा । अपाय मुकुंदा होईल २१
कौतुक दाखवावया जनासी । नानाचरित्रें तूं करितोसी । आतां पहिल्यासारिखा त्वरेंसी । हृषीकेशी होईं कां ॥ २२ ॥
मिराबाईचें असें उत्तर । ऐकोनि आनंदले शार्ङ्गधर । पहिल्यासारखे रुक्मिणीवर । झाले सत्वर तेधवां ॥२३॥ पुढें सा-
क्ष पाहती जग । ह्मणोनि ठेविला कंठींचा रंग । निजदासाची कीर्ति अभंग । करी भवभंग कृपाळू ॥ २४ ॥ राजा उठो-
नि सत्वर । देवास घाली नमस्कार । मग मिराबाईस बोले उत्तर । त्वां केला उद्धार वंशाचा ॥ २५ ॥ ऐकून नृपवराची
बोली । सकळ निंदक पाहाती खालीं । ह्मणती निजभक्ताची छळणा केली । तेणें अपकीर्ति झाली जनांत ॥ २६॥ जय-

जयकारें पिटोनि टाळी । आनंदली भक्तमंडळी । ह्मणती मिराबाईस ये काळीं । प्रसन्न वनमाळा जाहला कीं ॥ २७ ॥
मिराबाई संतुष्टमनें । करिती झाली श्रीकृष्णभजन । भक्तमहिमा प्रकट करून । आत्मज्ञान पावली ॥ २८ ॥ ते देशांत
अद्यापिवरी । राणेराजियांचे घरीं । श्रीकृष्णमूर्ति अतिसाजिरी । तयांचे मंदिरीं राहिली ॥ २९ ॥ पुढील अध्यायीं क-
था सुंदर । कान्होपात्रा भक्तथोर । तें रसाळ चरित्र अतिप्रियकर । परिसा सादर भाविक हो ॥ १३० ॥ जो आदिमाये-
चा नियंता । जो विधीचाही निजजनिता । तो हृदयीं वसोनि स्वभावतां । वदवी कथा निरुपम ॥ ३१ ॥ ऐसा निश्चय
धरी मन । वक्ता वदविता रुक्मिणीरमण । महीपती तयाचे कृपादानें । प्रसादवचन बोलत ॥ ३२ ॥ स्वस्ति श्रीभक्तवि-
विजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ पेका भाविकभक्त । अष्टत्रिंशाध्याय रसाळ हा ॥ १३३ ॥ ओंव्या १३३ ॥
अध्याय ॥ ३८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । ऐका श्रोते सावकाश । पंढरीक्षेत्र दक्षिणेस । तेथूनियां सात कोस । मंगळवेढें
ग्राम पैं ॥ १ ॥ तेथील वेश्या कलावंतीण । श्यामा तिचें नामाभिधान । तिचे पोटीं दिव्यरत्न । कान्होपात्रा जन्मली
॥ २ ॥ तिचें लावण्य पाहतां जाण । देवांगना होती लज्जायमान । मृत्युलोकीं तिजसमान । नाहीं विधीनें निर्मिली
॥ ३ ॥ बाळपणीं ते अबला । गायन शिकली नृत्यकला । रंभा तिलोत्तमा मेनिका सकळा । पाहतां डोळां लज्जित ।४॥
माता ह्मणे कन्येसी । चाल जाऊं राजद्वारासी । अलंकार देईल तुजसी । रूपलावण्य देखोनी ॥ ५ ॥ ते ह्मणे वो जननी ।
मज योग्य पुरुष सुंदर कोणी । धुंडितां न दिसेचि नयनीं । जाणसी मनीं आपुल्या ॥ ६ ॥ मजहूनि लावण्य कोटिगु-
णी । असल्या वरीन त्यालागोनी । ऐसा निश्चय करूनि मनीं । कान्होपात्रा राहिली ॥ ७ ॥ मृत्युलोकींचे पुरुष सम-
स्त । माते ते मजऐसे भासत । जैसे सूर्यापुढें खद्योत । तैसे दिसती मजलागीं ॥ ८ ॥ तंव कोणे एके अवसरीं । यात्रा जा-
तसे श्रीपंढरीं । गरुडटके निःसाणभेरी । वैष्णव गजरीं गाताती ॥ ९ ॥ कान्होपात्रा तयांस देखोन । संतांसि घाली लो-
टांगण । कोठें जातां वैष्णवजन । दया करून मज सांगा ॥ १० ॥ ते ह्मणती पंढरीसी । आह्मी जातों यात्रेसी । तेथें आ-
ला वैकुंठवासी । पुंडलीकाकारणें ॥ ११ ॥ कान्होपात्रा पुसे संतांसी । कैसा आहे वैकुंठवासी । ते ह्मणती ब्रह्मादिकां-
सी । त्याचा महिमा न वर्णवे ॥ १२ ॥ उदार धीर सुंदर पूर्ण । लक्ष्मीहूनि कोटिगुण । चंद्रसूर्यादि तारागण । जयाचे ते-
जें राहाटती ॥ १३ ॥ कान्होपात्रा ह्मणे संतांसी । ऐसा सांगतां हृषीकेशी । जरी मी शरण गेलें तयासी । तरी अंगीका-
र करील कीं ॥ १४ ॥ ते ह्मणती कुब्जा कंसदासी । कुरूप हीन मथुरेसी । कृष्णें अंगीकारूनि तियेसी । आपुल्या
ऐसी ते केली ॥ १५ ॥ अजामेळ चोखामेळ । त्याचा अंगीकार करी तत्काळ । पतितपावन दीनदयाळ । तो घननीळ
ह्मणवीतसे ॥ १६ ॥ ऐसें ऐकोनि संतवचन । कान्हो घरास गेली त्वरेनें । मातेसि ह्मणे नमन करून । पंढरीस मी जातें
॥ १७ ॥ मग वीणा घेऊनियां करीं । सप्रेमें गायन करी ते सुंदरी । कान्होपात्रा आली ते अवसरीं । श्रीहरीचे गुण वर्णि-
त ॥ १८ ॥ महाद्वारीं लोटांगण । कान्होपात्रा घाली प्रेमेंकरून । ह्मणे तुझी कीर्ति ऐकून । आलें शरण श्रीविठ्ठला ॥ १९ ॥
उदार धीर सुंदर पूर्ण । षड्गुणैश्वर्य लक्षण । तुझ्याठायीं वसती ह्मणोन । आलें शरण श्रीविठ्ठला ॥ २० ॥ अजामेळ गणि-
का जाण । तुवां उद्धरिली येतां शरण । संतीं सांगितलें ह्मणोन । आलें शरण श्रीविठ्ठला ॥ २१ ॥ लौकिक काम देहाभिमा-
न । माझे ठायीं होता जाण । सर्व त्यजोनि तुजकारण । आलें शरण श्रीविठ्ठला ॥ २२ ॥ आतां मजलागीं अंगीकारीं । श-
रण आलें तुज श्रीहरी । ह्मणोनि माथा चरणावरी । कान्होपात्रा ठेवीतसे ॥ २३ ॥ हरिरूप धरून मानसीं । कान्होपा-
त्रा राहिली पंढरीसी । महाद्वारीं सद्भावेंसी । श्रीहरिगुण वर्णीतसे ॥ २४ ॥ तंव कोणे एके अवसरीं । एक होता दुराचा-
री । त्यानें जाऊनि बेदरीं । रायापासीं सांगीतलें ॥ २५ ॥ ह्मणे पंढरपुरीं महाद्वारीं । एक गणिका आहे सुंदरी । तिजसा-
रिखी आणिक नारी । मृत्युलोकीं असेना ॥ २६ ॥ कांहीं नसतां अपराधासी । धिवर मारी जळचरांसी । तैसे सज्जनदुर्ज-

नांसी । अखंड वैर चालतसे ॥२७॥ निरपराधें श्वापदांसी । पारधी विंधोनि वधी त्यांसी । तैसें दुर्जन सज्जनांसी । अखंड वैर चालतसे ॥२८॥ व्याघ्र देखोनि मनुष्यासी । ग्रासूं पाहे सक्रोध मानसीं । तैसें दुर्जनसज्जनांसी । वैर मानसीं सर्वदा २९ अपराध नसतां निक्षितासी । ढेंकूण डसती मनुष्यासी । तैसें दुर्जनसज्जनांसी । वैर मानसीं सर्वदा ॥ ३० ॥ अन्याय केला नसतां जाण । रायाशीं सांगे जाऊनि दुर्जन । ऐकून पंढरीस त्यानें । दूत पाठविले तत्काळ ॥३१॥ कान्होपात्रा महाद्वारीं । सप्रेमभावें कीर्तन करी । तों राजकिंकर येऊनि सत्वरीं । तिजकारणें बोलती ॥३२॥ ह्मणती बेदरास चाल सत्वर । नातरी करूनि नेऊं बलात्कार । ते ह्मणे देवासि नमस्कार । करूनि सत्वर येतसें ॥३३॥ सभामंडपीं उभे दूत । कान्होपात्रा गेली राउळांत । कर जोडोनि विनवीत । बहु विनीत होऊनी ॥३४॥ ह्मणे पुंडलीकवरदा पांडुरंगा । मी तुझीच ह्मणवितें श्रीरंगा । आतां मोकलितां भवभंगा । उणें कोणासी येईल ॥३५॥ म्यां तुझें ह्मणविल्यावरी । रायें धरूनि नेलिया बेदरीं । पंढरीनिवासा श्रीहरी । उणें कवणास येईल ॥ ३६ ॥ गजेंद्राची ऐकोनि करुणा । सत्वर पावलासि जगज्जीवना । मज मोकलितां करुणाघना । उणें कवणा येईल ॥३७॥ कपोती संकटीं पडतां जाण । तुवां टाळिलें तिचें विघ्न । आतां मज देतां अव्हेरून उणें कवणास येईल ॥३८॥ श्वापद हरिणी पडली फांसा । स्मरतां पावलासि हृषीकेशा । मज मोकलितां पंढरीशा उणें कवणास येईल ॥३९॥ दुर्वासें छळितां अंबरीषासी । त्याचे गर्भवास तूं सोशिसी । आतां नेतां मज बेदरासी । उणें कवणासी येईल ॥४०॥ अजामिळ आणि चोखा महार । यांचा केला त्वां अंगिकार । आतां माझा करितां अव्हेर । उणें कवणास येईल ॥४१॥ कढईंत घातलें मंडूक बाळ । स्मरतां पावलासि तत्काळ । मज मोकलितां ऐशिया वेळे । उणें कवणास येईल ॥४२॥ तुझे स्वरूपीं जडलें मन । मज स्पर्शतांच हे दुर्जन । तरी देवा तुजकारण । संतसज्जन हांसतील ॥४३॥ ऐसें भाकितांचि करुणावचन । कृपेनें द्रवला नारायण । तिचें चैतन्य काढून । आपुले स्वरूपीं मेळविलें ॥४४॥ संतपुजारी सन्निध होते । त्याणीं तत्काळ देखिलें तेथें । कान्होपात्रेस कृपावंतें । जानूमाजी घातलें ॥४५॥ कान्होपात्रा जिराली मांडीवरी । ते साक्ष आहे अद्यापवरी । भावें जाताति जे पंढरीं । ते आवडीं पाहताती ॥४६॥ तिचें प्रेत तये अवसरीं । नेऊनि पुरिलें दक्षिणद्वारीं । त्याचा वृक्ष ते अवसरीं । तरटी झाड उगवलें ॥ ४७ ॥ असो बेदराहून आले दूत । सभामंडपीं ते तिष्ठती । पुजाऱ्यांसि तेव्हां पुसती । कान्होपात्रा काय जाहली ॥ ४८ ॥ ते ह्मणती तिचें चैतन्य । हरिस्वरूपीं जाहलें लीन । दूत ह्मणती आणोन । प्रेत आह्मांसि दाखवा ॥ ४९ ॥ पुजारी सांगती दूतांस । तिचे प्रेताचा जाहला वृक्ष । मग ते ह्मणती अभिलाष । तुह्मींच केला तियेचा ॥ ५० ॥ द्वारापुढती उकरून । पळविली कोठें सुरुंगांतून । आतां वृक्ष जाहला ह्मणून । असत्य वचन बोलतसां ॥ ५१ ॥ कांहीं विचार न करितां जाण । पुजारी नेले सर्व धरून । बेदरीं जाऊनि वर्तमान । रायापाशीं सांगीतलें ॥ ५२ ॥ अविंधराजा अविवेकी बहुत । पुजारी जाहले भयभीत । नारळ बुका प्रसाद त्वरित । रायापुढें ठेविला ॥ ५३ ॥ तेणें घेतलें प्रसादास । तंव त्यामाजी निघाला एक केंस । क्रोध आला अविंधास । पुजाऱ्यां-



सि पुसिलें पैं ॥ ५४ ॥ परम भय वाटलें तयांसी । विचार पडला तयांचे मानसीं । ह्मणती सांगावें राजयासी । केश देवाचा ह्मणोनी ॥ ५५ ॥ ह्मणे वैकुंठवासी इटेवरी । उभा राहिला भिंवरेतीरीं । कान्होपात्रेचा कैवारी । केश निर्धारीं तयाचा ॥ ५६ ॥ तुह्मी चलावें पंढरीस । जरी केंस नसेल देवास । तरी शिक्षा करावी आह्मांस । ऐसें लिहोन दीधलें ५७ राजा पुसे ब्राह्मणांसी । कान्हो देवांत मिळाली कैसी । पुजारी ह्मणती सागरासी । लवण मिळे तैशा रीतीं ॥५८॥ साक्ष पहावयाकारण । राजा सत्वर निघाला जाण । विचार करिती ब्राह्मण । आतां कैसें करावें ॥ ५९ ॥ केश न देखतां देवास । अविंध मारील आपणांस । लज्जा रक्षील जगन्निवास । कीं उपेक्षील आह्मांस कळेना ॥ ६० ॥ पंढरीसमीप आले जेव्हां । ब्राह्मण करुणा भाकिती तेव्हां । ह्मणती कृपावंता माधवा । तूं रक्षिता आह्मांसी ॥ ६१ ॥ लाक्षाजोहरीं पांडव जळतां । तेथें धांवलासी अनंता । आतां आह्मासि रक्षितां । संकट तुज कोणतें ॥ ६२ ॥ वाढितां दुर्जनांची पंक्ती । चतुर्भुज केली द्रौपदी सती । आह्मासि रक्षितां रुक्मिणीपती । संकट तुज चित्तीं कोणतें ॥ ६३ ॥ वणवा लागतां गिळिल्या ज्वाळा । रक्षिलें गाई आणि गोपाळां । आह्मांसी वांचवितां ये वेळां । संकट तुजला कोणतें ॥ ६४ ॥ मेघ वर्षतां दारुण । नखीं धरिला गोवर्धन । आमचे वांचवितां प्राण । संकट तुजला कोणतें ॥ ६५ ॥ तुझा प्रताप जाणून । राजद्वारीं दिधलें लिहोन । तूं चतुर्भुज श्यामवर्ण । केश कुरळ असती तैं ॥६६॥ असो महाद्वारीं ते अवसरीं । राजा पातला अतिसत्वरीं । ब्राह्मण देवासि गरुडपारीं । लोटांगणें घालिती ॥ ६७ ॥ ह्मणती पुंडलीकवरदा अनंता । ये संकटीं आह्मासि रक्षिता । तुजवांचोनि जगन्नाथा । कोणी न दिसे ये वेळे ॥६८॥ शेजार मंडपीं जाऊनि त्वरित । राजा देवासि जों पहात । तों मुकुट देखिला अकस्मात । प्रभायमान साजिरा ॥ ६९ ॥ कुरळ केश बहुसुंदर । कमलनेत्र अतिविशाळ । दिव्यकुंडलें मकराकार । कंठीं कौस्तुभ साजिरा ॥ ७० ॥ हृदयीं पदक अतिसुंदर । जघनीं ठेविले दोनी कर । कांसे वेष्टिला पीतांबर । शोभे माळ वैजयंती ॥ ७१ ॥ जें योगियांचें निजध्यान । सकळ देवांचें दैवतार्चन । एकाएकीं राजा आपण । देखता जाहला तेधवां ॥ ७२ ॥ अनुताप जाहला चित्तासी । राजा ह्मणे ब्राह्मणांसी । तुह्मीं मूर्ति सांगितली जैसी । तैसीच येथें देखिली ॥ ७३ ॥ अनन्यभावें दंडवत । राजा देवासि असे घालित । आलिंगन देवोनियां त्वरित । पुजाऱ्यांसि बोलतसे ॥७४॥ कान्होपात्रेचें भाग्य परम । हरिस्वरूपीं जाहली लीन । आम्ही अभाग्य ज्ञानहीन । केलें छळण तियेचें ॥७५॥ मागुती बोले पुजाऱ्यांसी । कान्हो वृक्ष जाहली कैसी । त्यांनीं दक्षिणद्वारापासीं । तरटीवृक्ष दाखविला ॥ ७६ ॥ राजयासि सांगती ब्राह्मण । पंढरीक्षेत्र हें पुरातन । येथील तरुवर होऊन । सकळ सुरगण बैसले ॥ ७७ ॥ तरटीवृक्ष तैसाचि आहे । अद्यापि दक्षिणद्वारीं पाहे । भाविकभक्त लवलाहें । पंढरीस पाहताती ॥७८॥ पुढिले अध्यायीं कथा अद्भुत । दामाजीपंत वैष्णवभक्त । महीपती त्याचा शरणागत । गुण वर्णित सद्भावें ॥७९॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । एकोनचत्वारिंशाध्याय रसाळ हा ॥८०॥ अ० ३९ ॥ ओं० ८० ॥

॥ श्री भक्तविजय अध्याय ३९ वा समाप्त ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीअनंतकोटिब्रह्मांडनायकाय नमः । जयजय भक्तवत्सला रुक्मिणीकांता । दीनबंधु अनाथ-
नाथा । निजभक्तांसि सुखदाता । तुजाविण सर्वथा असेना ॥ १ ॥ जयजय अनंत अवतारधारिया । कृपासागरा करु-
णालया । गुणसमुद्रा यादवराया । निरसीं माया भक्तांची ॥ २ ॥ जय विश्वपति विश्वेश्वरा । कैवल्यदानी अतिउदा-
रा । भक्तभूषणा जगदुद्धारा । निजभक्तअंतरीं वससी तूं ॥ ३ ॥ जय कमळापति कमललोचना । अक्षयरूपा चैतन्य-
घना । विश्वकर्त्या राजीवनयना । दीनोद्धारणा जगद्गुरु ॥ ४ ॥ निजभक्त पडतां संकटीं । सत्वर धांवसी जगजेठी ।
त्याचें कार्य करिशी उठाउठी । लज्जा पोटीं न धरितां ॥ ५॥ तीं आपुलीं सद्गुणचरित्रें । तूंचि वदविलीं राजीवनेत्रें । मी
तंव उगाचि निमित्तमात्र । बुद्धि स्वतंत्र असेना ॥ ६ ॥ मागील अध्यायीं निरूपण । श्रोतीं ऐकिलें प्रीतींकरून । का-
न्होपात्रेस जगज्जीवनें । दिधलें दर्शन निजकृपें ॥७ ॥ आतां उदार ज्ञानी धैर्यवंत । जो प्रपंचीं असोन अतिविरक्त । तो
निजभक्त दामाजीपंत । परिसा चरित्र तयाचें ॥ ८ ॥ अविंधराजा होता बेदरीं । एकनिष्ठ करी त्याची चाकरी । सं-
सार मिथ्या जाणोनि अंतरीं । श्रीहरिभजन करितसे ॥ ९ ॥ पंढरीक्षेत्रापासूनि जाण । मंगळवेढें दोन योजनें । तेथी-
ल राजमहाल ठाणें । केलें स्वाधीन तयाच्या॥१०॥रायें विश्वासूक जाणून । दास्तान केलें त्याचे स्वाधीन । कुटुंबास-
हवर्तमान । तेथेंच येऊन राहिला ॥ ११ ॥ माध्याह्नकाळीं अभ्यागतांसी । येतां अन्न देतसे त्यांसी । श्री पांडुरंगचरणीं
अहर्निशीं । भाव मानसीं धरियेला ॥ १२ ॥ ऐसें लोटतां दिवस बहुत । तों दुष्काळ पडला अकस्मात । तेणें जीवजंतु
समस्त । क्षुधेनें मरती उपवासी॥१३॥मुखामाजी घालोनि हीन । प्राणी पावती मृत्युसदन ।परी कोठेंही न मिळे अन्न ।
ऐसा काळ कठिण आलासे ॥ १४ ॥ स्वदेश टाकोनि लोक गेले । कोणी निर्बळ ते ठायींच राहिले । पंढरीक्षेत्रीं अन्न न
मिळे । नाहींत मळे क्षेत्र तेथें ॥ १५॥ तंव एक ब्राह्मण क्षुधित होऊन । मंगळवेढ्यास आला त्वरेंकरून । ह्मणे आजि-
चा दिवस मिळेल अन्न । इच्छा मनें हे धरिली ॥ १६॥ दामाजीपंताचिये घरीं । द्विज पातला त्या अवसरीं । विप्रासि
देखतांचि झडकरी । नमन करी सद्भावें ॥ १७॥ ह्मणे स्नान करूनियां त्वरित । प्रसाद घ्यावया यावें येथ । ऐसा आदर
देखोनि बहुत । संतोषे चित्त द्विजाचें ॥ १८॥ याचकासि नम्र बोलतां वचन । तेणें संतोषे जगज्जीवन । जेविं बाळकाचें
कोड करितां जाण । समाधान मायेसी ।१९। कीं निजपुत्राचा होतां आदर।पिता संतोष मानी थोर । तेविं याचकपूज-
नीं करितां आदर । शार्ङ्गधर उल्हासे ।२०। गृहस्थासि काळ असला कठिण । द्यावयासि नसे वस्त्र अन्न । तरी नम्रवचन
बोलून । करावें नमन आदरें ।२१।भिक्षा द्यावयासि नसली जरी । तरी आंवरोनि धरावी श्वानवैखरी । बसवसोनि पा-
ठी लागला तरी।नरकीं अघोरीं पडेल तो । २२ । ऐसी शास्त्रीं बोलली नीत । हें सर्व जाणे दामाजीपंत । ह्मणोनि द्विजाचा
आदर बहुत । करी निजप्रीत लावूनी।२३।स्नान करूनि आला ब्राह्मण । पंक्तीस बैसविला सन्मानेंकरून । नानापरीचीं
दिव्यान्नें । पात्रीं आणोन वाढिलीं।२४।शेवटीं पंक्तीस वाढितां घृत । संकल्प सांगे पुरोहित । आपोशन करवी त्वरित।तों

देखिलें विपरीत तेधवां ।२५। पंढरीहूनि आला ब्राह्मण । तो तत्काळ करूं लागला रुदन । अश्रु पडती नेत्रांतून । विस्मित मन सकळांचें ॥ २६ ॥ घरधनी पुसे त्याजकारण । ह्मणे स्वामी हा समय कोण । काय दुःख आठवून । जाहलांति उद्विग्न त्यासाठीं ॥ २७ ॥ ऐकोनि बोले द्विजवर । आज दिवस लोटले चार । कुटुंबासहित मुलें लेंकरें । राहिलीं साचार उपवासी ॥ २८ ॥ मी निर्दय बहु कठिण भारी । जेवीत बैसलों तुमचे घरीं । पुढें कैसी होईल परी । खेद अंतरीं वाटतो २९ दामाजीपंत ऐकूनि वचन । पुसता जाहला द्विजाकारण । एक संवत्सरपर्यंत जाण । पुरवीन अन्न तुह्मासी ।३०। आतां स्वस्थ करून चित्त । भोजन करावें जी त्वरित । सायंकाळीं धान्य निश्चित । तुमचे गृहांत पाठवीन ॥ ३१ ॥ ऐसें ऐकूनि अभयवचन । द्विजांसि वाटलें समाधान । जेविं आयुष्यहीनासि अमृतपान । शचीरमणें पाजिलें ॥ ३२ ॥ तैसा संतोष मानूनि चित्तीं । द्विज जेविला यथा निगुती । विडा दक्षिणा घेऊन प्रीतीं । आशीर्वाद देत संतुष्टचित्तें ।३३। मग बोलावूनि निजभृत्यांसी । दामाजीपंत सांगे त्यांसी । दोन खंड्या धान्य द्विजासी । घावें पंढरीसी नेऊनी।३४।ऐसी आज्ञा होतांचि त्वरित । ब्राह्मणास आनंद वाटला बहुत । ह्मणे मज पावला रुक्मिणीकांत । उल्हासयुक्त मानसीं ॥३५॥ मग धान्य घालोनि वृषभावरी । सत्वर पाठविलें पंढरपुरीं । दृष्टीस देखोनि नरनारी । पडलीं त्यावरी सकळिक ।३६। गोण्या फोडोनि तत्काळ । धान्य लुटोनि घेतलें सकळ । कोणाचेंही न चाले बळ । उपवासें पीडिले ह्मणूनी॥३७॥जयासि दिधलें होतें धान्य । तो रुदन करूं लागला ब्राह्मण । ह्मणे माझें धान्य घ्यावया लुटोन । तुह्मी कोण होतसां ॥ ३८ ॥ जैसें कृषीबलाचें पिकलें शेत । त्यावरी टोळ पडती बहुत । मग तो जैसा तळमळ करीत । तैसेंचि जाहलें तयासी ॥३९॥ पंढरीचे सकळ ब्राह्मण । तयास पुसती वर्तमान । कोठोनि आणिलें होतें धान्य । आह्माकारण सांगिजे ॥ ४० ॥ तो ह्मणे दामाजीपंत । उदार ज्ञानी धैर्यवंत । त्यानें कृपा करूनि मातें । अन्न होतें दीधलें ॥४१॥ देवें दिधलें कर्में नेलें । तैसेंच मजला घडोनि आलें । कुटुंबाचें प्राक्तन फुटलें । धान्य लुटिलें सकळिकीं ॥ ४२ ॥ ऐसी ऐकोनियां मात । सकळ ब्राह्मण निघाले त्वरित । दामाजीपंताचे मंदिरांत । आले समस्त तेधवां ॥ ४३ ॥ ब्राह्मण देखतांची दृष्टीसी । नमस्कार केला सद्भावेंसीं । द्विज आशीर्वाद देती त्यासी । कल्याण तुह्मासी असावें ॥ ४४ ॥ ह्मणती दुष्काळ पडिला कठिण । तुह्मीं ब्राह्मणासि दिधलें अन्न । तो वृत्तांत श्रवणीं ऐकून । आलों धांवून सकळिक ॥ ४५ ॥ तूं धैर्यवंत अतिउदार । चित्तीं नाहीं सान थोर । अन्नदानीं पात्र विचार । तुज साचार असेना ॥४६॥ गगनीं उगवला नारायण । तो प्रकाश करी सर्वां समान । तेविं तूं करितां अन्नदान । थोर सान न ह्मणसी ॥४७॥ आह्मी क्षेत्रवासी ब्राह्मण । उपवासी मरतों अन्नाविण । तुझी कीर्ती कानीं ऐकून । आलों धांवून या ठायां ॥४८॥ ऐकूनि द्विजवरांची मात । करुणा उपजली मनांत । मग अभय देऊनि दामाजीपंतें । विप्र समस्त बैसविले ॥ ४९ ॥ मग सदनीं जाऊन कांतेपासीं । विचार पुसे तियेसी । अन्नावांचूनि पंढरीसी । मरती उपवासी द्विजवर ॥५०॥ ते सकळ गोळा होऊनि जाण । आपुल्या घरासि आले ब्राह्मण । नाहीं

ह्मणतां त्यांजकारण । सत्वासि हानि होईल कीं ।५१। सकळ संतुष्ट करावयासी । धान्य तों नाहीं आपणापासीं । ह्मणोनि विचार पडिला मानसीं । काय ऐसियासी करावें ॥ ५२ ॥ एकास धान्य जें दिधलें । तें सकळीं त्याचें हिरूनि नेलें । दुष्काळानें लोक पीडिले । टाकूनि गेले स्वदेश ॥ ५३ ॥ कांता बोले तयाप्रती । जैशी तुह्मासि सुचेल युक्ती । तैसेंच करूनि यथानिगुतीं । द्विजांप्रती तोषवावें ॥५४॥ ह्मणे राजधान्याचीं अंबारें दोन । आपणापासीं आहेत जाण । तीं द्विजांहातीं लुटवून । वांचवावे प्राण सकळांचे॥५५॥रायासि कळतां वर्तमान।तरी कोपोन घेईल माझा प्राण । एका जीवासि येतां मरण । क्षेत्रींचे ब्राह्मण वांचतील॥५६॥म्यां एकल्यानें देहलोभ धरिला । तरी मृत्यु येईल सकळांला । ऐसा चित्तीं विचार केला । मग बाहेर आला सत्वरीं ॥५७॥ धान्य अंबारें उघडोनि त्वरित । द्विजांसि ह्मणे दामाजीपंत । जयासि धान्य जितकें लागत । न्यावें तितुकें सदनासी ॥ ५८ ॥ ऐसें ऐकोनि उदारवचन । आशीर्वाद देती सकळ ब्राह्मण । श्रीरुक्मिणीपति तुह्माकारण । करो कल्याण सर्वदा ॥५९॥ समस्त द्विजवर जाऊनि त्वरित । धान्य लुटिलें अपरिमित । हा पंढरींत कळतां वृत्तांत । लोक समस्त पातले ६० ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र जाण । वाणी बटाव अनाथ दीन । मंगळवेढ्यासी येऊन । धान्य घेऊन जाताती ॥ ६१ ॥ सुतार चर्मक नानायाती । कुलाल नापिक हीनमती । दामाजीपंताची ऐकोनि कीर्ती । धान्य नेती सकळिक॥६२॥गंवडी गवळी पाथरवट जाण । कोळी तांबट बागवान । मंगळवेढियांत सत्वर येऊन । नेती धान्य स्वइच्छा ॥ ६३ ॥ गुर्जर रंगारी खाराईत । अनुष्ठानी आणि संत महंत । ह्मणती आह्मास तुष्टला रुक्मिणीकांत । याच्या हृदयांत रिघोनियां॥६४॥ शिंपी रजक बेलदार । आणिक वर्णयाती अपार । अंत्यजादिक हीन नर । धान्य अपार ते नेती ॥ ६५ ॥ श्रोते आशंका धरितील कांहीं । कीं सकळ याती एके ठायीं । आणावयासि कारण काई । उंचनीच नाहीं निवडिले ॥ ६६ ॥ तरी पंढरीक्षेत्रीं जे राहती । ते सारिखेच मानावें निश्चितीं । पुरातन अभंगीं बोलिलें संतीं।संशय चित्तीं न धरावा ॥६७॥नवलक्ष जलचरें सागरापोटीं । परी त्याची सकळांवरी सारिखी दृष्टी । तेविं सकळ यातीस कृपादृष्टीं । पाहे जगजेठी सारिखें ॥६८॥ कीं दशलक्ष पक्षियांच्या जाती । तितुक्या आकाशांत हिंडती । तेविं सकळ यातींस रुक्मिणीपती । सारिखें चित्तीं लेखित॥६९॥नातरी वीस लक्ष स्थावरांकुर।वसुधेसि सारिखे निरंतर । तेविं पतितपावन दीनोद्धार । लेखी चराचर सारिखे॥७०॥जयांसि पूर्ण आत्मज्ञान। तेचि जाणती सिद्धांतखूण । ते दृष्टीस पाहूनि सकळ वर्ण । थोरसान न ह्मणती॥७१॥ हे उत्तम भक्तांची निजस्थिती । जाणीतली दामाजीपंतीं । ह्मणवूनि अन्न सर्वांभूतीं । वांटी निजप्रीतींकरूनी ॥ ७२ ॥ अनाथ दुर्बळ अतिदीन । त्यांचे दुष्काळीं वांचविले प्राण । परी मज घडलें अन्नदान । नव्हेच आठवण चित्तांत ॥ ७३ ॥ एकासी एक सांगती मात । कीर्ती प्रकटली स्वदेशांत । कृपण नर जे कां प्रपंचांत । ते ऐकूनि चित्तांत जळती ॥ ७४ ॥ ह्मणती राजयाचें धान्य वांटिलें । त्याच्या पदरचें काय गेलें । कायाकष्टें मेळवूनि भलें । नाहीं वांटिलें तयानें ॥ ७५ ॥ एक ह्मणती टाकूनि आपुला धंदा । व्यर्थ कां करितां

त्याची निंदा । राजयासि कळतां भरेल क्रोधा । करील आपदा बहु त्याची ॥ ७६ ॥ कायाकष्टाचें वांटावें धन । त्या-
परीस अघटित केलें तयानें । अविंधासि कळल्या वर्तमान । घेईल प्राण तयाचे ॥ ७७ ॥ ऐसी परस्परें मात । आपुल्या
घरीं लोक बोलत । परी दामाजीपंत आनंदयुक्त । हर्षशोकांत पडेना ॥ ७८ ॥ एकमासपर्यंत जाण । धान्य नेती याच-
कजन । तों पुढें ओढवलें महाविघ्न । तेंचि परिसा सज्जन भाविकहो ॥ ७९ ॥ मुजुमदार कानडा ब्राह्मण । विष्णुद्रोही
होता दुर्जन । त्यानें बेदरीं वर्तमान । रायासि लिहून पाठविलें ॥ ८० ॥ ह्मणे राजाधिराजा नराधिपती । परिसावी से-
वकाची विनंती । तुमचें धान्य दामाजीपंतीं । विप्राहातीं लुटविलें ॥ ८१ ॥ मी तुमचा ह्मणवितों अंकित । सेवेसि नि-
वेदन केली मात । ऐसा सर्व लिहूनि वृत्तांत । बेदरीं त्वरित पाठविला ॥ ८२ ॥ पत्र ऐकतांचि श्रवणीं । अविंधराजा सं-
तप्त मनीं । जेविं घृतें शिंपितां अग्नी । प्रदीप्त गगनीं होय जैसा ॥८३॥ कां वारणासि मद्य पाजितां सत्वर । तो पाडूं पा-
हे भलतेंचि मंदिर । तेविं वृत्तांत नृपवर । ऐकोनि विचार करीना ॥ ८४ ॥ ह्मणे माझी आज्ञा नाहीं घेतली । आणि धा-
न्य अंबारें कैसीं वांटिलीं । मग दूत पाठवूनि ते काळीं । तलब केली सक्रोधें ॥ ८५॥ दुर्बुद्धि धरिली मनांत । हुजूर बो-
लावूनि दामाजीपंत । शिक्षा करूनियां निश्चित । शिरच्छेद त्वरित करावा ॥८६॥ मंगळवेढ्यासि येऊन दूत । आज्ञा-
पत्र दाखविती त्वरित । ग्रामवासी लोक समस्त । चिंताक्रांत मानसीं ॥ ८७ ॥ ह्मणती अन्याय केला थोर । येणें लुटवि-
लीं धान्य-अंबारें । ह्मणोनि आले राजकिंकर । बेदरीं सत्वर न्यावया ॥८८॥ पत्र वाचितांचि त्वरित । चित्तीं उमजला
दामाजीपंत । ह्मणे मज अन्याय घडला बहुत । आतां कासया खंत करावी ।८९। दूत पाठविले न्यावयासी । दामाजीपं-
त ह्मणे त्यांसी । बेदरीं जातां पंढरीसी । रुक्मिणीकांतासी भेटावें ।९०। ऐसें ह्मणून त्या अवसरा । सत्वर आले पंढरपुरा ।
स्नान करूनि भीमातीरा । महाद्वारा चालिला ।९१। गरुडपारीं लोटांगण । घालोनि केलें पुढें गमन । मग शेजारमंडपीं
येऊन । केलें नमन साष्टांग ॥९२॥ वरतें पाहतांचि सत्वरीं । तों परब्रह्म देखिलें विटेवरी । जो अनाथनाथ भक्तकैवारी ।
विश्वोद्धारी जगद्गुरू ।९३। श्रीमुख साजिरें अतिसुंदर । दिव्य कुंडलें मकराकार । कंठीं कौस्तुभ पुष्पहार । कांसे पीतांबर
वेष्टिला ।९४। समचरण करकटीं । नासाग्रीं ठेविली असे दृष्टी । ऐसा देखोनि जगजेठी । संतोष पोटीं वाटला।९५।सप्रेम
देऊनि आलिंगन । मग सद्भावें धरिले दोनी चरण । मागुती स्वरूप न्याहाळून । कर जोडूनि विनवित।९६।ह्मणे देवाधि-
देवा रुक्मिणीकांता । शेवटील भेटी हेचि आतां । लोभ न सांडावा सर्वथा । चरणीं माथा ठेविला।९७।मीं अन्याय आ-
चरलों प्रसिद्ध । रायें अंतरीं धरिला क्रोध । आतां करावया शिरच्छेद । पाठविले दूत न्यावया।९८। परी जन्मोनि सार्थ-
क जाहलें पाहें । शेवटीं देखिले तुझे पाय । ऐसें बोलोनि लवलाहें । सद्गदित पैं जाहला ॥९९॥ गहिंवरें कंठ दाटला जाण ।
आसुवें भरले दोनी नयन । मागुती स्वरूप न्याहाळून । आज्ञा मागे दामाजी।१००। ऐसें ऐकूनि वचन । दूत ह्मणती चला
त्वरेनें । उशीर न करावा ह्मणून । जरूर जाणें असे पैं।१।मग सत्यभामा राधा रुक्मिण । यांसि साष्टांगें केलें नमन । गरु-



ड हनुमंत वंदोन । सत्वर तेथोन चालिला ।२। क्षेत्रवासी लोक समस्त । एकमेकांसी बोलत । कैसें करील पंढरीनाथ । न-
कळे निश्चित कोणासी ।३। सव्य घालोनि पंढरपुर । दामाजीपंत गेला सत्वर । संकट देखोनि रुक्मिणीवर । काय करिते
जाहले ।४। ह्मणे मजवरी त्यानें घालूनि भार । लुटविलें धान्याचें अंबार । आतां राजा सक्रोध होऊन थोर । नेतो सत्वर
मारावया ।५। तरी मी भक्तकैवारी जाण । ऐसें बोलती शास्त्रें पुराणें । आतां न करितां त्याचें धांवणें । येईल उणेंपण आ-
पणासी ॥ ६ ॥ ऐसें विचारूनि मनीं । काय करी मोक्षदानी । धान्याची गणना करूनी । द्रव्य ते क्षणीं घेतलें ॥७॥ ऐसें
बोलोनि पंढरीशें । तत्काळ धरिला अंत्यजवेष । भक्तकाजासि जगन्निवास । धरी उल्हास सप्रेमें ॥ ८ ॥ दामाजीपंता-
चें हस्ताक्षर । रायासि अर्जी लिहिली सत्वर । आपण होऊनि पाडेवार । चालिले सत्वर बेदरा ॥ ९ ॥ फाटक्या चिं-
ध्या रुक्मिणीकांतें । मस्तकीं बांधोनियां त्वरित । कंठीं घालूनि काळें सुत । पगर कानांत घातले ॥११० ॥ कांसेसि बां-
धोनि लंगोटी । हातीं सत्वर घेतली काठी । रुक्मिणी ह्मणे जगजेठी । काय गोष्टी योजिली ॥ ११ ॥ मग ह्मणे वैकुंठना-
थ । दामाजी माझा निजभक्त । त्यासि मारावया निश्चित । बेदरीं त्वरित नेलें कीं ॥ १२ ॥ त्याचें करावया काज । अ-
नामिक मी जाहलों आज । भक्तांसि संकट पडतां मज । नये लाज सर्वथा ॥१३॥ द्रव्यपोतें घेऊनि सत्वर । तयावरी के-
ली राजमोहोर । अतिलगबगें शार्ङ्गधर । प्रकटले बेदरपट्टणीं ॥ १४ ॥ द्वारपाळासि जगज्जीवन । सांगते जाहले वर्त-
मान । मी आलों मंगळवेढ्याहून । करा निवेदन धन्यासी ॥१५॥ राजाज्ञा घेऊनि त्वरित । द्वारपाळीं नेला आंत । जो-
हार करी पंढरीनाथ । नवल अद्भुत वाटलें ॥ १६ ॥ श्रुतिशास्त्रें वर्णिती गुण । त्यांसि नकळे ज्याचें महिमान । तो खालीं
करूनि मान । जोहार ह्मणून बोलत॥१७॥ अठ्यायशीं सहस्र ऋषी अमुप । जयाचे प्राप्तीस करिती तप । तो अविंधासिं
ह्मणे मायबाप । येतां अभिशाप भक्तांसी ॥ १८ ॥ वजीर पुसती त्याकारणें । कोठूनि नाईक जाहलें येणें । ऐसें ऐकोनि
मनमोहनें । बोलिलें वचन तें ऐका ॥ १९ ॥ ह्मणे मी मंगळवेढियाचा । राबता माहार दामाजीचा । खानजाद त्याच्या
घरचा । गुलाम साचा ह्मणवितों ॥ १२० ॥ ह्मणाल क्षीरसागरीं शेषशाई । तो नीचशब्द बोलेल कायी । तरी येचवि-
षयीं आपुले ठायीं । विकल्प कांहीं न धरावा ॥ २१ ॥ जो नंदाच्या गायी राखोनि जाणा । गुराखी प्रसिद्ध ह्मणवी आ-
पणा । धर्माघरीं यादवराणा । उच्छिष्टें काढी प्रीतीनें ॥२२॥ अर्जुनाचा होऊनि सारथी । घोडीं धुतलीं चहूं हातीं । तो
खानजाद ह्मणतां रुक्मिणीपती । संकोच चित्तीं धरीना।२३। नांव पुसतां तये वेळां । ह्मणे मी विठोनाईक लेंकुरवाळा ।
ऐसें बोलोनि घनसांवळा । कागद टाकिला त्यापुढें ॥२४ ॥ अक्षर वोळखितां त्यांसी । यथार्थ वाटलें अवघियांसी । अ-
र्जदास्त वाचूनि राजयासी । दाविते झाले तेधवां।२५। दृष्टीस पत्र देखोन।राजा करी आवडीं श्रवण। ह्मणे अन्याय केला
असतां जाण । काय लिहून पाठविलें ॥ २६॥ पत्र लिहिलें ऐशा रीतीं । ह्मणे राजाधिराज भूपती।सेवेसि दामाजीपंत बि-
नती । तुह्मांप्रती करीतसे ।२७। दुष्काळ पडिला स्वदेशांत । अन्न महर्घ झालें बहुत । सातशें खंडी धान्य त्वरित । तुमच्या

स्वहितार्थ विकियेलें ॥ २८ ॥ एका रुपयावरी जाण । निरख पायली होती धारण । तें सर्वही द्रव्य पोतें भरून । सेवेसि
पाठवून दीधलें।२९। विठोनाईक राबता आमुचा । कुलअखत्यार आहे घरींचा । हिशेब द्रव्य देईल साचा । जाब पा-
वल्याचा देइजे ॥ १३० ॥ ऐसें पत्र ऐकोनि जाणा । असत्य वाटलें सकळांजणां । खलेती लहान देखोनि नयना । संश-
य मना वाटतसे ॥३१ ॥ हिशेब पाहतां सकळांसी । जाऊनी सांगती रायासी ।अडसष्ट सहस्र एक लक्षासी । गणती द्र-
व्यासी पाहिजे ॥३२॥ पोतें फोडोनि जंव पाहत । तंव तें भरलें अगणित । मोजणाराचे शिणले हात । राजा विस्मित अं-
तरीं ॥ ३३ ॥ जैशा वाळूंतील विहिरी जाण । पाणी भरतां न सरे त्यांतून । तैसेंच लाघव जगज्जीवन । दावी करून त-
यांसी ॥ ३४॥ परी उमज न पडे कोणाप्रती । मायालोभें घातली भ्रांती । ते राजयाचें दैव बानिती । सभाग्य ह्मणती त-
यासी ॥३५॥ द्रव्य न सरेच अपारिमित । मग पोतें टाकिलें भांडारांत । ह्मणती धन्य दामाजीपंत । आपुलें स्वहित जा-
णतो ॥ ३६ ॥ मुजुमदाराची ऐकोनि बोली । म्यां व्यर्थचि त्याजला तलब केली । जैसीं रजकाचीं खरें भुंकलीं । ह्मणू-
नि दवडिली कामधेनु ॥ ३७ ॥ तंव अंगणीं बोले शार्ङ्गधर । पावल्याचा जाब यावा सत्वर । मंगळवेढें बहुत दूर । होई-
ल उशीर जावया ॥ ३८ ॥ दामाजीपंतासि पत्र लिहिलें । धान्याचें सकळ द्रव्य पावलें । मुजुमदारासि धरूनि वहिलें ।
बंदीं घातलें पाहिजे ॥३९ ॥ पत्र वाचितांचि तत्काळ । हक्क बुडवावा त्याचा सकळ । मंगळवेढ्यांत चिरकाळ । अखं-
ड तुह्मी असावें ॥ १४० ॥ विठोनाईकासी वस्त्रें देऊन । रायें गौरविला सन्मानेंकरून । हें देखोनि जगज्जीवन । आशी-
र्वचन बोलती ।४१। तुह्मासि हयात व्हावी धानिया । उदंड यावी दौलत दुनिया । पुढती मुजरा करूनियां । पत्र मागो-
नियां घेतलें ॥४२॥ दामाजीपंतासि वस्त्रें भूषणें । रायें दिधलीं संतुष्टमनें । शिबिका गज रथ आभरणें । दूतांहातीं पाठ-
विलीं ॥ ४३ ॥ त्यांसवेंचि जगज्जीवन । चालिले मंगळवेढियालागून । हें दामाजीपंतास वर्तमान । कळलें नाहीं स-
र्वथा ॥ ४४ ॥ तयासि बेदरीं येतां देख । वाटेसि पडली चुकामुक । तो मायालाघवी वैकुंठनायक । लीला भक्तांसि
दावितसे ॥ ४५ ॥ तया दामाजीपंतासि त्वरित । राजदूत आणिती बेदरांत । राजयासि कळला वृत्तांत । तो सा-
मोरा येत तयासि ॥ ४६ ॥ दृष्टादृष्टी होतांचि जाण । नृपवर देतसे आलिंगन । ह्मणे काल विठोमाहार येऊन ।
रसद भरून दिधली कीं ॥ ४७ ॥ वस्त्रें भूषणें तयाहातीं । तुह्मास पाठविलीं निजप्रीतीं । आह्मी कानड्याची ऐकोनि
कुमती । राग चित्तीं आणितला ॥४८॥ बोलावणें पाठवितां देख । तों कालचि आला विठोनाईक । त्यानें वृत्तांत स-
कळिक।आह्मासी देख सांगितला । ४९ । तुमचे हातींचें हस्ताक्षर । पत्र आणिलें जी साचार । द्रव्य देऊन अपार । आ-
पण सत्वर गेला कीं ॥ १५० ॥ वचन ऐकोनि दामाजीपंत ।आश्चर्य करी मनांत । मग ह्मणे शिणला पंढरीनाथ । माझा
आघात चुकवावया ॥ ५१ ॥ जो निर्गुण निर्विकार । निष्काम निरुपम साचार । तेणें अंत्यजरूप धरूनि सत्वर। माथां
द्रव्यभार वाहिला ॥ ५२ ॥ ज्याच्या मुकुटाची पाहतां दीप्ती । कोटिसूर्य लोपोनि जाती । तो पुराणपुरुष लक्ष्मीपती ।

बांधी चिंधोटी मस्तकीं ॥ ५३ ॥ कुंडलें टाकूनि मकराकार । कानीं घातले असतील पगर । कौस्तुभमणी अति सुंदर ।
सांडोनि दोर कां ल्याला ॥ ५४ ॥ शंख चक्र टाकोनि जगजेठी । हातीं घेतली असेल काठी । पीतांबर सोडोनि उठा-
उठी । नेसला लंगोटी मजसाठीं ॥ ५५ ॥ वाळे नूपुरें सांडोनि चरणा । ल्याला असेल फाटक्या वाहणा । आग लागो
माझिया जीवपणा । जगज्जीवना कष्टविलें ॥ ५६ ॥ ऐसें बोलोनि दामाजीपंत । झाला कंठीं सद्गदित । प्रेमें अश्रु नय-
नीं लोटत । तो आनंद न वर्णवे ॥ ५७ ॥ रायासमवेत सकळजन । आश्चर्य करिती मनांतून । ह्मणती अंत्यज नव्हे तो
रुक्मिणीरमण । अनुभवें खूण कळतसे ॥ ५८ ॥ तो जरी मानवी असता नर । तरी कैसा वागविता इतका भार । एक-
लक्ष अडसष्ट सहस्र। द्रव्य मोजून घेतलें ॥ ५९ ॥ तरी न्यून नव्हे पोतें । मोजणाराचे शिणले हात । मग भांडारगृहीं तें
त्वरित । टाकिलें असे अद्यापी ॥ १६० ॥ ऐसें बोलतां सकळांप्रती । विवेकें अनुताप झाला चित्तीं । ह्मणे जेणें शिणला
रुक्मिणीपती । तें कर्म मागुती करीना ॥ ६१ ॥ कानीं घालितां तुटती कान । तें कासया पाहिजे कांचन । जेणें शिणला
जगज्जीवन । तें कर्म परतोन न करी मी । ६२। मग रायासि ह्मणे ते अवसरीं । आतां पुरे तुमची चाकरी । आह्मासि नि-
रोप द्यावा सत्वरीं । पंढरपुरीं रहावया ॥ ६३ ॥ राजा ह्मणे तयालागूनी । तुमचा देवचि झाला ऋणी । तुमचेनियोगें
आह्मालागुनी । चक्रपाणी भेटले ॥ ६४ ॥ असो इकडे शार्ङ्गधर । मंगळवेढियास गेले सत्वर । घरीं सांगोनि समाचार।
अदृश्य झाले तेधवां । ६५।राजसेवा टाकूनि त्वरित । पंढरीस आला दामाजीपंत । कंठीं होऊनि सद्गदित । आलिंगन देत
देवासी। ६६।ह्मणे पतितपावना रुक्मिणीकांता । दीनबंधु पंढरीनाथा । माझिया अपराधांची गणिता । नव्हे सर्वथा को-
णासी ६७तूं सनकादिकांस पूज्यमान । शिवादिक वंदिती तुझे चरण । तो तूं अनामिक होऊन । माझा प्राण रक्षिला । ६८।
तूं विरिंचीचा जनिता । पवित्र गंगेचा आहेसि पिता । मजकारणें जगन्नाथा । अंत्यज वृथा झालासी॥६९॥विठोनाईक
नामाभिधान । तुझें ठेवणार होता कोण । घरचा लेंकवळा ह्मणोन ।आलासि सांगून रायासी। १७० ।ऐसें ह्मणोनि तये क्ष-
णीं । सप्रेम लोटले अश्रु नयनीं । स्वरूपदृष्टीं न्याहाळोनी । मस्तक चरणीं ठेविला ॥७१॥ कुटुंबासहित पंढरींत । निश्चल
राहिला दामाजीपंत । कीर्तनीं होऊनि प्रेमभरित । गुण वर्णित हरीचे॥७२॥ क्षेत्रवासी लोक बोलती । ह्मणती धन्य धन्य
याची भक्ती । ऋणी केला रुक्मिणीपती । वाढविली कीर्ती अद्भुत ॥७३॥ अघटित करूनि दाविली करणी । ह्मणोनि तु-
ष्टला चक्रपाणी । ऐसें आपापले सदनीं । लोक बोलती परस्परें । ७४। पुढिले अध्यायीं कथानक । मृत्युंजयचरित्र अलो-
लिक । आवडीनें परिसा भाविक । सौख्यदायक सर्वांसी । ७५।जरी भावार्थ नसला चित्तीं । तरी नादलुब्धही पावन हो-
ती । किंबा चकोरासि अमृत लाधतां निश्चितीं । प्रकाश देखती सर्वत्र ॥७६॥ ह्मणोनि आबालवृद्ध सकळांप्रती । प्रार्थी-
तसे महीपती । अंतरीं लावूनियां प्रीती । रुक्मिणीपती भजावा७७स्वस्ति श्रीभक्तविजय ग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ ।
प्रेमळ ऐका भाविकभक्त । चत्वारिंशाध्याय रसाळ हा ॥१७८॥ अध्याय ४० ॥ ओंव्या १७८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय४० वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । जयजयाजी पंढरीशा । लीलानाटकी जगन्निवासा । विश्वरूपा हृषीकेशा । अ-
भंगा परेशा पांडुरंगा१जयजयाजी कमलापती । विश्वात्मा तूं अंतर्ज्योती । तुझी वर्णितां स्वरूपस्थिती । कुंठित श्रुती
जाहल्या कीं ॥२॥ जयजयाजी हरिहरेश्वरा । अपरिमिता परम उदारा । निजभक्तांच्या हृदयमंदिरीं । जगदुद्धारा व-
ससी तूं ३ जयजय सगुणस्वरूपा मेघश्यामा । गुणनिधाना आत्मारामा । देवाधिदेवा पुरुषोत्तमा । भजनीं प्रेमा अ-
सोंदे ॥ ४ ॥ आतां प्रकट बैसोनि वैखरीवरी । भक्तचरित्रें वदवीं बरीं । जेणें श्रोतयांचे अंतरीं । प्रेमलहरी कोंदाटे ॥ ५ ॥
मागिले अध्यायीं कथा अद्भुत । दामाजीपंत प्रेमळ भक्त । त्याचे संकटीं रुक्मिणीकांत । निजांगें त्वरित पावले ॥६ ॥
आतां बेदरीं बादशहा होते जाण । शांतब्राह्मणी नामाभिधान । तो राज्य करितां बहुत दिन । वैराग्यज्ञान त्या जाहलें
॥ ७ ॥ तें ह्मणाल जरी कोणे रीतीं । तरी तें चरित्र परिसा निगुती । कांता घेऊनि उपरीवरती। संवाद तिजप्रती करीतसे
॥८॥ नानापरीचीं सुमनचंदनें । दिव्यवस्त्रें अलंकार भूषणें । विलास करिती दोघेजणें । निर्भयमनें असोनी ॥९॥ भोंव-
ते भृत्य ठेविले रक्षण । मग झरोक्यांत उभयतां बैसोन । उत्तम शर्करा केळीं आणवून । प्रीतीकरून भक्षिती ॥१०॥ सा-
ली काढून झरोक्यांतून । मार्गामध्यें देती टाकून । तों भणंग वेडें दुर्बळ येऊन । चोखीत बैसलें त्या ठायीं ॥११॥ राणी
देखोनि तयातें । स्वामीसि दाखवी दुरूनि हस्तें । ह्मणे अटक असतां येथें । कैसा आला कळेना ॥१२॥ ऐकोनि कांतेचें
वचन । शांतब्राह्मणी क्रोधायमान । द्वारपाळांसि बोलावून । तयांसि वचन पुसतसे ॥१३॥ तुह्मास यास्तव बैसविलें द्वा-
रीं । कीं कोणास येऊं न द्यावें मंदिरीं । आणि वेडें भणंग कैशापरी । आलें भीतरीं मज सांगा॥१४॥ ऐसें बोलोनियां वच-
न । द्वारपाळांसि केलें ताडन । ते अवघेच भणंगापासीं येऊन । लत्ताप्रहारें मारिती ॥१५॥ त्याचें दुःख न मानूनि कांहीं ।
तें हांसों लागलें तये ठायीं । शांतब्राह्मणी देखोनि पाहीं । आश्चर्य करी मनांत ॥ १६ ॥ दूतांसि सांगे तये क्षणीं । तयासि
मारूं नका कोणी । त्याचिया दुःखें सद्गदित होऊनी । शांतब्राह्मणी रडतसे।१७। मग पुसता जाहला भणंगाप्रती । द्वार-
पाळ तुजला ताडण करिती । आणि हांसें आलें कैशा रीतीं । सांग मजप्रती लवलाहें॥१८॥ ऐसें रायें पुसिलें त्वरित । म-
ग भणंग तयासि उत्तर देत । मी हांसलों निजकर्माप्रत । दृष्टीस विपरीत देखोनी॥१९॥ साल चोखोनि पाहिली किंचि-
त । तंव इतकी शिक्षा पावली येथ । पुढें तुझी कैसी होईल गत । आश्चर्य चित्तांत वाटलें ॥२०॥ मंदिरप्रदेशीं येतां जाण।
तंव इतकें मज जाहलें ताडण । तूं भीतरीं करितोसि नित्य शयन । चिंता दारुण मज वाटे ॥२१॥ चोखिली साल जिव्हे-
सि लावितां । तों निजकर्में इतुक्या बैसल्या लाता । तुह्मी आंतील मगज खातां । पुढें दंड कोणता कळेना ॥२२॥ निर्जी-
व पिठाची उंडी जाण । गिळितांचि मीन पावला मरण । मा जीव मारूनि करिती उदरपोषण । तरी गति कोण तयांची
॥२३॥ हें तुझें दुःख आठवलें चित्तीं । ह्मणोनि हांसें आलें मजप्रती । ऐकोनि भणंगाची वचनोक्ती । पालटली वृत्ती त-
त्काळ॥२४॥अनुताप धरूनियां चित्तीं । टाकिली सर्व राज्यसंपत्ती । वृत्तांत न कळतां कोणाप्रती । महाअरण्यांत पैं गे-

ला॥२५॥एकांतीं बैसोनि शांतब्राह्मणी। अतिउद्विग्न जाहला मनीं। ह्मणे सत्समागमावांचोनी। निढळवाणी मी एकला॥ २६॥ कैसें करावें ईश्वरभजन। कैसें करावें योगसाधन। कोणतें करावें देहासि दंडण। हें कांहींच मी नेणें सर्वथा॥ २७॥ कैशा असती वैराग्यगोष्टी। कैसा अनुताप धरावा पोटीं। कैसी श्रीहरी कृपादृष्टी। करील संकटीं मजलागीं॥ २८॥ कैसी करावी मानसपूजा। कैसें अर्चावें गरुडध्वजा। कैसा सफळ जन्म माझा। होऊनि येईल कळेना॥ २९॥ जनीं राहावें कवणे स्थितीं। कधीं भेटती संतमूर्ती। शांतब्राह्मणी ऐशा रीतीं। संकल्प चित्तीं आणीतसे।३०।तों आषाढमासीं पंढरपुरीं। यात्रा चालिली अतिगजरीं। दृष्टीस देखोनी ते अवसरीं। हर्ष अंतरीं वाटला॥ ३१॥ टाळ मृदंग वीणे वाजविती। वैष्णव आनंदें गाती नाचती। एकमेकांसि नमन करिती। आलिंगन देती सप्रेमें॥३२॥दिव्य पताका सोडिल्या अनेक। त्यापुढें मिरवती गरुडटके। माहेमोर्तब लावूनि देख। वैष्णव अनेक चालिले।३३। ऐसा समारंभ दृष्टीस देखोनी। शांतब्राह्मणी हर्षला मनीं। प्रीतीनें चालिला लोटांगणीं। वैष्णवांलागोनी तेधवां।३४।ह्मणे धन्य सुदिन आजिचा। समागम जोडला संतांचा। पूर्वजन्मींच्या सुकृताचा। उदय साचा जाहला कीं।३५। जें इच्छित होतों मनांत। तेंचि तत्काळ जाहलें प्राप्त। ऐसें समाधान मानूनि चित्तांत। चालिला त्वरित त्यांसवें।३६। पंढरीक्षेत्रासि येऊन। चंद्रभागेचें केलें स्नान। करूनि पुंडलीकाचें पूजन। संतसज्जन नमियेले॥३७॥ क्षेत्रप्रदक्षिणा करूनी। महाद्वारासि आला शांतब्राह्मणी। कीर्तनगजर दृष्टीं देखोनी। संतोष निजमनीं वाटला॥ ३८॥ उदंड तीर्थें आणि दैवतें। देखिलीं आणि ऐकिलीं असंख्यात। परी पंढरी ऐसें क्षेत्र अद्भुत। नाहीं दिसत त्रिभुवनीं॥ ३९॥ उपमा द्यावया पाहतां सकळ। तों एकही ऐसें न दिसे स्थळ। कैसाही दुर्बुद्धी असला खळ। तो होय प्रेमळ पंढरीसी॥४०॥ आणीक तीर्थांचें करितां स्नान। तरी तत्काळ येतो अभिमान। चंद्रभागेचें होतां दर्शन। घालिती लोटांगण एकमेकां॥४१॥ ऐसें क्षेत्र देखोनि नयनीं। शांतब्राह्मणी आनंदला मनीं। मग गरुडपारीं लोटांगणीं। प्रेमेंकरूनी जातसे॥४२॥ सकळ वैष्णवांसि करूनि नमन। दिधलें प्रीतीनें आलिंगन। मग घ्यावया देवदर्शन। शेजारमंडपीं पैं आला॥४३॥तों परब्रह्म उभें विटेवरी। दृष्टीं देखिलें ते अवसरीं। सद्भावें आलिंगन देऊनि उरीं। मग चरण नमस्कारी तेधवां॥ ४४॥ ह्मणे जयजयाजी पुराणपुरुषा। सगुणस्वरूपा हृषीकेशा। लीलानाटकी सर्वेशा। पंढरीशा श्रीविठ्ठला॥४५॥ तुझी कीर्ति ऐकूनि कानीं। शरण आलों चक्रपाणी। परि तुझें स्वरूप जाणावया मनीं। सद्गुरु कोणी भेटेना॥४६॥ तरी माझे मनोरथ करीं पूर्ण। ह्मणोनि द्वारीं बैसला घालोनि धरणें। नेघे फल मूल अथवा जीवन। वर्जिलें अन्न अनुतापें॥४७॥त्रिरात्र लोटतां त्वरित। प्रसन्न जाहला रुक्मिणीकांत। विवेकसिंधूचें पुस्तक साक्षात। दिधलें स्वप्नांत आणूनी॥४८॥ सहजानंदस्वामी कल्याणांत। तयाचा उपदेश घेईं त्वरित। स्वप्नीं सांगतां पंढरीनाथ। मग जाहला जागृत ते काळीं॥४९॥ तों पुस्तकमात्र असे तेथ। दृष्टीसि न दिसे पंढरीनाथ। आश्चर्य करितसे मनांत। चमत्कार बहुत देखोनी॥५०॥ह्मणे जगद्गुरूनें दिधलें दर्शन। तेणें



जाहलों मी पुण्यपावन। मग विवेकसिंधूपुस्तक वाचोन। करीत मनन एकांतीं॥५१॥ सहजानंदगुरु करणें। हे स्वप्नींची जाहली आठवण। मग देवासि आज्ञा मागोन। केलें गमन सत्वर॥५२॥ कल्याणास आला लवलाहीं। तंव सद्गुरु नाहीं तया ठायीं। मागुती कार्तिकमासीं पाहीं। पांडुरंगक्षेत्रासी पावला॥५३॥ तों सहजानंदस्वामी अकस्मात। तेही यात्रेस आले तेथ। शांतब्राह्मणी भेटोनि त्वरित। स्वप्नींचा वृत्तांत सांगीतला॥ ५४॥ मग त्यासि उपदेश देऊनि पाहे। नाम ठेविलें मृत्युंजय। नारायणपुरासि वास्तव्य। जाऊनि लवलाहें पैं केलें॥ ५५॥ सद्गुरुमुखें श्रवण मनन। करितां लागलें निदिध्यासन। मग साक्षात्कारासि येऊन। विज्ञानस्थिती पावला॥ ५६॥ भवराया जंगम तये स्थानीं। परमभाविक होता ज्ञानी। तो मृत्युंजयासि शरण येऊनी। उपदेश घेतला प्रीतीनें॥५७॥दुसरा समुच्चयजंगम तेथ। श्रेष्ठ ह्मणवी सर्वांत। तो भवरायाची निंदा करित। घातलें वाळीत तयासी॥५८॥ह्मणे मृत्युंजय जातीचा यवन। तयासि किंचित जाहलें ज्ञान। त्याचा उपदेश भवरायानें। नेणतां कैसा घेतला॥५९॥ शूद्रगृहींचें पक्वान्न। देखोनि काय सेविती ब्राह्मण। मद्यपात्रांत गंगाजीवन। आलिया प्राशन करूं नये॥ ६०॥ नूतन पादुका असल्या तरी। त्या बांधूं नये मस्तकावरी। महाद्वाराची पायरी। ते काय देव्हारीं पूजावी॥ ६१॥ पायींचा पोल्हारा सुवर्णमय। तो सर्वथा नाकीं घालूं नये। महावृक्षाची सरी पाहे। येरंड काय करील॥६२॥पितळ सोज्वळ उटिलें जरी। परी त्यासि कनकाची नये सरी। वृंदावन जरी घोळिलें शर्करीं। परी तें अंतरीं कडवट॥६३॥राजाची वेश्या सुंदरगुणी। परी काय बसेल पुण्याहवाचनीं। तेविं यवनयाति सद्गुरुस्थानीं। मानूं नयेची सर्वथा।६४।यापरी विकल्प धरूनि अंतरीं। समुच्चय त्याची निंदा करी। भवराया ऐकोनि ते अवसरीं। सखेद अंतरीं जाहला॥६५॥मग मृत्युंजयाजवळी त्यानें। जाऊनि सांगीतलें गाऱ्हाणें। ऐकतां सद्गुरु त्याकारणें। आश्वासन देताती।६६।ह्मणती आपुला विश्वास करूनि जतन। निवांत करी ईश्वरभजन। विकल्प द्वेषियाचें वचन। ऐकूं नये सर्वथा।६७।तंव तेथें एक होता भूपती। त्याचें नांव काशीपती। तो परम उदार सज्ञानमूर्ती। शिवभक्तीसि अतितत्पर।६८।तो नित्य दहा सहस्र जंगम जाण। आपुले मंदिरीं बोलावून। त्यांची षोडशोपचारीं पूजा करून। मिष्टान्नभोजन देतसे६९तों एके दिवशीं काशीपती। जंगम बैसवूनि भोजनपंक्तीं। पूजा करूनि निजप्रीतीं।अन्न पात्रीं वाढिलें।७०।घृत शर्करा धराधीश। निजकरें वाढीत सकळांस। मग आज्ञा दिधली तयांस। नैवेद्य शंकरास दाखवावया।७१।रुमाल सोडोनि जंव पाहात। तों अवघेचि लिंगाविरहित। ह्मणती हें जाहलें विपरीत।ह्मणोनि लज्जित मानसीं।७२।जैसा षट्शास्त्री ब्राह्मण। त्याचें यज्ञोपवीत गेलें गळोन। पाहतां होय लज्जित मन। तैसेंचि जाहलें तयांसी७३ कैंचें पूजन कैंचें भोजन। देहान्तप्रायश्चित्त वोढवलें गहन। शिव हरपोनि गेलिया जाण। जीवरक्षण न करावें ७४ लिंगधारण जेव्हां ते करिती। तेव्हां कुळगुरु ऐसेंचि सांगती। कीं लिंग टाकूं नये देहांतीं। प्रतिज्ञा घालिती जीवित्वा॥७५॥ वाळीत घालावें कवणाप्रती। सकळांची जाहली एक गती। बैसल्या दहा सहस्रमूर्ती। परी पडिली भ्रांती सकळांसी ७६

एक ह्मणती द्यावे प्राण । एक ह्मणती कासया जिणें । एक ह्मणती कैंचें भोजन । विघ्न अवचित ओढवलें ।७७।एक ह्मणती भक्षिलें राजाचें अन्न । तें आपुले पदरीं पडिलें दूषण । ह्मणोनि शंकरें सकळांकारण । दिधलें टाकून दिसताहे । ७८ । एक ह्मणती अन्नास काय बाध । आपुलाचि भाव नाहीं शुद्ध । शिव टाकूनि गेला प्रसिद्ध । लीला अगाध दाविली ।७९।ऐसें एकमेकांसि बोलती । परी उपाय न सुचे कोणाप्रती । कुंठित जाहल्या सकळांच्या मती । खालीं पाहती सकळिक । ८० । यावरी काशीपती कल्याणी । जंगमांसि पुसतसे तये क्षणीं । साधुपुरुषांची छळणा कोणी । आला करूनी दिसताहे ८१ यालागीं तुह्मां सकळांवर । क्षोभोनि पळाला विश्वेश्वर । ऐकोनि रायाचें उत्तर । पुसती साचार एकमेकां ।८२।तंव समुच्चयजंगम आपुले मनीं । ह्मणे अन्याय घडला मजकडोनी । अविंधाचा शिष्य ह्मणूनी । भवरायासी निंदिलें ॥८३॥ हा दोष घडला मज दारुण । साक्ष देतसे माझें मन । यासि उपाय करावा कवण । आह्मांकारण कळेना ॥८४॥ यावरी राजा बोले वचन । मृत्युंजयासि प्रार्था अवघेजण । तरीच संकटनिवारण । होईल जाण निश्चयेंसीं ॥ ८५॥ ऐसी राजाची वचनोक्ती । मानली सकळांचिये चित्तीं । मग उठोनियां सकळ पंक्ती । सत्वरगतीं चालिले ।८६। मृत्युंजयाचे मठांत येऊन । सकळ घालिती लोटांगण । तयासि वृत्तांत निवेदन करून । कर जोडून ठाकले ॥ ८७॥ ह्मणती भवरायात्ते साचार । आह्मीं बोलिलों दुरुत्तर । तेणेंकरून श्रीशंकर । गुप्त झाला न दिसेची ॥ ८८॥ ऐकोनियां ऐसें वचन । बैसविलें तयांलागून । मग मृत्युंजय बोले गर्जोन । सकळांप्रती तेधवां ॥ ८९ ॥ ह्मणे वेदांत सिद्धांत दोघेजण । आमुचे घरीं आहेत श्वान । त्यांनीं तुमचीं लिंगें हिरून । नेलीं असतील वाटतें ।९०। मग वेदांत ह्मणूनि हाक मारितां । तों श्वान प्रकटलें अवचितां । ह्मणे जंगमांचीं लिंगें कासया वृथा । चोरूनियां आणिलीं॥९१॥ तीं सत्वर देईं टाकून । ऐकोनि मृत्युंजयाचें वचन । पांच सहस्र लिंगें ओकून । टाकी श्वान तेधवां ।९२। मग सिद्धांत ह्मणोनि हाक मारितां जाण । तेथें प्रकटलें दुसरें श्वान । तयानें पांच सहस्र लिंगें वमून । दिधलीं टाकून ते ठायीं ।९३। ऐसें कौतुक देखोन । आश्चर्य करिती सकळजन । ह्मणती विष्णुभक्ताचें महिमान । कोणाकारण न कळेची ९४ परी आपुलालीं ओळखूनि घ्यावयासी । सामर्थ्य नव्हे कवणासी । मागुती नमस्कार मृत्युंजयासी । निजभावेंसीं घालिती ९५ जैसें श्रियाळासि पार्वतीनाथें । चिलये दाविले अष्टोत्तरशत । परी त्याचा त्यास नकळे निश्चित । तैसें आम्हांसि जाहलें कीं ।९६। मग प्रसन्न होऊनि कैलासवासी । त्याचाच पुत्र दिधला त्यासी । तैसेंच करावें आह्मांसी । ह्मणूनि चरणासी लागले ।९७। ऐकूनि त्यांचें करुणाउत्तर । ज्यांचीं त्यांपासीं गेलीं सत्वर । सकळ करिती जयजयकार । वाचेसि हरहर बोलती ।९८। ज्ञानसागरअय्या ह्मणवूनी । नाम ठेविलें सकळांनीं । मग राजमंदिरासि जाऊनी । सकळ भोजनीं बैसले ९९ ऐशा रीतीं वैष्णवभक्त । चरित्रें दाविती अघटित । महीपती तयांचा शरणागत । गुण वर्णित निजप्रेमें ।१००। स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । एकचत्वारिंशाध्याय रसाळ हा । १०१ । अ० ४१ ॥ ओ० १०१ ॥ श्रीकृष्णार्पण०





श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । जयजय वासुदेवा जगन्नाथा । कमललोचना रुक्मिणीकांता । निजभक्तांसि सुखदाता । तुजविण सर्वथा असेना ॥ १ ॥ जयजय पद्मनाभ विश्वमूर्ती । विधिजनका वैकुंठपती । विराटस्वरूपा वामनमूर्ती । अगम्यस्थिति वेदशास्त्रां ।२। जय विश्वबाहो अपरिमिता । विश्वचक्षु तूं देखता । विश्वपदीं गमनकर्ता । निगम वार्ता बोलतसे ॥३॥ हे विराटस्वरूपा हृषीकेशी । सर्वथा न कळेच निजभक्तांसी । मग सगुणस्वरूप धरूनि तयांसी । आपुले भजनासी लाविलें ॥४॥ ते जैसी इच्छा धरिती चित्तीं । तैसाच होसी क्षीराब्धिजापती । जैसें बाळकासि धरून हातीं । चाले हंसगतीं निजमाता ॥ ५॥ तें बोबडें बोले मंजुळ वचन । तेणेंच संतोषे तिचें मन । मग तैसेंच आपणही बोलून । देत चुंबन निजप्रीतीं ॥ ६ ॥ तेविं भक्तांसि कांहीं नकळतां ज्ञान । आणि वेडेंवांकुडें करितां स्तवन । तूं तैसाचि होसी जगज्जीवन । निजकृपेनें आपुल्या ॥७॥ मागिले अध्यायीं अनुसंधान । मृत्युंजयचरित्र रसाळ गहन । ऐकोनि श्रोते जाहले तल्लीन । अगाध महिमान संतांचें ।८। आतां साक्षात अवतार वासरमणी । जाहला असे प्रतिष्ठानीं । तें चरित्र रसाळ श्रवणीं । परिसावें सज्जनीं निजप्रेमें ॥९॥ सूर्य-उपासक एक ब्राह्मण । सज्ञान पवित्र भाविक जाण । तयासि जाहलें पुत्रनिधान । संतोष मनीं वाटला ।१०। तो दिवसेंदिवस जाहला थोर । मग व्रतबंध केला सत्वर । मायबापें तयावर । लोभ अपार करितातीं ॥ ११ ॥ अध्ययन सांगतां त्याजकारण । पिता जाहला क्रोधायमान । मग त्या भयेंकरून । गेला रुसोन पुत्र त्याचा ॥ १२ ॥ बाहेर जाऊनि करी तळमळ । परी कोठें लपावया न मिळे स्थळ । तंव अस्मात एक देऊळ । देखिलें तत्काळ दृष्टीसी ॥ १३ ॥ तें मेदिनींत गुप्त होतें जाण । तेथें नाहीं मनुष्याचें आगमन । मग सत्वर आंत प्रवेशोन । बैसला लपोन त्या ठायीं ॥ १४॥ सूर्यनारायणाची मूर्ती । त्या देवालयांत पुरातन होती । त्याचे चरणीं सत्वरगतीं । दंडवत प्रीतीं घातलें ॥ १५ ॥ मुलाचा भावार्थ देखोनि । प्रसन्न जाहला वासरमणी । ह्मणे अज्ञान लेंकरूं असोनी । निश्चय मनीं धरिलासे ॥ १६॥ मग मनुष्यरूप धरूनि सत्वर । तयासि भेटले दिवाकर । दुग्ध पाजोनि पोटभर । अभय वर दीधला । १७ । ह्मणे निर्भय असों देईं मन । श्रीपांडुरंगाचें करी स्मरण । कांहीं संकट पडतां जाण । तुज मी पावेन तत्काळ ॥ १८ ॥ इकडे मायबापें उद्विग्न मानसीं । धुंडिती निजपुत्रासी । सप्तदिवस लोटतां त्यांसी । परी कोठें दृष्टीसी पडेना ॥१९॥ तंव एके दिवशीं ब्राह्मणकुमर । अकस्मात आला बाहेर । तेथें एक होता द्विजवर । तेणें दृष्टीस देखिला ॥२०॥ हाक मारितांचि त्वरित । तंव तो पळाला देउळांत । ब्राह्मणें येऊनि नगरांत । पित्यासि वृत्तांत सांगितला ॥२१॥ पुत्राची शुद्धी लागतां देख । मायबापांसि वाटला हरीख । सवें घेऊनि ग्रामवासी लोक । पाहावयासी चालिले ॥२२॥ तों वोसाड देऊळ अरण्यांत । देखोनि नवल करिती समस्त । दिवट्या लावूनियां त्वरित । धीटपणें आंत उतरले ।२३। तंव नारायणाचि मूर्ती नयनीं । देखिली तेथें सकळिकांनीं । ब्राह्मणकुमर त्याचे चरणीं । मस्तक ठेऊनी निजेला ।२४।मायबापें येऊनि जवळी । पुत्रासि धरिलें हृदयकमळीं । ह्मणती एकटा कैसा वांचलास ये स्थळीं।

अश्रुपात डोळां लोटले।२५।लोक पुसती त्याकारण। तुझे कैसे वांचले प्राण। क्षुधा तृषा लागतां जाण। न मिळेचि अन्न या ठायीं ॥२६॥ ह्मणे परम तेजस्वी देदीप्यमान। येथें एक प्रकटला ब्राह्मण। तो मज करवितो दुग्धपान। तेणें प्राण वांचविले ॥२७॥ ऐकूनि बाळकाचें वचन। आश्चर्य करिती सकळजन। ह्मणती यासि भेटला सूर्यनारायण। भावार्थ देखोन निजनिष्टा॥२८॥भास्कर प्रसन्न झाला त्यास। ह्मणोनि नाम ठेविलें भानुदास। मग कडेवरी घेऊनि तयास। आले नगरास आपुल्या ॥ २९ ॥ ह्मणती ईश्वरें वांचविले याचे प्राण। आतां न बोलावें कठिणवचन। नारायणें आपल्यासि पुत्रदान। कृपा करून दीधलें ॥ ३० ॥ जैसी प्राक्तनीं असेल गती। तैसेंच घडोन येईल पुढती। आपण याची हळहळ चित्तीं। व्यर्थ कासया करावी ॥ ३१ ॥ समाधान मानोनि चित्तीं। मायबापांनीं धरिली प्रीती। विद्याभ्यास सांगावा पुढती। तरी जाईल मागुती रुसोनी।३२। वधू सत्वर विचारूनि जाण। भानुदासाचें केलें लग्न। ऐसे लोटतां बहुत दिन। करित भजन श्रीहरीचें ॥३३॥ आयुष्य सरोनि गेलियावरी। मायबापें निवर्तलीं ते अवसरीं। परी भानुदास निर्भय अंतरीं। प्रपंचव्यवहारीं गुंतेना ॥ ३४ ॥ न करी कोणाचें उपार्जन। उदीम व्यवसाय घेणें देणें। न करी कदा राजसेवन। पांडुरंगभजन करीतसे ॥ ३५ ॥ घरीं पाहिजे वस्त्र अन्न। कांतेचें हळहळीत मन। मुलें लेंकुरें सर्व असोन। उदास मन सर्वदा।३६। गृहस्थ मिळोनि चवघेजण। भानुदासासि बोलती वचन। कुटुंबासि पाहिजे वस्त्र अन्न। तुह्मांकारण कळेमा ॥३७॥ मातापिता होतीं शिरीं। त्यांणीं संसार केला आजवरी। पुढें कैशी होईल परी। तुह्मी अंतरीं उदास ॥ ३८ ॥ विद्याभ्यासही फार। तुह्मासि नाहीं जी साचार। आतां कांहीं सांगतों विचार। तो परिसा सादर निजकर्णीं ॥ ३९ ॥ एक शत द्रव्य भांडवल जाण। आह्मी देतसों तुह्मांकारण। त्याचें कापड घेऊन। चाटेपण करावें ॥ ४० ॥ नफा मिळेल तेणेंकरून। कुटुंबासि करावें वस्त्र अन्न। आमुचें मुद्दल जतन करून। हळूच देणें स्वइच्छा ॥ ४१॥ मग गृहस्थीं जाऊनि बाजारासी। कापड घेऊन दिधलें तयासी। इतर उदमी होते त्यांसी। भानुदासासी निरविलें ॥ ४२ ॥ ह्मणती तुह्मीं जातसां बाजारीं। तेव्हां न्यावें यास बरोबरी। बैसवूनि आपुले शेजारीं। प्रपंचव्यवहारीं लावावें ॥ ४३ ॥ गृहस्थांचें वचन ऐकोनि कानीं। मान्य केलें व्यवसायांनीं। मग भानुदासासि सवें घेऊनी। आपुले सन्निध बैसविती।४४। मुळु उदानु अंगोळू ऐसी। नंदभाषा सांगितली त्यासी। केवला काठी पवित्रू त्यासी। सांगोनियां दीधलें ॥ ४५ ॥ सेळु पोकू आणि ढकार। आवारू खूण सांगती सत्वर। कोणतें कैसें यावें अंबर। हाही विचार सांगितला।४६।मुद्दल जतन करूनि जाण। लाभ सांगावा विचारून। कोणासि बोलतां सत्यवचन। तरी होतसे हानि निश्चितीं ॥ ४७ ॥ भानुदास बोले तयाप्रती। मी असत्य न वदे कल्पांतीं। कांहीं न मिळो मजप्रती। परी सत्य निश्चितीं बोलेन॥४८॥ व्यवसायी हांसती सकळिक। ह्मणती याचे कपाळीं लिहिली भीक। ह्मणोनि आमुचें नायके एक। दरिद्री देख या नांव ॥४९॥ एक ह्मणती लागलिया लांचे। मग असत्य उदंड बोलेल वाचे। प्रपंचव्यवहारीं बोलतां साचें। कोणी दैवाचें दिसेना॥ ५०॥

जेवीं गर्भांधाचे दृष्टीस जाण। अवघें आंधळें वाटे जन। कीं रोग असतां शरीराकारण। कडवट पक्वान्न त्या भासे।५१। तेवीं आपुले अंतरीं असत्य नर। तयासि न दिसे कोणी खरें। जैसें जयाचें असेल अंतर। तैसेच इतर भासती ॥ ५२ ॥ भानुदासाचें धैर्य मोठें। प्रपंचव्यवहारीं न बोले खोटें। सकळ लोकांसि नवल वाटें। देखोनि निकटें तयासी ॥ ५३ ॥ कोणी गिराईक पुसे अंबर। त्यासि किंमत सांगे खरोखर। इतका नफा मुदलावर। एकदा उत्तर बोलतसे ॥ ५४ ॥ चित्तास येईल तरी घेणें। नाहीं तरी दुसरे दुकानीं जाणें। इतुकें मात्र बोलोनि वचन। मग नामस्मरण करीतसे ॥५५॥ जनीं जनार्दन भरिला जाण। निश्चय कळला सकळांकारण। ह्मणती भानुदास असत्यवचन। न बोलेची कल्पांतीं।५६। ऐसें जाणोनि ग्राहिक। त्यापासीं जाती सकळिक। इतर व्यवसायी अकर्मिक। दुरून कौतुक पाहती ॥ ५७ ॥ ह्मणती आपुल्यासवें लाविलें यासी। तें बाधक जाहलें आपुल्यासी। मग द्वेष उपजला मानसीं। दुराचारियांसी तेधवां।५८। ह्मणती आह्माशेजारीं बैसतो। आणि ग्राहीक आपणाकडे नेतो। आह्मी तोंटाकडे टकमका पाहतों। पोटीं जळतीं उगेची ॥५९॥ एक ह्मणती घालितो मोहनी। तेणेंचि जन जाती भुलोनी। मागितलें मोल देती टाकोनी। घसघस कोणी करीना।६०। एक ह्मणती बैसला विश्वास। तेणेंचि जन भजती त्यास। आपण असत्य प्रपंचदास। हें ईश्वरास मानेमा ॥६१॥ एक म्हणती आतां बोलावें खरें। दुजा देतसे प्रतिउत्तर। आपुला विश्वास कोणी इतर। यथार्थ साचार न मानिती।६२। एकदा वृत्ति ठसावे जैसी। तेचि जन्मवर चाले तैसी। प्रत्यक्ष आपुल्या दृष्टीसी। भानुदासासी घडली कीं ॥ ६३॥ श्वान उगेंच बैसलें घरीं। आणि मनुष्यें चोरून नेल्या भाकरी। तरी आळ येईल श्वानावरी। कोणासि अंतरीं कळेना ॥६४॥ व्याघ्रें धरितां निजशांतीसी। ह्मणतील जपतो मारावयासी। धनलोभी होतांचि उदासी। म्हणती नाडावयासी निघाला ॥ ६५ ॥ कीं जार तीर्थीं हिंडतां खरा। ह्मणती हा धुंडितो परदारा। शांति धरूनि बैसतां मार्जारा। म्हणती उंदिरा पाहतसे ॥ ६६ ॥ तेवीं आपुला जन्म असत्य बोलतां। गेला असे सकळां देखतां। आतां यथार्थ जरी वर्ततां। ह्मणतील वृथा कपट हें ॥ ६७॥ आपुल्या देखतां भानुदासाचा। व्यवहार किंचित कापडाचा। आतां तो थोर भाग्याचा। ईश्वर तयाचा साहकारी ॥ ६८ ॥ आपण उदंड करितां भरोभरी। परि पोटभर न मिळे भाकरी। ऋणकरी येऊन बैसती द्वारीं। आतां कैसी परी करावी ॥ ६९ ॥ भानुदासासि संगतीस लाविलें। तैंपासोनि आपुलें निघालें दिवाळें। ग्राहीक त्यानें सकळ नेले। आम्ही तळमळ करितसों ॥ ७० ॥ एके दिवसीं सकळ व्यवसायी। बाजारासि गेले पाहीं। वाट वोसरतां लवलाहीं। देउळीं येऊन राहिले ॥ ७१ ॥ त्यांसवें भानुदास वैष्णवभक्त। आले होते बाजारांत। त्यांजशेजारीं बिऱ्हाड त्वरित। त्यानें आणोनी लाविलें।७२। तंव त्या गांवांत हरिदास येऊन। त्यानें रात्रीं मांडिलें कीर्तन। गांवांत फिरतसे बोलावणें। कथेसि येणें ह्मणोनी ॥ ७३ ॥ भानुदास ऐकोनि मात ऐसी। उल्हास वाटला चित्तासी। ह्मणे आज सुदिन एकादशी। जावें कीर्तन ऐकावया ॥ ७४ ॥ व्यवसायांसी ह्मणे ते अव-

सरीं । आतां कीर्तनासी चलावें सत्वरीं । आळस आणूनि न याल जरी । निजाल बिऱ्हाडीं सकाळिक ॥ ७५॥ तरी माझें दुकान रक्षून । तुह्मी आपल्यापासीं करा जतन । ऐकोनि भानुदासाचें वचन । सक्रोधमन ते जाहले ॥ ७६ ॥ ह्मणती तूं जाहलासि देवलसी । अखंड सत्यवचन बोलसी । आतां जावें हरिकथेसी । आपुले बिऱ्हाडासी घेऊनी ॥७७॥ आह्मां सकळांसि आला टणक । आतां निद्रा करितों देख । तरी बिऱ्हाड पाहूनि आणिक । दुकान तेथें ठेवींका ॥ ७८ ॥ येथें तस्कर पडालिया पाहीं । तरी आमुचे अंगीं शब्द नाहीं । कीर्तनांत पडतें पदरीं कायी । तें आह्मांसि कांहीं कळेना ॥ ७९ ॥ भानुदास उत्तर देत पहाहो । बिऱ्हाड जावो अथवा राहो । परी पांडुरंगीं जडला भावो । तो मी सर्वथा न सोडीं ॥ ८० ॥ ऐसें बोलोनि वैष्णवभक्त । बिऱ्हाड टाकोनि गेला त्वरित । कीर्तनीं बैसले साधुसंत । तेथें त्वरित पातला ॥ ८१ ॥ अतिउल्हास धरूनि मानसीं । नमस्कार केला हरिदासांसी । ह्मणे धन्य पर्वकाळ एकादशी । क्षेम संतांसी दीधलें ॥ ८२ ॥ रामकृष्णचरित्र तारक जनीं । वैष्णव गाती प्रेमेंकरूनी । तें भानुदास आवडीकरूनी । ऐकती श्रवणीं निजप्रेमें ॥ ८३ ॥ इकडे व्यवसायी दुर्मती । बिऱ्हाडीं बैसोनि विचार करिती । कीं भानुदास गेला कीर्तनाप्रती । बिऱ्हाड निश्चितीं टाकुनी ॥८४॥ तरी आतां करूनियां युक्त । अश्व सोडोनि द्यावा त्वरित । दिंड टाकावें गारींत । तयासि मात नकळतां ॥ ८५॥ तो आपणासि पुसेल जर । तरी त्यासि सांगावें आले तस्कर । आह्मांसि निद्रा लागली फार । तों गेले सत्वर नकळतां॥८६॥मग तो घरासि जाईल परतोन । आपण कापड घेऊं वांटोन । ऐसा विचार करूनि दुर्जनीं । अश्व सोडून दीधला ॥ ८७ ॥ गर्ता पडली होती थोर । त्यामाजी दिंड टाकिलें सत्वर । टाळिया पिटोनि येरयेर । देती उत्तर एकमेकां ॥८८॥ भानुदास लागला आमुचे संगतीं । तैंपासोनि त्यासि आली संपत्ती । दरिद्र आलें आह्मांप्रती । ग्राहीक जाती त्याकडे॥८९॥ ते सर्व चिंता आजि निरसली । औषधावांचोनि खरूज गेली । ऐसी एकमेकांसी बोली । दुर्जनीं मांडिली तेधवां ॥९०॥ धर्माची हिरून घेतां संपत्ती । जैसा दुर्योधन उल्हासला चित्तीं । तैसे ते व्यवसायी दुर्मती । संतोष मानिती निजमनीं ॥९१॥ ऐसा अपाय देखोनि त्वरित । सत्वर पावले रुक्मिणीकांत । ह्मणे भानुदास बैसला कीर्तनांत । निश्चळ चित्त करूनी ॥ ९२ ॥ दुर्मती मिळोनि अवघेजण । गर्तेमाजी टाकिलें दुकान । आतां विचार करावा कवण । जगज्जीवन ह्मणतसे॥९३॥ अश्व जाईल एखादीकडे । मग तो पाहील कोणीकडे । त्यानें प्रपंचाची टाकूनि चाड । लाविलें वेडें सद्भजनीं ॥९४॥ ऐसें ह्मणोनि पंढरीनाथें । विप्रवेष धरिला त्वरित । अश्व पाहूनि बाजारांत । धरूनि बैसत तेधवां ॥९५॥ जो क्षीरसागरीं शेषशयन । ज्याचे लक्ष्मी ध्यातसे चरण । तो भक्तकैवारी मनमोहन । अश्व धरून बैसला । ९६ । योगी बैसले समाधीशीं । त्यांच्या लवकरी नये ध्यानासी । तो भक्तकैवारी हृषीकेशी । धरूनि अश्वासी बैसला ।९७। व्रतें तीर्थें तपें योग । करितां नातुडे श्रीरंग । तो पुंडलीकवरद पांडुरंग । अश्व धरून बैसला । ९८ । जो विरिंचीचा निजजनिता । अनंत ब्रह्मांडांचा कर्ता । तो भानुदासाचा अश्व जातां । धरूनि चोहटा बैसला।९९।व्यवसायी बैसले देउळांत । ते भानुदासाची निंदा करीत । ह्मणती आतां येईल अकस्मात । दुकान त्वरित पाहावया ।१००। येथील वृत्तांत कळतां सकळ । मग करीत बैसेल तळमळ । ऐसें परस्परें बोलती खळ । ऐकोनि घननीळ कोपला ।१। अवकृपा करितां जगज्जीवनें । तों अकस्मात तस्कर आले जाण ।व्यवसायांचें दुकान लुट्टून । केलें ताडन सकळांसी ।२।सकळ घोडीं सोडोनि नेलीं । मग रडत बैसले तये वेळीं । ह्मणती भानुदासाची छळणा केली । ते प्रचीत दाविली पांडुरंगें ३ एक ह्मणती ये संधीं । कर्मासारिखी होतसे बुद्धी । आपण ज्ञानहीन त्रिशुद्धी । विचार आधीं न केला४ एक ह्मणती प्राक्तन खोटें । ह्मणोनि कर्म घडलें वोखटें । भानुदास भक्त एकनिष्ठ । केली कटकट व्यर्थ तयासी ॥५॥ दीर्घस्वरें रडती जाण । कोणी नगरांतूनि नये धांवून । तो मायालाघवी रुक्मिणीरमण । घातलें मोहन सकळांसी ।६। इकडे कीर्तनीं होय आनंदगजर । मृदंगवीणे वाजती सुस्वर । तेणें नादें कोंदलें अंबर । होत गजर नामाचा७चार घटिका यामिनी उरली होती । तेव्हां वैष्णवीं केली आरती । भावें ओंवाळूनि रुक्मिणीपती । खिरापती वांटिल्या८नमस्कारूनि हरिदासासी । भानुदास चालिले बिऱ्हाडासी । तंव एक ब्राह्मण अश्वासीं । धरूनि वाटेसी बैसला ॥ ९ ॥ सन्निध चालोनि जातांचि पाही । अश्व हिंसला ते समयीं । ह्मणे आपुला अश्व ये ठायीं । कैसा आला कळेना ॥ ११० ॥ तंव त्याचे गळ्यांत अंगवस्त्र घालून । धरूनि बैसला एक ब्राह्मण । तो भानुदासासि देखतांचि जाण । अदृश्य झाला ते ठायीं ॥११॥ ऐसें कौतुक देखोनि सत्वरीं । विस्मित झाला निजअंतरीं । मग अश्व धरूनि निजकरीं । भानुदास बिऱ्हाडीं पातले ॥१२॥ तों व्यवसायी आपुले सांगाती । दीर्घस्वरें रुदन करिती । वृत्तांत पुसतां तयांप्रती । मग ते सांगती सकळिक ॥ १३ ॥ आह्मीं दुर्बुद्धि भाग्यहीन । करूं पातलों तुझें छलन । गर्तेमाजी दिंड टाकून । अश्व सोडून दीधला ॥ १४ ॥ मग दोनप्रहर भरतां निशी । तस्करीं लुटिलें आह्मांसी । प्राक्तनाची गति ऐसी । कोणापासीं सांगावें ॥ १५ ॥ घोडीं दिंडें गेलीं समस्त । आणि मारही बसला अपरिमित । पुढें संसाराची मात । खुंटली निश्चित दिसताहे ॥ १६॥ आमुचें भांडवल बुडोनि गेलें । तुझें ईश्वरें वांचविलें । पैलगर्तेमाजी टाकिलें । तें सांभाळिलें पाहिजे ।१७। ऐसें वचन ऐकूनि सत्वर । भानुदासाचें द्रवलें अंतर । ह्मणे अश्व धरूनि रुक्मिणीवर । बैसले असतील वाटतें ॥१८॥ मग ह्मणेरे कटकटा । प्रपंचव्यवहार करितों खोटा । तेथें आत्मसुखाचा नाहीं सांठा । व्यर्थ करंटा भुललों मी ॥ १९ ॥ सांवळा सकुमार राजीवनयन । पीतांबधारी जगज्जीवन । तो मजसाठीं विप्रवेष धरून । अश्व धरून बैसला ॥१२०॥ जेणें शीण आला पंढरीनाथा । तें कर्म आतां न करावें सर्वथा । ऐसा अनुताप धरूनि चित्ता । जाहला बोलता तयांसी ॥२१॥ व्यवसायांसि ह्मणे भानुदास । आतां स्वस्थ करावें मानस । तस्करीं दंडिलें तुह्मास । तरी खेद चित्तास न करावा ॥२२॥ गर्तैंतूनि दिंड काढोनी । वस्त्रें दिधलीं तयांसि वांटोनी । अश्व द्रव्य त्यांसि अर्पूनी ; भानुदास तेथोनी निघाले ॥ २३ ॥ निजमंदिरासि जाऊन । करीत बैसला हरिभजन । टाकोनियां मानाभिमान । कीर्तनीं गुण गातसे ॥ २४ ॥ न करी कोणाचें उपार्जन । प्रपंचचिंतेंत न घाली मन । कु-

टुंब कलत्र असोव उदासपणें वर्ततसे ॥ २५ ॥ आषाढी कार्तिकी येतां बरी । चालवी पंढरीची वारी । टाळमृदंग घोषगजरीं । कीर्तन करी वाळवंटीं ॥२६॥ नानापरीची कवित्वकळा । रचूनि आळवी घनसांवळा । हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा । कीर्तनीं गळा सद्गदित ॥ २७ ॥ भानुदास कीर्तनीं उभे राहती । तेव्हां स्वानंदजळें नेत्र भरती । तें आवडी देखोनि रुक्मिणीपती । नृत्य करिती त्या ठायीं ॥२८॥ दुर्बुद्धि अथवा अज्ञानखळ । तेही ऐकूनि होती प्रेमळ । ह्मणती तया मुखींचें कीर्तन प्रांजळ । सर्वकाळ ऐकावें ॥ २९ ॥ कैंची लटकी प्रपंचमाया । कैंची नाशवंत हे काया । ऐसें ज्ञान होऊनि श्रोतयां । धरिती दया सर्वांभूतीं ॥१३०॥ अयाचित वृत्ती करून । कोणी देईल वस्त्र अन्न । परी स्वमुखें करूनि जाण। नाहीं मागणें कोणासीं ॥ ३१ ॥ आपलें आणि परावें । हे कल्पनाचि नाहीं स्वभावें । सर्वांभूतीं ऐक्यभाव । विकल्प वाव टाकिला ॥ ३२ ॥ यापरि भानुदासाचें चित्त । सदा सर्वकाळ वैराग्यभरित । प्रेमउल्हासें दिवसरात । भजन करीत श्रीहरीचें ।३३। पुढिले अध्यायीं जगदुद्धारा । राजा नेईल विद्यानगरा । ते सुरस कथा ऐकतां चतुरां । उल्हास अंतरीं वाटेल ॥ ३४ ॥ संतसज्जन दैवतमेळीं । महाराष्ट्र ओंव्या फुलें मोकळीं । महीपती घेऊनि पुष्पांजळी । उभा जवळी तिष्ठत ॥ ३५॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । द्विचत्वारिंशाध्याय रसाळ हा ॥ १३६ ॥ अध्याय ४२ ॥ ओंव्या १३६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीवसुदेवनंदनाय नमः । ऐका श्रोते सज्जन प्रेमळ । आजि कल्पतरूसि पातलें फळ । जे भक्तकथा अति रसाळ । प्रकटल्या प्रांजळ निरुपम ॥१ ॥ जो अनिर्वाच्य वैष्णवमहिमा । विरिंचीसि न कळे ज्याची सीमा । जयाचा पार नेणवे निगमा । तो अनुपम प्रेमा आजिजे ॥ २ ॥ जयांसि सत्कर्माची प्रधान । ते अंतीं पावती ब्रह्मभुवन । जे यज्ञयाग आचरती जाण । ते करिती गमन स्वर्गलोकीं ॥३॥ जे पितरांचेठाईं भाव धरिती । ते अंतीं पितृवासींच विचरती । जे ज्या देवातें भजती । तें पद पावती अंतीं ते ॥४॥ पिशाच उपासिती तामसगुणी । ते तैसेच होती देहांतीं मरणीं । जे भक्तकथा ऐकती श्रवणीं । ते वैकुंठभुवन पावती ॥ ५ ॥ त्यांचें संकट देखतां नयनीं । तें तत्काळ निवारी चक्रपाणी । अंतीं चतुर्भुजरूप करूनी । सायुज्यसदनीं बैसवी ॥ ६ ॥ ऐसा वर पंढरीनाथें । दिधला असे या ग्रंथातें । ह्मणोनि श्रोते सादरचित्तें । ऐका श्रवणार्थ निजप्रीतीं ॥७॥ मागील अध्यायाचे अंतीं । भानुदासास भेटले रुक्मिणीपती । मग त्यानें धरून विरक्ती । प्रपंचवृत्ती सांडिली ॥ ८ ॥ आतां ऐका यावरी निरूपण । पंढरीक्षेत्रींचा एक ब्राह्मण । द्रव्य-इच्छा मनीं धरून । देशावरासी चालिला ॥ ९ ॥ तो पुरें पट्टणें पाहतां सत्वरा । अकस्मात आला विद्यानगरा । नगरीं प्रवेशोनि सत्वरा । ह्मणे नृपवरा भेटावें ॥१०॥ स्नानसंध्या करूनि द्विजवर । मग प्रवेशला राजमंदिर । परी द्वारपाळ जाऊं न देती सत्वर । बैसा क्षणभर ह्मणोनी ॥ ११ ॥ भूपतीची आज्ञा आणितों सत्वर । मग प्रवेशा जी नृपमंदिर । रायासि पुसोनि आले किंकर । मग भीतरीं द्विजवर प्रवेशला ॥१२॥ ब्राह्मणास देखोनि रामराजा । नमन करूनि केली पूजा । अतिउल्हास वाटला द्विजा । ह्मणे धन्य महाराजा धर्ममूर्ति ॥ १३ ॥ राजा पुसे त्याजकारण । कोठोनि जाहलें जी आगमन । काय मनीं इच्छा धरून । कृपा करून आलेती ॥ १४ ॥ ऐसें पुसतां नृपनाथें । ब्राह्मण सांगे उल्हासयुक्त । ह्मणे पंढरीक्षेत्र अतिअद्भुत । वास्तव्य तेथें असे कीं ॥ १५ ॥ तुझें औदार्य ऐकोनि सत्वर । पाहावयासि आलों देशावर । वचन ऐकोनि नृपवरा । संतोष थोर वाटला ॥१६॥ राजा ह्मणे ब्राह्मणासी । तुह्मीं असावें स्वस्थमानसीं । मी स्नान करून त्वरेंसीं । देवीपूजनासी जाईन ॥१७॥ तुह्मीं तेथें येऊनि पाहावें स्थळ । सुवर्णकांति असें देऊळ । मी अर्चन करूनि सकळ । तुलसीदल अर्पीन ॥१८॥ ऐसें बोलतां तयाप्रती । द्विज संतोष पावला चित्तीं । देवीदर्शना चालिला भूपती । त्याचे संगतीं जातसे ॥१९॥ देवालयाभोंवतीं अमोलिका । रायें लाविली पुष्पवाटिका । अंतरगाभारीं स्थापून अंबिका । समारंभ निका करीतसे ॥२०॥ नाना वाद्यांचे होती गजर । पूजा करीत बैसला नृपवर । द्विज बोलती मंत्रोच्चार । आनंदें गजर होतसे ॥ २१ ॥ षोडशोपचारें करूनि पूजन । देवीस लेववी वस्त्रेंभूषणें । नानापरीचीं दिव्यरत्नें । शोभायमान दिसती पैं ॥ २२ ॥ चंदनादिक उपचार । कंठीं घातले सुमनहार । धूप दीप करूनि नृपवर । नैवेद्य भावें अर्पितसे ॥ २३ ॥ मग पंचारती उजळोनियां । ओंवाळिली महामाया । साष्टांगनमस्कार घालोनियां । लागला पायां नृपनाथ ॥ २४ ॥ प्रसाद वांटोनियां सकळांसी । राजा बैसला स्वस्थमानसीं । मग पंढरीच्या द्विजासी । बोलता झाला तेधवां ॥ २५ ॥ ह्म-

णे राजाई ऐसें दैवत पाहीं। धुंडितां त्रिभुवनीं न दिसे कांहीं। आह्मीं देखिलें ऐकिलें नाहीं। धन्य नवाई अगाध ॥२६॥ सुंदर देऊळ पहावें नयनीं। यासि रुप्याचें सारिलें पाणी। भोंवतीं पुष्पवाटिका लाऊनी। पूजितों सुमनीं जगदंबा ॥२७॥ वियानगरींचे सकळजन। येती घ्यावया दर्शन। सेवेसि लाविले प्रधानजन। मी निजांगें पूजन करीतसें॥२८॥ तुह्मी राहतां पंढरीसीं। तेथें तो महिमा नसेल ऐसी। राजाई ऐसे पांडुरंगासी। उपचार तयासी नसतील॥ २९ ॥ दुर्बळ ब्राह्मण करिती पूजन। तेथें कैंचें वस्त्रभूषण। ऐकोनि रामरायाचें वचन। विप्र निजमनीं क्रोधावला॥ ३० ॥ मग ह्मणे गा नृपनाथा। पंढरी दृष्टीस न देखतां। आपुलीच थोर ह्मणसी देवता। अभिमान वृथा धरूनी ॥ ३१ ॥ देउळासि रुप्याचें दिधलें पाणी। तेंचि भूषण सांगसी जनीं। आमुचें क्षेत्र सुवर्णकोंदणीं। गेला रचोनि विश्वकर्मा ॥ ३२ ॥ तेथें कल्पतरूचीं लागलीं झाडें। परिस चिंतामणी लोळती खडे। दिव्यपताका चहूंकडे। चपळे ऐशा फडकती ॥ ३३ ॥ तेथें कामधेनूचीं गोधनें। रत्नजडित वृंदावनें। तेथें प्रेमळ वैष्णवजन। करिती कीर्तन उल्हासें॥३४॥ तेथें चंद्रभागा अमृतवाहिनी। जे सकळ तीर्थांची स्वामिनी। दर्शनेंचि मुक्त होती प्राणी। वैकुंठभुवन पावती ॥३५॥ रंभा तिलोत्तमा येऊनि सुंदरी। नृत्य करिती गरुडपारीं। गंधर्वगायन होतसे द्वारीं। नाद अंबरीं कोंदाटे।३६। ऐसा देवाधिदेव रुक्मिणीकांत। क्षीरसागरीं होता नांदत। तो पुंडलीक देखोनि निजभक्त। आला त्वरित त्या ठायां ॥ ३७ ॥ दोनी कर ठेऊनि जघनीं। उभा राहिला चक्रपाणी। निजभक्तांचें संकट देखोनी। पावे ते क्षणीं निजांगें ॥ ३८॥ त्याचें स्वरूप पाहतां नयनीं। लक्ष्मी लज्जित जाहली मनीं। कोटिसूर्य जाती लपोनी। मुकुटावरूनी तयाच्या ॥ ३९ ॥ सांवळा सकुमार शार्ङ्गधर। कांसे कसिला पीतांबर। दिव्यकुंडलें मकराकार। श्रीमुख मनोहर साजिरें ॥ ४० ॥ हें रूप देखावया दृष्टीं। इंद्रादिदेव तेहतीसकोटी। कर जोडोनि सदा तिष्ठती। सद्भावें स्तविती निजप्रेमें॥४१॥ ज्याचें नाम अहर्निशीं। एकांतीं जपे कैलासवासी। श्रुतिशास्त्रें वर्णिती जयासी। पार विरिंचीसी नेणवे॥४२॥सहस्रमुखें स्तवन प्रीती। शेष करिता जाहला निगुती। जिह्वा चिरूनी दुखंड होती। मग निवांतस्थितीं राहिला॥४३॥पांडुरंगा ऐसें दैवत। आणि पंढरी ऐसें पुण्यक्षेत्र। चंद्रभागेऐसें पावनतीर्थ। नाहीं दिसत त्रिभुवनीं ॥ ४४ ॥ हें दृष्टीस आधीं न पाहतां। आपुलेंच भूषण सांगसी वृथा। राजाई तुझी कुळदेवता। हें माझिया चित्ता नये कीं ॥४५॥ हे नित्य पंढरीस येऊन। करीतसे सडासंमार्जन। ऐसें बोलतांचि ब्राह्मण। क्रोधायमान नृपनाथ।४६॥ह्मणे माझी आराध्यदेवता। यानें निंदिली मजदेखतां। आपुलीच सांगे प्रशंसवार्ता। विचार चित्तीं न करितां ॥४७॥ आतां जीवें मारावें यासी। तरी अधिकारी व्हावें दोषासी। शिक्षा करूनि द्विजासी। नगरप्रदेशीं दवडावा ॥ ४८॥ मग ब्राह्मणासि ह्मणे नृपवर। तूं असत्य बोलिलासि उत्तर। सुवर्णमय पंढरपुर। ऐकिलें साचार नाहीं कीं।४९। आणि राजाईदैवत मूळपीठवासी। इजला स्वमुखें ह्मणतोसि दासी। तरी शिक्षा करूनि तुजसी। अरण्यासी दवडीन ॥ ५० ॥ मग ब्राह्मण ह्मणे ऐक भूपती। म्यां यथार्थ सांगितलें तुजप्रती। तुह्मीं पं-



ढरीस येऊन सत्वरगतीं। रुक्मिणीपती पाहावा।५१। म्यां सांगितलें त्याचें महिमान। त्याहूनि विशेष कोटिगुणें। तुझे दृष्टीस न पडतां जाण। मग मज दंडन करावें। ५२ ॥ तों देवाधिदेव देखिला नाहीं। तोंवरीच थोर हे राजाई। जैसा सूर्योदय न होतांचि पाहीं। दीपक सोज्वळ दीसती ॥ ५३ ॥ जों देखिला नाहीं ऐरावती। तों इतर वारण थोर भासती। कीं पौर्णिमेचा नुगवतां निशापती। उडुगणें वाटती सतेज५४नातरी सुधारस न येतां हाता। इतर रसांची तंवचि वार्ता। कीं पयोब्धि दृष्टीस न देखतां। दिसती सरिता अनुपम५५कल्पतरूंचें न देखिलें वन। तोंवरी आवडे आंबेवन। ऐकिलें नाहीं वेदांतज्ञान। तोंवरी पाखंडगान आवडे।५६। देखिला नाहीं सुवर्णपर्वत। तोंवरीच पितळ झगमगित। तेविं जों देखिला नाहीं पंढरीनाथ। तों इतर दैवतें आवडती ॥ ५७ ॥ ऐकोनि ह्मणे नृपवर। आतां पंढरीस येतों सत्वर। सांगितल्याऐसें देखिलें जर। तरीच बरें द्विजवरा ॥५८॥ आणि असत्य वदलें असेल जरी। तरी शिक्षा करीन तुज सत्वरीं। मग प्रधानासि सांगे ते अवसरीं। करावी स्वारी निजांगें।५९। अश्व गज रथ शिबिकाभरण। सर्वे घेऊनि कांहीं सैन्य। राजा सत्वर चालिला जाण। पांडुरंगदर्शम घ्यावया।६०। नाना वाद्यांचे होताति गजर। तयांमागून चाले द्विजवर। ह्मणे लज्जा रक्षील रुक्मिणीवर। कीं करील अव्हेर दीनाचा ॥६१॥ म्यां सांगीतले जैशा रीतीं। तैसें न देखे जरी भूपती। तरी शिक्षा करील मजप्रती। संशय चित्तीं न धरितां॥ ६२ ॥ मग ध्यानीं आणोनि पांडुरंगमूर्तीं। स्तवन करी आपुले चित्तीं। ह्मणे भक्तवत्सला रुक्मिणीपती। मज या आकांतीं पावावें।६३॥ अनाथ दीन तुझा ब्राह्मण। देशावरासी निघालों जाण। तुझें सांगूनि नामाभिधान। कुटुंबरक्षण करीतसें।६४। देवा तुझी अद्भुत कीर्ती। वर्णिली आहे मागिल्या संतीं। तैसीच सांगितली रायाप्रती। परी यथार्थ चित्तीं वाटेना ॥ ६५॥ त्याची निंदिली कुळदेवता। ह्मणोनि राग आला नृपनाथा। साक्ष पाहावयासि आतां। पंढरीनाथा येतसे ॥६६॥ पंढरी आहे जैशा रीतीं। तैसेंच कथिलें रायाप्रती। परी कलियुगीं मृत्तिकेच्या भिंती। लोकांसि भासती अभिन्नत्वें।६७।जैसें वडिलांचें द्रव्य पुरलें असे। तें निर्दैव्यासि पाहतां दिसती कोळसे। तैसीच पंढरी सुवर्णमय असे। परी विकल्पें न दिसे सर्वथा॥ ६८।संतीं मागें केली कथनी। म्यां तैसेंचि सांगीतलें त्यालागोनी। आतां दृष्टीस न देखतां चक्रपाणी। तरी मजलागोनी दंडील तो ॥ ६९ ॥ मग मी आपुला देईन प्राण। परी असत्य होईल संतवचन। पुढें पंढरीमाहात्म्य ऐकोनि सज्जन। विश्वास मनीं न धरिती ॥७०॥ अनाथनाथा रुक्मिणीवरा। ऐशा संकटीं पाव सत्वरा। करुणा भाकितां द्विज अंतरा। जगदुद्धारा जाणवलें ॥ ७१ ॥ ह्मणे माझी कीर्ती वाखाणितां गहन। ब्राह्मणाचा होतो अपमान। तरी जैसें कथिलें आहे तयानें। तैसेंच दाखवणें लागेल।७२। ऐसा स्वमनीं करूनि विचार। रुक्मिणीसि सांगे शार्ङ्गधर। वियानगरींचा नृपवर। येतो सत्वर दर्शना ॥७३॥ तरी जैसी होती द्वारकापुरी। त्याहूनि विशेष आहे पंढरी। नृपवरासि दाखवूं निमिषभरी। संशय निवारीं तयाचा॥७४॥नाहीं तरी शिक्षा पावेल ब्राह्मण। मग तो देईल आपुला प्राण। आणि आपुले बिरुदासि येईल उणें। संतसज्जन हांसतील ॥ ७५॥ वचन

ऐकोनि जगज्जननी । चरण नमस्कारी तये क्षणीं । ह्मणे वैकुंठींची रचना आणोनी । रायासि ये क्षणीं दाखवीन ॥७६॥ ऐसी कल्पना करितां जाण । तैसेंचि जाहलें नलगतां क्षण । तो मायालाघवी जगज्जीवन । निजभक्तमहिमान वाढवी ॥७७॥तों इकडे रामराजा चालतां सत्वर ।सन्निध आलें पंढरपुर । भयभीत होऊनि द्विजवर । रुक्मिणीवर आळवीतसे ॥७८॥मग सन्निध पाचारून द्विजा । काय बोलतसे रामराजा । आतां संशय न फिटतां माझा । तरी अपमान तुझा क-रीन ॥ ७९ ॥ मग सन्निध वारण आणवूनि त्वरित । अंबारींत बैसला नृपनाथ । पंढरी विलोकितांचि त्वरित । तों नवल अद्भुत देखिलें॥८०॥जैसा पौर्णिमेचा निशापती । त्याभोंवतीं नक्षत्रें दिसती। तेविं देवालयाच्या कळसाभोंवतीं । मंदिरें चमकती लखलखित ॥८१॥ हें कौतुक देखतां दृष्टीसी । राजा विस्मित जाहला मानसीं । ह्मणे ब्राह्मणें कथिली जैसी । पंढरी तैसी दिसताहे ॥८२॥ मग अनुताप धरून चित्तांत । खालीं उतरला नृपनाथ । नमस्कार साष्टांग घालूनि त्वरित । विप्रासि बोलत तेधवां॥८३॥तुह्मीं सांगितलें जैशा रीतीं । तैसेंच दिसोन येतसे पुढती । मी नेणतां अभिमान धरूनि नि-श्चितीं । विकल्प चित्तीं धरियेला ॥८४॥ ऐसें बोलोनि नृपवर । द्विजासि केला नमस्कार । मग शुद्ध करूनि अभ्यंतर । चरणीं सत्वर लागला ॥८५॥ब्राह्मण विस्मय पावला चित्तीं । ह्मणे मज पावला रुक्मिणीपती । हर्ष न माये त्रिजगतीं । गातसे कीर्ती सप्रेमें॥८६॥ह्मणे भक्तांमाजी अग्रगणी । एक पुंडलीक शिरोमणी । त्याचे भेटीसि द्वारकेहूनी । चक्रपाणी पातले ॥८७॥सकळ तीर्थांत वरिष्ठ गंगा । तीहूनि विशेष चंद्रभागा । दर्शनेंच पावन करी जगा । अभिमान अंगा जडों नेदी ॥८८॥ मथुरा गोकुळ वृंदावन । ये स्थळीं नांदे जगज्जीवन । द्वारकेंतही श्रीकृष्ण । भक्तांकारण तिष्ठत ॥ ८९ ॥ परी या क्षेत्रींचें महिमान । अनुपम दिसतसे मजलागून । ऐसा ब्राह्मण निर्लज्ज होऊन । गातसे गुण निजप्रीतीं ॥ ९० ॥ टाळमृदंग आणोनि त्वरित । समारंभ करी नृपनाथ । मिळवूनियां वैष्णवभक्त । गजर करित स्वानंदें॥९१॥पुढें विलोकि-तांचि जाण । तों कल्पतरूंचें लागलें वन । खडे परिसचिंतामणीसमान । लागतां रान पंढरीचें ॥९२॥कामधेनु ऐशा उ-दंड गायी । भोंवत्या असती तये ठायीं । राजा विस्मित होऊनि पाहीं । ह्मणे धन्य नवायी अगाध॥९३॥ब्राह्मणाचा ध-रूनि हात । भूपति पुढें विलोकित । तों पंढरीक्षेत्र लखलखित । पाहातां दिपत नेत्रपातीं॥९४॥ तरुवरीं बैसोनि पक्षिया-ती । निजच्छंदें गायन करिती । हंस मयूर नृत्य करिती । सप्रेमगतीं उल्हासें ॥ ९५ ॥ तपस्वी करिती अनुष्ठान । ब्राह्मण करिती वेदाध्ययन । विष्णुभक्त करिती कीर्तन । मृदंगवीणे घेऊनी॥९६॥ठायींठायीं सभा करूनि जाणा । नृत्य करिती देवांगना । तेणें तटस्थता येऊनि नयना । विषयिकजनां भुलविलें ॥९७॥ संत बैसोनि ठायींठायीं । आत्मचर्चा बोलती पाहीं । अनुभवें तल्लीन होऊनि तेही । आलिंगन देती येरयेरां ॥९८॥ चंद्रभागेसि अष्टोत्तरशत । तीर्थें येऊनि मूर्तिमंत । स्नान करूनि पावन होत । दृष्टीस पाहात नृपनाथ ॥ ९९ ॥ एक कनकाचें रचून वृंदावन । त्यावरी बैसविलें रत्नकोंदण । दिव्य लेवूनि वस्त्राभरणें । करिती पूजन नरनारी ॥१००॥ मग भीमरथींत करूनि स्नाना । राजा चालिला देवदर्शना ।

अ. ४३

पा. १४५

तों इंद्रादिदेव सकळ जाणा । पंढरीराणा लक्षिती॥१॥अष्टसिद्धि सकळ दासी । निजांगें राबती देवापासीं । तयांमाजी अकस्मात राजाईसी । रायें दृष्टीसी ओळखिलें॥२॥ह्मणे विद्यानगरीं अर्चितों पूजनीं । तेचि हे आमुची कुळस्वामिनी। ती पंढरीस झाडितसे अंगणीं । विस्मित मनीं नृपनाथ ॥३॥ उदो शब्द ह्मणोनि ते समयीं । राजा तीस पुसे लवलाहीं । ह्मणे माते तूं किमर्थ ये ठायीं । निजांगें पाहीं झाडितेसी॥४॥मग भवानी उत्तर देत तयासी । तुवां व्यर्थचि अहंता धरि-ली मानसीं । मजऐशा अनंत दासी । येती पंढरीसी राबावया।५।या पुंडलीकाचे अंगणीं । सकळ तीर्थें घालिती लोळ-णी । मग पवित्र होऊनि तत्क्षणीं । वाहाती पाणी निजांगें॥६॥ विस्मित होऊनि नृपनाथ । पुढें विलोकूनि जों पाहत । तों नारद तुंबर येऊन तेथ । कीर्तन करित देखिले ॥ ७ ॥ चतुर्भुजरूपें नारीनर । अवघे दिसती साकार । लोटांगण घा-ली नृपवर । स्वानंदें निर्भर मानसीं ॥८॥ शंखचक्रादि आयुधें घेऊनी । द्वारीं जयविजय तिष्ठती दोनी । दिव्यप-ताका गगनीं । चपळे ऐशा झळकती ॥ ९ ॥ मागुती घालोनि दंडवत । राजा प्रवेशला राउळांत । तें तेज पाहतां नेत्र झां-कत । मग धरिला हस्त ब्राह्मणाचा ॥ ११० ॥ तों सांवळा सकुमार राजीवनयन । पीतांबरधारी जगज्जीवन । कमललो-चन सुहास्यवदन । स्वरूप सगुण देखिलें ॥११॥ जें योगियांचें निजध्यान । हृदयीं ध्यातो पंचवदन । तें स्वरूप वर्णितां-चि जाण । उपमा गौण दिसताहे ॥१२॥ अमृताची चवी सांगतां । उपमा द्यावया रस कोणता । तेविं देवाधिदेव रुक्मि-णीकांता । दृष्टांतीं वर्णितां नये कीं ॥१३॥ तरी दृष्टीस देखती निजभक्तजन । तेचि अनुभवें जाणती खूण । येरवीं बुद्धि-मतें करितां स्तवन । पडलें मौन श्रुतींसी ॥ १४ ॥ ऐसी निरुपम परब्रह्ममूर्ती । प्रीतीनें आलिंगी भूपती । स्वरूप न्याहाळू-नियां दिठीं । मग चरणीं मिठी घातली ॥ १५॥ ब्राह्मणासि ह्मणे रामराजा । तूं सखा सद्गुरु जिवलग माझा । काय उप-कार आठवूं तुझा । गरुडध्वजा भेटविलें ॥ १६॥ तुवां जें कां कथिलें देख । त्याहूनि कोटिगुणें अधिक। दृष्टीं देखिला वै-कुंठनायक । सौख्य अनेक पावलों ॥ १७॥ राजाई माझी कुळस्वामिनी । तेही झाडितां देखिली अंगणीं । इंद्रासमवेत सुर येऊनी । कर जोडोनी तिष्ठती ॥ १८॥ पंढरी ऐसें क्षेत्र अद्भुत । आणि पांडुरंगा ऐसें वरिष्ठ दैवत । चंद्रभागे ऐसें पा-वनतीर्थ । नाहीं दिसत त्रिभुवनीं ॥ १९ ॥ घुंगरडें होतां उंबरा आड । तें ह्मणे माझें हें ब्रह्मांड गाढ । फोडोनि दाखवितां चहूंकडे । होतसे वेडें निजमनीं ॥ १२० ॥ तैसेंचि जाहलें रायाकारण । मग ब्राह्मणाचे धरिले चरण । ह्मणे मी वेष्टिलों होतों अविद्येंकरून । परी जाहलों पावन तुझेनी ॥२१॥ यापरी कौतुक दाखवूनि जाणा । मग अदृश्य जाहली तितुकी-ही रचना । तों मृत्तिकेच्या भिंती दिसती नयना । आश्चर्य मनांत वाटत ॥ २२ ॥ जैसें दाखविलें रायाप्रती । तैसेंच पंढरी क्षेत्र आहे निश्चितीं । परी मनुष्यासि मृत्तिका ऐसी भासती । निजकर्मगतीकरूनी ॥ २३॥ सांप्रत आपणा जैसें दीसत । तैसेंच देखे नृपनाथ । विस्मित होऊनि मनांत । ह्मणे चमत्कार अद्भुत देखिला॥ २४ ॥ राजा विचारी आपुले मनीं । आ-तां व्यर्थ कासया पुजावी भवानी । सन्निध क्षीरसागर टाकुनी । सरिताजीवनीं कां न्हावें ॥ २५॥ अमृत सरोवर देखि-

ल्या पाही । दिव्य औषधी कासया घ्यावी । कल्पतरु सन्निध असोनि पाही । बाभुळछायीं न बैसावें ॥ २६ ॥ हातींचा परिस टाकोनियां । धातुवादी व्हावें कासया । कामधेनु गृहासि आलिया । अजा कासया पूजावी ॥ २७ ॥ गृहीं प्रकटतां सूर्यनारायण । मग दीप कासया सरसावणें । तेविं जाहलिया पांडुरंगदर्शन । देवीउपासन कासया ॥ २८ ॥ ऐसें ह्मणोनि रामराजा । प्रार्थितसे गरुडध्वजा । ह्मणे देवाधिदेवा वैकुंठराजा । मनोरथ माझा पुरवीं कां ॥ २९ ॥ चित्तीं हेत आहे ऐसा धरिला । कीं वियानगरासि न्यावें तुजला । आतां अभय देऊनि शरणागताला । सत्वर चला देवराया ॥ १३० ॥ देव ह्मणे ...वरी ठेविसी मजसी । तरी तेथेंच राहीन निश्चयेंसी । कांहीं अन्याय घडतां तुजसी । मागुती पंढरीसी येईन ॥ ३१ ॥ ऐसें सांगतां चक्रपाणी । राजा हर्षला आपुले मनीं । ह्मणे स्थळोंस्थळीं डांक ठेवूनी । जाईन घेऊनी देवासी ॥ ३२ ॥ पंढरी क्षेत्रापासूनि जाण । वियानगरपर्यंत तेणें । दोंभागीं मनुष्यें उभीं करून । मूर्ति काढून नेतसे ॥ ३३ ॥ पुजारी ब्राह्मण निवांत ठायीं । भूपतीसी बळ न चले कांहीं । मूर्ति उचलोनि लवलाहीं । हातोहातीं चालिले ॥ ३४ ॥ वियानगरासि नेऊनि सवेग । तेथें स्थापिला पांडुरंग । नानापरीचे उपचार भोग । राजा निजांगें करीतसे ॥ ३५ ॥ इकडे यात्रेसि आषाढमासीं । वैष्णव आले पंढरीसी । तेथें मात ऐकिली ऐसी । कीं वियानगरासी देव गेले ॥ ३६ ॥ उदास दिसे पंढरपुर । जैसें प्राणावांचोनि शरीर । कीं सरितेमाजी नसतां नीर । जेविं भयासुर वाटे ते ॥ ३७ ॥ कीं नृपावांचोनि सैन्यसंपत्ती । कीं चंद्रावांचोनि नक्षत्रजाती । नातरी भ्रताराविण पतिव्रता सती । निढळ दिसती जनांत ॥ ३८ ॥ तेविं वियानगरासि गेलिया हरी । अवघी उदास दिसे पंढरी । संतमहंत गरुडपारीं । येऊनि सत्वरीं बैसले ॥ ३९ ॥ ह्मणती कोणाचें करावें कीर्तन । आह्मांसि टाकिलें जगज्जीवनें । पुंडलीकासि दिधलें वरदान । तें असत्य वचन जाहलें कीं ॥ १४० ॥ भाविक भक्त आले सर्व । ह्मणती काय जाहला पंढरीराव । वियानगरासि गेले देव । कळला अभिप्राव सकळांसी ॥ ४१ ॥ संतसाधु वैष्णवजन । एकमेकांसी बोलती वचन । वियानगरासि कोणी जाऊन । रुक्मिणीरमण आणावा ॥ ४२ ॥ ऐसें एकमेकांसि बोलती वचन । परी कोणीच न देती आश्वासन । ह्मणती पुंडलीकासि गेला उपेक्षून । तो आमुचेन नये सर्वथा ॥ ४३ ॥ एक बोलती प्रत्युत्तरीं । आमुचा प्रवेश नोहे राजमंदिरीं । नृपास वृत्तांत कळेल जरी । तरी शिक्षा बरी करील कीं ॥ ४४ ॥ एक दाविती निर्गुणभाव । आपुले देहींच आहे देव । चित्तीं नसतांचि अनुभव । बोलती वाव आत्मज्ञानी ॥ ४५ ॥ एक ह्मणती ईश्वरइच्छेनें । जें जें जैसें येईल घडोन । तें तें दृष्टीं पाहावें आपण । तळमळ कोणी न करावी ॥ ४६ ॥ त्यांत भानुदास वैष्णवभक्त । प्रतिज्ञा करूनी काय बोलत । मी घेऊनि येतों रुक्मिणीकांत । नाहीं तरी जीवित न ठेवीं ॥ ४७ ॥ ऐसें बोलोनि तयांप्रती । तेथोनि निघाला सत्वरगतीं । वियानगरासि जाऊन रातीं । लोकांप्रती पुसतसे ॥ ४८ ॥ पंढरीहूनि पांडुरंगमूर्ती । येथें घेऊनि आला नृपती । ते कोठें स्थापिली निश्चितीं । सांगा मजप्रती लवलाहें ॥ ४९ ॥ राजयाच्या भयेंकरून । कोणी यथार्थ न सांगती वचन । आह्मांसि विदित नाहीं ह्मणोन । प्रतिवचन बोलती ॥ १५० ॥ मग भानुदास पुसती एकांतीं । त्यास सांगितलें वैष्णवभक्तीं । मंदिरीं ठेऊनि रुक्मिणीपती । पूजी एकांतीं नृपनाथ ॥ ५१ ॥ राजा करूनि गेलिया पूजन । मग आणिकासि नव्हे दर्शन । कपाटें कुलुपें घालून । द्वारपाळ रक्षण ठेविले ॥ ५२ ॥ ऐसी ऐकोनियां मात । भानुदास झाला हर्षयुक्त । मग अर्धरात्र लोटतांचि त्वरित । झाले निद्रित सकळिक ॥ ५३ ॥ द्वारापाशीं येतांचि जाण । कुलुपें गळालीं न लागतां क्षण । भानुदास आंत प्रवेशोन । घातलें नमन साष्टांग ॥ ५४ ॥ स्वरूप दृष्टीसी न्याहाळून । आलिंगन दिधलें प्रीतीकरून । कंठ सद्गदित होऊन । देवासि विनवणी करीतसे ॥ ५५ ॥ ह्मणे लक्ष्मीकांता वैकुंठवासिया । पुंडलीकवरदा यादवराया । आह्मांवरील लोभ सांडोनियां । जाहलासि रायास्वाधीन ॥ ५६ ॥ पुंडलीकासि दिधलें वरदान । कीं कदापि न जाय येथून । तें तुझें आतां अभयवचन । असत्य दिसोन आलें कीं ॥ ५७ ॥ आह्मां दुर्बळांची नावडे पूजा । येथें उपचार करितो राजा । तें सुख मानोनि अधोक्षजा । गरुडध्वजा राहिलासी ॥ ५८ ॥ दिव्यवस्त्रें आणि आभरणें । नैवेद्यासि अनेक पक्वान्नें । यालागीं दुर्बळांचें स्मरण । तुजकारण नव्हे कीं ॥ ५९ ॥ रुक्मिणी राधा सत्यभामा । इतुक्यांसि सांडोनि पुरुषोत्तमा । रामरायें तुज लावूनि प्रेमा । मेघश्यामा चालविलें ॥ १६० ॥ सांडोनियां पंढरपुर । वसतें केलें वियानगर । तेथें वाट पहाती ऋषीश्वर । भक्त थोर तिष्ठती ॥ ६१ ॥ रंभा तिलोत्तमा उर्वशी मेनका । सेवेसि येती अष्टनायिका । सांडोनियां विधिजनका । बैसलासि निका ये ठायीं ॥ ६२ ॥ कीं आमुचे पदरीं दोष दारुण । पळोनि आलासि तयाभेणें । कीं तुज मागनसों प्रेमदान । ह्मणोनि पळून आलासी ॥ ६३ ॥ कीं कीर्तनाचा होतो गलबला । तेणें निद्रा न लागेचि तुजला । ह्मणोनि एकांतीं ठाव पाहिला । कळलें मजला यथार्थ ॥ ६४ ॥ कीं यात्रा मिळते असंख्यात । तयांसि भेटतां शिणसी बहुत । मग येऊनि वियानगरांत । घेतोसि विश्रांति याठायीं ॥ ६५ ॥ ऐकोनि भानुदासाचें वचन । काय बोलतसे जगज्जीवन । तूं बोलतोसि उदासवचनें । विचार मनीं न करितां ॥ ६६ ॥ मज न रुचती नाना उपचार । वस्त्रें भूषणें अलंकार । कधीं देखेन भीमातीर । ह्मणोनि अंतरीं झुरतसें ॥ ६७ ॥ रायें आणोनि मजलागूनी । येथें घातलें बंदीखानीं । तुह्मीही निष्ठुर होऊनि मनीं । परत कोणी न केली ॥ ६८ ॥ ऋद्धिसिद्धि चारी मुक्ती । मी देत होतों तुह्मांप्रती । परी त्यांसि अव्हेरूनि निश्चितीं । भजन प्रीतीं करीतसां ॥ ६९ ॥ याविरहित तों मजपासीं । कांहींच न दिसे द्यावयासी । सेवाऋण न फिटे मजसी । ह्मणोनि तुह्मांसी टाकिलें ॥ १७० ॥ ऐसें बोलतां रुक्मिणीकांत । कंठ जाहला सद्गदित । आनंदाश्रु नेत्रीं वाहत । दोघेही स्फुंदती निजप्रेमें ॥ ७१ ॥ भानुदासासि जगज्जीवनें । मागुती दिधलें आलिंगन । ह्मणे प्रातःकाळीं करितां पूजन । देईन दर्शन तुजलागीं ॥ ७२ ॥ मग नवरत्नांचा काढोनि हार । भानुदासासि देत शार्ङ्गधर । ह्मणे आतां बिऱ्हाडासि जाईं सत्वर । येईल नृपरव दर्शना ॥ ७३ ॥ बाहेर येतांचि भानुदास । कुलुपें बैसलीं कवाडास । अणुमात्र न कळतां कोणास । निजभक्तास भेटला ॥ ७४ ॥ प्रातःकाळीं उठोनि नृपती । स्नान केलें सत्वरगतीं । देवासि नमन करूनि प्रीतीं । कांकडआरती करीतसे ॥ ७५ ॥ तों कंठीं न दिसे

रत्नहार । पुजाऱ्यासि पुसिलें सत्वर । ह्मणे येथें कोण आला तस्कर । ह्मणोनि नृपवर क्रोधावला ॥ ७६ ॥ तया-
सि ताडन करूनि बहुत । ह्मणे हार त्वरित आणिजे येथ । अमूल्यरत्नें न मिळती निश्चित । पृथ्वी समस्त धुंडि-
तां ॥ ७७ ॥ ऐसी आज्ञा होतांचि सत्वर । झाडा घेती घरोघर । परी कोठेंचि न दिसे हार । मग पहाती बाहेर त-
स्करासी ॥ ७८ ॥ तों गंगातीरीं स्नान करूनी । भानुदास बैसले नामस्मरणीं । राजदूत पाहती विलोकूनी । तों हार दुरूनी
देखिला ॥७९॥ ह्मणती सांपडलारे तस्कर । आतां यास धरावा सत्वर । अकस्मात बांधोनि वैष्णववीर । चालिले किंकर
रायाचे ॥ १८० ॥ नगरांत आणितां त्याकारण । देखोनि हांसती सकळजन । ह्मणती हा भोंदावया जनाकार-
ण । संत होऊन हिंडतो ॥८१॥ देवावरी हात घातला पाहे । तो मनुष्यासि भिईल काय । कसाबासि भेटतां कपिलागा-
य । तो पूजील काय तिजलागीं ॥ ८२ ॥ ऐसें नानापरीचे त्रिविधजन । भानुदासासि निंदिती देखोन । परी तो खेद न
करी जाण । नामस्मरण करीतसे ॥८३॥ एक ह्मणती मैंदाचिया गळां । अहाणा बोलती तुळसीमाळा । तो आजि प्रत्य-
क्ष देखिला डोळां । हार चोरिला येणेंची ।८४। नवरत्नांचा हार घेऊन दूतांनीं । रायासि दिधला नेऊनी । ह्मणती तस्कर
आणिला बांधोनी । तयासि दंड कोण करावा ॥८५॥ सक्रोध बोले नृपवर । त्यासि शूळावरी घाला सत्वर । कोण कैसा
पहावा तस्कर । ऐसा विचार न केला ॥ ८६ ॥ भानुदास दूतांसि बोले वचन । माझें तो सन्निध आलें मरण । शेवटीं पां-
डुरंगाचें दर्शन । मजकारण करवावें । ८७ । त्यांत कोणी होते सज्जन । त्यांस मानलें त्याचें वचन । मग रायासि आज्ञा
मागून । गेले घेऊन देउळासी ।८८। भानुदास ह्मणे देवाप्रती । मी न्यावयासि आलों एकांतीं । ह्मणोनि योजिली ऐसी
युक्ती । आणि नृपाहातीं दंडविलें ॥८९॥ जो न्यावया येईल तुजकारण । त्याचा ऐसाच घ्यावा प्राण । मग राजमंदि-
रीं विलास भोगून । सुखें राहावें या ठायीं ॥१९०॥ ऐसा विचार करूनि घननीळा । मग हार घातला माझिया गळां ।
ऐसें बोलतां तये वेळां । अश्रु डोळां लोटले ।९१। परी शतसहस्र जन्मा-अंतीं । तुज मी न सोडीं रुक्मिणीपती । ऐसें बो-
लानि मागुतीं । नमन प्रीतीं घातलें ॥९२ ॥ दूत ह्मणती ते अवसरीं । आतां ऊठगा चाल झडकरी । आधींच केली नस-
ती चोरी । तरी ऐसी परी कां होती ॥ ९३ ॥ ऐसें ह्मणोनि सत्वर । भानुदासासी काढिलें बाहेर । शूळ देऊनि खांद्यावर ।
माथां शेंदुर घातला ॥ ९४ ॥ कौतुक पाहावया सत्वरीं । अमित मिळाल्या नरनारी । मग नेऊनि नगराबाहेरी । शूळ
झडकरीं रोंविला ॥ ९५॥ उचलूनि जों घालावें वरी । तों भानुदास देवातें विनंती करी । ह्मणे आकाश कडकडोनि प-
डो मजवरी । तरी तुज अंतरीं आठवीन॥ ९६॥ सप्तसमुद्र समरस जाहलिया । तरी तुज न सोडीं देवराया । तुजवरूनि
नाशवंत काया । ओंवाळूनियां सांडिली ॥९७॥ लया जाईल सकळ क्षिती । आणि पंचभूतेंही प्रळया पावती । तैं तुज-
वांचूनि रुक्मिणीपती । आणिक सांगाती असेना ॥ ९८ ॥ वडवानळ खाईल त्रिभुवन । तैं तूं माझा जिवलग प्राण । भा-
नुदासाचा निश्चय देखोन । जगज्जीवन पावले ॥ ९९ ॥ तंव नवल वर्तलें आति अद्भुत । तें सादर परिसा भाविकभक्त ।



शूळ रोंविला होता तेथ । त्यासि पल्लव अकस्मात फुटले ।२००। फुलें फळें आलीं बहुत । राजासि जाऊनि सांगती मा-
त । ह्मणे तो आहे वैष्णवभक्त । पंढरीनाथ पावला त्या ॥१॥ शूळाचा वृक्ष झाहला सत्वर । राजासि सांगते जाहले किं-
कर । वचन ऐकूनियां नृपवर । आश्चर्य थोर करितसे ॥२॥ पाहावयासि येतां त्वरित । तंव दृष्टीस देखिलें साक्षात । मग
अनुताप पावला चित्तांत । ह्मणे अन्याय बहुत मज घडला।३।भानुदासासि नमस्कार प्रीतीं । सद्भावें घालीतसे नृपती ।
ह्मणे अपराध घडला मजप्रती । विवेक चित्तीं न करितां । ४ । मग रामरायें भानुदासाप्रती ।देउळीं नेलें सत्वरगतीं । दृ-
ष्टीस देखतां पांडुरंगमूर्ती । सद्गदित कंठीं जाहला । ५ । चरणीं मिठी घालितांचि जाण । उचलोनि धरी जगज्जीवन ।
भानुदासासि ह्मणे रुक्मिणीरमण । मजकारणें शिणलासि।६।आतां मज घेऊनि खांद्यावरी । पंढरपुरासि चाल सत्वरीं।
तेथें पुंडलिकाचे द्वारीं । निरंतरीं वसेन ।७। रामराजा धरितसे पाय ।मज उपेक्षूनि जातां काय । देव ह्मणती तुझा अन्या-
य । घडोनि आला अनायासें ।८। कांहीं तुझें होतें सुकृत । ह्मणोनि होतों दिवस बहुत । आतां माझें रूप हृदयांत । आठवीं
नित्य सप्रेमें ।९। भानुदास ह्मणे रुक्मिणीकांता । कैसा उचलसील मज आतां । माझी तो नाहीं राजसत्ता । म्यां मेळवू-
नि बहुतां तुज न्यावें।२१०।ऐकोनि ह्मणे दीनदयाळ । मी तुझे स्वाधीन जाहलों केवळ।आतां माझी सत्ता आहे सकळ ।
ते तुझीच असे निजभक्ता ॥११॥ ऐसें ह्मणोनि जगज्जीवनें । तत्काळ रूप धरिलें सान । भानुदासासि बोले वचन । सां-
बळींत घालोन मज नेईं । १२ । मग गवाळें आणोनि तये क्षणीं । त्यांत बांधिले चक्रपाणी । ऐसी ऐकोनियां वाणी । आ-
शंकित मनीं न व्हावें ॥१३॥जैसें आकाश विस्तीर्ण आहे बहुत । परी घटीं पाहतां तेवढेंच होत । तेविं भक्तलीलेसि वै-
कुंठनाथ । सूक्ष्म होत निजप्रीतीं ।१४। कीं अफाट समीर आहे बहुत । परी विंझणा हालवितां तैसाचि होत । तेविं भक्ता-
धीन रुक्मिणीकांत । तैसाचि होत निजच्छंदें ॥ १५ ॥ मागें कृष्णावतारीं यशोदा घुसळितां । जो डेरियामाजी लागला
तिच्या हाता । तो भानुदासाच्या गवाळ्यांत जातां । संशय कोणता आणावा ॥१६॥ जो अनंतघटीं व्यापून जाण । तै-
साचि दिसे थोरसान । अणुरेणूपरीस लहान । ज्ञानदृष्टीनें दिसताहे ॥ १७ ॥ तो भानुदासाचे आवडीसाठीं । सांबळींत
मावला जगजेठी । खांद्यावरी घेऊनि उठाउठी । सत्वरगतीं जातसे ॥ १८ ॥ मंजुळ शब्द गवाळ्यांतून । भक्तासि बोले
जगज्जीवन । धन्य आजिचा उगवला सुदिन । संतसज्जन भेटतील ॥ १९ ॥ पद्मालयासि आले भानुदास । तेथें खालीं
ठेविला जगन्निवास । आपण लागले स्नानास । हर्ष चित्तास वाटला ॥२२०॥ इकडे सांबळींत होते रुक्मिणीवर । ते ए-
काएकीं झाले थोर । वरील पूड मस्तकावर । तळींचा चूर झाला कीं ॥ २१ ॥ भानुदास येऊनि जंव पाहे । ह्मणे देवाधि-
देवा हें केलें काय । थोर झालासि लवलाहें । आतां उचलसील काय मजलागीं ॥ २२ ॥ मग ह्मणे रुक्मिणीवर । तूं पुढें
जाऊन सांग सत्वर । नाना वाद्यांचा करूनि गजर । येतील सामोरे संतसाधू ॥ २३ ॥ सुदिन घटिका आजिचे दिनीं ।
मज बैसवावें सिंहासनीं । ऐसें बोलतां चक्रपाणी । भानुदास तेथोनि निघाला॥२४॥ तों गरुडपारीं वैष्णवभक्त । अवघे

बैसले चिंताक्रांत । ह्मणती भानुदासासी दिवस लागले बहुत । परी रुक्मिणीकांत नये कीं ॥ २५ ॥ तों अकस्मात भक्त-
विजयी । हास्यवदन देखतां पाहीं । येतां देखिला लवलाहीं । ह्मणती शेषशायी आणिला ॥ २६ ॥ संतांसि क्षेम देऊनि
त्वरित । ह्मणे पद्मालयासि आले रुक्मिणीकांत । ऐसी ऐकोनि हर्षमात । संतोषे चित्त सकळांचें ॥ २७ ॥ दिंडी पताका
घेऊनि सत्वर । सामोरे चालिले वैष्णववीर । टाळमृदंगांचा गजर । वाद्यें अपार वाजती ॥ २८ ॥ पूजारी आणि लोक-
पाळ । नरनारी सामोरे जाती सकळ । पद्मालयासि येतां ते वेळ । देखिला घननीळ दृष्टीसी ॥ २९ ॥ सकळीं घालोनि
दंडवत । देवासि आलिंगन देऊनि त्वरित । रथावरी बैसवोनि रुक्मिणीकांत । चालिले मिरवत संभ्रमें ॥ २३० ॥ संत
गर्जती गुणानुवाद । त्यांपुढें नट नाचती छंदें । भेरी वाजंत्र्यांचा नाद । वाटतो आनंद सकळांसी ॥ ३१ ॥ तो समारंभ
वर्णितां वाचेसी । दृष्टांत न पुरे द्यावयासी । आतां प्रत्यक्ष कार्तिकमासीं । पाहाती दृष्टीसी वारकरी ॥ ३२ ॥ रथोत्साह
पौर्णिमेस होत । तेचि उपमा तया सरत ॥ तैशाचपरी पंढरीनाथ । येती मिरवत निजच्छंदें ॥ ३३ ॥ येतां चंद्रभागेचे ती-
रीं । तंव ते पुढारी येत सामोरीं । देवासि स्नान घालोनियां झडकरी । मग महाद्वारीं चालिले ॥ ३४ ॥ रथाखालीं उतरू-
न सांवळीमूर्ति । शिबिकेंत घातली हातोहातीं । देवालयीं नेऊन सत्वरगतीं । अभिषेक करिती मधुपर्क ॥ ३५ ॥ ब्राह्मण
करिती मंत्रघोष । कीर्तनीं गर्जती वैष्णवदास । सिंहासनीं बैसे जगन्निवास । धन्य दिवस सुदिन तो ॥ ३६ ॥ वस्त्रालंकार
भूषणें । षोडशोपचारें केलें पूजन । पक्वान्न नैवेद्य अर्पून । मंगलारती पैं केली ॥ ३७ ॥ पुष्पांजली मंत्रघोष । पुजारी सम-
र्पिती देवास । संतवैष्णवयात्रेकऱ्यांस । वाटला उल्हास तेधवां ॥ ३८ ॥ नरनारी मिळोनि समस्त । भानुदासाचें स्तवन
करित । ह्मणती याच्यायोगें वैकुंठनाथ । आले पंढरीत मागुती ॥ ३९ ॥ एक शर्करा नगरांत वांटिती । एक पक्वान्नभोजन
विप्रां घालिती । क्षेत्रवासी लोकांप्रती । आनंद चित्तीं वाटला ॥ २४० ॥ जैसा चतुर्दश वर्षें वनवास कंठोन । अयोध्येसि
आला रघुनंदन । नगरवासी आनंदले जन । तैसेंचि झालें तयांसी ॥ ४१ ॥ कीं अवर्षणीं अहाळला होता पर्वत । त्यावरी
मेघ वर्षला अपरिमित । पंढरीचे लोक समस्त । संतोष मानिती या रीतीं ॥ ४२ ॥ कीं अगस्तीच्या पोटांतूनी । समुद्र नि-
घाला देखूनि नयनीं । मग मेघांसी उल्हास वाटला मनीं । तैसीच करणी झाली कीं ॥ ४३ ॥ नातरी वसंतकाळ येतांचि
त्वरित । वनस्पती दिसती सुशोभित । तेविं पंढरीस येतां अनाथनाथ । लोक समस्त आनंदले ॥ ४४ ॥ कीं शरीरांतील
परतला प्राण । मग इंद्रियें वर्तती सावधान । पंढरीचे सकळही जन । तैशाचपरी जाहले ॥ ४५ ॥ पुढिले अध्यायीं कथा
सुरस । ऐकतां यश जोडे निर्दोष । ह्मणूनि भक्त हो सावकाश । जोड करा हेचि पैं ॥ ४६ ॥ हें सात्त्विकभक्तांचें महिमान ।
वाढविता श्रीरुक्मिणीरमण । महीपती त्याचा बंदिजन । गातो सद्गुण कीर्तनीं ॥ ४७ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐक-
तां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । त्रिचत्वारिंशाध्याय रसाळ हा ॥ २४८ ॥ अध्याय ४३ ॥ श्रीकृष्णा० ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीकालीयमर्दनाय नमः । आज ज्ञानेंद्रियांत सभाग्यपूर्ण । वैखरी दिसते पुण्यपावन । कीं विष्णु-
भक्तांचे वर्णितां गुण । दुरितें संपूर्ण पळालीं ॥ १ ॥ ध्यानीं आणितां संतमूर्ती । तेणेंचि पावन नेत्रपातीं । श्रवणेंचि कर्ण
पुनीत होती । सायास निगुतीं न करितां ॥ २ ॥ भक्तकथेसि करितां गमन । तेणें चरणासि आलें पवित्रपण । आळस
त्यागोनि बैसतां जाण । सर्वांग पावन होतसे ॥ ३ ॥ या पुस्तकासि करितां नमस्कार । तेणेंचि पवित्र होती कर । मस्त-
क लववितां साचार । अहंता सत्वर जातसे ॥ ४ ॥ भक्तकथेसि करितां नमन । तेणेंच होतसे उन्मन । मग निश्चळतेसि
येऊनि जाण । समाधान भोगवी ॥ ५ ॥ ह्मणोनियां सभाग्यश्रोतीं । येथें धरावी पूर्ण आर्ती । मागील अध्यायाचे अं-
तीं । कथा निगुतीं परिसिली ॥ ६ ॥ कीं विद्यानगरासि सप्रेमस्थितीं । भानुदास जाऊनि सत्वरगतीं । प्रार्थूनि आणि-
ली पांडुरंगमूर्ती । पंढरीस श्रीपती स्थापिले ॥ ७ ॥ आणिक कथा ऐका उद्भट । प्रतिष्ठानक्षेत्रीं बहिरंभट । जो षट्शा-
स्त्रीं निपुण पंडित । वेदांतज्ञानीं प्रवीण ॥ ८ ॥ आणिक ब्राह्मण पढले श्रुती । परी तयाचे विद्यार्थी ह्मणविती । कितीएक
विप्र लागोनि संगतीं । ते पुराणव्युत्पत्ती शिकले ॥ ९ ॥ इतुकें सामर्थ्य असतां जाणा । कदापि न जाय राजदर्शना । गृहीं
अग्निहोत्रादि सत्कर्में नाना । परी उद्विग्न मना नव्हेची ॥ १० ॥ अयाचितवृत्ती करूनि जाण । चालवी वेदोनारायण । गं-
गातीरीं करूनि स्नान । जप अनुष्ठान करीतसे ११ मध्यान्हसमयीं उठोनि सत्वरा । बहिरंभट येती निजमंदिरा । नैवेद्य वैश्व-
देव सारोनि बरा । पंक्तीस द्विजवरां घेतसे ॥ १२ ॥ यापरी भोजन सारूनि जाण । मग तृतीयप्रहरीं सांगती पुराण । मग
श्रवणासि येती सज्ञान । जे अध्यात्मीं निपुण असती ॥ १३ ॥ एके दिवसीं भोजनीं बैसला । तों आपुले स्त्रियेसि विनोद
केला । अलवणी शाक वाढिली मजला । हा शब्द ऐकिला कांतेनें ॥ १४ ॥ मग उत्तर काय देतसे त्यासी । साठ वर्षें जाह-
लीं तुह्मांसी । आतां रसनेस चवी आपणासी । वृथा कासया पाहिजे ॥ १५ ॥ कांतेचें वचन ऐकोनि त्वरित । अनुताप
जाहला हृदयांत । ह्मणे आतां जिणें कासया व्यर्थ । करावें सार्थक आपुलें ॥ १६ ॥ बहिरंभटें उठोनि त्वरेंसी । नमस्कार
केला कांतेसी । ह्मणे माते यथार्थ मजसी । उपदेश देशी निजलोभें ॥ १७ ॥ मागील सुकृत होतें बहुत । तें फळासि आलें
सुनिश्चित । ह्मणूनि शब्दाचें होऊनि निमित्त । वैराग्य अद्भुत झालें कीं ॥ १८ ॥ बहिरंभट विचारी अंतरीं । आतां ऐसाच
गेलों वनांतरीं । तरी भीड घालोनि लोकाचारीं । मागुती घरीं आणितील ॥ १९ ॥ तरी स्वजातिसंबंध तुटे झडकरी । आ-
णि आपणासि कोणी उत्तर न करी । ऐसी युक्ति करावी बरी । विचार अंतरीं करितसे ॥ २० ॥ आतां जरी घ्यावें संन्यास-
ग्रहण । तरी पूजा करितील सकळ ब्राह्मण । परमहंसदीक्षा घेतां जाण । तरी ब्रह्मरूपपण मानिती ॥ २१ ॥ तरी वरिष्ठ निंदा
करितील जाण । देखोनि थुंका टाकितील अवघेजण । पिशुन करितील अपमान । तैसेंचि होणें ये समयीं ॥ २२ ॥ ऐसें घ-
डेल मजकारण । तरीच देह होईल पावन । ऐसा अनुताप मनीं धरून । मंदिराहून चालिला २३ मग अविंधपुरोहिताचे
घरीं । बहिरंभट गेले ते अवसरीं । काजीस बोले मधुरोत्तरीं । स्वयातींत सारीं आह्मांतें ॥ २४ ॥ हिंदूचा अविंध करितां

जाण । तुमचे शास्त्रीं बोलिलें पुण्य । तरी कांहीं संकोच न धरून । आपुल्यासमान करावें।२५।यावरी उत्तर देत काजी।
आजि कां उदास झालेत भटजी । कां वासना पालटली तुझी। तरी कार्य आजी साधीन२६तुह्मी ज्ञानी पंडित असतां।
तरी आमुचे यातींत कासया येतां।कांहीं कामना असेल चित्ता । ते सर्वथा पुरवीन मी।२७।यावरी बहिरंभट उत्तर देत ।
मी नाहीं झालों सकामविरक्त । एकविध मार्ग तुमचा दिसत । भगवंत प्राप्त व्हावया।२८। ऐसी निष्ठा देखोनी । बहिरंभ-
टासि भ्रष्टविलें त्यांनीं । ब्राह्मण वृत्तांत ऐकूनि श्रवणीं । उद्विग्न मनीं सर्वत्र।२९।कांहींच उपाय न चले ह्मणोनी । मग नि-
वांत राहिले आपुले मनीं । कोणी विकल्पी होते पैठणीं । ते दृष्टीं देखोनी निंदिती ॥ ३० ॥ एक ह्मणती वैराग्यतामस । एक
ह्मणती तो पिशाचभास । एक ह्मणती नाम घेतां त्याचें । सुकृत आमुचें जाईल।३१।एक ह्मणती निजकांतेनें । ऐसें सर्वथा
न वदावें वचन । एक ह्मणती तिचें प्राक्तन । आलें दिसोन विपरीत ॥ ३२ ॥एक ह्मणती तो निर्दय चित्तीं । आमुच्या कांता
उदंड बोलती । परी वैराग्य आणोनि चित्तीं । प्रपंचभ्रांती न सोडीं।३३।एक ह्मणती जाहली द्रव्यसंपत्ती कुटुंबाची देखि-
ली निश्चिती । मग सहज वैराग्य आठवलें चित्तीं । ऐसें बोलती परस्परें ३४ एक ह्मणती शास्त्रीं होता निपुण । त्यानें घ्यावें
होतें संन्यासग्रहण । नीचयातींत शिरून । अविंध होऊन बैसला ३५एक बोलती अनुष्ठान करितां । मंत्रचळ झाला असे-
ल अवचितां । एक बोलती विवेक न करितां । व्यर्थचि निंदितां तयासी ॥ ३६ ॥ विद्या वय कुल उत्तम जाण । सर्व संपत्ति
आणि धन । पुत्र कलत्र सर्व असून । वैराग्य होणें अघटित ॥३७॥ पैठणींचे जन ऐशा रीतीं । कोणी निंदिती कोणी स्तवि-
ती । परी बहिरंभट अनुतापयुक्तीं । निर्भय चित्तीं सर्वदां॥३८॥ तंव कोणे एके अवसरीं । विप्र बैसले गंगातीरीं । त्यांपाचीं
जाऊनि सत्वरीं । रुदन करी अनुतापें॥३९॥कंठ जाहला सद्गदित। आनंदाश्रु नेत्रीं वाहत । ऐसें दृष्टीं देखोनि त्वरित। ब्रा-
ह्मण पुसती तयासी ॥ ४० ॥ बहिरंभटासि बोलती वचन । तुह्मी किमर्थ झालेत यवन । तेथें कोणता सद्गुण देखोन । दिधलें
टाकून आह्मांतें।४१।ऐसें बोलतांचि द्विजवर । तयांसि देत प्रत्युत्तर । माझें कर्म बलबत्तर । ह्मणोनि अविचार घडला कीं
॥४२॥ईश्वरप्राप्तीस्तव जाण । मी स्वइच्छेनें झालों यवन । परि येथेंही आत्मप्राप्तीचें चिह्न । नये दिसोन सर्वथा।४३।या-
वरी विप्र उत्तर देती । आपुल्या सत्कर्मींच आहे सद्गती । ऐसें बोलोनि तयाप्रती। विचार करिती एकमेक।४४।ह्मणती हा
होता सर्वज्ञ गुणी । निजकर्मे भ्रष्टला आपुले मनीं । तरी आतां विधियुक्त प्रायश्चित्त देऊनी । ब्राह्मणपणीं आणावा।४५।
इतर ग्रामींचे शास्त्ररीती । सकळ पुसावया आपणा येती । आणि यास शुद्ध करावया निश्चितीं । संशय चित्तीं कासया
॥४६॥जैसे इतर गांवींचे लेंडवोहळ । गंगेसि मिळतां पवित्र केवळ । आणि तिचें बाहेर पागळलें जळ । तें काय अमंगळ
ह्मणावें॥४७॥तेविं इतर ग्रामींचे भ्रष्टले कोणी । ते शुद्ध होताति प्रतिष्ठानीं । आणि येथील दवडावा सर्वज्ञ गुणी । तरी
आपणा शब्द येईल।४८।मग शास्त्र पाहोनियां त्वरित । तयासि दिधलें प्रायश्चित्त । द्रव्य वेंचोनि अपरिमित । ब्राह्मणीं
पवित्र त्या केलें ॥४९॥ सकळ द्विजवर मिळोन । बहिरंभटासि बोलती वचन । आपुल्या सत्कर्मीं तुह्मांकारण । होईल





दर्शन श्रीहरीचें ॥५०॥ तेव्हां समस्त अविंध होऊनि गोळा । द्विजांसि ह्मणती तये वेळां । तुह्मीं यवनाचा ब्राह्मण कैसा
केला । सांगा चला राजद्वारीं।५१।बहिरंभट ह्मणे तयांप्रती । मज अविंध केलें कैशा रीतीं । कर्णाचीं छिद्रें अद्यापि दि-
सती । संशय मजप्रती वाटतो५२नेत्रासि दृष्टी असोनियां । मग अंध ह्मणावें कैसें तया । गमनशक्ती आहे जया।पांगुळ
तया न ह्मणावें५३जीवासि असतां अहंता।तयासि मुक्त ह्मणणें वृथा।कर्णद्वारें शब्द ऐकतां।तरी बधिर सर्वथा न ह्मणावें
५४शर्करा मद्यांत मेळवितां जाण । तिचें न जाय गुळचटपण।तेविं तुह्मीं भ्रष्टविलें मजलागून।परी कर्णीं विंधन तैसेंची
।५५।विंधनें असतां अविंध ह्मणतां । लज्जा न वाटे तुमच्या चित्ता। यापरी यवनांसि वाद घालितां।भागले बोलतां सक-
ळिक५६ विप्रांसि ह्मणे ऐका वचन । मज प्रायश्चित्त देऊनि केला ब्राह्मण । ऐसें तुमचें धर्मशास्त्र कोण । मजकारण कळे-
ना ॥५७॥ चर्म कापिलें लिंगावरुतें । तें आलेंच नाहीं प्रायश्चित्तें । भस्म गोमय लावूनि वरतें । कैसा पवित्र मी जाहलों
।५८।नासिक कापून घेतल्या पाहीं । सन्मान राहिला कवणे ठायीं । तेविं मज भ्रष्टविलें यवनांहीं । तेथें ब्राह्मणत्व नाहीं
राहिलें ॥ ५९ ॥ पौर्णिमेनें चंद्र सोज्वळ केला । परी त्याचे अंगीं कलंक राहिला । तेविं प्रायश्चित्तें शुद्ध केलें मजला ।
परी डाग राहिला शिश्नासी ॥ ६० ॥ शिखा राखविली नापिताहातीं । परी चर्म तैसें न ये पुढतीं । हाचि संशय माझे
चित्तीं । अक्षय निश्चितीं जडलासे ॥६१॥ तरी मी ब्राह्मण सर्वथा नव्हेचि जाण । आणि यवनही न ह्मणावें मजलागू-
न । एकही वर्ण नामाभिधान । मजकारण असेना ॥६२॥ जैसा कुलालें चक्रावरी । मृत्तिका पिंड ठेविला त्याचे शिरीं।
तो घट नव्हे ना मृत्तिका बरी । तैसीच परी मज असे ॥ ६३ ॥ ऐसी ऐकूनियां वचनोक्ती । विप्र निवांत उगेच राहती ।
ह्मणती याची संशयनिवृत्ती । कैशा रीतीं होईल ॥ ६४ ॥ कोणी भेटती सज्ञान । तयांसि पुसे मी आहे कोण । ऐसें द्यावें
जी सांगोन । मग पुढें गमन करावें ॥ ६५ ॥ तूं यवन ऐसें ह्मणतां त्यासी । क्रोधयुक्त होय मानसीं । ह्मणे यथार्थ
कळेना तुह्मांसी । व्यर्थचि मजसी चाळवितां ॥ ६६ ॥ ह्मणे मी जरी यथार्थ असतों यवन । तरी कर्णास कासया अ-
सतें विंधन । तुह्मीं नेणतां चाळवोन । मूर्खपणेंची ह्मणतसां ॥ ६७ ॥ एक ह्मणती ब्राह्मण थोर । बहिरंभट प्रतिष्ठानकर ।
ऐसें ऐकूनियां उत्तर । तयांसि सत्वर निर्भर्त्सी ॥ ६८ ॥ ह्मणे तुह्मीं आह्मांसि विप्र ह्मणतां । तरी कां केली आहे सुनता ।
लिंग सोडोनि त्यांस दाखवितां । आश्चर्य चित्तीं करिताती ॥ ६९ ॥ जया तयांसि पुसतां ऐसा । नांव पडलें बहिरापि-
सा । ह्मणे कधीं भेटेल सद्गुरु ऐसा । संशयठसा निवारी ॥ ७० ॥ ऐसें असतां बहुत दिवसीं । हिंडत आला वडवाळेसी ।
तंव नागनाथ सिद्ध त्या ठायांसी । सद्गुरुमठासी राहिला ॥७१॥ तो स्वामीची समाधि बांधीत कोडें । त्यासि शरकां-
ड्याचे लाविले गाडे । पर्वतप्राय वरी ठेऊनि दगड । जुपिलीं माकडें ओढावया ॥७२॥ हें बहिरापिसा देखोनि नयनीं ।
आश्चर्य करी आपुले मनीं । ह्मणे हा संशय निवारूनी । निश्चलत्व आणील दिसताहे ॥ ७३ ॥ मग नागनाथासि ह्मणे
बहिरंभट । मी हिंदु कीं अविंध सांग स्पष्ट। ऐसी वाणी ऐकोनि उद्धट । सद्गुरुश्रेष्ठ कोपले॥७४॥दंडकाठी होती हातीं ।

ते तत्काळ मारिली ताळूवरती । मूर्च्छा येऊनि सत्वरगती । पडिला क्षितीं तेधवां ॥ ७५ ॥ चित्तवृत्ती नाठवेचि कांहीं । जीवपण आटलें ठायींचे ठायीं । मी कोण ऐसें स्फुरणचि नाहीं । चैतन्य देहीं असेना ॥ ७६ ॥ नागनाथें करूनि ऐशा रीतीं । ह्मणे याची समूळ उडवावी भ्रांती । करूनियां संशयनिवृत्ती । आत्मस्थितिं लावावा ॥ ७७ ॥ मुसळ आणवूनि सत्वरगतीं । पिंड कांडविला शिष्यांहातीं । अस्थि मांस कुटोनि निश्चितीं । गोळा करिती निजहस्तें ।७८। पुढती त्याची मूर्ती निर्मूनी । मग स्वहस्तें दिधला भडाग्नी । हें कौतुक सकळ देखोनी । आश्चर्य मनीं करिताती । ७९ । अग्नि शांत होतांचि त्वरित । अघटित करी नागनाथ । त्यातें कृपादृष्टीं अवलोकित । तों चैतन्य आंत संचरलें ॥ ८० ॥ ब्रह्मरूप तनू ओतिली सद्गुणी । जैसा योगी सेवूनि बैसला उन्मनी । नागनाथ दृष्टीसि देखोनी । संतोष मनीं वाटला ।८१। मग सद्गुरु पुसती तयासि खूण । ह्मणती बहिऱ्यापिशा ऐक वचन । तूं कोण आहेस हें मजकारण । सत्वर सांगणें लवलाहें।८२।ऐसा ऐकोनियां प्रश्न । विचार करित आपुलें मनीं । ह्मणे जाहलें संशयनिरसन । ह्मणोनि मौनें राहिला।८३।यवन ह्मणावें आपणास । तरी शिश्नावरी चर्म असे । ब्राह्मण ह्मणावें तरी कर्णास । विंधन न दिसे सर्वथा । ८४ । सद्गुरु सांगती सिद्धांतज्ञान । परी देहाचा पालट करी कवण । तें नागनाथें दाविलें अघटित करून । विकल्प दारुण निरसिला ।८५। मग नागनाथें मस्तकीं हस्त ठेवूनी । उपदेश दिधला त्यालागूनी । तत्काळ होऊनि आत्मज्ञानी । श्रीहरिभजनीं लागला८६ बहिरंभट चित्तीं हर्षयुक्त । धन्य धन्य तो सद्गुरु नागनाथ । दुसरा जन्म दिधला साक्षात । काळ क्षणमात्र न लोटतां८७ उद्दंड गुरु आत्मज्ञानी असती । जन्ममरणही निवारिती । परी देहाचा पालट नव्हे निश्चिती । कर्माची गती अनिवार ॥८८॥ ध्यानांत आणोनि पांडुरंगमूर्ती । उद्दंड भक्त उपासिती । नामदेवें जेवविली पाषाणमूर्ती । परी हे करणी दिसती विचित्र ।८९। मिथ्या माया सर्वत्र ह्मणती । संकटीं धैर्य उद्दंड धरिती । परी कबीरानें वधिलें पुत्राप्रती । हे करणी दिसती विचित्र ।९०। नरासि ज्ञान पढविती वृद्ध । श्रुति शास्त्रादि नानाविध । परी रेडियामुखें बोलविला वेद । ज्ञानदेवें अगाध केलें।९१।धन्य सांवता वरिष्ठभक्त । लपावया आले पंढरीनाथ । मग स्वकरें पोट चिरूनि त्वरित । हृदया आंत सांठविले ।९२।ऐसे वैष्णवभक्त प्रेमळ । एकाहूनि एक दिसती आगळे । यांचामहिमा कोणासि नकळे । जींहीं घननीळ वश केला ।९३।असो मागील अनुसंधान । नागनाथाची कृपा होतांचि जाण । बहिऱ्यापिशासि झालें ज्ञान । निजात्मखूण पावला ।९४।मग पंढरीसि जाऊनि तये क्षणीं । सगुण स्वरूप देखिलें नयनीं । तेव्हां प्रेमभरित होऊनी । नाचे कीर्तनीं स्वानंदें ९५ श्रीभागवत दशमस्कंध देखा । त्यावरी केली महाराष्ट्र टीका । त्या सप्रेम ओव्या अमोलिका । ऐकतां भाविकां निजसुख ।९६।आणिक पदपदांतरें शेवटीं । काव्य रचिलें बहिरंभटीं । दुरितें पळती उठाउठीं । कर्णसंपुटीं ऐकतां।९७।या निजभक्तांची ऐकतां कीर्ती । जडजीव सकळ पुनीत होती । श्रोतयां विनवी महीपती । अवधान प्रीतीं असों द्या ९८स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । चतुश्चत्वारिंशाध्याय रसाळ हा ॥९९॥ अ० ४४ ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीदेवकीनंदनाय नमः । ऐका श्रोते हो कथा रसिक । ऐकतां निवारी भवरोगदुःख । अंतरीं ठसावे पूर्ण विवेक । निजशांतिसुख ये हाता ॥१॥कांहीं न करितां योगसाधन । न घडतांचि तीर्थाटन । भक्तकथा ऐकतां मन लावून । वैकुंठभुवन पावती ॥ २ ॥ जरी बहुत नसली शास्त्रव्युत्पत्ती । अंगासि न येतां वैराग्यस्थिती । परी हरिकीर्तनीं लावितां प्रीती । ते पावन होती क्षणमात्रें ॥ ३ ॥ जयासि न घडे व्रतनेम । रसनाविषय नव्हेचि शम । तींहीं वाचेसि स्मरतां रामनाम । स्वयें पुरुषोत्तम ते होती ॥ ४ ॥ अंगीं जयासि कृपणता । आणि कुटुंबीं वाढली विशेष ममता । तींहीं श्रवण करितांचि भक्तकथा । तरी अनुताप चित्ता ठसावे । ५ ।जैसा लोहदंड होतां मळकट । परी परीस लागतां तत्काळ पालटे। तेविं भक्तकथेची लागतां चट । विवेक भेटे अज्ञाना।६।जरी पूर्वपुण्याची असेल कोडी।तरीच ये कथेची लागेल गोडी। इतर प्राक्तनहीन जीं बापुडीं । तीं विकल्पें नाडलीं सर्वस्वें।७। ह्मणोन तुह्मीं भाविक प्रेमळ । मज दिसतां देवाआगळे । जे सात्विक कथेचे गराळ । सेवितां सकळ निजप्रेमें ।८। मागील अध्यायीं कथा निगुती । परम पावन परिसिली श्रोतीं । जे भानुदासें पांडुरंगमूर्ती । पंढरीसि मागुती आणिली । ९ । त्या भानुदासाचा पुत्र सद्गुणी । त्याचें नाम ठेविलें चक्रपाणी । तो परम भाविक वैष्णवज्ञानी । श्रीहरिभजनीं निमग्न ॥१०॥ त्याचा पुत्र सूर्यनारायण । जो ज्ञानप्रकाशें देदीप्यमान । त्याची कांता सुलक्षण।नाम रुक्मीण तियेचें ।११। तिचे उदरीं जन्मला सुत । नाम त्याचें एकनाथ। जो जगद्गुरु अवतरला साक्षात । परिसा चरित्र तयाचें ॥१२॥तो दिवसेंदिवस जाहला थोर । व्रतबंध केला सत्वर । मायबापें तयावर । कृपा अपार करिताती।१३।तिथें जनार्दनपंत ज्ञानराशी।दत्तात्रेयदर्शन होतें त्यासी ।एकनाथ उठोनि एके दिवशीं। गेला दर्शनासी तयाच्या।१४।आंगडें टाकूनि मस्तकावरी । सद्भावें त्यास नमस्कारी । जनार्दन देखोनि ते अवसरीं । विस्मित अंतरीं होतसे । १५। ह्मणे तूं कवणाचा सांग त्वरित । कशास्तव आलासि येथ । जनार्दनें संबोखोनि तयाप्रत । वृत्तांत पुसत तेधवां।१६।टाकूनि मातापितयांसी । रुसोनि आलासि आह्मांपासीं । हें यथार्थ सांगावें मजसीं । संकोच मानसीं न धरितां१७मग जोडूनियां दोनी कर। एकनाथ बोले मधुरोत्तर । ह्मणे मी ऋग्वेदी ब्राह्मणकुमर । दर्शना साचार पातलों१८ मायबापावरी न रुसतां । उगाच अनुताप वाटला चित्ता । कीं देहीं जडली प्रपंचममता । कामक्रोधें चित्ता गांजिलें।१९ लोभ माया दंभ अहंकार । हे देहीं दिसती अनिवार । मग स्वामींच्या दर्शनासि सत्वर । आलों साचार निजप्रेमें२०आतांचि इच्छा असे मानसीं ।कीं निरंतर राहावें तुह्मापाशीं । सेवा करावी अहर्निशीं । निजभावेंसी आवडी।२१।मी पतीत शरण आलों पाहे । अंगीकार करीं सद्गुरुमाये । ऐसें बोलोनि लवलाहें ।धरिले पाय सद्भावें।२२।एकनाथाचें ऐकूनियां वचन । आश्चर्य करिती जनार्दन ।ह्मणती वय दिसतें लहान । परी विशाल ज्ञान अनुपम।२३।मग जनार्दनें अभय देऊनि त्यासी । ह्मणे सुखें असावें आह्मापासीं । हें वचन ऐकूनि मानसीं । उल्हास चित्तासी वाटला । २४ । जैसा द्वैपायन पडतां संशयवनीं । तयासि भेटले नारदमुनी । तेविं जनार्दनाच्या अभयवचनीं । एकानाथ मनीं संतोषला।२५।कीं हंसरूपें भे-

टतां नारायण । विरिंचीस वाटलें समाधान । तेविं जनार्दनाचे अभयेंकरून । एकनाथ मनीं संतोषला।२६।स्वामिसेवे-
सि निरंतर । अहोरात्र असे तत्पर । कोणे विषयीं न पडेचि अंतर । भावार्थ थोर धरियेला२७रात्रीं निजतां जनार्दन ।स्व-
करें चुरीत बैसे चरण । निद्रा लागतां त्यांजकारण । परी न उठणें सर्वथा २८ विडा करूनि निजहस्तें।सर्व साहित्य मिळ-
वून त्यांत । जनार्दनासि होऊनि विनीत । घाली मुखांत निजप्रेमें ।२९। मुख प्रक्षाळावयासि तस्त । निजकरें पुढें आणो-
नि ठेवित । स्नान घालूनियां आपुल्या हस्तें । साहित्य देत पूजेचें ।३०। गंधाक्षता सुमन चंदन । धूपदीपादि उपचार जा-
ण । जेव्हां जें मागती जनार्दन । तें सत्वर आणून देतसे । ३१ । जेवितां शेष उच्छिष्ट रहात । तें निजप्रीतीं भक्षी एकनाथ।
ऐसी सेवा दिवस बहुत । असे करित निजप्रेमें ॥ ३२ ॥ जनार्दन रात्रीं कफपित्त । थुंकोनि टाकीत तस्तांत । तें एकांतीं
नेऊनि एकनाथ । प्राशन करित आवडीं ॥ ३३ ॥ बहिर्भूमीचें जें स्थळ । तें स्वहस्तें करी अति निर्मळ । ऐसा गुरुभक्तीसी
सर्वकाळ । एकनाथ केवळ विनटला।३४।हें जनार्दन दृष्टीं देखतां । मग आश्चर्य करिती निजचित्ता।ह्मणे मनुष्य ह्मणूं न-
ये एकनाथा । सकळ गुरुभक्तां वरिष्ठ कीं ।३५। एकांत पाहोनि एके दिवशीं । जनार्दन कृपेनें पुसती त्यासी । तूं सेवा क-
रितोसि आह्मांपासीं ।मायबापासीं न कळतां॥३६॥ तूं तो विरक्त दिससी जाण।घरीं पाहिजे वस्त्रअन्न।वडील वृद्धें दोघे-
जण । चिंता दारुण करितील । ३७ । ऐसें जाणूनि जनार्दन । घरीं पाठवीत वस्त्र अन्न । वडिलांसि कळतां वर्तमान । समा-
धान वाटलें । ३८ । जनार्दन विचारी निजअंतरीं । ह्मणे यासि सांगावी कांहीं चाकरी । मग एकनाथासि आज्ञा करी ।
हिशेब दप्तरीं राखावा।३९।तूं येथें असलासि जरी प्रवीण । तरी कळों येईल अवघेंच ज्ञान । मग अवश्य ह्मणोनि केलें न-
मन । ह्मणे आज्ञा प्रमाण स्वामींची ।४०। परी सेवेसि न पडतां अंतर । हिशेब राखावा निरंतर । जनार्दन ह्मणती परमच-
तुर । कळला विचार मजलागीं । ४१ । तरी कांहीं निमित्त करून जाण । स्वरूपीं लावावें याचें मन । एकनाथास जवळ
बोलावून । ह्मणे हिशेब दाखवणें आह्मांसी । ४२ । पाहूनि खरडा खतावणी । हिशेब दाखवीं आह्मांलागुनी । अवश्य ह्म-
णोनि तये क्षणीं । पुढती चरणीं लागला ।४३। सेवेचा सारूनि नित्यनेम जाण । रात्रीं दीपकासि घातलें भरण।त्यांत एक
अडका राहिला चुकोन । तोचि धुंडोन पहातसे ।४४। परी कोठेंचि न सांपडे त्वरित । ताळा न पडेचि हिशेबांत । मग ए-
काग्र करून चित्त । हिशेब पाहात बैसला।४५।क्षणभरीही न करी शयन । न मानी निजदेहाचा शीण ।तृषा लागली अ-
ति दारुण । परी उदकपान करीना।४६।ह्मणे उपहार करूनि उदक प्राशितां । तरी निद्रा आळस येईल तत्वतां । मग काय
सांगावें गुरुनाथा । विवेक चित्ता करीतसे । ४७ । जनार्दन जागृत होऊनि त्वरित । सभोंवतें विलोकूनि जंव पाहात । तों
एकनाथ न दिसे तेथ । ह्मणोनि विस्मित जाहले।४८।अंतरगृहीं धुंडितां देखा । तों हिशेब पाहत बैसला एका । भरण घा-
लोनि दीपका । धुंडित अडका निश्चळत्वें।४९।तों अकस्मात ताळा पडतां । हर्ष वाटला एकनाथा । मग आपुल्याच हातें
टाळी पिटितां । दुसरा नसतां सन्निध।५०।मागें उभे राहून तेथ । जनार्दन पाहती कौतुकांत । मग सन्मुख येऊनि त्वरित ।



स्वमुखें पुसत तयासी।५१।सद्गुरु ह्मणती एकनाथा । काय आश्चर्य वाटलें चित्ता । ह्मणोनि हर्ष मानूनि आतां । हांसला-
सि ये क्षणीं।५२।ऐसें ऐकोनियां वचन । वरतें पाहे विलोकून । मग सत्वर उभा राहून । केलें नमन सद्भावें॥५३॥ह्मणे सर्व
हिशेब शोधून पाहतां । त्यांत एक अडका चुकला होता । त्याचा अकस्मात ताळा पडतां । उल्हास चित्ता वाटला ।५४।
ह्मणोनि संतोष पावून मन । हांसें आलें मजकारण । ऐसें ऐकोनियां वचन । जनार्दन विस्मित।५५।मग एकनाथासि स-
द्गुरु बोलत । तुझें अडक्याकडे लागलें चित्त । तैसें श्रीकृष्णचरणीं होतां रत । तरी पावशील निजहित आपुलें । ५६ । ऐसीं
अक्षरें पडतां कानीं । अनुताप जाहला तये क्षणीं । ह्मणे हेचि इच्छा होती मनीं । जे आज्ञा स्वामींनीं मज द्यावी ५७ धन्य
दिवस सुदिन आजिचा । अनुग्रह जाहला निजकृपेचा । विकार तुटोनि मायेचा । ठाव प्रपंचाचा पूसिला।५८। मग ले-
खणी घेऊनि तये क्षणीं । एकनाथें ठेविली सद्गुरुचरणीं । सांगीतली जमाखर्चघडणी । ते ऐकावी सज्जनीं निजप्रीतीं ५९
नरदेह मुद्दल सालमजकुर । गुदस्तां रुजू पूर्वसंस्कार । प्रेमपत्र हृदयीं अक्षर ।स्वधर्म थोर खर्च केला ६० फळत्याग करि-
तांचि सकळ । रुजू पावेल स्वामीजवळ । ब्रह्मार्पणीं तये वेळे । अर्पिलें न कळे सर्वथा।६१।विचार सुरस हा निजनेमाचा।
सावधानपणीं लिहितां साचा । वरी मनसुर सद्गुरुकृपेचा । हिशेब सकळाचा पूसिला । ६२ । एवं नरदेह जमा झाडिया-
सि आणूनी । अज्ञानबाकी झाडा करूनी । मी विनटलों तुमचे चरणीं । व्यापार सांडोनी निजच्छंदें । ६३ । त्रैलोक्याचे
स्वामी आपण । व्यापार जाहला तुह्मांपासून । तें वाचेसि आवडे कृष्णनाम । कृपेंकरून आपुल्या । ६४ । सोहं दिधलें
खुर्द खत । तें मस्तकीं वंदिलें म्यां त्वरित । प्रेमाचीं वस्त्रें अपरिमित । पावलों निश्चित ये काळीं।६५। निजमुक्तीचा लाध-
लों विडा । तेणें वारिली भवरोगपीडा । कैवल्यपुरासि जाऊनि रोकडा । चैतन्यहुडा बैसलों।६६।स्वानुभवाची तहसी-
ल निकी । रसद स्वामीसि दिधली शेखीं । सत्संग सारून वसूलबाकी । हुजत नेटकी भक्तीची ।६७। पूर्वसुकृत होतें कां-
हीं । मग रामनामव्यापारीं लागलों पाहीं । ऐसें ह्मणूनि तये समयीं । घातलें पायीं दंडवत ।६८। हें वचन ऐकतांचि श्रव-
णीं । जनार्दन विस्मित जाहले मनीं । ह्मणे यासि उपदेश द्यावयालागुनी । अधिकार दिसोनी येताहे॥६९॥मग उठवो-
नि एकनाथाप्रती । जनार्दन कृपेनें आलिंगिती । रामकृष्णमंत्र तारक निश्चिती । सद्गुरु सांगती तेधवां ॥७०॥तेथेंच वि-
श्वास धरूनि दृढ । परमार्थयोग साधिला गूढ । कीर्तनीं हरिगुण पवाडे । गातसे कोडें निजप्रीतीं ।७१। इतुकी कृपा जा-
हलियावरी । परी सद्गुरुसेवेंत अंतर न करी । दिवसेंदिवस अधिकोत्तरीं । सद्भाव साचारीं बैसला ॥७२॥ हा निश्चय दे-
खोनि जनार्दन । ह्मणे यासि मनुष्य ह्मणेल कोण । विश्वोद्धार करावयालागून । अवतार पूर्ण विष्णूचा ॥७३॥ यावरी
करूनि कृपादृष्टी । श्रीदत्तात्रेयाची करावी भेटी । ऐसें विचारूनियां पोटीं । जीवींची गोष्टी सांगतसे ॥ ७४ ॥ एकना-
थासि ह्मणे जनार्दन । तुज श्रीदत्तात्रेयाची भेट करीन । परी निर्भय असूनि त्वां मनें । चित्तीं न भिणें सर्वथा ॥७५॥ ते
आपुलीं स्वरूपें कडोविकडीं । पालट करिती घडीघडीं । अज्ञानी जन निंदिती रोकडी । काया चोखडी तेचि धरिती

॥७६॥ तरी मी जयासि बोलेन गोष्टी । तूं त्याचे चरणीं घालीं मिठी । आलिंगन देऊनि उठाउठी । सद्गुरूसि पोटीं ध-
रावें।७७।प्रसाद दिधला तुजकारण । तरी तेथेंच भक्षीं निजप्रितीनें । ऐशी जनार्दनें देतां शिकवण । एकनाथ चरण ध-
रीतसे।७८। ह्मणे हेचि इच्छा बहुत दिनीं । वाटतसे माझिया मनीं । परी स्वामीची मर्यादा उल्लंघोनी । सर्वथा माझेनी न
बोलवे७९।तें आजि आपुले स्वसुखेंकरून । स्वामींनीं मज दिधलें अभयवचन । तें आजि मनोरथ पूर्ण करून । करवावें
दर्शन दत्ताचें ।८०। ऐसा पूर्ण जाणूनि हेत । एकनाथासि नेलें अरण्यांत । तंव तेथें अनसूयासुत अकस्मात । आले त्वरित
भेटावया । ८१ । जनार्दन ह्मणे एकनाथा । आमुचे स्वामी ओळखें आतां । तों अविंध बैसोनि अश्वावरुता। आला अव-
चितां त्या ठायां ।८२। ऐसें रूप देखतां दृष्टीं । एकनाथ भयभीत जाहले पोटीं । ह्मणे प्रत्यक्ष यवन दिसतो दृष्टीं । असत्य
गोष्टी मज वाटे।८३।विशाल भाल आरक्त नयन । हातीं शस्त्रें अश्ववाहन । सन्निध येऊन उतरला जाण । मग केलें नमन
जनार्दनें।८४ ।यवनभाषेनें अनसूयासुत । जनार्दनासि बैसले बोलत। हें दृष्टीस देखोनि एकनाथ।आश्चर्य करीत मानसीं
।८५। सद्गुरु ह्मणती जनार्दना। क्षुधा लागली करूं भोजना। तेथें पक्वान्नें निर्मूनि नाना । आश्चर्य रचना दाखविली।८६।र-
त्नजडित कनकताट । त्यांत षड्रस वाढिले गोमटे । जनार्दन बैसोनि निकट । जेवीत स्पष्ट सांगातें।८७। सद्गुरु ह्मणती ज-
नार्दना । पैल तो मूल दिसतो नयना । त्यासि सत्वर बोलवावें भोजना । तुमच्या मना येईल तरी ।८८। ऐसें ऐकोनियां व-
चन । विकल्प वाटला त्याजकारण। ह्मणे यवनाचें कैसें भक्षावें अन्न । गेले पळून दूर तेव्हां ।८९।दत्तात्रेय तत्काळ अदृश्य
होतां । आश्चर्य वाटलें एकनाथा । सद्गुरुचरणीं ठेऊनि माथा । झाला पुसता निजप्रेमें।९०।ह्मणे कोण आला होता यवन।
तुह्मी भेटलेती त्यालागून । ते ह्मणती तुज मेणवेचि खूण । तो आत्रिनंदन होता कीं।९१।साधन करितां नानासायास ।परी
त्याचें दर्शन नव्हेचि कोणास । ते तुज भेटतां अनायासें । परी विकल्प चित्तास आला कीं ।९२। वाटेसि जातां अभाग्य
नरू। तों अवचित भेटला कल्पतरू। त्यासि डावलोनि केला अव्हेरू। तैसाच विचारु त्वां केला।९३।नातरी अमूल्य मु-
क्ताफळ। हातावरी पडिलें तत्काळ। तंव दैव नसतां झांकिले डोळे। तैसेंच घडलें तुजलागीं।९४।अमृतसिंधु पडल्या दृष्टीं।
काळासही मारवेल काठी। परी अनसूयासुत उठाउठी । प्राकृतदृष्टीं पडेना।९५। वज्रासनयोग अवघड । तोही साधवेल
वाडेकोडें। परी दत्तात्रेयाचें दर्शन न घडे । तें तुज जोडे अनायासें ।९६। जीवमात्राचें मनोगत । न सांगतांचि कळेल त्व-
रित । परी दृष्टीं पडावा अत्रिसुत । हें अघटित एकनाथा ।९७। निजबळें पाहूनि आपण । सप्तसागरांचें घडेल स्नान । परी
सद्गुरूचें दर्शन । दैवेंकरून लाधलें ।९८। पुढील भविष्य मेणेचि कोणी। तेंही एक वेळ कळेल मनीं । परी दत्तात्रेय साक्षात
येऊनी । कोणालागुनी न भेटती । ९९ । ते तुज अनायासें भेटले असतां । वायांचि विकल्प धरिला चित्तां । बरें पुढें दर्शन
दिधल्या अवचितां।तरी सावधानता असावी।१००।यावरी एकनाथ उत्तर देत। मी तुमचा ह्मणवितों मुद्रांकित।आणि-
के ठायीं लावितां चित्त । विकल्प धरीत निजमनीं ।१। बालक पित्याचें जाणे अंतर ।पितामह सहजचि लोभ करी । तेविं



तुमचेचरणधरितांशिरीं । श्रीदत्तमजवरीतुष्टेल ॥२॥ कींपुष्पेंधरितांदेंठास । त्यासिसहजाचिपावेलसुळींचारस । तेविंतु-
मचालागतांनिदिध्यास । दत्तअनायासेंभेटती।३।ऐसेंसद्गुरूसीबोलोनिवचन । उभयतांघरासिआलेत्वरेनें ।एकेदिवसीं
जनार्दन । एकनाथासीबोलती ॥४॥ आजिवनांतजाऊनितुजकारण । श्रीदत्तात्रेयाचेंकरवितोंदर्शन । परीकोणत्यारूपें
येतीलजाण । आह्मांकारणकळेना।५।ऐसेंबोलोनितयाप्रती । अरण्यांतगेलेसत्वरगतीं । तंवमलंगरूपेंअवचितीं । दत्ता-
त्रेयमूर्तीयेतसे।६।मायारूपतेचिकामिनी । कामधेनुसवेंदिसतीशुनी । ऐसेंरूपदृष्टीसिदेखोनी । जनार्दनमनींआनंदले७
मगपुढेंहोऊनिसत्वर । केलासाष्टांगनमस्कार । आलिंगनदेऊनिनिजकरें । बोलतीउत्तरएकमेकां ।८। यवनभाषेनेंअन-
सूयासुत । जनार्दनासिकायबोलत । क्षुधालागलीआह्मांबहुत । तरीभोजनत्वरितकरावें ॥ ९॥ मगमृत्तिकापात्रसत्वर
काढोनी । त्यामाजीस्वकरेंदोहिलीशुनी । तिच्यादुग्धांतअन्नचुरोनी । बैसलेभोजनींउभयतां॥११०॥सद्गुरुह्मणतीज-
नार्दना । पैलतोकोणादिसतोनयना । तयासिपाचारूनिआणा । सवेंभोजनाबैसावया ॥११॥ वचनऐकूनिएकनाथ । म-
नांतजाहलेसंकोचित । ह्मणेसाक्षातफकीरदिसत । कैसेंअनुचितकरावें।१२।जनार्दनदाखवितीनिजखूण । तुजमागेंदि-
धलीशिकवण । त्याजगद्गुरूचेंजाहलेंदर्शन । तरीप्रसादघेऊनजाईंकां।१३।मगएकनाथसंकोचितकरूनिचित्त । समीप
आलेभीतभीत । ह्मणेसमागसेंनबैसेंनिश्चित । तरीप्रसादत्वरितमजद्यावा ।१४। तेव्हांउच्छिष्टग्रासनिजप्रीतीं । जनार्दन
देततयाहातीं । तोवस्त्राचेपदरींबांधोनिनिश्चिती । निवांतस्थितींबैसले॥१५॥ भोजनसमाप्तहोतांपाहे । जनार्दनासिबो-
लतीदत्तात्रेय । पैलतोमूलकोणआहे । सांगलवलाहेंआह्मांसी ॥ १६॥ मगएकनाथासिबोलावूनिलवलाहीं । उचलोनि
स्वामीचेघातलापायीं । त्यांनींआश्वासनदेऊनिपाहीं । बरदानकांहींबोलती । १७। श्रुतिशास्त्रांचेंजेंमथित । व्यासेंका-
ढिलेंश्रीभागवत । त्याचाअर्थसखोलगुप्त । वदेलप्राकृतप्रसिद्धहा।१८।आणिकभावार्थरामायण।वदेलरसाळनिरूपण।
तेंश्रवणकरितांप्रीतीकरून । तरतीलजनसकळिक ॥१९॥ आणिकपदपदांतरेंबहुत । श्रीहरिचरित्रअतिअद्भुत । कीर्तनीं
गाऊनिप्रेमयुक्त । उद्धरीलपतितश्रवणमात्रें।१२०।ऐसावरदेऊनिसत्वर । मस्तकींठेविलाअभयकर।निमिषलोटतांसा-
चार । अदृश्यजाहलेतेधवां ।२१। जनार्दनह्मणेएकनाथा । आजितरीयथार्थवाटलेंचित्ता । तुजलाप्रसाददिधलाहोता ।
तोंठेविलाकेउतामजसांग।२२।येरूयथार्थबोलेवचन । तोग्रासम्यांदिधलाटाकून।मगजनार्दनेंतांबूलकाढोन।निजकरें
मुखांतघातलें । २३ । एकनाथासिधरूनिहातीं । मंदिरांतआलेसत्वरगतीं । एकमेकांसिनविसंबती । जेविंलेंकुराप्रतीनि-
जमाय॥२४॥आणितान्हयासिनपडेमायेचाविसर । हेंपरस्परेंसाक्षदेतसेअंतर । तेविंएकनाथजनार्दननिरंतर । असती-
साचारएकचित्तें।२५।दीपकआणिप्रकाशज्योती । कींसुवर्णआणित्याचीकांती । द्रवत्वआणिउदकनिश्चितीं । अभिन्न
असतीएकत्वें ।२६। कींरविआणित्याचींकिरणें । कींचंद्रआणिशीतलत्वजाण । कींसमीरआणिचंचळपण।अभिन्नपणें
असतीपैं ।२७। समुद्रआणिकल्लोळकैसे । भिन्नपणेंएकत्रजैसे । अमृतआणिस्वादरस । एकत्रपणेंनांदती ।२८।कींअवधान

अ० आणिश्रवण। कींपृथ्वीआणिघनवटपण। अध्यात्मआणिसत्वगुण। नामाभिधानेंवेगळालीं।२९। तेविंजनार्दनआणि
एकनाथ। नामेंदोनपरीअभिन्नअसत। एकमेकांसिनविसंबत। कासावीसआप्तजयापरी।१३०। तंवकोणेएकेदिवसीं।
जनार्दनविचारीमानसीं। आतांसेवाघेगेंयाजपासी। अनुचितमजसीदिसताहे॥३१॥ मगएकनाथासिबोलतीवचन।
माझीआज्ञातुजप्रमाण। तरीआतांप्रतिष्ठानासिजाऊन। गृहस्थाश्रमचालवीं।३२। स्नानसंध्यादेवतार्चन। वैश्वदेवादि
अतिथिपूजन। नित्यनैमित्तिककर्माचरण। दाखवींवर्तवूनलोकांसी।३३। तूंअध्यात्मज्ञानींप्रवीणहोसी। परीसर्वथान
सोडींसत्कर्मासी। नदीपारजाहलियाआपणासी। तरीकेविंनावेसीफोडावें।३४। तेविंमिथ्याकर्मकळलेंअंतरीं। तरीव-
र्तावेंलोकाचारीं। यथाविधिवर्तोनिनिर्धारीं। मगतेंईश्वरींअर्पावें॥३५॥ हेंवचनप्रमाणकरितांत्वरित। तुजप्रसन्नहोईल
रुक्मिणीकांत। जनार्दनेंमस्तकींठेविलाहात। प्रतिष्ठानींत्वरितचालिले।३६।सद्गुरुवचनहेंचिप्रमाण।त्याहूनिवरिष्ठन-
व्हेचिसाधन। हेगुरुभक्तचिजाणतीखूण। इतरांकारणनघडेची॥३७॥मगनिजमंदिरायेऊन। वडीलवृद्धांसकेलेंनमन।
पुत्रदेखतांत्यांजकारण। समाधानवाटलें॥३८॥स्नानसंध्यादेवतार्चन। मातापित्यांचेंकरीसेवन।ऋतुकाळींस्वदाराग-
मन। विधिआज्ञेनेंकरीतसे।३९। नकरीकोणाचेंउपार्जन। दृष्टीसनयेतीथोरसान। चराचरजेंजेंदिसेआन। तेंतेंजनार्दन
भासत॥१४०॥ घरींपुरातनपांडुरंगमूर्ती। एकनाथपूजीनिजप्रीतीं। जैसीबोलिलीशास्त्रींनीती। तैशाचरीतींअर्चीतसे
।४१।नानापरीचींसुमनेंचंदन। परिमळउपचारसुगंधभूषणें। धूपदीपकर्पूरनीरांजन। नैवेद्यअर्पणनिजभावें।४२।पुष्पां-
जलिस्तोत्रेंपढोनिनाना। देवासिघालीतसेप्रदक्षिणा। मगसाष्टांगनमस्कारघालोनिजाणा।भाकीतकरुणाअनुतापें४३
जयपतितपावनाजगदुद्धारा। द्वारकावासियारुक्मिणीवरा। अनाथनाथाकरुणाकरा। सर्वेश्वरापांडुरंगा॥४४॥ मी
अनन्यभावेंतुजशरण।म्हणूनिपुढतीकरितोंनमन। मग तुळसीप्रसादघेऊन। तीर्थप्राशनकरीतसे॥४५॥ब्राह्मणघेऊनि-
यांपंक्तीं। भोजनकरीतनिजप्रीतीं। तृतीयप्रहरींपुराणव्युत्पत्ती। श्रवणकरितीसद्भावें।४६।रात्रींआरंभीहरिकीर्तन। श्र-
वणासियेतीभाविकजन। एकनाथाचेंऐकोनिवचन। होतीतल्लीननरनारी॥४७॥जनार्दनाचेकृपेकरूनी। कवित्वबोल-
तीप्रसादवाणी। संतसज्जनऐकतीकानीं। संतोषमनींमानिती॥४८॥ एकेदिवाशींएकनाथ। निद्रितहोतेयामिनींत। तों
स्वप्नींयेऊनिश्रीरघुनाथ। कायबोलतीतयासी॥४९॥ म्हणेवाल्मीकिकृतरामायण। संस्कृतवाणीनकळेगहन। यावरी
महाराष्ट्रटीकाकरून। जनांकारणेंसांगावी॥१५०॥ऐसेंस्वप्नदेखतांचिजाण। जागृतीसआलेनलागतांक्षण। तेचिआज्ञा
करूनि प्रमाण। आरंभीरामायणप्राकृत॥५१॥सुदिनपाहोनिएकेदिनीं। सप्तकांडेंपाहिलींशोधोनी। तोअभिप्रायध्या-
नींआणोनी। एकनाथमनींतल्लीन॥५२॥म्हणेयाचाअर्थसखोलगहन। मीप्राकृतकायबोलोंजाण।परीजनार्दनाचेकृपे-
करून। ग्रंथवदेनयथामती॥५३॥ बालकांडआरंभितांचिजाण। प्रथमाध्यायींमंगलाचरण। गणपतिसरस्वतीचेवंदो-
निचरण। सद्गुरुस्तवनमगकेलें।५४।प्रार्थूनिसंतसज्जनमूर्ती। ग्रंथआरंभिलाएकनाथीं। सद्भावेंबोलिलावचनोक्ती। मग





भावार्थम्हणतीरामायण।५५।मुखींबैसोनिश्रीरघुनाथ। ग्रंथवदवितीयथार्थ। एकनाथपुढेंनिमित्तमात्र। जाणतीपवित्र
निजभक्त॥५६॥परीएकगृहस्थहोताशेजारीं। तोनित्यत्याचीनिंदाकरी। म्हणेप्राकृतटीकासंस्कृतावरी। एकनाथकरी
कासया।५७।कोणीभाविकहोतेप्रेमळ। तेयाचेंकवित्वम्हणतीरसाळ। श्रवणींपडतांचितत्काळ। राहेतळमळचित्ताची
॥५८॥एकेदिवशींरात्रींत। निद्रितझालेएकनाथ। तोंस्वप्नींयेऊनिजानकीकांत। कायबोलतीतयासी॥५९॥आतांनिद्रा
आळसटाकूनिजाग। लिहीतबैसेंरामायण। तुझेमुखींचेंरसाळभाषण। मजकारणेंआवडे।१६०।दौतलेखणीपत्रहातीं।
आणोनिदेतअयोध्यापती। जागृतहोऊनिजंवपाहती। तंवदृष्टीसनदिसतीश्रीराम।६१।मगकरूनिरघुनाथस्मरण। लि-
हीतबैसलेरामायण। तोंअद्भुतवर्तलेंगहन। तेंपरिसासज्जननिजप्रीतीं।६२।सीताशुद्धीसजातांमारुती। तेकथालिहितां
सप्रेमचित्तीं। एकनाथासिनसेदेहभ्रांती। मीपणनिश्चितीस्फुरेना॥६३॥ महेंद्रपर्वतावरूनी। हनुमंतउडालाजयेक्षणीं।
तेओंवीलिहितांयालागुनी। आविर्भावमनींदाटला।६४।तोप्रेमादाटोनिमनांत। मगउडोनिचालिलेएकनाथ। शेजा-
रियाचेवाड्यांत। पडिलेअवचितअर्धरात्रीं।६५।गृहस्थहोऊनियांजागृत। अंगणींयेऊनिजंवपाहत। तोंमूर्च्छितपडिले
एकनाथ। देखोनिविस्मितअंतरीं॥६६॥ मगहातींचेंपत्रघेऊनी। वाचूनिपाहेतयेक्षणीं। तेव्हांतोउमजलाआपुलेमनीं।
म्हणेप्रेमेंकरोनिउडाले॥६७॥गृहस्थपुसतसेवर्तमान। किमर्थयेथेंपडलेतियेऊन। परीत्यासिनाहींदेहभान। म्हणोनिव-
चननबोलत॥६८॥ऐसीस्थितिदेखतांसत्य। अनुतापजाहलाचित्तांत। म्हणेएकनाथअवतारमूर्तिसंत। म्यांनिंदिलेंव्यर्थ
यांप्रती।६९।मगआपुलेपाठीवरबांधूनिसत्वरीं। नेऊनिबैसविलेंत्यांचेमंदिरीं। एकनाथसावधहोऊनिलवकरी। लेखन
करीतबैसले॥१७०॥ गृहस्थकरूनियांनमन। आपुलेगृहागेलाजाण। म्हणेएकनाथाचाउपदेशघेईन। विचारत्यानेंदृढ
केला॥७१॥चमत्कारदेखिलाअतिअद्भुत। मगतयावरीजरीबसलाहेत। तरीतोनव्हेशुद्धभावार्थ। दांभिकनिश्चितया
नांव।७२। परिसाचादेवजाणतकेला। मगदेव्हारींषोडशोपचारेंपूजिला। ऐसाभक्तभावार्थदेखिला। तरीदांभिकत्या-
जलाम्हणावें।७३।कामधेनूचाचमत्कारदेखोनिजाणा। मगतीसघातल्याप्रदक्षिणा। त्यांच्यासद्भावाच्याखुणा। कळ-
तीसज्ञानांभाविकां।७४।कल्पतरूसओळखोनी। मगकामनिकत्यासिघालितीपाणी। त्यासिपरोपकारीम्हणतांकोणी।
तरीयथार्थसज्जनींनम्हणावें।७५। तेविंसंतांचाउपहासआधींकेला। मगचमत्कारपाहोनिभावार्थजडला। तरीदांभिक
म्हणावेंत्याला। अन्यथाबोलअसेना॥७६॥वैभवपातलेंसोयऱ्यासी। मगपिशुनआदरकरितीत्यासी। परीमागीलअप-
मानआठवूनमानसीं। प्रशस्तत्यासीवाटेना।७७। तेविंगृहस्थेंउपहासआधींकेला। मगचमत्कारपाहोनिशरणआला।
परीएकनाथासिदांभिकभासला। वृत्तांतपहिलाआठवूनी॥७८॥ एकेदिवशींजनार्दनसुत। एकांतींबैसलेदेवघरांत। तों
गृहस्थसत्वरयेऊनितेथ। प्रार्थनाकरीततयांची॥७९॥ म्हणेस्वामीतुमचामहिमानेणतां। म्यांमागेंउपहासकेलावृथा।
आतांभावार्थधरूनिचित्ता। आलोंसमर्थातुजपासीं१८०तरीमाझेमस्तकींठेऊनिहात। उपदेशद्यावाजीत्वरित। वचन

ऐकोनिएकनाथ। राहिलेनिवांतउगेची।८१।ह्मणतीअधिकारनपाहतांकांहीं। कैसाकरावासंप्रदायी। बरडभूमीअसतांपाहीं। तेथेंसर्वथाकांहींनपेरावें।८२।कुळासिनाहींठावठिकाण। तयासिसर्वथानयावेंधन। कुंभफुटकानपाहतांजाण। तरीतयांतजीवनभरूंनये॥८३॥ऐसेंह्मणोनिएकनाथ। गृहस्थासिकायउत्तरदेत। तुह्मींआपणायोग्यपाहूनिसमर्थ। तयासिभावार्थधरावा।८४।ऐसेंतयासिह्मणतांपाहीं। परीतोसर्वथानायकेकांहीं। ह्मणेतुह्मांविणउपदेशघेणेंनाहीं। ह्मणूनिपायींलागला॥८५॥त्याचेंभिडेस्तवबाह्यात्कारें। ह्मणेउदयीकमुहूर्तआहेबरा। तुह्मींस्नानकरूनिसत्वर। यावेंऐसेंबोलिले।८६।मगगृहस्थउठोनिगेलियाघरीं। एकनाथविचारकरितीअंतरीं। ह्मणतीआळशीकृपणासिउपदेशसत्वरीं। देऊंनयेचीसर्वथा॥८७॥उदयीकस्नानकरूनित्वरित। देउळासिआलेजनार्दनसुत। घरच्यामनुष्यांसिकायसांगत। अग्रोदकयेथेंनठेवावें ॥ ८८ ॥ आह्मींहांकमारिलियासत्वर। परीकोणीचनद्यावेंप्रत्युत्तर। ऐसाद्दढसांगोनिविचार। मगमानसपूजेसीबैसले।८९।तोंगृहस्थस्नानकरूनित्वरित। सत्वरआलेदेवघरांत। तंवएकनाथबैसलेध्यानस्थ। मुखींजपतकृष्णनाम ॥ १९० ॥ विचारकरितीआपुल्याचित्ता। याचीपरीक्षापाहावीआतां। दांभिकअसलातरीसर्वथा। उपदेशवृथादेऊंनये।९१। मगहांकमारूनिमंदिरांत। घरच्यामनुष्यांसिकायबोलत। अग्रोदकठेविलेंनाहींयेथ। कायनिमित्तपैंआजी॥९२॥सागुतीसांगतीतेअवसरीं। आतांतरीआणूनियाझडकरी। परीकोणीचनबोलतीमंदिरीं। मगएकनाथझडकरींऊठिले॥ ९३ ॥हातींचंबूघेऊनित्वरित। ह्मणेकोणीउदकद्यावयानाहींयेथ। मगआपणचीजाऊनिमंदिरांत। अग्रोदकनिश्चितआणिलें। ९४। गृहस्थाचीपरीक्षा घेऊनिऐसी। एकनाथलागलेदेवपूजेसी। मनांतह्मणेहाकुटिलआळसी। तरीउपदेशयासिदेऊंनये॥९५॥ जोफुकाचेंउदकनेदीदेवा। तोकायपुढेंकरीलसेवा। जोनमस्कारनकरीभूदेवा। तोपक्कान्नजेवांनेदीच॥९६॥जोवाटनसांगेपथिकासी। तोमंदिराठावदेकेविंत्यासी। कींजोबैसावयानेदीपाहुण्यासी। तोसिरयावडोईसीबांधीना॥ ९७ ॥ तेविंफुकाचेंआणोनिनेदीजीवन। तोपुढेंकायकरीलसाधन। ऐसेंमनांतविचारून। करीतपूजनश्रीहरीचें ॥ ९८ ॥ यावरीगृहस्थकायबोलत। माझेमस्तकींठेवाहात। एकनाथह्मणतीटळलामुहूर्त। आतांनाहींदिसतयापुढें ॥ ९९॥ वचनऐकोनित्याअवसरीं। गृहस्थगेलानिजमंदिरीं। एकनाथाच्याअंतरीं। समाधानवाटलें ॥ २०० ॥ ह्मणेदांभिकपणव्यर्थवायां। आह्मांससांप्रदायीपाहिजेकासया। तरीसर्वउपाधिटाकोनियां। पंढरीरायाभजावें॥१॥जनार्दनाचेतान्हयाबाळका। कासयापाहिजेतशिष्यशाखा। **अंगाजाणीवयेईलदेखा**। ह्मणोनिआशंकावाटत॥२॥यापरीअसोनिवैराग्यभरित। भजनकरितीएकनाथ। **पुढेंद्वारकेहूनिश्रीकृष्णनाथ**। सेवेसियेतीलनिजांगें॥३॥ तेकथाकानींऐकतांफुडी। श्रोतयांअधिकलागेलगोडी। मगभवरोगाचीदिसतेवांकडी। तेजाईलरोकडीउठाउठीं॥४॥ ह्मणोनिश्रोतयांपुढतपुढती। विनंतीकरीमहीपती। कथाश्रवणींलावूनिप्रीती। अवधानविशींअसावें॥५॥स्वस्तिश्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतांतुष्टेलजगन्नाथ। प्रेमळऐकाभाविकभक्त। पंचचत्वारिंशाध्यायरसाळहा॥२०६॥अध्याय॥४५॥



श्रीगणेशाय नमः। श्रीधेनुकासुरमर्दनाय नमः। आजि अमृतसिंधूसि भरतें आलें। कीं ब्रह्मविद्येचें भांडार उघडलें। कीं वासरमणीचें तेज भलें। हृदयीं प्रकटलें श्रोतयांचे ॥ १ ॥ नातरी शुद्धज्ञानाचें गुज। कानीं अवचट पडिलें सहज। कीं मोक्षयुक्तीचेंही बीज। लाधलें आज निजभाग्यें ॥२॥ कीं हा मंत्रराज मंगळनिधी। दैवदशेनें प्रकटला आधीं। कीं वैराग्यविवेकाची बुद्धी। भक्तकथेसंधीं पातली ॥ ३ ॥ नातरी शांतीचें निजसुख। कीं विवेकवल्लीचें उगवलें रोंप। कीं आनंदसुखाचा हरिख। प्रकटला देख भूमंडळीं ॥ ४ ॥ कीं वैराग्याची निरपेक्षता। कीं भूतदयेची ही ममता। कीं प्रेम आवडी तत्वतां। ते हे भक्तकथा रसाळ ॥ ५ ॥ कीं सायुज्यतेचें निजधाम। कीं कीर्तनसुखाचें हें प्रेम। कीं निर्विकल्प प्रकटला कल्पद्रुम। कीं साधन निष्काम ह्मणावें ॥६॥ मागिले अध्यायीं एकनाथें। परीक्षा करूनि वाळिला गृहस्थ। जेविं पितळ तावितां अग्नींत। काळें दिसत दृष्टीसी ॥७॥ कीं कसवटी लावितां सुवर्णासी। डांक्रळग दिसे हीनकसी। मग परीक्षक सोडून देती त्यासी। नये मानसीं ह्मणोनियां ।८। नातरी वेश्येचें सुंदर गायन। परी विरक्त तेथें न घालिती मन। कीं राजमंदिरींचें वर्षासन। पवित्र सज्जन न घेती ॥९॥ कीं एकचि शीत चांचपटोनी। भात पाहती सुगरणी। तेविं एकनाथें त्यास मागोनि पाणी। कुचर निजमनीं वोळखिला ॥१०॥ षोडशोपचारें नित्यपूजा। सद्भावें अर्पित अधोक्षजा। साहित्य द्यावयासि नाहीं दुजा। हें गरुडध्वजा जाणवलें ॥ ११ ॥ ह्मणे माझे पूजनीं अति आवडी। एकनाथास प्रीती लागली गाढी। तरी निजांगें जाऊनि तांतडी। कार्य लवडसवडीं साधावें ॥ १२ ॥ ऐसें बोलूनि द्वारकानाथ। ब्राह्मणरूप धरूनि त्वरित। प्रतिष्ठानीं येऊनि अनंत। पुसे वृत्तांत लोकांसी ॥१३॥ जो अंतरसाक्ष चैतन्यघन। ब्रह्मांडनिवासी जगज्जीवन। तो एकनाथाचें पुसे सदन। ठावें असोन अंतरीं ॥१४॥ ह्मणे या ग्रामांत वैष्णववीर। श्रीकृष्णपूजनीं अति सादर। ब्राह्मणभोजन करी निरंतर। तयाचें मंदिर कोणतें ।१५। ऐसें बोलोनि घनसांवळा। त्याचे मंदिरांत प्रवेशला। नरनारी दाविती ते वेळां। मग नमस्कार केला तयासी।१६।एकनाथासि ह्मणे जगज्जीवन। मी अनाथ परदेशी ब्राह्मण। तुह्मी नित्य करितां ब्राह्मणसंतर्पण। ती कीर्ती ऐकून मी आलों॥१७॥तरी मज वस्त्र अन्न घालावें पोटभरी। मग मी येथेंच राहीन निरंतरीं। सांगाल कार्य तें करीन सत्वरीं। आळस अंतरीं न आणितां ॥ १८ ॥ एकनाथ पुसती त्याकारण। तुह्मी कोठें असतां कोण। काय परिवार असे जाण। नामाभिधान कोणतें ॥ १९ ॥ ऐकोनि ह्मणे रुक्मिणीपती। मी एकलाएकट असें निश्चितीं। पुत्र दारा आणि संपत्ती। कांहींच नसती मजलागीं ॥२०॥ तुमचा प्रसाद सेवून येथें। सेवा करावी अनन्यचित्तें। ऐसा निजमनीं धरूनि हेत। आलों त्वरित या ठायीं ॥ २१॥ आणिक स्थळें पाहिलीं बहुत। परी सांप्रत कोठें न रमे चित्त। वचन ऐकोनि एकनाथ। आश्चर्य करित मानसीं ।२२। ह्मणे तुमची इच्छा असेल जरी। तरी राहावें आमुचे मंदिरीं। ऐसें ऐकतांचि श्रीहरी। संतोष अंतरीं मानितसे ॥२३॥ जो ब्रह्मादिकां पूज्यमान। शिवादिक करिती ज्याचें ध्यान। तो लीलानाटकी जगज्जीवन। ब्राह्मणजन जाहला कीं ।२४। ज्याची कीर्ति वर्णितां चोखडी। श्रु-

तिपुराणें झाळीं वेडीं । तो गंगोदकें भरूनी कावडी । लवडसवडीं वाहातसे ॥२५॥ क्षीरसागरीं प्रभाकर बेट । तेथें शेष-शायी वैकुंठपीठ । तो प्रातःकाळ होतांचि उठे । देहासि कष्ट न मानितां ॥२६॥ अष्टांगयोगसाधनीं जाण । योगी शिणती जयाकारण । तो देवपूजेसि उपकरणीं । सोज्वळ उटीन देतसे ॥ २७॥ सकुमार सांवळा रुक्मिणीकांत । सायुज्य-दानी जगविख्यात । तो सडासंमार्जन करूनि त्वरित । देवघर सारवित निजांगें ॥ २८ ॥ जयाच्या चरणापासूनि नि-श्चिती । प्रकट जाहली भागीरथी । तो देवपूजेसि अग्रोदक प्रीतीं । भरूनि श्रीपति ठेवितसे ॥ २८ ॥ अठ्यायशीं सहस्र ऋषि जाण । सद्भावें ज्याचें करिती अर्चन । तो ब्राह्मण होऊनि जगज्जीवन । उगाळी चंदन निजप्रीतीं ॥ ३० ॥ अष्ट-सिद्धी सकळ दासी । जयासि ओळंगती अहर्निशीं । तो हार गुंफोनि हृषीकेशी । देवपूजेसी ठेवितसे ॥३१॥ चंद्र सूर्य नक्षत्रराज । ज्याचे योगें दिसती सतेज । तो दीपक सरसावी अधोक्षज । परी मनीं न लाजे सर्वथा ॥ ३२ ॥ सकळ सुरगण इंद्रादिक । जयाचे ह्मणविती आज्ञाधारक । तो देवपूजेचे उपचार अनेक । एकनाथासी देतसे ॥ ३३ ॥ कृष्णा ह्मणोनि हांक मारितां । तंव पुढें सादर होय अवचिता । कोठेंही अंतर न पडे सर्वथा । सावधानता सर्वकाळ ॥ ३४ ॥ चंदन देतसे उगाळून । कोणी ह्मणती श्रीखंड्या ब्राह्मण । नगरवासी सकळ जन । आश्चर्य मनीं करिताती।३५।ह्मणती एकनाथाचे घरीं । एक ब्राह्मण करितो चाकरी । कांहीं वेतन न घेतां पदरीं । अवघी भरोवरी करीतसे ॥ ३६ ॥ एक-नाथासि नकळत । मंदिरांत जाती द्वारकानाथ । कांतेसि धंदा करूं लागत । उल्हासयुक्त निजप्रीतीं ॥ ३७ ॥ सडासं-मार्जन पात्रें धुवून । उशीर होतांचि करी घुसळण । ह्मणे कार्य सांगाया मजकारण । संकोच मनीं न धरावा ॥ ३८ ॥ विलंब होतांचि घनसांवळा । निजांगें झाडीत पाकशाळा । साहित्य घेऊन एक वेळां । स्वयंपाकासी निघतसे ॥ ३९ ॥ होतां कार्याची आडाआडी । आपण निजांगें द्विजांसि वाढी । त्या अन्नासि अधिक लागे गोडी । नवल परवडी अ-भिनव ॥४०॥ उदक वाढीत जगज्जीवन । तें प्राशन करिती जंव ब्राह्मण । तंव अभिनव गोडी त्याकारण । विस्मितमन होताती ॥४१॥ उच्छिष्टें काढावया लवडसवडीं । त्या देवास अत्यंत आवडी । ओंचे खोऊनियां तांतडी । अन्न सावडी निजहस्तें ॥४२॥ प्रीतीनें धरूनि पत्रावळी । बाहेर टाकीत वनमाळी । हस्त प्रक्षाळून ते वेळीं । भूमिका जळीं धूतसे।४३। एकनाथाची मातापिता । क्रमोनि गेलीं आयुष्य सरतां । तों एक वर्तली अभिनव कथा । ते परिसा आतां भाविक हो ।४४।एकदां पितृतिथि येतां जाण । ब्राह्मणांसि दिधलें आमंत्रण । ह्मणे उदईक तुह्मां पितृक्षण । भोजनासि येणें निश्चित ।४५। प्रातःकाळीं उठोनि सत्वरगतीं । गृहांत करविली पाकनिष्पत्ती । दीडप्रहर येतांचि निश्चितीं । स्नानें सांगीतलीं विप्रांसी ।४६। जेथें श्रीकृष्ण ब्राह्मणजन । तेथें साहित्यासि काय उणें । धोतरजोडे दक्षिणा सुवर्ण । द्विजांकारणें सिद्ध केलीं ॥४७॥ मग स्नान करूनि सत्वरगतीं । एकनाथ आले मंदिराप्रती । उपरीवरी जाऊनि निश्चितीं । धोत्रें वाळविती तेधवां ॥४८॥ तों अनामिक आणि त्याची कांता । बिदीस झाडिती उभयतां । पक्वान्नाचा सुवास तत्वतां । आला अव-

चित तयांसी ॥४९॥ मग अंत्यजासि कांता बोले उत्तर । अन्नाचा सुवास येतसे सुंदर । हें आपुल्यासि प्राप्त नव्हे साचा-र । खातील द्विजवर भाग्याचे ॥५०॥ तेव्हां अनामिक ह्मणे स्त्रियेसी । तूं व्यर्थचि कासया लाळ घोंटिसी । हें उष्णउष्ण पक्वान्न आपणासी । आल्या जन्मासी लाधेना ॥५१॥ आजि याचे घरीं श्राद्ध जाण । उच्छिष्टही टाकिती पुरोन । तुवां नेणोनियां मूर्खपणें । वासना मनीं धरियेली ॥५२॥ वृषभ गेला लग्नाप्रती । तरी समर्थ कडबे त्यासि देती । तेविं पक्वान्न-भोजन आपुले संचितीं । कोठोनि असेल निजकांते ॥ ५३॥ ऐसी परस्परें बोलतां वाणी । एकनाथाच्या पडिली श्रव-णीं । मग खालीं उतरूनि तये क्षणीं । कांतेलागोनी पुसतसे।५४।ह्मणे अनामिक दोघें झाडिती । त्यांनीं पक्वान्नभोजन इ-च्छिलें चित्तीं । तरी घरांत जाहली पाकनिष्पत्ती । तें भोजन त्यांप्रती घालावें ॥ ५५ ॥ यावरी कांता बोलत । अन्न तो निपजलें असे बहुत । तरी मुलांलेंकरांसमवेत । अतिशूद्र समस्त बोलावा ॥५६॥ दोघांसीच जरी घातलें भोजन । तरी इतर अतृप्त राहतील जाण । ते जाऊन सांगतील त्यांकारण । मग येतील धांवून सकळिक ॥ ५७ ॥ तरी आधीं बो-लावून सकळांप्रती । भोजन घालावें सत्वरगतीं । जनार्दन आहे सर्वांभूतीं । तरी करावी तृप्ती अनामिकां ॥ ५८ ॥ म-ग बाहेर येऊन तत्काळ । अंत्यज बोलाविले सकळ । बिदीस बैसवून ते वेळ । अति कळवळ निजमानसीं ॥५९ ॥ करा-वया ब्राह्मणपूजन । गंधाक्षता पुष्पें सुमनें । साहित्य ठेविलें होतें करून । तें केलें अर्पण अनामिकां ॥ ६० ॥ शूद्राहातीं पात्रें मांडून । तयांसि वाढविलें पक्वान्न । घृत शर्करा शाखा लवण । बाहेर आणोन ठेविलीं ॥ ६१॥ जनीं जनार्दन आ-हे निश्चित । हा भाव जाणोनि चित्तांत । संकल्प सोडी एकनाथ । भोक्ता कृष्णनाथ ह्मणूनी ॥ ६२ ॥ ग्रास घ्या ह्मणतां त्यांकारणें । अनामिक सेविती पक्वान्नें । मुलें लेंकरें थोरलहानें । करिती भोजन यथारुचीं ॥ ६३ ॥ देखिला ऐकि-ला नव्हता कर्णीं । तो रस लाधला त्यांलागूनी । ह्मणती धन्य एकनाथा तुझी करणी । आह्मांलागोनी तृप्त केलें ॥ ६४ ॥ आह्मीं अंत्यज यातिहीन । देखिलें नव्हतें कधीं अन्न । तूं दयावंत वैष्णव जाण । केली आठवण जन्मवरी ॥ ६५ ॥ जें जें अपेक्षित जयांसी । मागतां तैसेंच वाढी त्यांसी । तृप्त केलें सकळांसी । विडे समस्तांसी दीधले ॥ ६६ ॥ उरलें अन्न होतें घरीं । तेंही घातलें त्यांचे पदरीं । मग सडासंमार्जन करूनि मंदिरीं । पात्रें झडकरी धूतलीं॥६७॥आणिक सामग्री उदक देऊनी । पाकासि घातल्या स्वयंपाकिणी । पहिल्याहूनि दशगुणीं । निपजलीं गृहीं पक्वान्नें ॥ ६८ ॥ ब्राह्मणांसि सांगीतलीं होतीं स्नानें । तयांसि कळलें हें वर्तमान । कीं तुह्मांआधीं एकनाथानें । अंत्यजां भोजन दीधलें ॥ ६९ ॥ एक-मेकांसी बोलती वचन । हें तो अघटित केलें तेणें । आह्मां देऊनि पितृक्षण । घातलें भोजन अनामिकां ॥ ७० ॥ वि-प्र होऊनि क्रोधायमान । विचार करिती अवघेजण । आजपासोनि या भ्रष्टाचें अन्न । कोणी न घेणें सर्वथा ॥७१॥ मग सकळ शास्त्रज्ञ झडकरी । पातले एकनाथाचे घरीं । सक्रोध होऊनि त्या अवसरीं । कठोरशब्दें ताडिती॥७२॥ह्मणती ऐ-करे कर्मभ्रष्टा । तुवां अघटित केल्या चेष्टा । ब्राह्मण न जेवितांचि दुष्टा । अंत्यजां आधीं पूजिलें ॥७३॥ आजि तुझे व-

डिलांची पितृतिथी देख। ते काय होते अनामिक। ह्मणोनि अतिशूद्र पूजिले अनेक। जे कां निंदिले वेदशास्त्रीं॥७४॥तुझेनियोगें वर्णसंकर। आतांच होऊं पाहे सत्वर। निजांगें मांडिला भ्रष्टाचार। ब्राह्मण आचार बुडवूनी॥७५॥ ऐसी ऐकोनि विप्रवाणी। एकनाथ विनवी कर जोडोनी। दुसरा स्वयंपाक तुह्मांलागोनी। मंदिरीं करूनी ठेविला॥७६॥ पाहिला स्वयंपाक होता सदनीं। त्याचा सुवास घेतला अंत्यजांनीं। तें उच्छिष्ट अन्न तुह्मांलागोनी। कैशा रीतीं घालावें ७७ ह्मणोनि तें त्यांस अर्पोनि निश्चितीं। दुसरा स्वयंपाक करविला प्रीतीं। तरी क्षमा करून कृपामूर्ति। करावी पितृतिथी पुनीत॥७८॥यावरी द्विज बोलती काय। आजि आमुचा अपमान केला आहे। महायज्ञाचा पुरोडाश पाहें। वायसापुढें टाकिला॥७९॥ कीं भागीरथीची कुपी जाण। बहिर्भूमीसि दिधली लवंडोन। किंवा राजकांतेचें जडितभूषण। दासीस नेऊन दीधलें॥८०॥ नातरी मैलागिरी शुद्ध चंदन। त्याचें खरासि केलें लेपन। कीं विष्णुपूजेच्या तुळसी जाण। मसिदीस नेऊन वाहिल्या॥ ८१॥ कीं अग्निहोत्रींचा कृशान झडकरी। नेऊनि ठेविला गुडगुडीवरी। सुधारस ओतिला राखेवरी। तरी वायांच निर्धारीं गेला कीं॥८२॥तेवि आह्मां नदेतां भोजन। अंत्यज पूजिले त्वां प्रीतीनें। हें अनुचित केलें जाण। लाविलें दूषण आपणासी॥८३॥ ऐसें बोलोनियां त्वरित। ब्राह्मण घालोनि गेले वाळीत। एकनाथ होऊनि चिंताक्रांत। बैसले निवांत ते समयीं॥८४॥ तों घरीं कृष्णा ब्राह्मणजन। श्रीखंड्या दुसरें नामाभिधान। तो ह्मणे एकनाथाकारण। उद्विग्नमन कासया॥८५॥ आजि पितृतिथी आहे घरीं। ह्मणूनि चिंता सर्वथा न करीं। तुमचे पितर साक्षात झडकरी। येतील सत्वरीं जेवावया॥८६॥ पाकसिद्धि झालिया घरांत। पात्रें घालावीं तुह्मीं त्वरित। एकनाथ जाहले हर्षयुक्त। आश्चर्य करिती मानसीं॥८७॥नानापरीचीं पक्कान्नें। घृत शर्करा वाढिली जाण। आगतं ह्मणतां निजमुखेंकरून। तों पितर येऊन बैसले।८८।अर्घ्यपाद्यपूजा करून। पूगीफल गोपीचंदन। यज्ञोपवीतें सकळांसि देऊन। हिरण्य दक्षिणा दीधली॥८९॥ब्रह्मार्पण सोडितांचि एकनाथें। साक्षात पितर बैसले जेवित। जें जें अन्न जयासि रुचत। तें तें भक्षिती निजप्रीतीं॥ ९०॥ जनार्दनपायीं भाव धरिला। तो पितृस्वरूपीं प्रकटला। एकनाथासि आनंद वाटला। दृष्टीसी देखिला पितृलोक॥ ९१॥ तृप्त जाहलिया पितृपंक्ती। करशुद्धि दिधली तयांप्रती। विडे दक्षिणा देऊनि प्रीतीं। एकनाथ पुसती तयांसी॥ ९२॥ शेष उरलें आहे अन्न। काय करावें यालागून। इष्टांसमवेत करावें भोजन। उत्तर दिधलें तयांनीं॥ ९३॥ तंव ब्राह्मण द्वारीं उभे राहूनी। हे शब्द ऐकिले त्यांनीं श्रवणीं। कवाडें उघडोनि तये क्षणीं। आंत येऊनी पाहाती॥९४॥ तंव साक्षात पितर येऊन जेविले। यांस देखतांचि अदृश्य जाहले। सकळ द्विजांसि आश्चर्य वाटलें। नवल देखिलें ह्मणोनी॥ ९५॥ मग ब्राह्मण बाहेर जाऊनि त्वरित। एकमेकांसी उत्तरें बोलत। मानव नव्हे हा एकनाथ। अवतार साक्षात विष्णूचा॥ ९६॥ आपण धरूनि कर्माभिमान। वायांच करितों याचें छळण। परी तयासि साह्य श्रीकृष्ण। जाहला प्रसन्न निजनिष्ठें॥ ९७॥ तयासि संकट पडतां सहज। तत्काळ पावेल गरुडध्व-

ज। पितर साक्षात जेवविले आज। आणिली लाज आपणासी॥ ९८॥ एक ह्मणती पक्कान्नें नाना। आणि हातींची गेली दक्षिणा। पुढें होणार तें कळेना। बोल प्राक्तना ठेवावा॥ ९९॥ आतां उदयीक जाऊनि अवघे त्वरित। एकनाथासि सांगावी नीत। कीं आतां घेऊनी प्रायश्चित्त। स्वयातींत असावें॥ १००॥ येन्हवींच तयासि पवित्र ह्मणतां। तरी आपुली गेली व्यर्थ अहंता। तरी दंड करूनि एकनाथा। लावावा मागुता सत्कर्मीं॥ १॥ दुसरे दिवशीं द्विजवर सकळ। वाळुवंटीं गोळा जाहले तत्काळ। मग एकनाथासि ते वेळ। विचारिलें तेधवां॥ २॥ ब्राह्मणांसि देखोनि नयनीं। नमस्कार केला ते क्षणीं। ह्मणे कोणता हेतु धरून मनीं। मज स्वामींनीं बोलाविलें॥३॥ यावरी द्विज बोलती वचन। तुज नकळतां घडलें दूषण। आतां विधियुक्त प्रायश्चित्त घेऊन। यावा मान वेदवचना॥४॥ ऐकोनि ह्मणे एकनाथ। मी सर्वथा नघे प्रायश्चित्त। मायबाप असतां श्रीकृष्णनाथ। कैसें विपरीत करावें।५। ब्राह्मण ह्मणती यथार्थ पाहीं। परी आमच्या वचनासि मान देई। प्रायश्चित्त घेतल्याविण नाहीं। शुद्धता देहीं सर्वथा॥ ६॥ मग गंगेंत स्नान घालूनि त्वरित। एकनाथासि देती प्रायश्चित्त। भस्म गोमय लावूनि त्वरित। मंत्र वेदोक्त ह्मणताती॥ ७॥ तों त्र्यंबकेश्वराहूनि तेथ। एक ब्राह्मण आला अकस्मात। लोकांप्रती काय बोलत। कोणता एकनाथ मज सांगा॥ ८॥ त्याच्या सर्वांगासि जाहलें कुष्ट। तिळप्राय अंग नसे नीट। ऐसें स्वरूप देखोनि दुष्ट। सांगती स्पष्ट तयासी॥ ९॥ पैल तो उदकांत प्रायश्चित्त घेत। त्यासीच ह्मणती एकनाथ। कैशियास्तव पुससी त्यातें। सांग त्वरित आह्मांसी॥११०॥ यावरी बोले कुष्टी ब्राह्मण। म्यां त्र्यंबकीं केलें अनुष्ठान। मग शंकरें दृष्टांत दाखवून। एथें पाठवून दीधलें॥११॥ मज सांगती उमाकांत। कीं पैठणीं एकनाथ विष्णुभक्त। तेणें अनामिक जेवविले बहुत। होती पितृतीथ ते दिवशीं॥ १२॥ तें पुण्य आहे त्याचे पदरीं। तरी तूं जाऊन तेथ सत्वरीं। तो किंचित पुण्य देईल जरी। तरी कुष्ट सत्वरीं जाईल॥ १३॥ हें स्वप्न होतांचि त्वरित। मी तत्काळ धांवत आलों येथ। वचन ऐकोनि द्विज समस्त। आश्चर्य करिती मानसीं॥ १४॥ ब्राह्मण टाकोनि अंत्यज जेवविले। हें पुण्य कोण्या शास्त्रीं बोलिलें। एक ह्मणती असत्य भलें। धरणें उठविलें शंकरें॥ १५॥ एक ह्मणती उगेंच बसा। हातींच्या कांकणासि काय आरसा। एकनाथाचा भाव कैसा। निवडेल आपैसा ये समयीं॥ १६॥ मग कोडी जाऊन गंगे-आंत। एकनाथासि काय बोलत। एका अनामिकाचें सुकृत। शंकरें देवविलें मजलागीं॥१७॥ अवश्य ह्मणोनि तये क्षणीं। त्याचे हस्तावरी घातलें पाणी। सकळ ब्राह्मण तटस्थ होऊनी। कौतुक नयनीं पाहाती॥१८॥ तों नेत्रांसि न लागतां पातीं। सुंदर झाली कोडियाची कांती। हें कौतुक देखोनि समस्तीं। आश्चर्य करिती मनांत॥ १९॥ ह्मणती कर्माचा धरिला अभिमान। तेणेंचि नाडिलों आह्मी जाण। विष्णुभक्तासि प्रायश्चित्त देणें। हेंचि दूषण आपुल्यासी॥ १२०॥ एकनाथासि ह्मणती द्विजवर। तूं केवळ विष्णूचा अवतार। सर्वथा नव्हसी मानववीर। कळलें साचार आह्मांसी॥२१॥ हिमालयासि नलगे विंझणवारा। प्रावरण नलगेचि अंबरा। स्नान

नलगेचि वैश्वानरा । तेविं वैष्णववीरा निर्मळ तूं ॥२२॥अमृता नलगे पाक करणें । उदधीस कासया तीर्थाटन । तेविं तु-
जला प्रायश्चित्त नलगेचि जाण । आह्मांकारणें समजलें ॥ २३ ॥ तुवां अघटित दाविली करणी । साक्षात पितर जेव-
विले आणोनी । हें देखिलें ऐकिलें नव्हतें कोणी । तें प्रत्यक्ष नयनीं दाविलें॥२४॥मग एकनाथासि धरूनि हातीं । गृहा-
स आले सत्वरगतीं । ह्मणती तुज साह्य रुक्मिणीपती । निश्चय चित्तीं कळों आलें ॥ २५ ॥ द्विजांसि अर्पोनि दक्षिणा ।
तीर्थ मस्तकीं वंदिलें जाणा । ते जाऊनि आपुल्या सदना । आश्चर्य मनीं करिताती ॥२६॥ ह्मणती धन्य हा विष्णुभक्त।
ब्राह्मणसेवेसि अतिनिरत । देवतार्चन विधियुक्त । प्रेमभावें करीतसे ॥२७॥ यापरी पैठणींचे लोक समस्त । कोणी निं-
दित कोणी स्तवित । परी एकनाथ सदा संतोषयुक्त । हर्षशोकांत पडेना॥२८॥ तों एक ब्राह्मण जाऊनि द्वारावती । तप
करी अनुतापयुक्ती । ह्मणे मज भेटावा रुक्मिणीपती । धरिला चित्तीं हेतु पूर्ण।२९।मग स्वप्नांत येऊनि राधारुक्मिणी ।
काय सांगती त्यालागोनी । द्वारकेंत नाहींत चक्रपाणी । तूं जाईं येथोनि सत्वर ॥ १३० ॥ गंगातीरीं प्रतिष्ठानांत । वै-
ष्णवभक्त एकनाथ । ब्राह्मणसंतर्पण नित्य करित । तुवां जावें निश्चित ते ठायीं ॥ ३१ ॥ कृष्णा श्रीखंड्या ब्राह्मणजन।
द्वादश वर्षें राहिला जाण । तो साक्षात्परब्रह्म नारायण । तरी घ्यावें दर्शन तयाचें ॥३२॥ निजभक्ताची सेवा करित ।
तेथेंच बैसला वैकुंठनाथ । आमुची कदा न करी मात । तरी आणावें त्वरित जाऊनी ॥ ३३ ॥ ऐसा दृष्टांत ऐकोनि
कानीं । ब्राह्मण हर्षला स्वमनीं । मग प्रतिष्ठानासि येऊनी । लोकांप्रती पुसतसे ॥ ३४ ॥ येथें एकनाथ वैष्णवभक्त ।
ब्राह्मणसेवनीं अति निरत । त्याचें मंदिर दावा त्वरित । ऐसें बोलत चालिला ॥३५॥ पुसत पुसत ते अवसरीं । ब्राह्मण
पातला त्याचे मंदिरीं । तापसी देखतांचि सत्वरीं । नमस्कार करी एकनाथ ॥ ३६ ॥ बैसावया दिधलें आसन । ह्म-
णे कोठोनि झालेंजी आगमन । कवण कवण तीर्थाटण । आलेति हिंडोन या ठायीं ॥ ३७ ॥ यावरी तापसी बोले व-
चन । कृष्णा श्रीखंड्या ब्राह्मणजन । त्याचें घ्यावया दर्शन । आलों धांवोन या ठायां ॥ ३८ ॥ एकनाथ ह्मणती ते अ-
वसरीं । उदकासि गेला गंगातीरीं । तुह्मीं स्वस्थ बसावें निमिषभरी । येईल सत्वरीं या ठायां॥ ३९ ॥ तों खांदीं कावड
घेऊनी । वाड्यांत आले चक्रपाणी । तापासियासि देखतां नयनीं । संकोच मनीं वाटला ॥४०॥ ह्मणे द्वादश वर्षेंपर्यंत ।
मी आनंदयुक्त होतों येथ । हा कोठोनि पातला ऋणायित । देखिला अवचित या ठायां ॥ ४१ ॥ ऐसें ह्मणोनि वैकुं-
ठनाथ । मनीं जाहले चिंताक्रांत । तों नवल वर्तलें अद्भुत । तें परिसा निजभक्त भाविक हो ॥ ४२ ॥ एकनाथ ह्मणे ता-
पसियासी । कृष्णा ब्राह्मण पहा दृष्टीसी । तेणें सत्वर उठोनि वेगेंसीं । मिठी चरणासी घातली॥४३॥मग कावड घेऊनि
जगन्नाथ । सत्वर गेला देवघरांत । घागरी खालीं ठेवूनि त्वरित । अदृश्य जाहला ते ठायीं ॥ ४४ ॥ तापसी बाहेर वा-
ट पाहत । तंव परतोनि नयेच रुक्मिणीकांत । देवगृहांत जंव विलोकित । तंव कोणीच तेथें दिसेना ॥ ४५ ॥ तेव्हां शोक
करीत तये क्षणीं । अंग टाकूनि दिधलें धरणीं । ह्मणे मज देखोनि चक्रपाणी । गेला पळोनी लवलाहें ॥ ४६ ॥ हें दृष्टीस



देखतां एकनाथ । तापसियास पुसे वृत्तांत । ह्मणे कां झालांति शोकाकुलित । सांगा त्वरित मजपासीं ॥ ४७ ॥ त्यानें स-
कळ वृत्तांत सांगोनी । एकनाथाचे लागला चरणीं । दोघेही सद्गदित होऊनी । एकमेकांसी भेटती॥ ४८॥ एकनाथ ह्म-
णे तापसियास । धन्य तुमचें भाग्य विशेष । दृष्टीं वोळखूनि जगन्निवास । चरण सावकाश वंदिले॥४९॥ आह्मीं न ओ-
ळखोनि देवा । त्यापासूनि बहुत घेतली सेवा । ऐसा अनुताप धरूनि जीवा । एकनाथ केशवा आळवीत ॥ ५० ॥ ह्म-
णे भक्तवत्सल दीनानाथ । तुवां बहुत कष्ट केले येथ । मज न कळतां वृत्तांत । घडला अनर्थ थोर हा ॥५१॥ तूं परम सु-
कुमार चक्रपाणी । कावडी वाहिल्या अनवाणी । खडे रुतले असतील चरणीं । अघटित करणी हे केली ॥ ५२ ॥ द्वाद-
श वर्षें जवळ असतां । परी कांहींच नेणवे माझिया चित्ता । ब्राह्मणवेष धरून अनंता । कार्य नेणतां सांगीतलें ॥५३॥
तूं ब्रह्मादिकांसि पूज्यमान । सदाशिव चिंती तव चरण । तो तूं स्वकरें उगाळूनि चंदन । देत होतासि पूजेसी ॥ ५४ ॥
तापसी तप करूनि अवघड । तुज लक्षिती वाडेंकोडें । एक तीर्थाटनें करितां गाढ । परी दृष्टीपुढें न दिससी ॥ ५५॥
ऐसा दुर्लभ तूं हृषीकेशी । तुझें लाघव नकळे कोणासी । येऊनि यशोदेचे उदरासी । ते पुत्रपणें तुजसी लेखितसे ॥५६॥
मग गोकुळ टाकूनि मथुरेसि जातां । तेव्हां उमजलें तियेचे चित्ता । तेविं द्वादश वर्षें जवळी असतां । मी नेणेंचि अ-
नंता तुजलागीं ॥ ५७ ॥ ऐसा अनुताप धरूनि अंतरीं । खेद करीत नानापरी । तो प्रेमा वर्णितां सविस्तरीं । तरी ग्रं-
थ विस्तारीं वाढेल ॥ ५८ ॥ एकनाथाची निजकांता । परम भाविक पतिव्रता । ह्मणे देवाधिदेवा रुक्मिणीकांता । तुज
आह्मीं वृथा कष्टविलें ॥ ५९ ॥ तूं परम सुकुमार गोविंदा । प्रातःकाळीं उठोनि करिसी धंदा । आह्मीं केली अमर्यादा।
नेणतां मुकुंदा तुजलागीं ॥६०॥ तूं सकळ देवांसि पूज्यमान । आह्मां मागूनि करिसी भोजन । नाहीं जाणिली भूक त-
हान । अशी मी अधम श्रीकृष्णा ॥ ६१ ॥ द्वादशवर्षेंपर्यंत निश्चिती । श्रीकृष्ण होता त्यांचे संगती । तितुके गुण नित्य
आठविती । विस्तारें किती सांगावें ॥६२॥यावरी एके दिवशीं एकनाथ । निद्रित होते यामिनींत । तों ज्ञानदेव येऊनि
स्वप्नांत । काय सांगत तयासी ॥६३॥ तुवां अलकावतीस येऊन । समाधि उघडोनि घ्यावें दर्शन । तेथें अजानवृक्षाची
मुळी जाण । सन्निध येऊन लागली॥६४॥ ते एकीकडे लावून हातें । मागुती समाधि बुजवीं त्वरित । ऐसें देखोनि एक-
नाथ । जाहला जागृत तत्काळ ॥६५॥ मग अलकावतीस येऊन । इंद्रायणीचें केलें स्नान । सिद्धेश्वराचें घेऊनि दर्शन ।
समाधि उघडोन पाहिली ॥६६॥ तों वज्रासन घालोनि सहज । तेथें बैसले ज्ञानराज । दिव्यरूप दिसे तेजःपुंज । उपमा
न साजे तयासी ॥६७॥नमस्कार करूनि ते वेळीं । एकनाथ समाधींत न्याहाळी । तों अजानवृक्षाची मुळी । ज्ञानदेवा-
जवळी पातली॥६८॥ते निजकरें लावूनि एकीकडे । मागुती समाधीचें लाविलें कवाड । चुनेगचीनें बुजवोनि दृढ । पू-
र्ववत दगड रचियेले।६९।तेव्हां अलकावती उजाड बहुत।सिधा सामग्री न मिळे तेथ।शिष्यसांप्रदायी जाहले क्षुधित।
तों पंढरीनाथ पावले।१७०।निजभक्तांची भूक ताहान । निजांगें पुरवी जगज्जीवन । तेथें वाणियाचें रूप धरून । पाल

देऊन बैसले ॥७१॥ हें दृष्टीस देखोनि त्वरित । चित्तीं हर्षले एकनाथ । ह्मणे व्यवसायी आले बाजारांत । सामग्री विकत आणावी ॥७२॥ मग दोघे ब्राह्मण पाठवून झडकरीं । सर्व साहित्य घेतलें पदरीं । ह्मणती द्रव्य आणून देतों सत्वरीं । तुह्मीं स्वस्थ अंतरीं असावें।७३।यावरी बोलती पंढरीनाथ । आह्मीं आजचा दिवस आहों येथ । तुह्मीं स्वयंपाक करूनि त्वरित । जेवा समस्त बिऱ्हाडीं ॥७४॥ एकनाथासि जाणतों आह्मी । परी ते नोळखती मजलागोनी । ते यात्रेकरी आले ऐकोनी । सामग्री घेऊनी सी आलों ॥७५॥ पाठमोरे होतां ब्राह्मणासी । तों अदृश्य जाहले हृषीकेशी । आश्चर्य वाटलें सकळांसी । एकनाथासी सांगीतलें ॥७६॥ ह्मणती आह्मांसी सामग्री देऊनी । तत्काळ अदृश्य जाहला वाणी । द्रव्यही न देतां त्यालागूनी । जाहली करणी अद्भुत॥७७॥ऐसी ऐकोनियां मात । एकनाथ झाले सद्गदित । ह्मणती आह्मांसाठीं पंढरीनाथ । शिणले बहुत वाटतें ॥ ७८ ॥ मग पाकसिद्धि होतां जाण । ब्राह्मणांसाहित केलें भोजन । ते दिवशीं रात्रीस राहून । मांडिलें कीर्तन निजप्रेमें ॥ ७९ ॥ समाधीस करूनि नमस्कार । दुसरे दिवशीं निघाले सत्वर । प्रतिष्ठानीं येऊन साचार । सप्रेम भजन करीतसे॥८०॥एकनाथाची ऐसी स्थिती । जनार्दनस्वरूप त्रिजगतीं । तोचि व्यापक सर्वांभूतीं । संशय चित्तीं न वाटे ॥ ८१ ॥ जनार्दनाचें लागतां ध्यान । स्वयेंच झाले जनार्दन । तेथें कांहींच न दिसे भिन्न । जेविं सरिताजीवन सागरीं ॥ ८२ ॥ कीं दीप प्रकाश दोघेजण । नामें वेगळीं परी एकत्र जाण । तेविं एकनाथ आणि जनार्दन । नव्हती भिन्न सर्वथा ॥८३॥ कीं कर्पूर सुगंध एक पाहीं । कीं द्रवत्व नीरासि द्वैत नाहीं । नातरी पुष्प मकरंद एके ठायीं । निजप्रीतीनें नांदती ॥ ८४ ॥ तेविं एकनाथ आणि जनार्दन । समरस असती एकपणें । महीपती तयांसि अनन्यशरण । वंदी चरण सद्भावें ॥ ८५ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । षट्चत्वारिंशाध्याय रसाळ हा ॥ १८६ ॥ ॥ अध्याय ४६ ॥ ओंव्या १८६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः । श्रीद्वारकानाथाय नमः । ऐका श्रोतेहो कथा चोखडी । जेणें परमार्थीं लागेल गोडी । श्रवणीं एकतांचि तांतडी । दुरितें शेकडीं न राहती ॥ १ ॥ तुटोनि मायामोहपाश । विकल्प संशयांचा होय नाश । भेदाभेद मावळे निःशेष । शांतिसुख अनायासें ये हाता ॥२॥ तुटोनियां कर्माकर्म । चित्तीं ठसावे भजनप्रेम । भक्तकथेची महिमा निरुपम । पुरुषोत्तमें ह्मणीतला ॥३॥ हे सांगूं काय बहु व्युत्पत्ती । अनुभवें खूण सभाग्य जाणती । जेयासि चित्तीं बाणली विरक्ती । जे कां भक्तिपंथा लागले ॥४॥ टाकोनियां लौकिकप्रौढी । जे कीर्तनीं नाचती कडोविकडी । त्यांवांचूनि कथेस गोडी । न लागे रोकडी कवणासी ॥५॥ यास्तव तुह्मीं सभाग्य श्रोतीं । जोडिल्या मागें पुण्यसंपत्ती । ह्मणोनि कथाश्रवणीं धरोनि आर्ती । श्रवणासि प्रीतीं बैसलां ॥६॥ मागील अध्यायीं कथा अद्भुत । एकनाथ प्रेमळ वैष्णवभक्त । जो विष्णु-अवतार मूर्तिमंत । परिसिलें चरित्र तयाचें ।७। असो यावरी कृष्णातीरीं जांबनगर । तेथें रामउपासक एक द्विजवर । परम भाविक ज्ञानी चतुर । असे उदार सर्वस्वें ॥८॥ कांतापुरुष दोघेजण । एकचित्तें असती जाण । अहोरात्र प्रेमेंकरून । श्रीरामभजन करितासी ॥९॥ सहज कुळकर्णाची वृत्ती । ह्मणोनि निरंतर तेथेंच नांदती । अन्नार्थीयांसी तृप्त करिती । भूतदया चित्तीं धरूनियां ॥१०॥ रामजयंति येतां जाण । बोलावूनि साधू वैष्णवजन । मंडप पताका उभारून । महोत्साह करित उल्हासें ॥ ११ ॥ सर्व साहित्य करूनि प्रीतीं । द्विजांसी पक्वान्नभोजन घालिती । कीर्तन करूनि नवरात्रीं । जागरण करिती उल्हासें ॥१२॥ श्रीराम सीता लक्ष्मण । या मूर्ती घरीं पुरातन । त्यांसि दिव्य मखरें शृंगारून । षोडशोपचारें पूजिती ॥१३॥ वाजंत्री भेरी मृदंग कुसरी । वाद्यें वाजती मंडपद्वारीं । प्रतिवर्षीं ऐशियापरी । महोत्साह गजरीं करीतसे ॥ १४ ॥ दशमीचे रात्रीं करून ललित । सकळ गौरवावे साधुसंत । मानसीं धरूनि अत्यंत प्रीत । नमस्कार करीत सद्भावें ॥ १५ ॥ परी पुत्रसंतान नाहीं पोटीं । ह्मणोनि कांता होतसे कष्टी । तों रात्रीं निद्रा न लागतां मोठी । मग स्वप्न दृष्टीं देखिलें ॥१६॥ दृष्टांतीं येऊन श्रीरघुनाथ । ब्राह्मणाप्रती काय सांगत । मारुति-अवतार मूर्तिमंत । तुमचे उदरा येईल ॥ १७ ॥ भक्ति ज्ञान वैराग्य जाण । त्याचे देहीं वसती पूर्ण । तो निजभक्त अंजनीनंदन । पुत्रनिधान देखसी ॥१८॥ ऐसें स्वप्न देखोनि ब्राह्मण । जागृत जाहला न लागतां क्षण । मनांत विस्मित होऊन । कांतेप्रती सांगतसे ॥ १९ ॥ भ्रताराचें वचन ऐकून । चित्तीं वाटलें समाधान । तों नवमास गर्भास होतां जाण । पुत्रनिधान प्रसवली ॥ २० ॥ गृहीं सर्व संपत्ति सुख । त्यावरी पाहिलें पुत्रमुख । द्विजासि वाटला परम हरिख । ह्मणे जानकीनायक पावला॥२१॥ प्रसन्न होऊन अयोध्याधीश । पुत्र दिधला हा मोठा हर्ष । नाम ठेविलें रामदास । द्वादश दिवस लोटतां ॥ २२ ॥ दिवसेंदिवस थोर जाहला । पांचवे वर्षीं व्रतबंध केला । वैदिक ब्राह्मण घरीं ठेविला । पढों घातला त्यापाशीं ॥ २३ ॥ कांता ह्मणे भ्रताराकारण । निजपुत्राचें करावें लग्न । तेव्हां पुरोहित तत्काळ जाऊन । वधू विचारून ठेविली ॥ २४ ॥ मग लग्नसामग्री अलंकार । वस्त्रें भूषणें घेऊनि फार । नर-

नारी सोयरे सत्वर । घेतले सकळ लग्नासी ॥ २५ ॥ पुढें सोयरा होऊनि सामोरी । वर पूजिला ते अवसरीं । बिऱ्हाड
देऊनि जानवसघरीं । उल्हास गजरीं वाद्यांचा॥२६॥ देवकप्रतिष्ठा करून जाण । केलें ब्राह्मणसंतर्पण । लग्नघटी उ-
रतांच दिन । मधुपर्कविधान पैं केलें ॥ २७ ॥ मग अंतःपट धरूनि देख । ब्राह्मण बोलती मंगलाष्टकें । शेवटीं अव-
घे होऊनि एक । सावधान देख ह्मणताती ॥ २८ ॥ तंव एक पुरोहित सन्निध बैसला । रामदास प्रश्न करी त्याज-
ला । तुह्मीं सावधान ह्मणतां कवणाला । सांगा मजला ये समयीं ॥२९॥ तंव तो विनोदें बोले वचन । सावधान ह्म-
णतों तुजकारण । आजपासोनी संसारबंधन । पडलें जाण निश्चितीं ॥ ३० ॥ परम दुःखरूप संसार पाहीं । येथें अ-
णुमात्र सौख्य नाहीं । संसार ह्मणितला जींहीं । तरी ते सर्वस्वेंही नाडले ॥ ३१ ॥ ह्मणोनि सकळ पुरोहित । तुजला-
गूनि सावधान ह्मणत । रामदास ऐकोनि मात । थरथरां कांपत तेधवां ॥ ३२॥ वैराग्य होऊनि निजअंतरीं । पळो-
नि चालिले वनांतरीं । मायबापें धरूं पाहाती सत्वरीं । परी मोह अंतरीं परतेना ॥ ३३ ॥ जैसें विष रांधिलें अन्नांत ।
तो जेवणारासि कळला वृत्तांत । मग तो जैसें पात्र टाकोनि देत । उपचार समस्त अव्हेरी ॥ ३४ ॥ तैसा कंटाळोनि
विषयसुखीं । पळोनि गेला एकाएकीं । उदंड गौरव केला लोकीं । परी नायके शेखीं कोणाचें ॥३५॥ तया मागेंचि मा-
तापिता । अरण्यांत गेलीं उभयतां । पुत्रासि लाऊं ह्मणती ममता । परी तो सर्वथा परतेना ॥ ३६ ॥ रामदास ह्मणे पि-
त्यासी । तुह्मीं व्यर्थ कां गोऊं पाहतां मजसी । प्रपंच केवळ दुःखराशी । उमजलें मजसीं निश्चित । ३७ । कामाचें आर्त्त
पुरवावया । ह्मणोनि केली सुंदरजाया । तिचें पालन करावया । आटली काया सर्वस्वें ॥ ३८ ॥ धनवंताचें उपार्जन ।
करूनि द्रव्य मिळविलें जाण । आणि अवचित तस्कर पडले येऊन । तरी घेती प्राण आपुले । ३९ । जेविं गळ आहे उं-
डि-आंत । हें मीनासि उमजलें अकस्मात । मग पळोनि गेला पाणियांत । तैसा सावचित्त मी जाहलों । ४० । कीं नळिका-
यंत्र देखोनि डोळां । शुक आकाशीं पळोनि गेला । तेविं प्रपंचफांसा न पडतां भला । उमजलें मजला या रीतीं
॥ ४१ ॥ आतां कांहीं ममता न धरितां चित्तीं । परतोनि जावें सदनाप्रती । ऐसें ह्मणोनि सत्वरगतीं । अरण्याप्रती चा-
लिला ॥ ४२ ॥ पिता उमजला निजअंतरीं । हा मारुतीचा अवतार ब्रह्मचारी । कदापि न बुडे भवपुरीं । मग परतोनि
मंदिरीं चालिला ॥ ४३ ॥ पूर्वीं दृष्टांत जो जाहला । तो कांतेसि मागुती आठव दीधला । ह्मणती धन्य वंश आपुला ।
कीं पुत्र निघाला वीतरागी ॥ ४४ ॥ यापरी समाधान करूनि चित्ता । ग्रामासि गेलीं उभयतां । हृदयीं ध्याती श्रीरघु-
नाथा । माया ममता टाकोनी ॥ ४५ ॥ तों इकडे रामदास अरण्यांत । एकांतीं जाऊनि बैसला त्वरित । होऊनि वैरा-
ग्यभरित । विचार करित मानसीं ॥ ४६ ॥ तीर्थें व्रतें अनुष्ठान । कलिमाजी नवतीं साधनें । तरी श्रीरामासी रिघोनि
शरण । करावें चिंतन तयाचें ॥ ४७ ॥ नाम घेतां उठाउठी । गणिका चढली वैकुंठीं । नाम जपतां धूर्जटी । शीतळ पो-
टीं तो जाहला ॥ ४८ ॥ ऐसा विश्वास धरून । करीत बैसला नामस्मरण । न घे फळ मूळ अथवा जीवन । मांडिलें

निर्वाण निजनिष्ठें ॥ ४९ ॥ ह्मणे जय अयोध्यावासी दशरथकुमरा । कौसल्यातनया जानकीवरा । रावणांतका जग-
दुद्धारा । सायुज्यउदारा श्रीरामा ॥ ५० ॥ मी अनाथ बाळक तुझें दीन । अरण्यांत बैसलों किलवाणें । तूं भक्तकैवारी
पतितपावन । तरी द्यावें दर्शन मज आतां ॥ ५१ ॥ ऐसी करुणा भाकितां चित्तीं । तों तेथें प्रकटला मारुती । वि-
क्राळ रूप दाविलें निश्चितीं । परी भयभीत चित्तीं न होय ॥ ५२ ॥ जैसा अग्नि प्रदीप्त होऊनि पाहे । कृशानासी
पोळवूं जाय । परी तयासि सर्वथा नुपजे भय । एकचि देह ह्मणोनी ॥ ५३ ॥ कीं दिनकर भास्कराचे गेलिया घरा ।
त्यासि सर्वथा नयेचि उबारा । तेविं उग्ररूपें मारुती भेटला खरा । परी रामदास अंतरीं गजबजेना ॥ ५४ ॥ किंवा
पौर्णिमेसि सागर आथूनि भरतें । आपुलाचि कल्लोळ लपवूं पाहात । परी तो न बुडे निश्चित । असे एकत्र ह्मणो-
नी ॥ ५५ ॥ कीं आकाश सक्रोध होऊनि पाहे । नभासी अवचित गिळूं जाय । तरी तें त्याचेन गिळवेल काय ।
व्यर्थचि उपाय हा तैसा ॥ ५६ ॥ तेविं विक्राळ रूपें अंजनीसुत । रामदासासि भय दाखवित । परी तो निर्भय चि-
त्तांत । एकत्र भावित आपणासी ॥ ५७ ॥ रामदासाचा निश्चय देखोन । मारुतीस वाटलें समाधान । मग सौम्य-
रूप धरून । दिधलें दर्शन निजप्रीतीं ॥ ५८ ॥ रामदासें देऊनि आलिंगन । वंदिले मारुतीचे चरण । ह्मणे श्रीरामा-
चें होय दर्शन । तो उपाय सांगणें मजलागीं ॥५९॥ अभय देऊनि ते अवसरीं । मारुति अदृश्य जाहले सत्वरीं । मग रा-
मदास जाऊनि नगरांतरीं । करतळभिक्षा मागती ॥ ६० ॥ तें भिक्षेचें अल्प सेवूनि अन्न । मग अरण्यांत जाऊनि करी
स्मरण । निद्रा आलस्य नयेचि जाण । अनुतापबळें सर्वथा ॥ ६१ ॥ आपुलेंचि मन आपुल्यासि श्रोता । आपुलेंचि मन
आपुल्यासि वक्ता । मनापरीस ज्ञानदाता । सद्गुरु सर्वथा असेना । ६२ । मग मनासी बोध करून साच । श्लोक रचिले दो-
नशें पांच । ते सप्रेम गाती जे नित्य वाचें । वैराग्य त्याचें आंदण । ६३ । श्रीरामरूप आठवूनि मनीं । कीर्तनीं नाचे प्रेमें-
करूनी । मग कंठ सद्गदित होऊनी । आनंदाश्रु नयनीं लोटती ॥ ६४ ॥ झाडें वृक्ष आणि पाषाण । पक्षी श्वापदें व-
नचरें जाण । हेंचि आपुले सखे सज्जन । निश्चय मनीं दृढ केला ॥ ६५ ॥ मध्याह्नसमयीं भिक्षेपुरतें । क्षणभर
जाऊनि नगरांत । तेणें क्षुधा करून शांत । मागुती अरण्यांत बैसावें ॥६६॥ प्रापंचिक लोक येतां जवळी । तरी प-
ळोनि जावें तत्काळीं । ह्मणे गुंता करोनि मज ये काळीं । मायाजाळीं पाडितील ॥ ६७ ॥ जो परमार्थविषयीं वि-
रक्त । सज्ञान आणि धैर्यवंत । तेणें धरितां जनाची संगत । तरी होईल अनर्थ रोकडा ॥ ६८ ॥ कस्तूरीचें सुवास-
पोतें । क्षणेक ठेविलें हिंगा-आंत । तरी त्याचें मोल तुटे निश्चित । अवगुण लागत निमेषमात्रें ॥ ६९ ॥ किं तं-
बाखू आणि पूगीफल पाहीं । दोनी सांठविलीं एके ठायीं । तरी दुर्गंधि लागेल निश्चयीं । संशय कांहीं न धरावा ७०
तेविं प्रापंचिक जे अज्ञान । समूळ वेष्टिले अविवेंकरून । त्यांचे संगतीसि विरक्त सज्जन । लागतां नाडले निश्चि-
त ॥ ७१ ॥ ह्मणोनि रामदास वैराग्यशील । मनुष्य देखोनि पळे तत्काळ । नामस्मरण सार्वकाळ । करीत प्रेम-

 ळ विदेही ॥ ७२ ॥ तों एके दिवसीं आषाढमासीं । पंढरीस चालिले यात्रेसी । मार्गीं मारुती सांगे त्यासी । श्रीराम तुजसी भेटतील ॥ ७३ ॥ ऐसा दृष्टांत देखोनि सत्वरीं । परम हर्ष वाटला अंतरीं । मग रामदास सप्रेमगजरीं । पंढरीसी लवकरी चालिले ॥ ७४ ॥ तंव तेथें टाळ मृदंग वाजती । वैष्णव आनंदें गाती नाचती । पुढें वाहे भीमरथी । तेव्हां संशय चित्तीं वाटला ॥ ७५ ॥ ह्मणे मी जयाचें करितों ध्यान । तो कांहींच न दिसे येथें जाण । मग विक्षेप पावूनि निजमन । श्रीरामभजन करीतसे ॥ ७६ ॥ श्रीरामचरित्र मुखीं गात । महाद्वारासि आला त्वरित । तंव गरुड आणि हनुमंत । पुढें अवचित देखिले ॥ ७७ ॥ मारुतीसि करूनियां नमन । पुढें पाहातसे विलोकून । तों संतसाधु वैष्णवजन । करिती कीर्तन स्वानंदें ॥ ७८ ॥ दिंड्या पताका गरुडटके । जैसें वैकुंठ उतरलें निकें । मग रामदासासि वाटला हरिख । सप्रेमसुख देखोनी ॥ ७९ ॥ तेव्हां हरिदासासि करूनि नमन । घ्यावयासी चालिले देवदर्शन । तों विटेवरी उभे जगज्जीवन । देखिले दुरून दृष्टीसी ॥ ८० ॥ समचरण करें कटीं । नासाग्रीं ठेविली दिठी । ऐसें स्वरूप देखोनि दृष्टीं । रामदास भेटी न घेची ॥ ८१ ॥ ह्मणे मी मानसपूजा करितों नित्य । तें श्रीरामस्वरूप न दिसे येथ । मग सन्मुख उभा राहूनि तेथ । काय बोलत देवासी ॥ ८२ ॥ चापबाण हातींचे काय केले । निजकर जघनावरी ठेविले । कां निजवेषासि पालटिलें । सांग वहिलें श्रीरामा ॥ ८३ ॥ अबोला धरिला जगजेठी । कांहीं आह्मांसी न बोलसी गोष्टी । काय अपराध धरिला पोटीं । तें मज उठाउठी सांगावें ॥ ८४ ॥ शरयू गंगा त्यजिली काय । येथें भीमरथी वाहात आहे । ऐसें विपरीत जाहलें काय । सांग लवलाहें रघुनाथा ॥ ८५ ॥ लोपोनि गेली अयोध्यानगरी । येथें वसविली क्षेत्रपंढरी । काय जाहली सीतासुंदरी । येथें चौघी नारी मेळविल्या ॥ ८६ ॥ असित वानरदळ पाहीं । तें कांहींच न दिसे ये ठाईं । आतां आह्मीं नमावें कायी । सांग लवलाहीं श्रीरामा ॥ ८७ ॥ एक हनुमंत दिसतो येथ । हा सैन्यांतूनि फुटला कि पर्थ । तुज चाळवूनि कोण्या भक्तें । उभें केलें या ठायीं ॥ ८८ ॥ आतां कोणासि द्यावें आलिंगन । जेणें चित्तास वाटे समाधान । कोणासि करावें साष्टांगनमन । तें मज कारण कळेना ॥ ८९ ॥ कंठ जाहला सद्गदित । नेत्रीं अश्रुपात वाहात । ह्मणे अयोध्यावासी जानकीकांत । भेटावें त्वरित मजलागीं ॥ ९० ॥ मी तुझा तुझा अनाथ दीन । येथें दिसतों किलवाणें । आतां कृपादृष्टीं विलोकून । द्यावें दर्शन श्रीरामा ॥ ९१ ॥ ऐसा निश्चय देखोनि चित्तीं । संतोषले रुक्मिणीपती । ह्मणे धन्य रामदासाची भक्ती । उपासक निश्चितीं या नांव ॥ ९२ ॥ मग रुक्मिणीसि ह्मणे जगज्जीवन । राम-उपासक निजभक्त जाण । घ्यावया आला आपुलें दर्शन । तरी तूं सीता होऊन बैसावें ॥ ९३ ॥ ऐसें सांगूनि पंढरीनाथें । आपुलें स्वरूप पालटिलें त्वरित । श्रीरामस्वरूप धरूनि तेथ । जाहले उदीत भेटावया ॥ ९४ ॥ मुकुट कुंडलें विराजमान । सुंदर सगुण मेघश्यामवर्ण । हातीं घेतलें धनुष्यबाण । ठाण मांडोनि उभे कीं ॥ ९५ ॥ सन्निध होती रुक्मिणीमाता । ते तत्काळ जाहली सगुणसीता । हें दृष्टीस देखोनि निजभक्ता । आनंद चित्ता वाटला ॥ ९६ ॥ मग राम-





दास सन्निध येऊन । श्रीरामासि दिधलें आलिंगन । तें ध्यान दृष्टीसि न्याहाळितां जाण । समाधान वाटलें ॥ ९७ ॥ कंठ होऊनि सद्गदित । आनंदाश्रु नेत्रीं वाहत । मग चरणीं मिठी घालोनि त्वरित । मस्तक ठेवीत सद्भावें ॥ ९८ ॥ बहुता दिवसीं दिधली भेटी । ह्मणोनि समाधान वाटलें पोटीं । रामदासासि जगजेठी । कृपादृष्टीं पाहातसे ॥ ९९ ॥ ह्मणती तुझिया आवडीकारण । म्यां श्रीरामरूप धरिलें जाण । आतां हेंच रूप ध्यानीं आणून । द्वैतखंडन करावें ॥ १०० ॥ शिष्यसंप्रदायी करून कांहीं । सद्भावें कीर्तन करीत जायीं । तेणें जड मूढ अज्ञान पाहीं । माझे भजनीं लागतील ॥ १ ॥ ऐसें सांगोनि जानकीवर । मस्तकीं ठेविला अभयकर । मागुती कटावरी ठेऊनि कर । स्वरूप सत्वर पालटिलें ॥ २ ॥ पांडुरंगरूप जगज्जीवन । धरिते जाहले नलगतां क्षण । तो मायालाघवी मनमोहन । लाघव पूर्ण कळों नेदी ॥ ३ ॥ धन्य रामदासाची सप्रेमभक्ती । स्वाधीन केला जगत्पती । जैसी इच्छा धरिली चित्तीं । तैसा श्रीपती जाहला कीं ॥ ४ ॥ मग विठ्ठलमूर्तीस आलिंगन । देऊनि सद्भावें धरिले चरण । रामदासें मांडिलें हरिकीर्तन । प्रेमउल्हासें ते समयीं ॥ ५ ॥ रामकृष्णस्वरूपें दोनी । हा संशय होता निजमनीं । तो देवें तत्काळ निरसूनी । अद्वैतभजनीं लाविला ॥ ६ ॥ गोपालकाला झालियावरी । देवासि पुसोनियां चालिले सत्वरीं । आश्रमासि जातां ते अवसरीं । तों वाटेसि जेजुरी लागली ॥ ७ ॥ रामदास येतां नगरांत । चित्तीं हर्षले ह्माळसाकांत । ह्मणती धन्य हा वैष्णवभक्त । आणिक दैवत नेणेची ॥ ८ ॥ जो पांडुरंगमूर्तीसि न करी नमन । तो कैसा घेईल माझें दर्शन । तरी आपण मनुष्यरूप धरून । यावें भेटोन तयासि ॥ ९ ॥ तेव्हां होता शिवाजी नृपवर । तैसेचि जाहले ह्माळसावर । अश्वारूढ होऊन सत्वर । कपाळीं भंडार लाविला ॥ ११० ॥ ऐशा रूपीं मणिमल्लमर्दन । तेथोनि चालिले न लागतां क्षण । रामदासासि देखतां दुरून । अश्वावरून उतरले ॥ ११ ॥ ह्मणे धन्य आजिचा सुदिन । स्वामीचें अकस्मात जाहलें दर्शन । मग रामदासाचे धरूनि चरण । दिधलें आलिंगन निजप्रीतीं ॥ १२ ॥ जो साक्षात शिव-अवतार पाहें । तो रामदासाचे वंदी पाय । हस्त जोडोनियां लवलाहें । बोलती काय तयासी ॥ १३ ॥ पंढरीस येतां जाण । आह्मांस देत जावें दर्शन । मी गडावरी राहिलों बहुत दिन । तुमची भेट इच्छितसें ॥ १४ ॥ ऐसें बोलोनि ह्माळसापती । रामदासासि बोले पुढती । जे श्रीरामाचें भजन करिती । ते मज आवडती सज्जन ॥ १५ ॥ रामदासें उत्तर द्यावें कांहीं । तों अदृश्य जाहले तये ठायीं । अश्व नृपति कांहींच नाहीं । ह्मणती हे नवायी अगाध ॥ १६ ॥ मग विवेकदृष्टीं जंव पाहात । ह्मणे आले असतील ह्माळसाकांत । तो शंकर-अवतार साक्षात । जो भजन करित अहर्निशीं ॥ १७ ॥ तरी आतां परतोन जाऊन । पाहावें तयाचें निजस्थान । ऐसा विचार मनें करून । चालिले तेथून सत्वर ॥ १८ ॥ जो श्रीरामाचा प्रियकर । साक्षात मारुतीचा अवतार । त्यानें सत्वर जाऊन गडावर । ह्माळसावर पाहिला ॥ १९ ॥ श्रीरामस्वरूप आठवूनि मनीं । मग नमस्कार केला तये क्षणीं । सभामंडपीं कीर्तन करूनी । आरती रचोनी गायिली ॥ २० ॥ पंचानन हयवाहन ह्मणती । ते रामदासांनीं केली

आरती । नमस्कार करूनि सत्वरगतीं । तेथून मारुती निघाले ॥ २१ ॥ परतोनि जांबासि येतां जाण । शिवाजीस कळलें वर्तमान । कीं मार्तंड आपुलें रूप धरून । रामदासासि भेटले ॥ २२ ॥ हे कीर्ति ऐकोनियां ऐसी । शरण आला सद्भावेंसीं । मग अधिकार देखोनि रामदासें । उपदेश तयासी दीधला ॥ २३ ॥ आणिक संप्रदायी वैराग्यशीळ । भजनीं लाविले भक्तप्रेमळ । परी रामदास उदास सर्वकाळ । न करी तळमळ सर्वथा ॥ २४ ॥ मानापमान दोनी सारखीं । अरण्यांत बैसले एकाएकीं । कांहीं गुंता कळतां लौकिकीं । तेथोनि शेखीं पळावें ॥ २५ ॥ राजा रंक आणि दीन । दृष्टीस लेखीतसे समान । सर्वांभूतीं सद्भाव पूर्ण । हें आत्मज्ञान प्रकटलें ॥ २६ ॥ अनुभवाचे सोलींव शब्द । ग्रंथ रचिला दासबोध । तो सद्भावें वाचितां बुद्धिमंद । तरी तो होय अगाध ज्ञानराशी ॥२७॥ रामदासाचें ज्ञान अद्भुत । स्वमुखें रचिला अध्यात्मग्रंथ । जे श्रवण करिती वैष्णवभक्त । तरी जीवन्मुक्त ते होती ॥२८॥ करावया विश्वोद्धार । भूतळीं अवतरले वैष्णववीर । जे सिद्धांतज्ञानी अतिउदार । करुणाकर दीनाचे २९ रामदासाची अद्भुत स्थिती । सारखीच दिसे शेण माती । पुढें येतां इंद्रसंपत्ती । तरी न गणी चित्तीं सर्वथा॥१३०॥ श्रवणीं ऐकावें श्रीरामकीर्तन । मुखीं जपावें त्याचें नाम । ध्यानीं आणोनि आत्माराम । दृष्टी सम सर्वांभूतीं ॥३१॥ पुढिले अध्यायीं अतिसुगम । कथा रसाळ निरुपम । जो वैष्णवभक्त तुकाराम । त्यासि पुरुषोत्तम पावतील ॥३२॥ त्या कथेची रसउत्पत्ती । वदविता श्रीरुक्मिणीपती । श्रोतयां विनवी महीपती । अवधान चित्तीं असों द्या ॥३३॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ पेका भाविकभक्त । सप्तचत्वारिंशाध्याय रसाळ हा ॥ १३४ ॥ अध्याय ४७ ॥ ओंव्या १३४ ॥



श्रीगणेशाय नमः। श्रीपंढरीनाथाय नमः।जयजय करुणासागरा आनंदघना।भक्तवत्सला राजीवनयना।विधिजनकादानवभंजना । जगज्जीवना जगदीशा।१।जयजय विश्वव्यापका कमलापती । सज्जनजीवना आनंदमूर्ती । निर्गुणसगुणा विश्वपती । अतर्क्यगती वेदशास्त्रां।२।जयजय विश्वबाहु अपरिमिता । विश्वचक्षूनें तूं देखता । विश्वपादें गमनकर्ता । निगम वार्ता बोलिले ३ जयजय चित्स्वरूपा आत्मारामा ।गुणनिधाना उत्तमोत्तमा । स्वानंदप्रकाशा पुरुषोत्तमा । अनुपम महिमा पैं तुझा।४।तुझी ध्यानांत आणितां मूर्ती । श्रुति परतल्या ह्मणोनि नेति नेती । कुंठित झाली पुराणव्युत्पत्ती । शास्त्रसंपत्ति लज्जित ५ करितां तपें तीर्थाटनें । प्राप्त नव्हेचि अनुष्ठानें । तो तूं निजभक्तांचीं ऐकोनि कीर्तनें । जाशी धांवून त्या ठायीं।६।करूनि योगाची आटणी । साधक बैसले वज्रासनीं । त्यांसि नेणतां चक्रपाणी । भाविक धुंडोनी पहासी ७ तूं सर्वदेवांत मुकुटमणी श्रेष्ठ । सनकादिकांसि पूज्य वरिष्ठ । तो तूं भाविकांचे घरीं कष्ट । करिसी स्पष्ट निजांगें ८ निजभक्तांचें काम करितां । लज्जा न वाटे तुझिया चित्ता । मानापमान नेणवे सर्वथा । पंढरीनाथा तुजलागीं।९।तुझ्या निजभक्तांची ऐसी निष्ठा । कदा न घालिती तुज संकटा।प्रपंचदुःखाचे दावूनि कष्टा।वैराग्यवरिष्ठा त्यां देशी १०त्या वैराग्याचे निजबळें । तुझें भजन करिती सर्वकाळ । कीर्तन गाती भक्तप्रेमळ । सांडोनि तळमळ चित्ताची ११ तूं अभक्तांच्या हृदयीं रिघोन । त्या भक्तांचें करविसी छळण । मग आपणचि निजांगें उडी घालून । राखिसी सन्मान दासांचा॥ १२॥अघटित दावूनि करणी।कीर्ति वाढविसी त्रिभुवनीं।ऐसा निजभक्तांचा ऋणी।तूं चक्रपाणी गोविंदा १३त्यांचें वर्णावया सगुणचरित्र । कोणासि करिसी निमित्तमात्र । मी तंव मंदबुद्धि स्वतंत्र।तूं राजीवनेत्र प्रकाशिता १४अनाथनाथा रुक्मिणीपती। आतां नमूं तुज पुढतपुढती।ऐसेंही ह्मणतां निजप्रीतीं।कुंठित मती होतसे १५तुझी कृपा न होतांचि जाण।कदापि न करवे तुज नमन।जें ज्या काळीं येईल घडोन।तें तुझे सत्तेविण नव्हेची १६क्षणक्षणा पालटोनि मती।संकल्प विकल्प येतील चित्तीं।तूं तर साक्ष जाणसी श्रीपती।सांगों किती निजमुखें १७न सांगों जरी रुक्मिणीकांता । परी करुणा नयेचि तुज सर्वथा।जैं तान्हें बाळक रुदन करितां।धरीतसे माता दूर त्यासी १८तैशा रीतीं चक्रपाणी । भक्त आळविती तुज करुणावचनीं।मग कृपादृष्टीं विलोकूनी।सप्रेमभजन त्यां देसी १९ऐसीच तुझ्या गृहींची रीती। मागें वर्णिली सभाग्यसंतीं।त्या निजभक्तांची अद्भुत कीर्ती।तूंचि श्रीपती वदवीं कां २०मागिले अध्यायीं कथा लाघव।रामदासाचा निश्चय दृढभाव।देखूनियां पंढरीराव। जाहले राभराव निजांगें २१आतां सादर होऊनि प्रेमळजनीं। निरूपण रसाळ ऐकावें श्रवणीं। दीडयोजन अलकापुरीहुनी।देहुगांव धरणी पुण्यक्षेत्र २२तेथील निज भक्त तुकावाणी ।आंबळे उपनाम त्यालागोनी । परी व्यवसाय करित असतां जनीं।असत्य सर्वथा नबोले २३दो धी कांता तयासि असती।घरीं उदंड धनसंपत्ती।परी त्याची अखंड विदेहवृत्ती । स्मरण एकांतीं करितसे।२४।मातापिता क्रमलियावर । दुःखरूप जाहला संसार । दुष्काळ पडला थोर।तेणें द्रव्य समग्र आटलें।२५।धन धान्य जें कांहीं होतें।तें आटोनि गेलें जेथींच्या तेथें । जैसें पौर्णिमेचें भरतें।सागरांत सामावे

।२६।कीं वर्षाऋतूचें अभ्र पाहे। सीतकाळीं नाहींसें होय। नातरी होतां सूर्योदय। नक्षत्रें गगनींच हारपती।२७।कीं वार्धक्य अंगीं येतां पाहीं। तारुण्यदशा न दिसे देहीं। नातरी उष्णकाळ येतां ठायीं। तृणें सर्वही नासती।२८। तेविं स्वदेशीं पडतां दुष्काळ। धन धान्य आटोनि गेलें सकळ। मुलें माणसें करिती तळमळ। परी अन्न न मिळे सर्वथा।२९।ज्येष्ठकांतेसि पुत्र दोघेजण। कनिष्ठेसि नवतें संतान। भाजीपाला खाती उकडोन। परी दृष्टीस कण दिसेना।३०।तरी होणार न चुकेचि सर्वथा। ज्येष्ठ निवर्तली अन्न अन्न करितां। तेणें लज्जित होऊन चित्ता। प्रपंचममता नाठवे।३१।संपत्तिवैभव हरपतां जाण। त्यासवेंच गेला सन्मान। देखतां हांसती सोयरे पिशुन। तेव्हां लज्जित मन तुकयाचें।३२।जे राखित होते बहु मर्यादा। तेचि स्वमुखें करिती निंदा।अन्नवस्त्राची सदा आपदा।उदीम धंदा चालेना ३३पुरुष झालिया द्रव्यहीन।त्यासि न पुसती सोयरे पिशुन। जेविं वृक्षाचीं पत्रें गेलीया झडोन। तेथें विलासीजन न रमती ३४कीं रणीं पडतांचि नृपती। देहलोभी रण टाकूनि पळती। तेविं दरिद्र येतां पुरुषाप्रती। पिशुन करिती अपमान।३५। हा काठिण काळ येतांचि देखा। परम लाज्जित झाला तुका। प्रपंचीं कोणी न दिसे सखा। मग चित्तीं विवेका आठविलें।३६।कांहीं करितां उदिमाची हातवटी।तंव तेथें आधिक होतसे तुटी। हा कठिण काळ पडतां संकटीं।अनुताप पोटीं उपजला ३७ह्मणे प्रपंच लटका मिथ्या माया। नरदेह केवळ नाशवंत काया। म्यां जन्म दवडिला वायां। पंढरीराया विसरोनी।३८। ढेंकुणाचे बाजे करितां शयन। तेथें सुखनिद्रा न लागेचि जाण। कीं विष कालवूनि रांधिलें अन्न। तें उत्तम भोजन ह्मणूं नये।३९।तेविं प्रपंचीं ह्मणती विषयसुख। ते केवळ ह्मणावे अति मूर्ख। जैसा वांझेचा पुत्र उपजतां देख। वायांचि हारिख मानावा।४०।ऐसा विवेक करून मानसीं। वैराग्य जाहलें तुकयासी। सुख दुःख दोनी मानूनि सरसीं। भजन अहर्निशीं करितसे ४१पांडुरंगाचें देऊळ पुरातन।बहुता दिवसांचें होतें जीर्ण। निजांगें तें लिंपोनि जाण। केलें सारवोन सोज्वळ ४२ सकळ साधनांमाजी श्रेष्ठ। एकादशीव्रत वरिष्ठ। तें आरंभूनियां एकनिष्ठें। जागरण वरिष्ट करावें।४३।कीर्तन करावें निजमतें। परि आधीं अभ्यासी नवतें चित्त। कोणी सप्रेम गाती संत। धरावें ध्रुपद त्यामागें।४४।मागील संत झाले श्रेष्ट। त्यांचीं वचनें केलीं पाठ।त्याहूनि मार्ग नाहीं वरिष्ठ। भाव एकनिष्ठ धरियेला ॥४५॥ भूतमात्रासि देखोनि दृष्टीं। त्याची करुणा येतसे पोटीं। त्यासि परोपकारें काया कष्टी। संतप्तपोटींनिववीत ४६ ते जरी ह्मणाल कैसिया रीतीं। सकळिक ऐका माथितार्थी। कोणी प्रवासी पाहतां वस्ती। त्यांसि मंदिराप्रती आणावें।४७।क्षुधार्तीयासि असल्या अन्न। तरी घालावें त्यासि भोजन।नसेल तरी कष्ट करून। आणावें मेळवून त्यासाठीं।४८।कोणी तृषाक्रांत झालिया वनीं। त्यासि नेऊन पाजावें पाणी। कोणी चालत आले दुरूनी। त्यांसि रगडूनि निववावें ॥ ४९ ॥ कोणाचे मस्तकीं असला भार। तो आपण घ्यावा सत्वर। तें ओझें वाहूनि पाठीवर। विसांवा क्षणभर त्या यावा॥५०॥कोणी रोगी प्रवासीं पीडित। जवळी नसतां सुहृद आप्त। त्यावरी होऊनि कृपावंत। औषध देऊन पथ्य करवी ॥५१॥गाईवृषभांसि निर्बळपणीं। मोकलूनि देती निर्दय धनी। ते निजकरें कुरवाळोनी। चारा पाणी त्यांस यावें॥५२॥गृहासि येतां वैष्णवजन। तयांसि घाली लोटांगण। सद्भावें धुवोनियां चरण। तीर्थ प्राशन करावें।५३।हें शरीरतप करितां निश्चिती। यावरी जाहली कवित्वाची स्फूर्ती। जे श्रुतिशास्त्रांनीं वर्णिली कीर्ती।ते प्राकृतमतीं बोलत ॥ ५४ ॥ येथें मागील निरूपणासरिसें। दृष्टांतीं आलें अनायासें। तें कथानक अतिसुरसें। श्रोतीं सावकाश परिसावें।५५।एकदा नामा वैष्णवभक्त। पांडुरंगासि वचन बोलत। शतकोटि कवित्व प्राकृत। तुझी कीर्ती वर्णीन मी॥५६॥ऐकोनि ह्मणे रुक्मिणीकांत। नामया त्वां प्रतिज्ञा केली व्यर्थ। कलीमाजी आयुष्य वर्षें शत। त्यांतही आघात सर्वथा॥५७॥आणि प्रतिज्ञा करून बोलसी आतां। परी सिद्धीस न जाय हे सर्वथा। मग नामदेव चरणीं ठेऊनि माथा। रुक्मिणीकांता विनवित॥५८॥मी तुझ्या आश्रयें बोलिलों देवा। तो निजांगें पण सिद्धीस न्यावा। तूं काय एक न करिसी देवा। आम्हुचा केवा तो किती ॥ ५९ ॥ ऐकूनि नामयाचें करुणाउत्तर। प्रसन्न जाहला शार्ङ्गधर। मस्तकीं ठेऊनि अभयकर। सरस्वतीस काय आज्ञापी ॥ ६० ॥ तुवां याचे बैसोनि जिह्वाग्रीं। कवित्व वदवावें अतिकुसरीं। जे श्रुतीचे गर्भ आहेत अंतरीं। ते प्राकृत वैखरी वदावे॥६१॥मग ब्रह्मतनया करी विनवणी। नामदेव वदतील प्रसादवाणी। परी याचा चपळत्वें लिहिणार कोणी। चक्रपाणी योजावा।६२।मुखांतूनि निघतांचि अक्षरें। तत्काळ लिहावीं निजकरें। परतोनि पुसिल्या उत्तरें। तरी नयेची सर्वथा६३यावरी ह्मणे घननीळ। मी लिहित बैसेन सर्वकाळ। आणिक लेखक तों ये वेळ। न दिसे चपळ सर्वथा।६४। मग विलासभोग सर्व टाकुनी। नामयाचें कवित्व चक्रपाणी। हातीं घेऊनि दउत लेखणी। निजांगें लिहित बैसले।६५।ज्याची वेदशास्त्रें करिती स्तुती। व्यासवाल्मीकादिक वर्णिती। तो नामयाचें कवित्व लिही निश्चिती। नवल मजप्रती वाटलें।६६।सांडोनियां वैकुंठभुवन। सांडोनि क्षीरसागर शेषशयन। हातीं घेऊनि दौत लेखण। जगज्जीवन तिष्ठती।६७।काय निघेल मुखांतूनी। तेथें अवधान देत चक्रपाणी।निद्रा आळस सर्व टाकूनी।असती निशिदिनीं सावध६८ऐसे बहुत दिवस श्रीपती। नामयाचे बैसोनि संगतीं। तों कवित्वसंख्येची पहातां गणती। जाहली किती ऐका ते६९चाळीस लक्ष चौऱ्याण्णव कोटी। नवलक्ष लळित आलें शेवटीं।इतुकी संख्या देखोनि दिठीं।जाहले जगजेठी विस्मित॥७०॥ ह्मणती धन्य नामयाचा प्रेमा। अद्भुत वर्णिला माझा महिमा। सर्वथा पार न लागे निगमा। त्या मज पुरुषोत्तमा वश केलें।७१। ऐसें ह्मणूनि जगजेठी। निजकरें नामयाची पाठी थापटी। ह्मणे कांहीं प्रेमा राहिला पोटीं। तो पुढें गोष्टी वदवीन।७२।आतां माझें स्वरूप आठवोनि मनीं। सप्रेम पहा दृष्टीभरोनी। ऐसें बोलतां चक्रपाणी। नामा चरणीं लागला ७३ त्वां शतकोटींचा केला पण। तो सिद्धीस न्यावया जगज्जीवन। बाकी राहिलें कवित्वलेखन। तें करी संपूर्ण निजांगें।७४। मग नामयाचा धरूनि हात। तुकयाचे स्वप्नीं आले त्वरित। ह्मणे वाउगें न बोलावें निश्चित। करावें कवित्व ममाज्ञा।७५।प्रमाणाची संख्या शतकोटि। ते सिद्धी पाववीं तूं शेवटीं। ऐसें ह्मणोनि जगजेठी। पाठ थापटी निजकरें।७६। जागृत होऊनि जंव पाहत। तंव दृष्टीसि न दिसे रुक्मिणीकांत। नामदेवही नाहीं तेथ। चमत्कार अद्भुत दे-

खिला । ७७ । मग तेचि आज्ञा वंदोनि शिरीं । आरंभिली कवित्वकुसरी । त्याविण वाउगी वैखरी । गोष्टी दुसरी न बोले
।७८। कीर्तन करितां प्रेमेंकरूनी । प्रासादिक रसिक वदे वाणी । प्रेमळभक्त आवडीकरूनी । ऐकती श्रवणीं सद्भावें ।७९ ।
कोणी विकल्पी जे विचक्षण । ते ह्मणती हें कवित्व नूतन । आह्मांसि न वाटे प्रमाण । न करूं श्रवण सर्वथा । ८० । मागील
संतांचीं टाकूनि वचनें । आपुलीं कासया दाविशी भूषणें । आइतीं टाकोनि पक्वान्नें।हात पोळवणें कासया।८१। ह्मणाल
आज्ञाकर्ता रुक्मिणीरमण । त्याचें कवित्व कां निंदिती जन । तरी भाविकांपाठीं पुरातन। विकल्पी असती बहुसाल८२
मागें त्रेतायुगीं वाल्मीकीनें । भविष्य केलें रामायण । तेव्हांही होते अभक्तजन । ते अप्रमाण मानिती ।८३। मग अवतार
घेऊनि जानकीपतीं । लीला दाविली तैशाच रीतीं। ते अनुभवास येतां प्रचीती। यथार्थ मानिती सकळिक।८४।द्वापारीं
बोलिले कवि व्यास । परी कौरवांसि न वाटे विश्वास । मग घडोनि आलिया अनायासें । धृतराष्ट्र संजयास नमस्कारी
।८५। एवं भावार्थियामागें विकल्पी नर। लागले असती परंपर। ह्मणोनि तुकयाचे अभंग साचार । निंदिती पामर निज-
मुखें ।८६। सूर्याचा प्रकाश देखोनि दृष्टीं । डुडुळ उगेचि जल्पती पोटीं । कीं पूर्वेस चंद्र येतां निकटीं। तस्करांसि भेटी ना-
वडे।८७।दातयाची ऐकोनि कीर्ती । कृपण उगेचि त्या धिक्कारिती । कीं दिव्य औषधी चमकतां रातीं। रोग तळपती चि-
त्तांत । ८८ । पंडिताची देखोनि वक्तृता । अजापाळ ह्मणती हें बडबड वृथा । कीं गंधर्व सुस्वर गायन करितां । तेथें गर्दभ
भुंकतां न राहती।८९।बकुळीचा सुगंध येतां पाहे । तो पुंगळवेलीस मानेल काय । सुंदर कपिला असली गाय । तरी यवन
काय पूजिती ।९०। ब्राह्मण प्रतिमेची पूजा करिती । आणि अविंध तया फोडूं पाहती । तेविं भाविक तुकयाचें कीर्तन ऐ-
कती । विकल्पी निंदिती निजमुखें ।९१। परी दोनी मानून ते समान । करीतसे तो श्रीहरिभजन । कोणी हरिदास करितां
कीर्तन । तरी सादर श्रवणीं ऐकावें।९२। दिवसेंदिवस अधिकचि प्रीती । या नांवें चढती वाढती भक्ति । निद्रा किंचित न
लागे रातीं । करितां एकांतीं हरिभजन।९३। आषाढी कार्तिकी पंढरीसी । नेमवारी धरिली ऐसी । मग पंधरा दिवसीं ए-
कादशीसी । जाय दर्शनासी निजभावें । ९४ । निरपेक्षता तरी किती । एके दिवशीं शिवाजी नृपती । तुकोबाची ऐकूनि
कीर्ती । दर्शनाप्रती पातले ॥ ९५॥ तेव्हां अविंधांचें प्राबल्य थोर । सिंहगडीं होता नृपवर । कोणासि नकळतां साचार ।
पुण्यासि सत्वर पातला।९६।तेथें एका वाणियाचे घरीं। तुका वैष्णव कीर्तन करी ।राजयासि कळतां सत्वरी। संतोष अं-
तरीं वाटला ।९७। मग निशीमाजी कोणा नकळत । लपोनि आले नगरांत । यवनाचें भय वाटे बहुत । कीं नेती त्वरित
धरूनी ।९८। तुकोबाचें घेऊन दर्शन । गडावरी जावें परतोन । ऐसा मनीं हेत धरून। आला लपोन नृपनाथ।९९।रुप्याचें
तबक सोज्वळ जाण । तयांत घातल्या मोहरा होन।तुकयापुढें द्रव्य ठेवून। केलें नमन साष्टांग।१००। तें राजद्रव्य देखोनि
त्वरित।थरथरां कांपे विष्णुभक्त।मग शिवाजीस काय बोलत।तें परिसा संत भाविकहो१कासया पाहिजे द्रव्यठेवा।एक
विठ्ठलचि आह्मांसि व्हावा।त्याविण आणिक प्रपंचहेवा। आमुच्या जीवा नावडे २ जैशा जोहारियाच्या साठोवाटी ।



गारा आणिल्या उठाउठी।तेविं आमुचि घ्यावया भेटी।कनकओंटी आणिली ३तुह्मी विशाळ ऐकतों मती।आजि उदा-
रत्व कळलें नृपती।आह्मां वैष्णवांसि नावडे चित्तीं।तें पुढें निजप्रीतीं ठेविलें४तुवां आणिलें द्रव्यहोन।हें आह्मां गोमांस-
समान।ऐसें ऐकोनि निर्वाणवचन।लज्जित मनीं नृपनाथ।५।पुढती रायासि बोले वचन। आमुचें व्हावें समाधान।ऐसें इ-
च्छित असेल तुझें मन । तरी ते ऐकें खूण सांगतों।६।तुह्मीं करावें विठ्ठलनामस्मरण ।तेणेंचि आह्मीं सुखसंपन्न।येर संपत्ति
देशील धन । तें मृत्तिकेसमान नृपनाथा ।७। गळयांत कंठी मिरवा तुळसी।व्रत करावें एकादशी। तेणेंचि समाधान आ-
ह्मांसी । द्रव्यराशी न घेतां ।८। चित्तीं धरूनि प्रेमउल्हास । ह्मणावें विठोबाचा दास । हेचि आमुची आहे आस । पुरवा
सावकाश धणीवरी।९।ऐसी निरपेक्ष देखोनि स्थिती । मनांत आश्चर्य करी नृपती । मग अनन्यभावें लोटांगण प्रीतीं ।
पुन्हां मागुती घातलें ॥११०॥ ते दिवशीं असे हरिदिनी । कीर्तन ऐके प्रेमेंकरूनी । तों दोन सहस्र पठाण चाकणाहूनी ।
अविंधें त्वरित पाठविले।११।हेर ठेविले होते पाळती । त्यांनीं सांगीतलें यवनाप्रती । कीं पुण्यासि आला नृपती । दर्श-
नासि रातीं तुकयाचे।१२।मग स्वार पाठविले त्या दुर्जनीं । कीं त्यासि आणावें शीघ्र धरूनी । नानापरीचीं शस्त्रें घेऊ-
नी । आले धांवूनि अर्धरात्रीं।१३।जेथें मांडिली होती कथा । तो वाडा वेढिला सभोंवता । आंतील मनुष्य बाहेर निघ-
तां । ते जाऊं सर्वथा न देती।१४।ह्मणती शिवाजीस ओळखोनि सत्वर । बांधोनि आणावें बाहेर । रायासि कळला स-
माचार । कीं वेढिलें मंदिर परचक्रें।१५।कोणी ह्मणती नृपवरासी । आतां उठोनि पळा वेगेंसी । तेणें भय उपजलें मान-
सीं । विचार तयासी पडियेला । १६ । देखोनि श्रोतयांचें दुश्चित चित्त । तुकयासि कळला वृत्तांत । ह्मणे काय गुजगुज
करितां मनांत । सांगा त्वरित मजपासीं।१७।ऐकोनि तुकयाचें वचन । हळूच सांगती सज्ञानजन।कीं राजयासि न्याव-
याकारण । परचक्र दारुण पातलें ।१८।ह्मणोनि आतां सत्वरगतीं। येथोनि पळवावा नृपती।आज्ञा द्याल आह्मांप्रती । त-
रीच वांचती प्राण याचे॥१९॥ तयासि तुका बोले काय । कीर्तनांतूनि सर्वथा उठों नये । धर्मनीति तों ऐसी आहे । नेणतां
काय सकळिक।१२०।ऐसें ऐकोनि नृपती । निश्चय करून बैसला एकचित्तीं । ह्मणे तारिता मारिता रुक्मिणीपती । त्या-
विण त्रिजगतीं असेना।२१।आज एकादशी पर्वकाळ सुदिन । संनिध संत वैष्णवजन । एथें कीर्तनांत आलें जरी मरण ।
तरी भाग्य धन्य पैं माझें।२२।इकडे बाहेर परदळ विचार करिती।कीं धरून आणावा सत्वर नृपती।वाड्यांत हेर उदंड ये-
ती।परी कोणीच नोळखती रायासी२३यवनासि सांगती जाऊन।कीर्तनीं बैसले बहुतजन।तयांत शिवाजी आहे कोण।
आह्मांकारण कळेना ।२४।ऐकोनि पायिकांचें वचन । क्रोधें संतापला तो दुर्जन । ह्मणे कथेंत बैसले जितुके जन । तितुके
मारून टाकावे।२५।त्यांत सहजचि राजा सांपडला । ऐसा निश्चय दृढ केला । तों अंतरसाक्ष तुकयाला । वृत्तांत कळला
ते समयीं॥२६॥ मग ध्यानांत आणोनि पंढरीनाथ । नानापरीची करुणा भाकित । जयजय अनाथनाथकृपावंत । धांवें
त्वरित ये समयीं।२७।तुझ्या कीर्तनासि आले सज्जन । तयांसि तत्काळ ओढवलें विघ्न । आतां हें अरिष्ट निवारण । तुज-

विण कोण करील । २८ । जेथें तुझें नामसंकीर्तन । तेथूनि विघ्नें जाती पळोन । ऐसें संत बोलिले वचन । तें असत्य होऊन आलें कीं ।२९। माझें चित्त पहासी जगज्जीवना । परी मी भीत नाहीं आपुल्या मरणा । दुःख होईल संतसज्जनां । तें माझिया नयना न देखवे ।१३०।आमुची जातिपरंपरा ऐसी । रुक्मिणीपती तूं काय नेणसी । विक्षेप झाला जो भजनासी । याहूनि मरण आह्मांसी कोणतें।३१।ऐसें ऐकोनि करुणावचन।तत्काळ आले जगज्जीवन।तुकयासि देऊनि आलिंगन। ह्मणे त्वां कीर्तन करावें ३२परचक्र आलें महाविघ्न ।तें मी निजांगें करितों निवारण।तूं स्वस्थ करूनि आपुलें मन।सप्रेम भजन करावें।३३।ऐसें ह्मणोनि घनसांवळा।शिवाजीराजा आपण जाहला।अश्वारूढ होऊनि ते वेळां। सत्वर चालिला बाहेरी ३४कीर्तनीं बैसले लोक समस्त।तयांसि नकळतां हा वृत्तांत।कौतुक मांडिलें अत्यद्भुत।तें परिसा निजभक्त भाविक हो ३५ज्या वाडियांत होतें हरिकीर्तन।तेथें अकस्मात प्रकटले जगज्जीवन ।आपणचि स्वमुखें हांक मारून।ह्मणे जातो पळून नृपनाथ ३६ दोन सहस्र पठाणीं वेढोनि वाडा। घातला होता त्यांनीं गराडा। तितुकेही होऊनि मागांपुढां।पाहती रोकडा नृपनाथ ३७क्षण एक पडोनि तयांचे दिठीं।चपळत्वें चालिले उठाउठीं।सैन्य लाऊनि आपुले पाठीं।लाघव जगजेठी दावित ३८नगरवासी लोक समस्त।जागृत होऊनि अति त्वरित।माड्या माळवदे उभे राहत।काय बोलतपरस्परें ३९ राजा पुढें जातोपळोन।तयामागें लागले यवन।आतांन वांचतील त्याचेप्राण।अनर्थहोईलदिसताहे १४०अविंधाच्या सैन्यांतून।पाळतीहेर जे ठेविले जाण।त्यांसि दिसे जगज्जीवन।जैसा नृपवरशिवाजी ४१एक ह्मणती धराधरा।राजा पळोन जातो खरा।हडबड झाली महावीरां।ह्मणोनि सत्वरा धांवती ४२एका जवळीचदिसे पाहीं।धरूं जातां कांहींच नाहीं।एक ह्मणती पळोनि कायी।आतांच लवलाहीं मारावा।४३।एक ह्मणती घाला वेढा।काय पाहतां रे मागांपुढां।एक ह्मणती तुह्मां भ्याडां । वीर रोकडा धरवेना।४४।आपण दोन सहस्र शूर। इतुक्यांतूनि पळतो एकला वीर । कासया वागवितां हतियार । प्राण सत्वर द्याना कां ।४५। एक ह्मणती उगवेल दिवस । मग राजयास धरूं सावकाश । आतां आमुचे डोळां न दिसे । व्यर्थ कासावीस कां होतां ।४६। क्षण एक ठायीं राहिले स्थिर । तंव कौतुक करी शार्ङ्गधर । आपण प्रकट झाले सत्वर । ह्मणती धरारे सांपडला ।४७। मागुती सकळ लागले पाठी । तरी तयांसि नातुडे जगजेठी । क्षणएक संनिध पडोनि दृष्टी । धरितां निकटी आतुडेना।४८।मग शुक्लपक्षींचें पडिलें चांदणें । त्या प्रकाशें धांवती यवन । प्रहररात्रींत पांच योजनें । अरण्यांत नेऊन घातले ४९ज्या डोंगरीं लागलें कंटकवन । महाभयानक ओसाड अरण्य । त्या स्थळाप्रति नेऊनि सैन्य । मग जगज्जीवन परतले १५०तेथें सकळ वीर सभोंवतें पाहाती । तों कोठेंचि न दिसे शिवाजीनृपती । ह्मणती आपुल्यास पडली भ्रांती । धांवलों रातीं व्यर्थची ॥५१॥ एक ह्मणती तरळली दृष्टी । तेणें वायांचि झालों कष्टी । एक ह्मणती सन्निध स्पष्टी ।आह्मीं तंव दृष्टीं देखिला ।५२। परतोनि चालिले मागुती । तंव मावळोनि गेला निशापती । अंधारीं कांहींच न दिसे रातीं । मार्ग निश्चितीं सांपडेना ।५३। एका पुढें एक अश्व हांकिती । अडखळोनि तेचि ठायीं पडती । येरये-



रांसी काय बोलती । बरवी गती दिसेना ५४ अंगासि लागतां कांटवण । तेणें वस्त्रें गेलीं फाटून । एक दीर्घस्वरें करिती रुदन । जातील प्राण ह्मणोनी।५५।हिंव सुटलें अति प्रबळ।तेणेंचि सैन्य झालें विकळ । ओसाड अरण्यांत करिती तळमळ। अश्व तंव सकळ पळाले।५६।अद्भुत केलें जगज्जीवनें । कोणासि न मारितां जीवें प्राणें । नागडे फिरती यवन । आली नागवण सकळांसी ५७शस्त्रें हातींचीं पडलीं सत्वरी । अश्व तों जाहले रानभरी । कांटवणीं राहिलीं वस्त्रें दूरी । केले भिकारी सकळिक।५८।ऐसा दुर्जनांसि दंड करूनी । परतोनि आले चक्रपाणी । तुकयाचे कीर्तनीं येऊनी । प्रेमरंगणीं नाचती ५९ श्रवणासि बैसले लोक समस्त । तयांसि न कळतां हा वृत्तांत । विघ्न टाळीत पंढरीनाथ । माव अघटित करूनियां ।१६० । तुकयाचे कानीं जगज्जीवन । येऊनि सांगे वर्तमान। आतां निर्भय करून मन । करावें कीर्तन आवडीं।६१।मग जयजयकारें पिटोनि टाळी । हरिनामें गर्जती सकळ मंडळी । वैष्णव नाचती कीर्तनमेळीं।तुष्टला वनमाळी ह्मणोनी ६२रायासि सांगती सकळजन । परचक्र आलें होतें दारुण । तयाचें न करितां निवारण । गेलें पळोन आपोआप ।६३। आश्चर्य करी नृपवर । ह्मणे मज पावला रुक्मिणीवर । अरिष्ट आलें होतें थोर । आह्मां अनिवार सकळांसी॥६४॥यापरी मानूनि समाधान । श्रवण करिती हरिकीर्तन । चार प्रहर झालें जागरण । तों उदयासि अरुण पातला ॥ ६५ ॥ मग उजळोनि मंगळारती । ओंवाळिला रुक्मिणीपती । हरिनामें गर्जोनि क्षितीं । दंडवत प्रीतीं घातलें ६६ बिन्हाडासि जातां नृपनाथ। ग्रामांत नरनारी काय बोलत । तुह्मां ऐसाचि रात्रीं पळत । गेला त्वरित नगरांतूनी ॥६७॥ हें यवनानें देखोनि दृष्टीं । पळताचि गेले त्याचिया पाठीं । कैसे वांचलेत संकटीं । आश्चर्य पोटीं वाटतें ।६८।राजा चमत्कारला मनीं । ह्मणे ईश्वराची अघटित करणी । वांचविलें अरिष्टापासोनी । चक्रपाणी कृपाळें ६९एके दिवशीं शिवाजीनृपती । विचार करी आपुले चित्तीं । तुकोबासि देतां धनसंपत्ती । परी ते न घेती सर्वथा॥१७०॥ परी दीन रूप धरूनि आपण । नेऊन द्यावें त्याचे घरीं धान्य । येरवीं तो माझें राजान्न । तें तो नेघेची सर्वथा।७१।ऐसी युक्ती योजूनि जाण । वस्त्रें नेसला फाटकीं जीर्ण। वृषभावरी धान्य दोन मण । चालिला घेऊन तेधवां।७२।दोन घटिका लोटतां यामिनी । तुकोबाचिया पातला सदनीं । तों ते बैसले होते वृंदावनीं । हातीं स्मरणी घेऊनियां ॥७३॥ तों राजा येऊनियां सत्वरीं । गोणी लोटोनि टाकिली द्वारीं। ह्मणे स्वामी म्यां करूनि मजुरी । धान्य मेळवूनी आणिलें ।७४। तुमचे चरणीं धरूनि हेत । येथें घेऊनि आलों किंचित। मी अनाथ दीन आहें बहुत । हें सांठवा गृहांत आपुल्या ।७५। मग नमन करूनि सत्वरीं । राजा गेला ते अवसरीं । तुकयासि कळलें निज अंतरीं । कृत्रिम परी ह्मणोनियां।७६।ह्मणे ओळख सांगतां रायाकारण । त्याचे प्रेमाचें होईल खंडन। ह्मणोनि उगेंचि धरून मौन । नामस्मरण करीतसे । ७७ । मग निजकांतेप्रती बोलत । धान्य आणिलें तों नृपनाथें त्वरित । गृहांत ठेविलें जरी समस्त । तरी खंडेल सुकृत आपुलें ।७८॥ जरी एका दिवसापुरतें अन्न । निजकरें घेसील त्यांतून । वरकड द्विजांसि बोलावून । त्यांजकारणें अर्पावें।७९।ऐसी ऐकोनियां गोष्टी । कांता सक्रोध जाहली पोटीं। आपुल्या करें

ललाट पिटी। ह्मणे मी करंटी अभागी॥१८०॥अवचित गोणी आली घरा। तें धान्य खाऊं नेदीच पोरां। वांटिलें गांवीं-चिया द्विजवरां। म्यां काय संसारा करावें।८१। यावरी कांतेसि उत्तर देत।जैसें आपुलें आहे संचित। तो वांटा टाकोनि निश्चित। घ्यावें बहुत कोठोनी॥८२॥ एके दिवशीं देवालयांत। तुकोबा आनंदें कीर्तन करित। तों नवल वर्तलें अद्भुत।तें परिसा चरित्र भाविक हो॥८३॥ टाळ मृदंग वाजविती सुस्वर। तेणें नादें कोंदलें अंबर। तटस्थ होऊनि नारीनर। ऐकती सादर हरिलीला।८४।तेथें एक कासार भाविक सज्जन।ऐकावया येतसे कीर्तन। त्याचिया सुलास व्यथा दारुण।होता ति प्राण कासावीस॥८५॥कांता ह्मणे तयासी। आजि तुह्मीं न जावें हरिकीर्तनासी। तेणें नायकोनि तिचे वचनासी। गेला कीर्तनासी सत्वर।८६।तों मागें लेंकुराचे जातां प्राण। माता दीर्घस्वरें करी रुदन। तैसेंच प्रेत खांद्यावरी घेऊन। कीर्तनांत आणोन टाकिलें।८७।कासारीण ह्मणे तुकोबासी। त्वां आमची पाठ घेतली कैसी।वेड लावूनि भ्रतारासी। मायालोभासी सांडविलें।८८। तुझी कथा ऐकिलि यानें। माझे बाळकाचे गेले प्राण। आमुचे घरीं पूर्वींपासून। नाहीं धाराजिणें हरिनाम।८९।ऐसें बोलोनि उद्धत। कीर्तनरंगीं ठेविलें प्रेत। तेणें श्रोतयांचें दुखवोनि चित्त। राहिले निवांत अवघेची।१९०। जैसें भणंग पक्वान्न जेवित। त्यांत मृत्तिका पडली अकस्मात। तेविं कीर्तनामाजी आणितां प्रेत।रंग समस्त वितुळला९१ लोक ह्मणती ऐक कासारिणी।तूं येथें कुणप आलीस घेऊनी।परी याजपाशीं नाहीं अमृतसंजीविनी।मग लेंकरूं उठवूनी देईल।९२।ऐसें बोलतां सकळ लोकां। प्रतिउत्तर देतसे तुका। हरिनामापरिस सुधारस फिका। जो इंद्रादिकां दुर्लभ।९३। विश्वास न मानी तुमचा जीव। तरी तत्काळ पहा याचा अनुभव। ऐसें ह्मणोनि भक्त वैष्णवें। अपूर्व लाघव दाविलें।९४। श्रोतयांसि ह्मणे तयेक्षणीं।विठ्ठल विठ्ठल वदा वाणी।हेचि अमृतसंजीविनी।विकल्प मनीं न धरावा ९५ऐसें बोलतां सभा रंगणीं। विठ्ठलनामाच्या उठल्या ध्वनी। नादें ब्रह्म सुसावोनी। गगन भरोनी कोंदलें।९६। मंडप तिवाशा गालिचे।विठ्ठलनाम गर्जती वाचे। खडे पाषाण ते भूमीचे। बोलती वाचे हरिनाम।९७। दिंड्या पताका टाळांतूनी। विठ्ठलनामाच्या निघती ध्वनी। तेव्हां सुरवर आकाशीं येऊनी।तो आनंद नयनीं पाहती॥९८॥ जाणते नेणते थोर लहान। विठ्ठल ह्मणती प्रेमेंकरून। भाळे भोळे सकळ जन। प्रेमेंकरून डुल्लती।९९।एकमेकांकडे लोक पहाती। तंव अवघ्या दिसती विठ्ठलमूर्ती। याती वर्ण वेगळे न दिसती। अद्भुत स्थिती बाणली२००तंव अद्भुत नवल वर्तलें तेथ। प्रेत उठोनि बैसलें सावचित्त। मग सावध ह्मणती लोक समस्त। देखतां विस्मित ते जाहले।१।सन्निध होती त्याची माता। संतोष वाटला तिचिया चित्ता। ह्मणे मी अज्ञानपणें नेणतां। निंदिलें वृथा तुकयासी।२। कौतुक देखिलें सकळ जनीं। विश्वास बैसला त्यांचे मनीं। ह्मणती अमृतसंजीविनी। हरिनामाहूनी असेना।३।पुढिले अध्यायीं कथा सुंदर। वदविता श्रीरुक्मिणीवर। महीपतीसि देवोन अभयकर। बसविलें अंतर निजकृपें॥ ४ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविक भक्त। अष्टचत्वारिंशाध्याय रसाळ हा ॥ २०५॥ अध्याय ४८॥ ओंव्या २०५॥



श्रीगणेशाय नमः। श्रीलक्ष्मीरमणाय नमः। जय कृपासागरा जगजेठी। तूं सगुणस्वरूप दाखविसी दृष्टीं। जैं भक्त पडतां महासंकटीं। तैं तूं न टळसी आपेंआप।१। सर्वांगीं दिससी घनसांवळा। दिव्यपीतांबर कांसे पिंवळा। पिंवळेंचि पदक वक्षस्थळा। त्यावरी रत्नकळा फांकती।२।पिंवळाचि मुकुट कनकदीप्ती। देखोनि लज्जित निशापती। पिंवळीं कुंडलें कानीं तळपती। मकराकृती सुढाळ॥ ३॥ पिंवळीच कंठी मोहनमाळ। मध्यें कौस्तुभ दिसे सुढाळ। दृष्टीस देखोनि सर्वकाळ। भक्त प्रेमळ भुलले पैं॥४॥पिंवळा केशरी तिलक ललाटीं। पिंवळीच अंगीं चंदनउटी। पिंवळयाच वळीनें क्षुद्रघंटी। देखतांचि दृष्टीं तल्लीन॥५॥ पिंवळेंचि वस्त्र पांघरूण। पिंवळेंच हातीं वीरकंकण। पिंवळेंच अंगीं भूषण। तुजकारण शोभती॥६॥पिंवळाच चरणीं वांकी तोडर। पिंवळे शोभती वाळे नूपुर। नखींचें तेज सर्वकाळ। भक्त प्रेमळ देखती।७।ब्रह्मादिकां दुर्लभ चरण। ते प्राप्त जाहले दासांकारण। जींहीं प्रपंचाचें टाकूनि भान। वर्णिती सद्गुण पैं तुझे।८।मानापमान नाठवूनि चित्तीं। जींहीं सांडिली लौकिकस्थिती। जे निर्लज्ज होऊनि कीर्तनीं गाती। ते तुज श्रीपती पावले।९। जींहीं दुराशा टाकोनि मनें। जे सारखेंच लेखिती शेण सोनें। स्वर्गसुखासि विटले मनें। ते तुजकारणें आवडती।१०।जींहीं देहलोभ सांडोनि तत्वतां। चहूं मुक्तींस हाणीतल्या लाता।ऐसी जयांची निरपेक्षता। ते रुक्मिणीकांता तुज पावले।११।संकटीं पडतां भक्तप्रेमळ। सगुणरूप धरिसी तत्काळ। न विचारिसी काळवेळ। तूं दीनदयाळा पावसी॥१२॥कलियुगीं बौद्धावतार जाण। ऐसें बोलती शास्त्रपुराणें। त्यांचें एक वेळ मोडोनि वचन। होसी सगुण स्वइच्छें।१३।जैसी सांजवेळ न होतां पाहें। वत्स मातेसि पिऊं जाय। परि मोहें पान्हा घालिताहे। निष्ठुर न होय सर्वथा१४ तेविं अवताराची न येतां वेळ। तुज बोलाविती भक्तप्रेमळ। तयांची मानोनि कळवळ। बोलसी तत्काळ गुजगोष्टी१५ ऐसे एकनिष्ठ वैष्णवजन। जींहीं तुज केलें आपुले स्वाधीन। त्यांचे वर्णावया सद्गुण। उल्हास मनें धरियेला।१६।दीनदयाळ वनमाळी। मी तंव अघटित घेतली आळी। तूं निजांगें बैसोनि हृदयकमळीं। स्वानंद नवाळी बोलविसी।१७। जैसा पिता पुत्राचा धरूनि हस्त। खडे मांडोनि ओनामा शिकवीत। तेविं बुद्धीचा चालक तूं रुक्मिणीकांत। लिहविसी ग्रंथ मजहातीं।१८।गोवर्धन उचलोनि आपण। गोपाळां दिधलें थोरपण। तेविं माझी करूनि बुझावण। ग्रंथरचना तूं करविसी१९मी मंदबुद्धि पंढरीनाथा। धड निरोप तोही नये सांगतां। त्यामुखें वदविशी भक्तकथा।हें आश्चर्य चित्ता वाटतें२०कवणे वेळे वर्तलें कायी। तें म्यां सर्वथा देखिलें नाहीं। लिहितां अटक पडली कांहीं। तूं देसी लवलाहीं आठवण॥ २१॥ तूं बुद्धिप्रकाशक शार्ङ्गधर। सर्व हा भार घातला तुजवर। हरोनि मीपणाचा बडिवार। ग्रंथ साचार वदविसी२२मागील अध्यायाचे अंतीं। विठ्ठलस्मरण करितां प्रीतीं। कुणप उठविलें सत्वरगतीं। तें कथानक श्रोतीं परिसिलें२३तो चमत्कार अद्भुत देखोन।बहुत सन्मान करिती जन।मग तुकोबा अरण्यांत जाऊन।करी चिंतन श्रीहरीचें२४दांभिक लौकिक प्रतिष्ठा।मानी जैसी श्वानविष्ठा। टाकोनियां सन्मानचेष्टा।करी एकनिष्ठ हरिभजन २५

जेणें लोक पिशाच ह्मणती।कुटिल स्वमुखें निंदा करिती।तैसीच धरूनि विदेहस्थिती।जाऊनि एकांतीं बैसत२६कोणी
निजमुखें करिती स्तवन।तेथून सत्वर जावें पळून।आपणास कोणी ठेवितील दूषण।तेथें करीत श्रवण बैसावें २७कोणी
पक्वान्नें करूनि नाना।आदर करूनि देतील भोजना।तरी तें सर्वथा न ये मना।विवेकें रसना आंवरित२८कोणीदुर्बळ अ-
नाथदीन।त्यानें वाढिलें भाजीचें पान।तें देहनिर्वाहापुरतेंजाण।आवडीकरून भक्षावें२९बह्वाळाच्या वना-आंत।दिव-
सा एकांतीं जाऊन बैसत।रात्रीं येऊन ग्रामांत।कीर्तन करीत सप्रेमें३०दोनमास असोनि आपुले नगरीं।गेले नाहींत नि-
जमंदिरीं।कांता गार्‍हाणें घरोघरीं।लोकाचारीं देतसे३१ऐका साजणी एक मात।माझें कर्म बहु विपरीत।घरधनी न क-
रीच आपुली परत।बैसतो अरण्यांत जाऊनी३२टाकूनियां धंदा उदिम।कीर्तनीं नाचतो निजप्रेमें।हृदयांत आठवी पुरु-
षोत्तम।भजनीं नेम धरियेला३३दोन महिने गांवांत असोनी।भ्रतार आला नाहीं सदनीं।मी चिंतातुर होऊनि मनीं।झु-
रतें साजणी रात्रदिवस३४कधीं भेटेल तुह्माप्रती।तयासि सांगा धर्मनीती।कीं तुवां टाकिलें कांतेप्रती।जाहली फजिती
जनांत॥३५॥ऐसी शेजारिणीलागोनी। नित्य सांगतसे गार्‍हाणीं। तों एके दिवशीं उदकालागूनी। घागर घेऊनी चा-
लिली॥३६॥ कुंभांत भरूनि जीवन। परतोनि घरा येतां जाण। तों तुकोबा करूनियां स्नान। देवालयांत चालिले।३७।
कांता लवलाहें जाऊनियां जवळी। पदरीं धरिला तत्काळीं।मर्यादा टाकूनि ते वेळीं। काय बोलिली तें ऐका।३८।तूं नि-
र्लज्ज निःशंक होऊनि मनीं। कीर्तनीं नाचतोसि निशिदिनीं। घरासि न येसी परतोनी। मी तळमळ मनीं करीतसें॥३९॥
लोकलज्जा धरूनि पाहीं। घरीं मोकलितें नित्य धायी। त्वां आमुची वाट केली कायी। सांग लवलाहीं ये समयीं॥४०॥
यावरी कांतेप्रती बोले वचन। तुझिया मायबापें केलें लग्न। त्यांहीं आह्मांसि दिधलें नाहीं पाहोन। तरी वस्त्र अन्न पुरवूं
कासया।४१। कांता ह्मणे मग तुकयासी। पाहिलें तरी सांग कवणासी। येरू ह्मणे आमचे मायबापांसी। निरविलें तुज-
सी निजकांते।४२। यावरी कांता उत्तर बोलिली। तुझीं मायबापें मरोनि गेलीं। तीं कोठें धुंडोनि पाहूं वहिलीं। जीं मस-
णीं जाळिलीं निजकरें४३यावरी निजभक्त बोले काय। पांडुरंग पिता माझा होय। विश्वजननी रुक्मिणी माय। अचळ
अक्षय सर्वदा।४४। सृष्टीस होतां जैं उत्पत्ती। तेणें काळें ते न वाढती। विश्वास येतां प्रळयगती। ते नाश न पावती सर्वथा
॥४५॥घटांत आकाश बिंबतां जाण। त्यास नाहीं दुजेपण। नाश होतां घटाकारण। तें गेलें फुटोन ह्मणों नये॥४६॥तेविं
आमुचीं बापमाय। त्यांचे चित्तीं आठवीं पाय। तीं अन्नवस्त्र पुरवितील पाहें। न धरीं संशय सर्वथा॥ ४७॥ मग कांता
ह्मणे प्राणेश्वरा। आतां चलावें निजमंदिरा। तेणें पिशुनांसि होईल उजगरा। संसार बरा तुमचेनी॥४८॥ मी श्रीहरीचे
पाय आठवीन। तेच पुरवितील वस्त्र अन्न। परी तुह्मीं उगेच घरीं बसून। श्रीहरिभजन करावें॥४९॥ भ्रतार ह्मणे ते अ-
वसरीं। माझें वचन ऐकसील जरी। तरी भाक देयीं वो निजकरीं। येतों मंदिरीं आतांचि॥ ५०॥ कांतेनें वचन देऊनि
देखा। घरासि आणिला वैष्णव तुका। आश्चर्य वाटलें गांवींच्या लोकां। बोलती एकमेकां परस्परें॥५१॥ चार दिव-



स वैराग्य दाखवून। आपुली प्रतिष्ठा वाढविली त्यान। पुनः मायेसि वरपडा होऊन। प्रपंचीं जाऊन पडियेला॥५२॥
एक ह्मणती जाहलें यथास्थित। प्रपंचींच साधे परमार्थ। तुकयानें आपंगिलें निजकांतेतें। तेणेंच समाधान चित्त आ-
मुचें॥५३॥ जाऊनि बैसतां गिरिकपाटीं। कोण चढला देखा वैकुंठीं। यापरी लोक बोलती गोष्टी। विवेक पोटीं न क-
रितां।५४। कोणी निंदिती कोणी स्तविती। उत्तम अथवा अधम ह्मणती। परी तुकयासि नाहीं हर्ष खंती। आनंद चि-
त्तीं सर्वदा॥ ५५॥ ते दिवशीं होती हरिदिनी। तुकोबा बैसोनि वृंदावनीं। कांतेसि सन्निध बोलावूनी। ह्मणे ऐकें श्रवणीं
हरिकथा॥५६॥ मग सन्मुख बैसवोनि तिजला। निजकरीं टाळ वीणा घेतला। अकरा अभंग उपदेश केला। तो सज्जनीं
ऐकिला असेल।५७त्याचाचि अन्वय आणोनि ध्यानीं। मीही बोलतों आर्ष वाणी। जैसें देखावया वासरमणी। दीपक
उजळोनि दाखविती।५८। नातरी व्हावया अमृतसिद्धि। तेथें वैद्य देती आ[illegible]ळी औषधी। तेविं तुकयाचे अभंगाची अ-
र्थसिद्धी। मी मंदबुद्धी सांगतों। ५९। गंगेंत वोहळ मिळालीया पाहें। त्यासि अपवित्र सर्वथा ह्मणों नये। कीं परिसासि
लोह भेटलिया काय। काळिमा न राहे तयासी।६०। त्यांत संतांचें अनुपम वचन। अर्थ पाहतां सखोल गहन। परि किं-
चित वदेन त्यांचे कृपेनें। तें परिसा सज्जन निजप्रीतीं॥६१॥ मग कांतेसि सन्मुख बैसवून। ह्मणे नरदेह हें क्षेत्र जाण। येथें
येऊनि केलिया हरिस्मरण। तरी पिकेल दारुण निजभाग्यें॥ ६२॥ जींहीं परमार्थ न केला दृढ। त्यांची केवळ जाहली
बूड। वाहूनि प्रपंच काबाड।झिजविलें हाड व्यर्थची।६३। ऐंशी टक्के दिवाणदारा। देणें लागतो याचा सारा। नाहीं तरी
काळोजी हुद्देदार। दाखवी दरारा बहुसाल॥६४॥ त्याचेंचि भय पावोनि मनीं। दहा टक्के टाकिले झाडोनि। बाकी स-
त्तर त्या लागूनी। ऐवज नयनीं दिसेना।६५।दहा टक्के ह्मणशील कोणते। ते आशंका वाटेल निजचित्तें। तरी दश इंद्रियें
क्षेत्रांत। झडलीं प्रस्तुत जाण वो॥६६॥ अपशब्द आणि रसाळ स्तुती। सारिखेंचि वाटे श्रवणाप्रती। नेत्रांस सोनें आणि
माती। सारिखेंचि दिसती माझिया।६७। साखर आणि वृंदावन। जिव्हेसि नाहीं अधिकउणें। पुंगळवेल आणि बकुळ-
सुमन। घ्राणासि लागती सारिखीं।६८। इंद्रियांत मन चंचळ पाहीं। तें स्थिरावलें विठ्ठलपायीं। तैसींच कर्मइंद्रियें देहीं।
कर्तेपण नाहीं तयांसी ६९ ज्याचा विषय न कळे त्यासी। ते सहजचि दहा झाडिलीं ऐसीं। बाकी सत्तर उरले तयांसी। ऐ-
वज मजपाशीं सांगतों।७०।पांडुरंग चौधरी जाण येथींचा। ह्मणे झाडा करावा सकळ बाकीचा। हृदय चोहटा बैसोनि
साचा।बोलतो वाचा तें ऐका७१ह्मणतो हांडें भांडें गुरें शेखीं।देऊनि झाडीं आपुली बाकी।हेचि बुद्धी करूनियां निकी।
होईं निष्कलंकी ह्मणतसें॥७२॥ हें यासी न देतां निजकांते। तरी लपावयासि स्थळ कोणतें। याविण स्थळ न दिसे रितें।
विवेक चित्तें विचारीं।७३। हा विश्वव्यापक जगजेठी। याजभेणें पळतां उठाउठी। दुजा कोणी घालील पाठी। न दिसे
दृष्टीं सर्वथा॥७४॥ काय ते गव्हाण हिंडावें किती। पाठ घेतली याच्या दूतीं। आधींच कुळवाडी केली नसती। तरी कां
मजप्रती गांजिता।७५।तरी बेबाक होऊनि सर्वोपरी। येथेंचि असावें निरंतरीं। स्वइच्छा देईल जे मजूरी। ते भक्षूं निज-

करीं सकळिक ।७६। यानें नागवून सोडिले किती । ते संसारा आले नाहींत माग़ुती । या भेणेंकरूनि पदरीं स्तुती । कोणी
न घेतीं सर्वथा।७७।एकासि सद्गुरु घेऊनि जमान । केलें तयाचें निसंतान । तया हांसती सकळ जन।मानाभिमान टाकि-
तां।७८। कसवटींत सरले जे निकटीं । तयांसि घालितो वैकुंठीं । माझीही तैसीच घेऊनि पाठी । केली साठी जिवाची७९
ऐसें पहिलें कळलें असतां । जाणोनि जाहलों मी नेणता । जेणें निर्दयपणें गांजिलें बहुतां । त्याचे हातां सांपडलों ॥ ८० ॥
आतां विवेक करूनि मानसीं । उदास होई संसारासी । नाश आरंभिला माझिया जिवासी । मग अनुमानासी कासया
॥८१॥जरूर दिसोन आलें सहज । मग कां नावडे सांग तुज । उपास रोकडे येती मज । आतां कासया लाज धरावी ८२
देहाचा लोभ धरिलिया पाहें । तुझिया जिवाचें व्हावें काय । मज तुज तूट कदां न होय । ते ऐक सोय सांगेन ॥८३॥ मु-
लांलेंकुरांसमवेत पाहीं । उभयतां नांदों एकेच ठायीं । हा विचार ऐकसीं जरी निश्चयीं । तरी वियोग नाहीं सर्वथा ८४
ह्मणसील लेंकुरें खातील काय । हे चिंता सर्वथा करूं नये । तयांचें अन्न वस्त्र तयांस पाहे । लिहिलें आहे विधीनें ॥ ८५ ॥
तूं आपुला गळा घेई उगवूनी । चुकवीं चौऱ्यायशी लक्ष योनी । गर्भवासाची चुकवीं जांचणी । तो विचार कानीं ऐकें
वो।८६।मी तुज टाकूनि पळतों निराळा । कीं ऐवज देखोनि बांधिती गळा। तुझे हातींचे सुजाईम मजला। होऊनि घा-
ला घालितील ।८७। धर्मदूतांचा अवघड मार । देखोनि जीव कांपे थरथर । आतां माझी चाड असली जर ।तरी व्हावें
उदार सर्वस्वें॥८८॥काय करूं या निजसंचिता । साठी पडिलीसे जीवविता । हे माझी करणी नव्हे सर्वथा। पंढरीनाथा
आवडलें।८९।मोकळा भिकारी जाहलों पाहें। तरी पुढां पाठ घेतलीच आहे। त्यासि सर्वथा करुणा नये। नागवण होय
निश्चयेंसी।९०। भोंपळा घेऊनि प्यावें जीवन। जेवावया देवें लाविलें पान। तरी तुवां चित्त वाड करून। सर्वस्व दान क-
रावें।९१।ऐसा निश्चय करिशील चित्तीं। तरी भले लोक तुजला मानवती। उभय लोकीं वाढेल कीर्ती।तो विचार चित्तीं
ऐकें वो।९२।बरग पडोनि मेलीं गुरें। भांडीं नेलीं ह्मणावीं चोरें । नाहीं जाहलीं मज लेंकुरें । ऐसें कठिण अंतर करावें।९३।
सर्वस्वें निरसोनियां आस । कठीण करीं निजमानस । उपमा समान वज्र जैसें। धैर्य चित्तास करावें।९४।किंचित प्रपंचीं
विषयसुख । हें निःशेष थुंकोनि टाकितां देख । परमानंदधणी पावसी अनेक । जे सनकादिक इच्छिती ॥९५॥ हे सायास
चुकती बहु मोठे।भवबंधन आपोआप तुटे।अंतीं सोहळे होती गोमटे।वैकुंठ वाटे चालतां९६तें सुख होईल उभयतांसी।
सोहळे करितील देवऋषी । जडित विमानीं सन्मानेसीं । विष्णुदूत आपणासी बैसविती ॥९७॥ संत महंत सिद्ध किन्नर ।
हे पुढें येतील सामोरे । विमानीं बैसवोनि सादर । नामघोष गजर करितील ।९८। मायबाप पडतां दृष्टीं । चरणीं घालूनि
दृढमिठी। तेथें करून सुखगोष्टी।असों निकटीं त्यापाशीं ९९ तें सर्व सुखाचें पुरवावया कोड।ह्मणूनि चित्त करी तूं वाड।
टाकूनि प्रपंचकाबाड । परमार्थ दृढ साधावा ।१००। तूं देव पाहावया सायास करीं । नाशिवंताची आस न धरीं । प्रातः-
काळीं उठोनि झडकरी । स्नान करीं अनुतापें।१।सोमवार द्वादशी पर्वकाळ। उदयीक पावला उत्तम काळ।तरी मन शुद्ध

करूनि उतावेळ । ब्राह्मण सकळ पाचारीं ।२।संकल्प करूनि विधियुक्तीं। गृह लुटवावें द्विजांहातीं। पुढें मिळेल कैंशारी-
तीं । हा उद्वेग चित्तीं करूं नको।३। मायबाप सखा जिवलग । आपुले शिरीं आहे पांडुरंग। तो सर्व पुरवील निजांगें ।आ-
पदा मग होऊं नेदी ॥४॥ तो सन्निध आहे मजजवळी । परी दूर सांगतों पाल्हाळीं । तूं देखोनि काय जाहलीस आंधळी ।
चिन्हें सकळीं न जाणसीं ।५। तो पांडुरंग हृदयीं प्रकटला देख । ह्मणूनि नावडे विषयसुख । मनाच्या ओढी खुंटल्या अ-
नेक।सगुणस्वरूप न्याहाळितां६कनक कांता पदार्थ दोन।जनासि आवडती जीवाहून। आह्मांसि ते पाषाणाहूनि हीन।
काय तूं खूण न जाणसीं ।७। भूक तहान निश्चयें राहिलीं जाण । सज्जन सोयरे आणि हें वन । वृक्षवल्ली आह्मांकारण । दि-
से समान सारिखेंची।८।तो जवळी आहे रुक्मिणीपती।ह्मणोनि सुखदुःखें समान वाटती । तोडोनि विषयांची नैश्चल्य-
भ्रांती । भजन प्रीतीं करावें।९।हें सद्गुरूचे कृपेंकरून । देवें बोलविलें मजकारण । त्वांही सादर केलें श्रवण। तरी तैसेंच व-
र्तून दावीं कां।११०।प्रसन्न होऊनि रुक्मिणीवर । माझा तंव केला अंगीकार । आतां सर्वथा आणिक विचार । नव्हे सा-
चार निश्चित।११।या वचनीं धरून विश्वास । बळकट होईं घालूनि कांस । आतांच जाहला तुज उपदेश।कांहीं सायास
न करितां।१२।करूनि सडा संमार्जन । शृंगारीं तुळसीवृंदावन । अतीतब्राह्मणांचें पूजन।सद्भावें जाण करावें १३काया
वाचा मनोभावेंसी । होईं वैष्णवांची अनन्यदासी । विठ्ठलनाम निजप्रेमेंसीं । अहर्निशीं घेईं कां।१४। हा स्त्रीउपदेशाचा
आशय जाण । सहज आलें अनुसंधान । उपलंबिलें असे संपूर्ण ।संतसज्जन जाणती।१५।एकादश अभंग मुख्य देखा।नि-
जमुखें बोलिला वैष्णव तुका । त्याजवर ओंवीबद्ध टीका।अर्थ नेटका निर्वाळिला।१६।ते मुळींचीं पदें पाहूनि निगुती ।
अर्थ ध्यानासि आणिजे संतीं । तेणेंप्रमाणें जे कां वर्तती।ते तरती निश्चिती सभाग्य।१७।निजकांतेचें करूनि मिष । केला
साधकांसि उपदेश।जेणें तुटोनि भवबंधपाश।शांतिसुख अनायासें ये हातां१८।जैसी चातकाची देखोनि आर्ती।गगनीं
उगवला रोहिणीपती।परी प्रकाश न वंची कोणाप्रती । समान स्थिती तयाची।१९।तेविं कांतेसि उपदेश केला।परी अर्थ
नाहीं कोणासी वंचिला । जो स्वभावें घेईल त्याजला । असे ठेला स्वतःसिद्ध।१२०।तें वचन कानीं पडतां निश्चित । तेणें
द्रवलें तिचें चित्त।मग अनुसंधानीं लाऊनि प्रीत।श्रवण करीत निजप्रेमें।२१। आणिक श्रीहरीचे वर्णूनि गुण । चार प्रहर
केलें जागरण।मग उदयासि येतां अरुण।रुक्मिणीरमण ओंवाळिला ।२२।जाऊनि इंद्रायणीच्या तीरीं।स्नान सारिलें ते
अवसरीं।कांता येऊनियां मंदिरीं।द्विजांसि झडकरी पाचारिलें ।२३। चित्त शुद्ध करूनि निश्चिती।संकल्प केला निज-
प्रीतीं । कांहीं कामना न धरून चित्तीं । मंदिर त्यांहातीं लुटविलें २४ भांडीं गुरें वस्त्र अन्न । सकळ घेऊनि गेले ब्राह्मण।
तेथें जटिलसंन्यासी येऊन । मंदिर धुंडोन पाहतसे।२५।तंव कांहींच न दिसे निश्चितीं।मग चुलीची राख घेतली प्रीतीं।
सर्वांगासि चर्चिली विभूती । देखूनि हांसती सकळिक ॥२६॥ह्मणे चवदा रत्नें वांटिते वेळे । शंकरा लाधलें हालाहल।
तेविं निर्दैवाचें प्राक्तन केवळ । दिसोन आलें आपणासी॥ २७ ॥ इतुकें करूनि ते अवसरीं । तुकोबा चालिले बाहेरी ।

तिळमात्र अन्न नाहीं घरीं। ह्मणोनि कांता उद्विग्न ॥२८॥कालची एकादशी निराहार। क्षुधेनें पीडिती मुलेंलेंकुरें। ह्म-
णूनि अंतरीं चिंतातुर। ह्मणे कैसा विचार करावा २९तंव गांवची महारीण होती दीन। तिचें रूप धरी माता रुक्मिण।
तुकयाचें सत्व पाहावयाकारण। वस्त्र मागोन पाहावें।१३०। ऐसें ह्मणोनि विश्वजननी।बाहेर निघाली तये क्षणीं।तुक-
यातें देखोनि नयनीं। काय बोलिली तयासी।३१। घर लुटविलें विप्रांहातीं।मी तुमच्या घरची महारीण राबती।कांहीं
उरलें असेल तयाहातीं।तरी द्यावें मजप्रती मायबापा।३२।तों वाडियामागून परसा आंत।लुगडें वाळतां देखिलें तेथ।
तें तुकयानें ओढोनि त्वरित।तिजकारणें दीधलें।३३। गांवींचे लोक देखोनि मनीं। विस्मित जाहले तये क्षणीं। ह्मणती
यानें विपरीत केली करणी। घातलें पाणी संसारा।३४।त्यांनीं घरीं सांगतां मात।ऐकोनि कांता क्रोधभरित।ह्मणे प्राक्तन
माझें विपरीत। जाहली लोकांत अपकीर्ती।३५।वाड्यांत मिळाल्या शेजारिणी।त्यांजवळ देतसे गाऱ्हाणीं। दुःख कोणा
सांगों साजणी।तळमळ मनीं करीतसे।३६।दोन मासपर्यंत जाण।भ्रतारें त्यागिलें मजकारण।परतोनि घरीं नयेच जाण।
गांवांत असोन साजणी३७नानापरीचे त्रिविध जन।मागें पुढें बोलती न्यून।ह्मणून काल समजावून।घरासि घेऊन मी
आलें३८रात्रीं मांडोनि कीर्तन।त्यानें मज घातलें मोहन।नानापरीचे दृष्टांत देऊन।बोलिला वचन तें ऐका ३९मायबाप
विठ्ठलरखुमायी।त्यांचे पाय आठवीत जायीं।तीं अन्नवस्त्र देतील समयीं।सायास कांहीं न करितां १४०त्यांचा विश्वास
म्यां धरून।सकळ लुटविलें धनधान्य।भांडीं गुरें सर्व देऊन।उदास होऊन बैसलें।४१।नेसतें वस्त्र आणिलें धुवोनी।तें पर-
सांत वाळूं घातलें साजणी।तें महारिणीस दिधलें ओढोनी।तुह्मीं तो नयनीं देखिलें।४२।मी करूनियां मोलमजूरी।लेंकुरें
पोशीत होतें बरी।त्याचें तों बाहेर बरव्यापरीं।चाले परभारीं प्रारब्धें।४३।यापरी काळ कडे लागतां।म्यां वायांचि बुद्धि
केली वृथा।घरासि आणिलें प्राणनाथा।मुकलें अर्था सर्वस्वें४४पाय आठवितां निशिदिनीं।अन्नवस्त्र देतील मजलागो-
नी।ऐसा विश्वास त्यांचे वचनीं।आपुले मनीं जाणिला४५चिंतन केलें दोनतीन वेळ।तों दरिद्र पातलें तत्काळ।लेंकुरें क-
रिती तळमळ।अन्न न मिळे ह्मणोनी४६ऐसा पायांनीं केला घात।ह्मणोनि संतप्त जाहलें चित्त।तरी आतां मी जाऊन देउ-
ळांत। करीन विपरीत तें ऐका।४७।घरधनी पायांची वर्णिती थोरी। ते फोडोनि टाकीन ये अवसरीं। मग पाषाण घेऊन
मस्तकावरी। चालिली लवकरी देउळांत।४८।ह्मणे रुक्मिणीपतीचे चरण। ब्रह्मादिक करिती ज्यांचें ध्यान। नारदादि
करिती ज्यांचें गायन। वर्णिती थोरपण जयांचें।४९।त्यावरी पाषाण घालोनि पाहें। मी फोडूनि टाकीन लवलाहें। ऐसा
चित्तीं करून निश्चय। महाद्वारासी जातसे।१५०।हें जाणोनि पंढरीनाथ। देउळामाजी थरथरां कांपत। तो भक्तवत्सल
दीननाथ। लीला दावीत दासांसी।५१। जेणें मत्स्यरूप धरूनी। शंखासुर मारिला समुद्रजीवनीं। तो तुकयाचे स्त्रियेस
भिऊनी। चक्रपाणी कांपत।५२। जो कूर्म होऊनि घननीळ। पाठीवरी धरी मंदराचळ। तो सप्रेमभक्तीचें देखोनि बळ।
कांपे चळचळ निजांगें।५३।जो वराहरूप धरून श्रीहरी। वसुधा धरिली दाढेवरी।तो लीलानाटकी वैकुंठविहारी। नि-



जभक्तांसी भीतसे।५४। जो बळेंच प्रगटोनि स्तंभाआंत। हिरण्यकशिपु विदारिला दैत्य। तो निजभक्तांचें भय बहुत।
वागवी चित्तांत आपुल्या।५५।दानाभिमानें फुगला बळी। मग त्रिविक्रम होऊनि वनमाळी। तयासि घातलें पाताळीं।
तो कांपत देउळीं थरथरां।५६।जो रेणुकेच्या उदरासि येऊनी। निःक्षत्रिय केली सकळ अवनी। तो निजभक्तासि चक्र-
पाणी। भयभीत होऊनी कांपत।५७।सकळ सुरवरांसि जिंकिलें जेणें।तो दशकंठ निवटिला रघुनंदनें। ऐसा प्रतापी भक्त-
भूषण। भयें करून कांपत।५८।कंस चाणूर महादैत्य। स्वहस्तें निवटी श्रीकृष्णनाथ। तो तुक्याचे कांतेचें भय बहुत। असे
वागवीत मानसीं।५९।घर्में डवडवला चक्रपाणी। देखोनि विस्मित जाहली रुक्मिणी। ह्मणे कवण चिंता उपजली मनीं।
मजलागोनि सांगावें।१६०।यावरी ह्मणे चक्रपाणी। आजि चिंता उद्भवली आमुचे मनीं। जे तुकयाची कांता सक्रोध
होऊनी। पाषाण घेऊनी येतसे।६१।निजकरें फोडावे आमुचे चरण। ऐसा निश्चय केला तिणें। यासि उपाय करावा क-
वण। हें मजलागोन कळेना।६२।रुक्मिणी ह्मणे संकट काय। येथोनि पळावें लवलाहें। एवढी वेळ चुकवूनि पाहें। पर-
तोनि यावें मागुती।६३।यावरी ह्मणे जगज्जीवन। आपुले तें स्वाधीन नाहीं जाण। मी जाहलों असे भक्तांआधीन। त्यांचे
आज्ञेनें वर्ततसें।६४।बाळक पदर धरितां पाहें। पित्यासि बळें सोडवितां नये। तो निजमोहें थोकलाचि राहे। तैसेंच आ-
ह्मां हें जाहलें।६५। मिलिंद निजमुखें कोरी काष्ठासी। परी कमळिणी सर्वथा न फोडवे त्यासी। अडकला राहे निजमो-
हेंसी। गति तैसी मज जाहली।६६। आपण गेलिया येथून। तरी तुकयाचें मोडेल मन। मूर्ति न देखतां सगुण। तो देईल
प्राण आपुला।६७।त्याचें मनोगत राखिलें जरी। तरी कांता येऊनि ये अवसरीं। पाषाण घालील पायांवरी। हे चिंता अं-
तरीं मज वाटे।६८।इकडे पत्नी सक्रोध मानसीं। सत्वर येतसे देउळासी। देखोनि तुका पुसे तिजसी। कोठें जातेसी मज
सांग।६९।येरी तयासि उत्तर देत। तुझा पिता रुक्मिणीकांत। तेणेंचि माझा केला घात। पाय चित्तांत आठवितां १७०
तुवां उपदेशिलें मजकारण।आठवीत जाई त्याचे चरण।मग पुरवील वस्त्र अन्न। तें म्यां वचन ऐकिलें ७१ विश्वासें वचन
धरून चित्तीं। घर लुटविलें विप्रांहातीं। मुलें लेंकुरें अनाथ दिसती। अन्नवस्त्र त्यांप्रती मिळेना।७२।ऐसा पायांनीं केला
घात। ह्मणोनि चालिलें देउळांत।त्यावरी पाषाण घालोनि त्वरित।फोडीन निश्चित ये समयीं।७३।ऐसी पत्नीची ऐकोनि
मात। मोहें द्रवलें तुकयाचें चित्त। ह्मणे इणें तो मांडिलें विपरीत। ह्मणोनि अश्रुपात लोटले।७४।तरी इजसवेंचि जाऊ-
नि आपण।नम्र बोलावें विनीत वचन।कीं क्रोध नावरेच तुजकारण।तरी मजवरी पाषाण घालीं कां ७५ ऐसें विचारून
चित्तीं। मागूनि चालिले सत्वरगतीं। हें जाणोनियां वैकुंठपती। चिंता करिती मानसीं।७६।पहिले थरथरां होते कांपत।
ते उगेच राहिले निवांत। देखोनि रुक्मिणी झाली विस्मित। मग विनोदें पुसत देवासी।७७।ह्मणे देवाधिदेवा पंढरीना-
था। मघां चळचळां कांपत होतां। आतां आश्रय जाहला कोणता। हा संशय चित्ता वाटतसे७८कोण तुमचा प्राणस-
खा। जिवलग पातला पाठीराखा। ह्मणोनियां वैकुंठनायका। निवांत राहिलां ये समयीं।७९।मग ह्मणे दीनदयाळ।आ-

णिकचि अरिष्ट ओढवलें सबळ।तुकया आपुला भक्तप्रेमळ।आली कळवळ माझीतया।१८०।कांताफोडील आपुले चरण।ह्मणोनिमागें येतसेजाण।कीं पत्नीसऐसें बोलावेंवचन।घालीं पाषाणमजवरी।८१।आपुलेंदु:खह्मणोनि विसरून। त्याचीचचिंतावाटतेदारुण।यासउपायकरावाकवण।हेंमजकारणकळेना।८२।तिची तो आहे विरोधभक्ती। विवेकविचारनाहींचित्तीं।अवचितमारीलतुकयाप्रती।हे चिंतामजप्रतीवाटते।८३।पाषाणघालील पायांवरी।मगत्याचेपायदुखलेजरी।कीर्तनींनाचेलकैशापरी।हे चिंता अंतरीं मजवाटे।८४।यावरी रुक्मिणी उत्तर देत।तुह्मीं कां उद्विग्न जाहलेति व्यर्थ।जयावरीआपुलीदया किंचित।कळिकाळ कांपत तयासी।८५।जयासि प्रसन्न जाहलाभास्कर।त्यावरी सर्वथा न पडेअंधार।कीं वस्तीसमिळालियाक्षीरसागर।तो सर्वथाक्षुधातुरराहेना।८६। साधलिया अमृतसंजीविनी।तरी रोग न बाधी त्यालागोनी।तेविं तुमचेंनामतुकयाच्या वदनीं।असतां चक्रपाणीभय काय।८७।ऐसें बोलतां जगन्माता।तों आली अवचित तुकयाचीकांता।पाषाण ठेविला मस्तकावरुता।देखिलें येतां महाद्वारीं।८८।ती अंतरीं प्रवेशतां सत्वर। रुक्मिणीनें आड केलें द्वार।तुकयासि ठेविलेंबाहेर।काय निमित्त पैं तेव्हां।८९।कांता संतापोनिअंतरीं।पाषाण घालील तयावरी।ह्मणूनि येतांचि भीतरीं।तुकयासि बाहेरी कोंडिलें।१९०।यापरी चुकवोनि आघात।भक्तांसि रक्षी पंढरीनाथ। जैसें बाळक अग्नीसी धरूं जात।तंव माता रक्षिततयासी।९१।तुकयाचे चित्तीं ऐसा भाव।जे कांतेसि पावला पंढरीराव। मजवरी रुसला रुक्मिणीनावो।ह्मणऊनि द्वार आड केलें।९२।कीर्तनीं जागला घनसांवळा। आतां विश्रांति घ्यावया निद्रितजाहला।मी जाऊन तेथें करीन गलबला।कोंडिलेंसजला यासाठीं।९३।आतां परतोन जावें घरा।सर्वथा न करावा उजगरा।किंवा रागआला रुक्मिणीवरा।आड केलें द्वारा यासाठीं।९४।कीं कांतेची भक्ति विशेष जाण।तीस आपंगी जगज्जीवन।मजबाहेर दिधलेंटाकून।ह्मणोनि रुदन करीतसे।९५।असो ते समयीं तिचें प्रेम वर्णितां। तरी ग्रंथीं विशेष वाढेल कथा।पायांवरी पाषाण उचलोनि घालितां।तंव रुक्मिणीमाता बोलिली।९६।काय अपराध केला जगज्जीवनें। ह्मणोनि फोडितेसि याचे चरण।तें तूं सांगहो मजकारण।संकोच मनीं न धरितां।९७।येरी ह्मणेऐक वो माये।एक दोन वेळां आठविले पाय।तों मंदिरीं न दिसे एकहीठाय।संसारसोय मोडिली।९८।घरीं नाहीं वस्त्रअन्न।मुलेंलेंकुरें करिती रुदन।ह्मणोनि संतापलें मन।फोडितें चरण यासाठीं।९९।पायांनीं केला आमुचा घात।ह्मणोनि संतप्त जाहलें चित्त। ऐसी ऐकोनि तियेची मात।रुक्मिणी बोलत तियेसी।२००। जें संसारांत पडेल उणें।मी निजांगें पुरवीन तुजकारणें। मग साडी चोळी मूठभर होन।तिजकारणें दीधले।१।हें देतां पावली समाधान।मग पाषाण दिधला टाकून।तेव्हां वस्त्र करोनि परिधान।धरिलेचरणरुक्मिणीचे।२।मूठभरहोनघेऊनहातीं।बाहेरआलीसत्वरगतीं।पुढिलेअध्यायींरसउत्पत्ती।तरीसादर श्रोतींपरिसावें ३ हृदयीं बैसोनिरुक्मिणीकांत।स्वयेंचिवदवीतसेयथार्थ।महीपतीत्याचामुद्रांकित।शरणागतदासांचा ४ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ।प्रेमळ ऐका भाविकभक्त।एकोनपंचाशत्तमाध्यायरसाळ हा२०५



श्रीगणेशाय नमः। श्रीप्रलंबासुरमर्दनाय नमः।जयजय कृपासागरा चक्रपाणी।भवभंजना सायुज्यदानी। मज कृपादृष्टीं विलोकूनी। कर्मापासूनी सोडवावें॥१॥आशापाश तोडूनि श्रीपती। करीं निरपेक्ष उदासवृत्ती। तुझे भजनीं लागे प्रीती। ऐसें श्रीपती करावें ॥ २ ॥ कामक्रोधादि मद मत्सर। देहीं उठती अनिवार। तूं कृपा करिसी जैं शार्ङ्गधर। शुद्ध अंतर तैं होय॥३॥लौकिक प्रतिष्ठा मानाभिमान। हें पुढें ओढवलें महाविघ्न। तेथेंचि लाऊनियां मन। तुझें चिंतन घडेना ॥४॥ ऐसे अवगुण असोनि अंतरीं। मी तुझा ह्मणवितों लोकाचारीं। हाचि अभिमान धरूनि श्रीहरी। मज उद्धरीं पतितासी ॥५॥चंचळ मन हें अनिवार। तुझे चरणीं असावें स्थिर।हेंचि इच्छितों निरंतर। जाणसी अंतर पांडुरंगा॥६॥ हस्त इच्छिती तुझें अर्चन। षोडशोपचारें करावें पूजन। त्यांचें करावें समाधान। मनोरथ पूर्ण करावे ॥७॥ समदृष्टीनें चराचरभूतीं। तुजचि पाहावें वैकुंठपती। विकल्प द्वेष हे नये चित्तीं। ऐसें श्रीपती करावें ॥८॥ चरणांचें सार्थक तरीच जाण। तुझे यात्रेस करावें गमन।नृत्य करावें निर्लज्ज होऊन। देहाभिमान टाकोनी ॥९॥ तुझे निजभक्त रुक्मिणीपती। त्यांचीच मुखें वर्णावी कीर्ती। हे इच्छा धरूनि चित्तीं। विनवितों तुजप्रती दयाळा।१०।हे म्यां अघटित घेतली आळ। तूं निरूपण वदवीं रसाळ। जें श्रवणीं पडतांचि तत्काळ। श्रोते प्रेमळ संतोषती ॥११॥मागील अध्यायीं शेवटीं कथा। देउळीं गेली तुकयाची कांता। प्रसन्न होऊनि रुक्मिणीमाता। बोलिली अवचितां निजभाग्यें १२ साडी चोळी मुष्टीभरी होन। देतांचि वाटलें समाधान। ह्मणे पाषाणमूर्ति बोलिली वचन। हें अघटित देखोन विस्मित ॥ १३ ॥ परिधान करूनि दिव्यांबर। रुक्मिणीस केला नमस्कार । बाहेर येतांचि सत्वर।कळलें साचार तुकयासी ॥ १४ ॥ मग कांतेसि काय वचन बोलत । तुवां उतावेळ केलें चित्त। तेणें अंतरलें परमार्थहित। ऐक ते मात निजकर्णीं ॥ १५॥ उभेंचि शेत मोडितां जाण। पुढें राशीस येतसे उणेंपण। कीं दुधावरील साय भक्षितां जाण। मग नवनीत कोठोन येईल।१६।नातरी ऊंस उभाचि चोखिला सारा। तरी कोठून लाभेल शर्करा। ऐसा विवेक करूनि अंतरा। होन द्विजवरां वांटावे ॥१७॥ कांचमण्याचा त्याग करितां। मुक्ताफळ येतसे हाता। तरी धीर धरून निजचित्ता।उदास आतां त्वां व्हावें।१८।खद्योत त्यागितां मनांतूनी। गृहासि येतसे वासरमणी। कीं थिल्लर टाकितां डावलोनी। पयोब्धि येऊनी भेटेल।१९।गुंजाहार न लेतां वाडेंकोडें।तरी अनर्घ्य रत्नें लाधती पुढें। कीं न धरितां औषधाची चाड। तरी सुधारस गोड लाधेल कीं॥२०॥ न करितां सिद्धीचा आदरू। तरी निजभाग्यें भेटतो कल्पतरू। दुर्जनत्यागें भेटती सद्गुरू। तरी कां अव्हेरू करावा २१ तेविं ऋद्धि सिद्धि संपत्ति धन। त्यांस त्यागितां मनांतून। तरी तूं पावसी सायुज्यसदन। जें इच्छिती सुरगण मानसीं।२२।ऐसीं ऐकोनि दृष्टांतवचनें।कांता पावली समाधान।तत्काळ विप्र बोलावून। वांटिले होन तयांसि।२३। सांडोनियां लोभममता। हृदयीं आठवी श्रीपंढरीनाथा। पुढें वर्तली अपूर्व कथा। ते सावधनता ऐकावी ॥२४॥ तुकयाची प्रशंसा जाहली फार। मानूं लागले थोर थोर। कीं याजसवें जेवितो रुक्मिणीवर। लोक परस्पर बोलती।२५। हें चिंचवडीं दे-

वांसि कळतां जाण । असह्य जाहलें त्यांजकारण।ह्मणती आह्मीं प्रतिष्ठित ब्राह्मण।गणपति प्रसन्न केला कीं॥२६॥आ-
णि तुकया जातीचा शूद्र वाणी । त्यासवें जेवितो चक्रपाणी । हे तंव अघटित दिसे करणी । आली दिसोनी यथार्थ२७
तरी तयासि बोलावूनि येथ । दृष्टीस पाहावी कांहीं प्रचित।ऐसें विचारिती चित्तांत। तो कळला वृत्तांत तुकयासी।२८।
ह्मणे चिंचवडींचे थोर ब्राह्मण । त्यांनीं केलें आपुलें स्मरण । तरी आतां तेथवरी जाऊन। घ्यावें दर्शन तयांचें।२९।ऐसी
कल्पना धरोनि पोटीं । सत्वर निघाला उठाउठीं । मग मूषकवहनाची घेऊन भेटी । बैसले निकटीं देवांचे ॥ ३० ॥ तुक-
यासि देखोनियां त्यांनीं । ह्मणती इच्छित होतों जें मनीं। तें अनायासें आलें घडोनी । चमत्कार नयनीं पाहावा।३१।तों
सहज पातला मध्यान्हकाळ। पंक्तीस बैसले ब्राह्मण सकळ । तुकयासि पात्र ते वेळ। वाढिलें तत्काळ तयांनीं ॥३२॥ दे-
वांसि ह्मणे वैष्णवभक्त। आमुचा सांगाती पंढरीनाथ। तो भोजनासि येईल येथ। तरी आणिक पात्र मांडावें ॥ ३३ ॥
आणखी तुह्मींही प्रार्थूनि गजवदनासी । येथें आणावें भोजनासी । वचन ऐकतांच मानसीं । आश्चर्य देवांसी वाटलें
।३४। ह्मणती हें तों अघटित जाहलें । आमुचे मंत्र आह्मांस फळले। मग देव्हारां जाऊन ते वेळे । करकमळ जोडिलें त-
यासी।३५।नानापरीची केली स्तुती । परी भोजनासि नयेच गणपती।काय करावा शास्त्रयुक्ती । एक सद्भक्ती नसतां-
ची।३६।बाह्यात्कारें केलें पूजन । अंतरीं विकल्पें भरलें मन। तरी कोणतेंही दैवत नव्हे प्रसन्न । दुश्चितमन असतां पैं।३७।
गजेंद्रासि पावला वैकुंठपती। तो काय जाणें शास्त्रव्युत्पत्ती। गोपी उद्धरल्या नेणों किती। सप्रेमभक्ती देखोनी ॥३८॥
विधियुक्त याज्ञिक कर्मठपण । त्यांसि अंतरले श्रीकृष्णचरण । ऋषिपत्न्यांनीं नेलें अन्न। त्यांसि जगज्जीवन भेटला३९
भोळे भाविक भक्त प्रेमळ । त्यांस्वाधीन जाहला दीनदयाळ।हुंबरी घालितांच गोपाळ । तें ऐकें घननीळ निजप्रीतीं४०
असो आतां बोलून काय फार। हें वर्म जाणती वैष्णववीर। जींहीं शुद्ध करूनि अंतर। शार्ङ्गधर वश केला।४१।मग ब्रा-
ह्मण ह्मणती तुकयासी । पाषाणमूर्ति जेवील कैसी । नैवेद्य दाखवितां गजवदनासी । सुवास तयासी जातसे।४२।यावरी
बोले वैष्णववीर। मूर्तीमाजी नाहीं विघ्नहर। तुह्मांसि संशय असला जर। तरी ऐका विचार निजकर्णीं।४३।समुद्रजी-
वनीं करितां स्नान। एक भक्त बुडत होता जाण। त्यानें एकदंताचें केलें स्तवन। करीं धांवगें ह्मणोनी ॥ ४४ ॥ तयासि
काढावया त्वरित । विनायक गेले असती तेथ। याची पाहाणें असेल प्रचित । तरी बैसावें क्षणभरी ॥४५॥ देव्हारीं नस-
तां गजवदनासी । तुह्मीं नैवेद्य दाखविला कवणासी ।तुका मात बोलतां ऐसी । आश्चर्य देवांसी वाटलें ॥ ४६ ॥ तों एक
मुहूर्त लोटतांचि त्यांनीं । कौतुक देखिलें आपुले नयनीं । गणपतीची मूर्ति सिंहासनीं । उदकें भरूनी निथळत ॥४७॥
पीतांबर पिळोनि पाहातां जाण । तों क्षार लागलें समुद्रजीवन । हा चमत्कार अद्भुत गहन । आश्चर्य देखोन करिताती
॥४८॥तुकयासि पुसती द्विजवर । किमर्थ भिजलासे पीतांबर । यावरी ह्मणे वैष्णववीर । आले विघ्नहर ये ठायीं॥४९॥
निजभक्त बुडतां जाण । त्यानें सत्वर केलें धांवणें । ऐलतीरीं बैसवोनि त्याकारण । गजवदन आले कीं ॥५०॥ ऐकोनि



तुकयाची वचनोक्ती । देव निजमनीं आश्चर्य करिती । ह्मणे विष्णुभक्तांची अद्भुत स्थिती । आपणाप्रती नेणवे ॥५१॥
पुढती ब्राह्मण काय बोलत । समुद्रासि गेले पार्वतीसुत । हें तुह्मास कैसें जाहलें श्रुत । साक्षात प्रचीत दाखविली ॥५२॥
परस्परें आपण उत्तर देती । यानें आराधिला रुक्मिणीपती । सकळ दैवतांची गती । आलीसे हातीं यास्तव॥५३॥प्रसन्न
होतां सूर्यनारायण । काय एक न दिसे त्याकारण । कां कल्पतरूचें देखतां उद्यान । कामना अपूर्ण न राहे ॥ ५४ ॥ जेणें
क्षीरसागरीं रहिवास केला । तरी क्षुधेतृषेचा उद्वेग गेला । नातरी अमृतसिद्धी येतां साधकांला । औषधी त्याजला न
लागती ।५५। तेविं कृपा करितां पंढरीनाथें । तयासि वोळंगती सकळ दैवतें । जेविं विलोकितां रोहिणीपतीतें । उडुगण
समस्त दीसती ।५६। यापरी परस्परें बोलती देव । ऐकोनि ह्मणे तुका वैष्णव । भोजनासि आले पंढरीराव । अंतरीं सद्भाव
देखोनी ।५७। तुह्मीं प्रार्थोनी गजवदन । तयासि साक्षात जेववा अन्न । ऐसें ऐकोनियां वचन । देवीं मौन धरियेलें ॥५८॥
मग तुकयासि ह्मणती द्विजवर । तुह्मीं प्रार्थिला रुक्मिणीवर ।त्याचे पंक्तीस विघ्नहर । जेववा साचार निजप्रीतीं ।५९।
अवश्य ह्मणोनि तये क्षणीं। पात्र वाढिलें त्यांजकडोनी । मग गणपतीच्या सन्निध येवोनी । कर जोडोनि विनवीत ६०
जयजयाजि लंबोदरा । चौदा विद्यांच्या सागरा । तुझें तांडव देखोनी उमावरा। हर्ष अंतरा न समाये।६१।तुझी होतांचि
कृपादृष्टी । विघ्नें पळती उठाउठी । सप्रेमें अनुभव घेतां दिठीं । तुटे फांसोटी भवबंधा ॥६२॥ आतां प्रार्थितों तुजकारण ।
नैवेद्य भक्षावा प्रीतीकरून । वचन ऐकोनि गजवदन । करिती भोजन तेधवां ॥ ६३ ॥ एके पात्रीं रुक्मिणीरमण ।
त्यासन्निध गजवदन । तुकयाचे भक्तीस्तव जाण । बैसले येऊन उभयतां ॥ ६४ ॥ परी कोणासि न दिसती नयनीं ।
अन्न तर सरलें पात्रांवरूनी । हा चमत्कार देखोनि मनीं । आश्चर्य वाटलें देवांसी ।६५। ह्मणती आह्मीं लंबोदर उपा-
सिला । परि साक्षात नाहीं कधीं जेविला । तुकयानें अघटित दाविली लीला । नवल सकळां वाटलें॥६६॥गणपति जे-
विला अपूर्व काय । हें अघटित सर्वथा ह्मणों नये । साक्षात आले पंढरीराय । जे दुर्लभ होय साधकां॥ ६७॥पयोब्धीच
जाहलिया स्वाधीन । मग सरितांचा पाड कोण।तेविं कृपा करितां रुक्मिणीरमण । दैवतें संपूर्ण तुष्टती ६८कामधेनु गृ-
हासि येतां पाहीं । तेथें सहजचि येती इतर गायी । कीं रोहिणीवराच्या दर्शनें पाहीं । नक्षत्रें कायीं न दिसती कीं॥६९॥
वज्रासनीं बैसोन नेटीं । योगियांसि ज्याची दुर्लभ भेटी । तो सगुण साकार जगजेठी । पावतो संकटीं निजदासां।७०।
यापरी ब्राह्मण स्तविती देवा । ह्मणती वैष्णवभक्त प्रेमळ तुका । स्वाधीन केलें वैकुंठनायका। जो ब्रह्मादिकां दुर्लभ७१
मग करशुद्धि तांबूल घेऊन । तेथें मांडिलें हरिकीर्तन । एकरात्र तेथें राहून । चालिले पुसोन निजग्रामा ।७२।गजवद-
नासि करोनि नमन । देवांस विनवी कर जोडून । आतां देहूस जावयाकारण । आज्ञा देणें मजलागीं।७३।यावरी ब्रा-
ह्मण बोलती वचन । पुन्हां मागुती यावें दर्शन । निरोप येईल तुह्मांकारण । तैं करावें गमन निजप्रीतीं।७४।अवश्य ह्म-
णोनि वैष्णवभक्त । तेथोनि चालिले अतित्वरित । ग्रामासमीप येतां निश्चित । तों एक माळी अकस्मात पातला॥७५॥

तुकयासि करोनि साष्टांगनमन । कर जोडोनि बोले वचन । मळियांत गुऱ्हाळ लागलें जाण। तेथवरी आगमन करावें ।७६। सद्भाव देखोनि त्याचे अंतरीं । अवश्य ह्मणती ते अवसरीं । तुकयासि येतां मळियाभीतरी । माळी अंतरीं संतोषला।७७।बैसावयासि ते वेळे । घडी करोनि टाकिलें चवाळें । ह्मणे धन्य भाग्य माझें सुफळ । जे दीनदयाळ पातले ७८ इक्षुदंड मोडोनि लवडसवडीं । काढोनि दिधलीं मध्यकांडीं । परी तुकयास तेथींची गोडी । न रुचे चोखडी सर्वथा७९ जेणें ब्रह्मरस सेविला प्रीतीं । त्यास इतर सर्वथा नावडती । जेविं दिनकराचे लागतां संगतीं । दीपक दिसती तेजहीन ।८०। जो सिद्धांतज्ञानी मग्न आहे । तो पाखंड कर्णीं ऐकेल काय । कामधेनुऐसी जोडल्या गाय । मग अजापालन कासया ।८१। तेविं नामसुधेची लागतां गोडी । इतरांसि येत अनावडी । आणोन इक्षुदंडाची चोखडी । चवी धडपुडी जाणेना ॥८२॥ परी माळियाचा सद्भाव देखोन । तेथें बैसले निवांत क्षण । त्यानें सोज्वळ पात्र उटोन । रस आणोन पाजिला ॥८३॥ जातेसमयीं तुकयाप्रती । माळी कर जोडूनि करी विनंती । कीं ऊंस न्यावे लेंकरांप्रती । मंदिरासी आपुल्या॥८४॥आकळून इक्षुदंड एके ठायीं । बांधोन दिधले ते समयीं । ते खांद्यावरी घेऊन लवलाहीं । तेथोन सत्वरीं चालिले ॥ ८५॥ देहूस प्रवेशतां तुकयास । गांवींचीं लेंकुरें मागती ऊंस । तेव्हां आपुलें परावें न दिसे त्यास । देतसे ऊंस त्यांप्रती ।८६। जैसा घरधनी आणि तस्कर । दीपकासि सारिखे निरंतर । कीं दरिद्री आणि नृपवर । यांसी प्रकाशे दिनकर सारिखा ॥ ८७ ॥ कीं चूतवृक्ष आणि बाभूळ जाण । गंगातीरीं उगवलीं दोघेंजण । परी तिजला अधिक उणें । न वाटे जाण सर्वथा८८नातरी उर्वीवरी जाण । वसती मुंगी आणि वारण । सम विषम न वाटे तिजलागून । लेखी समान दोहींतें ॥ ८९ ॥ कीं असंख्य जळचरें जाण । पयोब्धींत वसती रात्रदिन । आपपर हा भाव जाण । न लेखीच सर्वथा ॥ ९० ॥ नातरी पौर्णिमेचा निशापती । प्रकाशे सारिखा सर्वांप्रती । तैसाच भाव तुकयाचा निश्चितीं । अद्भुतस्थिती निरुपम ॥ ९१ ॥ इक्षुदंड न्यावे आपुले घरीं । हा आठव सर्वथा नव्हे अंतरीं । सर्वांभूतीं मैत्री बरी । दृष्टी चराचरीं सारिखी ॥ ९२ ॥ मुलांस वांटितां ऊंस देख । गृहासि न्यावया उरला एक । हें कांतेनें देखिलें सम्यक । देखोन संताप वाटला ॥ ९३ ॥ तंव गृहासि येऊनि वैष्णववीर । कांतेसि बोले मधुरोत्तर । तिनें ऊंस घेऊन सत्वर । मग कठिण उत्तर बोलिली ॥ ९४ ॥ इक्षुदंड वांटिले सर्वांस । ते काय पावले तुमचे वडिलांस । घरीं लेंकुरें दिसती उदास । नाहीं खावयास ह्मणोनी ॥ ९५ ॥ मग सक्रोध होऊनि अंतरीं । इक्षुदंड मारिला पाठीवरी । दोन कांडीं पडलीं भूमीवरी । एक निजकरीं राहिलें ॥ ९६ ॥ निजशांति अंतरीं धरोनि देखा । कांतेसि बोले वैष्णव तुका । वांटा जाहलासे नेटका । साह्य निजसखा पांडुरंग ।९७। तुझा तुजपाशीं राहिला भाग । खालीं दोन पडले सवेग । ते लेंकुरें आणि आह्मीं सांग । घेऊं वांटून निजप्रीतीं।९८।ऐसी निजांगें देखोनि शांती । आश्चर्य वाटलें कांतेप्रती । ह्मणे हा निर्लज्ज जाहला निश्चिती । प्रपंचभ्रांती टाकोनी ।९९। आतां मायाभ्रांती टाकोनि पाही । यासि वायां छळोनि कायी । मानापमान न कळे



कांहीं । संसारसोयी टाकिली ।१००। ऐसा विवेक करोनि चित्तीं । निवांत राहिली निजकांता । तुकयाची शांति वर्णितां । तुळणेसि दृष्टांता नयेकीं १ मग विवेक करोनियां महीपती । पुरातनभक्तांच्या धुंडोनियां स्थिती । तंव एकादशस्कंधीं उद्धवाप्रती । कदर्युकथा सांगितली ।२।तें एकनाथाचे टीकेवरूनी । परिसिलें असेल संतसज्जनीं । तैसीच तुकयाची शांति नयनीं । दृष्टांतीं दिसोनि येतसे ।३। हे उपमा देतां जाण । मजला दिसोन येतसे गौण । जे कदर्यूनें घेतलें संन्यासग्रहण । मग केलें छळण तयाचें ॥ ४ ॥ आणि गृहस्थाश्रमीं असतां वैष्णवभक्त । मानापमान सारिखे मानित । निजकांतेनें मारितां त्वरित । परि क्रोध अणुमात्र नयेची ।५।ह्मणोनि उपमा द्यावयासि पाहीं । दृष्टांत न पुरे कवणेठायीं । जैसा क्षीरसागराचे तुळणेस पाहीं । रत्नाकर काय येईल ।६। कीं सायुज्यतेचे साम्यतेसि निश्चिती । सलोकता समीपता न सरती । तुकयाची तैसी अद्भुत स्थिती । सभाग्य श्रोतीं जाणिजे॥७॥जेणें कलीमाजी वैकुंठीं सहज । देहासहित लाविला ध्वज । तो प्रेमळभक्त वैष्णवराज । जगद्गुरु सहज अवतरला।८।तयासि थोरथोर ह्मणतां पाहें । तरी वरिष्ठ सर्वथा ह्मणों नये । जैसा समुद्र गंभीर ह्मणतां पाहे । येरवीं काय नव्हे तो ।९।कीं वासरमणी सतेज आगळा । कासया ह्मणावें वेळोवेळां । नातरी शीतळ रोहिणीपतीला । ह्मणावयाला नलगेची ॥ ११० ॥ पृथ्वीची क्षमा वर्णितां पाहे । ते तेव्हांचि तैसी झाली काय । ना ते स्वभावेंचि तैसी आहे । तरी वानावें काय निजमुखें । ११ । तेविं विवेकशांतीचें भूषण । तुकयाचे अंगीं अक्षय लेणें । तें निजमुखें वर्णावें कोणें । पवित्रसज्ञान जाणती ।१२। कायिक वाचिक मानसिक पाहीं । त्याचे तपासि तुळणा नाहीं । असत्य वचन नयेचि कांहीं । प्राणांतही ओढवल्या।१३।हें वाचिक तप जाणा सुनिश्चिती। आतां मानसिकाची कैसी रीती । सारिखीच करुणा सर्वांभूतीं । विषम चित्तीं न धरितां ।१४। हा मानसतपाचा विचार । संक्षेपें बोलिलों साचार । आतां निजांगें करावा परोपकार । हें तप शारीर बोलिजे।१५।हे तीन यथापद्धतीनें । तुकयासि सर्वांगीं जाहले भूषण । चरणचाली निजप्रीतीनें । पंढरीगमन करावें ॥ १६ ॥ पंधरा दिवशीं हरिदिनीशीं । नेमें वारी धरिली ऐसी । एक दिवस राहोनि मंदिरासी । दुसरे दिवशीं निघावें ॥१७॥गात नाचत प्रेमभरित । पंढरीस सातवे दिवशीं जात । तीन रात्रि राहून तेथ । परतोनि येत गृहासी।१८।तीन वर्षें लोटतां ऐसीं । तों शीतज्वर लागला शरीरासी । मग शक्तिहीन देखोनि मानसीं । तळमळ चित्तासी करीतसे।१९।निजांगें न चालवे पाउलभरी । ह्मणे पंढरीची अंतरली वारी । कांहीं दोष होता पदरीं । तें विघ्न लौकरी ओढवलें ॥१२०॥ तों निजभक्त ते अवसरीं । पंढरीस चालले वारकरी । त्यांचे हातीं पत्र लिहून सत्वरीं । पंढरीसी पाठविलें।२१।त्या विसा अभंगांचा अन्वय निश्चिती । अभिप्राय परिसिला वैष्णवभक्तीं । जे श्रवण करितां निजप्रीतीं । प्रेम चित्तीं ठसावे ।२२। ध्यानीं आणोनि पांडुरंगमूर्ती । ह्मणे देवाधिदेवा रुक्मिणीपती । तुज विनवावया निश्चिती । भाग्य मजप्रती असेना ॥२३॥ परि धीट होऊनि आपुले मनीं । पत्र लिहितों आवडीकरूनी । पार नेणिजे श्रुतिपुराणीं । मी पामर कोठूनी वर्णूं शकें।२४।परी जैसी तैसी आर्षवाणी ।

अंगीकारावी चक्रपाणी । सलगी केली पायांलागोनी । मस्तक चरणीं ठेविला।२५।तूं सकळ सुरवरांवरिष्ठ देव। गोपि-
कापति सगुण माधव । उदारख्याती वर्णिती सर्व । सत्कीर्ति वैभव त्रिभुवनीं॥२६॥नाममात्रेंचि हृषीकेशी । नाशितो-
सि पातकांच्या राशी । कर्में जळतील आपैशीं । दारिद्र्य दृष्टीसीं दिसेना॥२७॥ सर्व सुखें विठाबाई । तुझ्या ओळंगती
पायीं । ऋद्धिसिद्धि अनुकूल ठायीं । चारी मुक्ती आंदण्या।२८।इंद्रादिकां जें दुर्लभ पद । तें निजदास पावती सप्रेम बो-
ध । कीर्तनीं नाचतां अति आल्हाद । टाळिया छंदें पीटितां।२९।विश्वीं जडजीव असती अनंत । त्यांचें जीवन तूं रुक्मि-
णीकांत । परी माझेंचि खोटें संचित । ह्मणोनि मूळ न पाठविशी ॥१३०॥ नाहीं निरोप पाठविला तुज । ह्मणोनि उदास
धरिलें मज । निष्ठुर होऊनियां सहज । मोकलिलें आज ये समयीं ॥३१॥ कीं, कांहीं जरूर पडला धंदा । ह्मणूनि विस-
रलासि मज गोविंदा । मी वाट पाहातसें मुकुंदा । दाखवीं पदा आपुल्या।३२।नातरी कांहीं द्यावें लागेल मजला । हेंचि
सांकडें पडलें तुजला । ह्मणोनि सांड करूनि विठ्ठला । मूळ मजला न पाठविशी ।३३। एवढा संकोच मानसीं । तरी पोरें
कासया व्यालासी । आह्मीं जाऊनि कोणापासीं । तोंड वासूनि मागावें । ३४ । तुवां दिधलें मोकलून । तरी कोण आहे
आह्मांकारण । कोण निवारी भागशीण । एका तुजविण पांडुरंगा ।३५। कोणाची वाट पाहूं सांग । कोण सखा आह्मां-
सि जिवलग । तुवांच मोकलिलें श्रीरंगा। तरी होईल भवभंग कैशिया रीतीं।३६।कोण माझे जीवींचें सांकडें। न सांगतां
जाणेल वाडेंकोडें । तुजविण निवारिता रोकडें । मागें पुढें दिसेना ।३७ देवाधिदेवा रुक्मिणीपती । काय माझी देखि-
ली अनीती । ह्मणोनि करुणा नये चित्तीं । मोकलिलें मजप्रती दयाळा॥३८॥तरी डोळेभेट द्यावी सत्वर। कांहीं वेंच न
घालीं तुजवर । अहर्निशीं नामउच्चार । वारंवार करीतसें ॥ ३९ ॥ जैसें चित्ताप्रमाणें मिळेल । तेंचि करोनि दाट पातळ ।
कडे लावूं आपुला काळ । सोडोनि तळमळ चित्ताची॥१४०॥परी तुजवरी भार न घालीं सर्वथा। हाचि निश्चय पंढरी-
नाथा । हृदयमंदिरीं तूं वसता । जाणसी तत्वतां अंतरींचें॥४१॥परी आह्मां लेंकुरांची जाती । भेटावयासि वाटे खंती ।
ह्मणोनियां रुक्मिणीपती । तळमळ चित्तीं करीतसें॥४२॥तुज तंव पोरें जाहलीं फार । त्यांची न साहे किरकिर । ह्मणो-
नि चित्तीं होऊनि निष्ठुर । माझा अव्हेर केला कीं।४३।आह्मीं करितों कलागती । तुजसीं भांडतों रुक्मिणीपती । ह्मणो-
नियां मजप्रती । सांडिलें निश्चिती दयाळा।४४।नातरी कुटुंब बहुत जाहलें पदरीं । कन्या गेलिया वराचे घरीं । मग नि-
ष्ठुरता धरोनि अंतरीं । आह्मांस सासुरीं टाकिलें ॥४५॥ कां व्यवहार करितां जगजेठी । व्यवसायांत आली तुटी । ह्म-
णोनि कृपणता धरोनि पोटीं । मज ये संकटीं टाकिलें ४६ नातरी पत बुडाली लोकाचारीं। रिणकरी येऊनि बैसले द्वारीं।
ह्मणोनि विसर अंतरीं । पडला श्रीहरी आमुचा४७ बरें मूळ पाठवावया न होय । तरी निरोप धाडितां वेंचे काय । कोरडें
यशही न घेववे । उपजलें भय मानसीं।४८।आह्मांसि टाकिलें जगजेठी । तरी जोड संचिली कोणासाठीं। एवढी करिसी
आटाआटी। लेंकुरें दृष्टीं नावडती।४९।फुकाचा शब्द वेंचितां जाण।यश न घेववे तुजकारण।तरी धन केलें बहुत जतन।

तें कोणाकारण देशील।१५०।पोटींच्या लेंकुरांसि नाहीं सुख। रुदन करितां लागली भूक। तरी जेणें होईल तुझा लौकि-
क। तैसा विवेक करावा ।५१। आमुचा तळतळाट घेशील जर । तरी तुझें कदापि न होय बरें । ऐसा मानसीं करूनि वि-
चार। घ्यावा समाचार दीनाचा ५२ नाहीं तरी भीड न धरितां अंतरीं । सर्वथा न ठेवीं कांहीं उरी । संतांसि सांगोनियां
सत्वरीं । तुझी जोड निर्धारीं बुडवीन।५३।नाम जपतों अहर्निशीं । तें कदापि मी न घें वाचेसी । जरी तूं होऊन उदासी।
आस बुडविसी दयाळा।५४। तूं एवढा समर्थ जगजेठी । पोटीं जन्मलों आह्मीं करंटीं । हेंच अपकीर्ती जाहली खोटी ।
फजीती मोठी जनांत।५५।येथें खावयास न मिळे अन्न । मूळही नयेच माहेरीहून । आतां वृथाच हें खोटें जीवन । का-
सया वागवण व्यर्थची।५६। पुढें आठव धरोनि रुक्मिणीपती । सांगोनि पाठवावें मजप्रती । रात्रदिवस करितों खंती ।
तरी निष्ठुर चित्तीं न व्हावें । ५७ । कंठीं धरोनियां प्राण । पायांपासीं पातलें मन । चित्त जाहलें असे उद्विग्न । तुझें दर्शन
घ्यावया।५८। सांडोनि प्रपंचआडाआडी । वाट पाहातों मी बराडी । तरी कृपादृष्टी करोनि गाढी । मूळ तांतडी पाठ-
वावें।५९।धीर न धरवे निमेषभर । कैंची बुद्धी माझी स्थिर । मनासि आवरोनि वारंवार । मति साचार शुद्ध नाहीं१६०
ऐसी दशा आली अंगा । तूं सर्व जाणसी पांडुरंगा । ह्मणोनियां रुक्मिणीरंगा । करीं भवभंगा माझिया ।६१। शरणागत
उपेक्षिला कोणी । हे मात ऐकिली नाहीं कर्णीं । ह्मणोनि पाय आठवोनि मनीं । मस्तक चरणीं ठेवितों ।६२। कधीं करि-
सील उचित । हें मज न कळेच निश्चित । परी समाधान मानोनि चित्तीं ।वर्णितों कीर्ती निशिदिनीं ६३हे विनंति ऐकोनि
शार्ङ्गधरा । मूळ पाठवीं मज सत्वरा । वारकरी परतोन येती घरा । तोंवरी वाट पाहातसें ।६४।मग सामोरा जाऊन त्व-
रित । सद्भावें घालीन दंडवत । पुसेन निरोपाची मात । कीं त्वां काय उचित पाठविलें । ६५ । महाद्वाराची पायरी नि-
श्चित । निवांत पडली आहे तेथ । तैसेंच माझें दंडवत । सांगतील संत तुजलागीं । ६६ । कीं दंडकाठी उभीच सोडितां ।
धरणीस पडे अवचितां । तैसेंच दंडवत पंढरीनाथा । सांगीतलें संतां तुजलागीं ।६७।नातरी जननीपासीं छंद घेत । बा-
ळक गडबडां जैसें लोळत । तैसेंच माझें दंडवत । सांगतील संत तुजलागीं।६८।मग वारकरियांसि ह्मणे तये क्षणीं । मा-
झी तुह्मीं करा विनवणी । कीं तुकयासि टाकूनि दिधलें वनीं । अन्याय देखोनी कोणता।६९।दाखवोनियां कींव काकु-
ळती । मात पुसावी तयाप्रती । कीं तुकयाचे अन्याय देखिले किती । ह्मणोनि त्याप्रती मोकलिलें।१७०।कां पंढरीस न
होय त्याचें येणें । विटेवरी न दिसती समचरण । मोकलूनि दिधलें कवण्यागुणें । त्याजकारणें पुसा कीं।७१। मग कृपा
करूनि पंढरीनाथ । मज बोलावील जरी तेथ । तरी मी धांवोन येईन त्वरित । साधुसंत भेटती । ७२ । त्रिविधताप आ-
हेत पोटीं । ते तत्काळ पळतील उठाउठी । जे गुणचरित्रें गातां कंठीं । हरुषें वाळुवंटीं नाचतां ॥ ७३ ॥ मातेपुढें रिघोन
जाण । प्रेमें करीन स्तनपान । परिसोनि माझें करुणावचन । उत्तर पाठवणें सत्वर ॥ ७४ ॥ कृपासागरा जगज्जीवना ।
गुणदोष कांहींच नाणीं मना । करोनि पापाचा उगाणा । दाखवीं चरणा मजलागीं ॥ ७५ ॥ माझीं दुरितें हरावया तु-

जसी । सामर्थ्य नाहीं हृषीकेशी । ह्मणोनि निष्ठुर होवोनि मानसीं । मज परदेशीं मोकलिलें ॥ ७६ ॥ कीर्ति ऐकोनि रुक्मिणीपती । रात्रदिवस वाटते खंती । मी साक्षात भेटतां निश्चिती । तैं लोभ जोडती अपार ।७७। तुझें चरित्र जगज्जीवना । वर्णावयास नाहीं रसना । प्रेमामृत चाखावया मना । उतावीळ वासना होतसे ॥७८ ॥ परी काळ साह्य नसतां देख । वायांच करीत बैसलों शोक । पुढें अधिकचि वाटे दुःख। कल्पना अनेक नावरती ।७९ । अंतरसाक्ष तूं श्रीहरी । आतां जाणशील तैसें करी । मी तळमळ टाकोनि सर्वोपरी । निश्चल अंतरीं राहिलों॥ १८० ॥परी अव्हेरून टाकितां सहज। तरी दांतकसाळी लागेल तुज । तूं मरोन गेलिया अधोक्षज । पोरवडें मज येईल कीं॥८१॥तरी आशीर्वाद देतों तुज आतां । सुखरूप नांदें रुक्मिणीकांता । कधीं तरी धरोनि ममता । आह्मां अनाथां आपंगीतसां।८२।जरी टाकोनियां दिधलें दूर । तरी निरोपें घेसी समाचार । मोंहें दाटलिया अंतर । दाखविसी माहेर मजलागीं ।८३। कृपासागरा जगजेठी । आतां ऐक माझी गोष्टी । कळेल तैसें करीं शेवटीं । पुढें वटवटी करीना ॥८४॥ जैसें येईल तुझिया चित्ता । तो जबाब पाठवीं पंढरीनाथा । मी बोललों जाणतां नेणतां । तो अपराध अनंता क्षमा करीं ॥८५॥ आधीं बालकासि दिधला लाड । तैसेंच पुरवीं माझें कोड । भेट देऊनि निजनिवाडें । भवबंधसांकडें निवारीं तूं॥ ८६ ॥ ऐसे करुणाशब्द लिहून प्रीतीं । पाठविले वारकऱ्यांचे हातीं । इतुका पाल्हाळ ऐकोनि श्रोतीं । आशंकित चित्तीं न व्हावें॥८७॥ ह्मणाल अनुसंधान टाकोनि दूरी । ग्रंथ लिहिला अति विस्तारीं । स्वानंद प्रेमाचिये भुलीं । आठवण मागली नयेची ॥ ८८ ॥ तरी तैसें नव्हे निश्चित ।वायांच वाढविला नाहीं ग्रंथ । पत्रिकेचे अभंग पाहोनि त्वरित । लिहिलें संकलित ये ठायीं॥८९॥तुकयाचें प्रेम वर्णितां प्रीतीं। सहसा न पुरे आपुली मती । जैसा चितान्यानें लिहिला गभस्ती । परी प्रकाश त्याप्रती काढवेना १९०कां सरिता भरोनि चालिली जरी । ते करील काय सागराची बरोबरी । नातरी दुधाळधेनु असली जरी । ते कामधेनूची सरी करीना ॥९१॥ पितळ लखलखित दिसे दुरून । तें काय होईल शुद्ध कांचन । कीं सुधारसाचें सामर्थ्य जाण । औषधीकारणें नये कीं ९२ कां मेघ गर्जना करितां नाचे मयूर । तैसेंच करूं पाहे लांडोर । परी दोहींची कळा भिन्न साचार । सज्ञान चतुर जाणती ॥९३॥ तेविं तुकयाचें प्रेम वर्णितां प्रीतीं । कुंठित जाहली सकळ मती । जैसा उदयासी येतां गभस्ती । उडुगणें लोपती त्यापुढें॥९४॥परी कस्तूरींत मृत्तिका पडतां भली ।तैशाच मोलें तुकयासि आली । तेविं संतस्तवनीं वैखरी भली । हे पावन जाहली अनायासें ।९५। असो मागील अनुसंधान । पंढरीस चालिले वैष्णवजन । त्यांजहातीं पत्र तुकयानें । दिधलें लिहून निजप्रीतीं।९६।मग तुकयासि भेटोनि सत्वरीं । पंढरीस चालिले वारकरी । पुढिले अध्यायीं भक्तचतुरीं । सप्रेमभरीं परिसिजे ।९७।जैसा कृपण मोजितां धन । अणुमात्र फांको नेदी मन । कां परनिंदा कर्णीं ऐकोन । कुटिल तल्लीन होतसे।९८।तैशापरी अवधान प्रीतीं । देतां तुष्टेल रुक्मिणीपती । श्रोतयांसि विनवी महीपती ।श्रवणीं सद्भक्ती असों या ९९ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ।ऐकतां तुष्टेल जगन्नाथ।प्रेमळ ऐका भाविकभक्त ।पंचाशत्तमाध्याय रसाळ हा २००अ० ५०



श्रीगणेशाय नमः । ।श्रीगोपालकृष्णाय नमः । जय जय दीनदयाळा हृषीकेशा । सप्रेमभक्तहृदयनिवासा । रुक्मिणीरंगा पंढरीशा । आदि सर्वेशा जगद्गुरू ।१। जय जय लीलानाटकी सूत्रधारिया । गुणनिधाना यादवराया । हृदयीं आठवूनि तुझिया पायां । समुद्रतनया तल्लीन ॥ २ ॥ जय अंतरसाक्षा चराचरवासा । आदिस्वरूपा निर्गुणवेषा । पुंडलीकवरदा परेशा । जय अविनाशा आत्मरूपा ॥ ३ ॥ जय करुणासागरा वैकुंठपती । विराटस्वरूप वामनमूर्ती । तुवां परशुधरें निर्वीर करूनि क्षिती । विप्रांप्रति स्थापिलें४जय असुरदमना धर्मस्थापका। त्रैलोक्यपति विधिजनका। प्रेमळभक्तांसि सज्जनसखा। तुजविण आणिक असेना।५।म्यां निजमुखें करावी तुझी स्तुती । तरी बुद्धीस नाहीं अखंड स्फूर्ती । अर्चन करावें निजप्रीतीं । तरी साहित्य निश्चिती घडेना । ६ । अनुतापें करावें तीर्थाटन । तरी शरीर जाहलें शक्तिहीन । नातरी सत्पात्रीं करावें दान । तरी पदरीं धन नसे कीं॥७॥व्रत करावें विधियुक्त । तरी क्षुधेनें प्राण व्याकुळ होत । वंदोनि नमावीं सर्वभूतें । तरी गुणदोष आठवती अंतरीं ॥८॥ शास्त्राभ्यास करूं श्रीपती । तरी आयुष्य नाहीं आपुले हातीं । अनुतापें टाकावी प्रपंचभ्रांती । तरी वैराग्य चित्तीं ठसेना॥९॥एकांतीं करावें तुझें ध्यान । तरी बुद्धीसि नावरे चंचळ मन । टाकूनि स्वरूपानुसंधान । रानोरान हिंडतसे॥१०॥नातरी करावें इंद्रियदमन । तरी रसना नव्हे स्वाधीन । ऐसा वेष्टिलों अवगुणेंकरून । जाणसी खूण अंतरींची॥ ११ ॥ ह्मणोनि प्रार्थना रुक्मिणीपती । जे निजभक्त तुजला प्रिय असती। त्यांची वर्णावया सद्गुणकीर्ती । सप्रेमस्फूर्ती असों दे॥१२॥काया वाचा मनेंकरून । हेंचि वांछितों प्रसाददान । याविरहित इच्छा नसे आन । तरी मनोरथ पूर्ण करावा ॥ १३ ॥ ऐका श्रोते हो सादर गोष्टी । मागिले अध्यायीं कथा गोमटी । तुकयानें सप्रेम होऊन पोटीं । पत्रिका शेवटीं पाठविली॥१४॥ ते चोविस अभंग घेऊनि सत्वरीं । पंढरीस चालिले वारकरी । मार्गीं जातां स्वानंदलहरी । कीर्तनगजरीं डुल्लत ॥ १५ ॥ ऐशा खेळीं मेळीं सत्वरा । वैष्णव आले पंढरपुरा । सकळ देखतांचि त्या अवसरा । लोटांगण एकसरां घातलें ॥ १६ ॥ एकमेकांस आलिंगन देती । आनंदाश्रु नेत्रीं वाहाती । आरती करून श्रीपती । ओंवाळिती प्रीतीनें ॥ १७ ॥ मग दिंड्या पताका घेऊन करीं । आले चंद्रभागेचे तीरीं । स्नान करूनि झडकरी । नित्यनेम सारिला ॥ १८ ॥ पुंडलीकासि भेटोनि जाण । मग केली क्षेत्रप्रदक्षिणा । टाळ मृदंग लाऊनि नाना । नृत्य करिती स्वानंदें ॥१९॥ असो यावरी वैष्णववीर । सत्वर पावले महाद्वार । पुढें देखोनि गरुडपार । लोटांगणें घालिती।२०।पत्र लिहिलें जें तुकयानें । तें आनंदें गाती वैष्णवजन । ऐसी करुणा ऐकूनि रुक्मिणीरमण । गहिवरें दाटले तेधवां२१सावकाश नाहीं तुकयासी।ह्मणोनि घाबरले हृषीकेशी।जैसें पाडस पडतां पारधीफांसीं।ते व्यथा हरिणीसी वाटत।२२।कीं बाळकासि देवी निघतां जाण।चैन न पडे मातेकारण । तेविं तुकयाचें पत्र ऐकून।जगज्जीवन घाबरले।२३जीवन जळदेवता शोषितां पाहीं । मत्स्य तळमळती आपुले ठायीं।तेविं तुकयाची करुणा ऐकून पाहीं।शेषशायी घाबरले२४कीं कृपणाचिया धनावर।पाळती लावी तस्कर।ऐको-

ष० नि दचके त्याचें अंतर।तेविं शार्ङ्गधर घाबरले२५मग रुक्मिणीसि ह्मणे वैकुंठपती।तुकयाची मज वाटते खंती।ह्मणोनि सद्गद होऊनि चित्तीं।अश्रु पडती नेत्रकमळीं२६वारकरी आले सकळिक।परी दृष्टीसी तुकया न दिसे एक।ह्मणोनि माझे जीवासि सुख। न वाटे देख सर्वथा।२७। आतां आपण जावें येथून।तरी यात्रेस आले बहुत जन। यासि विचार करावा कवण। तुजकारण पुसतसें।२८।यावरी रुक्मिणी बोले वचन। गरुडास मूळ पाठवावें जाण।तो तुकयास पाठीवर बैसवून। न लागतां क्षण आणील कीं।२९।हें सामर्थ्य असोन आपणासी।व्यर्थ कां चिंता करावी मानसीं।ऐकोनि ऐशिया वचनासी। हृषीकेशी संतोषले॥३०॥मग बोलावून विनतासुत। तयास सांगे पंढरीनाथ।तुवां देहूसि जाऊनि त्वरित। कार्य निश्चित साधावें॥३१॥मग स्वकरें लेखणी घेऊन।पत्र लिहीत जगज्जीवन।तें सादर करून मन।परिसा सज्जन भाविक हो।३२।ह्मणे वैकुंठ कैलास असे जोंवरी।चिरंजीव तुका असो तोंवरी।आणि अखंड मजला हृदयमंदिरीं।प्रेमभरें आठवो॥३३॥ऐसा आशीर्वाद होतां जाण।तेव्हां रुक्मिणीचें विस्मित मन। ह्मणे हें आपुले मुखींचें वचन। असत्य नोहे सर्वथा।३४।मौनेंचि हांसोन पंढरीनाथ।हृदयीं दाटलें प्रेमभरित।ह्मणे तुकया वाटे तुझी खंत।व्यथा विपरीत ऐकोनी३५कैशा रीतीं ह्मणसील जरी। तरी तुझेंचि चित्त साक्ष अंतरीं। निरोप सांगतां वारकरी।जाहलों अंतरीं कासावीस॥३६॥ भेटीसि धांवोनि यावें त्वरित। तरी यात्रा मिळाली आहे बहुत। ह्मणोनि गरुड पाठविला तेथ। तुजला निश्चित आणावया॥ ३७॥ तरी कांहीं संकोच न धरितां अंतरीं। बैसावें याचे पाठीवरी। क्षण न लागतां येऊनि पंढरीं। भेट दे सत्वरीं मजलागीं॥ ३८॥ ऐसें लिहूनि जगज्जीवन। गरुडाप्रति बोले वचन। माझे ठायीं तुकया जाणून। आणीं बैसवून पाठीवरी॥ ३९॥ अवश्य ह्मणोनि ते अवसरीं। माथा ठेविला चरणावरी। ह्मणे स्वामींनीं जयासि धरिलें पदरीं। तो आह्मां शिरीं वंद्य असे॥ ४०॥ मूर्खासि प्रसन्न सरस्वती। जाहल्या पंडित सन्मानिती। सरितेसि अंगीकारितां अपांपती। तरी वोत अव्हेरिती कासया॥४१॥ कीं बोरी बाभुळीस मैलागिरीनें। शेजार दिधला निजप्रीतीनें। तयांस कांटवण ह्मणावें कवणें। सुगंधा उणें नसेची॥ ४२॥ नातरी वाचस्पतीनें अंगीकार केला। मग सकळ सुरगण मानिती त्याला। कीं लोहदंड परिसासी लागला। मग मलिन त्याला न ह्मणावें॥ ४३॥ तेविं तुकयाचें शुद्ध देखोनि अंतर। तुह्मीं तुष्ट जाहलेती तयावर। मग आह्मांसि धरावया दूर। नाहीं अधिकार सर्वथा॥ ४४॥ ऐसें ह्मणोनि ते अवसरीं। मस्तक ठेविला चरणावरी। खगपति उठोनि झडकरी। पवनचालीं निघाला॥ ४५॥ तों इकडे तुका उतावीळ मनीं। निढळावरी ठेऊनि पाणी। वाट पहात निशिदिनीं। जेविं बाळक जननी न देखतां॥ ४६॥ नातरी चातकासि तृषा लागत। तो तोंड पसरूनि पाहे निरुत। कीं क्षुधा लागतां पोटांत। कांसवी विलोकित जननीसी॥ ४७॥ कीं कृपणाचें धन हारपतां सकळ। त्यासि रात्रदिवस लागतो चळ। नातरी मीनाचें तुटतां जळ। करी तळमळ जया रीतीं।४८। तेविं पंढरीच्या वियोगेंकरून। तुका तळमळी रात्रदिन। तों अकस्मात गरुड येऊन। उभा ठाकला सन्निध॥४९॥ ख-



गपतीस देखतां क्षणीं। नमस्कार घातला साष्टांग धरणीं। आलिंगिला प्रीती करूनी। प्रेमभावें तेधवां॥ ५०॥ मग वर्तमान पुसे निजप्रीतीं। सुखी आहे कीं रुक्मिणीपती। मज रात्रदिवस वाटे खंती। कधीं भेटती कळेना।५१।कां निष्ठुर होउनि जगज्जीवनें। कठीण केलें बहुत मन। मज परदेशीं दिधलें टाकून। होतसें उद्विग्न यासाठीं॥५२॥ वारकरी मिळाले असतील फार। माझा किमर्थ पडला विसर। कोणता दोष जाणोनि दुर्धर। हें मज निर्धार कळेना॥५३॥ऐकोनि तुकयाचें वचन। काय बोले विष्णुवाहन। तुझ्या उद्वेगें जगज्जीवन। अति विव्हळ मानसीं॥ ५४॥ जेविं तान्हयाच्या वियोगें जननी। कीं पाडसवियोगें जैशी हरिणी। कीं तृषाक्रांत जीवनावांचूनी। तळमळ मनीं करीतसे॥५५॥ तैशाच परी रुक्मिणीपती। रात्रदिवस तुज आठविती। मग मूळ पाठविलें मज निश्चिती। न्यावयाप्रती तुजलागीं॥५६॥ पत्र पाठविलें रुक्मिणीकांतें। तें तुकयासि वाचून दाविलें त्वरित। तें श्रवणीं पडतां अश्रुपात। नेत्र सजल जाहले कीं॥५७॥ तें पत्र हातीं घेऊनि सत्वर। मस्तकीं ठेवी वारंवार। मागुती हृदयीं धरूनि करें। आलिंगि निजप्रीतीं॥ ५८॥ जैसा सुकत्या झाडावरी सहज। अवचितां वोळला मेघराज। तेविं पत्र देतांचि अंडजराजें। तुकया संतोष वाटला। ५९। कीं उदया येतां वासरमणी। संतोष पावती जैशा कमळिणी। तेविं गरुडाचे आगमनीं। तुकयासि संतोष वाटला।६०। नातरी श्रीरामाची वाट पाहत। नंदिग्रामीं बैसला भरत। मग निरोप सांगतां अंजनीसुत। संतोष वाटत ज्या रीतीं॥६१॥ तेविं पत्र पाठविलें रुक्मिणीवरें। आणि निरोप सांगितला खगेश्वरें। तेणें तुकयाचें अंतर। जाहलें स्थिर ते समयीं।६२।मग गरुड बोले मधुरोत्तरीं। आतां बैसावें माझे पाठीवरी। निमेष न लागतां सत्वरीं। दावीन पंढरी तुजलागीं॥ ६३॥ रोगें शरीर जर्जर बहुत। चालावयासि नाहीं शक्त। मग कृपा करूनि पंढरीनाथ। पाठवी त्वरित मजलागीं।६४।तरी आतां ऊठ वेगेंसी। विलंब न करावा जावयासी। वचनें ऐकोनियां ऐसीं। उत्तर तयासी देतसे।६५।खगपतीस ह्मणे ऐक वचन। तूं आमचे स्वामींचें वहन। आणि आह्मां सेवकां पूज्यमान। होसि सुजाण विचक्षणा। ६६। पायींची वाहाण पायीं बरी। ते वागवूं नये मस्तकावरी। कीं वाळे नूपुरें बांधितां शिरीं। विचार चतुरीं करावा।६७। कीं महाद्वारींची पायरी पाहें। प्रतिमास्थानीं बैसेल काय। हडपी आवडता ह्मणोनि रायें। बैसवूं नये सिंहासनीं॥ ६८॥ ह्मणोनि विष्णुवाहना अवधारीं। मी सर्वथा न बैसें तुजवरी। तुझे भाग्याची वर्णितां थोरी। मज निर्धारीं कळेना।६९। जो पुराणपुरुष वैकुंठविहारी। अनंत ब्रह्मांडें जयाचे उदरीं। तया वागविशी पृष्ठीवरी। नवल अंतरीं वाटतसे॥७०॥ जो सुरां असुरां अजित जाण। तयासि जिंतोनि सांडला पण। शेखीं जाहलासि त्याचें वहन। सदा कर जोडूनि तिष्ठसी॥७१॥ ह्मणोनि आह्मां उपासकां जाण। सेवक स्वामी तत्समान। यालागीं पाठीवरी बैसोन। न घडे येणें सर्वथा॥ ७२॥ तरी आतां असो हेचि विज्ञप्ती। माझी अवस्था जाणोनि चित्तीं। पंढरीस जाऊनि सत्वरगतीं। रुक्मिणीपती आणावा॥७३॥ मग गरुडाचे धरूनि चरण। साष्टांगें घातलें लोटांगण।ह्मणे तुह्मां आधीन जगज्जीवन। तो मज आणोन भेट-

वा ॥ ७४ ॥ अवश्य ह्मणोनि त्वरित । सत्वर निघाला विनतासुत । तुकयास भेटवूं पंढरीनाथ । विचार मनांत पैं केला ॥७५॥ हा निश्चय करूनि मानसीं । गरुड पावला पंढरीसी । पृष्टीवरी न देखतां तुकयासी । हृषीकेशी घाबरले ॥७६॥ जैसें कन्येसि मूळ पाठवितां । तें फिरोनि रितें देखिलें येतां । हिंवसली उगीच राहे माता । तेविं रुक्मिणीकांता जाहलें ।७७। मग सन्निध येऊनि ते अवसरीं । मस्तक ठेविला चरणावरी । ह्मणे देवाधिदेवा श्रीहरी । तुका मजवरी न बैसे ७८ परी तुझ्यावियोगें रुक्मिणीपती । रात्रदिवस करितो खंती । आतां कृपा करूनि वैकुंठपती । चाल त्याप्रती भेटावया ॥७९॥ अवश्य ह्मणोनि जगज्जीवनें । गरुडास दिधलें आलिंगन । मग रुक्मिणीस बोलावून । सांगे खूण अंतरींची ८० मग विश्वजननी उत्तर देत । यात्रेसि आले वैष्णवभक्त । हा उत्सव टाकूनि जाणें तेथ । नसे उचित सर्वथा ॥ ८१ ॥ जैसें कांतेविण मंदिर शून्य । कीं जीवनाविण सरिता जाण । तेविं तुह्मांविण पंढरी शून्य। वैकुंठनाथा दिसेल कीं॥८२॥नातरी नृपावांचूनि सेनासंपत्ती । कीं चंद्राविण उडुगण दिसती।कीं कुंकुमाविण अलंकार निश्चिती।मालिन दिसती सर्वथा ।८३।तेविं आपण नसतां ये अवसरीं । उदास दिसेल हे पंढरी । तरी गोपालकाला जाहलियावरी । जाऊं भेटीस तुकयाचे ॥ ८४ ॥ ऐकोनि रुक्मिणीचें वचन । अवश्य ह्मणती जगज्जीवन । तों दर्शनासि आले संतजन । नामाभिधानें तीं ऐका ॥ ८५ ॥ शेखमहंमद आणि गणेशनाथ । बोधला निंबराज विख्यात । संतोबापवार वैष्णवभक्त । आले त्वरित दर्शना ॥८६॥टाळ वीणे मृदंग वाजती । सप्रेमभावें वैष्णव गाती । पताका शोभायमान फडकती । तयांत चमकती गरुडटके ।८७। लोटांगण घालिती सकळजन । तेव्हां रुक्मिणीसि बोले जगज्जीवन । निंबराजासि जाहला बहुशीण। घालित लोटांगण आला तो ॥ ८८ ॥ तरी यासि प्रसन्न होऊनि त्वरित । कांहीं द्यावें वरदान उचित । तंव श्रोते होऊन आशंकित । प्रश्न करीती निजप्रेमें॥८९॥ह्मणती निंबराज कोठील कोण । तयाचें सविस्तर करीं कथन।ऐसा करितांचि प्रश्न । हर्षलें मन वक्तयाचें॥९०॥तो प्रश्न वाटला कैशा रीतीं । जैसा चकोरांसि उदेला निशापती।कीं क्षुधार्तीयासि प्रारब्धगती । अमृत अवचितीं वर्षलें॥९१॥ कीं दुर्बळाचिया अंगणीं । कामधेनु ठाकली येऊनी । नातरी लोहसंदुकांत जाऊनी । परीस अवचितां पडिला कीं ॥ ९२॥ कीं क्षेत्र पिकासि आलें जाण ॥ त्यावरी पुढती वर्षला घन । मग द्विगुण दाटले कण । ते सभाग्य जाण लाधती ॥ ९३ ॥ तेविं श्रोतयांचे प्रश्नोत्तरीं । वक्ता संतोषला निज-अंतरीं । ह्मणे निंबराजचरित्र विस्तारीं । प्रेमभरी अवधारा ॥ ९४ ॥ स्वदेशांत ग्राम जाण । देवदैठण ह्मणती त्याकारण । तया ग्रामींचें कुलकर्णी । वृत्ति पुरातन तयाची ॥ ९५ ॥ मुलें लेंकुरें असती सर्व । परी निंबराज ह्मणवी भक्तवैष्णव । संतपूजनीं धरितां भाव । अनुताप जाहला तयासी ॥९६॥ मग ह्मणे पुरे हा संसार । दुर्धर माया अनिवार।प्रपंच करितां व्यवहार।आयुष्य समग्र वेंचलें ।९७। ऐसा अनुताप धरूनि जाणा । मग चालिले तीर्थाटना । बारा ज्योतिर्लिंगें देखोनि नयना । संतोष मना वाटला।९८।भूतळींचीं तीर्थें अवघड । तीं दृष्टीसि देखिलीं अति चोखडीं । सप्तपुऱ्या करूनि पुढें।हिमालयाप्रती पैं



गेले।९९।त्या मार्गींची ख्याती वर्णितां । तरी बहुविस्तारें वाढेल कथा।ह्मणोनि संकलित बोलिलों वार्ता।जाणावें श्रोतीं अंतरीं ।१००। भागीरथीच्या तीन कावडी। रामेश्वरीं घातल्या आवडीं । ऐसी सुकृताची करूनि जोडी । मग आले तांतडी आश्रमा ।१। अंतरीं इच्छा धरिली जाण । स्वमुखें करावें हरिकीर्तन । हेच आवड मनीं धरून । नामस्मरण करीतसे ।२। निष्कामबुद्धी व्रतें तपें।आचरला असेल जो साक्षेपें ।तरीच श्रीहरिकीर्तनीं अनुतापें । होईल रत निजप्रीतीं ।३। तीर्थें याग वेदपठण।हीं तेव्हांच फळासि आलीं जाण।तरी निर्लज्ज होऊनि मनीं।वर्णील गुण श्रीहरीचे४।असो आतां बहुभाषण । वैष्णव जाणती सप्रेमखूण । जे टाकोनियां मानाभिमान।करिती भजन अहर्निशीं ।५। श्रीहरिकीर्तनीं होतां रत । सकळ साधनें होती व्यर्थ । जैसी वापी खाणिली सखोल बहुत । परी जीवन नाहीं लागलें॥६॥कीं क्षेत्रीं कणसें आलीं सघन । परी त्यावरी उमटले नाहीं कण । कीं देसायानीं साधिलें वतन । तें संतानाविण व्यर्थची।७।कीं विद्याभ्यास केला फार । परी समयीं नाठवे प्रत्युत्तर । कीं शौर्य तेजेंविण नृपवर । व्यर्थचि बैसला भद्रासनीं ॥ ८ ॥ कीं पात्रीं पक्वान्नें वाढिलीं बहुत । परी शेवटीं नाहीं आलें घृत । तेविं श्रीहरिचरित्र न वर्णितां होत । सकळ साधनें व्यर्थची ९ तरी कीर्तन करावें प्रेमयुक्त । हा निंबराजें धरिला हेत । मग गजवदनासि पंढरीनाथ । आज्ञा करीत एके दिनीं ॥११०॥ ह्मणे मत्कीर्तनीं होईल स्फूर्ती । हा वर द्यावा तयाप्रती । ऐसें सांगतां रुक्मिणीपती । अवश्य गणपती ह्मणतसे॥११॥ तंव एके दिनीं यामिनींत । निंबराज होते निद्रित । तंव ब्राह्मणरूपें स्वप्नांत । पार्वतीसुत पावले ॥१२॥ थापटोनि सावध केलें पाहीं । ह्मणे वरप्रसाद माझा घेईं । मग तांबूल काढोनि ते समयीं । हातावरी दीधलें ।१३। तों निंबराजें सुषुप्तींत । तत्काळ टाकिलें मुखांत । मग गजवदन काय बोलत । अक्षय वरदान दीधलें॥ १४ ॥ आतां अभ्यास केल्याविण।बहुत वर्णिशील हरीचे गुण । आणि रंगदेवता येऊन । अखंड कीर्तनीं नांदेल ॥ १५ ॥ ऐसा वर देऊनि त्वरित । अदृश्य झाले पार्वतीसुत । निंबराजें होऊनि जागृत । स्वप्न ध्यानांत आणिलें ॥१६॥ तों विप्र दिसत नाहीं जवळ । आणि मुखांत असे साक्षात तांबूल । मग तैसाचि गिळोनियां ते वेळ । उठोनियां बैसला ॥१७॥ हाताकडे विलोकून पाहात । तों डाग लागला असे आरक्त । उदकेंकरूनि क्षाळिला हात । परी तो न जाय सर्वथा॥१८॥सागरें कूपासि दिधलें पाणी । तें न आटे जैसें अवर्षणीं । कीं योगियांसि तृप्त करी उन्मनी । तो नव्हे परतोनी क्षुधार्ती ॥१९॥ नातरी परिसाचा गुण लोहासि लागला । तरी पुढती काळिमा नयेच त्याला । कां गंगेनें वोहळ अंगीकारिला । तो अक्षय पूज्य सकळांसी॥१२०॥ कीं विरिंचीनें आयुष्य दिधलें पाहे । तेथें भयव्याधि सर्वथा न जाय । नातरी रंकासि हातीं धरिलें रायें । त्याची संपत्ति न जाय सर्वथा ॥२१॥ कां भास्करें दिधली दिव्यकांती । ते हिंवें फुटेल कैशा रीतीं । तेविं तांबुलाचा डाग लागला हातीं । तो धुतलिया न जाय सर्वथा।२२।त्या दिवसापासून । निंबराज करूं लागले कीर्तन ।जे श्रवण करिती वैष्णवजन।तल्लीन होऊन राहाती।२३।टाकूनि लज्जा मान लौकिक । टाकोनि आशापाश देख।टाकूनि भेदाभेद अनेक । सप्रेमसुख भो-

गीतसे।२४।ऐसी वृत्ति असतां सहज । पंढरीस आले निंबराज । येथूनि प्रश्न केलासे मज । श्रोतीं उमज धरावा ।२५। रुक्मिणीस ह्मणती जगज्जीवन । निंबराजासि यावें वरदान । जगन्माता तें ऐकून । विस्मितमन होतसे ।२६।मग माळिणीचें रूप धरूनी । वाटेसि बैसली विश्वजननी।आरक्त गाजरें पाटींत भरूनी । फांका करूनि ठेविल्या॥२७॥निंबराज येतां देउळांतून । तयासि बोले मधुरवचन । ह्मणे तान्हेंबाळ घरीं रडतसे जाण । मी जातें तयासी आणावया ॥२८॥ तरी कृपा करूनि मजवरी । येथें बैसावें क्षणभरी । मी बाळक घेऊनि सत्वरी । असीच येतें परतोनी ॥ २९ ॥ तूं नायकसी जरी वचन । तरी येथें गाजरें राखील कोण । बाजारीं फिरती बहुत जन । जातील घेऊन यासाठीं ॥ १३० ॥ ऐसें बोलतां विश्वजननी । करुणा उपजली तयाचे मनीं । ह्मणे सत्वर येईं परतोनी ।तरी मी बसतों ये ठायीं ३१मग पाटी करून त्याचे स्वाधीन । राउळाकडे गेली माळीण । एक प्रहरपर्यंत जाण । नये परतोन सर्वथा॥ ३२ ॥ तेव्हां वस्त्र काढोनि पाटीवरूनी । निंबराज विलोकी तये क्षणीं । तों सुवर्णपाकळ्या देखिल्या नयनीं । गाजर एकही दिसेना ॥ ३३ ॥ मग मनीं होऊन विस्मित । ह्मणे आदिमाया गोवूं पाहत । कनक नव्हे हा महा अनर्थ । दिसूनि येत मजलागीं ॥३४ ॥ ऐसा अनुताप धरिला मनीं । जेविं विप्र प्रवेशे यवनसदनीं । तेथिंचें मांस देखोनि नयनीं । कंटाळूनी पळतसे।३५।कां गलित कुष्ट दृष्टीस पडे । तों सुंदर न पाहे तयाकडे । कीं मेघातें देखूनि दृष्टीपुढें । अनुतापी उठे तेथूनि ॥ ३६ ॥ तैसें तें सुवर्ण पाटींत देखोन । निंबराजाचें चिळसलें मन । मग राउळांत जाऊन । घाली लोटांगण सद्भावें ॥३७॥हात जोडूनि करी विनंती । ह्मणे देवा कां मज करितोसि गुंती । तुझी कृपा इच्छितों चित्तीं । नलगे संपत्ती धन कांहीं३८मग रुक्मिणीसि करून नमस्कार । बिऱ्हाडासि आले सत्वर । नामस्मरण निरंतर । प्रेमभावें करीतसे ॥ ३९॥ इकडे रुक्मिणी ह्मणे जगज्जीवना । म्यां वंदोनि तुमची आज्ञा । निंबराजासि दिधलें सुवर्ण जाणा । परी त्याचे तें मना नये कीं॥१४०॥ हांसोनि ह्मणे जगन्निवास । भजनीं संतुष्ट माझे दास । तयांसि ममता लोभ आस । बाधूं न शके सर्वथा ॥ ४१ ॥ पर्वता न रुतती पर्जन्यधारा । कीं काळें लावितां नये अंबरा । शीत न बाधेच दिनकरा । न होय उबारा चंद्रासी ॥४२॥ कीं तृषा न बाधे समुद्राकारण । अग्नीस न बाधे कदा अन्न । बंदीखान्यांत कोंडेल पवन । कैशा रीतीं सुजाणे । ४३। तेविं निजभक्त उदास वर्तती । आशापाश न बाधे त्यांप्रती । ऐसें बोलतां वैकुंठपती । रुक्मिणी चित्तीं विस्मित ॥४४॥ दुसरे दिवसीं प्रातःकाळीं । स्नानासि चालिली संतमंडळी । निंबराज तयांचे मेळीं । चंद्रभागेसी पैं आले॥४५॥तंव विचार करी पंढरीनाथ । निंबराजासि यावें सुख उचित । जेणेंकरूनि प्रेमभरित । होईल रत मत्कीर्तनीं ॥४६॥ ऐसें ह्मणोनि ते वेळ । विप्रवेष धरिला तत्काळ । गळां घालूनि तुळसीमाळ । तमालनीळ पातले ॥४७॥ डोईस टोपी गळां मेखळा । सुवासबुका भाळीं शोभला । निंबराजासि घनसांवळा । काय बोलिला ते समयीं ॥४८ ॥ मी स्नानासि जातों भीमरथींत । तस्कर फिरती यात्रे-आंत । तरी मेखला टोपी माळ निश्चित । आपणापासीं असोंदे ॥४९॥ ऐसें ह्मणोनि रुक्मिणीपती । आभरणें दि-



धलीं त्याचे हातीं । आपण न लागतां पातया पातीं । अदृश्य जाहले तेधवां ॥ १५० ॥ निंबराज पाहे सभोंवतें । तों ब्राह्मण सर्वथा न दिसेच तेथ । एक प्रहरपर्यंत । वाट पहात बैसला ॥५१॥ परी तो नयेचि परतोन । मग संतांसि सांगे वर्तमान । येथें एक येऊनि ब्राह्मण । बोलिला वचन तें ऐका ॥ ५२ ॥ ह्मणे मी जातों स्नानासी । आरभणें असोंदे आपणापासीं । मग माळ टोपी मेखला मजपासीं । काढोनियां दीधलीं ॥५३॥ आपण न लागतां पातया पातें । अदृश्य जाहला जेथिंच्या तेथें । मी बैसलों वाट पाहात । चिंताक्रांत होऊनी ॥ ५४ ॥ तरी अजून नयेचि सर्वथा । यासि विचार काय सांगा आतां । वचन ऐकोनियां संतां । आश्चर्य चित्ता वाटलें ॥५५॥ मग सकळ बोलती वैष्णवभक्त । ब्राह्मण नव्हे तो रुक्मिणीकांत । तुह्मांसि उचित देऊनि त्वरित । जाहले गुप्त तेचि ठायीं ॥५६॥ तरी आतां संशय न आणूनि मनीं । अंगावरी घ्या आभरणें । ऐसीं ऐकोनि संतवचनें । केलें नमन साष्टांग॥५७॥मग गळ्यांत घातली मेखला । कंठीं शोभती तुळसीमाळा । टोपी लेववूनि तेवेळां । बुका लाविला संतजनीं ॥५८॥ वाळुवंटीं मिळोनि भक्तमंडळी । निंबराजासि ह्मणती ते वेळीं । तुज उचित देऊनि वनमाळी । केली दिवाळी भाविकां ॥ ५९ ॥ तरी वाळुवंटीं आज उभे राहून । आपुल्या मुखें करावें कीर्तन । क्षुधित जाहले आमचे श्रवण । तरी तृप्त करणें यथांसी ॥ १६०॥ मग मृदंगाचे स्वरावरी । वीणा मेळविला ते अवसरीं । टाळघोळ मेळवून झडकरी । दिव्यपताका उभारिल्या ॥६१ ॥ वैदिक शास्त्री पुराणिक । संत महंत वैष्णव अनेक । अठरा वर्णांचे बहुत लोक । श्रवणासि देख पातले ।६२। अस्तमानासि चालिला दिन । तेव्हां आरंभिलें कीर्तन । विठ्ठलनामें टाळिया पिटोन । केलें नमन निंबराजें ॥ ६३ ॥ अंतरीं आठवूनि रुक्मिणीपती । आनंदाश्रु नेत्रीं वाहती । विमानीं बैसोनि विबुध येती । कौतुक पाहती तेधवां ।६४साबडें सप्रेम गायन । ऐकोनि वेधले सकळ जन । सज्ञान आणि विचक्षण । तल्लीन होऊन राहिले ॥ ६५ ॥ वक्त्यासि चित्तीं असतां प्रेम । तेथेंचि संतोषे पुरुषोत्तम । परी कळा चातुर्य शहाणपण । नलगेचि जाण सर्वथा ।६६।प्रेमावांचूनि केलें गायन । कीं शरीर प्राणेंविण जाण । कीं लवणाविण रांधिलें अन्न । रुची नेदीच सर्वथा।६७।एक सुगंध नसला जरी ।तरी ते काय जाळावी कस्तूरी । कीं संतानाविण कांता सुंदरी । तीस घरचारी ह्मणों नये ॥ ६८॥ नासिकाविण गोरेपण । काय जाळावें तें सुंदर वदन । तेविं प्रेमेंविण केलें गायन । तयासि कीर्तन न ह्मणावें॥६९॥ कृष्णा रामा मेघश्यामा । गोविंदा गोपाळा पुरुषोत्तमा ।अच्युता नरहरी आत्मया रामा । असोंदे प्रेमा निजभजनीं ।१७०।हीं नामें उच्चारूनि सहज । नृत्य करितां निंबराज । मग संतोषोनि गरुडध्वज । काय करिती तेधवां॥७१॥बाळरूप धरून श्रीपती । मयूरपिच्छें घेतलीं हातीं । मग कौतुक मांडिलें तें संतीं । सादर श्रवणार्थीं परिसावें ॥ ७२॥ निंबराजाच्या खांद्यावरी । उभे राहोनि श्रीहरी । मोरचेल वारिती निजकरीं । हें नवल परिसा भाविक हो ॥७३॥ जो क्षीरसागरवासी शेषशयन । समुद्रतनयेचें अंतरजीवन । तो निजभक्तावरी जगज्जीवन । चामरें वारितो निजप्रीतीं।७४।वज्रासनीं बैसले नेहटीं। तयांसि लवकर नेदी-

च भेटी । तो निंबराजाचे राहूनि पाठीं।मयूरपिच्छें ढाळीतसे।७५। नाना यागव्रतें तपराशी।करितां नातुडे साधकांसी। तो दीनदयाळ हृषीकेशी । निजदासांसी सन्मानी।७६।विरूपाक्ष आवरूनि मन । एकांतीं करितो ज्याचें स्मरण । तो भक्तभूषण रुक्मिणीरमण । करी सन्मान दासांचा ॥७७॥ कीर्तनीं पातला घनसांवळा । तेथेंचि आल्या चौसष्टकळा । आणि चवदा विद्याही अनुकूला।दिसोनि येती विचक्षणा७८तटस्थ पाहती सभाजन।चारी प्रहर जाहलें कीर्तन । परी निद्रा आलस्य कोणाकारण । नयेचि जाण सर्वथा ।७९। दुष्काळ नाहीं क्षीरसागरासी । रोग न राहे अमृतापासीं । अंधार भास्कराचे गृहासी । राहील कैसा चतुर हो ॥ १८०॥ तेविं प्रेमळाचे कीर्तनांत पाहें । निद्रा आलस्य सर्वथा नये । टाकूनि जाती वर्णसोये । जाहले एकमय सकळिक।८१।टाळमृदंगाचे छंदें।टाळिया पिटिती ब्रह्मानंदें। विसरून भेदाभेदद्वंद्वें । नामस्मरणें डोलती ।८२।चार घटिका उरल्यावरी यामिनी । तों नवल वर्तलें तये क्षणीं । एक सावकारकांता वस्त्र पांघरूनी । स्नानालागूनी चालिली ८३ तिनें दृष्टीस अकस्मात । साक्षात देखिले पंढरीनाथ । मग लगबगां धांवत धांवत । कीर्तनांत पातली।८४।निंबराजापासीं येऊनि जाणा । पाहूं लागे रुक्मिणीरमणा । तों अदृश्य जाहला जाणा। आश्चर्य मना वाटलें॥८५॥मग आक्रोशें करूनि रुदन । निंबराजाचे धरिले चरण । लोक पुसती तिजकारण । आलीस धांवूनि कां येथें ॥८६॥ दृष्टीस कौतुक देखिलें काय । तें सांगें आह्मांसि लवलाहें । सग सकळांसि नमस्कारूनि पाहें । बोलिली काय तें ऐका ॥ ८७ ॥ निंबराजाच्या खांद्यावरी । आतां म्यां देखिला श्रीहरी । मयूरपिच्छें धरूनि करी । स्वहस्तें वारी निजप्रीतीं।८८।ह्मणूनि धांवूनि आलें त्वरित । तो आतां कांहींच न दिसे येथ । कोठें गेला रुक्मिणीकांत। हें मज निश्चित कळेना।८९।सांवळा सुकुमार जगजेठी । पुढती पडावा माझे दृष्टीं । ह्मणोनि चित्तीं होतसें कष्टी । परी नेदीच भेटी सर्वथा।१९०।लोक आश्चर्य करिती पाहे।ह्मणती हें नवल सांगतां नये।मग साक्ष पाहावया लवलाहें।समीप आले विचक्षण।९१।निंबराजाचे खांद्यावरूनी । अदृश्य जाहले चक्रपाणी। परी बुक्का टाकिला होता सज्जनीं । त्यावरी पाउलें चिमणीं उमटलीं ॥९२॥ ऐसी साक्ष देखोन । आश्चर्य करिती संतसज्जन । एकमेकांसि आलिंगून । लोटांगण घालिती ॥९३॥ जिणें देखिले होते पंढरीनाथ । तिजला नमिती भाविकभक्त । ह्मणती तुझे पदरीं होतें सुकृत । रुक्मिणीकांत देखिला॥९४॥यापरी स्तवितां नारीनर । तों उदयासि पातला दिनकर । मग निंबराजें आरती करूनि सत्वर । शार्ङ्गधर ओवाळिला॥९५॥पौर्णिमेस केला गोपाळकाला । मग यात्रेचा समुदाय फुटला । तेणें दीनबंधु खंतावला । सद्गदित जाहला निजलोभें ।९६। अबला कन्या सासऱ्यास जातां । गहिंवरें रडे जैसी माता । तेविं यात्रा फुटतां पंढरीनाथा । अवस्था पूर्ण जाहली॥९७॥ रुक्मिणीस ह्मणे श्रीहरी । आतां उदास दिसे हे पंढरी । निजभक्त गेले आपुले घरीं । मज निर्धारीं न कंठे॥९८॥ आतां उभयतां उठाउठी । जाऊं तुकयास द्यावया भेटी । ऐसें ह्मणोनि जगजेठी । उतावेळ पोटीं जाहले कीं।९९।गरुडासि पाचारिला सत्वर । सगुणरूप धरिलें साकार । जें अखंड आठवी अपर्णावर।



शुद्ध अंतर करोनी ॥२००॥ विनतासुताचे पाठीवरी । रुक्मिणीसहित बैसले हरी । इच्छामात्रें झडकरी । देहुग्रामासी पावले।१।तों इकडे वैष्णव तुकया वाणी । उतावीळ वाट पाहे मनीं । ह्मणे कधीं येईल चक्रपाणी । माता रुक्मिणीसमवेत ॥२॥ आज उजवा लवतो माझा नयन । घडि घडि बाहु करी स्फुरण । क्षणक्षणा वाटे समाधान । हे उत्तम शकुन होताती ॥३॥ तों आकाशपंथें अकस्मात । गरुडटका देखिला झळकत । मग सामोरा होऊनि त्वरित । घाली दंडवत निजप्रेमें ॥ ४ ॥ मग निजभक्तांचा प्रेमभावो । देखोनि प्रगटले देवाधिदेवो । ब्रह्मादिकांसि ज्याचा ठावो । नेणेचि पाहावो सर्वथा ॥ ५ ॥ रूप सांवळें अति सुकुमार । कांसे वेष्टिला पीतांबर । दिव्य कुंडलें मकराकार । कौस्तुभ सुंदर शोभत ॥६॥ मुकुट विराजे देदीप्यमान । त्यावरी जडलीं दिव्यरत्नें । पदक एकावळी भूषणें । जगज्जीवनें घातलीं ॥७॥ चरणीं नूपुरें वाळे वाजती । ते ध्वनी ऐकोनि लाजती श्रुती । रुक्मिणीसहित जगत्पती । प्रगट जाहले तेधवां ॥ ८॥ ऐसें रूप देखोनि नयनीं । तुकयासि हर्ष वाटला मनीं । सप्रेमें आलिंगन देऊनी । मिठी चरणीं घातली ॥ ९ ॥ पुढील अध्यायीं सुरस वाणी । देवभक्तांसी होतील बोलणीं । तें सादर होऊनि संतसज्जनीं । परिसावें श्रवणीं निजप्रीतीं ॥२१०॥ जें प्रेमगंगेचें जीवन सुरस । कीं आनंदसमुद्रींचा सुधारस । महीपती विनवी श्रोतयांस । सेवा सावकाश निजप्रीतीं ॥ ११॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । एकपंचाशत्तमाध्याय रसाळ हा ॥ २१२ ॥ अध्याय ५१ ॥ ओंव्या २१२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय ५१ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीजगदीश्वराय नमः । जयजय भक्तकरुणाकरा । अक्षय अभंगा जगदुद्धारा । आदिस्तंभा सायुज्यउदारा । रुक्मिणीवरा श्रीविठ्ठला ॥१॥ तूं जया पाहसी कृपादृष्टीं । त्याची तुटे भवबंधफांसोटी । करूनि प्रपंचाची तुटी । देसी शेवटीं अक्षयपद ।२। तुझें उदारत्व वर्णितां पाहें । सहस्रमुखातेंही लेखा नोहे । महाकवीची मती कुंठित होय । तेथें मी काय मशक । ३ । परी आवडीची ऐसी जाती । बाळकें मातेसि भलतें बोलतीं । परी जननीस त्याची न वाटे खंती । ऐकूनि तुष्टे ती निजलोभें ॥४॥ तेविं कृपा करूनि जगज्जीवनें । अंगीकारावीं आर्षवचनें । हेंचि मागतों तुजकारणें । परी तुझेचि सत्तेनें दयाळा॥५॥सागरींचें जीवन मेघ आणिती । ते सरिता घेऊन समुद्रासि जाती । तरी उपकार कोण तयाप्रती । ज्याचें त्यास अर्पितां ॥६॥ भास्कराचे जावें भेटीसी । तरी त्याचेच प्रकाशें पाहावें त्यासी । तेविं तुज प्रार्थावया हृषीकेशी । सत्ता आह्मांसी असेना॥७॥कीं पृथ्वीस केला नमस्कार । आणि तिजवर पडेच शरीरभार। तेविं तुज वर्णावया साचार । आणिक आधार असेना ॥८॥ नातरी विनवावें प्रभंजनास । तरी त्याच्याचयोगें निघती श्वास । तेविं तुझीं चरित्रें यावया वाचेस । कारण तूंची अससी पैं ॥ ९ ॥ कीं अग्नीस धूप दाखविला जर । तरी त्याचेच योगें निघे धूर । तेविं तुझ्याच योगें चित्त होतें स्थिर । निघती उद्गार कथेचे।१०।गंगेसि केला अभिषेक । परी तिजचिपासाव घेतलें उदक । तेविं तुझिया प्रसादें देख । कवि अनेक वर्णिती॥११॥नातरी चंद्र आला उदयास । त्याच्याच प्रकाशें पाहावें त्यास । कां मातेची सेवा केली विशेष । तरी शरीर असे जननीचें॥१२॥सुरतरूखालीं बैसोन । कल्पनेकरूनि त्यासि घातलें जीवन । मग आपण उपकार दाखवितां जाण । लज्जित सज्ञान होतसे ।१३। तेविं तुझिया सामर्थ्यें रुक्मिणीपती । वेदीं वर्णिली अपार स्तुती । मग विवेक करूनि आपुले मतीं । नेती नेती वदले कीं ॥ १४ ॥ ऐसा स्वसामर्थ्यें तूं अधोक्षज । जाणसी दासांचें अंतरगुज । आतां अभयवर देऊन मज । वदवीं निजभक्तविजयकथा ॥ १५॥ मागील अध्यायाचे अंतीं । देहूस आले रुक्मिणीपती । सगुणरूप धरूनि निश्चितीं । तुकयासि प्रीतीं भेटले ।१६। मग प्रसन्न होऊनि जगज्जीवन।ह्मणती कांहीं माग वरदान । जें विरिंचीस न लाभे करितां प्रयत्न । तें मी देईन तुजलागीं१७ यावरी तुका देत उत्तर । ह्मणे चित्तीं न पडावा तुझा विसर । गुण गाईन वारंवार । सप्रेम अंतरीं होऊनी ॥ १८ ॥ आणि तुझे निजभक्त अंतरंग । अखंड असावा त्यांचा संग । हेंच मागतों आला प्रसंग । न करीं मनोभंग दयाळा ॥ १९ ॥ तुझे भजनीं असावी प्रीती । नलगे कांहीं धनसंपत्ती । पुढें करिसील चारी मुक्ती । तरी त्या नावडती मजलागीं ॥ २० ॥ अखंड संतसमागम । वाचेसि असावें तुझें नाम । मग गर्भवास असतां संभ्रम । होय सुगम सर्वदा ॥ २१ ॥ हेंचि मागणें रुक्मिणीपती । ह्मणोनि नमन केलें पुढती । ऐसें ऐकोनि वैकुंठपती । आश्चर्य चित्तीं करीतसे ॥ २२ ॥ मग गरुडासि ह्मणे भक्तसखा । उदास विरक्त प्रेमळ तुका । येणें सर्व त्याग करूनि देखा । मजचि एका आराधिलें ॥ २३ ॥ माझिया वियोगदुःखेंकरून । अन्नउदक वर्जिलें जाण । ह्मणूनि देह कृश होऊन । गेला वाळून पाहें तुका ॥ २४ ॥ यावरी बोले

दिनतासुत । तुह्मीं आशीर्वाद लिहिला पत्रांत । कीं जोंवरी वैकुंठ कैलास दिसत । तोंवरी चिरंजीव असावें ॥ २५ ॥
तें आपुलें वचन वैकुंठपती । असत्य नव्हेचि कल्पांतीं । तरी शरीर वाळलें ह्मणोन प्रीतीं । उद्विग्न चित्तीं कां होतां।२६।
भजनीं रतलें याचें चित्त । तेव्हांचि कळिकाळ जाहला अंकित । हा नामयाचा अवतार साक्षात । जाणती संत नि-
जखूण ॥ २७ ॥ अनंतजन्मीं करूनि भजन । एकाग्र निश्चळ करूनि मन । तुह्मांस केलें आपले स्वाधीन । वर्णितो गुण
निजप्रीतीं ॥ २८ ॥ यावरी तुकयास ह्मणे जगजेठी । मी क्षुधित जाहलों बहु पोटीं । उपवासी निघूनि उठाउठी । तुझि-
या भेटी पातलों ॥ २९ ॥ तरी गृहांत निपजलें असेल अन्न । तें पात्रीं आणावें विस्तारून । ओलें कोरडें ह्मणोन । संको-
च मनीं न धरावा ॥ ३० ॥ ह्मणाल सन्निध असतां रुक्मिणी । क्षुधित कां आले चक्रपाणी । तुकयाचा हेत होता मनीं ।
कीं देवा भोजनीं बैसवावें ॥ ३१ ॥ तें मनोगत जाणोनि त्वरित । तैसेंचि वदले पंढरीनाथ । जेणें प्रेमळाचा पुरे हेत । तें-
चि दीननाथ करीतसे ॥ ३२ ॥ मग तुकयानें आणोनी जळ । धुतलें देवाचें चरणकमळ । कोमळ तुळसीदळाची माळ ।
कंठीं तत्काळ घातली ॥३३॥ अत्यंत प्रीतींकरून नमन । मग पात्रीं वाढूनि आणिलें अन्न । शुष्क भाकरी भाजीपान ।
शाकेसि लवण दुसरें असे ॥ ३४ ॥ तें आवडीनें खात जगज्जीवन । ऐकोनि आशंका धरिती सज्जन । ह्मणती क्षीराब्धि-
वासी नारायण । कोरडें कदन्न खातसे ॥ ३५ ॥ तरी एक सद्भाव असतां अंतरीं । तेथेंच क्षुधित होय श्रीहरी । मग याती
कूळ न विचारी । निजप्रीति बरी देखोनियां ॥ ३६॥ पक्वान्नें करूनि नानारीतीं । वाट पाहे दुर्योधन कुमती । परी तेथें न
जेवितां श्रीपती । कण्याचि खाती विदुराच्या ॥ ३७॥ कीं द्रौपदीनें सद्भावें पाहतां वाट । जेवितां लोटून दिधलें ताट ।
मग धांवत येऊन बैसले निकट । मागत देंठ भाजीचा ॥३८॥ जो यज्ञपुरुष अतिनिर्मळ । तो उच्छिष्ट गवळियांचें खा-
तो बळें । भिल्लिणीचीं उच्छिष्ट फळें । भक्षी घननीळ निजप्रीतीं ॥३९॥ तो तुकयाचे घरीं कदन्न भक्षितां । येथें आश्चर्य
कोणतें चित्तीं । ह्मणोनि साशंक न व्हावें श्रोतीं । पुरातन कथा ऐकोनी ॥४०॥ असो रुक्मिणीसहित जगज्जीवनें । आ-
वडीं बैसोन केलें भोजन । करशुद्धी देऊन तुकयानें । उच्छिष्ट आपण भक्षिलें ॥४१॥ देवास मुखशुद्धीस ते वेळ । आ-
णूनि दिधलें तुळसीदळ । आवडी देखोनि दीनदयाळ । अतिआदरें भक्षिती ॥४२॥ यापरी होऊन संतुष्ट । मग तुकयासी
बोले जगजेठी । आतां मज ठेऊनि हृदयसंपुटीं । वियोगहिंपुटी न व्हावें ॥४३॥ तूं बोलाविसील जैं मज । तैं सगुणस्व-
रूपें भेटेन तुज । ऐसें ह्मणोनि अधोक्षज । जाते जाहले तेधवां ॥४४॥ तुकयानें धांऊन ते वेळीं । मस्तक ठेविला चरणक-
मळीं । मग रुक्मिणीसहित वनमाळी । पंढरपुरासी पातले ॥ ४५ ॥ तंव एक ब्राह्मण कामना धरूनी । आळंदीस बैसला
अनुष्ठानीं । ह्मणे पुराणव्युत्पत्ती व्हावी मजलागूनी । मनीं अखंड चिंतित ॥४६॥ मग दृष्टांत दाविला ज्ञानेश्वरें । कीं तु-
कयापासीं जाय तूं त्वरें । तो तुज प्रसाद देईल स्वकरें । तरी मनोरथ साचार पुरतील ॥ ४७ ॥ तेव्हां ब्राह्मणें विचारूनि
चित्तीं । सत्वर आला देहूप्रती । तुकयासी भेटोनि एकांतीं । कामना चित्तींची सांगितली॥४८॥ ह्मणे म्यां अनुष्ठान केलें



अलकावतीसी । ज्ञानदेवें पाठविलें तुह्मांपासीं । वचनें ऐकोनियां ऐसीं । तुका मानसीं विस्मित ॥४९॥ कांहीं पुण्य नाहीं
गांठीं । तरी तें वेंचूं यासाठीं । ज्ञानदेवें हे शेवटीं । पाठीं लाविली उपाधी ॥५०॥ मग विचार करीत आपुले मनीं । ह्मणे
विद्या नाहीं याचे प्राक्तनीं । ह्मणोनि ज्ञानदेवें कंटाळोनी । धरणें पाठवूनी दीधलें॥५१॥ह्मणे मी नेणता अज्ञान । नेणेंचि
जप तप अनुष्ठान । ज्ञानदेवें मजलागून । कासया थोरपण दीधलें ॥५२॥ मग अकरा अभंग आणि नारळ । ब्राह्मणासि
दिधले ते वेळ । ह्मणे हें भक्षिशी जे वेळ । ज्ञान तत्काळ तुज होईल ॥ ५३॥ ब्राह्मणाचें विकल्पी मन । ह्मणे नारळ भक्षि-
तां नव्हे ज्ञान । प्राकृत अभंग मजकारण । पाहिजेत पैं कासया ॥५४॥ ऐसा विकल्प चित्तीं धरून । टाकूनि गेला प्राक्त-
नहीन । जैसा चिंतामणी हातीं लागतां जाण । गोंफणी घेऊन दवडिला ॥ ५५ ॥ का निधान सांपडतां अभाग्याला । तें
कोळशा ऐसें दिसे त्याला । नातरी पक्वान्न रोगियाला । कडवट जिह्वेसी लागत ॥ ५६ ॥ कां भागीरथीची कुपी जाण ।
उन्मत्तासि भासे मद्यपान । नातरी कल्पतरूचें वन । जाय डावलून दरिद्री ॥ ५७ ॥ तेविं तुकयानें प्रसाद दीधला । तो
विप्रें तेथेंचि टाकिला । मग अलकावतीस ज्ञानराजाला । पत्र लिहून पाठविलें ॥ ५८ ॥ मज पामरासि देऊनि थो-
री । येथें पाठविला धरणेकरी । तुमची आज्ञा वंदोनि शिरीं । उचित झडकरी दीधलें ॥५९॥ तेणें विकल्प धरूनि मग ।
टाकिले एकादश अभंग । महाफळाचा करूनि त्याग । गेला सवेग येथूनी ॥६०॥ ऐसें कल्पोनि मानसीं । निरोप पाठ-
विला आळंदीसी । मग ध्यानांत आणूनि हृषीकेशी । नामस्मरण करीतसे ॥ ६१ ॥ तंव शिवाजीराजापासीं देख । शा-
स्त्रज्ञ होता पुराणिक । त्याचा ब्राह्मणजन एक । होता अतिमूर्ख अज्ञानी ॥६२॥ तो तुकोबापासीं सत्वर । करावयासि
आला नमस्कार । तोचि नारळ उचलोनि वैष्णववीरें । त्याचे हातीं दीधला ॥ ६३॥ आणि एकादश अभंग ठेविले लि-
हून । तेही दिधले त्याकारण । तेणें तो नारळ फोडून । तेथेंच भक्षिला निजप्रीतीं ॥ ६४ ॥ बिन्हाडासी गेला तो ब्राह्म-
ण । तों तेथें मांडिलें होतें पुराण । श्रवणासि बैसले पंडितजन । अतिनिपुण वेदशास्त्री ॥ ६५॥ आणिक श्रोते सज्ञा-
न चतुर । ऐकावया बैसले सादर । तेथें तो ब्राह्मणजन येऊनि सत्वर । करीत प्रश्न पुराणिका ॥ ६६ ॥ तुह्मी श्लोक वा-
चिला आतां । त्याचे पदाचा अर्थ राहिला सांगतां । पंडित मागुती विचारितां । तो यथार्थ समस्तां वाटलें ।६७। ह्मण-
ती हें आश्चर्य बहुत । यासि ओनामा तो नव्हता येत । एकाएकीं पुराणव्युत्पत्ती । कैसी जाहली कळेना।६८।वृत्तांत पुस-
तां त्याकारण । साकल्य सांगितलें वर्तमान । ह्मणे एकादश अभंग तुकयानें । आणि नारळ एक दीधला ॥ ६९ ॥ तो फो-
डोनि खातांचि ते वेळीं । गीर्वाणभाषा कळों लागली । ऐसी ऐकोनियां बोली । तटस्थ जाहली सकळ सभा॥७०॥ पुरा-
णिकें समीप बोलावूनि प्रीतीं । पत्र दिधलें त्याचे हातीं । ह्मणे हें वाचून दावीं आह्मांप्रती । तरी सत्य प्रतीती वाटेल७१
मग तुकयाचे पाय आठवूनि चित्तीं । सांगूं लागला पुराणव्युत्पत्ती । ऐकोनि पंडित तटस्थ होती । आश्चर्य त्यांप्रती
वाटलें।७२। ह्मणती विष्णुभक्तांची अघटित करणी । नव्हे तेंच करूनि दाविती जनीं । एक सद्भाव चित्तीं धरूनी । च-

कपाणी वश केला॥७३॥जो लीलानाटकी भगवंत। राईचा करी पर्वत। त्याचे आवडते जे निजभक्त। अघटित चरि-
त्रें तयांचीं।७४। मूर्खांसि ज्ञान जाहलें अद्भुत। ही चिंचवडीं देवांसि कळली मात। मग ब्राह्मण मिळोनि समस्त। स्व-
भावें बोलती एकमेकां। ७५। आपण मताभिमानेंकरून। तुकयाचें करितों हेळण। परी मनुष्य न ह्मणावें त्यालागून।
यथार्थ वचन जाणिजे।७६।एक ह्मणती पाचारूनि त्यासी। प्रीतीनें पुसावें एके दिवशीं। तूं कोण आहेस हें सांग आह्मां-
सी। ऐसें तुकयासी पुसावें।७७।तो ब्राह्मणभक्त अतिप्रेमळ। आपणासि सांगेल तत्काळ। ऐसा चिंचवडीं ते वेळ। विचा-
र केला द्विजवरीं ॥ ७८ ॥ मग मनुष्य करून मोलकरी। त्यासि सांगीतलें ते अवसरीं। तुवां जाऊनि तेथवरी। तुकया-
सि लवकरी पाचारिजे ॥ ७९ ॥ इतुकेंच जाऊनि सांग वहिलें। कीं चिंचवडीं देवांनीं पाचारिलें। ऐसें ऐकूनि ते वेळे।
मनुष्य उठिला सत्वरीं॥ ८० ॥ मग देहूस येऊन तयानें। तुकयासि केलें साष्टांग नमन। तंव तेथें होतसे हरिकीर्तन।
बैसले सज्जन श्रवणासी ॥ ८१ ॥ सप्रेमभावें अति सादर। श्रवण करिती नारीनर। नामघोषें कोंदलें अंबर। पडिला
विसर देहाचा ॥ ८२ ॥ नावडे कोणासि प्रपंचभ्रांती। लवों विसरलीं नेत्रपातीं। नामरूपीं जडली वृत्ती। जाहली वि-
श्रांती सकळिकां ॥८३॥ टाळकरी आणि मृदंग्यासी। आह्मी कोण हें नाठवे त्यांसी। आपपर नाठवेच कोणासी। प्रेम
मानसीं प्रगटलें ॥८४ ॥ हिलाल धरिला होता ज्यानें। तयासि नाहीं देहभान। नामरूपीं जडलें मन। मी कोण हें स्फुरे-
ना ॥ ८५ ॥ तेणें हिलाल करितां वरी। तों मंडपासि लागला ते अवसरीं। तों आणिक कथा लागली दुसरी। ते सादर
चतुरीं परिसावी ॥८६॥ चांभारगोंदियांत प्रसिद्ध। ज्ञानसागर शेखमहंमद। तो कीर्तन करीत अति आनंदें। प्रेमच्छं-
दें नामाच्या ॥८७॥ श्रवणासि बैसले बहुत जन। अठरा वर्णांचे थोर लहान। आणिक चतुर श्रीमंत जन। सज्ञान ब्रा-
ह्मण पंडित जे॥ ८८ ॥एकाग्र ऐकती कीर्तन सांग। कथेसि आला अद्भुत रंग। पाखंडियांसि वचन न सुचे मग। आरो-
गिले मूग ते समयीं।८९। तों वक्त्यानें ते वेळां। उडी मारूनि मंडप चोळिला। हें कौतुक देखोनि डोळां।आश्चर्य सकळां
वाटलें।९०। मग पुढें बैसले होते श्रवणीं। ते पुसते जाहले तये क्षणीं। कशाकरितां मंडप स्वामींनीं। दाखविला चोळूनी
आह्मांतें।९१। हें कौतुक दृष्टीं देखोन। आशंकित जाहलें त्यांचें मन। शेखमहंमद देखोन। काय बोलिला ते समयीं।९२।
वैष्णव तुका देहु गांवांत। प्रेमभावें कीर्तन करीत। तों मंडपासि हिलाल अकस्मात। लागला अवचित नकळतां।९३।तो
जळतां दृष्टीं देखिला तेथ। म्यां निजकरें विझविला येथ। ऐसी ऐकोनियां मात। श्रोते आशंकित जाहले कीं।९४।हें को-
णासि न वाटे खरें। ह्मणती देहूगांव बहुत दूर। तुह्मांस तेथील समाचार। कैशापरी श्रुत जाहला।९५। तेथेंही श्रोतयांचा
असेल मेळा। त्यांच्या काय न दिसे डोळां। ह्मणूनि मंडप तुह्मीं विझविला। हें यथार्थ आह्मांला न वाटे।९६। मग शेख-
महंमद बोले वचन। तुकयाचे कीर्तनीं बैसले जन। तयांसि नाहीं देहभान। करितां श्रवण हरिलीला॥९७॥नामरूपीं ज-
डलें चित्त। सकळ जाहले देहातीत। हिलाल लागोनि मंडप जळत। तो म्यां त्वरित विझविला ॥९८॥ यावरी श्रोते पु-



सती मात। कीर्तनीं असती पंढरीनाथ। त्यानें कां न चुकविला आघात। मंडप जळतां देखोनी॥९९॥मग शेखमहंमद
बोलती त्यांसी। प्रेमें भुलले हृषीकेशी। देवपण नाठवेच तयांसी। नाठवे भक्तांसी भक्तपण॥१००॥ते दोघे एक जाहले
असती। कोणी रक्षावें कोणाप्रती। जेविं दोनी दीपक जळत असती। भिन्न न दिसती सर्वथा।१।त्या एके ठायीं करितां
वस्ती। समरसपणें मिळोनि जाती। ऐसी तयांची विदेहस्थिती। माझे चित्तीं श्रुत जाहली।२।कीं सरितेमाजी विशाळ
बेटें। तेथें उदकाचे होती दोन वांटे। मग पुढें होऊनि एकवटे। भिन्नत्व न दाविती सर्वथा।३।कां प्रतिमा आणि उपकरण।
एके पितळेचीं असती जाण। मुशींत आटतां त्यांकारण। न दिसती भिन्न सर्वथा। ४। नातरी घृत नवनीत पाहीं। दो-
न्ही कढविलीं एकेच ठायीं। त्यांसि वेगळेपण पाहतां कांहीं। भिन्नत्व नाहीं सर्वथा।५। तेविं भक्त जाहले असतां एक।
कोण कोणाचें जाणेल दुःख। समरसें अविनाश जाहलें सुख। भेदाभेद मावळले।६। देवपणा विसरले रुक्मिणीकांत।
तुकया न स्मरे मी भक्त। तैसेच श्रोते जाहले समस्त। हा मज वृत्तांत समजला ॥ ७ ॥ हें जरी तुह्मांस न वाटे खरें। तरी
तेथूनि आणा समाचार। ऐसें ऐकूनि उत्तर। श्रोते चतुर संतोषले॥८॥ मग देहूचे पाटलासि पत्र लिहूनी। एक सांडणी
पाठविली त्यांणीं। कीं रात्रीं कौतुक देखिलें नयनीं। तें यथार्थ लिहूनि पाठवावें॥९॥ अस्तमाना जातां दिनकर। आ-
लें त्याचें प्रत्युत्तर। रात्रीं होतां कीर्तनगजर। मंडपासि हिलाल लागला ॥११०॥ दीडहात छिद्र पडलें जाणा। परी रा-
त्रीं कळलें नाहीं कोणा। सकाळीं उठोनि देखिलें नयनीं। मग आश्चर्य मना वाटलें ॥ ११ ॥ ऐसें पत्र ऐकतां श्रवणीं।
यथार्थ वाटलें त्यांलागोनी। मग शेखमहंमदापासीं येऊनी। नमस्कार घालिती॥१२॥ ह्मणती तेथील वृत्तांत। तुह्मा-
सि कैसा जाहला श्रुत। हा चमत्कार देखोनि अद्भुत। आश्चर्यचित्त सकळांचें ॥ १३ ॥ ऐसी ऐकूनि वचनोक्ती। ह्मणे
काय सांगावें तुह्मांप्रती। मीन नीटचि धार चढती। ते आणिकां गती अवघड ॥ १४ ॥ आणिक जळचरें बहुत जाण।
परी मत्स्याऐसें त्यां न लोटे जीवन। तेविं भक्तांचे मनींची खूण। भाविकांवांचून कळेना ॥१५॥कीं पिपीलिकांचे मा-
र्गानें। पिपीलिकाच चालूं जाणें। तेविं वैष्णवांचे मनींची खूण। भाविकांवांचून कळेना ॥१६॥ कीं अंतरिक्षीं विहंगम
उडतां। तेथें मार्ग पहावा कोणता। परी पक्षीच चालती त्या पंथें। आणिकां सर्वथा कळेना ॥१७॥ जे कूपामध्यें बेडूक
रहात। ते काय जाणती पयोब्धीची मात। तेविं गुरुभक्तांची खूण निश्चित। मायालोभियांस कळेना।१८। ऐसी वच-
नोक्ति बोलोनि त्वरित। शेखमहंमद राहिले निवांत। आश्चर्य मानूनि श्रोते समस्त। घातलें दंडवत सकळांनीं।१९। अ-
सो सिंहावलोकनें आतां। श्रोतीं परिसावी मागील कथा। जो चिंचवडींहूनि मनुष्य येतां।त्यानें ऐकिली कथा तुकया-
ची।१२०। तेथेंच जडला त्याचा भाव। निरोप सांगावयाचा नाहीं आठव।प्रपंचउद्वेग राहिला सर्व।ऐसा जीव सुख पा-
वला।२१।घरासि जावें परतोन।हेंही सर्वथा नाठवे भान। तुकयाचें होतांचि दर्शन।जाहला तल्लीन निजप्रीतीं २२ इकडे
चिंचवडीं देव वाट पाहती।ह्मणती तुकयासि दिवस लागले बहुत।मनुष्यही परतोन नाहीं येत। काय जाहलें कळेना २३

मग विचार करूनि सकळांनीं । दुसरा मनुष्य पाठविला त्यांनीं । तोही तुकयाचें कीर्तन ऐकूनी । विदेही होऊनी बैसला ।२४।विलंब लागतांचि त्याप्रती । तिसरा पाठविला मागुती । त्याचीही उडाली देहभ्रांती । सप्रेम चित्तीं होऊन २५ मग गजवदनाचे उपासक। आश्चर्य करिती सकळिक। तिघे मनुष्य गेले देख।नये एक परतोनी।२६।जेविं गंगेसि वोहळ गेले। ते आपलेपणासि समूळ मुकले । कां नाना पुष्पांचे मकरंद भले । वायूस मिळाले समरसें ॥२७॥ तरंग मिळाला जळांत । कीं अभ्रचि लपलें आकाशांत । कीं सुवागी पडे सुशींत । ते नाहीं येत परतोनी ॥ २८ ॥ तैसेंचि जाहलें त्यांकारण । निरोपही न सांगती येऊन । तुकयाचें ऐकतां सप्रेम गायन । राहिले तल्लीन होऊनी ॥ २९ ॥ तुकयासि सांगीतलें असतें तयांनीं । तरी यावया अनुमान न करिता मनीं । त्याऐसा ब्राह्मणभक्त जनीं । वैष्णव ज्ञानी असेना ॥ १३० ॥ तरी आपणचि सांडोनि वर्णाभिमान । जाऊनि घ्यावें त्याचें दर्शन । संशय वाटतसे मनीं जाण । ते जीवींची खूण पुसावी ॥३१॥ ऐसा विचार करूनि जाण । ब्राह्मण निघाले तेथून । हे अंतरीं तुकयालागून । न सांगतां खूण कळली कीं ॥३२॥ ह्मणे मनुष्यें पाठविलीं विप्रांनीं । परी सांगीतला नाहीं निरोप कोणीं । आतां तेचि कृपावलोकनीं । येताति चालोनी भेटावया॥३३॥तरी आपण न जातां येथून । ब्राह्मणांचा होईल अपमान । लक्ष्मीकांत ज्यांचे चरण । हृदयीं भूषण वागवितो । ३४ । ते आले नाहींत येथवरी । तों आपण पुढें जावें सत्वरीं । ऐसें विचारूनि अंतरीं । निघे सत्वरी तेधवां ॥३५॥ जैसी चातकां तृषा लागत । तों मेघ सत्वर धांवूनि येत । कीं उदया येतां रोहिणीकांत ।सरितानाथ उचंबळे ३६ नातरी हिरकणी देखोनि सुंदरा । ऐरणींतूनि निघे हिरा । येरयेरांच्या अंतरा । साक्ष जैसी प्रतीती॥३७॥कां चुंबकाची देखोनि प्रीती । लोहरज येती तयाप्रती। तेविं द्विजवरांची अत्यंत प्रीती।तुकयाचित्तीं जाणवलें ।३८।ह्मणूनियां लवडसवडीं । विष्णुभक्त जातसे तांतडी । श्रीहरीचे गुण कडोविकडीं । अतिआवडीं गातसे ॥३९॥अर्धपंथ लोटतां त्वरित । तों द्विजवर देखिले अकस्मात । तुकयानें मग दंडवत । अतिप्रीतीनें घातलें । १४० । यावरी धरामर बोलत । तूं साक्षात विष्णुभक्त । ह्मणोनि दर्शनाचा धरूनि हेत । येत होतों तुजपासीं।४१।तंव येथेंचि मनोरथ पूर्ण जाहले । मग सप्रेमें आलिंगन दीधलें । आसनावरी द्विजवर बैसले । तुकयासि बोलिले तें ऐका ॥४२॥ कलीमाजी अवतार घेऊनी । त्वां अघटित चरित्र दाखविलें जनीं । हें देखिलें आपुले नयनीं । विस्मित मनीं होतसों॥४३॥मग अवसर पाहूनि एकांतीं । पुसावयासि आलों तुह्मांप्रती । तरी कोण आहां तें सत्वरगतीं । आह्मांसि निश्चिती सांगावें ॥४४॥ऐकूनि द्विजवरांचें वचन । विचार करी मनांतून । ह्मणे यांसि प्रचीत दाखविल्याविण । संशयखंडन नव्हेची॥४५॥मग आपले मांडीचें चर्म धरूनी । ओढूनि चिरिलें तये क्षणीं । तंव निखळ कापूस पिंजारोनी॥ भरिला असे त्यामाजी।४६। हें द्विजवरांहीं देखोनि दृष्टीं । आश्चर्य करिती आपुले पोटीं। ह्मणती तुकयाची मनुष्यराहाटी । कैसी चालती कळेना ।४७। रुधिर मांस नसतां कांहीं । कैसें चैतन्य राहिलें देहीं । एक ह्मणती मायालाघवी । ईश्वरकरणी अघटित।४८।पंचभूतांचें ओडंबर कोडें।



मायाममतेच्या लाऊनि तोंडें । जीवासि लाविलें विषयवेड । प्रपंचकाबाड वाढविलें ।४९। याविरहित तुका वैष्णवभक्त । अनुभवें कळों आली प्रचीत । यासि ह्मणों नये मनुष्य प्राकृत । जगद्गुरु निश्चित अवतरला। १५०।जैसें गंगेसि न ह्मणावें जीवन । कीं परिसासि न ह्मणावें पाषाण । कनकासि अन्य धातूसमान । लेखों नये सर्वथा।५१।वृक्ष नव्हेचि कल्पतरू। कीं समुद्र न ह्मणावा सरोवरू। कीं इतर पर्वतांसमान मेरू। लेखों नयेचि सर्वथा॥५२॥ अंडजयातीमाजी जाण । निजभक्त जन्मला सुपर्ण । तेविं शूद्रयातींत हा वैष्णवजन । उपमा गौण दिसताहे ॥५३॥ गरुडें विष्णूचें होऊनि वहन । आपुलें शरीर केलें पावन । तुकयानें करूनि हरिकीर्तन । जडजीव संपूर्ण उद्धरिले॥५४॥पुढेंही याची ऐकोनि कविता । वैराग्य उपजेल खळांचे चित्ता । भाविक सज्ञान वैराग्यभक्तां । मार्ग प्रांजळ दाविला॥५५॥ऐसें बोलोनि द्विजवर । तुकयासि करिती नमस्कार । येरू वरचेवरी धरूनि शिर । चरणीं सादर लागला॥५६॥विप्रांसि ह्मणे ऐका मात । हें तुह्मीं करितसां अनुचित ।आमुचा स्वामी भृगूची लात । हृदयीं वागवित अद्यापी॥५७॥जो देवाधिदेव जगज्जीवन । त्यासही तुह्मीं पूज्यमान । आणी मी हीनयाति अनाथ दीन । देतसां थोरपण निजकृपें।५८।यावरी द्विजवर उत्तर देती । ज्यासि विष्णुभजनीं लागली प्रीती । त्याची ह्मणावया नीच जाती । कुंठित श्रुती जाहल्या कीं ।५९।वानर विनटले श्रीरामभजनीं । ते वाल्मीकें वर्णिले रामायणीं । गोवळ्यांची कीर्ति पुराणीं । ठेविली लिहूनी श्रीव्यासें॥ १६०॥ह्मणोनि तुह्मी करावया स्तुती । अधिकार आहे आह्मांप्रती । जे विष्णुभक्तांची अद्भुत कीर्ती । भरूनि त्रिजगतीं उरली असे। ६१ ।बहुत दिवस होता हेत । तो आज पुरला मनोरथ । जे मांडी चिरूनि निजहस्तें त्वरित । दाविली प्रचीत आह्मांसी। ६२।पुढती आलिंगन देऊनि प्रीतीं । ब्राह्मण तुकयासि काय बोलती । चिंचवडीं चालोनि एक रातीं । कीर्तन निगुतीं करावें॥ ६३॥ त्यांचें राखावया मनोगत । नगरांत गेले एक रात । तों लोहोगांवींचे मिळोनि गृहस्थ । विचार करिती एकमेकां ६४ ह्मणती तुकयासि आणोनि आपले नगरीं । कीर्तन ऐकावें धणीवरी । ते सेवितां प्रेमामृतलहरी । सार्थक संसारीं होईल ।६५।मग तुकयासि विनीत होऊनी । लोहोगांवांस नेलें तयांनीं । नित्यानित्य आवडीकरूनी । ऐकती श्रवणीं हरिकथा ।६६।भाविक लोक जे सज्जन । करिती ब्राह्मणसंतर्पण । नानापरीचीं पक्वान्नें करून । घालिती भोजन विप्रांसी।६७।दिव्य मंडप उभारून । पुष्पहार सुगंधचंदन । कीर्तनासि प्रारंभ होतां जाण । करिती पूजन वैष्णवांचें।६८।लोहोगांवांत एक मास । नित्यनित्य सोहळा विशेष । तंव पंढरपुरचे हरिदास । देशावरास चालिले।६९।तंव व्यवसायी बैसोनि अश्वावरी । सत्वर चालिला बाजारीं । देखोनि हरिदास ते अवसरीं । काय बोलती तयासी।१७०। अश्वारूढ होऊन मार्ग क्रमिसी । येथें तुज निद्रा लागली कैसी । हें नवल देखोनि दृष्टीसीं । आश्चर्य आह्मांसी वाटलें । ७१ । तंव व्यवसायी बोले त्यांकारण । चारी प्रहर रात्रीं जागरण । ऐसें एक मासपर्यंत जाण । होतसे कीर्तन तुकयाचें।७२। ऐसी ऐकोनियां मात । हरिदास जाहले चिंताक्रांत । ह्मणती आपण लोहोगांवांत । आतां न जावें सर्वथा ॥ ७३ ॥ जेथें प्रेमळाचें कीर्तन होत ।

आपुलें कसब न रुचे तेथ । जेविं रोगिया लाधलें दिव्यामृत । तो न घे औषध कल्पांतीं।७४। अमूल्य हिरियांची दीप्ती ।
काचमणी लोपोनि जाती । नातरी उदयासि येतां गभस्ती । दीपक हरपती त्यापुढें।७५।समीप गंगा वाहतां जाण । तेथें
मग वापीकूपांसि पुसे कोण । तेविं प्रासादिकांचें ऐकतां कीर्तन । धीटपाठ गायन रुचेना ।७६। तरी लोहोगांव डावलो-
नियां पुढारा । आतां चलावें आणिका नगरा । ऐसें बोलोनियां येरयेरां । हरिदास सत्वर परतले ।७७। गांवींचे लोक
होते तेथ । ते सत्वर येऊनि नगरांत । तुकयासि सांगती वृत्तांत । जो देखिला दृष्टीसी ॥७८॥ ऐसें ऐकतांचि वचन ।
तेथोनि उठिला न लागतां क्षण । ह्मणती आपण सामोरें जाऊन । आणावें प्रार्थून हरिदासां ॥७९॥ आपण सवेग चा-
लत । अंतरीं उल्हास वाटे बहुत । ग्रामवासी लोक समस्त । तेही चालती सामोरे॥१८०॥ह्मणती पंढरीक्षेत्री हरिदास ।
चालिले होऊनि उदास । तरी आपण प्रार्थूनियां तयांस । आणावें नगरास आपुल्या॥८१॥मग पुढें धांवणार पाठवूनी।
परतविलें तयांलागोनी । ह्मणती वैष्णवतुका आवडीकरूनी । भेटावयासी येतसे ॥८२॥ इतुका निरोप सांगतां जाण ।
तंव तेही पावले न लागतां क्षण । मग हरिदासांसि करूनि नमन । देऊनि आलिंगन भेटले ॥८३॥ तुकयास ह्मणती क्षे-
त्रवासी । आह्मीं पातलों देशावरासी । कीं घरीं लग्न वैशाखमासीं । करणें असे पुत्राचें ॥ ८४ ॥ अवश्य ह्मणोनि ते वेळे ।
गांवांत हरिदासासी आणिलें । रहावयासि देऊनि स्थळ चांगलें । सिधासाहित्य पाठविलें॥८५॥करूनियां भोजन ।
रात्रीं करिती हरिकीर्तन । एक मासपर्यंत जाण । होतसे आनंद या रीतीं॥८६॥ मग ग्रामवासियां भाविकलोकां । आ-
ज्ञा करी वैष्णव तुका । आतां देशावर करूनि देखा । हरिदासां वाटे लावावें॥८७॥ ब्राह्मणाचे कष्ट घेऊन । मग त्यासि
द्यावें द्रव्यदान । हें तुह्मांसि वाटतें भूषण । परी पदरीं पुण्य पडेना॥८८॥तरी नगरांत आहेत वस्तीकर । नांदताति लहा-
न थोर । त्यांची शक्ति पाहूनि साचार । मागा देशावर सकळांसी॥८९॥ऐकोनि तुकयाची वाणी । अवश्य ह्मणती त-
ये क्षणीं । मग दूऊत लेखणी पत्र आणोनी । आसाम्या मांडोन दिधल्या ॥१९०॥ उत्तम मध्यम कनिष्ठ जाण । नगरांत
नांदत असती जन । ते ह्मणती तुकयालागोन । पत्रीं अंक घालावा ॥९१॥मग उत्तमावरी घालूनि तुळ । टाळी लिहि-
ली मध्यमावर । कनिष्ठावरी पकार । लिहिला सत्वर ते समयीं।९२।तें देखोनि ग्रामवासी । ह्मणती हें नये आमुचे चि-
त्तासी । मग तुका उत्तर देत तयांसी । जें येईल चित्तासी तें करा ।९३। त्यांणीं उल्हास धरूनि अंतरीं । मूळू लिहिलें उ-
त्तमावरी । उदाणूकें आंख झडकरी । मध्यमावरी टाकिला ।९४। पकार होता कनिष्ठावरी । एक आंख घातला त्याव-
री । तुकयासी दाऊनि सत्वरीं । गांवकरी ऊठले ।९५। गांवांत जाऊनि सत्वर । उकलोनि आणिलें देशावर । मुख्य जे
ह्मणवीत होते थोर । ते तुकयासि उत्तर बोलती९६पुढें ठेऊनि द्रव्यराशी । ह्मणती आह्मीं युक्ती केली कैसी । आतां देशा-
वर हरिदासांसी । आपुले हातीं समर्पा ॥ ९७ ॥ ऐसें बोलतां ते अवसरीं । तुकयासि कळों आलें अंतरीं । कीं दातियांच्या
चित्तांतरीं । अहंकार वैरी प्रकटला ।९८।जैसी पक्कान्नांत पडिली मक्षिका । कीं दुग्धामाजी लवणकणिका । कीं प्रेमळां-



माजी लटिका । कुटिल येऊन बैसला ।९९।कीं तारुण्यदशेंत क्षयरोग । कीं विप्रसभेंत प्रकटला मांग । नातरी विरक्तासि
स्त्रीसंग । कर्मयोगें जोडला २०० कीं क्षेत्र पिकासि आलें बहुत । तों टोळधाड पडली अकस्मात । कीं पश्चिम धान्यावरी
मार्गेश्वरांत । तांबारा अवचित पडियेला ।१। नातरी गगनीं वोळल्या पर्जन्यधारा । तों अकस्मात सुटला दक्षिणवारा।
कीं पौर्णिमेचा चंद्र उगवतां बरा । तंव राहु प्रकटला त्याआड ।२।तेविं दान देते अवसरीं । यांस अभिमान पातला वैरी ।
जेणें होय याची बोहरी । तैसीच परी करावी।३।मग लोकांसि ह्मणे वैष्णवभक्त। देशावर आणिलें तुह्मीं समस्त । तरी चु-
कलें वांकलें गांवांत । राहूं सर्वथा न द्यावें । ४ । लोक ह्मणती ते वेळ । गांवांत साळी एक दुर्बळ । तो निंदक नष्ट महाखळ ।
नाहीं प्रेमळ अंतरीं।५।तो एक राहिला असे जाण। इतरीं दिधलें शक्तीप्रमाणें। ऐसें ऐकोनिया वचन। भक्त प्रेमळ बोलती
।६।तुह्मीं जाऊनि त्याचे मंदिरीं । माझा निरोप सांगा सत्वरीं । रुका अधेला कांहीं तरी । आणा धर्मार्थ मागुनी।७।ऐकू-
नि तुकयाचें वचन । आश्चर्य करिती सकळजन । मग साळियाचे घरासि जाऊन । अंगणीं उभे राहिले॥८॥परी तो कां-
हींच न बोले वचनासी । पाजणी करी वेगेंसीं । तुह्मीं कोण आलेत कासयासी । उत्तर कोणासी करीना ॥९॥ गांवकरी
विस्मित होऊन । एकमेकांसि सांगती खूण । ह्मणती तुकयाचे भिडेकरून । मूर्खापासीं पातलों ॥ २१० ॥ परी हा काहीं
न बोले वचन । मग बोलते जाहले सकळ जन । पंढरीचे हरिदास आले जाण । एक मास कीर्तन होतसे ११ कांहीं देशा-
वर मागावयासी । तुकयानें पाठविलें तुजपासीं । वचनें ऐकोनियां ऐसीं । मूर्ख मानसीं संतापला १२ह्मणे तुकयानें मां-
डिली बडबड । तैंपासोनि तुह्मां लागलें वेड । सांडोनियां लौकिकचाड । नाचतां उघड कीर्तनीं १३ आपुल्या संसारा
पाहूनि तुटी । आतां कां घेतसां माझी पाठी । घरीं नाहीं थाळा वाटी । मी तुह्मांसि शेवटीं काय देऊं॥१४॥ऐकूनि मू-
र्खाचें वचन । कांता बोले त्यालागून । थोर थोर लोक तुकयाचे वचनें । अंगणीं येऊन उभे कीं १५ तुह्मीं निंदक परम-
खळ । मुखें न बोला शब्द रसाळ । बैसावयासि निर्मळ स्थळ । तेंही न मिळे सर्वथा॥१६॥आतां विवेक करूनि चित्तीं ।
कांहीं तरी द्यावें यांप्रती । ऐकूनि कांतेची वचनोक्ती। मूर्ख चित्तीं संतापला॥१७॥सक्रोध होऊनि बोले काय । एक तां-
ब्या घरांत आहे । तो यांस देऊनि लवलाहें । वाटे लावीं सत्वर ॥ १८ ॥ ऐकूनि भ्रताराचें वचन । कांता पावली समा-
धान । मग उदकपात्र आणून । त्याचे करीं दीधलें॥ १९ ॥ त्याणें दिधलें डाव्याकरीं । यांणीं लाभ अनुभविला अंतरीं ।
तांब्या घेऊनियां करीं । निघाले झडकरी तेथूनी॥२२०॥ आश्चर्य करिताती सकळ । ह्मणती प्रसन्न जाहला खळ । दा-
वाग्नि होय शीतळ । कीं शेरास फळ जैसें आलें।२१।आजि शुष्ककाष्ठास अंकुर फुटला । कीं पाषाणासि घर्म दाटला।
कीं राहु सोज्वळ होऊनि भला । प्रकाश पाडिला जगावरी ॥ २२ ॥ तैसेंचि घडोनि आलें स्पष्ट । जे उदारत्व धरी हा
परमनष्ट । एक ह्मणती आपुलें अदृष्ट । सानुकूल होतें कीं ॥२३॥ ऐसें बोलोनि परस्पर । तुकयापासीं आले सत्वर । पुढें
ठेऊनि उदकपात्र । करिती नमस्कार तेधवां ॥ २४ ॥ तें देखोनि वैष्णववीर । लोकांसि बोले प्रतिउत्तर । तो साळी आ-

हे मोठा उदार । दिधलें देशावर बहुतची ॥ २५॥ आपुले करें घेऊनि त्वरित । ह्मणती हें आहे सुवर्णपात्र । तुह्मांस न कळलें अणुमात्र । परीक्षा स्वतंत्र कळेना ॥२६॥ लोक ह्मणती तये वेळ । हें पितळेचें पात्र सोज्वळ । उजळोनि केलें अति निर्मळ । कांचना ऐसें दिसतें कीं॥२७॥अग्नींत तावूनि पाहतां जाण । तंव तें आहे शुद्ध सुवर्ण । ऐसें कौतुक देखोन । विस्मित मन सकळांचें२८ ह्मणती अघटित संतांचा महिमा।। पितळेची दवडिली काळिमा । अद्भुत तुकयाचा भजनप्रेमा । यावया उपमा नसे कीं २९ मग हरिदासांसि बोलावून । केलें तयांचें चरणक्षालन।पुष्पहार गळां घालून । दिधलीं वस्त्रें सकळांसी३० गांवकरी ह्मणती देशावर। आणिला करा अंगीकार । सकळ करिती नमस्कार । अति आदरेंकरूनी ३१ मग वैष्णव तुका काय बोलत । ग्रामवासी हे उदार बहुत । यांणीं द्रव्य उकलोनि त्वरित । दिधलें निश्चित तुह्मांसी ३२ एक दुर्बळ साळी ग्रामवासी । परम शठ ह्मणती त्यासी। त्याणें सुवर्णपात्र तुह्मांसी। मनोभावेंसीं अर्पिलें।३३। हें तुळसीदळ अंगीकारून । करावें आपुले पुत्राचें लग्न । ऐसें बोलोनियां वचन । वंदिले चरण सद्भावें ।३४। आह्मीं एक उदार दाते जनीं । हा अभिमान होता ज्यांचे मनीं । ते हें कौतुक देखोनि नयनीं । लज्जित मानसीं जाहले३५हरिदास संतोष मानूनि बहुत । पंढरपुरासि गेले त्वरित । प्रेमळ तुका अतिविरक्त । देहूग्रामासी पातला३६ सांडोनियां सन्मानपूजा । हृदयीं चिंती अधोक्षजा । दीन अनाथ आणि राजा । सारिखेचि मानी दृष्टीसी।३७तंव एके दिवसीं प्रेमळ भक्त। किंचित होता निद्रित । तों दृष्टांत देखिला साक्षात । तो परिसा श्रोते भाविक हो ।३८। इंद्रायणीचे स्नानास जात । तंव काय करी पंढरीनाथ । विप्राचा वेश धरूनि त्वरित । तुकयासि अवचित भेटले ।३९। ब्राह्मण देखूनि दृष्टीसीं । साष्टांग नमस्कार घातला तयासी । मग तुकयाचे मस्तकीं हृषीकेशी । हस्त ठेवीत निजकृपें २४० उपदेश देतांचि त्या अवसरा । नमस्कार केला द्विजवरा । ह्मणे स्वामी येऊनि माझिया घरा । भोजन करा निजप्रीतीं ४१ त्यावरी ब्राह्मण उत्तर देत । आह्मांस पावशेर पाहिजे घृत । तें देशील तरी निश्चित । येतों त्वरित घरासी ।४२। अवश्य ह्मणूनि ते अवसरीं । विप्रासि धरिला आपुले करीं । सत्वर येऊनि स्वमंदिरीं । कांतेप्रती बोलत।४३। ब्राह्मण क्षुधित उपवासी । तरी सिधासाहित्य द्यावें त्यासी । पावशेर घृत नित्य भोजनासी । मनोभावें अर्पावें४४ ऐसें बोलतांचि वचन । कांता झाली क्रोधायमान । ह्मणे कोठोनि आणिला ब्राह्मण । घृत कोठून म्यां द्यावें ४५ऐसें ऐकोनि कठिणोत्तर । अदृश्य झाले शार्ङ्गधर । जो लीलानाटकी सर्वेश्वर । कौतुक दाखवी निजभक्तांसी ४६ ऐसा देखोनि स्वप्नसंभ्रम । जागृतीस आले तुकाराम । हृदयीं अद्भुत दाटलें प्रेम । कौतुक निरुपम देखोनी ४७ ह्मणती कृपा केली सद्गुरुनाथें । परी सेवा घडली नाहीं मातें । मार्गीं जातां गंगास्नानातें । सांपडविलें मजलागीं ।४८। मस्तकीं ठेवूनियां कर । घृत मागोनि पावशेर । घरीं कलह मांडिला थोर। गेले सत्वर ह्मणूनी ।४९ केशवचैतन्य राघवचैतन्य । सांगितली माळिकेची खूण। बाबाजी आपुलें नामाभिधान । बोलिले वचन सद्गुरू । २५० । आवडीचा मंत्र झडकरी । सांगीतला रामकृष्णहरी । जो प्रीतीकरूनि त्रिपुरारी । निरंतरीं

जपतसे ॥५१॥ माघशुद्धदशमी साचार । पाहोनियां गुरुवार । माझा करूनि अंगीकार । गेले सत्वर सद्गुरू ।५२। ऐसा विश्वास धरून । प्रेमें करी हरिभजन । रात्रीं आनंदेंकरून । करीत कीर्तन निजनिष्ठें ॥५३॥ नानापरीचे दृष्टांत अनेक। रसाळ कवित्व प्रासादिक । श्रवणीं ऐकतां सभाग्य लोक । होती तल्लीन मानसीं ॥५४॥ ह्मणती हा नव्हे मानववीर । केवळ ईश्वरीच अवतार । याचेनि मुखें रुक्मिणीवर । करी उद्धार जनांचा ॥ ५५॥ ऐसी प्रतिष्ठा वाढतां जनीं । दुरात्मे संतप्त जाहले मनीं । ह्मणती शास्त्रमार्ग टाकोनी । पाखंड वाणी बोलतसे ॥ ५६ ॥ कर्ममार्ग सकळ बुडवून । भजनीं लाविले भाविकजन । एक भक्तिमार्गावांचून । न बोले आन सर्वथा ॥ ५७॥ तुकयानें केलें जें कवित । त्या वह्या बांधोनि वस्त्रांत । उदकांत बुडवाव्या त्वरित । विचार निश्चित दृढ केला ॥ ५८॥ जैसी गंडकीमूर्ती देखोनी । यवन उगेचि जळती मनीं । मग अंतरीं कुमती धरूनी । टाकूं फोडोनी ह्मणताती ॥ ५९ ॥ कां पिंजऱ्यांत शुक बैसोन । स्वच्छंदें करी रामभजन । तो शब्द कानीं ऐकून । ससाणा मनीं संतापे ॥ २६० ॥ नातरी व्रत करितां एकादशी । मान्यत्व पावला अंबरीष । मग दुर्वास संतप्त होऊनि मानसीं । पातला छळणासी सक्रोधें ॥ ६१ ॥ तैशापरी ते दुर्जन । प्रवेशले तुकयाचें सदन । ह्मणती तुवां पाखंड रचून । लाविले जन भक्तीसी ॥ ६२ ॥ हे तुझी प्राकृत शुद्ध वाणी । सर्वथा ऐकूं नये श्रवणीं । ऐसें ह्मणूनि त्या दुर्जनीं । पुस्तकें हिरोनी घेतलीं ॥६३॥ मोटा बांधोनि सत्वरीं । पाषाण घातले त्यांभीतरी । नेऊनि इंद्रायणीचे तीरीं । उदकामाजी बुडविल्या॥६४॥ ब्राह्मण ह्मणती तुकयालागून । तेरा दिवसांचा घातला पण । जरी कोरडे काढील जगज्जीवन । तरी मानूं प्रमाण यथार्थ ॥ ६५॥ ऐसें बोलोनि ते अवसरीं । गेले सत्वर आपुले घरीं । तुकयाचिया चित्तांतरीं । विक्षेप फार वाढला ॥ ६६ ॥ जैसी कांचेची कुपी ओतिली । ते अवचित फोडूनि टाकिली । कां पट्टकूलाची घडी केली । ते पावकें जाळिली अकस्मात ॥ ६७ ॥ नातरी बकुळाचा वृक्ष लागला । तो अजापाळकें तोडोनि टाकिला । विक्षेप वाटे बनकराला। तैसें तुकयाला जाहलें कीं॥६८॥कीं निर्जळवनींच्या विहिरी बुजवितां।तळमळ करी कनवाळू दाता । नातरी तुळसीबन बोकडें खांडितां । वैष्णवभक्तां विक्षेप ॥६९॥ कां षड्रस रांधिलें पक्वान्न । त्यासि अकस्मात शिवे श्वान । मग स्वयंपाकीण विक्षेप पावोन । उद्विग्न मनीं होतसे ॥ ॥ २७० ॥ कीं गार ह्मणोनि अकस्मात। मुक्ताफळ टाकिलें अग्नींत । मग जोहरी आपुले चित्तांत । हळहळ करी बहुतची ॥७१॥ तेविं वह्या बुडवितां दुर्जनीं । तुकयाचें विक्षेप पावलें मन । जाहलें प्रेमाचें खंडन । अरिष्ट दारुण देखोनी ॥ ७२ ॥ मग देउळांत येऊनि ते अवसरीं । धरणें घेतलें महाद्वारीं । जैसी द्वारांतली पायरी । उठों नेणेंच सर्वथा ॥७३ ॥ ह्मणे अनाथनाथा पंढरीराया । मजहातीं कष्ट करविले वायां । शेवटीं अरिष्ट उठवोनियां । बुडविल्या वह्या उदकांत ॥७४॥ तुवां स्वप्नीं येऊनि वनमाळी । मज मतिमूढासि आज्ञा केली । जे नामदेवाची बाकी राहिली । ते बोलविली प्रासादिक ॥ ७५ ॥ ऐसें असतां रुक्मिणीकांता । तरी हें अरिष्ट ओढवलें कां आतां । बरें जें येईल तुझिया चित्ता । तें पंढरीनाथा करावें ॥७६॥ ऐसें ह्मणोनि ते अव-

सरीं । रूप आठविलें निज अंतरीं । मुखीं मंत्र रामकृष्णहरी । सप्रेमभरीं जपतसे ॥७७॥ न घे फळ मूळ अथवा अन्न । न
बोले कोणासी प्रतिवचन । सांडोनि देहलोभ आशा जाण । उदकपान करीना ॥७८॥ हें निर्वाण देखोनि जगज्जीवनें ।
बाळरूप सांवळें धरिलें सगुण । तुकयाचें करावया समाधान । रुक्मिणीरमण पातले ॥७९॥ मस्तकीं ठेऊनि अभयकर ।
ह्मणे तुझें स्वस्थ असोंदे अंतर । अरिष्ट जाहलें जें दुर्धर । तें मी शार्ङ्गधर निवारितों ॥ २८० ॥ ऐसें बोलोनि ते वेळ । अ-
दृश्य जाहला तमालनीळ । कीं तुकयाचें हृदयकमळ । देखिलें निर्मळ बैसावया ॥८१॥ तेथेंचि अदृश्य होऊनी । सुरवा-
डले चक्रपाणी । पदसंधीचे निरूपणीं । मजलागोनी भासतें ॥ ८२॥ ऐसे तेरा दिवस लोटतां जाण । पुस्तकें पाहाती वि-
चक्षण । तों अक्षरालागीं जीवन । आतळलें नाहीं सर्वथा ॥८३॥ ह्मणती अन्याय घडला नेणतपणें । विष्णुभक्ताचें केलें
छळण । परी तयाचा साह्य जगज्जीवन । अरिष्ट दारुण निरसिलें ॥ ८४॥ ऐसा अनुताप धरूनि अंतरीं । सत्वर आले
महाद्वारीं । तुकयासि ह्मणती ते अवसरीं । पावले श्रीहरी तुजलागीं ॥ ८५॥ कोरडे कागद निघाले जाण । आतां पाहें
दृष्टि उघडून । ऐसें ह्मणोनि सकळ जन । करिती नमन साष्टांगीं ॥८६॥ ह्मणती जयासि साह्य रुक्मिणीपती । तेथें आमु-
चा अपाय तो किती । अमृतकुपींत रोग शिरती । हें कल्पांतीं घडेना ॥ ८७॥ नातरी भास्कराचिया घरा । प्रवेश नव्हे-
चि अंधकारा । कीं चंद्रमंडळांत उबारा । रिघों न शके जया रीतीं ॥८८॥ तेविं विष्णुभक्तावरी प्रयत्न । करितां अरिष्ट
न चले जाण । ऐसें परस्परें बोलोनि वचन । नामस्मरण करिताती ॥ ८९ ॥ तुका नेत्र उघडोनी । पुढें पाहे विलोकूनी । तों
कोरड्याचि वह्या ब्राह्मणांनीं । देउळीं आणूनी ठेविल्या ॥२९०॥ हें कौतुक दृष्टीसि देखोन । चित्तीं वाटलें समाधान ।
जैसें अंधासि नेत्र येतां जाण । उल्हासे मन तयाचें ॥९१॥ कीं मुखीं घालितां सुधारस । प्रेत जैसें उठोन बैसत । तैसा तु-
कयाचे मनीं उल्हास । ह्मणे पंढरीनिवास पावला ॥ ९२॥ बद्धांजली जोडूनि मग । स्वमुखें बोलिला सात अभंग । तो
अनुपम बहुत प्रेमरंग । वर्णितां नये सर्वथा ॥ ९३ ॥ परी किंचित अन्वय यथानिगुती । परिसा श्रवणीं निजप्रीतीं । तु-
कयानें लाविलीं नेत्रपातीं । सद्गद चित्तीं होऊनी ॥ ९४ ॥ ह्मणे जयजयाजी श्रीविठ्ठला । बहुत अन्याय मज घडला ।
लागूनि लोकांचिया बोला । भार घातला तुजवरी ॥ ९५॥ तुज केला बहुत शीण । मी तंव अधम यातिहीन । तेरा दि-
वस झांकोनि नयन । तुझ्या द्वारीं बैसलों ॥ ९६॥ तहान भुकेचें कोडें श्रीहरी । तोही भार घातला तुजवरी । माझिया
बैसोनि हृदयमंदिरीं । योगक्षेम मुरारी त्वां केला ॥९७॥ उदकीं कोरडे राखिले कागद । चुकविला लौकिक अपवाद ।
त्वां अनाथनाथें आपुलें बिरुद । साच केलें दयाळा ॥ ९८॥ बाळवेष धरूनि निगुतीं । मज भेटलासि रुक्मिणीपती ।
समाधान करूनि प्रीतीं । अभय निजहस्तें दीधलें ॥९९॥ आतां कापोत माझी मान । सुखें पीडा करोत दुर्जन । परी क-
दापि संकट तुजकारण । न घालीं जाण सर्वथा ॥ ३००॥ मी तंव चांडाळ दुष्ट पतित । एकदा चुकी पडली य-
थार्थ । उमें करूनि उदकांत । वह्या राखविल्या तुजहातीं ॥ १ ॥ समर्थासि घालावया भार । आपुल्यास नाहीं अधि-



कार । हें सर्वथा नेणेंच मी पामर । विवेक विचार कळेना ॥२ ॥ होऊनि गेलें जें श्रीपती । ते गोष्टी परतोनि नये पुढती ।
पुढें तरी रुक्मिणीपती । संकट तुजप्रती घालीना ॥ ३ ॥ मानेवरी ठेविली नसतां सुरी । घाय न हाणितां पाठीवरी । तों
म्यां उतावीळ होऊनि श्रीहरी । आकांत तुजवरी हा केला ॥४॥ मजपासीं आणि डोहा-आंत । दों ठायीं वांटलें तुझें चि-
त्त । दोनी चुकवूनियां आघात । वाढविली कीर्ति लौकिकीं ॥ ५ ॥ तुज ह्मणों मायबापासमान । परी तीं स्वल्पासाठीं
घेऊं पाहती प्राण । म्यां तों अघटित केलें जाण । परी साह्य जगज्जीवन तूं एक ॥ ६ ॥ तूं कृपासागर चक्रपाणी । तुजस-
मान न देखों त्रिभुवनीं । स्तुति करावी प्रीतीकरूनी । तरी कुंठित वाणी जाहली कीं ॥ ७ ॥ तूं दीनबंधु दयाळ । शशी-
परीस अतिशीतळ । माउलीपरीस स्नेहाळ । येती कल्लोळ प्रेमाचे ॥८॥ तूं अनिर्वाच्य देवाधिदेव । उपमा द्यावयासि ना-
हीं ठाव । सकळ जीवांचाही जीव । निवाला शिव नाम जपतां ॥९॥ महद्भूतें पांच निर्माण । तींही तुजपासोनि जाण ।
गोड ह्मणूं अमृतासमान । तरी तूं जगज्जीवन त्यापरता ॥३१०॥ आतां न बोलतां कांहीं । उगाचि माथा ठेवितों पायीं ।
अनंत अपराध विठाबाई । क्षमा करीं तूं स्नेहाळे ॥११॥ मी अवगुणी अन्यायी फार । किती सांगों वारंवार । पुरेपुरे हा
संसार । चित्त स्थिर होऊं नेदी ॥ १२ ॥ अनंत बुद्धीचे विकल्प जाण । तरंग पालटती क्षणक्षण । संसर्ग करितां जाण ।
तैं बद्धमन होतसे ॥ १३ ॥ देवाधिदेवा पंढरीनाथा । सकळ निरसीं माझी चिंता । कर्मजाळ निरसोनि अनंता । हृदय-
मंदिरीं असावें ॥१४॥ ऐशिया रीतीं तुकयानें । प्रेमें आळविला श्रीरुक्मिणीरमण । मग अंतरगाभारां रिघोन । दिध-
लें आलिंगन देवासी ॥ १५॥ सगुणस्वरूपीं गुंतले लोचन । मुखें करीत नामस्मरण । पुढें देहासहित तुकाराम जाण ।
वैकुंठभुवन पावला ॥ १६ ॥ ते कथा सविस्तर ल्याहावी ग्रंथीं । तों हृदयस्थ सांगे रुक्मिणीपती । कीं तुकाराम अद्यापि
स्थितीं । आहे निश्चितीं इहलोकीं ॥ १७ ॥ निजनिष्ठ जे कां प्रेमळभक्त । तयांसि स्वप्नीं दर्शन देत । जैसा दत्तात्रेय अ-
नसूयासुत । स्वेच्छा विचरत भूमंडळीं ॥ १८ ॥ याचा संशय वाटेल मनीं । तरी साक्ष ऐकिजे संतसज्जनीं । निळोबाचे
स्वप्नीं येऊनी । उपदेश केला निजकृपें ॥ १९ ॥ जया चित्तीं शुद्ध असेल प्रेम । त्यासि उपदेश देती तुकाराम । तो जग-
द्गुरु निरुपम । अद्यापि असे चिरंजीव ॥ ३२० ॥ त्यानें कृपा करूनि एकांतीं । ग्रंथ लिहविला माझे हातीं । परी येविष-
यीं विचक्षण श्रोतीं । संशय चित्तीं न धरावा ॥२१॥ तो विश्वव्यापक चैतन्यघन । सद्गुरु तुकाराम आह्मांलागून । मही-
पती तया अनन्यशरण । देहाभिमान टाकोनी ॥ २२ ॥ स्वस्ति श्री भक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐ-
का भाविकभक्त । द्विपंचाशत्तमाध्याय रसाळ हा ॥ ३२३ ॥ अध्याय ५२ ॥ ओंव्या ३२३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्री भक्तविजय अध्याय ५२ वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीत्रैलोक्यनाथाय नमः । जय विश्वभूषणा विश्वंभरा । मायातीता जगदुद्धारा। सगुणस्वरूपा निर्विकारा । सायुज्य उदारा जगद्गुरू ॥ १ ॥ जयजय मायाचक्रचाळका । पीतांबरधारी वैकुंठनायका । प्रजापती चे जिजनका । वेदोद्धारका पांडुरंगा ॥ २ ॥ वारण आणि अणुरेणूंत । तूं सारिखाचि असती जगन्नाथ । सुरगण पुरंदर निश्चित । सत्तेनें वर्तती तूझिया ॥ ३ ॥ चंद्र सूर्य आकाशीं धांवती । त्यांची सूत्रदोरी तुझिया हातीं । जैसा जळमंडपीं बाहुल्यांप्रती । नाचवितो सुक्तीं निजकळें ॥ ४ ॥ कां एकलाचि प्रभंजन केवळ । हालवीतसे तरुवर सकळ । तैसा लाघवी तूं गोपाळ । ब्रह्मांडगोळ हालविसी ॥५॥ जें जें चराचर दिसतें दृष्टीं । तें तुझ्या रोमरंध्रीं जगजेठी । तो तूं पुंडलीकाचे पाठीं । दोनही कर कटीं ठेविले ॥ ६ ॥ ब्रह्मादिकां पार न कळे जाण । तो तूं निजभक्तांचें पाळिसी वचन । नानापरींचीं संकटें दाखवून । मग निजांगें धांवणें करिसी तूं ॥ ७ ॥ शेषशायी तूं गरुडध्वजा । लक्ष्मी इच्छी तुझिया चरणरजा। तो तूं उभा राहूनि अधोक्षजा । घेसील पूजा दासांची ॥ ८ ॥ योगी बैसले वज्रासनीं । तरी लवकरी न येसी त्यांचे ध्यानीं । तो तूं प्रेमळ भक्तांचे कीर्तनीं । निर्लज्ज होऊनि नाचसीं॥९॥त्या निजभक्तांचीं अघटित चरित्रें। तूंच वदविशीं राजीवनेत्र । येरवीं मी मतिमंद करावया स्तोत्र । बुद्धिस्वतंत्र असेना ॥ १० ॥ मागील अध्यायीं कथा अद्भुत । तुकयासि पावले पंढरीनाथ । कोरडे कागद उदकांत । तेरा दिवस राखिले॥११॥आतां सावध होऊनि श्रोतीं । कथा रसाळ परिसावी पुढती । धामणगांव बाळेघाटाप्रती । प्रसिद्ध जाणती संतसाधू ॥ १२ ॥ तेथील पाटील वैष्णव भला । प्रेमळभक्त माणकोजी बोधला । शूद्र यातींत उपनाम त्याला । जगताप ऐसें ह्मणताती ॥१३॥ ममताई तयाची निजकांता । परम भाविक पतिव्रता । जे भ्रतार आज्ञेविण सर्वथा । न वर्तें वृथा संसारीं ॥ १४ ॥ ज्येष्ठ पुत्र अति उदासी । यमाजी नामाभिधान त्यासि । तैसीच स्नुषा सद्गुणराशी । नाम तियेसी भागीरथी ।१५। ऐसे चौघेजण एकचित्त । प्रपंचीं असोनि अतिविरक्त । हृदयीं आठवोनि पंढरीनाथ । भजन करिती निशिदिनीं।१६।घरीं धनधान्य असे अपार । महत्व मान्यता कारभार । गायी वृषभ निरंतर । गोठण भरून असती पैं ॥१७॥ पंधरा दिवशीं एकादशीसी । जात असे पंढरीसी । नेमवारी धरिली ऐसी । बोधराजें निजनिष्ठें ।१८। द्वादशी पर्वकाळ सुदिन । करी ब्राह्मणसंतर्पण । दीन याचक क्षुधित जाण । वांटित अन्न त्यांलागीं ॥१९॥ त्रयोदशीस उठोन लवलाहीं । परतोनि यावें धामणगांवीं । ऐसे बहुत दिवस लोटतां पाहीं । तों अवर्षण पडलें देशांत ॥ २० ॥ दुष्काळ पडिला अति कठिण । सहा शेरांची जाहली धारण । द्रव्य देऊनि विकत अन्न । दुर्बळांकारण मिळेना ॥ २१ ॥ ऐसा कठिण काळ देखतां दृष्टीं । बोधल्यास करुणा उपजली पोटीं । ह्मणे भूतमात्रीं जगजेठी । आहे सर्वांघटीं व्यापक ॥ २२ ॥ मग कांतेसि नेऊनि एकांतीं । निजहित सांगे तिजप्रती । ह्मणे भुकेलियासि यथाशक्ती । अनोदक देईजे ॥ २३ ॥ क्षुधार्तीयासि द्यावें अन्न । सुकल्या झाडासि घालावें जीवन । शीतकाळीं वस्त्रें अर्पितां जाण । तरी अक्षय पुण्य जोडतसे ॥ २४ ॥ प्रवासीं रोगिया औषध देतां । कीं बुडत्यासि जळांतून काढि-

तां। कीं दुर्बळ ब्राह्मणाचें लग्न करितां। तरी अक्षय पुण्य जोडतसे ॥ २५ ॥ पावकें जळतां विझविलें घर। कीं अनाथ प्रेतास अग्निसंस्कार। तृषाक्रांतासि पाजितां नीर। तरी अक्षय पुण्य जोडतसे ॥ २६ ॥ निर्बळ ढोरासि कुरवाळणें। कीं पाशांतून सावज सोडवणें। याचकांस बोलतां नम्रवचनें। तरी अक्षय पुण्य जोडतसे ॥ २७ ॥ हें सुकृत असतां पदरीं जाण। तरी सात्विक वैराग्य उपजेल तेणें। मग जोडती श्रीरामचरण। पळती विघ्नें विषयांचीं ॥२८॥ येर जप तपें उग्र करिती। तीं फळभोगें सुकृतें विलया जाती। आणि परोपकार जे साधिती। तयांस विरक्ती ठसावे ॥ २९ ॥ यापरी बोधला एकांतीं। शिकवण देतसे कांतेप्रती। अवश्य ह्मणोनि ते सती। तैशाच रीतीं वर्ततसे ॥ ३० ॥ करुणा धरून सर्वांभूतीं। दुष्काळीं अन्नदान करिती। स्वदेशांत प्रगटली कीर्ती। याचक येती धांवूनी ॥ ३१ ॥ साखरेचे राशीवर देखा। गोळा होती मुंग्या मक्षिका। कीं वृक्षच्छायेचिया देखोनि सुखा। पांथ येती धांवोनी ॥ ३२ ॥ नातरी डोंगराचिया उदकापाशीं। श्वापदें येती निजप्रीतीसीं। तेविं बोधल्याचे मंदिरासी। तृषार्त क्षुधार्त येती बहू ॥ ३३ ॥ अश्वावरी सामग्री घालूनि बहुत। पंढरीस निघावें दशमी-आंत। एकादशीस जाऊनि तेथ। स्नान करीत चंद्रभागेचें॥३४॥ जात पुंडलीकाचे दर्शना। हातीं शोभे टाळ वीणा। घालूनि क्षेत्रप्रदक्षिणा। करी गर्जना हरिनामें ॥ ३५ ॥ सप्रेम भरीं ते अवसरीं। लोटांगण घाली महाद्वारीं। मग प्रवेशोनि राउळांतरीं। स्वरूप दृष्टीभरी न्याहाळित।३६।देवासि देऊनि आलिंगन। सांगत आपुले जीवींची खूण। जैसी कन्या सासुरवासिण। गुज सांगत मातेसी ॥३७॥मस्तक ठेऊनि चरणावरी। सभामंडपीं कीर्तन करी। जागरण होत प्रहर चारी। स्वानंदगजरीं तेधवां ॥३८॥विप्राहातीं स्वयंपाक करून। क्षुधार्तीयांसि अर्पावें अन्न। मग देवासी आज्ञा मागून। यावें परतोन गृहासी ३९ ऐसे लोटतां बहुत दिन। पदरींचें सरलें धान्यधन। मग अलंकार वस्ता मोडून। करी अन्नदान याचकां ॥४०॥ गायी वृषभ चाऱ्याविण पीडती। ह्मणोनि वांटिलीं लोकांप्रती। निरुपाधि होऊनि ऐशा रीतीं। भजन एकांतीं करीतसे॥४१॥ निजांगें कष्ट करून। मजूरी करूनि मिळवावें अन्न। त्यांतही अतिथी संतोषवून। कुटुंबरक्षण करितसे॥४२॥ ऐसी येतां दरिद्रआपदा। आपुला निश्चय न सांडी कदा। सद्भावें आळवूनि गोविंदा। गुणानुवाद वर्णितसे ॥४३॥ ऐसी निष्ठा देखोनि चित्तीं। प्रसन्न जाहले रुक्मिणीपती। साक्षात दर्शन एकांतीं। बोधल्याप्रती देतसे ।४४। एक चित्तीं नसतां भावो। सर्वथा न भेटे देवाधिदेवो। प्रेमभक्तीविण पाहाव्रो। जाणपण वावो कासया॥४५॥अंगीं भरतां ज्ञानाभिमान। कदापि न ठसे भोळेपण। जैसा तरुवर थोर वाढला जाण। तो लवों नेणेंची सर्वथा ॥४६॥ कीं वृद्धत्व पावला द्विजवर। त्याचे मुखीं न बैसे वेदाक्षर। कीं कोल्हाटी थोर वाढल्यावर। त्याचें अंग न लवेची ॥४७॥ कीं अग्नीमाजी मडकें भाजिती। त्याची परतोनि नव्हेचि माती। नातरी जीं बीजें अग्नीनें आहाळती। तीं अंकुरासि न येती सर्वथा ॥४८॥ तेविं जाणपण येतां अंगासी। भोळेपण न ठसेच तयासी। भाव विश्वास नसतां मानसीं। हृषीकेशी आतुडेना॥४९॥ह्मणूनि साधुसंतजन। डावलोनि टाकिती ज्ञानाभिमान। जेविं हिवराचे वृक्षाखालून। न जाती सज्ञान सर्वथा ५०असो संतांची वर्णितां स्थिती। पुढें ग्रंथ वाढेल बहुत। बोधल्याची देखोन भोळीभक्ती। पंढरीनाथ भेटला५१ एके दिवसीं हरिदिनीसी। पंढरीस चालिले यात्रेसी। वाटखर्ची नाहीं द्यावयासी। मग कांता मानसीं चिंतावली॥५२॥ चंद्रभागेसि करितां स्नान। ब्राह्मणांसि द्यावया नाहीं दक्षिणा। द्वादशीस विप्रांसि भोजन। कोठूनि द्यावें निजकांते ॥५३॥ तरी काष्टें आणोनियां स्वकरीं। विकीन पंढरीचे बाजारीं। मग कुऱ्हाड घेवोनि करीं। पंढरीस सत्वर चालिले।५४।पायांस न मिळे पायतण। वस्त्रें चवाळ अति जीर्ण। डोक्यास चिंध्या बांधोन। करित भजन श्रीहरीचें ॥५५॥ ह्मणती गेलें घरींचें संपत्तिधन। हें बहुत वाटलें समाधान। देवें मायाजाळ काढोन। प्रपंचभान उडविलें॥५६॥जैसें नितळोनि गेलिया आभाळ। आकाश दिसे अति निर्मळ। कीं पूर वोहटोनि गेलिया तुंबळ। गंगा निश्चळ वाहतसे॥ ५७ ॥ तेविं लया जातां धनसंपत्ती। बोधला निश्चळ जाहला चित्तीं। अंतरीं होऊन प्रेमभरित। भजन करीत चालिला ५८ सन्निध उतरतां क्षेत्र पंढरी। भाराभर काष्टें घेतलीं शिरीं। तीं सत्वर नेऊनि बाजारीं। तीन पैशांवरी दिधलीं५९चित्तीं अनुताप धरून। केलें चंद्रभागेचें स्नान। प्रयोग सांगतां विप्राकारण। दक्षिणा दिधली एक पैसा॥६०॥ एक पैसा मोडून ते वेळां। घेतल्या खारका बुका माळा। राउळा जाऊनि घनसांवळा। भावें पूजिला निजप्रीतीं।६१।रात्रीं ऐकोनि हरिकीर्तन। चार प्रहर केलें जागरण। द्वादशीस करोनियां स्नान। उद्विग्नमन बैसला॥६२॥ ह्मणे विप्रासि शिधा द्यावयासी। अनुकूलता नाहीं आजिचे दिवसीं। मागुती तिरुका देऊनि वाणियासी। पिष्ट अर्धशेर आणिलें ॥ ६३ ॥ तें चवाळ्यांत बांधोन ते अवसरीं। बैसला चंद्रभागेचे तीरीं। ह्मणे कोणी द्विजवर येईल जरी। तरी सभाग्य अंतरीं मी एक ॥ ६४ ॥ नाहीं डाळ तांदूळ लवण। कोण दुर्बळाचें घेईल अन्न। थोरथोर लोक यात्रेसि येऊन। समाराधना घालिती॥६५॥ सांडूनियां दिव्यमंदिर। खोपटांत न येती वस्तीकर। कां पात्रींचें टाकोनियां क्षीर। ताक जेवणार न घेती ६६ तेविं थोर थोर टाकोन यजमान। मजकडे कोण येतील ब्राह्मण। ऐसा चिंताक्रांत होऊन। करीत भजन श्रीहरीचें ॥ ६७ ॥ बोधल्याचा भाव निर्मळ। जाणोनियां भक्तवत्सल। वृद्धब्राह्मण दीनदयाळ। जाहले तत्काळ ते समयीं॥६८॥ हातीं काठी डोईस टोपी। जीर्णवस्त्र नेसले जगजेठी। थरथरां कांपत उठाउठीं। आले वाळवंटीं तेधवां ॥ ६९ ॥ बोधल्यासि ह्मणे जगज्जीवन। तूं आमुचा यजमान पुरातन। मी पंढरीक्षेत्रीं राहून। आशीर्वचन तुज देतों ७०आणिक उदंड असती द्विजवर। त्यांचे यजमान थोरथोर। मज दुर्बळालागीं साचार। कोणीच पामर न पुसती७१ह्मणोनि क्षुधित होऊन पोटीं। पातलों बोधल्या तुझे भेटी। काय साहित्य असेल जें गांठीं। तें उठाउठी मज द्यावें॥७२॥ ऐकोनि विप्राचें वचन। चित्तीं वाटलें समाधान। ह्मणे मज पावला रुक्मिणीरमण। आनंदघन कृपाळू ॥ ७३ ॥ मग चवाळ्याची गांठ सोडूनि सत्वरीं। पिष्ट काढिलें ते अवसरीं। घातलें ब्राह्मणाचे पदरीं। परी संकोच अंतरीं वाटला ॥ ७४ ॥ ह्मणे स्वामी हें कोरडें पीठ। द्यावयासि नाहीं डाळ मीठ।

वचन ऐकोनि वैकुंठपीठ । काय बोलती तेधवां ॥ ७५॥ समयीं होतें जें अनुकूळ । तें त्वां दिधलें ये वेळे । कासया पाहि-
जे लवण डाळ । ऐसें घननीळ ह्मणतसे ॥७६॥ बोधल्याचे चित्तीं आवडी बहुत । कीं ब्राह्मण जेवावा दृष्टिदेखत । हे जी-
वींची खूण पंढरीनाथ । जाणता जाहला ते काळीं ॥ ७७ ॥ मग ह्मणे रुक्मिणीकांत । आमुचें बिऱ्हाड देउळांत । स्वयं-
पाक करावया तेथ । स्थळही रितें दिसेना ॥७८॥ शुभा वेंचोनि देशील मातें । तरी पानगे करून भक्षूं येथें । ऐकोनि बो-
धल्याच्या चित्तातें । संतोष परम वाटला ॥ ७९ ॥ ह्मणे जैसें होतें माझे मनीं । तैसीच बोलिला विप्र वाणी । मग चवा-
ळ्याची ओटी करूनी । शुभा वेंचोनी आणिल्या ॥ ८० ॥ स्नान करोनि आला ब्राह्मण । ओलें वस्त्र नेसला जीर्ण । बो-
धल्यानें यात्रेकऱ्यांपासोन । कृशानु आणोन दीधला ॥ ८१ ॥ ज्याचें ऐश्वर्य देखोनि डोळां । लक्ष्मी जडली चरणकम-
ळा । तो वैकुंठवासी घनसांवळा । पानगे करीत बैसला ॥८२॥ वेदोक्त मंत्र उच्चारूनी । ज्यासी अवदान देती ऋषि हव-
नीं । तो निजभक्तांची आवडी देखोनी । पिष्ट मळीत निजकरें ॥८३॥ हा रुक्मिणीस कळतां वृत्तांत । कीं स्वयंपाक क-
रिती पंढरीनाथ । मग ती वृद्धरूप धरोनि त्वरित । येती जाहली त्या ठायां ॥ ८४ ॥ जैसा दीपक सूक्ष्म होतां जाण । प्र-
काश तैसाच दिसे मलिन । कीं वृक्षासि येतां पोखरपण । लता पिंगट होताती ॥ ८५ ॥ कां मृदंगाऐसाच उमटे ध्वनी ।
कीं पुष्पाऐसाच परिमळ जाण । कीं मेघाअंगीं चपला जाण । शोभायमान चमकत ॥ ८६ ॥ नातरी चित्राऐसा उमटे
रंग । कीं प्रकृतीऐसेंच होय अंग । कां मुगाऐसीच जैसी शेंग । झाडीं असतां वाढतसे ॥ ८७ ॥ कां ऋतुऐसेंच आकाश
होय । कीं ओघाऐसी सरिता वाहे । तेविं भ्रताराऐसीच रुक्मिणीमाय । रूपें नटली तेधवां ॥ ८८॥ मुखांत नाहींत द्विज-
पंक्ती । कर्णीं ताटंकें लखलखती । सौभाग्यभूषणें विराजती । कुंकुम ललाटीं लाविलें ॥ ८९ ॥ शुभ्र फाटकें वस्त्र जीर्ण ।
काठी टेंकीत स्थिरावोन । मग वाळुवंटीं येऊन जाण । जगज्जीवन धुंडीतसे ॥ ९० ॥ तों वाळुवंटीं थाळ घालूनी । पिष्ट
मळीतसे चक्रपाणी । हें देखोनि विश्वजननी । हांसोन काय बोलतसे ॥९१॥ यजमान आला यात्रेसी । एकलेच आलां
त्याजपाशीं । आह्मांसि टाकोनि मागेंसी । स्वयंपाकासी निघालां ॥ ९२ ॥ रुक्मिणी ह्मणे ते समयीं । मी स्वयंपाकार्थ
पातलें पाहीं । मग स्नान करोनि लवलाहीं । बैसली येऊन सन्निध ॥ ९३ ॥ ह्मणे एकलेच करूं पाहतां भोजन । परी जेवा-
वयास आली सुवासिण । ऐकोन बोधल्याचें मन । संतोषयुक्त तेधवां ॥९४ ॥ बोधला विचारी स्वमनांत । अन्न असे कीं
हें किंचित । उभयतां कैसीं जेवितील यांत । न कळे निश्चित मजलागीं ॥ ९५ ॥ अनंतशक्तीची स्वामिणी जेथ । सकळ
सिद्धि ओळंगती तेथ । तिचे हात लागतां त्वरित । आली बरकत अन्नासी ॥९६॥ रांजणीं बैसली भागीरथी । तरी तीं
आटेल कैशा रीतीं । कामधेनूचिया गोठ्याप्रती । चाऱ्यासि तुटी नये कीं ॥ ९७ ॥ नातरी उर्वीचे लग्नांत जाण । नव्हे
स्थळाची अडचण । तेविं जेथें बैसली माता रुक्मिण । तेथें किंचित न्यून न पडेची ॥ ९८ ॥ आतां पक्वान्नें करावीं जर ।
तरी बोधल्याचें दुखवेल अंतर । ह्मणोनि पानगेच भाजिले फार । अमृताहून सुरस जे ॥ ९९ ॥ तीन पात्रें तत्काळ वाढून ।



निजभक्तासि ह्मणे जगज्जीवन । तुह्मींही आतांच उठोन । प्रसाद घ्यावा ये पंक्तीं ॥१००॥ येरू ह्मणे जी द्विजवरा । मी
आतांच न जेवीं सत्वरा । तुह्मीं उभयतां जेविल्या पुढारा । उच्छिष्टपात्र मज द्यावें ॥ १ ॥ अवश्य ह्मणे हृषीकेशी । मग स-
त्वर बैसले भोजनासी । तों सुरवर येवोनि आकाशीं । कौतुक दृष्टीसी पाहती ॥ २ ॥ इतर जनांच्या न पडतां दृष्टीं । परस्परें
बोलताति गोष्टी । ह्मणती भक्तवत्सल जगजेठी । प्रेमळापाठी लागतसे ॥ ३ ॥ आह्मी करितों नानायत्न । परी कदा न करी
अमृतपान । तो बोधल्याची भक्ति देखोन । भक्षी कदन्न निजप्रीतीं ॥ ४ ॥ ब्राह्मण सुवासिनी जेवल्यावर । बोधल्यासि दि-
धलें उच्छिष्टपात्र । निमिष न लागतां शार्ङ्गधर । अदृश्य जाहले तेधवां ॥ ५ ॥ तेव्हां उमजलें याचे मनीं । कीं विप्रवेषें
आले चक्रपाणी । माझें समाधान करूनी । गेले ऐसें वाटतसे ॥ ६ ॥ पात्रीं प्रसाद होता उरला । तो निजप्रीतीनें भक्षी बो-
धला । देउळासि जाऊन ते वेळां । काय बोलिला देवासी ॥ ७ ॥ ह्मणे भक्तवत्सला जगज्जीवना । आजि कदन्न आवडलें
तुझिया मना । थोरथोर टाकूनि समाराधना । सांभाळिलें दीना निजकृपें ॥ ८ ॥ यावरी ह्मणे रुक्मिणीरमण । द्विजांसि
वाढिती नानापक्वान्नें । तेथेंही मी जातसें जाण । परी कोणीच भोजन न घालिती ॥ ९ ॥ बोधल्यास ह्मणती अधोक्षज ।
उदईक कौतुक दाखवीन तुज । तों एका सावकारें सहज । सहस्रभोजन मांडिलें ॥ ११० ॥ सर्व साहित्य करोनि ते दिनीं ।
रात्रीं द्विजांसि सांगीतलीं आमंत्रणें । सकळांचीं नावें पुसोन । पत्रीं लिहोनी ठेविलीं ११ मग वाळुवंटीं कनात देऊनी ।
स्वयंपाक केला दुसरे दिनीं । विप्रांसि स्नानें सांगतां त्यांनीं । पात्रीं येऊनी बैसले ॥ १२ ॥ कागदीं ताळा पाहतां सहज ।
तों सहस्रांची आली बेरीज । तंव बोधल्यास ह्मणे अधोक्षज । कौतुक तुज दाखवितों ॥ १३ ॥ मग आपण जाहला वृद्ध
ब्राह्मण । वस्त्र नेसला फाटकें जीर्ण । हातीं काठी जगज्जीवन । थराथरां मान कांपवित ॥ १४ ॥ ऐसें रूप धरोनि पाहीं ।
सत्वर चालिले लवलाहीं । बोधल्यास ह्मणती तये समयीं । कौतुक पाहीं दुरोनी ॥ १५ ॥ ब्राह्मणपंक्तीपासीं जाण । ये-
ऊन बोलतसे जगज्जीवन । मी क्षुधित उपवासी ब्राह्मण । पक्वान्नभोजन इच्छितसें ॥ १६ ॥ ते ह्मणती परतोन जाईं । येथें
समावेश होत नाहीं । वचन ऐकोन शेषशायी । काय बोलती तेधवां ॥ १७ ॥ सहस्र ब्राह्मण बैसले देख । यांत एक न स-
माये काय आगंतुक । ऐसें बोलतां वैकुंठनायक । सावकार बोलत तें ऐका ॥ १८ ॥ आमंतिले ब्राह्मण असतां जाण ।
आगंतुकाचें काय कारण । ऐसे येतील उदंड जाण । आह्मीं कोठूनि अन्न पुरवावें ॥ १९ ॥ मग बळेंच पात्रीं उठाउठी ।
जाऊनि बैसले जगजेठी । बोधला कौतुक विलोकूनि दृष्टीं । आश्चर्य पोटीं करीतसे ॥१२०॥ सावकार सेवकांस सांगे
देखा । ब्राह्मणास बाहेर उचलोनि टाका । तेव्हां कोणीच न करिती विवेका । वैकुंठनायका उठविलें ॥ २१ ॥ कोणी ध-
रिले चरण हात । कोणी शेंडी धरोनि ओढित । ह्मणती हा ब्राह्मण लंड बहुत । बळेंच बैसतो पात्रावरी ॥ २२ ॥ ऐसें पर-
स्परें बोलोनि वचन । द्विजासि टाकिलें भिरकावून । पुढती सरसावोनि जगज्जीवन । उभे राहिले तेधवां ॥ २३ ॥ तों
इकडे पात्रीं वाढिलें घृत । पुरोहितें संकल्प सोडिला त्वरित । मग आपोशन घेऊनि समस्त । द्विज बैसले भोजना ॥ २४ ॥

हें देखोनि वैकुंठविहारी । परतोनि चालिले ते अवसरीं । जैसा सिद्धांपासोनि त्रिपुरारी । रुसोनि सत्वर निघाला ।२५। जैसीं कुडी सांडोनि प्राण जात । मग देहासि ओढवे कल्पांत । तेविं पाठमोरा होतां रुक्मिणीकांत । विघ्न अद्भुत ओढव-
लें ॥ २६ ॥ अपार सुटला प्रभंजन । धुळीनें कोंडोनि भरलें गगन । अन्नपात्रीं मृत्तिका भरोन । गेलीं उडोन चोहींकडे
॥ २७॥ कनात मंडप सुटोनि पडले । सकळ द्विजवर उठोनि गेले । हें कौतुक बोधल्यासि दाखविलें । आश्चर्य वाटलें त-
यासी ॥ २८ ॥ एक विमुख होतां जगज्जीवन । उपवासी उठले सकळ ब्राह्मण । जैसें मुळापासोनि तोडितां जीवन । मग
शाखा कोठून येतील ॥२९॥ कीं वरमाय मंडपांतूनि रुसोनि जाय । तेथें वऱ्हाडिणी जेवितील काय । कीं वत्सासि पा-
न्हा न देतां गाय । तरी घरधनी काय दोहितील१३०तेविं विप्रमुखें भोक्ता घननीळ । ज्यासि हृदयीं ध्याती जाश्वनीळ ।
तो विमुख होतां दीनदयाळ । विघ्न तत्काळ ओढवलें ॥३१॥बोधल्यासि ह्मणे वैकुंठनाथ । ऐसेच दांभिक लोक समस्त ।
तुझा शुद्ध देखोन भावार्थ । कदन्न आवडत मजलागीं ॥३२॥ म्यां मोडोन दुर्योधनाच्या वचना । विदुराच्या गृहीं खा-
दल्या कण्या । द्रौपदीसतीचे भाजीच्या पाना । आलों पाहुणा अर्धरात्रीं ॥ ३३ ॥ गोपाळांचें उच्छिष्ट जाण । म्यां खा-
दलें निजप्रीतीनें । ऋषिपत्न्यांनीं आणिलें अन्न । तें आवडीकरोन भक्षितसें ॥३४॥ गोपाळ चाळवूनि घालिती कवळ ।
ते मज वाटती अति निर्मळ । ऐसें बोलतां दीनदयाळ । भक्तप्रेमळ संतोषला ॥ ३५ ॥ बोधला ह्मणे जगज्जीवना । तुझा
पार न कळे कवणा । ऐशा रीतीं बोलोनि वचना । मिठी चरणीं घातली ॥ ३६ ॥ चोखामेळा वैष्णवभक्त प्रेमळ । त्याचें
घृत भक्षीत घननीळ । भिल्लिणीचीं उच्छिष्ट फळें सकळ । प्रेम आवडीनें खातसे ।३७। मग देवाची आज्ञा घेवोनि पाहीं ।
परतोनि चालिले धामणगांवीं । मार्गीं चालतां लवलाहीं । तों ओसाड अरण्य लागलें ॥ ३८ ॥ क्षुधेनें तृषेनें व्यापिलें
जाण । जवळ न दिसे पुरपट्टण । निजदासाचें अंतर जाणून । जगज्जीवन पातले ॥ ३९ ॥ इच्छामात्रें तये वेळां । वा-
टेसि निर्माण केला मळा । जे दृष्टीनें देखतां डोळां । विश्रांती वाटे पथिकांसी ।१४०। आपण बनकर होऊनि प्रीतीं ।
मोट हांकी वैकुंठपती । माळीण होऊनि रुक्मिणीसती । वाट पाहाती भक्तांची ॥४१॥ हें बोधल्यानें दृष्टीं देखोन । म-
ळयांत जावयासि न घेच मन । शीत उष्ण दुःख सुख समान । मानोनि भजन करीतसे ॥४२॥ मग पाटींत घालोनि ता-
कभाकरी । कंदमूळ फळें घेतलीं बरीं । लवलाहीं घेऊन मस्तकावरी । रुक्मिणी पुढारी येतसे ॥४३॥बोधल्यासि ह्मणे ते
वेळां । आमचा डावलोनि जातोसि मळा । माळी वाट पाहात बैसला । दुरूनि तुजला देखोनी ४४ तूं पंढरीचा वारक-
री । आमुचा आश्रम पवित्र करीं । क्षुधा तृषा असली जरी । तरी संकोच अंतरीं न धरावा॥४५॥बोधला विस्मित जा-
हला चित्तीं । ह्मणे या स्थळीं कधींच नव्हती वस्ती । मग परतोनि जाऊनि मळयाप्रती । घेतली विश्रांती क्षणभरी
॥४६॥ कंदफळें खाऊनि कांहीं । सत्वर चालिले धामणगांवीं । परतोनि मागें पाहतां पाहीं । तों कोणीच न पडे दृष्टी-
सी ॥४७॥ ह्मणे मी क्षुधित जाहलों बहुत । ह्मणोनि माव रची पंढरीनाथ । मंदिरीं जाऊन वृत्तांत । कांतेप्रती सांगतसे

॥४८॥ एके दिवसीं बोधराज । शेतीं राखण बैसले सहज । ध्यानांत आणोनि अधोक्षज । नामस्मरण करीतसे ॥ ४९ ॥
ह्मणे च्याडियावरी मूठ धरिती जेव्हां । विश्वभाग्य पिको ह्मणे तेव्हां । तरी आतां कासया पक्षी उडवा । त्यांचिया जीवा
दुःख वाटे॥१५०॥ ज्याचें अन्न असेल येथ । ते सुखें खावोत या क्षेत्रांत । सर्वांभूतीं रुक्मिणीकांत । बोलिले संत पुरातन
॥५१॥ मस्तकीं गोफण गुंडाळोन । अनुतापें करीत नामस्मरण । तों पाटींत भाकर घालोन । कांता पातली सत्वर ।५२।
भोजन घालोनि बोधल्यासी । ममतायी बोलिली काय त्यासी । तुह्मीं हुरडा वांटितां याचकांसी । पुढें गति कैसी
होईल।५३।दिवाणाचा फिटला पाहिजे सारा । धान्य लागतें आपुले उदरा । ह्मणोनि माझी गोष्टी भ्रतारा । चित्तीं धरा
आजि एक५४ आपुल्या हातें कणसें जाण । याल तरी विठोबाचीच आण । ऐसें बोलोनियां वचन । कांता गेली मंदिरा
५५तों कीर्तन करीत आनंदेंसी । यात्रा चालिली पंढरीसी । तें बोधल्यानें देखोनि दृष्टीसीं । आनंद मानसीं वाटला ५६
मग माळयाखालीं उतरोन सत्वर।घातला साष्टांग नमस्कार।तों पुढें चालत होते द्विजवर। ते ह्मणती कोमळ अंतर बहु
याचें ५७ ब्राह्मण ह्मणे रे विष्णुभक्ता । तूं दुष्काळीं आमुचा अन्नदाता । जरी कणसें चार देशील आतां । तरी संतोष क्षु-
धिता मज होय ५८ ऐकोनि द्विजवराची वाणी । करुणा उपजली त्याचे मनीं । ह्मणे मज कांतेनें आण घालूनी । घरासि
गेली आतांची।५९। तरी तुह्मीं जाऊनी क्षेत्रांत । कणसें न्यावीं आपुले हातें । ऐसी ऐकतांचि मात। विप्र चित्तांत संतोष-
ला ।६०। लगबगें मोडितां ते अवसरीं । तों मागोन आले यात्रेकरी । त्यांणीं द्विजवराचे करीं । कणसें देखिलीं तेधवां६१
मग विठ्ठलनामें गर्जोन सत्वरीं । बोधल्यासी ह्मणती ते अवसरीं । आह्मांसि कणसें देशील जरी।तरी कृपा श्रीहरी करी-
ल तुज६२महर्घता पडली अतिकठिण । तीन पायल्यांची जाहली धारण । ये समयीं करिशील अन्नदान । तरी अगणित
पुण्य होईल ।६३। वचन ऐकोनि बोधल्यानें । चित्तीं वाटलें समाधान । ह्मणे धन्य आजिचा सुदिन । संतसज्जन भेटले
॥६४॥मग यात्रेकऱ्यांस ते अवसरीं । ह्मणे कणसें मोडा आपुले करीं । मज शपथ घालोनि झडकरी । कांता मंदिरीं गेली
असे।६५। यात्रा होती दोन शतें । क्षेत्रामाजी शिरले त्वरित। जोंधळा लुटोन केला फस्त । मग निघाले समस्त बाहेरी ६६
गांवांत कळला वृत्तांत । कीं बोधल्यानें लुटविलें शेत । ऐकोनि नरनारी समस्त । आश्चर्य करिती मानसीं।६७।एक ह्म-
णती अतिउदार । एक ह्मणती दिवाळखोर । एक ह्मणती त्याचा संसार । रुक्मिणीवर चालवितो ।६८। पुत्र कांता गां-
जितील ह्मणोन । गांवांत नयेच परतोन । ध्यानांत आणोनि जगज्जीवन । सप्रेम भजन करीतसे ॥ ६९ ॥ तंव ज्येष्ठपुत्र
वृत्तांत ऐकोनि । पाहावयसि आला तयेक्षणीं । तों थोड्या ताटांस दृष्टीं देखोनी । उद्वेग मनीं वाटला ॥ १७० ॥ चिंता-
क्रांत बैसला तेथ । पित्यासि कळलें समस्त । एक अभंग उपदेश तेथ । केला असे पुत्रासी ॥७१॥ ह्मणे ऐक बापा जिवा-
चें लक्षण । हें व्यर्थचि धरितोसि कृपणपण । जैसी मधुमक्षिका उपवासी राहून । रस सांचवोन ठेवीती।७२।मग पारधी
येऊन एक वेळ । झाडोन नेत तें मोहळ । मग मक्षिका करिती तळमळ । अरण्यामाजी जाऊनी॥७३॥ तेविं कृपणता प्र-

रोनि पोटीं । लोक करिती संसाररहाटी । मग आलिया नागवणीची पटी । देती शेवटीं धनधान्य ७४ आजि सत्पात्रीं वेंचिलें शेत । आणि तूं कां मनांत चिंताक्रांत । ऐसें बोलतां प्रेमळभक्त । अनुताप चित्तांत ठसावला ॥७५॥ हरिणीच्या पाडसाकारणें । शिकवणें न लागती जैसीं किरणें । कीं विहंगमीच्या पिल्यांस जाणें । उडतां कष्ट न होती ।७६। नातरी मीनाचिया पिलियां । सांगड बांधणें कासया । तेविं यमाजीस अनुताप ह्वावया ।सायास नाहीं लागले॥७७॥बोधल्यास करोनि साष्टांगनमन । घरासि नेलें हातीं धरून । मग ममतायीस सकळ वर्तमान । जाहलें तैसें सांगीतलें ७८यात्रेकऱ्यांसि शेत वांटिलें । ऐकोनि कांतेसि समाधान वाटलें । ह्मणे सत्पात्रीं अन्न वांटिलें । हें सुकृत फळलें मागील कीं ॥७९॥ वाटलें पत्नीस समाधान । परि निंदा करिती कुटिल पिशुन । ह्मणती दिवाणसारा कोठून । देईल आतां कळेना ॥१८०॥ तंव गांवांत पटी मांडिली जाण । वायदा लिहिला सात होन । गांवकरी समापत्र करून । काय बोलती तें ऐका ॥८१॥ पदरीं नसतां कांहीं ताकत । बोधल्यानें लुटवून टाकिलें शेत । हरिनाम गर्जोनि दिवसरात । टाळ कुटित निजप्रेमें॥८२॥ तरी त्याचे आधीं मागावे होन । मग आपण देऊं सकळ जन । ऐसा विचार दृढ करून । पत्र लिहून पाठविलें।८३॥यांत अंतर करील कोणी दुसरा । तरी बोधल्याचा त्याणें द्यावा सारा । मग हवालदार पाठवून त्याचिया घरा । ह्मणे होन सत्वर देइजे ॥ ८४ ॥ तीन होन मंदिरीं होते जाण । चार न मिळती करितां प्रयत्न । तंव गांवांत एक नागाऊ ब्राह्मणीण । सावकारीण होती कीं ॥८५॥ प्रहररात्र लोटल्यावरी । बोधराज गेले तिचिया घरीं । ह्मणे कलांतर घेऊन अगोदरी । होन चार सत्वरीं मज द्यावे ॥ ८६ ॥ अवश्य ह्मणे सावकारीण । प्रातःकाळीं देईन होन । मग बोधराज सत्वर उठोन । निजमंदिरा पातला ॥८७॥ द्रव्याची चरवी भरोनि मोठी । ठेविली होती भुईचे पोटीं । ते उकरोनियां उठाउठी । चार होन त्यांतून काढिले ॥ ८८ ॥ दुसरे दिवशीं गांवांत । तीस परस्परें कळली मात । कीं यात्रेकऱ्यांहातीं शेत । लुटविलें निश्चित तयानें ॥ ८९ ॥ नागाऊ ह्मणे आपुले चित्तीं । होन दिधले परतोनि न येती । व्याजाची लालुच धरिली निश्चिती । तरी मुद्दलचि बुडेल दिसताहे ॥ १९० ॥ भुसाची आशा धरितां जाण । तरी वृषभ खाऊन जातील कण ।कीं ताकाचें भाजन करितां रक्षण । तंव दुग्धचि नासोन जाईल ॥९१॥ प्रत्यक्ष आहाणा बोलती जन । अदमणासाठीं जातो मण । टक्याची आशा धरितां जाण । तों सगळाच होन बुडतसे ॥९२॥ असो दुसरे दिवशीं बोधला येऊन । नागाऊपाशीं मागे होन । ती ह्मणे एकाचा भरंवसा धरून । तुह्मांसि वचन दीधलें॥९३॥परी तो आतां ह्मणतो नाहीं । यासि उपाय आपुला कायी । आणिक तों धामणगांवीं पाहीं । सावकार कोणी नसे कीं॥९४॥वचन ऐकूनि प्रेमळभक्त । घरासि उठोनि आला त्वरित । मनीं होऊनि चिंताक्रांत । काय बोलत कांतेसी॥९५॥साऱ्यासाठीं अडविलें फार । कोठें होन मिळती चार । तरी मी राळेरासि जाऊनि सत्वर । पाहतों सावकार एखादा ॥ ९६ ॥ ऐसें बोलोनि कांतेप्रती । बोधराज निघाले सत्वरगतीं । मार्गीं चालतां एकांतीं । श्रीहरीचें भजन करीतसे ॥ ९७ ॥ गोविंदा गोपाळा श्रीपती । जगदुद्धा-



रा अमूर्तमूर्ती । सगुणस्वरूपा अक्षय चित्तीं । भजनप्रीती असोंदे ॥ ९८ ॥ तंव इकडे गांवांत बोभाट जाहला । ह्मणती बोधला पळोनि गेला । द्वारीं प्यादा येवोनि बैसला । दारवटा बंद केला तयानें।९९।गुरें वासरें ते अवसरीं । कोंडून टाकिलीं घरच्या घरीं । कृशानु उदक भीतरीं । जाऊं नेदीच सर्वथा ॥२००॥ ऐसा दुर्जनीं अपाय करितां । करुणा उपजली पंढरीनाथा । ह्मणे संकट पडलें माझिया भक्ता । तरी कार्य आतां साधावें ॥१॥ त्याणें लुटविलें नसतें शेत । तरी कां होता ऐसा आकांत । मग अंत्यजरूप धरूनि त्वरित । रुक्मिणीकांत पातले ॥ २ ॥ गांवींचा होता विठामाहार । तैसेच जाहले शार्ङ्गधर । सात होन घेऊन सत्वर । चावडीस नेऊन दीधले ॥ ३ ॥ जोहार मायबाप ऐका वचन । माणकोजी पाटलानें पाठविले होन । मग चौगुल्यापासीं देऊन । जगज्जीवन परतले ॥ ४ ॥ गांवकरी यांणीं करोनि पटी । पोतें पाठविलें उठाउठी । ह्मणती बोधल्यास या संकटीं । द्रव्य कोठोनी मिळालें ॥५॥ दुसरे दिवशीं प्रेमळ भक्त । होन घेऊन आला त्वरित । तंव बोभाट नाहीं गांवांत । दिवाणाचें पोतें सरलिया ॥ ६ ॥ चौगुले काय बोलती वचन । तुह्मीं माहाराहातें पाठविले होन । ते आह्मीं सत्वर घेऊन । पोतें पाठविलें राजद्वारीं ॥ ७ ॥ कांतापुत्रांसि पुसतां पाहीं । तीं ह्मणती ठाउकें आह्मांसि नाहीं । मग विठ्या माहारासि लवलाहीं । बोलावून पुसतसे ॥ ८ ॥ तो ह्मणे माझिया घरीं अन्न । एका दिवसाचें नाहीं जाण । आणि मी तुमचा सारा कोठून । देईन नेऊन चावडीसी ॥ ९ ॥ ऐसी ऐकोनि वचनोक्ती । बोधला उमजला आपुले चित्तीं । ह्मणे माझें संकट देखोन प्रीतीं । रुक्मिणीपती पावले ॥ २१० ॥ कंठ जाहलासे सद्गदित । नेत्रीं अश्रुपात वाहात । ह्मणे दीनदयाळ अनाथनाथ । शिणलेत कीं मजलागीं॥११॥ क्षीराब्धिवासा पंढरीराया । त्वां अंत्यजवेष धरिला कासया । मी तरी सोडून प्रपंचमाया । तुझिया पायां जडलों कीं ॥ १२ ॥ तुझे भजनाचें लागलें वेड । मजला लोकांची नाहीं चाड । नाशवंत हें शरीर जड । याचेंही कोड न धरीं मी ॥१३॥ आतां सगुणरूप धरोनि त्वरित । मज भेट देई साक्षात । बोधल्याचा शुद्ध देखोनि हेत । पंढरीनाथ पावले ॥ १४ ॥ देवासि भेटोनि त्या अवसरा । ह्मणे कोठून दिधला आमुचा सारा । ऐसें पुसतां भक्तचतुरा । अनाथसोयरा काय बोले ॥ १५॥ तूं राळेरास गेलियावर । गांवकऱ्यांनीं अडविलें फार । मग नागाऊचे होन चार । चोरोनियां आणिले ॥ १६ ॥ आणि घरचे तीन घालोन त्यांत । चावडीस नेऊन दिधले सात । ऐसें बोलतां पंढरीनाथ । बोधला हांसत तेधवां ॥ १७ ॥ ह्मणे दीनदयाळा पंढरीराया । गरीबाचे होन घेतले कासया । आतां व्याजीं आणिले काढोनियां । ते नेऊनि तिजला देतों मी ॥१८॥ ऐकोनि बोले जगज्जीवन । तूं जरी देशील तिचे होन नेऊन । तरी गुप्त आहे तियेचें ठेवणें । तें मी उडवीन क्षणमात्रें ।१९। बोधला मिठी घाली पायीं । ह्मणे समर्थापुढें उपाय नाहीं । आणिक कौतुक धामणगांवीं । शेषशायी करीतसे॥२२०॥ हुरडा वांटिला यात्रेकऱ्यांस । त्या थोंट्या ताटांस आलीं कणसें । रितीं पेवें असती बहुदिवस । धान्यें संपूर्ण भरलीं तीं ॥२१॥ हें कौतुक दृष्टीस देखोन । आश्चर्य करिती सकळ जन । ह्मणती बोधल्यास जगज्जीवन । जाहला प्रसन्न वाटत-

से ॥ २२ ॥ जो दीनदयाळ रुक्मिणीकांत । निजभक्तांची वाढवी कीर्ती । महीपती तयाचा मुद्रांकित । गुण वर्णित संतांचे ॥ २३ ॥ स्वति श्रीभक्तविजयग्रंथ । ऐकतां तुष्टेल जगन्नाथ । प्रेमळ ऐका भाविकभक्त । त्रिपंचाशत्तमाध्याय रसाळ हा ॥ २३४ ॥ अध्याय ५३ ॥ ओंव्या २२४ ॥ श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु ॥





श्रीगणेशाय नमः । श्रीराधारमणाय नमः । जयजय विश्वव्यापका रुक्मिणीपती । तूंचि माझी धनसंपत्ती । माता पिता बंधु निश्चितीं । तुजविण विश्रांती असेना ॥ १ ॥ तूंचि माझें अध्यात्मज्ञान । तूंचि माझें श्रवणमनन । तूंचि माझें गीर्वाणभाषण । प्राकृत बोलणें तूंचि माझें ॥ २ ॥ तूंचि माझी चातुर्यकळा । वक्ता वदविता घनसांवळा । तूंचि माझा प्रेमजिव्हाळा । दीनदयाळा श्रीपती ॥ ३ ॥ तूंचि माझा अचुक लेखक । विशालबुद्धि वैकुंठनायक । तूंचि माझें अक्षयसुख । सद्गुरु तारक तूं माझा ॥ ४ ॥ तूंचि माझा प्रेमळ श्रोता । समयीं वचनआठव देता । तुझी कृपा असतां अनंता । लोभ ममता बाधेना ॥ ५ ॥ तुवां कृपा केलिया श्रीपती । अज्ञानी तेचि ज्ञानी होती । जैसी तमें दाटलिया राती । उगवे गभस्ती अवचित ॥ ६ ॥ मग अंधारचि होय प्रकाश । तेथें संशय कोणता असे । तुझी कृपा होतां तैसें । अज्ञान निरसे मुळींहूनी ॥ ७ ॥ नातरी लोहास परीस झगटे । मग त्याची काळिमा राहील कोठें । कीं वोहळावरी गंगा लोटे । मग तो पवित्र होय जैसा ॥ ८ ॥ तेविं तूं कृपादृष्टीं जयातें । अवलोकिसील आपुले मतें । तरी त्याची कीर्ती त्रिभुवनांत । होईल निश्चित निरुपम ॥ ९ ॥ जे प्रेमळभक्त अतिविरक्त । क्षणमात्र तुज न विसरत । त्या संतांचीं चरित्रें अघटित । लिहवीं निश्चित ममहस्तें ॥ १० ॥ मागील अध्यायाचे शेवटीं जाण । कौतुक दाखवी जगज्जीवन । रित्या पेंवांत धान्य घालून । ठेविलीं भरून क्षणमात्रें ॥ ११ ॥ आणि शेत वांटिलें यात्रेकऱ्यांस । मग थोंट्या ताटांसि आलीं कणसें । हें कौतुक देखोनि विशेष । आश्चर्य सर्वांस वाटलें ॥ १२ ॥ ह्मणती बोधला ईश्वर अवतार । यास न ह्मणावें प्राकृत नर । आह्मीं अज्ञान अति पामर । छळिलें साचार तयासी ॥ १३ ॥ रितीं पेवें भरलीं होतीं । बोधल्यानें लुटविलीं विप्रांहातीं । जैसीं मोगऱ्यासि पुष्पें येती । तो विलासियांप्रती देतसे ॥ १४ ॥ कां कमळिणींत मकरंद आला जाण । तो वांटोनि देती मिलिंदांकारण । कीं मेघामाजी सांचलें जीवन । तो देत रिचवोन पृथ्वीवरी ॥ १५ ॥ तेविं प्रसन्न होऊनि हृषीकेशी । धान्य दिधलें बोधल्यासी । तेणें उदास होऊनि मानसीं । वांटिलें विप्रांसी तत्काळ ॥ १६ ॥ थोंट्या ताटांस आलीं जीं कणसें । तीं पाहावयास येती माणसें । कीर्ति प्रकटली देशोदेशें । ह्मणती महिमा विशेष संतांचा ॥ १७ ॥ एके दिवशीं प्रेमळभक्त । बैसला होता शेत राखित । तों हांसी कुणबीण अकस्मात । चरणीं लागत येऊनी ॥ १८ ॥ ह्मणाल हांसी कवणाची कवण । तरी सविस्तर ऐका अनुसंधान । दोन कोशीं धामणगांवाहून । राळेरास ग्राम असे ॥ १९ ॥ तेथील पाटील मोकदम खरा । तो बोधल्याचा सखासासरा । तो निमोनि गेलिया मोक्षघरा । ममताई माहेरा अंतरली ॥ २० ॥ बंधु दोघे होते दुर्बुद्धी । ते समाचार न घेती कधीं । जयांसि अहंकाराची व्याधी । जोडली त्रिशुद्धी निजकर्मे ॥ २१ ॥ हांसी कुणबीण त्यांचे घरीं । परम भाविक प्रेमळ अंतरीं । प्रपंचधंदा सारितां करी । भजन हरीचें सर्वदा ॥ २२ ॥ राळेरास आणि धामणगांव । दोहींची एकवट आहे शींव । मेरेसि शेत भक्तवैष्णवें । धरिलें होतें एकदा ॥ २३ ॥ राळेरासकर जे अभक्त । त्यांचें यांचें शेजारीं शेत । त्यांणीं हांसी कुणबीण स्वतंत्र । शेतीं राखण ठेविली ॥ २४ ॥ माळावरी बैसोनि नित्य । बोधला हरीचे गुण व-

र्णित । हांसी कुणबीण येऊनि तेथ । श्रवण करीत निजप्रीतीं ॥२५॥ तिणें एकदा दृढ धरूनि पाय । प्रेमळभक्तासि बोले
काय । जेणें माझें संसारीं सार्थक होय । तैसा उपाय सांगावा ॥२६॥ ऐकोनि बोधला मानसीं ह्मणे । इचें तंव शरीर प-
राधीन । जप तप ध्यान तीर्थाटन । नये घडोन सर्वथा॥२७॥दासी दास कांता जाण । पराधीन सर्वदा यांचें जिणें । गाई
वृषभ अश्ववहन । तयांसी समान ह्मणावीं ॥ २८॥ दुष्कृताचा वांटा परम । ह्मणूनि होतो यांचा जन्म । कांहीं एक नि-
त्यनेम । यांजकारणें घडेना ॥ २९ ॥ आतां उगेंच धरितां मौन । तरी इच्या प्रेमाचें होईल खंडन । ऐसें ह्मणोनि वैष्णव-
जन । काय बोलत तेधवां॥३०॥ऐक हांसे माझें वचन । तुवां आह्मांसि पुसिलें साधन । तरी संसारधंदा राहाटतां जाण ।
करावें चिंतन श्रीहरीचें॥३१॥ आणि पंधरा दिवशीं एकादशी । तुवां रहावें उपवासी । निशाकाळीं कीर्तनासी । धाम-
णगांवासी येइजे ॥ ३२ ॥ चार प्रहर जाहलिया श्रवण । प्रातःकाळीं करावें गमन । आपुल्या धन्यासि पुसोन । चाल-
वीं नेम आपुला ॥ ३३ ॥ तरी तुझें सार्थक होईल पाहें । पांडुरंगाचे जोडतील पाय । सगुणस्वरूपाची भेट होय । येथें
संशय न धरावा ॥ ३४ ॥ वचन ऐकोनि ते समयीं । हांसीनें मिठी घातली पायीं । ह्मणे एकादशीस धांमणगांवीं । येत
जाईन निश्चित ॥ ३५ ॥ ज्यासि जो अधिकार निश्चित । तैसेंच साधन सांगती संत । जैसा सद्वैद्य ध्यानासि रोग आणि-
त । मग औषध देत त्या रीतीं ॥३६॥ कीं नृपवर भद्रीं बैसोनि जाणा । अधिकार सांगत प्रधाना । कीं गृहचारिणी धरू-
नि शाहाणपणा । वागवीत सुना आपुल्या ॥ ३७ ॥ नातरी विवेकी सावकार जाण । उदीम पाहून देतसे ऋण । कीं च-
तुर वक्ता सभा देखोन । करित कीर्तन तैसेंची ॥ ३८ ॥ कां मृदु कठिण पाषाण जाणती । मग पाथरवट तैशाच टांक्या
ह्याणिती । तेविं आधीं योग्यता संत पाहाती । मग साधन सांगती तैसेंची ॥ ३९ ॥ असो बोधल्याची वचनोक्ती । हां-
सीनें दृढ धरिली चित्तीं । मग संसारधंदा करितां प्रीतीं । नामस्मरण करीतसे॥४०॥हरिदिनीचे दिवशीं उठोनि पाहीं ।
कार्य करावें लवलाहीं । मग धन्यासि पुसोनि धामणगांवीं । कीर्तनसमयीं जातसे ॥४१॥ बोधल्याची कथा प्रेमळ ब-
हुत । अज्ञानासि कळे अन्वयार्थ । भोंवरगांवींचे लोक समस्त । श्रवणासि येती निजप्रीतीं ॥ ४२ ॥ नरनारी येती बहु-
त जन । वाड्यांत होतसे अडचण । मग चोहाटीं उभा राहून । सप्रेमकीर्तन करीतसे ॥ ४३ ॥ दोन रांजण पाणी भरून ।
हांसी ठेवित लोकांकारण । आपुले हातें खरांटा घेऊन । जागा निर्मळ करीतसे ॥ ४४ ॥ आकाश तेंचि मंडपाकार । पृ-
थ्वी हेंचि आसन थोर । बोधल्याचा कीर्तनगजर । ऐकोनि सुरवर आनंदती॥४५॥ तंव एके दिनीं हरिदिनीसी । राळे-
रासकर कीर्तनासि । येत असतां ग्रामापासीं । तंव डसला एकासी महासर्प ॥४६॥ तत्काळचि झेंडू येऊन । तेथेंच त्या-
चा गेला प्राण । समागमें होते त्यांणीं उचलून । कीर्तनांत आणून बैसविला ॥ ४७ ॥ एकमेकांसि विचार करिती । क-
ळों न द्यावें कवणाप्रती । श्रीरामनामाची बहुत ख्याती । बोधला लोकांसि सांगतसे ॥ ४८ ॥ ह्मणती रामनामें प्रल्हाद-
भक्त । टाकितां न जळे अग्नींत । विष तेंही होतें अमृत । ऐसी प्रचीत नामाची ॥४९॥ तरी त्याजवरी निमित्त ठेवूं आप-

ण । कीर्तनांत गेले याचे प्राण । हें उठविसील तरी सत्य जाण । यथार्थ महिमान नामाचें ॥५०॥ऐसें बोलोनि ते दुर्मती ।
उगेच निवांत श्रवण करिती । तंव बोधराज सांगे लोकांप्रती । अनुपम ख्याती नामाची ॥५१॥ ऐका ऐका सकळजन ।
नाम फुकाचें अतिपावन । गोड तरी अमृताहून । मी प्रचीत पाहून बोलतें॥५२॥ तरी सकळीं पिटोनि टाळी । विठ्ठल-
नामें द्या आरोळी । वचन ऐकोनि ते वेळीं । श्रोते गर्जती निजप्रेमें ॥ ५३ ॥ ज्यांणीं कीर्तनांत बसविलें प्रेत । ते बोधल्या-
सि काय बोलती । आह्मां पुढें बैसला हा गृहस्थ । नाहीं उच्चारित हरिनाम ॥ ५४ ॥ सर्प डसोनि पावला मृत्यु । हें बोध-
ल्यास नाहीं श्रुत । मग मृत प्रेतास प्रेमळभक्त । काय बोलत तें ऐका ॥ ५५ ॥ बापा येऊनि नरदेहास । हरिभजनाचा
न करीं आळस । आतां टाळिया पिटोन उल्हासें । मुखें नामघोष उच्चारीं ॥५६॥ बोधल्याचिया कीर्तनांत । लीलाना-
टकी पंढरीनाथ । ऐकोनि निजभक्ताची मात । विचार करीत मानसीं ॥ ५७ ॥ ह्मणे याचे तंव गेले आहेत प्राण । हें श्रु-
त नाहीं बोधल्याकारण । नामउच्चार न करितां येणें । विक्षेप मन पावेल कीं।५८।मी सन्निध असतां पांडुरंग । वितळो-
नि जाईल कीर्तनरंग । मग यमधर्मासि रुक्मिणीरंग । निजमुखें सांगे तेधवां ॥ ५९ ॥ कीर्तनांत प्रेत बैसलें जाण । याचे
सत्वर परतवीं प्राण । ऐकोनि कृपासिंधूचें वचन । अवश्य ह्मणे श्राद्धदेव ॥ ६० ॥ तों प्रेतें उठोनि त्या वेळीं । नामघोषें
पिटिली टाळी । बोधल्याचे चरणकमळीं । मिठी घातली तयानें ॥ ६१ ॥ मग त्याचे सांगाती उठोनि त्वरित । बोध-
ल्यास सांगितला वृत्तांत । ऐसी श्रोतयांनीं ऐकतां मात । वाटलें आश्चर्य सकळांसी॥६२॥जयजयकारें पिटोनि टाळी।
आनंदली भक्तमंडळी । बोधल्याचे नेत्रकमळीं । अश्रुपात लोटले ॥ ६३ ॥ ह्मणे देवाधिदेवा भक्तवत्सला । मज अना-
थाची पाळिसी लीला । मज वृत्तांत असता कळला । तरी विक्षेप वाटला असता कीं ॥६४॥ जैसी मक्षिका अन्नांत प-
डतां । ती बाळकासि न सांगतां काढी माता । तेविं आमुचा आघात रुक्मिणीकांता । तूं न सांगतां निवारिसी ॥६५॥
यापरी आळवूनि कमळापती । मग उजळिली मंगळारती । ओंवाळूनि श्रीरुक्मिणीपती । नमस्कार प्रीतीं घातला
॥६६॥ धामणगांवींचे नारीनर । ह्मणती बोधला ईश्वरी अवतार । करावया जनाचा उद्धार । आला साचार मृत्युलो-
कीं ॥ ६७ ॥ प्रेत उठविलें कीर्तनांत । हें दृष्टीस देखोनियां चरित । हांसीचा प्रेमभावार्थ । दिवसेंदिवस वाढला ॥ ६८ ॥
पंधरा दिवशीं धामणगांवांत । येऊनि कीर्तन श्रवण करीत । ऐसें तीन वर्षेंपर्यंत । लोटतां अरिष्ट ओढवलें।६९।साधकीं
करितां ईश्वरभजन । त्यांजवळी येतसे महाविघ्न । जेविं दुग्धें भरूनि ठेवितां भाजन । मार्जार लवंडूं पाहातसे।७०।कु-
पथ्यापासीं रोग सकळ । कीं देहास अखंड जपतो काळ । कीं योगियासि सिद्धि निश्चळ । गोवूं पाहाती एकांतीं।७१।ना-
तरी द्रव्यापासीं जपतो तस्कर । कीं श्वापदांसि धरूं पाहे व्याघ्र । कीं निशापतीसी समग्र । राहू आडवा येऊं पाहे॥७२॥
तेविं ईश्वरभक्ति करितां जाण । संचरूं पाहे अवचित विघ्न । असो मागील अनुसंधान । परिसा सज्जन निजप्रीतीं।७३।
बोधल्याचा अनुग्रह घेतां जाण । दासीस जाहलें पूर्ण ज्ञान । एकादशीस ऐकोनि कीर्तन । करी गमन एकांतीं।७४। ना-

मीं बैसला विश्वास । तो निरंतर लागला निदिध्यास । ऐसीं लोटलीं तीन वर्षें सावकाश । तों पातलें भक्तीस महाविघ्न ॥७५॥ ममताईचे बंधु दोघेजण । विभक्त राहूं पाहती जाण । ह्मणोनि हांसी कुणबीण । विकरीं घातली तयांनीं ॥७६॥ परस्परें गांवांत जाहलें श्रुत । तिचे कर्णीं प्रगटली मात । मग मानसीं झाली चिंताक्रांत । ह्मणे कर्म बळवंत माझें कीं ७७ मग धंदा सारूनि लवलाहीं । सत्वर आली धामणगांवीं । बोधल्याचे एकांत समयीं । चरण दोनी धरियेले॥७८॥ कंठ जाहला सद्गदित । नेत्रीं वाहती अश्रुपात । हे अवस्था देखोन प्रेमळभक्त । काय बोलत तियेसी॥७९॥ हांसे नवल वाटतें चित्ता । विपरीत देखोन तुझी अवस्था । काय उद्भवली चित्तीं चिंता । ते तत्वतां मज सांगें ॥८०॥ हांसी ह्मणे गा बोधराया । मायबापा जिवलगसखया । आजपासोनि तुझिया पायां । मी अंतरलें निश्चित ॥८१॥ धन्यांनीं विकरीं घातलें जाण । गिऱ्हाईकही आलें दुरून । आतां माझे श्रवणीं तुमचें कीर्तन । पडेल कोठून स्वामिया ॥८२॥ बोधला ह्मणे ऐक माते । देहाचें प्रारब्ध असेल जेथें । जाणें लागेल निश्चयें तेथें । तूं कासया खंती करितेसी ॥८३॥ तरंग सागरा आंतौतें । ते वाहत फिरती सभोंवते । परी जीवनाविण नाहींत ते । दृष्टीस दिसतें सकळांच्या ॥ ८४ ॥ तेविं आनंदसागर श्रीपांडुरंग । आपण जीव त्याचे तरंग । ऐसें जाण तूं अंतरंग । मग चित्तीं वियोग बाधेना।८५।यावरी हांसी उत्तर देत । मी याजसाठीं नाहीं रडत । शिंवेशेजारीं तुमची संगत । ते मज निश्चित अंतरली ॥८६॥ इतुकें बोलोनियां जाण । तेथेंच पडली मूर्च्छा येऊन । मागुती देहास सांवरून । गृहांत जाऊन बोलत ॥ ८७ ॥ ममताईस ह्मणे ते अवसरीं । तुमचे बंधूंनीं मज घातलें विकरीं । ह्मणोनि आजि दुःखसागरीं । मी पडिलें जननीये ॥ ८८ ॥ तरी तुह्मीं ठेऊनि आपुले घरीं । द्रव्य घाला त्यांचे पदरीं । ऐसें ह्मणोनि ते अवसरीं । पायांवरी लोटली॥८९॥दासीची अवस्था देखोनि नयनीं । करुणा उपजली ममताईचे मनीं । ह्मणे कांहीं तरी उपाय करूनी । इजलागोनी सोडवणें ॥९०॥ आपुल्यासी द्रव्य न मिळे जाण । तरी धामणगांवींचें विकावें वतन । परी अनाथासि सोडवणें । विचार मनीं दृढ केला ॥९१॥ बोधराजें येऊन मंदिरीं । हांसीस अभय दिधलें करीं । ह्मणे तूं गृहास जाई पुढारी । मागूनि सत्वर मी येतों ॥९२॥ वचन ऐकोनियां ऐसें । तिजला समाधान झालें कैसें । जेविं प्रेतावरी सायासें । अमृत वर्षे ज्यापरी॥९३॥ कीं वणवा लागतां वर्षला घन । तेणें विझोनि जाय कृशान । मग तरुवरांसि सीतळपण । नवे पल्लव फुटती॥९४॥ तेविं बोधल्याचें अभयवचन । ऐकूनि दासीस वाटलें समाधान । मग राळेरासी उठोन । गेली असे सत्वर ॥९५॥मग बोधराज मागूनि जाऊनि तेथ । आपुल्या मेहुण्यांसि काय बोलत । तुह्मीं दासीस विकितां निश्चित । ऐकिली मात परस्परें ॥ ९६ ॥ ऐसें चित्तीं असेल जरी । तरी हे द्यावी आमुचे घरीं । मोल सांगाल जें निर्धारीं । तें देऊं सत्वरी पाठवूनी ।९७। बोधल्याचें वचन पडतां कानीं । दुर्बुद्धी संतप्त जाहले मनीं । ह्मणती आमुचें मनुष्य तुमचे सदनीं । आह्मीं न देऊंच सर्वथा ९८ शिंवेशेजारीं वतनदार । पुरातन सोयरे निर्धार । आणिका फुकट देऊं पर । न देऊं साचार तुह्मांसी । ९९ । ऐकूनि अभिमानाची मात । निवांत राहिला

अ.
५४

पा.
१४२

विष्णुभक्त । हांसी आक्रंदत मंदिरांत । ह्मणे कर्म विचित्र पैं माझें १०० मग बोधराज ह्मणे हांसीकारण । सोयऱ्यां देखतां बोले वचन । मी विठोबाची विनंती करून । तुजकारण आणवितों।१। ऐसें ह्मणोनि ते समयीं । परतूनि आले धामणगांवीं । कांतेपासीं वृत्तांत सर्वही । सांगीतला तेधवां।२।इकडे राळेरासि पिशुनांसी । परम भय उपजलें मानसीं।ह्मणे बोधला सांगोनि विठोबासी । मारवील हांसीस निश्चयें ॥ ३ ॥ येथें बोलोनि गेला पण । तें कदापि नव्हे असत्यवचन । तरी आतां ग्राहिक सत्वर आणोन । इजकारण वोपावें ॥४ ॥ तों परग्रामींचे घेणार । तेचि दिवसीं आले सत्वर । हांसी आणि तिची कुमारी । विकत घेतली तयांनीं।५।पंचवीस होन देऊनि त्वरित। लिहूनि घेतलें खरेदीखत। हांसी कुणबीण आक्रंदत । ह्मणे पंढरीनाथ न ये कीं।६।दीनदयाळा पंढरीनाथा । माझ्या धांवण्या धांव आतां।सांडोनियां देहममता । प्राण तत्वतां देईन श्रीं । ७। बोधला सांगोनि गेला मज । कीं विठोबा येऊनि नेईल तुज । तरी त्याचें वचन असत्य आज्ञ । होईल ऐसें वाटतें ॥८॥ जाणोनि दासांचें मनोगत । तत्काळ पंढरीनाथ आले तेथ । विप्रवेष घेऊनि त्वरित । प्रकटला अनंत त्या ठायीं।९।पिशुनाचे अंगणीं सहज । उभे ठाकले अधोक्षज । हांसीस ह्मणती तुज । बोधराजें बोलाविलें ॥ ११० ॥ ऐसी ऐकोनि विप्रवाणी । दासीस हर्ष वाटला मनीं । तिणें ब्राह्मणाचे चरणीं । मिठी घातली निजप्रेमें ॥ ११ ॥ कौतुक वर्तलें अतिअद्भुत । तें सादर ऐका भाविकभक्त । हांसीसहित पंढरीनाथ । झाले गुप्त ते ठायीं॥१२॥ हांसीची कन्या होती धाकुटी । तेही पाठविली वैकुंठीं ॥ सोयरे कौतुक देखोनि दृष्टीं । आश्चर्य करिती तेधवां १३ ह्मणती आश्चर्य जाहलें मोठें । कुडीसहित गेली कोठें । गिऱ्हाईक ह्मणती प्राक्तन खोटें । आमुचें दिसोन आलें कीं ॥ १४॥ आह्मीं ग्रामीं नेली नसतां कुणबीण । येथेंच अदृश्य जाहली जाण । तरी परतूनि द्यावे जी आमुचे होन । ऐसें वचन बोलिले ॥१५॥ पिशुन ह्मणती ते अवसरीं । खरेदीखत दिधलें करीं । आतां लांझा आमुचे पदरीं । राहिला नाहीं सर्वथा ॥१६॥ मघा आला होता जो ब्राह्मण । बोधल्याचें नाम सांगीतलें त्यानें । तरी तुह्मीं धामणगांवास जाऊन । वाद सांगणें तयासी ॥ १७ ॥ यावरी गिऱ्हाईक काय बोलत । परस्परें आह्मीं ऐकिली मात । कीं बोधला तुह्मांपासीं विकत । कुणबीण मागत होता कीं१८तुह्मीं दिधली नाहीं त्याजला। मग तो जातेसमयीं काय बोलिला। कीं विठोबा येऊन इजला । घेऊनि जाईल निश्चयें ॥१९॥ तरी तैसेंच घडोनि आलें पाहीं । त्याकडे आमुचा वाद नाहीं । तुह्मीं होन लवलाहीं । टाकूनि द्यावे आमुचे ॥१२०॥ ऐसा परस्परें जाणा । वाद लागला तिघांजणां । भक्तकैवारी पंढरीराणा । चरित्र वाढवी दासांचें ॥ २१ ॥ आणिक चरित्र अद्भुत देख । सादर परिसा भक्त भाविक । धामणगांवांत अंत्यज एक । असे चाळक बहुभाषी तो॥२२॥ बोधल्यासि ह्मणे एकांतीं । उपदेश द्या जी मजप्रती । तुमचे चरणीं लागली प्रीती । ह्मणोनि विनंती करीतसे ॥२३॥ ऐकूनि बोले प्रेमळभक्त । मी अनुग्रह कोणासि नाहीं देत । जरी आज्ञा करील पंढरीनाथ । तरी पुसेन त्यातें एकांतीं॥२४॥मग ध्यानीं आणूनि वैकुंठनायक । ह्मणे देवा विनंती ऐक एक । आपुले ग्रामींचा अनामिक । दिसतो भाविक मजलागीं

॥ २५ ॥ तो बहुत दिवस मज विनवित । ह्मणे माझे मस्तकीं ठेवीं हात । जरी आज्ञा देशील मज निश्चित । तरी अंगीकार त्याचा करीन मी ॥ २६ ॥ ऐकूनि बोधल्याचें वचन । काय बोलती जगज्जीवन । नीचयातीस उपदेश जाण । सर्वथा आपण न द्यावा ॥ २७ ॥ जो अखंड अविश्वासी मनीं । आणि अनास्था धरी शास्त्रश्रवणीं । तरी सद्गुरूनें तयालागोनी । अनुग्रह सर्वथा न द्यावा ॥ २८ ॥ पुस्तकाची फलश्रुती पाहून । कामनिक करी आवर्तन । ऐशा शिष्यासि सद्गुरूनें । उपदेश सर्वथा न द्यावा ॥ २९ ॥ जो मनीं धरूनि चावटी । वाचकांसि खोदून पुसे गोष्टी । त्यासि सद्गुरूनें कृपादृष्टीं । पाहों नयेची सर्वथा ॥ १३० ॥ शिष्य असावा सज्ञान विरक्त । नातरी भाविक प्रेमळभक्त । ऐसें बोधल्यासि रुक्मिणीकांत । असे सांगत एकांतीं ॥ ३१ ॥ हा तों अनामिक हीनयाती । परमनष्ट चांडाळ कुमती । हें तुज सत्य न वाटे चित्तीं । तरी पाहे प्रचीती सत्वर ।३२। तुझे खळ्यांतील रासपूजा । उद्यीक आहे भक्तराजा । अनामिकास बोलावून तुझा । वृषभ मारवीं त्याहातीं ।३३। तयासि दाखवीं ऐशी प्रीती । हें वृत्त न सांगे कोणाप्रती । जरी ही गोष्ट लोपली तयाहातीं । तरी उपदेश तयाप्रती देईजे ॥ ३४ ॥ बोधला ह्मणे पंढरीनाथा । मी हिंसाकर्म न करीं सर्वथा । कासया बैल मारवावा वृथा । हें माझिया चित्ता नये कीं ।३५। ऐकोनि बोले रुक्मिणीरमण । माझी आज्ञा तुज प्रमाण । हिंसाकर्माचें दूषण । तुजकारण घडों नेदी ३६ दुसरे दिवसीं अनामिक येऊन । बोधल्याचे एकांतीं धरी चरण। ह्मणे अनुग्रह द्यावा मजलागून । कृपा करून ये समर्यीं ॥ ३७ ॥ माणकोजी ह्मणे ऐक महारा । राशीवर कापीं आमुचा गोऱ्हा । कोणासि कळों नेदीच विचारा । तरी सच्छिष्य खरा तूं माझा ॥३८॥ अवश्य ह्मणोनि ते अवसरीं । अनामिकें बैल वधिला करीं । मांस रांधोनि आणिके घरीं । भात भाकरी करविल्या ॥ ३९ ॥ रास पूजावया बोधराजें । मेळविले सोयरे गोत्रज । मांस भाकरी देतां सहज । अद्भुत चोज वाटलें त्यां ॥ १४० ॥ ह्मणती बोधल्याची ढसळली वृत्ती । हिंसाकर्म करितो पुढती । अजापुत्र मारूनि आजिचे रातीं । मायवतां प्रीतीं जेववीत ॥ ४१ ॥ परी वृषभ मारविला ऐसें जाणा । हा विचार ठावा नाहीं कोणा । जेवूनि आपुलाले सदना । गेले सत्वर तेधवां ॥४२॥ अनामिकास ह्मणे बोधला भक्त । वृषभाचें शिर लपवीं राशींत । चर्म गाडीं भुसाआंत । कोणासि मात कळों नेदी । ४३ । तों अनामिकाचें फुगलें पोट । ह्मणे केव्हां होईल आतां पहाट । सांगेन लोकांसि हे गोष्ट । ह्मणोनि वटवट करीतसे ॥४४॥ इतक्यांत उगवला दिनकर । गांवांत गेला दुराचारी । फेरी करी एकसर । मागे भाकर घरोघरीं ॥४५॥ रिघोनि कुणब्यांचे घरीं । बैसे जाऊनि त्यांशेजारीं । तंव ते ह्मणती होईं दुरी । कैसा भीतरीं आलासी ॥ ४६ ॥ तंव तो तयांसि घाली वाद । तुह्मां आह्मांत काय भेद । बोधराजें काल प्रसिद्ध । वृषभ मारिला राशीवरी ॥ ४७ ॥ आणि तुह्मीं मांस भक्षिलें साचार । आतां मज कां धरितां दूर । ऐसेच रीतीं घरोघर । सांगे साचार लोकांसी ॥ ४८ ॥ गुणगुण उठली गांवांत । ह्मणती बोधल्यानें केलें अनुचित । तो ह्मणवीतसे हरिभक्त । बाटविलें गोत आपुलें ॥४९॥ एक ह्मणती हे असत्य मात । एक ह्मणती हे यथार्थ । बोधल्याचा गोऱ्हा निश्चित । नाहीं दिसत गोठणीं ॥१५०॥ गोत्रज सोयरे होऊनिं गोळा । एकांतीं बैसोनि विचार केला । ह्मणती पुसावें बोधल्याला । कीं कैसें आह्मांसि बाटविलें ॥ ५१ ॥ अनामिकास ह्मणती सकळ जन । मुद्दा दाखविसी आह्मांकारण । तो ह्मणे वृषभाचें शिर कापून । ठेविलें लपवून राशींत ॥५२॥ चर्म लपविलें भुसाआंत । चला तुह्मांसि दाखवितों त्वरित । ऐकोनि दुर्जनाची मात । झाले संतप्त सकळिक ॥ ५३ ॥ ह्मणती जाऊनि सकळजण । बोधल्याचा जीवेंचि घ्यावा प्राण । मग राजा पुसे आपणाकारण । तरी पडेल नागवण तें देऊं ॥५४॥ ऐसें बोलोनि दुराचारी । डांगा घेतल्या आपुले करीं । बोधल्यापासीं सत्वरीं । येऊन उभे राहिले ॥ ५५ ॥ तंव त्याणें लावूनि नेत्रपातीं । हृदयीं चिंतिली श्रीविठ्ठलमूर्ती । नामस्मरण एकांतीं । करीत बैसला निजप्रेमें ॥५६॥ लोक ह्मणती होईं सावध । करावयास आलों तुझा वध । ऐसा कैसा रे तूं मैंद । बाटविलें प्रसिद्ध सकळांसी ॥ ५७ ॥ बोधला ह्मणे पंढरीनाथा । ऐसिया संकटीं पावें आतां । तुजवांचून कृपावंता । कोण रक्षिता दीनासी ॥५८॥ तंव ते ह्मणती दुराचार । तुज आतां न पावे रुक्मिणीवर । आह्मांसि कापून घातलें ढोर । भ्रष्टाकार केला कीं ॥५९॥ अनामिकासि ह्मणती ते अवसरीं । मुद्दा आणून दावीं सत्वरीं । अवश्य ह्मणोनि दुराचारी । राशीभीतरी पाहातसे ॥ १६० ॥ वृषभाचें शिर होतें त्यांत । तें बोकडाचें करी पंढरीनाथ । तया ऐसेंच चर्म करित । देखिलें अकस्मात काढितां ।६१। अनामिक तें घेऊन हातीं । अधोमुख पाहे तो दुर्मती । ह्मणे म्यां वृषभ मारिला निश्चितीं । विपरीत गती हे जाहाली ॥६२॥ गांवकरी बोधल्यास ह्मणती पाहें । तुझा गोऱ्हा जाहला काय । तों कौतुक करी पंढरीराय । जें न होय कोणासी ॥६३॥ वृषभ कापिला होता देखा । तो सावध केला पहिल्यासारिखा । तेव्हां आश्चर्य वाटलें लोकां । ह्मणती अनामिक लटिकाची ॥६४॥ अंत्यजासि ह्मणती ग्रामवासी जन । तुझाच आह्मी घेऊं प्राण । तुवां असत्य घेऊन तुफान । करविलें छळण बोधल्याचें ॥६५॥ ऐकोन सकळांची सक्रोध उक्ती । थरथरां कांपे तो दुर्मती । मग विष्णुभक्तासि लोटांगण प्रीतीं । अंत्यज घाली तेधवां ॥६६॥ ह्मणे मी अनंत अपराधी जाण । हीनयाति चांडाळ दुर्जन । आतां अपराध क्षमा करून । माझे प्राण वांचवीं ॥६७॥ ऐकूनि दुर्जनाची वाणी । करुणा उपजली तयाचे मनीं । मग ग्रामवासीयांस सांगे वचनीं । यासि कोणी न मारावें ॥६८॥ मग अहंता टाकूनि समस्त । बोधल्यासि घाली दंडवत । चित्तीं जाहला अति लज्जित । अनुचित घडलें सकळांसी ॥ ६९ ॥ तों इकडे बोधल्यासि रुक्मिणीकांत । ध्यानांत येऊनि काय बोलत । तुज सांगितला म्यां गुह्यार्थ । अनुभवें प्रचीत आली कीं ॥१७०॥ बोधला ह्मणे जगज्जीवना । तुझा पार न कळे कवणा । ह्मणूनि मिठी घातली चरणा । वैकुंठराणा हांसतसे ॥७१॥ आणिक चरित्र अमोलिक । सादर ऐका भक्त भाविक । धामणगांवींचे सकळ लोक । देखती कौतुक नानापरी ॥७२॥ ह्मणती बोधला नव्हे मानवी नर । परमज्ञानी अति उदार । केवळ ईश्वरी अवतार । केला भवपार सकळांचा ॥ ७३ ॥ एके दिवसीं अवर्षणीं । पर्जन्य न पडेच मेदिनी । ह्मणूनि धांमणगांवींची पेरणी । अग्रधान्याची राहिली ।७४। आश्विनमासपर्यंत जाण । पडिलें होतें अवर्षण । मग कार्तिकांत स्वातीचा पर्जन्य । अपार जाण

वर्षला।७५।बोधल्यानें काढोनि कर्ज। पेरावयासि घेतलें बीज। गांवकरी करूनि विरज। चालिले काज करावया।७६। तों दिंड्या पताका घेऊनि करीं। यात्रा चालिली पंढरपुरीं। दृष्टीस देखोनि ते अवसरीं। बोधराज अंतरीं संतोषला।७७। यात्रेकरी यांस दंडवत। सद्भावें साष्टांग घालित। ह्मणे आजि आमुचें भाग्य ऊर्जित। ह्मणोनि संत भेटले ॥७८॥ त्या समारंभांत होते ब्राह्मण। ते बोधल्यासि बोलती वचन। तूं दुष्काळीं करितोसि अन्नदान। आलों ह्मणून या ठायां ॥ ७९ ॥ ऐकूनि द्विजवरांचें वचन। ह्मणे आपुले गृहीं तों नाहीं धान्य। आणि विमुख गेलिया संतसज्जन। तरी सत्वासि हानि होय कीं।१८०। मग बोलावूनि निजपुत्रासी। एकांतीं विचार सांगे त्यासी। कीं हें बीज नेऊनि घरासी। भोजन संतांसी घालावें ॥ ८१ ॥ भूमी पीक देतसे निर्जीव। मग संत तों आहेत सजीव। यांचे उदरीं बीज पेरितां सर्व। काय एक नव्हे सांगपां ॥८२॥ ऐसी पित्याची वचनोक्ती। ऐकोनि यमाजी संतोषे चित्तीं। विरजे मिळाले होते शेतीं। ते ग्रामांत मागुती परतविले ॥ ८३ ॥ बीज होतें सवामण। तें दळोनि यात्रेकऱ्यांस घातलें अन्न। कडूभोपळ्याचें बीज नेऊन। आपुल्या शेतीं पेरिलें ॥ ८४ ॥ ईश्वरकरणी अघटित। तुंबिनीसि फळें आलीं बहुत। ग्रामवासी लोक हांसत। ह्मणती विपरीत हें केलें ॥ ८५ ॥ यात्रेकऱ्यांस बीज घालोनियां। कडूभोपळे पेरिले कासया। तंव एक कुटिल येऊनियां। काय बोलिला तें ऐका ॥ ८६ ॥ बोधला पाटील गांवचा राजा। आह्मीं सकळ तयाची प्रजा। आपल्या सांडाव्या लौकिक लाजा। ऐसें तयासी वाटतसे ॥ ८७ ॥ एक एक द्यावा सकळांहातीं। ह्मणोनि पेरिले आहेत शेतीं। ऐकूनि दुर्जनाची वचनोक्ती। गदांगदां हांसती सकळजन ॥ ८८ ॥ ह्मणती बोधल्याचे शेतीं जाऊन। कौतुक पाहूं अवघेजण। कैसें पीक आलें सघन। ऐसें ह्मणोन ऊठिले ॥ ८९ ॥ क्षेत्रांत पाहतां ते वेळ। तंव तुंबिनीसी बहुत आलीं फळें। एक भोपळा तोडूनि तत्काळ। फोडोनियां पाहती। १९०। तेथें नवल देखिलें अद्भुत। उत्तम गहूं निघाले त्यांत। ह्मणती ईश्वरकरणी अघटित। साश्चर्य चित्त सकळांचें ॥९१ ॥ ग्रामींचा हवालदार होता तेथ। ह्मणे राजासि सांगणें लागेल हे मात। तेणें अविंधराजासि त्वरित। वृत्तांत लिहून पाठविला ॥ ९२ ॥ पत्र वाचितांचि यवन। ह्मणे कृत्रिमविद्या केली जाण। मग ढालाईत पांचजण। धामणगांवास पाठविले ॥ ९३ ॥ त्यांणीं बोधल्यासि पुढें घालून। राजद्वारीं नेलें जाण। अविंधें पुसतां वर्तमान। केलें निवेदन सकळिक ॥ ९४ ॥ सक्रोध होऊनि राजा पुसे। भोपळ्यांत गहूं आले कैसे। येरु ह्मणे मज ठाउकें नसे। पंढरीनिवासें हें केलें ॥ ९५ ॥ ऐकोनि निजभक्ताची वाणी। विश्वास न वाटे त्यालागूनी। जैसें श्रीरामचरित्र ऐकोनी। पिशाचें मनीं जळताती ॥९६॥ कां संजय वाचितां गीताशास्त्र। त्याचा धृतराष्ट्रासि नाहीं विश्वास। तेविं बोधल्याचे शब्द अविंधास। असत्य वाटले तेधवां ॥ ९७ ॥ राजा बोले क्रोधायमान। माणकोजी बोधल्यासि करावें यवन। मग भक्षावया मांसबोन। तत्काळ जाण आणविलें ॥ ९८ ॥ बोधल्यासी बैसविला भोजनासी। तों त्याच्या झाल्या फुलें तुळसी। राजा उठोनि वेगेंसी। नमन बोधल्यासी करीतसे ॥ ९९ ॥ ह्मणे जें इच्छील तुझें मन। तें

मज मागें संपत्ति धन। बोधल्याचें कंटाळलें मन। चालिला उठोन सत्वर ॥२००॥ राजयास ह्मणे ते अवसरीं। कांहींच इच्छा नाहीं अंतरीं। कामधेनु बांधिली असतां घरीं। मग दारोदारीं कां जावें ॥ १ ॥ कल्पतरु अंगणीं असतां जाण। मग कासया लावावें सिंदीवन। सांडोनी ऐरावतवहन। खरावरी बैसणें अनुचित ॥ २ ॥ आम्रवृक्षाची सांडोनि छाया। हिंवरातळीं बैसावें कासया। कीं नरदेहासि विटोनियां। पशुजन्म वायां कां घ्यावा ॥ ३ ॥ सांडूनि बकुल सेवंती। पुंगळवेळ कां धरावी हातीं। कीं दुरावून संतसंगती। निंदकासी प्रीती करूं नये॥४॥कीं हरिकीर्तन टाकोनियां। डफगाणें ऐकावें कासया। दहीं दूध गृहीं असोनियां। तक्रासि वायां कां धुंडावें ॥ ५ ॥ जे परमहंसदीक्षा पावले परम। ते सर्वथा न करिती गृहस्थाश्रम। तेविं श्रीरामभजनीं जडलिया प्रेम। ते राजसन्मान न घेती ॥ ६ ॥ ऐसें ह्मणोनि ते समयीं। परतोनि आले धामणगांवीं। प्रेमळभक्ति असोनि देहीं। अहंता नाहीं तयासी ॥ ७ ॥ नामरूपीं जडलिया चित्त। दासांसि नाठवे आह्मी भक्त। तैशाच रीतीं रुक्मिणीकांत। देवपण त्यातें कळेना ॥ ८ ॥ कनकाचा मुकुट आणि पैंजण। एका मुशींत आटलिया जाण। मग त्या दोहींचें नामाभिधान। गेलें हारपोन तत्काळ॥९॥तेविं पांडुरंगाचें करितां भजन। बोधल्याचें हारपोनि गेलें मीपण। मग हृदयीं धरूनि जगज्जीवन। अद्वय भजन करीतसे ॥ २१० ॥ एक सद्भाव धरूनि अंतरीं। धामणगांवींचि केली पंढरी। चरित्र दाखवूनि नानापरी। जड मूढ उद्धरी निजप्रेमें ॥ ११ ॥ पुढिले अध्यायीं कथा अद्भुत। प्रेमळभक्त गणेशनाथ। त्याचें चरित्र रसाळ बहुत। तें प्रेमळ परिसोत निजप्रेमें ॥ १२ ॥ जो दीनदयाळ रुक्मिणीकांत। तो निजकृपें वदवी ग्रंथार्थ। महीपती तयाचा शरणागत। भजन करित निजप्रेमें ॥ १३ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविकभक्त। चतुःपंचाशत्तमाध्याय रसाळ हा ॥ ॥ २१४ ॥ अध्याय ५४ ॥ ओंव्या २१४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीभक्तविजय अध्याय५४वा समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीजगदीश्वराय नमः । जयजय अचळा अव्यया अविनाशा । अनामा अरूपा परमपुरुषा । ब्र-
ह्मांडनायका जगन्निवासा । स्वानंदाधीशा श्रीहरी।१।निजभक्त करिती तुझें स्मरण । तुजलागीं त्यांचें निदिध्यासन।
जैसे चातक आणि मेघ जाण । मित्रपणें नांदती।२।कीं बाळ मातेची करी खंती । तिजलागीं लोभ तैशाच रीतीं । तेविं प्रे-
मळ भक्तांची जैसी वृत्ती । होसी रुक्मिणीपती त्यांसारिखा ।३। कीं पौर्णिमेचा चंद्रप्रकाश घन । मनीं उल्हासे सागर दे-
खोन । तेविं निजभक्तांची कीर्ति ऐकोन । तूं जगज्जीवन संतोषसी।४।भक्तीं वर्णिली तुझी स्तुती । तुजही आवडे त्यांची
कीर्ती । ह्मणोनि चरित्रें मजहातीं । भक्तविजयग्रंथीं लेहविलीं।५।मागील अध्यायाचे अंतीं निश्चिती ।बोधराजें अविं-
धास दाविली प्रचिती।मग टाकूमियां धनसंपत्ति ।हरिभजनीं प्रीत लाविली।६।आतां सज्ञान विवेकी अतिविरक्त।सद्गु-
रुउपासक गणेशनाथ। त्याचें चरित्र अति अद्भुत । ऐका निजभक्त भाविकहो।७।बाळेघांटप्रांतीं जाण। सारसी उज्ज-
नी नगरें दोन । तेथें जयाचें अधिष्टान । सप्रेम कीर्तन करीतसे।८।सैली मुद्रा कानीं असती।वस्त्र कौपीन नेसे प्रीतीं। या-
विरहित कांहीं उपाधि निश्चिती । नावडे चित्तीं तयाचे।९।दिवसा राहून अरण्यांत।एकांतीं श्रीहरीचें भजन करित ।रा-
त्रीं नगरांत प्रेमभरित ।गुणानुवाद वर्णितसे ।१०।नावडे कवणाचा सन्मान। लौकिकपूजा दांभिक भजन । नावडे वस्त्र
संपत्ति धन । मिष्टान्नभोजन नावडे।११।तंव शिवाजी पंढरीसी । यात्रेस आला एके दिवशीं ।ऐकूनि गणेशनाथाचे की-
र्तीसी । आला भेटीसी नृपवर।१२।करूनियां साष्टांगनमन । श्रवण करीत बैसला कीर्तन । गणेशनाथाचें विशाल ज्ञान।
कवित्व बोलणें प्रासादिक।१३।नानापरीचे दृष्टांत देऊन ।अभंग रची जैसे बाण । तेणें श्रोतयांचे श्रवण। सुख पावती अ-
पार।१४।तंव शयन करावया आपणातें । पलंग करविला नृपनाथें। ह्मणे प्रथम दिवशीं गणेशनाथ। निजवावा निश्चि-
त यावरी।१५।मग कर जोडोनि ह्मणे स्वामी । एक रात्र क्रमावी आमुचे आश्रमीं । तल्पक करविला नूतन आह्मीं । ह्म-
णोनि चरणीं लागला।१६।पाहूनि नृपवराचा आदर ।नाथासि संकट पडिलें थोर।जैसा कां हरिणीसि नेऊं ह्मणतां व्या-
घ्र । भयें अंतर कांपे तिचें ।१७।संकट जाणोनि ते वेळ । अवश्य ह्मणे वैराग्यशीळ। मग खडे वेंचोनि एक ओंजळ। पदरीं
बांधिले तेधवां।१८।देखोनि नृपवर पुसे तया। कंकर वेंचोनि घेतले कासया ।येरू उत्तर देत तया। गणती घ्यावया ना-
मांची।१९।शिबिकेंत बैसवोनि ते अवसरीं । राजा घेऊन गेला बिढारीं । सुमनशेज रचोनि वरी। गणेशनाथासि निज-
विलें ।२०। त्रयोदशगुणी करून विडे । तबकीं ठेविले तयापुढें । समया लावूनि अति निवाडें। टाकिले पडदे चहूंकडे२१
नानापरीचे परिमळ निश्चिती । उपचार विलासभोग संपत्ती । ठेवूनियां तेथें नृपती । बाहेर आला सत्वर।२२।तो स्पर्श-
विषय देखोनि नेत्रीं । अनुताप वाटला सकळ गात्रीं । जैसा कां द्विज अग्निहोत्री । यवनमंदिरीं कोंडिला ।२३।कीं व्या-
घ्र जितची धरून गाय। आपुले जाळींत घेऊन जाय । ते जैशी लवकर निघों पाहे।धरून भय मानसीं।२४।नातरी कान-
नीहूनि आणिलें हरिण । राजमंदिरीं बांधिलें जाण । मग तें मानसीं इच्छित पूर्ण।जाईन सुटोन कधीं मी।२५।कीं घृतां-

त जिवंत धरोनि मासा। घालितां तळमळ करी जैसा। राजाचा भोग उपचार तैसा। गणेशनाथासी वाटला।२६।कीं नूतन रावा पिंजऱ्यांत घातला। मग चारा पाणी न रुजे त्याला। तेविं तल्पकावरी विरक्त भला। कंटाळला ते रीतीं ॥२७॥ सांगातें घेतले होते कंकर।ते पसरूनि टाकिले पलंगावर।त्याजवरी निजले घटिका चार।तंव उदयासि दिनकर पातला ॥२८॥दर्शनासि आला झडकरी। तों खडे आंथरले पलंगावरी। विस्मित होऊन निजअंतरीं । नमस्कार करी साष्टांग ॥ २९ ॥ नाथासि पुसे जोडोनि कर। तंव ते देती प्रत्युत्तर। शयन करितां पलंगावर। निद्रा अघोर लागेल कीं ।३०। तुझा हेतु व्हावया पूर्ण। खडे पसरून केलें शयन। जरी सुख दिधलें जीवाकारण। तरी पुढें दुःख भोगणें तितुकेंची ॥ ३१ ॥ जैसी खरूज खाजवितां पाहीं। परमसुख वाटे ते समयीं। मग खाज निघोनि गेल्या देहीं। सौख्य कांहीं पडेना।३२।नातरी भोजन करितां गोड वाटे। परी वमन करितां जीव कष्टे॥ तेविं शयनसुख आधीं गोमटें। मग परिणामीं खोटें देहासी ॥३३॥ कां बचनाग आधीं मधुर लागत। परी खाणार प्राणासि मुकत। तेविं विषय भोगितां भय सत्य। जाण निश्चित नृपनाथा३४ऐसें ऐकतांचि वचन। अनुताप जाहला रायाकारण । ह्मणे आजपासून मी पलंगीं शयन।नकरीं जाण सर्वथा।३५। निश्चय करून मानसीं। तल्पक अर्पिला ब्राह्मणासी। संतसंगाची महिमा ऐसी। ब्रह्मादिकांसी अगम्य।३६। गणेशनाथाची ऐसी स्थिती। तिन्ही अवस्थांत वैराग्यभरित। वस्ती न करीच ग्रामांत। हिंडे अरण्यांत सर्वदा ।३७। स्वदेशांत कीर्तन होतां जाण। दर्शना येती भाविक जन। नित्य अनुग्रह एकालागून। स्वइच्छेनें देतसे।३८।मस्तकीं हस्त पडतां जाण। शिष्याचें उडे प्रपंचभान। तो संसारधंदा टाकून। रानोरान हिंडतसे।३९।तो खळ अथवा दुराचारी। निंदक अथवा सज्ञान नर। परी नाथाचा शिरीं पडलिया कर। अपार वैराग्य होय तया। ४०। ऐसा एक संवत्सर जंव लोटे। तंव शिष्य जाहले तीनशें साठ। लंगोटबंद वैराग्यें उद्भट। आत्मज्ञान स्पष्ट पावले।४१।पुरीं पैठणीं लोक बोलती। जे कां यांचा उपदेश घेती। त्यांची तत्काळ उडोनि प्रपंचभ्रांती। मागें हिंडती सद्गुरूचे। ४२। एक ह्मणती चेटकी दारुण। एक ह्मणती घालितो मोहन। एक ह्मणती आत्मज्ञान। ठसावलें संपूर्ण तयासी ॥४३॥ एक ह्मणती हा स्वयें पांडुरंग। एक ह्मणती हें अत्यंत ढोंग। एक ह्मणती त्याचा संग। करितां भवभंग होतसे ॥ ४४॥ एक ह्मणती त्याचे दर्शना। इतःपर जाऊं न द्यावें कोणा। एक ह्मणती होणार चुकेना। प्राक्तनीं असेल जें कांहीं। ४५। एक ह्मणती त्याची भेटी। घेऊन सांगों चार गोष्टी। कीं बहुतांचे जीवांची करूनि सांटीं। पाडली तुटी संसारा।४६।ऐसें ह्मणोनि एके दिवशीं। आले नाथाचे दर्शनासी। तों हे आम्रवृक्षाचे छायेसी। बैसले होते ध्यानस्थ॥ ४७ ॥ मानसपूजा झालिया त्वरित। गणेशनाथ पाहे भोंवतें। कीं शिष्य बोलावूनि येथ। मस्तकीं हस्त ठेवावा।४८। तंव उभे ठाकूनि ते वेळ। काय बोलती निंदक खळ। तुह्मीं शिष्य करूनि भोळसाळ। आपुल्यामागें लाविले।४९। बहुतांचे संसारा केली तुटी। ह्मणोनि लोक होताती कष्टी। आतां आह्मीं सांगतों एक गोष्टी। तरी त्याचि राहाटीं वर्तावें।५०। तुह्मीं संत आत्मज्ञानी। दृष्टीसि सारिख्या चारी खाणी। तरी झाडासि उपदेश आजपासोनी। करीत जावा निजकृपें।५१। अवश्य ह्मणोनि तये क्षणीं। तत्काळ कौतुक दाखविलें नयनीं। जें मृत्युलोकीं नानासाधनीं। नये घडोनी सर्वथा।५२। चूतवृक्ष जुनाट होता तेथ। त्यासि उपदेश देऊनि त्वरित। मस्तकीं ठेऊनियां हस्त।तारकमंत्र सांगितला।५३।ऐसें दृष्टीस देखोन।काय बोलती ते विचक्षण।मनुष्यांसि अनुग्रह सांगतां जाण। ते प्रपंचभान टाकिती।५४। हा उपदेश ठसावला वृक्षासी। हें कैसें अनुभवेल आह्मांसी।तरी चमत्कार दाऊनियां निजकृपेसीं। संशय निरसीं सकळांचा। ५५। तंव भाकरभाजी याजकारण। नैवेद्यासि आणिली होती कवणें। गणेशनाथें ते उचलोन। आपुले करीं घेतली।५६। उपदेश दिधला ज्या वृक्षाकारण। तयासि काय बोलिला वचन। हा देवाचा प्रसाद मुख पसरून। प्रीतीकरून भक्षीं कां।५७।ऐसें बोलतां सद्गुरुनाथ। तंव अद्भुत कौतुक वर्तलें तेथ।झाडाचें खोड अकस्मात। उकललें सर्वां देखतां॥ ५८ ॥ त्यामाजी भाकर घालितां देख। मिळोनि गेलें पहिल्याचसारिखें। देखोनि आश्चर्य करिती लोक। तन्मय सकळिक झाले कीं। ५९। गणेशनाथासि ते वेळ। नमस्कार करिती विचक्षण खळ। ह्मणती तुजऐसा भक्तप्रेमळ। सज्ञान निर्मळ नसेची।६०।आह्मीं अहंकार धरूनि मनीं। व्यर्थचि केली तुमची छळणा।ऐशा रीतीं बोलोनि वचना। आपल्या सदना ते गेले।६१।एके दिवशीं गणेशनाथ। अरण्यामाजी कीर्तन करीत। श्रवणासि आले सज्ञान पंडित। आणि वैष्णवभक्त विवेकी।६२। वैदिक शास्त्रज्ञ आणि भाविक। अठरा वर्णांचे मिळाले लोक। कीर्तनप्रेमाचें निजसुख। पहावयासी पावले।६३। टाळ वीणे मृदंग वाजत। नामघोषगजर होत । नादें अंबर भरूनि तेथ। कोंदोनि गेलें तेधवां।६४। तंव वरते करूनि हात। पताका करवी गणेशनाथ। हें देखोनि सज्ञान पंडित। काय बोलतीं तें ऐका।६५। तूं तरी भराडी जातीचा हीन। आह्मी तों ब्राह्मण उंचवर्ण। कीर्तनीं टाळ्या तुझे वचनेंकरून। न पिटूं जाण सर्वथा।६६। यावरी गणेशनाथ उत्तर देत।ह्मणे ताडाचा वृक्ष उंच बहुत।परी त्याची छाया उपयोगी निश्चित।नाहीं पडत कोणाचे।६७। तेविं अठरा वर्णांमाजी निपुण।विप्र तंव वरिष्ठ पूज्यमान।परी कीर्तनाचे उपयोगीं जाण। तुमचे कर न पडती।६८। तरी आतां स्वस्थ करूनि मन।उगेंच तुह्मीं करावें श्रवण।टाळिया वाजवितील पाषाण। तुमचे कृपेनें स्वामिया।६९।ऐसें बोलतां वैराग्यशीळ।तों नवल वर्तलें देखती सकळ।दगडगोटे होते माळ्यावर।ते एकाएकीं उठिले पैं७०।जैशा करताळिया वाजती देख।तैसे लागती एकासी एक।ऐसें देखोनियां कौतुक।तटस्थ लोक पाहाती ७१ ह्मणती हें कौतुक अभिनव।दगडांसि कैसा आणिला जीव।गणेशनाथाचा अनुपम भाव।न कळे माव इंद्रादिकां७२मग चित्तीं अनुताप धरून।टाळ्या वाजविती सकळ ब्राह्मण। गणेशनाथाचें समाधान। जाहलें इतुकेन तेधवां ७३ तों मध्यान्हा आला गभस्ती। मग उजळिली मंगळारती।खिरापत घेऊनि निश्चिती।सदनाप्रती लोक गेले७४आह्मीं अहंकार धरून।व्यर्थ केलें याचें छळण।ऐशापरी वचनें बोलून। वाखाणिती गणेशनाथा। ७५। गणेशनाथ प्रेमळभक्त। त्यासि वर देती पंढरीनाथ। उज्जनी आणि सारशांत। यात्रा भरत अद्यापी।७६। संत महंत वैष्णव प्रेमळ। चमत्कार जागृत असे तें स्थळ । निजभक्तांची कीर्ति चिरका-

ळ। दीनदयाळ वाढविती ।७७। आतां न लिंपेचि जो विषयकर्दमीं। परमभाविक जो केशव स्वामी। तयाचें चरित्र मनोधर्मीं। ऐका तुह्मी भाविकहो।७८। स्वेच्छें हिंडतां देशावरी। एकदा गेले विजापुरीं। हरिदिनीसि सप्रेमभरीं। कीर्तन मांडिलें चोहटा।७९। केशवस्वामीची ऐकोनि स्थिती। श्रवणासि आले लोक बहुत। वैदिक विप्र आणि पंडित। संत महंत विरक्तही। ८०। अठरा वर्णांचे नारीनर। जाणते नेणते लहान थोर। दाटी जाहलीसे फार। भरूनि बाजार निघाला ।८१। हिलाल जळती सभोंवतें। टाळ मृदंगघोष तेथें। केशवस्वामी सप्रेमचित्तें। आनंदें नाचत कीर्तनीं ।८२। तंव शिष्य होता वृद्धब्राह्मण। तयाप्रती काय बोलती वचन। आजी एकादशीव्रत गहन। उपोषण सकळांसी।८३। तरी तूं वाणियाचे गृहासि जाईं। सुंठ साखर घेऊनि येईं। तेचि खिरापत जातेसमईं। लोकांसि देईं प्रसाद।८४। आज्ञा ऐशी होतां त्वरित। ब्राह्मण गेला बाजारांत। वाणियाचे दुकानीं जात। तंव तो निद्रित होता कीं।८५। हाका मारूनी सावध केला। ह्मणे सुंठ साखर देईं मजला। अवश्य ह्मणूनि वाणी उठिला। तों अंधार पडला दुकानांत ८६ सुंठ चांचपोनि जंव पाहात। तंव बचनागाचें लागलें पोतें। सात शेर मोजूनि दिधली त्वरित। पडली भ्रांती मानसीं।८७। साखर तितुकीच देऊन। वाणी तयासि बोले प्रतिवचन। माझा पुत्र हाटा गेला ह्मणून। कीर्तनासी येणें न जाहलें।८८। माणसें मिळालीं असतील फार। सुंठ न पुरे एवढी साचार। ह्मणूनि आणिक ओंजळभर। अधिक टाकिली तयानें ८९ जैसें अभय देऊन घातला दर्प। कीं प्रार्थना ह्मणोनि अपशब्द अमुप। कीं पुष्पहार ह्मणूनि महासर्प। कंठीं घातला नकळतां।९०। कीं अनुष्ठान ह्मणोनि प्रयोग केला। कीं औषध ह्मणोनि रोग दीधला। कीं मेघ ह्मणोनि अग्नि लाविला। काननीं जैसा नकळतां।९१। तैसेंच वाणियानें केलें। सुंठ ह्मणोनि विष दीधलें। निद्रालस्यें फार व्यापिलें। समजलें नाहीं तयासी।९२। घेणारासही न कळे कांहीं। मग बिऱ्हाडासि आला लवलाहीं। आडकित्यानें ते समयीं। तुकडे करूनी ठेविले।९३। हा न कळतां ओढवला आघात। हें जाणोनि पंढरीनाथ। ह्मणे श्रोते भक्षितील खिरापत। मग मोठा अनर्थ होईल कीं ९४ एकादशीचा उपवास जाण। बचनाग खातां पावती मरण। मग पुढें माझें कीर्तनश्रवण। कोणी न करितील सर्वथा।९५। आणि निजभक्ताच्या वचनास। कोणी न धरितील विश्वास। मग मागील कीर्ती माझी सुरस। असत्य जनास वाटे कीं ९६ ऐसें ह्मणोनि पंढरीनाथ। ह्मणे आजिचा टाळावा अनर्थ। मग बचनागाचें विष समस्त। शोषून घेतलें तेधवां ९७ विषाचें अमृत केलें जाण। जें सेवितां सौख्य दासांकारण। जेणें जन्ममरणाचें होय खंडन। तें जगज्जीवन करीतसे।९८। इकडे कीर्तनामाजी केशवभक्त। प्रेमानंदें गात नाचत। टाळिया पिटोनि हातोहात। गुण वर्णित श्रीहरीचे।९९। चारीप्रहर जाहलें कीर्तन। ओंवाळिला रुक्मिणीरमण। बचनागाची खिरापत जाण। सकळांकारण वांटिली।१००। हरिप्रसाद ह्मणोनि, निश्चिती। कोणी पदरीं बांधोनि ठेविती। तेथेंच भक्षोनि कित्येक जाती। सदनाप्रती आपुल्या।१। उदया येतां वासरमणी। दुकानीं जागा जाहला वाणी। तों बचनागाचें पोतें नयनीं। पुढें अकस्मात देखिलें।२। ह्मणे अनर्थ जाहला थोर। आतां



काय करावा विचार। सुंठ ह्मणोनि साचार। बचनागची दीधला ३ साधुसंत प्रेमळभक्त। आले असतील कीर्तनांत। ते सकळ पावले असतील मृत्यू। मजवरी निमित्त आलें कीं ४ नगरांत कळतां वर्तमान। कोण रक्षील मजलागून। मृत्यु पावल्यावरी जाण। रौरव भोगणें लागेल कीं। ५। तरी इह परलोकीं निश्चिती। मी कानकोंडा जाहलों दुर्मती। मज ऐसा पातकी निश्चिती। नाहीं त्रिजगतीं सर्वथा ६ चतुष्पदांमाजी निंद्य जनीं। खर सूकर जातीचे दोनी। मी अवगुणी तयांहूनी। यापरी वाणी अनुतापला।७। तरी आतां कासया वागवावें जिणें। विहिरींत घालून द्यावा प्राण। ऐसा मनीं निश्चय करून। दुकान टाकोन निघाला।८। समाचार घेतां नगरांत। तंव कोणीच नाहीं पावलें मृत्यु। कान देऊनि उगाचि ऐकत। तों कोणी रडत दिसेना। ९। परस्परें पुसे लोकांसी। गेले होतेत काय हरिकथेसी। खिरापती असली तुह्मांपासीं। तरी प्रसाद आह्मांसी देईजे।११०। ते ह्मणती आह्मांसि निराहार। रात्रीस वांटिली सुंठसाखर। तेथेंचि ते भक्षोनि सत्वर। सदनासि आलों आपुले।११। यावरी वाणी बोले त्यांसी। कालचें निश्चक्र तुह्मांसी। पोटांत होत असेल कासाविसी। तरी भोजन वेगेंसीं करावें १२ ते ह्मणती दंडक आह्मांप्रती। तुज ऐसे न हों अन्नार्थी। उपवासी राहावया आणीक राती। सामर्थ्य चित्तीं वागवितों। १३। ऐसें ऐकूनि उत्तर। परस्परें घेतला समाचार। मग श्मशानभूमीस सत्वर। जाऊनियां पाहिलें।१४। तंव एकही प्रेत न दिसे तेथ। मग वाणियास चमत्कार वाटत। ह्मणे अरिष्ट निरसी पंढरीनाथ। चुकविले आघात बहुतांचे। १५। तों इकडे केशवस्वामी स्नान करूनी। धातुमूर्ती पाहे विलोकूनी। तंव काळिमा देखिली तयालागूनी। मग विस्मय मनीं वाटला।१६। जैसें चंद्रासि लागतां ग्रहण। तो तत्काळ होय तेजहीन। तैशा रीतीं रुक्मिणीरमण। नीलवर्ण दिसतो कीं।१७। हें देखोनि केशवभक्त। आश्चर्य करिती मनांत। ह्मणे मूर्ति होती लखलखित। आजि काळिमा अद्भुत जडली कां १८ हें नवल ऐकोनि साचार। पाहावयासि आले नारीनर। तों वाणी येऊनि सत्वर। केशवस्वामीसी बोलतसे। १९। सुंठ पाहतां अंधारांत। बचनागाचें पोतें हातां लागत। सात शेर मोजूनि निश्चित। आपुल्याहातें दिधलें म्यां।१२०। तें अरिष्ट निरसिलें पंढरीनाथें। वांचविलें सकळ श्रोतयांतें। या अपराधाचें प्रायश्चित्त मातें। सांगा त्वरित स्वामिया।२१। केशवस्वामी ऐकूनि मात। नेत्रीं प्रेमाश्रु लोटले त्वरित। कंठ जाहला सद्गदित। काय बोलती देवासी २२ जयजय दीनदयाळे विठ्ठले। आजिचें निमित्त थोर टाळिलें। आपुलें बिरुद सत्य केलें। दासांसि रक्षिलें निजकृपें।२३। बचनागाचें विष दारुण। तुजलागीं चढलें नीलवर्ण। वांचवूनि बहुतांचे प्राण। आपण श्यामवर्ण जाहलेती। २४। तुझें नाम जपतां प्रऱ्हादभक्त। महाविषाचें जाहलें अमृत। आणि बचनागाचें विष किंचित। तें आजि बाधत कैशा रीतीं २५ तूं सर्वांवरिष्ठ देवाधिदेव। भजन करितां निवाला शिव। आणि बचनागें आजि केला उपद्रव। हाचि नवलाव श्रीविठ्ठला ॥ २६ ॥ निजांगें तुडविला काळिया सहज। तैं बाधक कांहीं न जाहलें तुज। आणि बचनागें काळिमा आणिली आज। हें नवल चोज श्रीहरी।२७। महाविषें भरूनि स्तन। पूतनेनें पाजिलें तुजलागून। तयाहूनि बचनाग कठिन। जा-

३० हलेति नीलवर्ण यासाठीं २८आजि अमृतासचि आलें मरण।कीं अंधारें ग्रासिलें सूर्यालागून।कीं भागीरथी पापेंकरून।
जाहली मलिन सर्वांगीं ।२९। कीं पृथ्वीस जाहला तृणाचा भार। कीं पर्वतासि भिऊन पळालें वज्र। कीं धुळीनें मळोनि
गेलें अंबर। तैसा विचार घडला कीं।१३०।नातरी चंद्रमंडळासि जाहला उबारा। कीं क्षुधा लागली क्षीरसमुद्रा। पिशा-
चबाधा पार्वतीवरा। जाहली ऐसें वाटतसे।३१। नातरी दरिद्रें पीडिला कुबेर। कीं विधीचें असत्य जाहलें उत्तर। कीं ते-
जें लोपूनि गेलें अंबर। तैसें दिसोन आलें कीं। ३२। हें इतुकें घडेल गोविंदा। परी तुज नव्हेचि विषबाधा। तरी वाढवाव-
या दासांची मर्यादा। लीला सगुण दाखविसी। ३३। तूं अज अजित पंढरीनाथा। कळिकाळाचाही नियंता। तरी कृपा
करूनि अनाथनाथा। होईं माग़ुता सोज्वळ। ३४। ऐसी ऐकूनियां स्तुती। संतोषले रुक्मिणीपती। लखलखित धातूची
मूर्ती। दिसों लागली तेधवां।३५। हें दृष्टीस देखोनि कौतुक। आश्चर्य करिती सकळ लोक। ह्मणती कीर्तनापरीस साधन
आणिक। नाहीं सर्वथा कलियुगीं।३६। वाणियासि अनुताप जाहला पूर्ण। सांडिलें सकळ प्रपंचभान। केशवस्वामीचे
संगतीनें जाण। करी श्रवण हरिकथा।३७।आणिक चरित्र रसाळवाणी। श्रोतीं सादर ऐकावें श्रवणीं ।गोमाई आवा वि-
धवा ब्राह्मणी। पंढरपुरासी चालिली।३८।परमदुर्बळ अति दीन। भक्षावयासि न मिळे अन्न। वस्त्र नेसली फाटकें जीर्ण।
मागे कोरान्न घरोघरीं। ३९। गुळसन्यापासीं आली सत्वर। तंव चंद्रभागेसि चालिला पूर। मानसीं जाहली चिंतातुर।
ह्मणे कोण उतार करील सज।१४०। मग आषाढशुद्ध दशमीसी। यात्रा राहिली उपवासी । गोमाई ह्मणे कोळियासी।
न्यावें मजला पैलतीरा।४१।यात्रा मिळाली असे बहुत। थोरथोर लोक भाग्यवंत। उताऱ्यांसि द्रव्य देऊनि त्वरित। जाती
नावेंत बैसोनी।४२।गोमाई जवळ धांवूनि जात।तों लोटोनि टाकिली उदकांत।वस्त्र भिजतां रडतरडत।माग़ुती येतबाहेरी
४३।दीर्घस्वरें करी रुदन। आतां पैलतीरीं नेईल कोण। तारू ह्मणती पैसा देऊन। जाईं उतरून ह्मातारे।४४।गोमाई त्या-
स देत उत्तर। पीठ देतें ओंजळभर। हें घेऊनियां सत्वर। भिंवरापार करावें।४५।पैसा न मिळे मजप्रती। ऐसें सांगे नाना-
रीतीं। परी दया नुपजे तयांचे चित्तीं। कठिण दुर्मती क्षेत्रींचे॥४६॥सकळ यात्रा उतरून गेली। गोमाई राहिली ऐलती-
रीं। कांहीं उपाय न सुचे अंतरीं। मग रुदन करी एकलीच।४७। ह्मणे मज न भेटे रुक्मिणीवर। व्यर्थचि पडिली येरझा-
र। क्षेत्रवासी लोक कठिण फार। द्रवेना अंतर कोणाचें॥४८॥ ऐसें जाणोनि पंढरीनाथ। कोळियाचें रूप धरूनि त्वरि-
त। जवळ सांगडी दीननाथ। घेतें झाले तेधवां।४९। गोमाईजवळ जाऊनि श्रीहरी। काय बोलती ते अवसरीं। तुज जा-
णें असेल पैलतीरीं। तरी ऊठ लवकरी ह्मातारे॥१५०॥ ती ह्मणे बापा मी दुर्बळ। द्रव्य द्यावयासि नाहीं जवळ। तरी पीठ
घेऊनि ओंजळभर। नेशील तर येईन मी।५१। यावरी ह्मणे शेषशायी। मी कोणापासून घेत नाहीं। रंजल्या गांजल्यास
पाहीं। मी लवलाहीं उतरीतसें॥ ५२॥ याजसाठींच दिवस बहुत। राहिलों असें पंढरपुरांत। ऐशी ऐकूनियां मात। गो-
माई चित्तांत संतोषली॥५३॥ह्मणे तारुवा वचन ऐक। रात्र झालीसे प्रहर एक। दुसरें वस्त्र नाहीं आणिक। नेसावयासी



मजलागीं॥५४॥ यावरी बोले पंढरीनाथ। भिजों न देतां हस्तपादसहित। खांद्यावरी बैसवूनि निश्चित। नेतों लवलाहीं
पैलतीरा।५५।ऐसें ह्मणूनि दीनदयाळें। गोमाईसि उचलिलें ते वेळ। लोटलें नसतां एक पळ। नेलें तत्काळ पैलतीरा।५६।
गोमाई तारुवासि काय बोले। तुझें अंग कैसें नाहीं भिजलें। मज पैलतीरीं बैसाविलें। हें अद्भुत जाहलें नवल कीं॥ ५७॥
यावरी ह्मणे चक्रपाणी। मी तैसा उताऱ्या नव्हे अडाणी। भवसिंधु दासालागूनी। कोरडाचि पार पाववितों॥५८॥ गो-
माई ह्मणे ते अवसरीं। तुवां उपकार केला माझे शिरीं। तरी पीठ देतें ओंजळभरी। हें घेईं पदरीं आपुल्या॥५९॥ यावरी
देव बोलिले कायी। मी कोणापासूनि घेत नाहीं। याचे पानगे करूनि पाहीं। द्वादशीस घालीं द्विजवरां।१६०।ऐसें बो-
लोनि जगज्जीवन। अदृश्य जाहले न लागतां क्षण। मग महाद्वारासि जाऊन। घेतलें दर्शन देवाचें ॥ ६१ ॥ एकादशीस
ऐकोनि कीर्तन। केलें चंद्रभागेचें स्नान। तें पीठ पदरीं बांधून। वाळुवंटांत बैसली॥ ६२॥ ह्मणे आजि पर्वकाळ द्वादशी।
सिधा द्यावा ब्राह्मणासी। तरी डाळ मीठ मजपासीं। द्यावया पदरीं नसे कीं।६३।कोणी ब्राह्मण पडेल दृष्टीं। तयासि म-
धुर सांगे गुजगोष्टी। मजवरी करून कृपादृष्टी। मूठभरी पीठ घ्यावें स्वामिया ॥ ६४ ॥ परी कोणीच जवळ न ये ब्राह्म-
ण। ह्मणती मुळींच जाहला अपशकुन। आज कैसा भेटेल यजमान। झालें दर्शन या विधवेचें॥६५॥ टाकूनि गूळ तांदू-
ळ घृत। पीठ कोण घेतसे पदरांत। ऐसें बोलोनि विप्र समस्त। जवळ न येती कोणीही॥ ६६॥ गोमाई ह्मणे पंढरीनाथा।
काय उपाय करूं आतां। द्वादशीस विप्र न मिळतां। अन्न सर्वथा न घेईं मी६७ऐसा सदृढ देखोनि भाव।तत्काळ पावला
पंढरीराव। वृद्ध ब्राह्मण देवाधिदेव। होऊनि आला ते समयीं६८गोमाईस ह्मणे ते वेळ। आजि द्वादशी पर्वकाळ। आ-
णि मी ब्राह्मण अतिदुर्बळ। आलों तत्काळ तुजपाशीं॥६९॥ पानग्याचें पीठ असेल जरी। तरी सद्भावें घालावें माझे प-
दरीं। ऐसें बोलतांच श्रीहरी। संतोष अंतरीं वाटला॥ १७०॥ पुढती बोले द्विजवर। मजला कोठेंच नाहीं थार। देउळीं
घेतलें बिढार। क्षुधातुर जाहलों कीं॥७१॥जरी पानगे भाजोनि देशील येथ। तरी भोजन करीन संतोषचित्तें। ऐसें बो-
लतां पंढरीनाथ। गोमाई चित्तांत संतोषली॥७२॥ मग शुभा वेंचोनि निजांगें। स्नान करूनि भाजिले पानगे। ते आव-
डीकरून पांडुरंग। खाती लगबगें निजप्रीतीं॥७३॥ तों इतक्यांत वृद्धरूप धरूनी। जवळी आली माता रुक्मिणी। ह्मणे
एकलेच येऊनि चक्रपाणी। बैसलेत भोजनीं न कळतां॥७४॥ ब्राह्मण ह्मणे गोसाईकारण। आतां सुवासिनीसी घालीं
भोजन। तुझें भाग्य सफळ जाण। घडलें मेहुण अनायासें। ७५। दोन पानग्यांचें पीठ होतें। परी तयासि आली बरकत।
रुक्मिणी आणि पंढरीनाथ। गोमाईसहित जेविलीं॥७६॥ मुखशुद्धी घेऊनि तुळसीदळ। अदृश्य जाहले दीनदयाळ।
आणिक चरित्र बहुरसाळ। परिसा प्रेमळ भाविक हो।७७।लतिबशाह मुसलमान। परमभाविक वैष्णवजन। गीता भा-
गवत करी श्रवण। श्रीरामभजन अहर्निशीं॥७८॥ सांडोनि आपुला यवनधर्म। कीर्तनीं लाविलें अद्भुत प्रेम। अर्चन पू-
जन नित्यनेमें। करीत निःसीम आवडीं॥७९॥मग सकळ यवन मिळून। रायासि सांगती वर्तमान। कीं लतिबशाह श्री-

रामभजन। करीतसे अहर्निशीं ॥१८०॥ अविंधराजा अविवेकी बहुत। तेणें छळणासि पाठविले दूत। कीं लतिबशाहाचा आश्रम त्वरित। लुटोनि फस्त करावा ॥८१॥ राजाज्ञा होतांचि देख। तत्काळ धांवले सकळ सेवक। परी तयाचे दर्शनें शांतिसुख। पावले सकळिक ते समयीं ॥८२॥ अनुताप जाहला त्यांचे चित्ता। ह्मणती राजसेवा न करावी आतां। श्रवण करित भगवद्गीता। येथेंच निरंतर असावें ॥ ८३ ॥ राजा विस्मित मन करून। ह्मणे कोणीच न येती परतोन। तरी आपणचि निजांगें जाऊन। करूं छळण तयाचें।८४। बादशाह येतो छळणेलागूनी। हा वृत्तांत कळला याचे मनीं। मग भागवताचें पुस्तक काढोनी। वृंदावनीं बैसला ॥८५॥ भोंवतीं प्रेमळ भाविक सज्जन। श्रवण करिती आवडीकरून। तंव इतुक्यांत अविंधराजा त्वरेंकरून। बैसला येऊन त्या ठायीं ॥८६॥ सभोंवतें पाहे तेवेळ। तों सारवून केलें स्थळ निर्मळ। भोंवतीं सुगंधपुष्पें परिमळ। मध्यें तुळसीवृंदावन ॥८७॥ चुनेगच्ची नितळ केल्या भिंती। त्याजवरी चित्रें लिहिलीं निगुती। दशावतारांच्या आकृती। काढिल्या असती तयांवरी।८८। आणिक तीर्थें क्षेत्रें पुरी। लिहिलीं असती तयावरी। वैकुंठ कैलास काढोनि कुसरी। रंग करारी दीधला ॥ ८९ ॥ ऐसें स्थळ देखोन। अविंध जाहलासे क्रोधायमान। मग छळनाचा उपक्रम। काढिता जाहला तेधवां। १९०। राधिका कृष्ण वृंदावनीं। लिहिलीं होतीं चितार्‍यांनीं। राधा हातीं विडा घेऊनी। देतसे वदनीं कृष्णाचे ॥९१॥ लतिबशाहासी राजा बोलत। हीं उभयतां लिहिलीं कोण येथ। तें मज सांगावें जी त्वरित। ऐसें बोलत सक्रोधें ॥ ९२ ॥ लतिबशाह बोले वचन। तीं राधिका कृष्ण दोघेंजण। तिचे हातीं काय ह्मणोन। रायें पुसिलें तयासी।९३। विष्णुभक्त सांगे तयाप्रती। विडा करोनि कृष्णासि दे ती। ऐसी ऐकोनि वचनोक्ती। अविंध चित्तीं संतापला ॥९४॥ मग ह्मणे राधिका विडा देत। तरी तुझा कृष्ण कां नाहीं खात। ऐसी ऐकतांचि मात। प्रेमळ भक्त ऊठिला।९५। मग दोनी कर जोडूनियां जाणा। कृष्णजीस भाकीत करुणा। भक्तकैवारिया जगन्मोहना। ऐक विज्ञापना एक माझी ॥९६॥ विडा घेऊन सद्भावेंसी। राधिका उभी तुह्मापासीं। तरी कृपा करोनि हृषीकेशी। निजमुखीं घेईं कां।९७। निजभक्ताचा सप्रेमभाव। देखोनि तुष्टला देवाधिदेव। कौतुक दाखविलें अपूर्व। मायालाघव करोनियां ९८ कृष्णाचें चित्र होतें लिहिलें। त्याणें तत्काळ मुख पसरिलें। राधिकेनें विडा ते वेळे। मुखीं घातला लवलाहीं।९९। तेथें साक्ष ठेविली कोणती। विडा होता राधिकेचे हातीं। तो हिरवा रंग अवचितीं। पुसोन गेला तेधवां।२००। ऐसें कौतुक देखोन। लतिबशाहासि केलें नमन। ह्मणे धन्य तुझें शुद्धभजन। म्यां व्यर्थ छळण केलें कीं ॥ १ ॥ ऐसें ह्मणोन तया अवसरा। राजा गेला आपुले घरा। निजभक्ताच्या कैवारा। आले आकारा श्रीपती ॥२॥ अनंत भक्त अनंत चरित्रें। अनंत अवतार राजीवनेत्र। महीपती त्याचा शरणागत। गुण वर्णित कीर्तनीं ॥३॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविक भक्त। पंचपंचाशत्तमाध्याय रसाळ हा ॥ २०४ अध्याय ॥ ५५ ॥ ओंव्या २०४ ॥



श्रीगणेशाय नमः। श्रीदीननाथाय नमः। जय वैकुंठवासी मनमोहना। क्षीराब्धितनयेच्या प्राणजीवना। अविनाशा कल्पद्रुमा। पुरुषोत्तमा पांडुरंगा ॥ १ ॥ कृष्ण विष्णु सदाशिवा। सकळ जीवांचा तूं विसांवा। करुणाकरा देवाधिदेवा। निजसौख्यठेवा तूं एक ॥ २ ॥ तूं निराधारियांसि आधार। प्राक्तनहीनांसि अतिउदार। भक्तांस छळितां दुराचारी। निजांगें कैवार तूं घेसी।३। तूं निःसंगाचा अससी संग। निरपेक्षाच्या लागसी मागें। भजनीं प्रेम देऊनि अभंग। करिसी भवभंग दासांचा ॥४॥ तूं अनाथनाथ दीनाचा पाहुणा। निर्बळास देशी अभयदाना। मूढमती मी जगज्जीवना। तरी ग्रंथरचना बोलवीं ॥ ५ ॥ मागील अध्यायाचे अंतीं। लतिबशाहासि छळितां नृपती। चित्रींचीं लेपें सजीव होती। सप्रेम भक्ती देखोनी ॥६॥ आतां वैष्णवांमाजी निधडा वीर। जो वैराग्यमंडपाचा स्तंभ थोर। तो निजभक्त संतोबा पवार। चरित्र सादर परिसा त्याचें ॥ ७ ॥ घरीं अश्व गज धन संपदा। रायापासीं असे मान्यता। एक तुकयाचें कीर्तन ऐकतां। अनुताप चित्ता जाहला ॥ ८ ॥ ह्मणे मिथ्या संसार मायाभ्रांत। नरदेह तोही नाशवंत। आतां आपण कासया व्यर्थ। आयुष्य वायां दवडावें॥९॥ संगतीस सेना होती कांहीं। ते जवळ बोलावूनि लवलाहीं। शिबंदी वारून टाकिली पाहीं। ह्मणे आपुलाले ठायीं तुह्मीं जावें ॥ १० ॥ मग बोलावून द्विजांप्रती। जवळील सर्व लुटविली संपत्ती। अश्व गज रथ ब्राह्मणांप्रती। वांटोनियां टाकिले ॥ ११ ॥ चार हात वस्त्र फाटकें जीर्ण। तें आपण केलें परिधान। उपाधीरहित होऊन। नामस्मरण करीतसे ॥ १२ ॥ रांजणगांव सांडसांचें। तेथें अधिष्टान होतें त्याचें। वैराग्य ठसावतांच साचें। निर्लज्ज नाचे कीर्तनीं ॥ १३ ॥ भीमरथी मुळामुठेचे संगमाला। त्या अरण्यांत बेटावरी जाऊन बैसला। जैसा पिंजर्‍यांतूनि शुक निघाला। जाऊन बैसला वृक्षावरी ॥१४॥ जैसा भ्रमर लोभें भुलत। गुंतला होता कमळिणीआंत। कठिण मन करूनि निश्चित। बाहेर निघत अनुतापें ॥१५॥ कां बहुतां दिवसांचा भुजंग असे। तो कांत टाकितां सतेज दिसे। प्रपंचमाया त्यजितां तैसें। संतोबा बावास वाटलें।१६। हा वृत्तांत गांवांत जाहला श्रुत। ऐकोनि लोक आश्चर्य करित। माता लोभें आक्रंदत। ह्मणे कैसें विपरीत जाहलें ॥ १७॥ सेना संपत्ति लुटवूनि पाहीं। पुत्र तो जाहला विदेही। वडिलांचा नांवलौकिक पाहीं। आतां पिशुन तेही हांसतील ॥१८॥ मग सुनेस शिबिकेंत बैसवून। लेवविलीं अलंकारभूषणें। ह्मणे तरुण स्त्रीस दृष्टीं देखोन। येईल परतोन प्रपंचीं ॥ १९ ॥ बेटावरी त्या शिवालयांत। संताजी एकांतीं स्मरण करित। तंव कांता बैसोन शिबिकेंत। आली अकस्मात त्या ठायीं ॥ २० ॥ नेत्र उघडोनि कांतेस बोलत। ह्मणे तूं कासया आलीस येथ। आतां परतोनि जाईं त्वरित। उत्तर बहुत न बोलतां ॥ २१ ॥ पत्नी ह्मणे ते अवसरीं। मी तुह्मांपासूनि नव्हेचि दूरी। जळचरांहीं उदधीस सांडिलें जरी। तरी मग गति दुसरी त्यां नाहीं।२२। वृक्षाचे मूळीं साल जडली। कीं सुवर्णा-अंगीं कांति लागली। ते करीन ह्मणतां वेगळाली। वायांच बोली असत्य ॥ २३ ॥ तेविं पतिव्रता भर्त्याकारण। टाकोनि जातां गति कोण। ऐकूनि कांतेचें वचन। संतोबा प्रतिवचन देतसे ॥ २४ ॥ माझी तों ऐसी उ-

दास वृत्ती । तुज वस्त्रें अलंकार बहुत असती । कांता ह्मणतां तुजप्रती । लाज चित्तीं वाटेना ॥२५॥ जरी मन करणें अ-
सेल कठिण । तरी याचकां देईं वस्त्रभूषणें । नाहीं तरी सत्वर उठोन । आटोपीं सदन आपुलें ॥ २६ ॥ ऐसी ऐकोनि वच-
नोक्ती । अनुताप जाहला कांतेप्रती । मग अलंकार सकळ आपुले हातीं । काढोनियां टाकिले ॥ २७ ॥ दिव्यवस्त्रें परि-
धान केलीं होतीं । तीं फेडून टाकिलीं झाडावरुतीं । तेणें चिंध्यादेवीप्रती । संतोष चित्तीं वाटला॥२८॥संताजीपासीं
धोतर होतें । तें अर्ध फाडोनि दिधलें तीतें । उभयतां उदास होऊन तेथें । नामस्मरण करित बैसलीं॥२९॥ तों प्रदीप्त
जाहला जठराग्न । क्षुधेनें व्याकुळ जाहला प्राण । मग कांतेप्रती बोले वचन । भिक्षेस जाणें नगरांत ॥ ३० ॥ सा-
लोमालोच्या पारगांवांत । सोयरे मित्र इष्ट बहुत । तरी आतां निर्लज्ज होऊनि तेथ । जावें त्वरित त्या ठायीं ॥३१॥
ममता लावूनि बोलती जन । तयांसि न देईं प्रतिवचन । आणि सगळी भाकर देईल कोण । तरी पदरीं न घेणें स-
र्वथा ॥ ३२ ॥ अवश्य ह्मणोनि प्राणनाथा । सत्वर निघाली पतिव्रता । सांडोनि लौकिक लज्जा ममता । पारगां-
वांत प्रवेशली ॥ ३३ ॥ भिक्षा मागतां घरोघरीं । काय बोलति नरनारी । सुकृत केलें जन्मांतरीं । तें वैराग्य अंत-
रीं ठसावलें ॥ ३४ ॥ घरोघरीं जाऊनि त्वरित । हरि विठ्ठल शब्द बोलत । नयेच भिक्षा इतुक्यांत । तरी जात पुढें
लगबगें ॥ ३५ ॥ तों आपुले नणंदेचे घरीं । अकस्मात गेली ते अवसरीं । हरि विठ्ठल ह्मणोनि द्वारीं । साद घात-
ली तेधवां ॥ ३६ ॥ तों संताजीची बहिण साक्षात । ते बाहेर धांवोनि आली त्वरित । गळां मिठी घालोनि रडत ।
काय बोलत निजमोहें ॥ ३७ ॥ ह्मणे वहिनी तूं अति सुकुमार । लावण्यगुणें अति गंभीर । परी एकाएकींच ईश्वर । कै-
सा क्षोभला कळेना॥३८॥ बैसली होतीस शिबिकेंत । आतां खडे रुतत असतील बहुत । टाकूनि भूषणें लखलखित । उ-
दासवृत्ति धरिली कां ॥ ३९॥ भरजरी वस्त्रें त्यजोन जाण । आतां नेसलीस फाटकें जीर्ण । सांडूनि घरचीं पक्कान्नें । मा-
गतीस कोरान्न घरोघरीं ॥ ४० ॥ मग दोन रोट्या आणूनि त्वरित । त्यांमाजी घातलेंसे गूळ घृत । आग्रह करून झोळीं-
त । तिणें अकस्मात टाकिल्या ॥ ४१ ॥ देखोनि संताजीची कांता । ह्मणे इतुकें अन्न कासया देतां । वृत्तांत कळतां प्राण-
नाथा । क्षोभतील तत्वता मजवरी।४२।येरी सद्गदित होऊनी। ह्मणे मी मायेनें देतसें साजणी। तरी आश्रमासि जाऊनी ।
बैसा भोजनीं उभयतां ।४३। तिणें आपुली शपथ घालितां । परतली बंधूची निजकांता । बेटांत येऊन पतिव्रता । ह्मणे
भोजन प्राणनाथा करावें।४४। भिक्षा मागोनी आणिली होती । ते झोळी पुढें ठेविली निगुती । तों सगळ्या रोट्या अ-
वचितीं । दृष्टीस पडल्या तेधवां ॥४५॥ हें देखोनि वैराग्यशीळ । कांतेस पुसे ते वेळ । तिणें वृत्तांत सकळ । सांगीतला त-
यासी । ४६ । अनुतापें कांतेसि बोले काय । परतोनि पारगांवास जाईं । जेथोनि मिष्टान्न आणिलेंस पाहीं । ज्याचें त्या-
स देईं परतोन ।४७। हें नायकसी जरी वचन । तरी सर्वथा मी न करीं भोजन । देखोनि भ्रताराचें निर्वाण । गेली परतोन
त्या ठायीं ॥४८॥ नणंदेसि वृत्तांत सांगूनी । भिंवरेपासीं आली परतोनी । तों अस्तमाना गेला तरणी । काहूर गगनीं दा-



टलें ॥४९॥ उगमीं पर्जन्य पडला फार । तों अकस्मात सरितेसी आला पूर । मनीं जाहली चिंतातुर । ह्मणे कैसा विचार
करावा ॥५०॥ देव गुरु अथवा भ्रतार । ते पैलतीरीं राहिले दूर । इकडे अंतरला संसार । कर्म दुस्तर बळवंत कीं ॥५१॥ प-
दरीं सुकृत नसतां देवा । भ्रताराची न घडे सेवा । आतां धांव पाव गा केशवा । ह्मणोनि धांवा करितसे ॥५२॥ ऐसें संक-
ट देखोनि तेथ । तत्काळ पावले पंढरीनाथ । तारूचे रूपें दीननाथ । काय बोलत तियेसी ॥५३॥ ह्मणे तूं कां बैसलीस चिं-
तातुर । पैलतीरीं असे संतोबा पवार । तेथवर जाणें असेल जर । तरी मी देतों उतार करूनी । ५४ । यावरी संतोबाची
पत्नी । काय बोले तारुवालागूनी । मी तुझी धर्माची भगिनी । तरी देईं उतरोनी सत्वर ।५५। ऐसें ऐकूनी श्रीहरी । तिज-
ला बैसविलें खांद्यावरी । निमिष न लागतां पैलतीरीं । नेऊनियां ठेविलें।५६। दुरूनि दाखवी पंढरीनाथ । पैल तो संतोबा
दिसत । ऐसें वदोनि रुक्मिणीकांत । जाहले गुप्त ते ठायीं ।५७। भ्रतारापाशीं जातां त्वरित । सांगीतला सकळ वृत्तांत ।
ह्मणे तुज भेटला वैकुंठनाथ । आणि माझा कां अंत पहातसे ।५८। तरी न होतां श्रीहरिदर्शन । मी सर्वथा न सेवीं अन्न ।
ऐसा निश्चयें केला पण । सत्य जाण निजकांते॥५९॥ दुसरे दिवशीं पारगांवांत । एक वाणी होता भाविक भक्त । तया-
सी स्वप्नीं पंढरीनाथ । आज्ञा करीत ते ऐका॥६०॥ आपुले घरीं पक्कान्नें करून । संतोबासि घालीं भोजन । तुझे पदरीं सु-
कृत जाण । ह्मणोनी दर्शन दिधलें म्यां ॥६१॥ चमत्कार देखोनि अद्भुत । वाणी तत्काळ जाहला जागृत । घरीं पक्कान्नें
करूनि त्वरित । घेऊनि जात संतोबापासीं ॥६२॥ सांगीतला सकळ वृत्तांत । ह्मणे मज आज्ञापी पंढरीनाथ । भोजन
करावें जी त्वरित । ह्मणोनि लागत चरणासी ॥६३॥ यावरी संतोबा भक्त । ह्मणे तुज भेटला रुक्मिणीकांत । आणि मा-
झे पदरीं काय दुरित । ह्मणोनि अंत पहातसे ।६४। तरी न होतां श्रीहरीचें दर्शन । मी न सेवीं कदापि अन्न । ऐसा निश्चय
देखोन । वाणी परतोन चालिला ।६५। कलियुगीं अन्नमय प्राण ह्मणत । परी त्याचा निश्चय अघटित । अंतर जाणोनि
रुक्मिणीकांत । भेटले साक्षात येऊनी ।६६। यावरी रांजणगांवांत । संतोबा नित्य भिक्षेसि जात । तेथें एक ब्राह्मण हो-
ता अभक्त । तो अखंड भांडत कांतेसी ।६७। आपणचि काढूनि कुरापत । कलह करीत नित्यनित्य । कांता जरी कांहीं
उत्तर देत । तरी भय घालित तियेसी।६८। ह्मणे संतोबापवारा ऐसा । मी वैरागी होईन तैसा । मग तुझी होईल दुर्दशा । भी
संसार-आशा टाकीन । ६९ । ऐसें बाह्यात्कारें बोलोनि दावित । ब्राह्मणकांता उगीच राहात । जैसा कोळाटी शस्त्र झा-
डित । अंगीं शूरत्व नसतांची ॥७०॥ कां अंगीं नसतां गर्भच्छाया । वंध्या डोहळे सांगतसे वायां । कीं पर्जन्याविण मेघा-
ची छाया । गर्जना वायां आकाशीं ।७१। कीं हृदयावरी नसतां कुचाकृती । हिजडे स्त्रियांचा आकार दाविती । नातरी
छत्रसिंहासन नसतां हातीं । बहुरूपी होती नृपवर ७२ तेविं चित्तीं नसतां शांति विरक्ती । जे वैराग्याच्या गोष्टी सांगती।
त्यांसी प्रपंचीं ना परमार्थीं । नाहीं गती दोहींकडे।७३। असो आतां तो ब्राह्मण पाहें । कांतेसि अखंड दाखवी भय । येरी
चिंताक्रांत होय । उगीच राहे ते समयीं॥७४॥ तों एके दिवसीं संतोबा भक्त । अंगणीं भिक्षेसि आले त्वरित । तिणें सा-

कल्यें वृत्तांत । तयाजवळी सांगितला ॥ ७५ ॥ ह्मणे स्वामी घरवती निता । होईन ह्मणे तुह्मांऐसा । यास उपाय करावा
कैसा । सांगाल तैसा ऐकेन मी ॥ ७६ ॥ विष्णुभक्त उत्तर देती तिसी । तो जेव्हां भांडण करील तुजसीं । मग टाकीं तांड
देऊनि तयासी । पाठवीं मजपासीं सत्वर ॥७७॥मग कांहीं मंत्रोपदेश सांगेन । करून देईन तुजस्वाधीन। जैसा दरवे-
शी माकडाकारण । हिंडे घेऊन घरोघरीं॥७८॥अवश्य ह्मणोनि तये क्षणीं । ब्राह्मण कांता लागली चरणीं । संतोबा भि-
क्षा घेऊनी । गेले आश्रमीं आपुल्या ॥७९ ॥ तों निमेष न लोटतांचि सत्वर । बाहेरूनि आला तिचा भ्रतार । ह्मणे स्वयं-
पाकासि कां लाविला उशीर । क्षुधातुर मी जाहलों॥८०॥मी संसाराचा त्याग करितों । संतोबापवाराऐसा होतों । मग
चित्तासि येईल तेथें जातों । वाद घालित ऐशा रीतीं ॥८१ ॥ कांता देत प्रत्युत्तर । आतां कासया करितां उशीर । जैसा
जाहला संतोबापवार । होईं सत्वर त्याऐसा ॥ ८२ ॥ ऐकोनि पत्नीचें वचन । विचारीं पडला तो ब्राह्मण । ह्मणे आतां
कासया ठेवावें जिणें । सक्रोधमन जाहला ॥८३॥ धोत्रें तांब्या घेऊन सत्वर । लवलाहें गेला बेटावर । संतोबासी बोले
प्रत्युत्तर । टाकूनि संसार मी आलों ॥ ८४ ॥ मी तुह्मांऐसा जाहलों निश्चिती । आतां कदापि न सोडीं तुमची संगती ।
अनुग्रह करून मजप्रती । लावा परमार्थीं आपुल्या ॥८५॥ अवश्य ह्मणे विष्णुभक्त । आह्मां अनायासें लाधली संगत ।
तुजऐसा वैरागी विरक्त । नाहीं दिसत त्रिभुवनीं ॥८६॥आतां भोपळा घेऊनि आपुल्या हातें । उदक आणूनि देईं मातें ।
वस्त्र पागोटें ठेवीं येथें । तस्कर बहुत जपताती॥८७॥अवश्य ह्मणोनि उठाउठीं । ब्राह्मण गेला सरितेकांठीं । क्षुधा बहुत
लागली पोटीं । ह्मणोनि कष्टी होतसे ॥८८॥ तों मागें वस्त्रें फाडोनि सत्वरीं । चिंध्या घातल्या बोराटीवरी । तांब्या झों-
किला डोहाभीतरी । तों ब्राह्मण सत्वरी पातला ॥ ८९ ॥ संतोबा ह्मणे त्याकारण । परिधान करीं आडबंदकौपीन । ब्रा-
ह्मणें संकोचित मनीं होऊन। धोतर फेडोन टाकिलें९० मग नेसोनियां लंगोटी । विष्णुभक्तासि पुसे गोष्टी । क्षुधा बहुत
लागली पोटीं । प्राण कंठीं धरिला म्यां ॥ ९१ ॥ मग नेपतींतरटें तोडोनि त्वरित । कांतेसह बैसले खात । ब्राह्मण ह्मणे हें
कडू बहुत । नाहीं भावत मजलागीं ॥९२॥ संतोबा उत्तर देत तया । आतां रसनाविषय पाहिजे कासया । तूं सर्व त्याग
करूनियां । आलासि लवलाहीं मजपासीं ॥९३॥ तरी कांहीं शीतळ देतों तुजकारण । तेणेंच करीं क्षुधाहरण । ऐकोनि
संतोबाचें वचन । संतोषयुक्त जाहला ॥९४॥ मग निंब तोडोनि आपुल्या हातें । सुखें खात बैसला तेथें । विप्र ह्मणे माझें
संचित । बरवें दिसत नाहीं कीं ॥९५॥खाऊन ओल्या कोरड्या भाकरी। सुखें होतों आपुले घरीं । परी माझी बुद्धि अ-
घोरी । प्रपंच मावारीं टाकिला ॥९६॥ स्फुंदोनि हळूच करी रुदन । ह्मणे आतां उपाय करावा कवण । सीत लागे अंगा-
सि दारुण । पोटीं क्षुधेनें पीडिलें॥९७॥ अंतरींची अवस्था जाणोनि ऐसी । संतोबा पुसो लागले त्यासी । तूं संसारीं हो-
ऊनि उदासी । कशास्तव आलासी या ठायीं ॥९८॥ येरू ह्मणे फुटलें प्राक्तन । वायांचि कांतेशीं केलें भांडण । मग उ-
दास होऊनि मन । तुह्मांपासीं पातलों॥९९ ॥ तों तुमची संगत बहुत कठिण । वस्त्रेंही टाकिलीं फाडोन । आतां घरासि

जावें परतोन । तरी लज्जा मनीं वाटत॥१००॥ तथापि रात्रीं गेलों पाहीं । तरी कांता येऊं देणार नाहीं । ह्मणेल लंगोट-
बंद गोसावी । कोण आला कळेना।१। ऐकोनि ह्मणे विष्णुभक्त । तूं कांतेसि अखंड होतास ह्मणत । कीं संतोबासारिखा
विरक्त । होऊनि अरण्यांत जाईन मी ॥ २ ॥ ऐसें आजवरोनि ह्मणतील जरी । तरी शपथ वाहें ये अवसरीं । मग तु-
जला नेऊन घालितों घरीं । कोणासि बाहेरी न कळतां ॥ ३ ॥ येरू तत्काळ धरी चरण । ह्मणे जरी मी कांतेसि क-
रीन भांडण । तरी माझी जिह्वा जाईल झडोन । वाहतसें आण देवाची ॥ ४ ॥ मग रात्रौं उठोनि संतोबाभक्त । द्वि-
जाचे घरासि गेला त्वरित । त्याचे कांतेसि वृत्तांत । काय सांगत एकांतीं ॥ ५ ॥ आह्मीं मंत्रदीक्षा देऊन । भ्र-
तार केला तुझे स्वाधीन । आतांचि देतों पाठवून । तरी तयासि भांडण न करावें ॥ ६ ॥ लंगोटी नेसून येईल येथें ।
तरी वस्त्र सत्वरीं देईं त्यातें । ऐशी ऐकूनियां मात । संतोषे चित्त तियेचें ॥ ७ ॥ इतुकें सांगोनि ते वेळां । परतो-
नि आला आपुल्या स्थळा । ब्राह्मणातें वृत्तांत सांगितला । आतां जावें वहिला घरासी ॥ ८ ॥ जरी कांतेसि क-
लह करिसील कांहीं । तरी मजऐसा वाईट नाहीं । येरू मस्तक ठेवूनि पाहीं । निघे लवलाहीं सत्वर ॥ ९ ॥ गांवां-
त प्रवेशला अंधारांत । ह्मणे कोणी देखेल अकस्मात । ह्मणे ब्राह्मणांस कळतां वृत्तांत । घालितील वाळीत मजलागीं
॥ ११० ॥ यास्तव लगबगें भेणेंभेणें । प्रवेशला आपुलें सदन । तैंपासोनि कांतेसीं भांडण । न करी जाण सर्वथा ॥ ११ ॥
यावरी संतोबा आषाढमासीं । पंढरीसि चालिला यात्रेसी । जैसी कन्या जातां माहेरासी । उल्हास मानसीं तियेच्या
॥ १२ ॥ तैशा रीतीं वैष्णवभक्त । सप्रेमभरीं गात नाचत । समागमें यात्रा बहुत । दोन सहस्र मिळाली ॥ १३ ॥ आषाढ
शुद्ध दशमीस सत्वरा । वारकरी आले नरसिंहपुरा । जेथें एकवट नीरा भिंवरा । संगम जाहला दोहींचा ॥ १४ ॥ आ-
षाढमास पर्जन्यकाळ । नदीस पूर आला तुंबळ । पात्र टाकूनि चालिलें जळ । देखोनि सकळ चिंतावले ॥ १५॥ ह्मणती
आजि न होतां नदीपार । उदयीक नाटोपे पंढरपुर । एकादशीस रुक्मिणीवर । दर्शन नेदीच सर्वथा॥ १६॥ ऐसें ह्मणो-
नि ते अवसरीं । यात्रा सर्व आली ऐलतीरीं । ह्मणती एक नांव असती जरी । तरी उतरूनि जातों सत्वर ॥ १७ ॥ हें दे-
खोनि संतोबा भक्त । आपुले मनीं विचार करित । ह्मणे देहाची आस्था धरितां निश्चित । तरी कैसा भगवंत भेटेल ।१८।
तरी तारिता मारिता श्रीहरी । ऐसा निश्चय करूनि अंतरीं । उदकीं प्रवेशोनि सत्वरीं । चरणचालीं चालिले ॥ १९ ॥
विष्णुभक्त भाविक प्रेमळ । तयासि बुडवूं न शके जळ । पोटऱ्यांइतुकेंच केवळ । उदक जाहलें तयासी ॥ १२० ॥ वीणा
घेऊनि ते अवसरीं । संतोबा नामस्मरण करी । सरितेवरूनि झडकरी । जाते जाहले तेधवां ॥ २१ ॥ हें नवल पाहतां ते
समयीं । सकळ यात्रेकरू बोलती कायी । आह्मां सांडोनि येथें पाहीं । जातां कैसे पैलतीरा ॥ २२॥ आपण केवळ ईश्वर
मूर्ती । ह्मणूनि आलों तुमचे संगतीं । परी प्राक्तनाची विचित्रगती । नाहीं संचितीं आमुच्या॥२३॥अनुपम महिमा ऐ-
किला बरा । ह्मणवोनि चालिलों पंढरपुरा । आतां परतोनि माघारां । जातों आह्मीं सकळिक ॥ २४ ॥ ऐकोनि यात्रे-

कन्यांची मात । उभे ठाकले जळा-आंत । मग उभारूनियां हात । काय बोलत तें ऐका ॥२५॥ सकळ वर्णांचे नारीनर। चतुष्पद आणि लहान थोर । कांहींच न करितां विचार । यावें सत्वर मजमागें ॥ २६॥ भय न धरावें चित्तांत । तुह्मांसि तारील पंढरीनाथ । ऐसी ऐकोनियां मात । संतोषे चित्त सकळांचें ॥ २७ ॥ ह्मणती संतोबा चालिले पंढरीसी । घोंट्याइतुकेंचि उदक जाहलें त्यांसी । आपण जाऊं तयासरसीं । ऐसें ह्मणती एकमेकां ॥ २८॥ अश्वांवरी ओझीं घालून । यात्रा उठिली न लागतां क्षण । एकापुढें एक करिती गमन । सरितेजवळी पातले ॥ २९ ॥ हें जाणूनि पंढरीनाथ । विचार करी चित्तांत । नदीस पूर आला बहुत । बुडतील समस्त जळामाजी ॥ १३० ॥ संतोबा तरला नामधारक । तरी त्याजऐसे नाहींत सकळ लोक । जेविं काष्ठ ह्मणोनि पाषाण देख । उदकीं टाकितां बुडतील कीं॥३१॥ आपण न करितां यांचें धांवणें । तरी भक्ताचें होईल असत्य वचन । यात्रा जळांत बुडतां जाण । तरी घेतील दर्शन कोण माझें।३२।आणि मागिल संतांचें वचन । असत्य मानितील विचक्षण । ऐसें ह्मणोनि जगज्जीवन । काय करिते जाहले ॥ ३३॥ पाठीवर यात्रा उतरावी सर्व । ह्मणोनि कांसव जाहले देवाधिदेव । ज्याचेनि आधारें सकळ जीव । ब्रह्मांडामाजी राहाटती ॥ ३४ ॥ नदीचें पात्र रुंद होतें । तेवढे जाहले रुक्मिणीकांत । निजदासांचे जगन्नाथ । चुकवी आघात नानापरी ॥३५॥ ब्रह्मादिकां पूज्य जगजेठी । ज्यासि अंतरीं जपतो धूर्जटी । तेणें यात्रेकऱ्यांसि दिधली पाठी । हे अपूर्व गोष्टी मज वाटे ॥ ३६॥ असो इकडे नारीनर । अठरा वर्णांचे लहानथोर । करीत हरिनामाचा गजर । एकदांचि सत्वर चालिले ॥३७॥ अश्व वृषभ आणि खर । ओझीं घालोनि तयांवर । वैष्णव करीत कीर्तनगजर । उदकामाजी प्रवेशले॥ ३८॥ तों घोंट्याइतुकेंच लागलें पाणी । सकळांसि आश्चर्य वाटलें मनीं । ह्मणती आपण उगेच कोंडोनी । राहिलों होतों अलीकडे ॥३९॥ एक आनंदें टाळ्या पिटिती । ह्मणती धन्य संतांची संगती । संतोष मानूनि ऐशा रीतीं । पैलतीरीं उतरले ।१४०। परी कूर्मरूप धरूनि तारिले देवें । हें न पडेचि कोणाप्रती ठावें । बिचित्रमायेनें सकळ जीव । मोहभ्रमांत पाडिले॥४१॥ मग यात्रेसाहित वैष्णवभक्त । पंढरपुरासि गेले त्वरित । स्नान करूनि चंद्रभागेंत । कीर्तन करिती सप्रेमें ॥४२ ॥ महाद्वारासि जाऊन । सकळ घालिती लोटांगण । देवासि देऊनि आलिंगन । वंदिले चरण सद्भावें ॥ ४३ ॥ संतोबा ह्मणे गा श्रीहरी । तूं भक्तां रक्षिसी नानापरी । तुझी कीर्ति वर्णितां बरी । शेषाची वैखरी शिणली कीं ॥ ४४ ॥ कांसवरूप धरूनि देवा । पाठीवर तारिलें जडजीवां । आतां मज चरणीं ठाव यावा । ऐसें संतोबा विनवित ॥ ४५॥ ऐसें ऐकोनि दीनदयाळ । हांसों लागले तयेवेळ । ह्मणे तूं माझा भक्त प्रेमळ । राहें सर्वकाळ मजपासीं ॥ ४६॥ आणिक कथा रसाळ पुढती । सादर ऐकिजे सभाग्यश्रोतीं । निळोबाची देखोनि भक्ती। पावले श्रीपती त्यालागीं ॥४७॥ज्यासी तुकारामें येऊनि स्वप्नीं । उपदेश दिधला कृपा करूनी । त्याचें चरित्र रसाळवाणी । ऐका श्रवणीं भाविक हो ॥ ४८ ॥ नेणे मान दांभिकपण । सद्भावें करी हरिकीर्तन । पुरातन संतांचीं वचनें बोलून । संतचरित्रें वर्णावीं ॥४९ ॥ मुलें लेंकुरें



सर्व असती । परी मी माझी ही नाठवे चित्तीं । सहज मिळेल जें अयाचित्तवृत्तीं । त्यांतही आतिथी पूजावा ॥ १५० ॥ तंव कोणे ऐके दिवसीं जाण । घरीं मांडिलें कन्येचें लग्न । सोयरे दांभिक अभक्त पूर्ण । घरीं सामग्री नसे किंचित॥५१॥ कांता ह्मणे तयाप्रती । तुमची ऐसी उदास वृत्ती । शेवटीं पिशुनांत होईल फजिती । ऐसें मजप्रती भासतसे ॥ ५२ ॥ ऐसें जाणोनियां जगज्जीवन । आपण जाहले वृद्धब्राह्मण । वस्त्र फाटकें नेसोनि जीर्ण । आले सत्वर त्या ठायीं ॥५३॥ दुसरें उपवस्त्र खांद्यावरी । किंचित सामग्री त्याचे पदरीं । निळोबासी ते अवसरीं । येऊनि काय बोलत॥५४॥मी निर्बळ ब्राह्मण आहें दीन । सामग्री किंचित आलों घेऊन । तयाचा स्वयंपाक करून । घालावें भोजन मजलागीं ॥ ५५ ॥विप्रासि नमन करूनियां । ह्मणे तुमची सामग्री पाहिजे कासया । आतां देवासि नैवेद्य दावूनियां।प्रसाद घ्यावा एथेंची ५६ यावरी काय बोले श्रीहरी । आमची इच्छा मिष्टान्नावरी। तरी पूर्णगर्भा करूनि सत्वरीं । भोजन पोटभरी घालावें ५७ निळोबा कांतेसि सांगत पाहीं । ब्राह्मणाची सामग्री ठेवीं । आणि स्वयंपाक करूनि ये समयीं । भोजन लवलाहीं घालावें ॥ ५८ ॥ अवश्य ह्मणोनि ते अवसरीं । शिधा घेतला आपले पदरीं । ह्मणे हे तों किंचित सामग्री । कैसा पोटभरी जेविशी तूं ॥ ५९ ॥ यावरी ह्मणे रुक्मिणीकांत । हें टाकी लग्नाचिये सामग्रींत । आणि तूं आपुलें घेऊनि त्वरित । मज क्षुधितासी तृप्त करीं ॥ १६० ॥ आणि माझें साहित्य नाहीं घेत । तरी मी सर्वथा न जेवीं येथ । वचन ऐकोनि प्रेमळभक्त । काय बोलत कांतेसी ॥ ६१॥ एका ब्राह्मणाकारण । भोजन घालितां संकट कोण । आतां सत्वर स्वयंपाक करून । करीं समाधान विप्राचें ॥६२॥ मग ह्मणे रुक्मिणीकांत । स्वयंपाकासी उशीर होईल बहुत । तरी अन्न निपजलें प्रस्तुत । तें भक्षूं त्वरित निजप्रीतीं ॥ ६३ ॥ तेव्हां निजभक्ताचे पंक्तीस । प्रीतीनें जेविले जगन्निवास । रात्रीं बैसूनियां स्वस्थमानसें । निळोबाबावास बोलती ॥६४॥ उदयीक तुमचे घरीं लग्न । उदक आणावयासि नाहीं ब्राह्मण । जरी ठेवाल मजकारण । तरी मिष्टान्नभोजन करीन मी ॥ ६५ ॥ आणि ईश्वरप्रीत्यर्थ तुमचे रांजणीं । घालीन चार घागरी पाणी । अवश्य ह्मणोनि तयेक्षणीं । निळोबा चरणीं लागला॥६६॥ दुसरे दिवशीं प्रातःकाळीं । सत्वर उठोनि वनमाळी । कोणासि नकळतां ते वेळीं । सडासंमार्जन पैं केलें ॥ ६७ ॥ तों वऱ्हाडी घेऊनि पांचशत । वरबाप आला अकस्मात । सीमांतपूजा करूनि त्वरित । जानवसांत राहिले ॥ ६८॥ साहित्यासी आले जगज्जीवन । ह्मणोनि सर्वथा न पडेचि उणें । कल्पतरूचे छायेसि बैसतां जाण । तरी उपवासी कोण राहील ॥६९॥ भास्कर घरीं आला पाहुणा । तरी अंधार सर्वथा पडेना । गंगा स्वयमेव बैसली रांजणां । तरी उणें जीवना नव्हे कीं ॥ १७० ॥ मेघची निजांगें घाली सडा । मग राहिल जागा कैसा कोरडा । कीं गजवदनें घालोनि दिधला धडा । तरी विद्यार्थी वेडा नव्हे कीं ॥ ७१ ॥ विधात्यानेंच दिधलें सुंदरपण । तेथें सामुद्रिकांत नयेची उणें । नातरी सरस्वतीनें केलें लेखन । तेथें न चुके व्यंजन सर्वथा ॥७२॥ तेविं लग्ना आले हृषीकेशी । तरी उणें न पडे साहित्यासी। कावडी घेऊनि खांद्यासी।उदक तांतडीसीं वाहातसे।७३।ब्राह्मणें

शिधा टाकिला कोठींत । तेणें ते सामग्री जाहली बहुत । पांचशें मनुष्य नित्य जेवीत । परी ते न सरे सर्वथा ॥७४॥ का-
माची होतां आडाडी । सामग्री देत अतितांतडीं । उच्छिष्टें काढूनि लवडसवडीं । अंगण झाडी अतिवेगें ॥ ७५ ॥ जे-
वित्या पदार्थ पडतां न्यून । आणोनि वाढी जगज्जीवन । सोयऱ्यांस विनवी कर जोडून । कीं स्वस्थ भोजन करावें
॥ ७६ ॥ निळोबा आश्चर्य करी मनांतून । ह्मणे हा ब्राह्मण फार सज्जन । सर्वस्वीं निभावलें प्रयोजन । पडों नेदी उणें स-
र्वथा ॥ ७७ ॥ मग ह्मणे प्रेमळभक्त । तुह्मीं कार्यासी पडलां बहुत । तरी आपुलें नामाभिधान निश्चित । सांगावें त्वरित
आह्मांसी ॥७८॥ यावरी ह्मणे जगज्जीवन । विठोबा माझें नामाभिधान । चारी दिवस मिष्टान्नभोजन । यथेच्छ जेवि-
लों तुमचे घरीं७९निळोबा विचारी मानसीं । कीं याचा उपकार न फिटे मजसीं । परी एक वस्त्र जाते समयीं यासी । म-
नोभावेंसीं अर्पावें ॥ १८० ॥ असो विप्रवेष घेऊनि तयाचे घरीं । पांच दिवस होते श्रीहरी । निजांगें कष्ट नानापरी । भ-
क्तां घरीं करीतसे ॥ ८१ ॥ वऱ्हाड बोळवून साहावे दिवसीं । निळोबा आले मंदिरासी । तयासवेंच हृषीकेशी । घरा-
सि आले तेधवां ॥ ८२ ॥ देवघरांत सर्वां देखत गेले । निमिष न लागतां अदृश्य जाहले । निळोबा ह्मणे विठोबास वहि-
लें । पाचारावें ये समयीं ॥ ८३ ॥ कोरा शेला घेऊनि त्वरित । ह्मणे त्यासि पांघरवूं एवढें वस्त्र । विठोबा ह्मणोनि हांका
मारित । तों राजीवनेत्र दिसेना ॥८४॥ इतुक्यांत समजलें चित्तांत । ह्मणे म्यां कष्टविला पंढरीनाथ । जळो या प्रपंचा-
ची संगत । घडलें विपरीत आजि बहु ॥ ८५॥ मग स्वप्नांत येऊनि रुक्मिणीवरें । निळोबाचे मस्तकीं ठेविला कर । कीं
मी कटावरी ठेवूनि कर । राहे निरंतर तुजपासीं ॥८६॥ त्याचे भक्तीस्तव श्रीहरी । अद्यापि आहेत पिंपळनेरीं । फाल्गु-
न वद्य द्वितीयेसी निर्धारीं । महोत्साह गजरीं होतसे ॥ ८७॥ आणिक एक चरित्र रसाळ गहन । धारुरकर उद्धवचि-
द्धन । ते सप्रेम करीत कीर्तन । देशावरासी चालिले ॥ ८८ ॥ जयाचीं पदपदांतरें बहुत । अनुभवरसिक जडाव अद्भु-
त । प्रेमळ विरक्त भाविक भक्त । भजनीं रत जाहला असे ॥८९॥ तंव एकदां चैत्र शुद्ध प्रतिपदेसी । अकस्मात आले बे-
दरासी । नगरांत कीर्तन तये दिवसीं । प्रेमोल्हासीं मांडिलें ॥ १९० ॥ श्रवणासि आले सज्ञानपंडित । इतर यातीचे भा-
विक भक्त । कीर्तन ऐकोनि सप्रेमभरित । रिझलें चित्त तयांचें ॥९१॥ माळ लावावी नगरांत । तों उद्धव तयासि काय
बोलत । श्रीरामजयंतीकरितां त्वरित । जाणें लागत धारुरा ॥ ९२ ॥ लोक ह्मणती त्या अवसरा । रामनवमी येथेंचि
करा । सकळांचा हेत देखोनि बरा । अवश्य ह्मणती तयांसी ॥९३॥ मग प्रशस्त वाडा पाहूनि त्वरित । मंडप उभारिला
तेथ । मखर करूनि तया-आंत । अयोध्यानाथ बैसविले ॥ ९४ ॥ हरिदास वैष्णव बोलावून । नित्य करीत हरिकीर्तन ।
नानापरीचीं पक्कान्नें करून । ब्राह्मणसंतर्पण करीतसे ॥ ९५ ॥ एकदा दिंड्या पताका घेऊनि सत्वर । मिरवत चालिले
वैष्णववीर । पुढें वाजंत्र्यांचा गजर । उल्हास थोर मांडिला ॥९६ ॥ सप्रेमभरें हरिदास गाती । तों मशिदीमाजी यवन
कुमती । बैसले होते सहजस्थितीं । ते काय बोलती एकमेकां ॥ ९७ ॥ उद्धवचिद्धनें हरिदास नाना । बोलावूनि मांडि-



ला कुफराणा । तरी आपण शेणमार करूनि जाणा । करूं विटंबना सकळांची ॥ ९८ ॥ तेव्हां यवनांचें प्राबल्य बहुत ।
कोणी न पाहे न्यायनीती । शहरीं गुंडे उन्मत्त बहुत । बैसले पांचशत ते ठायीं ॥९९॥ असो हरिदास सांगत नाचत । पुढें
वाद्यांचा गजर होत । मशिदीपुढें मिरवत । आले अकस्मात ते यवां ॥२००॥ तों ते टवाळ धांवले त्वरगतीं । वैष्णवांसि
शेणमार करिती । पताका हिरून घेतल्या किती । वैष्णवांसि ताडिती निजहस्तें ॥ २०१॥ वीणेच्या तोडोनि टाकिल्या
तारा । मृदंग फोडिले तया अवसरा । विक्षेप सकळांचे अंतरा । मग हरिदास घरां पातले ॥२॥ शिष्यसांप्रदायी येऊनि
त्वरित । उद्धवचिद्धनासि सांगती वृत्तांत । ऐसी ऐकतांचि मात । विक्षेप चित्तांत वाटला ॥ ३ ॥ जैसें दुग्धामाजी पडे
लवण । मग नासोनि जाय न लागतां क्षण । पक्कान्नासि शिवलें श्वान । मग स्वयंपाकीण तळमळी ॥४॥ कीं वधूवरें बैस-
लीं भोजनाकारण । तंव दीप विझविला पतंगानें । मग वरमायेचें विक्षेपे मन । तैसेंचि वाटलें तयांसी ॥५॥ नातरी ग्रास
घेतांचि क्षुधितासि । मुखांत अकस्मात गेली माशी । तेविं अविंधीं छळितां हरिदासांसी । उद्धवचिद्धनासी वाटलें ।६।
मग मखरापासीं जाऊन तत्वतां । ह्मणे जयजयाजी रघुनाथा । हें नव्हतें येत तुझिया चित्ता । तरी अट्टाहास वृथा कां के-
ला ॥७॥ तूं विश्वात्मा जानकीवरू । वसविसी सर्वांचें अंतरूं । मी कासया आतां खेद करूं । केला अनादरू संतांचा ।८।
मग रघुनाथाची मूर्ति उचलोनी । देव्हाऱ्यामाजी ठेविली तये क्षणीं । मखर टाकिलें मोडोनी । मंडप सोडोनी ठेविला ९
हरिदासांसि करून नमन । करीत बैसले श्रीरामभजन । तंव मारुती जाहले क्रोधायमान । ह्मणे बेदर घालीन पालथें
।२१०।माझा स्वामी श्रीरघुनाथ । त्याचा उत्सव करिती भक्त । त्या वैष्णवांसि गांजिलें येथ । तरी जिणें व्यर्थ पैं माझें ११
मग मशिदीवरी अंजनीसुत । उभा ठाकला जाऊनि त्वरित । टवाळगुंडे पांच शत । बैसले होते त्याखालीं ।१२। धरूनि
मशिदीची भिंती । निजकरें हालवितां मारुती । जवळ फकिराची झोंपडी होती । तेणें अवचितीं देखिलें ॥१३॥ तो फ-
कीर होता परम ज्ञानी । सत्वर उमजला आपुले मनीं । रामभक्तांसि छळिलें ह्मणोनी । मारुति क्षोभोनी पातला ।१४।
जोडूनियां बद्धांजली । हनुमंतासि ह्मणे ते वेळीं । माझी झोंपडी आहे खालीं । तरी हे वांचविली पाहिजे ॥ १५ ॥ गो-
ष्टी ऐकोनियां ऐसी । टवाळ ह्मणती एकमेकांसी । पिसें लागलें फकीरासी । बोलतो कोणासी कळेना ।१६।तो ह्मणे ए-
क वानर येऊन । मसीद पाडूं पाहे जाण । तरी तुह्मी आतांच उठोन । पळा बाहेर सत्वर॥१७॥ गुंडे बोलती तये संधीं । म-
सीद आहे चिरेबंदी । वानराचे पित्यासी त्रिशुद्धी । न पडेचि जाण सर्वथा ॥ १८ ॥ ऐसी ऐकतांचि मात । परम क्षोभला
श्रीरामदूत । निमिष न लागतां अकस्मात । मसीद पाडून टाकिली ॥१९॥ जाहला एकचि हाहाःकार । ह्मणती अघटित
जाहलें थोर । यवनवाड्यापासीं सत्वर । जाऊनि कोणी सांगती ।२२०। कीं मशीद पडिली अकस्मात । गुंडे मरूनि गे-
ले बहुत । तों त्याचे पोटीं शूळ अकस्मात । उठिला लोळत गडबडां ।२१। तों ज्या फकीरानें देखिला वानर । तो अविंधा-
सि जाऊनि सांगे सत्वर । कां उद्धवचिद्धन भक्त थोर । छळिलें साचार तयासी ॥ २२ ॥ टवाळांनीं केला शेणमार । तेणें

क्षोभला मारुतिवानर। मनांत करूनियां निकर। मसीद सत्वर पाडिली ॥ २३ ॥ ऐसी वार्ता ऐकूनि। भयभीत जाहला तो यवन। मग उद्धवचिद्धनाचे चरण। येऊनि वंदिले सद्भावें ॥ २४ ॥ रौप्यमुद्रा सहस्रवरी। आणूनि ठेविल्या पायांवरी। ह्मणे आपुला महोत्सव सुखरूप करीं। संकोच अंतरीं न धरितां ॥ २५ ॥ तुमचें छळण केलें ज्यांणीं। ते तत्काळ गेले मृत्युसदनीं। आतां मारुतीसि प्रार्थूनी। आह्मांलागोनी वांचवी ॥२६॥ नगरवासी होऊनि गोळा। तत्काळ मंडप उभा केला। मखर शृंगारूनि तयेवेळां। जानकीवरा बैसविलें ॥२७॥ टाळ मृदंग घेऊनि प्रीतीं। वैष्णव आनंदें गाती नाचती। द्वादशीपावेतों महोत्सव प्रीतीं। केला मारुती उल्हासें ॥ २८ ॥ साधुसंतांचा द्वेष करी। तयासि दुःख जन्मभरी। विघ्नें येती नानापरी। तयाचे घरीं शोधित॥२९॥ श्रीविठ्ठलाचे चरण आठवितां। सर्व विघ्नें जाती दूर पंथा। शरीरांतील रोगव्यथा। जाय निघोन ते काळीं ॥२३० ॥ असो त्रयोदशीस करूनि ललित। सकळ गौरविले हरिभक्त। भजनप्रसाद महीपती तेथ। मागे उचित संतांसीं॥२३१॥ स्वस्ति श्री भक्तविजयग्रंथ। ऐकतां तुष्टेल जगन्नाथ। प्रेमळ ऐका भाविक भक्त। षट्पंचाशत्तमाध्याय रसाळ हा ॥ २३२ ॥ अध्याय ५६ ॥ ओंव्या २३२ ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥



श्रीगणेशाय नमः। श्रीक्षीराब्धिवासाय नमः। जयजय क्षीराब्धिवासा मेघश्यामा। अनंतस्वरूपा अनंतनामा। अनंत अवतारा पुरुषोत्तमा। निगमासि महिमा न कळे तुझा ॥१॥ जयजय वैकुंठविलासिया। गुणसमुद्रा करुणालया। चरणीं महिमा जाणोनियां। समुद्रतनया तल्लीन ॥ २ ॥ जय गोकुलवासा घननीलवर्णा। गोरसचोरा मनमोहना। मथुरावासिया कंसमर्दना। धर्मस्थापका श्रीहरी ॥ ३॥ जय द्वारकावासी गरुडध्वजा। लीलानाटकी अधोक्षजा। अनुपम स्वरूपमहिमा तुझा। भीमकात्मजा एक जाणे॥४॥जयजय भीमातीरनिवासिया। पुंडलीकवरदानिया। भक्तांसि अभय देऊनियां। करिसी छाया कृपेचि॥ ५॥ त्वां अघटित केलें रुक्मिणीपती। ग्रंथ लिहविला मूढाहातीं। मशका अभय देऊनियां प्रीतीं। मेरु त्याहातीं उचलविला ॥ ६ ॥ मिळूनियां रीस वानर। त्यांहातीं घेवविलें लंकानगर। कीं ज्ञानदेवें देऊनि रेडिया वर। श्रुति साचार वदविल्या ॥७॥ कीं परिसें आपुला देऊनि गुण। लोहाचें केलें शुद्ध कांचन। कीं गंगेनें आपुलें पवित्रपण। वोहळासी अर्पण केलें कीं ॥ ८ ॥ नातरी कस्तूरीनें आपुले संगतीं देखा। ताजव्यांत जोखविली मृत्तिका। तेविं माझीं वचनें वैकुंठनायका। ग्रंथीं लिहिवीं कां निजकृपें ॥ ९ ॥ तूं सर्वांवरिष्ठ अधोक्षजा। प्रीतीनें करितोसि निजभक्तपूजा। नानाउपचार मांडितां वोजा। करितां लाजा न येशी तूं ॥१० ॥ निजभक्त गाती तुझीं स्तोत्रें। तुज आवडती त्यांचीं चरित्रें। मज पुढें करून निमित्तमात्र। वक्ता स्वतंत्र तूं एक ११ आतां सावधान होईजे श्रोतीं। शिखराध्यायासि आली कथा। जैसें कां दधिमंथन करितां। तों नवनीत अवचित देखिलें ।१२। नातरी चूतवृक्षासि घालितां पाणी। तों अमृतफळ देखिलें नयनीं। कां पदक घडिलें रत्नकोंदणीं। तें कंठीं येऊनि पडियेलें १३ कां पाकनिष्पत्तीची करितां खटपट। तंव अकस्मात लाभे पक्वान्नताट। कीं क्षेत्रीं करितां कष्ट। पीक घनवट आलें कीं १४ नातरी पंढरीस उत्साह जाहला। मग पौर्णिमेस मांडिला गोपाळकाला। तैसा शेवटील अध्याय मजला। आहे भासला त्या रीतीं॥१५॥अनंत संतांच्या कथा गहन। संख्या मोजितां अध्याय छप्पन्न। कीं छप्पन्नदेशींचीं महारत्नें जाण। सतेजपणें लखलखती ॥ १६॥ कीं छप्पन्न भाषांचा अन्वय। तो हा ग्रंथ भक्तविजय। श्रवणेंच भाविक पावती जय। हें सांगूं काय निजसुखें॥१७॥ कीं छप्पन्न देशींचीं शस्त्रें तीक्ष्ण। क्षमाकाळिका हातीं घेऊन। क्रोधमहिषावरी चढोन। आली ऐसें वाटतसे ॥१८॥ कीं छप्पन्न देशींच्या सरिता थोर। प्रेमरसाचें घेऊन नीर। श्रीपांडुरंग आनंदसागर। त्यासि धुंडिती निजप्रीतीं ॥ १९॥ कीं छप्पन्न देशींचे नृपराज। घेऊन हातीं विजयध्वज। ममतेचें परचक्र उडवूनि सहज। भद्रसायुज्य भोगिती ॥ २० ॥ या छपन्नांवरिष्ठ शिरोमणी। हा सत्तावन्नावा परिसा कानीं। जैसें जेवणाशेवटीं प्रीतीकरूनी। दध्योदन घेती श्रीमंत ॥ २१ ॥ मागील अध्यायाचे अंतीं जाण। यवनांनीं छळिले उद्धवचिद्धन। मग मारुतीनें चमत्कार दाखवून। महोत्सव पूर्ण करविला ॥ २२ ॥ आतां विसोबा सराफ प्रेमळ भक्त। पंढरीक्षेत्रीं होता राहात। देवधेव सावकारी करित। असोनि विरक्त संसारीं ॥ २३ ॥ चौघे पुत्र आणि कांता। ते सदा अनुकूल प-

तिव्रता । भ्रतारवचन न मोडी सर्वथा । काळ कठिण पडतांही ॥ २४ ॥ प्रपंचधंदा करितां जाण । विसोबा असत्य न
बोले वचन । क्षुधार्तियांसि घालावें अन्न । करूनि सन्मान आदरें ॥ २५ ॥ तों खरपड पडिलें अति कठिण । दोन पाय-
ल्यांची जाहली धारण । ब्राह्मण क्षुधातुर होऊन । सदनीं येऊन बैसती ॥ २६ ॥ दुष्काळीं करितां अन्नदान । धनधा-
न्य गेलें सरोन । तथापि या चक्रांकारण । दातयाचें जीवन कळेना ॥ २७ ॥ मातेचें दुग्ध निःशेष आटे । तरी बाळक
स्तनासि झगटे । कीं प्रजेनें भरिले उदंड तोटे । तरी राजासि खोटें वाटतसे ॥२८॥ बाप सदैव कीं दुबळा । हें सर्वथा ने-
णवे बाळकाला । तेविं दातयाचें दुःख याचकाला । अंतरीं सर्वथा कळेना ॥२९॥ विसोबाचिया सदनाप्रती । येऊन बै-
सती अन्नार्थी । तितक्यांसही यथाशक्ती । भोजन घालिती निजसत्वें ॥ ३० ॥ कोठें हात न चालतां जाण । मोडिले
अलंकार आणि भूषणें । मग थोर थोर भांडीं विकून । घाली भोजन याचकां ॥३१॥ टाकोनियां लौकिक ममता । टा-
कोनि संसाराची चिंता । सांडोनि निजदेहाची आस्था । पंढरीनाथा ध्यातसे ॥ ३२ ॥ क्षुधितांसि द्यावया नाहीं अन्न ।
ग्रामांत कोणी न देती उसणें । ह्मणती विसोबा सावकारी बुडवून । दिवा लावून बैसला ॥३३॥ एक ह्मणती अज्ञान नि-
श्चित । तयासि न कळे आपुलें हित । प्रपंच करूनि परमार्थ । सज्ञान साधिती विवेकें ॥३४॥ आतां विसोबासि जे पा-
तेजती । त्यांचीही ऐशी होईल गती । नरनारी बोलती येणें रीतीं । निंदा करिती सकळिक ॥ ३५ ॥ एक ह्मणती संचित
खोटें । धनधान्य आटलें जेथींच्या तेथें । अन्न घालितां यात्रेकऱ्यांतें । आळस यातें नयेच कीं ।३६। असो कासेगांवांत
होता पठाण । तयासि न कळे हें वर्तमान । त्यापासूनि कर्ज घेऊन । क्षुधितांस अन्न घालीतसे॥३७॥द्रव्य अखंड घेऊनि
येत । गणती जाहली शतें सात । दुहोतरा रोखा लिहून त्वरित । दिधला निश्चित तयासी ॥ ३८॥तंव एक रामपुरीबावा
सिद्धपुरुष । ते यात्रेसि आले पंढरीस । विसोबाचें सत्व पाहावयास। सोंग कुश्चळ घेतलें॥ ३९॥ह्मणे त्याची कैसी आहे
स्थिती । सम विषम पहाणें भूतीं । कीं सारिखीच करुणा सर्वांप्रती । हें आपण निश्चितीं पाहावें ॥४०॥ मोरींतील दुर्गंध
कर्दम घेतला । तो आपुले अंगासि लाविला। माजासि चिंध्यांचा कडदोरा बांधिला । लंगोटी नेसला अमंगळ॥४१॥
जेवावयासि पाहिजे पात्र । ह्मणोनि हातीं घेतलें खापर । यामिनी लोटली एक प्रहर । आले सत्वर मंदिरा ।४२।वेडि-
यासारिखी मारूनि हांक । ह्मणे माझे पोटीं लागली भूक । वचन ऐकोनि सम्यक ।विसोबा बाहेर पातले४३ओळखि-
ले नसतां महापुरुष । ह्मणे स्वामी कृपा केली विशेष । तरी भोजन करूनि सावकाश । जावें आश्रमास आपल्या।४४।
मग अन्नपात्र ठेवूनि सत्वर । आपण बैसले त्यासमोर । तों अंगास कर्दम लागला फार । दुर्गंधि थोर सुटलीसे ४५ उष्ण
उदक करून त्वरित । त्यासि धुतलें आपुले हातें । मग अंग पुसोनि स्वस्थचित्तें । दुसरी कौपीन नेसविली ॥४६॥गंधा-
क्षत अर्चन सोहळा । तुळसीमाळा घातल्या गळां । भोजन घालोनि त्याजला । नमस्कार केला साष्टांग॥४७॥तुळसी-
दळ मुखशुद्धीसी । देऊनि बोळविलें अतीतासी । रामपुरी विचारी मानसीं । ह्मणे आत्मज्ञान यासी ठसावलें ॥ ४८ ॥

व्याघ्र गायी आणि वृश्चिक । यांवरी सारिखा भाव देख । धुंडोनि पाहतां परीक्षक । तरी विरळा एक भेटेल कीं ॥ ४९ ॥
कीं राजा आणि दरिद्री । दोहींचा सन्मान सारिखाच करी । शोधूनि पाहतां पृथ्वीवरी । बहु यापरी नसती कीं॥५०॥
परद्रव्य आणि परस्त्री जाण । दृष्टीस लेखी जैसें वमन । धुंडाळोनियां त्रिभुवन । पहातां बहुत नसती कीं ॥ ५१ ॥ अना-
थ याचक आणि ब्राह्मण । दोहींचें सारिखें करी पूजन । त्याचे गृहीं रुक्मिणीरमण । रात्रंदिवस तिष्ठतसे ॥ ५२ ॥ वि-
सोबाची ऐशी वृत्ती । ह्मणूनि पूजिलें मजप्रती । ऐसें समजोनि आपुले चित्तीं । आश्रमाप्रती ते गेले ॥ ५३ ॥ तंव कासे-
गांवींच्या पठाणाकारण । वृत्तांत सांगे जाऊनि दुर्जन । कीं विसोबा दिवाळें काढून । दिवा लावून बैसला ॥ ५४ ॥
तरी तूं जाऊनि ऐशा समयीं । आपुलें द्रव्य मागून घेयीं । मग तो पंढरीस लवलाहीं । येऊनि काय बोलिला ॥ ५५ ॥
विसोबासि ह्मणे ते अवसरीं । माझें द्रव्य दे झडकरीं । नाहीं तरी तुझ्या द्वारीं । धरणें बैसतों ये वेळे ॥ ५६ ॥ ऐशी ऐको-
नियां मात । चिंतावला प्रेमळ भक्त । ह्मणे द्यावया ऐवज नाहीं दिसत । कैसी मात करावी ॥ ५७ ॥ मग धैर्य धरूनि
निजमानसीं । काय बोले सावकारासी । आजपासूनि सातवे दिवशीं । द्रव्य तुह्मांसी पाठवीन ॥ ५८ ॥ तो ह्मणे ब्रा-
ह्मणा विश्वास नाहीं मातें । तरी कोणी साक्षी ठेवीं येथें । मग मिळवूनि चवघां गृहस्थांतें । वायदा सांगत त्यांपासीं
॥ ५९ ॥ गृहस्थ पठाणासि सांगती बुद्धी । विसोबा असत्य न बोले कधीं । सातवे दिवशीं आधीं । द्रव्य पाठवूनी दे-
ईल ॥ ६० ॥ ऐसें ऐकूनियां उत्तर । तेथूनि उठिला सावकार । ह्मणे गोष्टी समजूनि दूरवर । आमचा लांझा वारावा
॥ ६१ ॥ ऐसें ह्मणोनि ते समयीं । पठाण गेला कासेगांवीं । ह्मणे वायदा पुरतां लवलाहीं । द्रव्य घेईन क्षणमात्रें ॥ ६२ ॥
असो सहा दिवस लोटलियावर । विसोबा मानसीं चिंतातुर । ह्मणे वाट पाहील सावकार । कैसा विचार करावा
॥ ६३ ॥ असत्य बोलिलों नव्हतों गोष्टी । ती आतां प्राक्तनीं आली शेवटीं । ऐसा उद्वेग करी पोटीं । विवेक दृष्टीकरू-
नियां ॥ ६४ ॥ करीत बैसला देवपूजन । परी कदापि स्वस्थ नव्हे मन । ऋणकऱ्याचें लागलें ध्यान । चंचळपण आव-
रेना ॥ ६५ ॥ ऐसें संकट देखोन । काय करीत रुक्मिणीरमण । विसोबाचा गुमास्ता पुरातन । त्याचें स्वरूप धरियेलें
॥६६॥ मुद्दल सात शतें द्रव्य होतें । तें व्याजसुद्धां घेऊनि पंढरीनाथ । कासेगांवीं जाऊनि त्वरित । पठाणासी बोलत ते-
धवां ।६७। मी विसोबाचा गुमास्ता पुरातन । विदित असे कीं तुह्मांकारण । तुमचा वायदा पुरला ह्मणोन । मजला ये-
थें पाठविलें॥६८॥तरी व्याजमुद्दल हिशेब करूनी । द्रव्य घ्यावें तुह्मीं मोजूनी । ऐसें बोलतां चक्रपाणी । सावकार मनीं
विस्मित॥६९॥मग पठाण पुसे ब्राह्मणाला । द्रव्य मिळत नव्हतें त्याजला । आणिक कोण सावकार पाहिला । आश्चर्य
आह्मांला वाटतसे।७०। यावरी बोले रुक्मिणीपती । विसोबाची सात्विक वृत्ती । असत्य न बोलेच कल्पांतीं । निश्चय
चित्तीं असों द्या ॥ ७१ ॥ सन्निध बैसोनि जगज्जीवनें । रोखा आणविला त्यापासून । ह्मणे चवघे गृहस्थ बोलावून । हि-
शेब करून घेई कां॥७२॥साक्ष ठेऊनि गांवींच्या लोकां । खरा करूनि दिधला पैका । त्यापासूनि घेऊनि रोखा । निज-

भक्तसखा काय करी।७३। सत्वर येऊनि पंढरपुरीं। गेला विसोबाचे घरीं। किंचित रोखा फाडोनि शिरीं। पुस्तकाभीतरीं बांधिला॥७४॥गीतेची पोथी सोडोनि पाहात। तों आपुले नांवाचें देखिलें खत। हस्ताक्षर ओळखितांचि त्वरित। विसोबा विस्मित मानसीं ॥७५॥ ह्मणे याचें वारिलें नसतां ऋण। रोखा कोणीं आणिला फाडोन। कांतापुत्रांसि वर्तमान। पुसते जाहले तेधवां॥७६॥फाटक्या खतासि देऊनि थिगळ। मागुती जोडिलें तत्काळ। ह्मणे ज्याचें त्यास ये वेळ। नेऊनि द्यावें आतांची ॥ ७७॥ ऐसें ह्मणूनि भाविक भक्त। कासेगांवीं गेले त्वरित। तंव पठाण भेटला बाजारांत। ह्मणे काय निमित्त आलेती ॥ ७८॥ तुमचा गुमास्ता पुरातन। आज प्रातःकाळीं आला त्वरेंकरून। व्याजसुद्धां द्रव्य देऊन। रोखा घेऊन गेला कीं॥ ७९॥विसोबा चित्तीं जाहले विस्मित। ह्मणे मजला तो हें नाहीं श्रुत। परी रोखा आजि पुस्तकांत। अकस्मात देखिला॥ ८० ॥ द्रव्य तंव नाहीं द्यावयासी। आणि खतही आले आह्मांपासीं। ह्मणोनि लवलाहें तुह्मांपासीं। सांगावयासी पातलों ॥८१॥ ऐसें बोलतां प्रेमळभक्त। सावकार ह्मणे असत्य मात। ऋण वारिलें ज्यां देखत। ते बोलावूनि त्वरित आणिले ॥८२॥ तेही तैसीच सांगती गोष्टी। मग आश्चर्य वाटलें याचे पोटीं। मग परतोनियां उठाउठी। पंढरी क्षेत्रासी पातला ॥ ८३ ॥ आपुला गुमास्ता बोलावून। वर्तमान पुसिलें त्यालागून। कैसें तुवां आमुचें वारिलें ऋण। यथार्थ सांगणें मजपासीं ॥ ८४ ॥ तो ह्मणे पांडुरंगाची शपथ। मज अणुमात्र नाहीं श्रुत। ऐसी ऐकतांचि मात। नेत्रीं अश्रुपात वाहती ॥ ८५ ॥ ह्मणे कृपासागरा जगजेठी। मजसाठीं तूं जाहलासि कष्टी। देवाचे चरणीं घातली मिठी। सद्गद पोटीं होऊनियां॥८६॥विसोबासि ह्मणे रुक्मिणीकांत। सकळ क्षेत्रीं प्रकटली मात। नरनारी आश्चर्य करिती। देखतां प्रचीत दृष्टीसी॥८७॥ संकटीं पडतां भक्त प्रेमळ। त्यासि तत्काळ पावे घननीळ। न विचारितां काळवेळ। दीनदयाळ कृपाळू ॥ ८८ ॥ मागें कृतीं त्रेतीं द्वापारांत। देवाचे अवतार साक्षात होत। भक्तांसि रक्षी भगवंत। हें नवल कोणतें ह्मणतसां ॥ ८९ ॥ आणि कलियुगीं प्रत्यक्ष पाषाणमूर्ती। बौद्धरूपें असतां श्रीपती। जनासि दाखवूनि नानाप्रचीती। वाढविली कीर्ती संतांची ॥ ९० ॥ परी तिहीं युगांपरीस कलियुग अधिक। ऐसें भागवतीं बोलिले शुक। येथें औटघटिकांत वैकुंठनायक। भेटतसे देख निजभक्तां ॥ ९१ ॥ परी एकचि आहे अडथळा। भक्त पाहिजे भाविक भोळा। जो विकल्पजाळीं नाहीं पडला। तयासि पावतो भगवंत ॥ ९२ ॥ होय न होय ह्मणूनि अंतरीं। दुश्चितपणें जो सेवा करी। तरी तो आपुल्या हितासि होऊनि वैरी। अंतरला दूरी हरिचरणा ॥ ९३ ॥ मानसीं इच्छी रुक्मिणीकांत। कीं संकटीं पडावे माझे भक्त। मग मी उडी घालूनि त्वरित। अद्भुत कीर्ती वाढवीन ॥९४॥ जैसा तारू बैसोनि सरितेकांठीं। ह्मणे बुडता पडावा माझे दृष्टीं। मग मी उडी घालूनि उठाउठी।काढीन संकटांतूनि तयासी ९५ कीं दानशीळ घालीन अन्नसत्र। रात्रदिवस हेचि इच्छित। ह्मणे मजपासीं आलिया क्षुधित। करीन तृप्त तयालागीं ॥९६॥नातरी सद्वैद्याचे वाटे चित्ता। कांहीं राजयासि व्हावी व्यथा। मग औषध देऊनि निजस्वार्था। रोग सवर्था दवडीन। ९७। कीं सज्ञान वक्तयांचे मनीं। संशय घेऊनि पुसावें कोणी। मग नानापरीच्या दृष्टांतवचनीं। आशंका फेडूनी टाकीन ॥९८॥ तेविं जघनीं ठेऊनि दोनी कर। मानसीं इच्छी रुक्मिणीवर। कीं भक्तांनीं घालोनि मजवरी भार। अघटित विचार करावा ९९मग पावून मी तयांप्रती। जगीं अद्भुत वाढवीन कीर्ती। हें सर्वदा चिंतीत श्रीपती। परी कोणी न करिती अधीर।१००।ज्यांणीं सोडोनि आशापाश। सांडिली नाशवंत देहाची आस। त्या निजभक्तांच्या कथा सुरस। ऐकिल्या सावकाश सज्जनीं।१।आतां ग्रंथारंभ जाहला जेथून। याचें पुढतीं करावें मनन। आधीं गणेशसरस्वती वंदून। सद्गुरुचरण आठविले ॥२॥ कलियुगीं दोष जाहले बहुत। हें क्षीरसागरीं जाहलें श्रुत। मग भक्तांसि सांगे लक्ष्मीकांत। अवतार घ्यावे मृत्युलोकीं ॥३॥ नाममहिमा प्रकट करून। भजनीं लावा सकळ जन। हें प्रथमाध्यायीं निरूपण। केलें श्रवण सकळिकीं।४।तस्करीं छळिलें जयदेवाकारण। पद्मावतीचे गेले प्राण। प्रेत उठविलें जगज्जीवनें। हें निरूपण दुसऱ्यांत ॥ ५ ॥ पाषाणनंदी जेविला अन्न। प्रेत उठविलें आशीर्वादेंकरून। तुळसीदासासि रघुनंदन। तृतीयाध्यायीं भेटले ॥ ६ ॥ शिंपल्यांत सांपडला नामाभक्त। दामशेटी आनंदला बहुत। गोणाईसी संवादले पंढरीनाथ। हें चौथ्यांत निरूपण ॥ ७ ॥ अयोनिसंभव भक्त कबीर। मोमिनागृहीं वाढला थोर। शेला विणोनि शार्ङ्गधरें। केला सत्वधीर निजकृपें ॥८॥ संतांसाठीं केली चोरी। कमाल वधिला आपुले करीं। नृपवरें घातला शूळावरी। साधूंनीं झडकरी उठविला ॥९॥ अंगणीं मिळाला वैष्णवमेळा। तेव्हां कबीरासि अयोध्यानाथ पावला। अगणित कबीर आपण जाहला। सप्तमाध्याय संपला येथून ॥११०॥निवृत्ति सोपान ज्ञानेश्वर। यतीचे पोटीं जाहले अवतार। त्यांस वाळींत घालिती द्विजवर। हे कथा सुंदर आठव्यांत ॥ ११॥ नवमाध्यायीं प्रसिद्ध। रेडियामुखीं बोलविले वेद। पितर जेवविले मंत्रशब्दें। हे लीला अगाध दाखविली ॥१२॥ ज्ञानदेवें पंढरीहूनी। नामयासि नेलें तीर्थाटनीं। हस्तनापुरीं हरिकीर्तनीं। गाई उठविली दशमांत ॥१३॥ कबीरकांता सत्वशीळ मोठी। वाणियासि अनुताप जाहला पोटीं। नामदेव आले त्याचिये भेटी। एकादशांत गोष्टी हे जाहली ॥१४॥ मारवाडांत तृषेनें पीडिलें। तें कूपांतील उदक वर आलें। नागनाथीं देवालय फिरविलें। हें द्वादशांत जाहलें निरूपण १५ त्रयोदशाध्यायीं माधवद्यांत। नामयासवें जेविले पंढरीनाथ। ह्मणोनि द्विजांनीं वाळीत। घातलें नकळत देवासी ॥ १६॥ निजभक्त बहु आवडती मज। हें रुक्मिणीस सांगती अधोक्षज। सत्यभामेनें नारदासि गुज। चतुर्दशाध्यायीं पुसिलें॥१७॥धरूनि चतुर्भुजरूप सगुण। द्विजासि साक्षात दिधलें दर्शन। ज्ञानदेवासी निरविलें जाण। हेंच निरूपण पंचदशाध्यायीं॥ १८ ॥ देव सांवत्याचे भेटीस गेला। उदर चिरून लपविलें त्याला। हें कौतुक दाखवूनि नामयाला। कूर्मदासा भेटला षोडशाध्यायीं ॥ १९ ॥ गोऱ्या कुंभारानें तुडविलें बाळकासी। कीर्तनांत पावले हृषीकेशी। थोंटे हात फुटले त्यासी। बाळक जननीस दीधलें॥१२० ॥ मांजरीचीं पिलीं घातलीं आव्यांत। तयांसि रक्षी पंढरीनाथ। राकाकुंभारासी वैराग्य अद्भुत। चरित्रें सत्राव्यांत हीं जाहलीं॥२१॥अठरा-

अ. ५७

वे अध्यायीं कथा अद्भुत । नामया हांसले सकळ संत । मग विसोबा गुरु पंढरीनाथें । करूनि दिधला त्यालागीं २२ आणि नामयानें लावितांच हात । वाळूचे तत्काळ जाहले परीस । हें कौतुक परशाभागवतास । दावूनि अनुग्रह दीधला ॥ २३ ॥ एकुणिसाव्यांत कथा ऐसी । हवालदारें छळिलें जगमित्रासी । मग व्याघ्ररूपें येऊन हृषीकेशी । कौतुक जनासी दाखविलें ॥ २४ ॥ जोग्यास अनुताप जाहला थोर । वृषभ लावूनि दंडविलें शरीर । तयासि भेटला शार्ङ्गधर । अभयवर दीधला ॥ २५ ॥ द्वैतभेद शंकर हरी । ऐसें मानी सोनार नरहरी । त्यासि एकरूपें भेटला मुरारी । विसाव्यांत परी हे जाहली ॥ २६ ॥ एकविसाव्यांत कथा अद्भुत । जनीसवें दळी पंढरीनाथ । तिचे अभंग स्वकरें लिहित । देखोनि संत हांसले ॥ २७ ॥ शंकरें पार्वतीस उपदेश केला । तो मत्स्याचे पोटीं मत्स्येंद्र जाहला । विभूतीचा गोरक्ष भला । उकरड्यांत जन्मला निजलीलें ॥ २८ ॥ चांगदेवें व्याघ्राचें वहन केलें । मग ज्ञानदेवें भिंतीसि चालविलें । विश्रांतवटाखालीं भेटले । बाविसाव्यांत चरित्र हें ॥ २९ ॥ तेविसाव्यांत चोखामेळा-आख्यान । आणि जीवा तत्वा दोघे ब्राह्मण । कबीराचे शिष्य जाहले ह्मणून । स्वयातीनें वाळिले ॥ १३० ॥ चोविसाव्यांत पद्मनाभाची कथा । व्याधि निरसली श्रीराम ह्मणतां । कबीरानें वाणियासि विकिली कांता । ऐसी वार्ता निरूपिली ॥ ३१ ॥ चर्मांत शाळग्राम घातला किमर्थ । ब्राह्मणें छळिला रोहिदासभक्त । मग उदरीं दाखविलें यज्ञोपवीत । पंचविसाव्यांत चरित्र हें ॥ ३२ ॥ सव्विसाव्यांत पिपाजीनें । अनुतापें राज्य दिधलें टाकून । द्वारकेहूनि येतां रामकृष्ण । उपदेश व्याघ्रासि दीधला ॥ ३३ ॥ नरसीमेहेत्याचें चरित्र थोर । तिसापावेतों अध्याय चार । तयासि भेटोनि श्रीशंकरें । रासमंडळ दाखविलें ॥ ३४ ॥ त्याच्या पुत्राचें करूनि लग्न । हुंडी भरी जगज्जीवन । कन्येचें होतां ओंटभरण । वस्त्रें भूषणें पुरविलीं ॥ ३५ ॥ रामदासाची भक्ति देखोनी । डाकुरासि आले चक्रपाणी । एकतिसाव्यांत चरित्र सज्जनीं । हेंचि वर्तलें जाणिजे ॥ ३६ ॥ बत्तिसाव्यांत मथुरेची मूर्ती । हरिद्वारीं आली चालोनि रातीं । ते[तिसाव्यां]त सुरदासाप्रती । मथुरेसि श्रीपती भेटले ॥ ३७ ॥ चवतिसाव्यांत कथा सुंदर । सेनान्हावी जाहला [र]क्मिणीवर । डोयी करूनि शार्ङ्गधरें । भुलविला नृपवर निजलीलें ॥ ३८ ॥ पस्तिसाव्यांत कथा अद्भुत । नृपवरें तोडविला आपुला हस्त । मग प्रसन्न होऊनि जगन्नाथ । केला पूर्ववत तैसाची ॥ ३९ ॥ कर्माबाईची देखोनि भक्ती । तिजसवें जेविली पाषाणमूर्ती । स्वप्न होतांच पूजाऱ्यांप्रती । आश्चर्य चित्तीं वाटलें ॥ १४० ॥ छत्तिसाव्यांत कथा दोन । सुरदासभक्त मदनमोहन । जनजसवंता उदकीं बुडवितां जाण । श्रीरघुनंदनें उचलिला ॥ ४१ ॥ सदतिसाव्यांत कथा सुंदर । प्रेमळभक्त रसिकमुरार । त्यागें वारणासि उपदेश करूनि सत्वर । भुलविला नृपवर क्षणमात्रें ॥ ४२ ॥ मिराबाई प्रेमळभक्त । तीस विषाचें जाहलें अमृत । अडतिसाव्यांत हें चरित्र । कथिलें असे भाविक हो ॥ ४३ ॥ कानोपात्रेस भेटले पंढरीनाथ । हे कथा एकुणचाळिसाव्यांत । चाळिसाव्यांत दामाजीपंतभक्त । रुक्मिणीकांतें रक्षिला ॥ ४४ ॥ एकेचाळिसाव्यांत मृत्युंजयाची ख्याती । लिंगें ओकविलीं

पा. २०७

श्वानाहातीं । बेचाळिसाव्यांत अश्व धरूनि हातीं । भानुदासासि श्रीपती भेटले ॥ ४५ ॥ वियानगरासि देव गेले । मग पंढरीलागीं भानुदास घेऊनि आले । शूळासि अकस्मात पल्लव फुटले । हें चरित्र परिसिलें सज्जनीं ॥ ४६ ॥ त्रेचाळिसाव्यांत बहिरंभटाप्रती । नागनाथें जन्म दिधला मारुती । करूनि त्याची संशयनिवृत्ती । आत्मज्ञानप्राप्ती पैं केली ॥ ४७ ॥ पंचेचाळिसाव्यांत एकनाथ-आख्यान । जनार्दनासि गेले शरण । त्यास श्रीदत्तदर्शन । करूनि प्रसाद दीधला ॥ ४८ ॥ शेचाळिसाव्यांत ब्राह्मणवेषें । सेवा केली द्वारकाधीशें । मग लोटलिया द्वादश वर्षें । एकनाथासी श्रुत जाहलें ॥ ४९ ॥ साक्षात अवतार मारुतीचा जाण । रामदास पळाले पड्याआडून । मग पंढरीसी रुक्मिणीरमण । रामरूप धरून भेटले ॥ १५० ॥ अट्ठेचाळिसाव्यांत कथा ऐसी । वैराग्य जाहलें तुकयासी । कीर्तनांत येऊनि हृषीकेशी । परचक्रासि निवारिलें ॥ ५१ ॥ एकुणपन्नासाव्यांत ऐशा रीतीं । उपदेश केला कांतेप्रती । गृह लुटविलें विप्रांहातीं । उदारवृत्ति धरियेली ॥ ५२ ॥ पन्नासाव्यांत कथा सुरस । तुकयाचे पाठीवर मारिला ऊंस । मग पत्र लिहूनि करुणारस । पंढरीस पाठविलें ॥ ५३ ॥ निंबराजाच्या खांद्यावरी । कीर्तनांत उभे राहिले हरी । एकावन्नाव्यांत ऐशियापरी । कथा चतुरीं जाणिजे ॥ ५४ ॥ हिलाल लागूनि मंडप जळत । शेखमहंमदासि जाहलें श्रुत । कोरड्याच वह्या उदकांत । बावन्नाव्यांत निघाल्या ॥ ५५ ॥ बोधल्यानें लुटविलें शेत । सारा देत पंढरीनाथ । थोंटच्या ताटांसि कणसें बहुत । त्रेपन्नाव्यांत आणिलीं कीं ॥ ५६ ॥ कीर्तनांत उठविलें प्रेत । हांसीकुणबीण केली गुप्त । अंत्यजास केलें फजीत । चौपन्नाव्यांत कथा हे ॥ ५७ ॥ पंचावन्नाव्यांत चरित्रें चार । श्रोतीं ऐकिलीं असतील सादरें । गणेशनाथें तरुवर । उपदेशिला निजकृपें ॥ ५८ ॥ आणि केशवस्वामीच्या कीर्तनांत । बचनाग खातां वांचले भक्त । गोमाईसि उतरूनि पंढरीनाथें । पानगे प्रीतीनें खादले ॥ ५९ ॥ लतिबशाहाचा भाव देखिला । चित्रानें तत्काळ विडा घेतला । यवनराजा चरणीं लागला । मग मंदिरासि गेला सत्वर ॥ १६० ॥ छप्पन्नाव्यांत कथा अपूर्व । संतोबापवाराचा देखोनि भाव । कूर्म होऊनि देवाधिदेवें । यात्रा सर्व उतरिली ॥ ६१ ॥ निळोबाचे लग्नीं साहित्य केलें । बेदरीं मारुतीनें मसीदीस पाडिलें । उद्धवचिद्घनासि साहित्य केलें । छप्पन्नाव्यांत वर्तलें चरित्र हें ॥ ६२ ॥ विसोबा सराफ भाविक पूर्ण ! त्याचें सत्तावन्नाव्यांत वारिलें ऋण । हें तो प्रस्तुत अनुसंधान । केलें श्रवण सकळिकीं ॥ ६३ ॥ हे छप्पन्नदेशींचे राजहंस । भक्तकथा घेऊनि मुक्ताघोंस । सत्तावन्नावा सरोवर मानस । एथें क्रीडावयास एकवटले ६४ प्रपंच आणि परमार्थ दोनी । एकवटलें होतें पय पाणी । मग विवेकचंचूसि खोऊनी । क्षीरचि निवडूनी घेतलें ॥ ६५ ॥ हीं छप्पन्न रत्नें अमूल्य चोखट । सत्तावन्नावा सुवर्ण तगट । कोंदणीं बैसवूनि एकवट । वैकुंठपीठ पूजिला ॥ ६६ ॥ निष्काम भक्त आणि प्रेमळ । ह्या तुळसीमंजिऱ्या कोमळ । यांची गुंफोनियां माळ । दीनदयाळ पूजिला । ६७ । कीं छप्पन्न देशींचे पाषाण निर्मळ । सत्तावन्नावा उत्तम स्थळ । तेथें रचोनि यांचें देऊळ । आंत घननीळ बैसविला । ६८ । आणिक संत वैष्णव महंत । भक्त प्रकट जाहले बहुत । ते

मोकळीं सुमनें घेऊनि निश्चित । पुष्पांजळी अर्पावी ॥६९॥ भर्तृहरी जालंधर । सदानंद शंकराचार्य । गोपीचंद राजा उदार । नरसिंहनागर विवेकी ॥ १७० ॥ हिरासिंगवाणी गुर्जर । मलुकदास गंगकवीश्वर । चर्पटी चौरंगी भक्त थोर । शार्ङ्गधर वश केला ॥७१॥धनाजाट बाजी दखान । बाबा आणि नानकसदन । नरसिंह भारती नारायण । अच्युताश्रम विवेकी ॥७२॥हळसी अवघड मुधयाभक्त । मुकुंदराज जगविख्यात । जेणें विवेकसिंधु अध्यात्म ग्रंथ । निजबुद्धीनें रचियेला ॥ ७३ ॥ कृष्णंभट याज्ञवल्की । कृष्णदास मुद्गल विवेकी । कान्हया हरिदास नामापाठकी । हे प्रसिद्ध लोकीं निजभक्त ।७४।लोलिंबराज चांद बोधला । शेखफरीद प्रसिद्ध भला । शेखहुसेन सख्यागळा । हे भक्त देवाला आवडती ॥ ७५॥ नरहरि जयराम माळोपंत । नरसिंहसरस्वती प्रेमळभक्त । महामुद्गलभट जगविख्यात । जानकीकांत वश केला ॥ ७६॥ एकलिंग मैराळसिद्ध । सुमति कमळाकर प्रसिद्ध । रेणुकानंदन आनंदकंद । लीला अगाध जयाची ॥७७॥ श्रीपति आणि दासोपंत । माधवदास जगविख्यात । प्रल्हाद बडवे बापूजीपंत । हे देवासि बहुत आवडते॥७८॥गोसावीनंदन स्वामी वामन । शिरीबाई चिन्मयनंदन । बस्वलिंगाचें ऐकून कीर्तन । जगज्जीवन संतोषे॥७९॥अंतोबा आणि भगवंतभट । विठ्ठलपुरंदर एकनिष्ठ । मैनावतीची देखोनि निकट । वैकुंठपीठ संतोषले ॥१८०॥ लालुनखोजी परमानंद । दादुपिंजारी पूर्णानंद । बहिणाबाईचा प्रेमच्छंद । नाचे गोविंद कीर्तनीं ॥८१॥ हरिविजय रामविजयसार । पांडवप्रताप ग्रंथ थोर । तो श्रीधरस्वामी नाझरेकर । पंढरपुरनिवासी॥८२॥शिवरामगोसावी पैठणकर । नारायण निंबयाचा कुमर । त्याचा ऐकोनि कीर्तनगजर । रुक्मिणीवर संतोषे।८३।तुकयाचा बंधु कान्हया जाण । धाकुटा कुमर नारायण । जेणें कांतेचा त्याग करून । केलें गमन द्वारकेसी ॥८४॥ बोधल्याचा नातु भगवंतबावा । तैसाचि देठणकर नरोबा बावा । ज्याचा कीर्तनीं अखंड हेवा । गाइलें देवा निजप्रेमें ॥ ८५॥ आनंदतनय प्रसिद्ध जनीं । रघुपतिशेष पूर्णज्ञानी । जयाचें कीर्तन ऐकोनि कानीं । अतिमूढ ज्ञानी झाले ॥ ८६॥ शेंदुरवादियांत साचार । मध्वमुनीश्वर भक्त थोर । जो पद्यरचनीं अतिचतुर । शार्ङ्गधर वश केला ॥८७॥ शंकरजीबावा शिउरकर । ज्याचा कीर्तनगजर थोर । सिद्धांतज्ञानी अतिउदार । पाखंडीयांवर पंचानन ॥ ८८॥ अमृतराय भक्त प्रेमळ । ज्याचें कवित्व अतिरसाळ । श्रवणीं ऐकती निंदक खळ । द्रवती तत्काळ निजप्रेमें ॥ ८९ ॥ ऐसे संत प्रेमळ जनीं । जे ईश्वरकृपेचे वरदानी । तयांचिया निजचरणीं । नमन माझें साष्टांग ॥१९०॥ मोरेश्वरबावा तांबवेकर । जो भागवतधर्मीं अतितत्पर । त्याचे चरणीं वारंवार । नमन माझें साष्टांग ॥ ९१ ॥ जे एकनिष्ठा धरूनि अंतरीं । झाले पंढरीचे वारकरी । त्या प्रेमळभक्तांचे चरणावरी । नमन माझें साष्टांग ॥ ९२ ॥ धरूनि सप्रेमउल्हास । ज्यांणीं पंढरीस केला वास । त्या क्षेत्रवासियां निजभक्तांस । नमन माझें साष्टांग ॥ ९३ ॥ आणिकही पुढें वैष्णवभक्त । गुप्त प्रगट होणार बहुत । त्यांचे चरणीं भावार्थ । माझा प्रणिपात साष्टांग।९४।असंख्य ईश्वराच्या विभूती । गणती घेतां न पुरे मती । जेविं पर्जन्याच्या धारा पडतां क्षि-

अ. ५७ पा. २०८

तीं । त्या न मोजवती सर्वथा ॥९५॥ पृथ्वीवरी अंकुर उठले देख । त्यांचा सर्वथा नव्हेचि लेख । कीं सागरींच्या लहरी अनेक । धरावा लेख कोठवरी ।९६। जो लीलानाटकी रुक्मिणीकांत । आपणचि जाहला देवभक्त । तयासीच पाहतां सकळ संत । आले दृष्टीं अनायासें।९७।घेतां सागराचें दर्शन । सकळ सरितांचें देखिलें जीवन । कां भास्करासि करितां नमन । सकळ किरण देखिले ॥९८॥अश्वत्थासि प्रदक्षिणा करितां देखा । तरी त्यांतच आल्या सकळ शाखा । तेविं निजभक्तां वैकुंठनायका । द्वैत सर्वथा नसे कीं॥९९॥गोडी आणि साखर जैसी । निवडितां नये चतुरासी । तेविं निजभक्त आणि भीमातीरवासी । एकचि मानसीं जाणिजे ॥२००॥ या दोहींचे कृपेंकरून । भक्तविजय जाहला निर्माण । श्रोतयांचे मनोरथ पूर्ण । श्रवणमात्रें होतील कीं ॥ १ ॥ जे भक्तचरित्रें अखंड गात । तयांसि ज्ञान होईल अद्भुत । कृपा करूनि पंढरीनाथ । भेटेल निश्चित त्यांलागीं ॥ २ ॥ ग्रंथसंग्रह करितां घरीं । तरी विघ्नें न येती त्यांचें मंदिरीं । भोंवतें सुदर्शन घिरटी करी । निश्चय अंतरीं असों द्या ॥३॥ या ग्रंथामाजी हेंचि कथन । कीं भक्तांसि पावला जगज्जीवन । ह्मणोनि श्रोतयावक्तयांकारण । रुक्मिणीरमण रक्षिता।४।कलियुगींचीं चरित्रें ऐकोनी । सामान्य न ह्मणावीं विचक्षणीं । कृतत्रेताद्वापरालागूनी । थोरथोर मुनी गातील । ५ । कलीचा प्रारंभ होतांचि त्वरित । सुरवर आनंदले बहुत । कीं औट घटिका करितां एकाग्रचित्त । वैकुंठनाथ भेटेल कीं ।६। तंव नारदमुनीनें कौतुक केलें । जिह्वा शिश्न हातीं धरिलें । सकळ देवांस आश्चर्य वाटलें । मग पुसते जाहले तयासी॥७॥ यावरी बोले ब्रह्मसुत । हे दोनी नावरती कलियुगांत । सुरवरीं ऐकतां हे मात । चिंताक्रांत मानसीं ॥ ८ ॥ मग नारद सांगे तयांप्रती । कलियुगीं वैष्णवभक्त जे होती । त्यांचीं चरित्रें जे ऐकती । त्यांसि वैकुंठपती भेटेल।९।ऐसें बोलतां ब्रह्मनंदन । विबुध आनंदले संपूर्ण। ह्मणती हें स्वल्प साधन । आह्मांकारण मानलें ॥२१०॥ ह्मणोनि महर्षि आणि इंद्रादिकांसी । भक्तचरित्रें पावन तयांसी । विचक्षणीं वचनें ऐकूनि ऐसीं । विकल्प मानसीं न धरावा ॥११॥ जैसी आज्ञा केली रुक्मिणीवरें । तितुकींच ग्रंथीं लिहिलीं अक्षरें । जैसा वाजविणार ... किती वारें । तैसींच वाजंत्रीं वाजती ॥१२॥ क्षेत्रांत बीज पेरिलें जाण । अंकुर येणें जीवनाधीन । कीं जळमंटपीय ... नाचणें जाण । कळसूत्राधीन असे कीं ॥ १३ ॥ तेविं भक्तविजयग्रंथीं । बुद्धीचा दाता श्रीरुक्मिणीपती । तेणें उजव... नेयां माझी मती । ग्रंथ निजयुक्तीं लिहविला ॥१४॥ शके सोळाशें चव्र्यायशी । चित्रभानु नाम संवत्सरासी । वैशाखवद्यद्वादशीसी । ग्रंथ सिद्धीसी पावविला ॥१५॥ प्रवरेपासूनि दक्षिणेस । ताहाराबाद गांव पांचकोस । भक्तविजय अतिसुरस । झाला असे ते ठायीं ॥१६॥ शेवटील विनवणी आतां । माझी ऐकें गा पंढरीनाथा । तूंचि श्रोता आणि वक्ता । ग्रंथरक्षिता निजकृपें ।१७।तूं अखिल अविनाश जगद्गुरू । मायातीत सर्वेश्वरू । निराधारीयांसि आधारू । करिसी भवपारू दासांसी ॥१८॥ भक्तांनीं जैसी घेतली आळ । ती तूं पुरविसी तत्काळ । त्यांचें प्रेम देखोनि निर्मळ । हृदयकमळीं वसविलें ॥ १९ ॥ कोणासि दिधलें आत्मज्ञान । कोणीं मागीतलें सायुज्यसदन । माझें हेंचि इच्छितसे मन । जे

गुण वर्णीन हरीचे।२२०।कोणी बैसले वज्रासनीं। कोणी बैसले वैकुंठभुवनीं।मी निजदासांचे कीर्तनीं।झालों रत सप्रेमें।२२१।अविट आवडी धरूनि चित्तीं।तुझिया दासांची वर्णिली स्तुती।हेंचि उचित महीपती।मागे निजप्रीतीं निरंतर ॥२२॥ स्वस्ति श्रीभक्तविजयग्रंथ।ऐकतां तुष्टेल जगन्नाथ।प्रेमळ ऐका भाविकभक्त।सप्तपंचाशत्तमाध्याय रसाळ हा ॥ २२३ ॥ अध्याय ५७ ॥ ओंव्या २२३ ॥ श्री गोपाळकृष्णार्पणमस्तु ॥ इति श्री भक्तविजयग्रंथः समाप्तः ॥



हा ग्रंथ पुणें येथें आर्यभूषण छापखान्यांत हरी नारायण गोखले यांनीं छापिला. अश्विन शुद्ध १० गुरुवार शके १८१८.

